भारतरत्न म. म. डॉ. काणेकृत

# धर्मशास्त्राचा इतिहास

## सारांशरूप ग्रंथ

उत्तरार्ध

अनुवादक

यशवंत आबाजी भट

बी. कॉम




महाराष्ट्र राज्य
साहित्य व संस्कृति मंडळ
१९८०

सारग्रंथमाला — १

भारतरत्न म. म. डॉ. काणेकृत

# धर्मशास्त्राचा इतिहास

(सारांशरूप ग्रंथ)
उत्तरार्ध

अनुवादक :
यशवंत आबाजी भट,
बी. कॉम.




महाराष्ट्र राज्य
साहित्य व संस्कृति मंडळ
१९८०

# ‘धर्मशास्त्राचा इतिहास’ (उत्तरार्ध)

# सारांश अनुवाद.

### अनुवादकाराचे अल्प निवेदन.

म. म. डॉ. काणे ह्यांच्या मूळ इंग्रजी ग्रंथाच्या चौथ्या आणि पांचव्या खंडांचा सारांश अनुवाद ह्या उत्तरार्धांत आला आहे.

पूर्वार्धात समाविष्ट झालेल्या मूळ ग्रंथाच्या पहिल्या खंडासंबंधी पुढील खुलासा करावा असे वाटते. त्या खंडाची इंग्रजीतील पहिली आवृत्ती सन १९३० मध्ये प्रसिद्ध झाली होती. त्या आवृत्तीच्या प्रती संपत आल्या होत्या आणि त्यामुळे त्या खंडाची दुसरी आवृत्ती काढण्याची आवश्यकता भांडारकर संस्थेला वाटू लागली. त्याचप्रमाणे सन १९३० नंतरच्या काळांत धर्मशास्त्राच्या विषयासंबंधी बरेच वाङ्मय भारतात आणि परदेशात प्रसिद्ध झाले होते आणि त्या वाङ्मयाचा परामर्श घ्यावा असे म. म. काणे यांना वाटत होते. अशा रीतीने सुधारलेली आवृत्ती म. म. काणे ह्यांनी तयार केली असून तिचे प्रकाशन भांडारकर संस्थेतर्फे होत आहे. त्या आवृत्तीत म. म. काणे ह्यांनी बराच नवा मजकूर घातला असल्याने ती फार मोठी झाली आहे आणि तिच्या ५८३ पृष्ठांचा पहिला भाग सन १९६८ मध्ये प्रसिद्ध झाला आहे.

त्या आवृत्तीत घातलेल्या महत्त्वाच्या नवीन मजकुराचा मराठी सारांश अनुवाद पूर्वार्धात देणे शक्य नव्हते परंतु प्रस्तुत उत्तरार्धांत परिशिष्ट म्हणून घालण्याची इच्छा होती. तथापि ती सुधारलेली संपूर्ण आवृत्ती अद्यापि प्रकाशित झालेली नसल्यामुळे तसे करता आले नाही ह्याबद्दल वाईट वाटते.

दि.११ एप्रिल १९७१<br>
तळे, ता. माणगाव<br>
जि. कुलाबा

**यशवंत आबाजी भट**

# अनुक्रमणिका

# धर्मशास्त्राचा इतिहास

## पूर्वार्ध आणि उत्तरार्ध

### त्रोटक विषयवार सूची

**अ**

आपस्तम्ब स्मृति पू., उ.

आर्य पू.

आर्यभट उ.

आर्यश्री मंजुश्री मूलकल्प उ.

आर्यसिद्धान्त उ.

आर्यावर्त पू.

आशौच उ.

आशौच दशक पू.

आशौच सागर पू.

आश्वलायन (लघु) उ.

आश्वलायन गृह्यसूत्र पू., उ.

आश्वलायन धर्मसूत्र उ.

आश्वलायन श्रौतसूत्र. पू., उ.

आश्रम पू.

आसुरी उ.

आह्निक कर्म आणि आचार; पू.

## इ-ई

इंडियन अँटिक्वेरी पू., उ.

इंडियन एफिमरी उ.

इंडियन लॉ रिपोर्ट, पू.

इंडिया उ.

इंडिया ऑफिस सूची पू.

इध्मप्रव्रश्चन पू.

ईशान संहिता उ.

## उ-ऊ

उज्वला पू.

उत्पल टीका (बृ. सं. वरील) उ.

उदकशांति उ.

उद्दालक व्रत उ.

उद्वाहतत्त्व पू., उ.

**औ**



**क**

**ख**



**ग**

**घ**



**च**



**छ**



**ज**

**ट**



**ड**

**त**



**थ**

## द

निबंध ग्रंथ पू.

नियती उ.

निर्णयसिंधु (कमलाकर भट्टकृत) पू.

निर्णयसिंधु (कमलाकर भट्टकृत) उ.

निर्णयामृत उ.

निरुक्त पू. उ.

निष्पन्न योगावली उ.

नीतिप्रकाशिका (जनमेजयकृत) पू.

नीतिवाक्यामृत पू.

नीलकंठभट्ट आणि त्याचे ग्रंथ पू.

नृसिंह पुराण उ.

न्यायमुक्तावली (अपरार्ककृत) पू.

न्यायसूत्र उ.

न्यूजबार उ.

**प**

पङ्क्तिदूषण पू.

पङ्क्तिपावन पू.

पञ्चमहायज्ञ पू.

पञ्चशिख उ.

पञ्चसिद्धान्तिका उ.

पञ्चांग उ.

पञ्चांग संशोधन समितीचा अहवाल उ.

पडद्याची चाल पू.

पतञ्जलीचे महाभाष्य उ.

पद्मपाद उ.

पद्मपुराण उ.

परलोक विद्याशास्त्र उ.

परशुराम कल्पसूत्र उ.

पराशर उ.

पराशरमाधवीय उ.

पराशर ज्योतिष पू., उ. बृहत् पू.

पराशर वृद्ध पू., उ.

परिव्राजक अथवा भास्करिन् पू.

परिभाषा प्रकरण उ.

पवित्रेष्टि उ.

पाणिनी पू., उ.

पातक उ.

पार्थसारथी मिश्र उ.

पारस्कर पू.

पारस्कर गृह्यसूत्र पू., उ.

पारानन्द तंत्र उ.

पारानंद सूत्र उ.

पाराशर्य पू.

पिङ्गिलाचे छंदःशास्त्र उ.

पितामह स्मृति पू.

पितामह सिद्धान्त उ.

पितृभक्ति उ.

पुनर्जन्म उ.

पुराणे उ.

पुरुषसूक्त पू.

पुरुषार्थ पू.

पुलस्त्य पू. उ.

पूर्वमीमांसा सूत्र उ.

पृथ्वीचंद्रोदय उ.

पेशवे दप्तर उ.

पैठीनसी पू. (सूत्र)

पौर्वात्यांचे धर्मग्रंथ पू., उ.

पौन्ड्रक पू.

प्रकाश अथवा महार्णव प्रकाश
अथवा महार्णव पू., टी,

प्रचेतस्
बृहेत्प्रचेतस
वृद्धप्रचेतस्
} पू.

प्रजापती स्मृति पू. , उ.
प्रज्ञोपायतंत्र उ.
प्रज्ञोपाय विनिश्चय सिद्धी उ.
प्रतापरुद्रदेव पू.
प्रतिष्ठामयूख (नीलकंठकृत) पू.
प्रतिष्ठा आणि उत्सर्ग पू.
प्रतिमापूजन पू.
प्रपा-अथवा पाणपोई पू.
प्रपंचसार उ.
प्रपंचहृदय उ.
प्रपौत्रदर्शनशांति उ.
प्रभाकर ग्रंथकार उ.
प्रभातखंड उ.
प्रयोगरत्न (नारायणभट्टकृत) पू,
प्रवराची व्याख्या पू.
प्रश्नउपनिषद् उ.
प्राचेतस् पू.
प्राणायाम उ.
प्रायश्चित्त–प्रकाश उ.
प्रायश्चित्त तत्व उ.
प्रायश्चित्त प्रकरण उ.
प्रायश्चित्त मयूख उ.
प्रायश्चित्त सार उ.
प्रायश्चित्त विपाक उ.
प्रायश्चित्त विवेक उ.
प्रायश्चित्त इंदुशेखर उ.
प्रारब्धध्यान्त संहति उ.

**फ**

फाहिएन उ.
फिलास्ट्राटस् कृत-
अपोलोनियसचे चरित्र उ.

**ब**

बौधायन मीमांसाशास्त्रावरील कृतकोटि
नांवाचे भाष्य उ.

बौधायन गृह्य शेषसूत्र पू.

बौधायन गृह्य शेषसूत्र उ.

बौधायन परिभाषा पू.

बौधायन धर्मसूत्र पू.

बौधायन पितृमेधसूत्र उ.

बौधायन श्रौतसूत्र पू.

बौधायन श्रौतसूत्र उ.

बौधायन श्रौतसूत्र (प्रवराध्याय) पू.

ब्रह्मगुप्त उ.

ब्रह्मचर्य पू.

ब्रह्मपुराण पू.

ब्रह्मपुराण उ. (तीर्थकल्प)

ब्रह्मसूत्र पू.

ब्रह्मर्षिदेश (व्याख्या) पू.

ब्रह्मवैवर्त पुराण उ.

ब्रह्मस्फुट सिद्धान्त उ.

ब्रह्मसिद्धान्त उ.

ब्रह्महत्या उ.

ब्रह्माण्डपुराण उ.

ब्रह्मावर्त (व्याख्या) पू.

ब्राह्मण ग्रंथ उ.

ब्राह्मण वर्ण पू.

**भ**

भक्तिपंथ उ.

भगवद्‌गीता पू., उ.

भगवंत भास्कर ग्रंथ (नीलकंठकृत). पू.

भट्टोजी (टीकाकार) पू., उ.

भट्टोजीकृत चतुर्विंशति मतावरील टीका पू.

भर्तृयज्ञ टीकाकार पू.

**म**

मदनपारिजात उ.

मदनरत्न उ.

मध्यदेश (व्याख्या) पू.

मनु स्वायंभुव पू.

मनुस्मृति पू.

वृद्ध मनु उ.

मरीचि स्मृति पू.

महाभाष्य पू.

महाप्रस्थान पू.

महाभारत पू., (शांती) (सभा) (शांति), (शां) (शां) (शां) (उद्यो), (अनु), (अनु), (अनु) (अनु), (विरा) (वन), (अनु) (उद्यो), (शां), (शां), (उद्यो) (भीष्म) (अनु) (उद्यो) (वन) उ., (शांति), (अनु), (अनु), (अनु), (अनु), (अनु), (वन), (वन), (वन), (वन), (अनु), (वन), (अनु), (अनु), (अनु), (सभा), (अनु), (वन), (शल्य), (सभा), (सभा), (सभा), (सभा), (शांति), (शांति), (अनु), (शांति), (अनु), (अनु), (शांति), (शांति), (शांति), (शांति), (शांति), (शांति) (शांति), (शांति), (सभा), (सभा), (वन), (वन), (वन), (वन), (अनु), (अनु), (वन), (अनु), (शांति), (शांति), (शांति), (वन, शांति, आश्वम), (वन), (वन), (वन), (शांति, आश्वम) (वन), (भीष्म), (अनु), (शल्य), (शांति), (शांति), (अनु), (अनु), (शांति), (शांति), (उद्योग).

महार्णवतंत्र उ.

महार्णव.प्रकाश पू

महानिब्वाणसूत्त उ.

महानिर्वाण उ.

महावग्ग उ.

माधवाचार्य (ग्रंथकार) पू., (मा. चे. गुरू).

माधवाचार्य कालनिर्णय पू.

माधवाचार्य दुसरे विद्वान पुरुष पू.

मानव गृह्यसूत्र पू., उ.

मानव धर्मसूत्र पू.

मानव श्रौतसूत्र पू.

## य

**र**

शांति पू., (ग्रहशांति) उ.
शांति कमलाकर उ.
शांतिमयूख उ.
शास्त्रदीपिका (शंकरभट्टकृत) पू., उ.
शिपारेलीचा जुना ज्योतिष ग्रंथ उ.
शिवधर्म पुराण उ.
शिवरामकृत कृत्यचिन्तामणी पू.
शिवसंहिता उ.
शुक्रनीतिसार पू.
शुद्धि (धर्मान्तर केलेल्याची) पू.
शुद्धि उ.
शुद्धि कौमुदी उ.
शुद्धि दीपिका उ.
शुद्धि प्रकाश उ.
शुक्रस्मृति पू.
शूलपाणी ग्रंथकार आणि त्याचे ग्रंथ
पू., (श्राद्धविवेक), (स्मृतिविवेक)
शूद्रवर्ण पू.
शूद्रकमलाकर (कमलाकरभट्टकृत) पू.
शृंगार प्रकाश (भोजकृत) पू.
शौनक आथर्वण श्राद्धकल्प उ.
शौनक स्मृति पू., उ.
श्राद्ध उ.
श्राद्धकलिका उ.
श्राद्धकल्प पद्धतीवर टीका
(अनंतदेवकृत) पू.
श्राद्धकल्पलता उ.
श्राद्धतत्त्व उ.
श्राद्ध प्रकरण (लोल्लटाचार्यकृत) पू.
श्राद्धमयूख (नीलकंठकृत) पू.
श्राद्धविवेक (रुद्रधरकृत) पू.
श्राद्धसागर (कुल्लुककृत) पू.

**ष**



**स**

**ह**

# धर्मशास्त्राचा इतिहास

## (सारांशरूप ग्रंथ)

## उत्तरार्ध

# खंड ४ : विभाग १ ला

# प्रकरण १

### पातक, प्रायश्चित्त आणि कर्मविपाक

(मू. ग्रं. पा. ४/१—४०)

पातकाविषयींची कल्पना निरनिराळ्या धर्मांत, निरनिराळ्या काळांत आणि निरनिराळ्या देशांत भिन्नभिन्न प्रकारची असल्याचे आढळून येते. प्रस्तुत ग्रंथात भारतामध्ये वेदकाळापासून मध्ययुगीन कालात झालेल्या धर्मशास्त्रावरील निबंध आणि टीकाग्रंथांपर्यंत पातकाच्या कल्पनेची वाढ आणि विकास कसा झाला ह्याचा विचार करावयाचा आहे.

**पातक** हा शब्द नीतिशास्त्रातील परिभाषेपेक्षा धार्मिक परिभाषेतील अधिक आहे. ह्या शब्दाची व्याख्या करणे फार अवघड असले तरी सामान्यपणे असे म्हणता येईल की जे कृत्य केल्याने देवाने सांगितलेल्या अथवा देवप्रणीत मानलेल्या धर्मग्रंथांत दिलेल्या नियमांचे बुद्धिपुरःसर उल्लंघन होते अथवा अवज्ञा होते अथवा निदान अशा ग्रंथांत घालून दिलेल्या नियमांचे परिपालन केले जात नाही ते कृत्य पातक.

ऋग्वेदामध्ये पातकासंबंधी अनेक ठिकाणी कळकळीचे आणि मनःपूर्वक काढलेले उद्‌गार आले आहेत आणि त्यांवरून प्राचीन काळच्या ऋषींना आपण पातकांपासून मुक्त व्हावे ह्याची अत्यंत तळमळ वाटत असे दिसून येते. ऋग्वेदात आलेली पातकाची कल्पना ऋताच्या कल्पनेशी जोडलेली आहे. ऋत शब्दाचे तीन प्रकारचे अर्थ होतात : (१) 'नैसर्गिक क्रम' अथवा 'विश्वाचा नियम आणि सर्वसाधारण क्रम' (२) यज्ञाच्या बाबतीत देवाच्या उपासनेची बिनचूक आणि व्यवस्थित पद्धती आणि (३) मनुष्याचे नैतिक वर्तन. वेदांमध्ये आलेल्या सोम, वरुण, अग्नि प्रभृति अनेक देवता ऋताचे संरक्षण करणाऱ्या, त्याची वृद्धि करणाऱ्या अथवा त्याचे स्वास्थ्य करणाऱ्या असल्याचे वर्णन केले आहे. आदित्यांना अनृतांचे (म्हणजे ऋताशी विरुद्ध असणाऱ्या गोष्टींचे) द्वेष्टे (अत्यंत द्वेष करणारे) असे म्हटले आहे. ऋत हे यज्ञाहून वेगळे असते. ऋत शब्दाने यज्ञाच्या व्यवस्थित विधीचा सामान्यतः बोध होतो. नैतिक प्रेरणा करणारा अशा अर्थानेही ऋत शब्द ऋग्वेदात अनेक ठिकाणी आढळतो. अनेक ठिकाणी ऋत आणि सत्य ह्यांच्यामध्ये भेद दर्शित केला आहे. कालाच्या ओघात ऋत हा शब्द मागे पडला आणि वैदिक वाङ्‌मयांत देखील त्याची जागा **सत्याने** पटकावली. तथापि, काही ठिकाणी ऋत आणि सत्य हे शब्द तै. उप. (२·१ आणि १·९·३) मध्ये एकमेकांच्या बरोबरही आले आहेत.

ऋग्वेदातील मंत्रद्रष्ट्या ऋषींना पातकाची अथवा अपराधाची तीव्र जाणीव होती आणि त्यांनी

पातकांबद्दल आपणास क्षमा करण्याविषयी आणि पातकांच्या परिणामांपासून आपली मुक्तता व्हावी ह्याविषयी देवांना आणि विशेषतः वरुण आणि आदित्य ह्यांना विनंती केली आहे. अशा प्रार्थनांमध्ये आगः, एनः, अघ, दुरित, द्रुग्ध, अंहस् ह्यांच्यासारखे अनेक शब्द आले आहेत. आगः आणि एनः ह्या दोन्ही शब्दांनी अत्यंत घोर स्वरूपाच्या आणि अनैतिक स्वरूपाच्या पातकांचा बोध होतो. 'वृजिन' हाही एक महत्वाचा शब्द असून तो पुष्कळ वेळा साधु अथवा ऋजु ह्या शब्दांच्या विरुद्ध अर्थाने योजण्यात येतो. ऋग्वेदामधे 'अनृत' हा शब्दही पुष्कळ वेळा आला आहे. (ऋ. ७·६०·५;७·६६·१३).

एखाद्या व्यक्तीच्या मनात पातकाचा प्रादुर्भाव कसा होतो हा प्रश्न सर्वकाळीच अवघड ठरला आहे. ह्या प्रश्नाचे निश्चित उत्तर देता आले नांही तरी आपण केलेल्या पातकाची जाणीव मनुष्याला खास असते. कौषीतकि [एष ह्येव साधु कर्म कारयति तं यमेभ्यो लोकेभ्यो उन्निनीषते
एष उ एवासाधुकर्म कारयति तं यमधो निनीषते।
—कौषीतकि ब्रा. उप. (३·९).] ब्राह्मण उप० (३·९) मध्ये म्हटले आहे की ज्या मनुष्याला उच्च स्थितीला न्यावयाचे देवाच्या मनात असते त्या मनुष्याकडून देव सत्कृत्ये घडवितो आणि ज्या मनुष्याला अधोगतीला न्यावे असे देवाच्या मनात असते त्याच्याकडून देव असत्कृत्ये घडवितो. ह्याचा अर्थ मनुष्याची नियती ही आधीच ठरविलेली असते आणि त्या नियतीला अनुसरून त्याच्या हातून चांगली अथवा वाईट कृत्ये घडतात. भगवद्गीतेमध्ये अशाच प्रकारच्या अर्जुनाच्या प्रश्नाला श्रीकृष्णाने असे उत्तर दिले आहे की रजोगुणापासून उद्भवणारे काम आणि क्रोध (आणि लोभ) हे ह्या जगातील मनुष्यांचे शत्रु असून ते मनुष्याला पापकृत्ये करण्याची प्रेरणा करतात. (भ.गी. ३·३७). तथापि, ह्या उत्तराने मूळ प्रश्नाचे समाधानकारक उत्तर मिळत नाही. ह्या प्रश्नाला फक्त सांख्यशास्त्रातील तत्त्वज्ञानानेच उत्तर दिले आहे. ते म्हणजे सत्व, रज आणि तम हे तीन गुण निरनिराळ्या मनुष्यांच्या ठिकाणी भिन्नभिन्न प्रमाणांत वसत असतात आणि त्यांच्यापैकी रजोगुण हा मनुष्यामधील पापप्रवृत्तीला कारण असतो. गौतमाने [अथ खल्वयं पुरुषो याप्येन कर्मणा लिप्यते तथैतदयाज्ययाजनमभक्ष्यभक्षणमवद्यवदनं शिष्टस्याक्रिया प्रतिषिद्धसेवनमिति।
—गौतम (१९·२)] (१९·२) म्हटले आहे की ह्या जगात मनुष्य दुष्टकृत्यांच्या (म्हणजे शास्त्राने निषिद्ध सांगितलेल्या गोष्टी केल्याच्या) योगाने आणि विहित (म्हणजे शास्त्राने करावयास सांगितलेल्या) गोष्टी न केल्याने मलिन होतो.

प्राचीन काळापासून पातक लागणाऱ्या कृत्यांची नावे आणि त्यांची महत्वानुसार वर्गवारी आणि विभागणी निरनिराळ्या ग्रंथांत सांगितलेली आढळते. [सप्त मर्यादाः कवयस्ततक्षुस्तासामेकामिदभ्यंहुरो गात्।
—ऋ. (१०·५·६)] ऋग्वेदाने (१०·५·६) असे सांगितले आहे की ज्ञात्या लोकांनी **सात** मर्यादा आखून दिल्या असून त्यांच्यापैकी एकाही मर्यादेचे उल्लंघन करणारा पातकी होतो. ही सात 'पातके' म्हणजे ब्रह्महत्या, भ्रूणहत्या, सुरापान, चोरी, गुरुतल्पगमन, दुष्कृत्यांची पुनरावृत्ती आणि एकाद्या पापकृत्याबद्दल खोटे बोलणे ही होत. (निरुक्त ६·२७). अत्यंत प्राचीन [... स्तेयं तल्पारोहणं ब्रह्महत्यां भ्रूणहत्यां सुरापानं दुष्कृतस्यकर्मणः पुनः पुनः सेवां पातके अनुतोद्यमिति।
—निरुक्त (६·२७).] काळापासून ब्रह्महत्या हे पातक सर्वांत गर्ह्य मानले जात असे. तथापि काठक संहितेत (३१·७) भ्रूणहत्या ही ब्रह्महत्येपेक्षाही अधिक निंद्य असल्याचे म्हटले आहे. पातकांची वर्गवारी आणि त्या प्रत्येक वर्गात समावेश होणारी पातके ह्यांच्या बाबतीत सूत्रग्रंथांत फार वैचित्र्य आढळते. आप. ध.सू. (१·७·२१·७।११) मध्ये पातकांचे **पतनीय** (ज्यांच्या योगाने मनुष्य जातिभ्रष्ट होतो) आणि **अशुचिकर** (ज्यांच्या योगाने अशुद्धता मात्र येते) असे दोन वर्ग केले असून त्यांत निरनिराळ्या पातकांचा समावेश केला आहे. आपस्तंबाने (१·९·२४·६।९) काही विशिष्ट कृत्ये करणाऱ्या मनुष्याला **अभिशस्त** अशी संज्ञा लावली आहे. वसिष्ठाने (१·१९।२३) एनस्विन्, महापातकी आणि उपपातकी असे तीन वर्ग केले आहेत. कात्यायनाने

(मिता.याज्ञ. ३·२४२) पातकांचे पांच वर्ग केले आहेत. विष्णु ध. सू. मध्ये पातकांचे नऊ वर्ग सांगितले आहेत. वि. ध. सू. (३३·३।५) मध्ये सांगितलेल्या पातकांपैकी एका व्यतिरिक्त सर्व पातकांचा मनूने उल्लेख केला आहे. छां. उप. (५·१०·९) मध्ये ब्रह्महत्या सुरापान, स्तेय (चोरी), गुर्वङ्गनागम आणि ह्या चार प्रकारचीं पातकें करणाऱ्याबरोबर संसर्ग करणे ह्यांना महापातकें म्हटले असून सामान्यतः ह्या पाच प्रकारांचा नामनिर्देश छां. उप. च्या काळापासून करण्यात आला आहे.

महापातके मानलेल्या ह्या पातकांसंबंधी थोडेसे विवेचन पुढे केले आहे :-

**ब्रह्महत्या**. कोणीही मनुष्य एखाद्या ब्राह्मणाच्या मृत्यूला पाच प्रकारांनी कारणीभूत होऊ शकतो. ते प्रकार म्हणजे स्वतःच ब्राह्मणाची हत्या करून **(कर्ता)**, दुसऱ्या कोणाला ब्राह्मणाचा वध करण्याची आज्ञा करून अथवा विनंती करून अथवा सल्ला देऊन **(प्रयोजक)**, दुसऱ्या कोणाला आपली संमती देऊन वध करण्याला उत्तेजन देऊन **(अनुमन्ता)**, दुसरा कोणी वध करीत असेल त्याला साहाय्य देऊन अथवा त्याला इतरांकडून पीडा होऊ नये म्हणून त्याला संरक्षण देऊन **(अनुग्राहक)** आणि एखाद्या ब्राह्मणाच्या वधाला **निमित्त** होऊन. [**निमित्ताची** व्याख्या मिताक्षरेने (याज्ञ. ३·२२७) अशी दिली आहे की जो मनुष्य ब्राह्मण असणाऱ्या दुसऱ्या कोणाची निंदा करून अथवा त्याला मार देऊन अथवा त्याची संपत्ती हिरावून घेऊन अथवा अशाप्रकारची कृत्ये करून त्या ब्राह्मणाला क्रोधाविष्ट होऊ देतो आणि मग तो ब्राह्मण त्याच्या समक्ष आपणास स्वतःला मारून घेतो तो मनुष्य त्या ब्राह्मणाच्या वधाला **निमित्त** असतो.]

ब्राह्मणाव्यतिरिक्त इतर तीन वर्णांच्या बाबतीत च्यवनस्मृतीसारख्या काही स्मृतींनी नेहमीच्या पाच महापातकांच्या जोडीला आणखी काही महापातके सांगितली आहेत : क्षत्रियाच्या बाबतीत दंड करण्यास अपात्र असणाऱ्या व्यक्तीला दंड करणे आणि युद्धभूमीतून पळून जाणे ही दोन महापातके असतात; वैश्याच्या बाबतीत खोटी वजने आणि खोटी मापे वापरणे ही दोन महापातके असतात; आणि शूद्राच्या बाबतीत मांसाची विक्री करणे, ब्राह्मणाला इजा करणे, ब्राम्हणस्त्रीबरोबर संभोग करणे आणि कपिला (पिंगट वर्णाच्या) गाईचे दूध प्राशन करणे ही चार अधिक महापातके असतात. (दीपकलिका—याज्ञ. ३·२२७).

जर एखादा **आततायिन्** प्रकारचा ब्राह्मण हल्ला करून आला तर **आत्मसंरक्षणाकरिता** कोणीही त्याचा प्रतिकार केल्यास काहीही पातक लागणार नाही; परंतु जर असा प्रतिकार करताना त्या ब्राह्मणाचा वध करण्याची त्या मनुष्याची इच्छा नसली तरीही (मृत्यूहून कमी स्वरूपाची इजा करण्याची इच्छा असली तरीही) जर त्या ब्राह्मणाला मृत्यु आला तर प्रतिकार करणारा राजाकडून शासनाला पात्र होणार नाही आणि त्याला स्वल्प प्रायश्चित्त करावे लागेल (त्याला **ब्रह्महत्येचा** दोष लागणार नाही) असे बहुतेक ग्रंथकारांनी म्हटले आहे. (**आततायिन्** म्हणजे आग लावणारा अथवा वध करण्याच्या उद्देशाने चाल करून येणारा अथवा जमीन बळकावण्याच्या उद्देशाने हल्ला करणारा मनुष्य).

**सुरापान.** मद्यप्राशन करणे हे एक महापातक असल्याचे मानले आहे. गुळापासून अथवा काकवीपासून केलेली, पिठापासून केलेली आणि मधुक (मोहाच्या) फुलांपासून अथवा मधापासून केलेली अशी तीन प्रकारची **सुरा** असते. (मनु ११·९४). त्यांच्यापैकी पिठापासून तयार केलेली सुरा प्राशन करण्याची तीन उच्च वर्णांच्या लोकांना बंदी असते आणि सुरापान हे त्यांच्या बाबतीत महापातक असते. मद्य (म्हणजे उन्माद करणारी सर्व पेये) कोणत्याही आश्रमातील सर्व ब्राह्मणांना निषिद्ध असते; परंतु **गौडी** अथवा **माध्वी** प्रकारची सुरा प्राशन करणाऱ्या ब्राह्मणाला महापातकाचा दोष न लागता **अनुपातकाचा** दोष

लागतो असे विष्णु ध. सू. मध्ये सांगितले आहे. पिठापासून तयार केलेल्या सुरेव्यतिरिक्त इतर **उन्मादक पेये** क्षत्रियांना आणि वैश्यांना निषिद्ध नसतात. पिठापासून तयार केलेल्या सुरेसहित **सर्व उन्मादक पेये** पिण्यास शूद्राला मोकळीक असते. वेदाचा अभ्यास करणाऱ्या सर्व वर्णांच्या **ब्रह्मचाऱ्यांनी** सर्व प्रकारच्या उन्मादक पदार्थांपासून अलिप्त राहिले पाहिजे. सुरापानाचा निषेध व्रतबंध न झालेल्या मुलांना आणि अविवाहित मुलींना देखील लागतो. तथापि स्त्रिया आणि अल्पवयी मुलींना कमी प्रतीचे प्रायश्चित्त करावे लागत असे.

जर एखाद्या मनुष्याच्या ओठांना फक्त सुरेचा स्पर्श झाला अथवा त्याची इच्छा नसताना सुरा त्याच्या मुखात शिरली तर ते कृत्य सुरापान होत नाही (म्हणजे महापातक होत नाही) आणि अशा कृत्याबद्दल स्वल्प स्वरूपाचे प्रायश्चित्त करावे लागते. (प्राय. वि. पा. ९३).

**स्तेय** (चोरी). एखाद्या ब्राह्मणाजवळचे काही विशिष्ट वजनाचे सोने चोरले असेल तरच ती चोरी महापातक संज्ञेला पात्र होते. आपस्तंबाने (१·१०·२८-१) **स्तेय** म्हणजे चोरी ह्याची व्याख्या अशी दिली आहे की कोणत्याही अवस्थेत असलेल्या परकीय मनुष्याच्या मिळकतीचा लोभ धरणे (आणि ती मिळकत तिच्या स्वामीच्या अनुमतीशिवाय घेणे) ह्या कृत्याच्या योगाने ते कृत्य करणारा **चोर** ह्या संज्ञेला पात्र होतो. ब्राह्मणाजवळचे निदान १६ माष वजनाचे सुवर्ण चोरले तर ते कृत्य महापातक होते. (मिता—याज्ञ. ३·२५७). परंतु ब्राह्मणाजवळचे त्याहून कमी वजनाचे सुवर्ण चोरल्यास अथवा एखाद्या ब्राह्मणेतराजवळचे केवढ्याही वजनाचे सुवर्ण चोरल्यास त्याला फक्त **उपपातकाचा** दोष लागतो.

काही काही परिस्थितीत दुसऱ्याच्या मालकीच्या वस्तु त्याच्या संमतीशिवाय घेण्याने चोरीचा अपराध होत नाही. उदाहरणार्थ, गाईकरिता अथवा श्रौत अथवा स्मार्त अग्नीकरिता गवत, इन्धने आणि झाडाझुडाची फुले आणि कुंपण न घातलेल्या झाडाची आणि वेलीची फळे संमतीशिवाय घेण्यास प्रत्यवाय नाही असे गौतमाने (१२·२५) सांगितले आहे; एखाद्या तीन उच्च वर्णाच्या प्रवाशाजवळची सामुग्री संपली असली तर त्याने दुसऱ्याच्या शेतातून दोन उसाच्या कांड्या आणि दोन मूलक (शासनाचे भय न बाळगिता) घेण्यास प्रत्यवाय नाही (मनु ८·३४१).

**गुर्वङ्गनागम** (अथवा गुरूच्या पत्नीबरोबर संभोग). हा अपराध करणाऱ्याला **गुरुतल्पग** अशी संज्ञा आहे. गुर्वङ्गना ह्या शब्दामध्ये आचार्याची पत्नी, स्वतःची माता, स्वतःच्या वर्णाची सापत्न माता, स्वतःची कन्या, आणि इतर निकटच्या नात्याच्या स्त्रियांचाही समावेश होतो असे काही ग्रंथकारांचे (प्राय.वि.पा. १२९) मत आहे. तथापि आचार्याची पत्नी आणि इतर अनेक नातलग स्त्रिया ह्यांच्याबरोबर संभोग करणे हे एक **अनुपातक** आहे असे विष्णु ध.सू. (३६·४-८) मध्ये सांगितले आहे.

**महापातकीसंसर्ग** (चार प्रकारची महापातके करणारांच्या बरोबर सहवास करणे). हे कृत्यही एक महापातक गणले आहे. परंतु असा सहवास एक वर्षपर्यंत केल्यास महापातक लागते असे गौतम (२१·३) प्रभृति अनेक ग्रंथकारांनी सांगितले आहे. हा नियम अशा पातकी मनुष्याबरोबर एकाच वाहनात अथवा एकाच आसनावर बसणाऱ्याला, त्याच पंक्तीत बसून भोजन करणाऱ्याला लागतो. परंतु काही परिस्थितीत **तात्काल** महापातकाचा दोष लागतो. उदाहरणार्थ, एखाद्याने अशा महापातक्याशी धार्मिक संबंध जोडला म्हणजे त्याला वेद शिकवला अथवा त्याच्याजवळ वेदाध्ययन केले, त्याचे पौरोहित्य केले अथवा त्याला पुरोहित नेमला, अथवा त्याच्याबरोबर संभोग केला अथवा विवाहसंबंध जोडला तर त्या व्यक्तीला तात्काल महापातकाचा दोष लागतो. ह्या बाबतीतही बरेच मतवैचित्र्य आहे. पराशराने (१·२५-२६) म्हटले आहे की

कलियुगामध्ये फक्त महापातक करणाऱ्याचा **पतित** म्हणून त्याग करता येतो. ह्या वचनावरून असे अनुमान निघते की एखाद्या महापातकी व्यक्तीला केवळ स्पर्श करण्याने अथवा त्याच्या घरी अन्न खाण्याने **पातित्य** येत नाही आणि ह्याच भावनेने 'पातकी व्यक्तींच्या संसर्गाने आलेली अशुद्धता' ह्याचा कलिवर्ज्य गोष्टीत समावेश केला आहे.

जरी अनेक अपराधांना महापातकांच्या व्याख्या शब्दशः लागू पडत नसल्या तरीही स्मृतींनी त्यांचा तुलनेने महापातकांसारखाच निषेध केला आहे. उदाहरणार्थ, जो कोणी यज्ञाची दीक्षा घेतलेल्या क्षत्रियाचा अथवा वैश्याचा वध करतो अथवा एकाद्या आत्रेयी (रजस्वला) स्त्रीचा वध करतो त्याला ब्रह्महत्येकरिता करावयाच्या प्रायश्चित्तासारखेच प्रायश्चित्त करावे लागते असे याज्ञवल्क्याने (३·२५१) म्हटले आहे. तसेच गुरुतल्पगमनाचे पातक (मातृभगिनी अथवा पितृभगिनी ह्यांच्यासारख्या) अनेक निकटसंबंधी स्त्रियांबरोबरच्या संभोगाला लागते असेही त्याने म्हटले आहे. (याज्ञ. ३·२३२-२३३). खोटी साक्ष देणे हे कृत्य सुरापानासमान असते; शिकलेला वेद विसरून जाणे, वेदाची निंदा करणे, गुरूच्या विरुद्ध मिथ्या आरोप करणे इत्यादी कृत्ये सुरापानासमान असतात असे निरनिराळ्या ग्रंथांत सांगितले आहे. सामान्य नियम [अत्र साम्यातिदेशेऽर्ध ताद्रूप्यवाचनिकयोस्तु पादोनम् ॥
–प्राय. म. पा. ८.] (प्रायं. म. पा. ८) असा आहे की जे प्रमाद महापातकांच्या **समान** असल्याचे सांगितलेले असते त्यांच्याकरिता करावयाचे प्रायश्चित्त महापातकांकरिता करावयाच्या प्रायश्चित्तापेक्षा कमी (अर्धे) असते.

मनु (११·५५-५८) आणि याज्ञ. (३·२२८-२३३) ह्यांनी ज्यांना महापातकांसमान म्हटले आहे त्यांना वृद्धहारीताने (९·२१६-२१७) आणि मिताक्षरेने (याज्ञ. ३·२३३) 'पातक' अशी संज्ञा. लावली असून विष्णु. ध. सू. (३६·८) ने त्यांना **अनुपातके** अशी संज्ञा लावली आहे.

**उपपातके** (गौणपातके). ह्यांची संख्या निरनिराळ्या काळी आणि निरनिराळ्या स्मृतींत भिन्न भिन्न सांगितली आहे. वसिष्ठाने (१·२३) पांच उपपातके सांगितली आहेत; शातातपाने (विश्वरूप-याज्ञ. ३·२२९-२३६) आठ उपपातकांचा उल्लेख केला आहे; शंखाच्या (विश्वरूप-याज्ञ ३·२२९-२३६) वचनात १८ उपपातके सांगितली आहेत; मनूने (प्राय. वि. पा. १९२) ४९ उपपातके सांगितली आहेत; याज्ञ ने (विश्व. याज्ञ. ३·२२९-२३६) सांगितलेल्या उपपातकांची संख्या ५१ आहे. मनु (११·६७) आणि विष्णु ध. सू. (३८·१-६) यांत काही काही प्रमादांना **'जातिभ्रंशकर'** (जातीबाहेर काढून लावणारी) अशी संज्ञा लावली आहे. अशा कृत्यांत ब्राह्मणाला काठीने अथवा हाताने मारणे, (लसूण, विष्ठा ह्यांच्यासारखे) हुंगण्यास अपात्र असलेले पदार्थ हुंगणे, मद्याचा वास घेणे इत्यादी कृत्यांचा समावेश केला आहे. गाढव, घोडा ह्यांच्यासारख्या पशूंचा वध करणे हे कृत्य **'संकरीकरण'** (मिश्र जातीत समाविष्ट करणारे) मानले आहे. निंद्य मनुष्याजवळून दान घेणे ह्यांच्यासारख्या कृत्याने मनुष्याचे **'अपात्रीकरण'** होते म्हणजे तो दान स्वीकारण्यास अपात्र ठरतो. (मनु. ११-६९). लहान मोठ्या जीवजंतूंचा वध करणे ह्यांच्यासारखी कृत्ये **मलावह** असतात (मनु ११·७०) म्हणजे त्यांच्या योगाने मनुष्य अपवित्र होतो. निरनिराळ्या प्रकारांत समावेश न केलेल्या सर्व दोषांना विष्णु ध. सू. (४२·१) मध्ये **प्रकीर्णक** (विविध प्रकारचे) अशी संज्ञा दिली आहे. भावदुष्ट, कालदुष्ट, क्रियादुष्ट, इत्यादी अन्नाचे दोष वृद्धहारीताने (९·२१०-२१५) सांगितलें आहेत. अशा प्रकारची अन्ने भक्षण करणे ह्या कृत्याचाही प्रकीर्णकामध्ये समावेश होतो.

ह्या निरनिराळ्या प्रकारच्या आणि दर्जाच्या पातकांच्या निराकरणाकरिता धर्मग्रंथांत निरनिराळी

साधने सांगितली आहेत. ऋग्वेदामध्ये सांगितलेल्या अशा साधनांत देवाने दया करावी आणि पातकांबद्दल क्षमा करावी ह्या करिता देवाची प्रार्थना करणे हे साधन प्रथम सांगितले आहे. (ऋ. ७·८६-४-५ इ.). पातक पाण्याने धुतले जाते असे ऋग्वेदात (१·२३-२२) मानले असून पातक दूर करण्याबद्दल जलांच्या प्रार्थना केल्या आहेत. देव प्रसन्न व्हावा ह्याकरिता यज्ञ करण्यात येत. पातकांची कबुली दिल्याने पातकांची निवृत्ती होते असेही मानले जात असे. यज्ञ करावयाचा म्हणजे यजमानाला सत्यभाषण करणे, उपोषण करणे ह्यांच्यासारखे काही कडक नियम पाळावे लागत, बरीच साधनसामुग्री जुळवावी लागे आणि ऋत्विजांना दक्षिणा देण्याकरिता बराचसा खर्च करावा लागे. अशा कृत्यांनी पातकामुळे मनाला आणि आत्म्याला लागलेला कलंक धुवून जातो असे मानले जात असे.

सूत्रग्रंथांत आणि स्मृतींत सांगितलेल्या पातकांच्या निवृत्तीबद्दलच्या उपायांसंबंधी विचार करताना **कर्म आणि पुनर्जन्म** ह्यांचे सिद्धांत ध्यानात घेणे अवश्य आहे. ह्या सिद्धांतांसंबंधी मूलभूत कल्पना अशी आहे की ज्याप्रमाणे भौतिक व्यवहारात क्रिया आणि प्रतिक्रिया ह्यांचा अखंड संबंध असल्याचे त्या त्या शास्त्रात मानले जाते त्याप्रमाणेच नैतिक बाबतीत देखील क्रिया आणि प्रतिक्रिया ह्यांचा अखंड संबंध असतो. चांगले कृत्य केले म्हणजे त्यापासून सुखकारक फल मिळते आणि वाईट कृत्य केले म्हणजे त्यापासून दुःख भोगावे लागते. वाईट कृत्याचे दुःखरूप फल जर तात्काल अथवा ह्या जन्मात मिळाले नाही तर आत्मा अन्य जन्म घेतो आणि त्या जन्मातील नव्या परिस्थितीत पूर्वी केलेल्या वाईट कृत्यांबद्दल दुःख भोगतो. अशा रीतीने कर्माच्या सिद्धांताचा पुनर्जन्माच्या सिद्धांताशी अतिशय संबंध असतो. सर्वसाधारण नियम असा आहे की चांगले अथवा वाईट कसल्याही प्रकारचे कर्म करणाऱ्याची मुक्तता त्या कर्मांच्या सुखकारक अथवा दुःखकारक परिणामांचा उपभोग घेतल्याशिवाय होऊ शकत नाही. (गौत. १९·५) [न हि कर्म क्षीयते।

—गौ. ध. सू. (१९·५)]. निरनिराळ्या उपनिषदांतील वचनांचा (बृह. उप. ४·४ आणि ६·२; छां. उप. ३·१४ आणि ५·३·१०) ह्या नियमाला आधार आहे. सूत्रांनीही (आप. ध. सू. २·१·२-७, विष्णु. ध. सू. २०·४७) असेच सांगितले आहे. तथापि हा सर्वसाधारण सिद्धांत स्मृतींनी आणि मागाहूनच्या काळात झालेल्या ग्रंथांनी अनेक प्रकारांनी मर्यादित केला आहे. उदाहरणार्थ, गौतमाने (१९·११) म्हटले [तस्य निष्क्रयणानि जपस्तपो होम उपवासो दानम्।

—गौतम (१९·११)] आहे की दोषार्ह कृत्यांची निष्कृति वेदाचा जप, तपश्चर्या, यज्ञ, उपोषण आणि दाने देणे ह्यांच्या योगाने होते. अनेक प्रकारच्या अपराधांच्या बाबतीत पातकनिष्कृतिकरिता करावयाच्या विधींमध्ये **कबुलीजबाब** हाही एक भाग असतो. (शत. ब्रा. २·५·२·२०).

# प्रकरण २

## पातकांच्या परिणामांचा ऱ्हास करण्याची साधने

(मू. ग्रं. पा. ४/४१—५६)

**कबुलीजबाब.** आपस्तंबाने (१·९·२४·१५) असा नियम सांगितला आहे की निरनिराळ्या पातकांकरिता प्रायश्चित्त करीत असलेल्या मनुष्याने उदरनिर्वाहाकरिता भिक्षा मागताना आपण केलेले दुष्कृत्य सर्वांना जाहीर केले पाहिजे. ब्रह्मचाऱ्याने केलेल्या संभोगाच्या अपराधाबद्दलही असा नियम गौतमाने (२३·१८) आणि मनूने (११·१२२) सांगितला आहे की त्याने सात घरी भिक्षा मागताना आपला अपराध लोकांना जाहीर केला पाहिजे.

**पश्चात्ताप** अथवा **अनुताप**. मनु (११·२२९-२३०) प्रभृतींती असा नियम सांगितला आहे की मनुष्याच्या मनात आपण केलेल्या दुष्कृत्यांबद्दल जितकी जितकी अधिक खंती वाटू लागेल तितके तितके त्याचे शरीर (त्याने केलेल्या) पातकांपासून मुक्त होते. तथापि प्रायश्चित्तप्रकाशासारख्या ग्रंथात म्हटले आहे की केवळ पश्चात्ताप पातकांचा नाश करण्यास पुरेसा नसतो. पश्चात्तापाच्या योगाने पातकी मनुष्य तप करण्यास पात्र होतो. यमाच्या (अपरार्क पा. १२३१) एका वचनातही असे सांगितले आहे की पश्चात्ताप आणि पातकयुक्त क्रिया पुन्हा न करणे ही प्रायश्चित्ताची केवळ अंगे (पूरक भाग) असतात आणि त्यांना स्वतंत्रपणे प्रायश्चित्तांची बरोबरी करिता येत नाही.

**प्राणायाम**. मनूने (११·२४८) असा नियम सांगितला आहे की व्याहृती आणि प्रणव युक्त १६ प्राणायाम प्रतिदिनीं केले तर ते एक महिन्याच्या अवधीत भ्रूणहत्या करणाराला देखील शुद्ध करतील. निरनिराळ्या पातकांच्या निवृत्तीकरिता किती प्राणायाम आणि किती कालपर्यंत करावे ह्याचा तपशील बौ. ध. सू. (४·१·५।११) मध्ये सांगितला आहे.

**तप**. तपाच्या योगाने स्वर्गप्राप्ती होते असे ऋग्वेदात (१०·१५४·२) म्हटले आहे. छांदोग्य (५·१०·१।२) प्रभृति उपनिषदांनी तपाला यज्ञाच्या वरचे स्थान दिले आहे. मनूने (११·२३९-२४१) म्हटले आहे की महापातके आणि इतर दुष्कृत्ये करणाऱ्याची शुद्धी उत्तम प्रकारे केलेल्या तपाच्या योगाने येते. मनाने, वाणीने आणि शरीराने मनुष्याने केलेल्या कोणत्याही पातकाचे तपाच्या योगाने शीघ्रपणे भस्म होते. हा सिद्धांत जैनांनी देखील (उत्तराध्ययन २९·२७) मान्य केला आहे. ब्रह्मचर्य, सत्यभाषण, त्रिकाल स्नान करणे, जमिनीवर निजणे, उपोषण करणे, अहिंसा, अस्तैन्य, गुरुशुश्रूषा इत्यादी कृत्यांचा तपामध्ये समावेश [ब्रह्मचर्यं सत्यवचनं सवनेषूदकोपस्पर्शनमार्द्रवस्त्रमाधःशायिताऽनाशक इति तपांसि। —गौतम (१९·१५).] होतो. (गौत. १९·१५). पातकाच्या स्वरूपाला अनुसरून तपाचा अवधी एका अहोरात्रापासून एक वर्षपर्यंत भिन्न भिन्न असतो. (गौ. १९·१७).

**होम.** तै. आरण्यका-(२·८) मध्ये असा नियम [अथ कूष्माण्डैर्जुहुयाद्योऽपूत इव मन्येत तथा स्तेनो यथा भ्रूणहैमेष भवति योऽयोनौ रेतः सिञ्चति। यदर्वाचीनमेनो भ्रूणहत्यायास्तस्मान्मुच्यत इति। —तै. आ. (२·८)] सांगितला आहे की स्वतःला अशुद्ध समजणाऱ्या मनुष्याने कुष्मांड मंत्रांनी हवन करावे. याज्ञ. (३·३०९) ने सांगितले आहे की ज्यावेळी कोणाही द्विजाला आपण मोठ्या पातकांत मग्न झालो आहो असे वाटेल त्यावेळी त्याने गायत्री मंत्राचा उच्चार करून तिळांचा होम करावा.

मनूने (११·३४) ही म्हटले आहे की वेदमंत्रांचा जप केल्याने आणि होम केल्याने ब्राह्मण सर्व आपत्तींपासून मुक्त होतो. यज्ञासंबंधी जुनी कल्पना अशी असावी असे दिसते की यज्ञ हे कोणत्यातरी देवतेला संतुष्ट करावयाचे कृत्य आहे. यज्ञ ही एक देवाला दिलेली देणगी असून त्या देणगीच्या योगाने देवाला संतोष होतो आणि तो मनुष्यांनी केलेल्या अपराधांबद्दल त्यांना क्षमा करितो आणि अपराधांमुळे त्याला आलेला राग नाहीसा होऊन तो त्याच्यावर पूर्ववत् कृपा करितो. अशा रीतीने देवाला संतुष्ट करणे आणि पातकाची निष्कृति करणे हा यज्ञाचा उद्देश असे. यज्ञ करावयाचा तो एखादा पशु बलि देऊन अथवा अग्नीमध्ये आहुती देऊन अथवा दुसरे काही पदार्थ देवाला अर्पण करून आणि नंतर इतरांना वाटून अशा निरनिराळ्या प्रकारांनी करिता येतो. यज्ञात पशूचा बलि देण्यामागे अशी कल्पना असे की पातक करणारा मनुष्य त्याने केलेल्या पातकाच्या योगाने आणि धर्माच्या अतिक्रमणाच्या योगाने जिवंत राहण्यास अपात्र झालेला असतो. तेव्हा तो स्वतःचा बलि देवाला देत आहे हे सूचित करण्याकरिता आपला प्रतिनिधि म्हणून एकादा पशु बलि देई.

**जप.** (म्हणजे वेदातील काही वाक्ये प्रार्थनेच्या रूपाने म्हणणे). जप तीन प्रकारचा असतो. **वाचिक** (मंत्राचा स्पष्ट उच्चार करणे), **उपांशु** (शब्दाचा उच्चार न करिता म्हणणे) आणि **मानस** (मनातल्या मनात म्हणणे). ह्यांच्यापैकी प्रत्येक प्रकार मागील प्रकाराच्या दहापट अधिक श्रेयस्कर असतो असे लघुहारीताने (४ पा. २८६) म्हटले आहे. निरनिराळ्या वेदसंहिता, उपनिषदे, वेदान्तसूत्रे, रुद्र, पुरुषसूक्त, पावमानी इत्यादी निरनिराळे वेदमंत्र शुद्धिकारक असल्याचे निरनिराळ्या ग्रंथांत (गौ. १९·१२, वसि. २२·९) सांगितले आहे. जपाची मूळ कल्पना अत्यंत आध्यात्मिक स्वरूपाची होती. उपनिषदप्रभृति ग्रंथांच्या सखोल ज्ञानाने जीवाला पवित्रपणा येतो आणि त्याला परमात्म तत्त्वाचे आकलन करण्याचे सामर्थ्य प्राप्त होते. देवाविषयीचे चिंतन आणि देवाशी एकरूपता प्राप्त करण्याचा प्रयत्न हे जपाचे उच्च स्वरूप आहे. धर्मग्रंथांतील वचनांचा पुन्हा पुन्हा उच्चार करण्याने जीव देवाच्या सन्निध आणि देवाच्याच विचारात मग्न राहतो. जपाकरिता अंतःकरणाची शुद्धता, अलिप्तपणा आणि देवाला आत्मसमर्पण ह्या तीन गोष्टींची आवश्यकता असते.

वेदमंत्रांनीं पातकांची निवृत्ती होते असे सांगितले असले तरी वसिष्ठ [न वेदबलमाश्रित्य पापकर्मरतिर्भवेत्। अज्ञानाच्च प्रमादाच्च दह्यते कर्म नेतरम्॥ —वसिष्ठ (२७·४)] (२७·४) प्रभृतींनी असा स्पष्ट इशारा दिला आहे की वेदांच्या सामर्थ्यावर विश्वास ठेवून कोणीही दुष्कृत्ये करण्याची संवय लावून घेऊ नये अथवा अशी कृत्ये करण्यात आनंद मानू नये. वेदाच्या अध्ययनाने अज्ञानाने अथवा अनवधानाने केलेल्या कृत्यांच्या परिणामांचाच मात्र नाश होतो आणि बुद्धिपुरस्सर केलेल्या इतर कृत्यांच्या परिणामांचा नाश त्याच्या योगाने होत नाही. ज्या ठिकाणी पातकांच्या नाशाकरिता एखादी विशिष्ट सूक्ते सांगितलेली नसतील त्या ठिकाणी वेदमंत्रांच्या बरोबर तपश्चर्याही केली तर ते मंत्र सामर्थ्यवान् होतात आणि शुद्धि करितात असे सामविधान [अनादेशे मन्त्रा बलवन्तस्तपोन्विताः पावना भवन्ति।
आपन्नः प्रायश्चित्तं चरेत्। अभ्यासः साम्नां शतं दशावरम्।
—सामविधान ब्रा. (१·५·२१४).] ब्राह्मणात (१·५·२१४) म्हटले आहे.

सूत्रग्रंथांच्या काळी आणि त्यानंतर वेदाचे अध्ययन फक्त पहिल्या तीन वर्णांच्या पुरुषांनाच करिता येत असे म्हणून पातकांच्या नाशाकरिता वेदमंत्रांचा जप करणे शूद्रांना शक्य राहिले नाही. ह्याकरिता पुराणांनी असे सांगितले आहे की शूद्रांनी देवतांच्या नामाचा जप करावा.

**दान.** सुवर्ण, धेनु, वस्त्रे, भूमि प्रभृति अनेक दाने पातकांचा नाश करणारी असल्याचे गौतमाने

(१९·१६) म्हटले आहे. वसिष्ठस्मृतीत (२९·१६) असे सांगितले आहे की उदरनिर्वाहाची अडचण पडल्यामुळे एखाद्या मनुष्याने जे काही पातक केले असेल त्याची मुक्तता भूमिदानाने होते – मग दान दिलेली भूमि 'गोचर्मा' इतकी अल्प असली तरी चालेल. भूमिदानाचे जे उल्लेख शिलालेखांत (एपि. इं. ११ पा. २२१) आढळतात त्यांत ते दान दात्याने स्वतःच्या आणि आपल्या पितरांच्या पुण्याची वाढ व्हावी म्हणून दिले असल्याचे म्हटलेले असते.

**उपवास**. ह्याचा काटेकोर अर्थ अन्न आणि पेय ह्यांच्यापासून पूर्णपणे अलिप्त राहणे असा असला तरी सामान्यतः त्याचा अर्थ साधे (हलके) आणि परिमित अन्न खाणे असा करण्यात येतो आणि कोणते पदार्थ खावयाचे ह्याबद्दल निर्बंध असतात. अनेक गृह्यसूत्रांत उपवास ह्याचा अर्थ (तांदुळासारख्या) यज्ञात उपयोगी पडणाऱ्या **(हविष्य)** अन्नापासून तयार केलेले हलके अन्न दिवसातून एक वेळ भक्षण करणे आणि भाजीपाला, माष (उडीद), मीठ आणि मांस भक्षण न करणे एवढाच असतो. (हरदत्त-गौतम. १९·११). उपवास करीत असलेल्या मनुष्याला दुसऱ्याही काही गोष्टींचा त्याग करावा लागत असे. उदाहरणार्थ, वारंवार पाणी पिणे, तांबूल भक्षण करणे, दिवसा निजणे आणि मैथुन करणे ह्या गोष्टींच्या योगाने उपवासाचे फल नाश पावते असे सांगितले [असकृज्जलपानाच्च ताम्बूलस्य च भक्षणात्।
उपवासः प्रदुष्येत्तु दिवास्वप्नाच्च मैथुनात्॥
देवल (अपरार्क पा. १९९).] आहे. (देवल-अपरार्क पा. १९९). पातकाच्या निवृत्तीकरिता करावयाच्या निरनिराळ्या साधनांत गौतमाने (१९·१५) उपवासाचा समावेश केला आहे.

ख्रिस्ती, मुसलमान इत्यादी इतर धर्मांतदेखील पश्चात्तापाची पूर्वतयारी म्हणून उपवासाची आवश्यकता मानतात.

शांतिपर्वात (३२३·१७) म्हटले आहे की ज्याप्रमाणे मलिन वस्त्र मागाहून पाण्याने स्वच्छ होते त्याप्रमाणे जे लोक उपवासाच्या (अग्नीने) तप्त झालेले असतात त्यांना अक्षय्य सुख चिरकालपर्यंत प्राप्त होते. तथापि त्याच पर्वात (७९·१८) असे सांगितले आहे की केवळ उपवासाने शरीर कृश करणे हे **तप** होत नाही तर अहिंसा, सत्य, अक्रौर्य, संयम आणि दया ह्यांना तप म्हणतात.

**तीर्थयात्रा.** अशी भावना असे की तीर्थयात्रा करण्याने आणि गंगेसारख्या पुण्य नद्यांत स्नान केल्याने मनुष्य पातकांपासून मुक्त होतो. विष्णू. ध. सूत्रात (३५·६) म्हटले आहे की ज्याने महापातके केली असतील त्याची शुद्धि अश्वमेध यज्ञ केल्याने अथवा पृथ्वीवरील सर्व पुण्यक्षेत्रांची यात्रा केल्याने होऊ शकते. पुणे येथील पेशवे ह्यांच्या काळात देखील ब्रह्महत्येकरिता तीर्थयात्रा करण्यास सांगत असत आणि अशा पातकी मनुष्याने प्रायश्चित्त केल्यानंतर इतर ब्राह्मणांनी त्याच्याबरोबर भोजन केले पाहिजे आणि तो पापमुक्त झाला आहे असे मानले पाहिजे अशी आज्ञा ब्राह्मणांना करीत असत. (पेशवे दप्तरातील उतारे खंड ४३ पा. १०७, राजवाडे खं. ६ पा. २२५).

# प्रकरण ३

## प्रायश्चित्ताची उत्पत्ति, व्युत्पत्ति आणि अर्थ

(मू. ग्रं. पा. ४/५७-८६)

आता पापनाशनाचे एक साधन ह्या दृष्टीने **प्रायश्चित्ताचे** विवेचन करणे अवश्य आहे. वैदिक ग्रंथांत ह्या शब्दाची 'प्रायश्चित्ति' आणि 'प्रायश्चित्त' अशी दोन रूपे आली असून त्यांच्या अर्थामध्ये भेद मानला जात नाही. त्यांपैकी 'प्रायश्चित्ति' हे रूप अधिक प्राचीन असावे असे वाटते. तै. सं. मध्ये काही ठिकाणी पातकांचे परिमार्जन ह्या अर्थाने हा शब्द योजला आहे आणि दुसऱ्या काही ठिकाणी त्याचा अर्थ 'आपत्तीकारक कृत्यांचे निवारण करण्याकरिता करावयाचा विधि' असा असून त्यात पातकाचा प्रश्न मुळीच उद्भवत नाही. जैमिनीच्या (६·३·७; ६·४·१० इ.) सूत्रांत हा शब्द आला असून (१२·३·१६) ह्या सूत्रावरील शाबरभाष्यात असा खुलासा केला आहे की श्रुतिग्रंथांत पातके दोन प्रकारची असतात. काही प्रायश्चित्ते यज्ञाच्या विधीमध्ये अथवा साहित्यात निष्काळजीपणाने अथवा अनवधानाने आलेल्या उणीवांची अथवा चुकांची भरपाई करण्याकरिता करावयाची असतात आणि काही प्रायश्चित्ते मुख्य कर्माच्या अनुषंगाने करावयास सांगितलेली कृत्ये न केल्यामुळे अथवा एखादे निषिद्ध कृत्य केल्यामुळे येणाऱ्या दोषांचे परिमार्जन करण्याकरिता करावयाची असतात. मीमांसेच्या भाषेत प्रायश्चित्ते **क्रत्वर्थ** आणि **पुरुषार्थ** अशी दोन प्रकारची असतात. क्रत्वर्थ प्रायश्चित्ते मुख्यत्वेकरून श्रौतसूत्रांत सांगितलेली असतात आणि पुरुषार्थ प्रकारची प्रायश्चित्ते स्मृतिग्रंथांत दिलेली असतात. प्रस्तुत ठिकाणी श्रौतसूत्रांत सांगितलेल्या प्रायश्चित्तांचे विवेचन गाळले आहे कारण त्यांचे विवेचन पूर्वी एका ठिकाणी (खंड २ मध्ये) येऊन गेले आहे आणि प्राचीन काळीही ती प्रायश्चित्ते फारच क्वचित प्रसंगी करण्यात येत असत.

बहुतेक निबंधग्रंथांत आणि टीकाग्रंथांत अंगिरसाच्या एका श्लोकाच्या [प्रायो नाम तपः प्रोक्तं चित्तं निश्चय उच्यते।
तपोनिश्चयसंयोगात्प्रायश्चित्तमिति स्मृतम्॥
—अङ्गिरस् (गौत. २२·१ वरील हरदत्ताची टीका.)] आधारावर प्रायश्चित्त हा शब्द **प्राय** (म्हणजे तप) आणि **चित्त** (म्हणजे निश्चय अथवा दृढ भावना) ह्या दोन पदांपासून झालेला असल्याचे सांगितलेले असते. ह्या व्युत्पत्तीच्या मागील कल्पना अशी आहे की अशा कृत्यांचा संबंध तपाशी असतो अथवा तप करण्याच्या निश्चयापासून त्यांचा उगम झालेला असतो अथवा ती कृत्ये पाप नाश करण्याची साधने आहेत अशी दृढ भावना असते. दुसऱ्याही काही प्रकारच्या व्युत्पत्ती काही ग्रंथांत दिल्या आहेत. बालंभट्टी (याज्ञ. ३·२०६) ह्या ग्रंथात उद्धृत केलेल्या एका वचनात प्राय म्हणजे पाप आणि चित्त म्हणजे शुद्धता असे अर्थ देऊन प्रायश्चित्त म्हणजे पापापासून शुद्धि असा अर्थ केला आहे. हेमाद्रीने (प्राय. पा. ९६९) उद्धृत केलेल्या एका वचनात प्राय म्हणजे नाश आणि चित्त म्हणजे एकत्र जुळविणे असे अर्थ देऊन प्रायश्चित्त म्हणजे जे नष्ट झाले असते त्याची भरपायी करणे अशी व्युत्पत्ती दिली आहे. प्रायश्चित्तप्रकाश (पृ. ७६) ह्या ग्रंथात असा निर्णय केला आहे की, ज्या कृत्यांना विद्वान लोक प्रायश्चित्त अशी संज्ञा देतात तेवढीच कृत्य प्रायश्चित्ते होत.

पातके **कामकृत** म्हणजे हेतुपूर्वक केलेली आणि **अकामकृत** म्हणजे हेतु नसताना घडलेली अशी दोन प्रकारची असतात. प्रायश्चित्ताच्या योगाने अथवा वेदाच्या अध्ययनाने हेतुरहित घडलेली पातके नाश पावतात असे स्पष्ट विधान मनु (११·४५) आणि याज्ञवल्क्य (३·२२६) यांनी केले आहे. परंतु हेतुपूर्वक केलेल्या पातकांच्या बाबतीत संशय उत्पन्न होतो. त्यांच्या बाबतीत (गौतम १९·३-६) एक मत असे आहे की

ज्याअर्थी कर्माचा क्षय त्याच्या परिणामांच्या उपभोगाशिवाय होत नाही त्याअर्थी प्रायश्चित्ते करू नयेत. दुसरे मत असे आहे की काही वेदवचनांत सांगितल्याप्रमाणे पातकांच्या परिणामांचे परिमार्जन करण्याकरिता प्रायश्चित्ते करावी. मनूने (११·४६) आपले स्वतःचे मत असे सांगितले आहे की हेतुरहित केलेल्या पातकांचा नाश वेदवचनांच्या पठनाने होतो आणि चुकीने हेतुपूर्वक केलेल्या पातकांचा नाश निरनिराळ्या प्रायश्चित्तांच्या योगाने होतो. याज्ञ. (३·२२६ उत्तरार्ध) चे मत असे दिसते की प्रायश्चित्ताच्या योगाने अनिच्छेने केलेल्या पातकांचा नाश होत नाही परंतु शास्त्रवचनांत सांगितलेले प्रायश्चित्त केल्यानंतर पातक करणारा मनुष्य त्या वचनांना अनुसरून इतरांशी व्यवहार करण्याला पात्र होतो. तथापि हेतुपुरस्सर केलेल्या पातकांचे परिणाम टळत नाहीत. प्रायश्चित्त केल्याने त्या मनुष्याच्या अंतःकरणाला शांति मिळते आणि इतर लोकही संतुष्ट होतात. मध्ययुगीन काळात झालेल्या ग्रंथकारांनी देखील अशीच मते प्रतिपादन केली आहेत. उदाहरणार्थ, मिताक्षरेने (याज्ञ. ३·२२६) म्हटले आहे की 'पातकांचे परिणाम दोन प्रकारचे असतात : पातके केल्याने नरकाची प्राप्ती होते आणि पातकी मनुष्याला समाजातील इतर लोकांशी व्यवहार करण्याची बंदी होते. ह्याकरिता प्रायश्चित्ताच्या योगाने जरी नरकात पडणे टळले नाही तरी प्रायश्चित्तामुळे समाजातील इतर लोकांबरोबर व्यवहार करण्याची बंदी नाहीशी झाली तरीही प्रायश्चित्ते करण्यात गैरवाजवी असे काही नाही. ज्या पातकांच्या योगाने **जातिभ्रष्टता** येते (म्हणजे जी **पतनीय** स्वरूपाची असतात) अशी पातके त्यांच्या करिता केलेल्या प्रायश्चित्ताने **देहान्त** होत असेल तर प्रायश्चित्ताच्या योगाने त्यांचादेखील नाश होतो. ह्याच्या उलट मनूने (११·१९०) असे म्हटले आहे की बालकांची हत्या, आश्रयाला आलेल्याचा वध, स्त्रियांचा वध ह्यांच्यासारख्या काही विशिष्ट पातकांच्या बाबतीत जरी पातकी मनुष्याने विहित प्रायश्चित्त केले तरी त्याच्याबरोबर कोणीही संगति करू नये.

प्रायश्चित्तांच्या योगाने पातकांचा नाश होतो असे का गृहीत धरावे असा कोणी प्रश्न विचारल्यास त्याला उत्तर असे आहे (मिता—याज्ञ. ३·२२६) की कोणती कृत्ये महापातके असतात, कोणती लघु पातके असतात आणि कोणती कृत्ये पातके नसतात हे शास्त्रांनी (म्हणजे श्रुतींनी आणि स्मृतींनी) सांगितले आहे. काही काही कृत्ये पातके का म्हणावी हे सामान्य लोकांना समजत नाही, परंतु स्मृतींनी ती कृत्ये पातके असल्याचे सांगितले आहे आणि कोणती कृत्ये पातके असतात ह्याबद्दल जर स्मृतींवर विश्वास ठेवावयाचा असेल तर त्याच स्मृतींत प्रायश्चितांच्या योगाने पातक नष्ट होते असे जे सांगितले असते तेही मान्य केले पाहिजे आणि प्रायश्चित्तांच्या बाबतीत दुसऱ्या कोणत्याही प्रमाणांचा आधार घेता कामा नये.

ज्या पातकांच्या बद्दल स्मृतींनी प्रायश्चित्ते सांगितली आहेत (ती सर्वच नसली तरी) त्यांच्यापैकी बहुतेक पातके राजाने अथवा शासनसंस्थेने शासन करण्याच्या स्वरूपाचे अपराध असतात. अशी कृत्ये करणाऱ्यांना राजशासनाखेरीज प्रायश्चित्तेही करावी लागत. अध्ययन केलेला वेद विसरून जाणे, सूर्योदयानंतर निजून राहणे ह्यांच्यासारखी दुसरी अशी काही कृत्ये असतात की ती स्मृतींनी पातके मानली असली तरी त्यांच्याबद्दल सांप्रत काळी शासनसंस्थेकडून शासन करण्यात येत नाही आणि बहुधा प्राचीन आणि मध्ययुगीन काळात देखील शासनसंस्थेकडून शासन करण्यात येत नसावे. त्यांच्यापैकी काही कृत्यांना याज्ञ. (३·२३९) ने उपपातके म्हटले असून कोणत्याही भारतीय राजाने अशा कृत्यांबद्दल कोणाही व्यक्तीला शासन केले असेल असे वाटत नाही. जी कृत्ये **प्रायश्चित्तार्ह** मानली जात असत आणि जी कृत्ये राजाकडून **शासनार्ह** अपराध असत अशा कृत्यांबद्दल विद्वान ब्राह्मणांच्या परिषदेकडून जी प्रायश्चित्ते सांगण्यात येत त्या प्रायश्चित्तांच्या बाबतीतील नियमांचा राजाने द्यावयाच्या शासनाशी काय संबंध असे हे सांगणे कठीण आहे. परिषदेच्या धर्मासंबंधीच्या अधिकारात राजा बहुधा फारसा हस्तक्षेप करीत नसे. आप. ध. सू. (२·५·१० १२-१६) मध्ये असे म्हटले आहे की दुर्मार्गाला लागून पाप करणाऱ्यांना (स्मृतींनी

सांगितलेली) विहित प्रायश्चित्ते करण्याची आज्ञा आचार्य करील, अशा लोकांनी आचार्याच्या आज्ञेचे अतिक्रमण केले तर आचार्य त्यांना राजाकडे घेऊन जाईल, राजा त्यांना पुरोहिताकडे. पाठवील, जर ते ब्राह्मण जातीचे असतील तर पुरोहित त्यांना विहित प्रायश्चित्त करण्याची आज्ञा करील, शारीरिक शिक्षा आणि गुलामगिरी ह्यांच्याव्यतिरिक्त इतर शिक्षा देऊन तो त्यांना बलात्काराने वठणीवर आणील. ह्यावरून असे दिसते की अपराध्याकडून प्रायश्चित्ते करविली जाण्याला राजा मदत करीत असे. पराशरानेही (८·२८-२९) म्हटले आहे की परिषदेने राजाची संमती घेऊन विहित प्रायश्चित्त कोणते हे सांगावे, ते प्रायश्चित्त राजाला कळविल्याशिवाय करण्यात येऊ नये, परंतु क्षुद्र स्वरूपाचे प्रायश्चित्त राजाला कळविल्याशिवाय करण्यास हरकत नसते, राजानेही परिषदेकडे दुर्लक्ष्य करून आपण स्वतःच प्रायश्चित्त सांगू नये. काही काही बाबतींत राजाने दिलेल्या शिक्षेच्या योगाने पातकातून मुक्तता होत असल्याचे मानण्यात येत असे. मनुस्मृतीत (११·१००-१०१) चोरीच्या बाबतीत असा एक नियम सांगितला आहे की चोराने मुसळ नावाचे एक शस्त्र अथवा दुसरे काही शस्त्र घेऊन राजाकडे जावे आणि राजाने त्या शस्त्राने त्या चोरावर एकदा प्रहार करावा आणि जर त्याच्या योगाने तो चोर मरण पावला अथवा जर मरण न पावता त्याला (राजाने) अर्धमृत स्थितीत जाऊ दिले आणि जर तो जगला तर तो त्या अपराधातून मुक्त होतो.

चोराने प्रायश्चित्त केले असले तरीदेखील त्याला चोरलेली वस्तु परत द्यावी लागत असे. चोराकडून परत करविणे शक्य नसेल तर राजाला आपल्या स्वतःच्या खजीन्यातून तिची भरपाई करावी लागत असे अथवा चोरी होऊ नये ह्याकरिता राजाने नेमलेल्या अधिकाऱ्यांना राजाने चोरीस गेलेल्या वस्तूची किंमत द्यावयास लावली पाहिजे. (गौत. १०·४७ इ.).

शिक्षा देणे आणि प्रायश्चित्त करावयास सांगणे ह्या दोन्ही बाबतींत विचारात घ्यावयाचे मुद्दे सारखेच असत, ते म्हणजे घडलेला अपराध हेतुपुरस्सर घडलेला आहे अथवा हेतुरहित घडलेला आहे, प्रथमतः झालेला आहे किंवा पुनः पुनः झालेला आहे आणि देश, काल, जात, वय, योग्यता, विद्या, संपत्ती इत्यादि परिस्थिती कशी होती हे पाहणे. नारदाने (साहस श्लो. ११) **साहसाचे** प्रथम, मध्यम आणि उत्तम असे तीन वर्ग केले आहेत आणि असा नियम सांगितला आहे की प्रथम आणि मध्यम प्रकारची साहसे करणाऱ्या अपराध्याला राजाने शासन केल्यावर तो इतरांशी सामाजिक व्यवहार करण्यास पात्र होतो. परंतु उत्तम (म्हणजे फार मोठे) साहस करणाऱ्या अपराध्याला जरी राजाने शासन केले असले तरीही तो त्याच्याबरोबर संभाषण करण्याला देखील पात्र होत नाही. काही अपराधांच्या बाबतीत जातीतील सामाजिक व्यवहार करण्यास पात्र होण्याकरिता प्रायश्चित्ते घेतल्यानंतर देखील जातीला भोजन घालावे लागे अथवा मिठाई वाटावी लागे. ह्यावरून असे सिद्ध होते की एकादा अपराध करणाऱ्या मनुष्यावर त्याला राजाकडून होणारी शिक्षा भोगणे, विद्वान ब्राह्मणांनी सांगितलेले प्रायश्चित्त करणे आणि जातीला भोजन घालणे अथवा मिठाई देणे असे तिहेरी बोजे पडत असत.

प्रायश्चित्ते सर्व वर्णांच्या पुरुषांना, प्रतिलोम संबंधापासून झालेल्या सर्व व्यक्तींना आणि चांडालांना देखील करिता येतात. शास्त्रात करावयास सांगितलेली कृत्ये न करणे आणि निषिद्ध कृत्ये करणे ह्यांच्या योगाने पातक लागत असल्यामुळे असे पातक करणारा आणि आपल्या पातकाचा नाश व्हावा अशी इच्छा असणारा मनुष्य, तसेच आपल्या अपराधांबद्दल पश्चात्ताप वाटणारा मनुष्य ह्यांना प्रायश्चित्त करण्याचा अधिकार असतो. (मनु १०·६२ आणि देवल).

पाच वर्षाहून मोठा आणि अकरा वर्षांहून लहान अशा मुलाने सुरापानासारखी काही पातके केल्यास

त्याला **स्वतः** प्रायश्चित्त करावे लागत नाही आणि अशा कृत्याबद्दल त्याच्या वतीने त्याचा बंधु, मित्र अथवा अन्य कोणी नातलग ह्यांना प्रायश्चित्त करावे लागते. पाच वर्षांहून कमी वयाच्या बालकाने कोणतेही कृत्य केले तरी ते पातक होत नाही आणि अशा कृत्याबद्दल तो बालक कोणतीही शिक्षा भोगण्यास अथवा प्रायश्चित्त करण्यास पात्र होत नाही. (बृहद्यम ३·१-२). मिताक्षरेच्या (याज्ञ. ३·२४३) मते पाच वर्षांपेक्षां लहान वयाच्या बालकाला शास्त्रात सांगितलेले **पूर्ण** प्रायश्चित्त करावे लागत नसून **कमी** प्रायश्चित्त करावे लागते. ८० वर्षांहून अधिक वयाचा वृद्ध अथवा १६ वर्षांहून कमी वयाचा बाल, तसेच स्त्रिया आणि रोगयुक्त व्यक्ति ह्यांना **अर्ध्याइतके** प्रायश्चित्त करावे लागते. (विष्णु. ध. सू. ५४·३३ इ.).

हेतुपूर्वक केलेल्या पातकाबद्दलचे प्रायश्चित हेतुरहित केलेल्या अपराधाबद्दलच्या, प्रायश्चित्ताच्या दुप्पट असते. अपराध करणाऱ्याच्या आणि ज्याच्याविरुद्ध अपराध केला त्याच्या जातीप्रमाणेही प्रायश्चित्तात आणि शिक्षेत भेद होतो. (विष्णु – प्राय. वि. पा. १०२). परंतु अशा प्रकारचा भेद निदान १२ व्या शतकानंतरच्या काळात राज्यकर्ते बहुतेक करीत नसत. अपराध कोणत्या **देशात** केला ह्यावरही त्याबद्दलचे प्रायश्चित्त अवलंबून असते. मामाच्या कन्येबरोबर विवाह करण्याची चाल काही देशांत आणि काही जातींत मान्य समजली जाते आणि अशा देशांत आणि जातींत त्याबद्दल प्रायश्चित्त अथवा शासन होत नाही. अपराध **पुनः पुनः** केला असल्यासही अधिक कडक प्रायश्चित्त करावे लागे. **आश्रमाला** अनुसरूनही प्रायश्चित्तामध्ये भेद होतो. इतर आश्रमातील मनुष्यापेक्षा गृहस्थाश्रमातील पुरुषाला अधिक प्रायश्चित्त करावे लागते. ज्या मुदतीपर्यंत एकादे प्रायश्चित्त करावयास सांगितले असेल त्या मुदतीच्या आतच तो मनुष्य मरण पावल्यास तो इहलोकी आणि परलोकीही पापमुक्त होतो. (हारीत).

पराशराने (६·५५।५७) म्हटले आहे की विद्वानांच्या परिषदेने अशक्त, बाल आणि वृद्ध ह्यांच्याबद्दल दयार्द्रबुद्धि दाखवावी परंतु इतरांबद्दल तशी दया दाखवू नये. विद्वान लोकांनी प्रेमाने, लोभाने, भीतीने अथवा अज्ञानाने विहित असलेले प्रायश्चित्त कमी केले तर त्या विद्वानांनाच ते पातक लागते. प्रायश्चित्तात करावयाचा संक्षेप कोणाही **एकाने** करू नये अथवा धर्मशास्त्र न जाणणाऱ्या मनुष्याने करू नये. धर्मशास्त्रात
[प्रायचित्तं यथोद्दिष्टमशक्यं दुर्बलादिभिः।
इष्यतेनुग्रहस्तेषां लोकसंग्रहकारणात्॥
एको नार्हति तत्कर्तुमज्ञो वा नाप्यनुग्रहम्।
धर्मज्ञा बहवो विप्राः कर्तुमर्हन्त्यनुग्रहम्॥
–देवल (परा. माध. २·१ पान १३०–१३१).] निष्णात असणाऱ्या **अनेक** ब्राह्मणांनाच मात्र पातकांबद्दल दयार्द्रबुद्धि दाखवून प्रायश्चित्तात संक्षेप करण्याचा अधिकार असतो. (देवल-परा. माध. २·१ पा. १३०।१३१). परिषदेचा निर्णय शक्य तो **एकमताचा** असावा असेही पराशराने म्हटले आहे. परिषदेतील विद्वान लोकांनी विहित प्रायश्चित्त जाणत असून देखील जर सांगितले नाही तर त्यांना पातक करणाऱ्यासारखेच पातक लागते. (अङ्गिरस मिता—याज्ञ ३·३००).

# प्रकरण ४

## विशिष्ट पातकांकरिता प्रायश्चित्ते

(मू. ग्रं. पा. ४/८७-१२९)

स्मृतींनी महापातके, उपपातके इत्यादी निरनिराळ्या प्रकारच्या भिन्न भिन्न पातकांकरिता निरनिराळी प्रायश्चित्ते सांगितली आहेत, आणि एकाच पातकाकरिता अनेक प्रायश्चित्ते सांगितली आहेत त्यामुळे निरनिराळ्या स्मृतिवचनांचा समन्वय करणे पुष्कळ वेळा कठीण होते. अशी बहुतेक प्रायश्चित्ते आता जुनी पुराणी झाली असून ब्राह्मणांना गाई अथवा द्रव्य दान देणे, तीर्थयात्रा करणे, वेदमंत्रांचे पठण करणे अथवा निरनिराळ्या लोकप्रिय देवतांच्या नावांचा जप करणे ह्यांसारख्या काही गोष्टींव्यतिरिक्त इतर स्वरूपाची प्रायश्चित्ते आता क्वचितच करण्यात येतात. ह्याकरिता निरनिराळ्या पातकांबद्दल करावयाच्या प्रायश्चित्तांची तपशीलवार माहिती न देता काही महत्त्वाच्या पातकांचे आणि काही महत्त्वाच्या प्रायश्चित्तांचे संक्षिप्त विवेचन करू.

**महापातके.** ब्रह्महत्या, सुरापान, गुरुतल्पगमन आणि सुवर्णाची चोरी ह्या चार **महापातकां**करिता शंखाने (१७·१-३) पुढील प्रायश्चित्त सांगितले आहे : असे पातक करणाऱ्याने दिवसातून तीन वेळा स्नान करावे, अरण्यात राहण्याकरिता एक झोपडी उभारावी, गावात भिक्षा मागण्याकरिताच प्रवेश करावा, जमिनीवर निजावे, पाला, मुळे आणि फळे ह्यांच्यावर उदरनिर्वाह करावा, दिवसातून एकदाच आहार करावा, भिक्षा मागताना आपल्या अपकृत्याचा सर्वकाळ उच्चार करावा, अशा प्रकारे १२ वर्षेपर्यंत केल्यास तो पातकांपासून मुक्त होईल. दुसऱ्या काही ग्रंथांनी (विष्णु. ध. सू. ३४·१) स्वतःच्या मातेबरोबर संभोग करणे ह्यांच्यासारख्या कृत्यांना **अतिपातक** अशी संज्ञा दिली असून त्यांच्याबद्दल अग्निप्रवेश करणे ह्या व्यतिरिक्त दुसरे प्रायश्चित्त नाही असे सांगितले आहे. सर्वसाधारण नियम असा असे की जर कोणत्याही खालच्या वर्णाच्या मनुष्याने हेतुपूर्वक ब्रह्महत्येचा प्रत्यक्ष अपराध केला असेल तर त्याबद्दल करावयाच्या प्रायश्चित्ताचा परिणाम मरणामध्ये झाला पाहिजे. (प्राय. प्रक. पा. ८·९).

मनूने [तथापि ब्राह्मणवधे प्रायश्चित्तानि सुव्रत।
मनुना कीर्तितानीह त्रयोदश यथाक्रमम्॥
—भविष्यपुराण (अपरार्क पा. १०५५).] **ब्रह्महत्ये**करिता निरनिराळी १३ स्वतंत्र प्रायश्चित्ते सांगितली आहेत. (अपरार्क पा. १०५५). वर उल्लेख केलेल्या प्रायश्चित्तांच्या तपशीलाखेरीज ज्या ब्राह्मणाची हत्या केली असेल त्याच्या मस्तकाचे एक हाड एका काठीवर टांगून ती काठी पातकी मनुष्याने खांद्यावर बाळगावी असे याज्ञ. (३·२४३) मध्ये सांगितले आहे. निरनिराळ्या ग्रंथकारांनी त्यात आणखी तपशीलांची भर घातली आहे. असे हाड बाळगण्याचा हेतु लोकांना त्याचा अपराध कळावा हा असे. मनूने (११·७२) दुसरे एक असे प्रायश्चित्त सांगितले आहे की जर एखाद्या क्षत्रियाने हेतुपूर्वक एखाद्या ब्राह्मणाचा वध केला तर त्याने युद्धात प्रवेश करावा आणि त्याच्या प्रतिस्पर्ध्याला तो ब्रह्महत्या करणारा असल्याचे माहीत असूनही जर त्याने त्या क्षत्रियाचा वध केला अथवा त्याला जखमी करून बेशुद्धावस्थेत युद्धभूमीवर टाकून दिले आणि नंतर जरी तो पुढे बरा झाला तरी देखील तो ब्रह्महत्येच्या पातकापासून मुक्त होतो. अश्वमेध यज्ञाच्या समाप्तीनंतर राजा आणि ऋत्विज अवभृथ स्नान करितात तेव्हा त्यांनी अनुमती दिल्यास आपल्या पातकाचा उच्चार करून त्यांच्या समवेत स्नान करणारा ब्रह्महत्येच्या पातकांपासून मुक्त होतो. (मनु. ११·८२). ब्रह्महत्येच्या पातकाकरिता मनूने आणि इतर ग्रंथकारांनी दुसरीही अनेक प्रायश्चित्ते सांगितली आहेत. (अपरार्क पा.

१०६४-१०६५).

ब्रह्महत्येच्या बाबतीत सोमयागात गुंतलेल्या ऋत्विजाची हत्या करणे ह्यासारख्या काही परिस्थितीत नेहमीच्या **दुप्पट** प्रायश्चित्त करावे लागते. (याज्ञ. ३·२५२). तसेच ब्रह्महत्येच्या **तुल्य** (सम) असल्याचे सांगितलेल्या पातकांबद्दल करावयाचे प्रायश्चित्त ब्रह्महत्येकरिता करावयाच्या प्रायश्चित्ताच्या **निम्मे** असते. एखाद्या क्षत्रियाने अथवा वैश्याने अथवा शूद्राने स्वतःच ब्राह्मणाचा वध केला तर त्याला **देहान्त** प्रायश्चित्त असते. परंतु तसे प्रायश्चित्त त्याने न केल्यास त्याला ब्राह्मणाने ब्रह्महत्या केल्यास कराव्या लागणाऱ्या प्रायश्चित्ताच्या **दुप्पट**, **तिप्पट**, अथवा **चारपट** प्रायश्चित्त केले पाहिजे. (प्राय. प्रक. पा. १६).

**स्त्रियांचा वध** हे कृत्य क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र पुरुषांच्या **वधाच्या** समान योग्यतेचे धरण्यात येई आणि जर ती स्त्री आत्रेयी अथवा गरोदर **अथवा** सोमयाग करणाऱ्या द्विजाची पत्नी अशासारख्या विशिष्ट प्रकारची असली तर तिच्या वधाबद्दल ब्रह्महत्येसारखे प्रायश्चित्त करावे लागे. (गौ. २२·१७ इ.).

ब्राह्मणाला प्रहार करण्याची धमकी देणे ह्याबद्दल एक कृच्छ्र प्रायश्चित्त असते, प्रत्यक्ष मार देण्याबद्दल अतिकृच्छ्र प्रायश्चित्त असते आणि रक्तपात करण्याबद्दल कृच्छ्र आणि अतिकृच्छ्र ही प्रायश्चित्ते असतात. (मनु ११·२०८).

**सुरापान**. पिठापासून तयार केलेले मद्य जर एखादा ब्राह्मण हेतुपूर्वक एकवार देखील प्राशन करील तर त्याला उकळत असलेली सुरा अथवा गोमूत्र ह्यांच्यासारखे पदार्थ प्राशन करण्यासारखी **मृत्युपर्यवसायी** प्रायश्चित्ते करावी लागत आणि अशा रीतीने जर तो मरण पावला तर तो त्या पातकापासून मुक्त होतो असे (मनु ११·९०-९१) सांगितले आहे. मनु (११·९२) आणि याज्ञवल्क्य (३·२५४) यांनी ज्याच्या योगाने देहान्त होणार नाही असे दुसरे एक प्रायश्चित्त सांगितले आहे. ते म्हणजे अशा पातक्याने एक वर्षभर (अथवा ३ वर्षेपर्यंत) दिवसातून एकदा रात्री शिजविलेल्या तांदुळाच्या कण्या अथवा तिळाची पेंड भक्षण करावी, गाईच्या केसांचे बनविलेले वस्त्र अंगावर घ्यावे, जटा धारण कराव्या आणि सुरा पिण्याचे पाच वर बसविलेला एक दंड धारण करावा. हाच नियम एखाद्या क्षत्रियाने अथवा वैश्याने तशाच प्रकारची सुरा प्राशन केल्यास त्यांना लागू पडतो, मात्र त्यांनी ब्राह्मणाने करावयाच्या प्रायश्चित्ताच्या पाऊणपट अथवा अर्धे प्रायश्चित्त करावे. गौतम (२३·२-३), मनु (११·१४६) प्रभृतींनी असे सांगितले आहे की उच्च तीन वर्णांपैकी कोणी अज्ञानाने मादक पदार्थ प्राशन केला अथवा मनुष्याचे मूत्र, विष्ठा इ. पदार्थ भक्षण केले तर त्याने प्रथमतः तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त केले पाहिजे आणि नंतर त्याचे उपनयन पुन्हा केले पाहिजे.

क्षत्रियांना आणि वैश्यांना पिठापासून तयार केलेल्या (पैष्टी) सुरेव्यतिरिक्त कोणतेही मादक पेय प्राशन करण्याबद्दल काही दोष लागत नाही आणि शूद्रांना पैष्टी सुरा प्राशन केली तरीदेखील कोणतेही पातक लागत नाही. तसेच एखाद्या उपनयन न झालेल्या मुलाने अथवा अविवाहित मुलीने सुरा प्राशन केली तरी त्यांना कोणताही दोष लागत नाही असे (कल्पतरु इ.) काही ग्रंथात प्रतिपादन केले आहे. परंतु दुसऱ्या काही ग्रंथांनी हा नियम मान्य न करून असे सांगितले आहे की उपनयनापूर्वी एखाद्या मुलाने मूर्खपणाने सुरा प्राशन केली तर त्याच्या वतीने त्याचा बाप, आई अथवा बंधु ह्यांनी तीन कृच्छ्र प्रायश्चित्त करावे [अनुपेतस्तु यो बालो मद्यं मोहात्पिवेद्यदि ।
तस्य कृच्छ्रत्रयं कुर्यान्माता भ्राता तथा पिता ॥]
—जातुकर्ण्य (परा. माध २ भाग २ पा. ८०).] (जातुकर्ण्य — परा. माध. २ भाग २ पा. ८०).

मनु (११·१६०) प्रभृतींनी असा सर्वसाधारण नियम सांगितला आहे की ज्याला आंतरशुद्धि पाहिजे असेल त्याने **निषिद्ध** केलेले अन्न भक्षण करू नये आणि अज्ञानाने भक्षण केल्यास भक्षण केलेले अन्न ओकून टाकण्याचा प्रयत्न करावा आणि तसे शक्य न झाले तर तात्काल प्रायश्चित्त करावे. फार प्राचीन काळापासून देखील अभक्ष्य पदार्थ भक्षण करण्याबद्दलच्या नियमाला अपवाद मानण्यात येत असत. छांदोग्य उपनिषदातील (१·१०) उषस्ती चाक्रायणाच्या कथेवरून असे दिसून येते की ज्यावेळी स्वतःच्या जीवाला धोका असेल तेव्हा अशुद्ध पदार्थ देखील भक्षण करण्यास प्रत्यवाय नसतो.

**सुवर्णस्तेय.** एखाद्या चोराने ब्राह्मणाच्या मालकीचे ८० रक्तिका वजनाचे अथवा ह्याहून अधिक वजनाचे सुवर्ण चोरल्यास ब्राह्मणाव्यतिरिक्त इतर वर्णांच्या अपराध्याला **देहान्त** प्रायश्चित्त करावे लागे आणि ब्राह्मण वर्णाच्या अपराध्याला फाटकी वस्त्रे अथवा वल्कले पांघरून अरण्यात ब्रह्महत्येच्या प्रायश्चित्तासारखे प्रायश्चित्त १२ वर्षेपर्यंत करावे लागे अथवा सुरापानाबद्दलच्या प्रायश्चित्तासारखे प्रायश्चित्त १२ वर्षेपर्यंत करावे लागे. चोरलेल्या सुवर्णाचे वजन, चोरणाराची आणि ज्याचे सुवर्ण चोरले असेल त्याची जात, तसेच प्रथम अपराध आहे किंवा पुनः पुनः केलेला अपराध आहे, स्थळ, काळ इत्यादी परिस्थितीला अनुसरून निरनिराळी प्रायश्चित्ते निबंध ग्रंथांत सांगितली आहेत (प्राय. वि. ५ पा. ११७-१२७ इ.). चोरलेली वस्तु परत देता आली नाही तर दुप्पट प्रायश्चित्त करावे लागे आणि काही विशिष्ट प्रकारच्या चोरांच्या बाबतीत जर त्यांना राजाने शारीरिक अथवा देहान्त शासन केले नसेल तर चोरलेल्या पदार्थाच्या ११ पट इतका दंड अशा चोरांना करण्यात येई. (मनु ८·३२१, ३२३ इ.)

चोरी दोन प्रकारची असते. एक दरवडयासारखी बलात्काराने केलेली चोरी (हिला **साहस** अशी संज्ञा आहे) आणि दुसरी गुप्त रीतीने केलेली चोरी). गुप्त रीतीने केलेल्या चोरीच्या बाबतीत चोरलेल्या संपत्तीचा स्वामी आणि चोरी करणारा ह्याच्या वर्णांना अनुसरून प्रायश्चित्त कमी अधिक असते.

**गुरूतल्पगमन.** ह्या पातकाबद्दल फार प्राचीन काळापासून पुढील [तप्ते लोहशयने गुरुतल्पगः शयीत। सूर्मीवा श्लिष्ये ज्ञवलन्तीम्।
लिङ्गं वा सवृषणमुत्कृत्याञ्चलावाघाय दक्षिणा प्रतीचीं
व्रजेदजिह्ममा शरीरपातात्।
—गौतम् (२३·८।१०)] प्रायश्चित्त सांगण्यात येत असे : अपराध करणाऱ्याने आपला अपराध कबूल करावा आणि नंतर तापून लाल झालेल्या लोखंडाच्या शय्येवर आडवे पडावे अथवा तापून लाल झालेल्या लोखंडाच्या स्त्रीच्या प्रतिमेला आलिंगन द्यावे अथवा आपले शिश्न आणि वृषण आपणच कापून आपल्या ओंजळीत घेऊन दक्षिण अथवा नैर्ऋत्य दिशेकडे मरून पडेपर्यंत सरळ चालावे आणि असे केल्याने तो अपराधी शुद्ध होतो. (गौत. २३·८-१० इ.).

ज्यांचा शेवट मृत्यूमध्ये होणार नाही अशी काही प्रायश्चित्ते मनूने (११·१०५-१०६) सांगितली आहेत. उदाहरणार्थ, अशा पातकी पुरुषाने निर्जन अरण्यात वास करावा, आपली दाढी वाढू द्यावी, फाटलेली वस्त्रे परिधान करावी आणि एक वर्षपर्यंत प्राजापत्य प्रायश्चित्त करावे. हे प्रायश्चित्त जर अपराध चुकीने घडला असेल तर करावे असे टीकाकारांनी सांगितले आहे. जर एखाद्या पुरुषाने निकट नात्याच्या स्त्रीबरोबर **तिच्या संमतीने** संभोग केला तर त्या स्त्रीला अशापुरुषाच्या इतके प्रायश्चित्त सांगावे आणि शिवाय मृत्यू ही कायदेशीर शिक्षा द्यावी असे याज्ञ० (३·२३३) ने सांगितले आहे.

एखादी स्त्री पतित झाली असली तरी तिला पूर्णपणे रस्त्यावर सोडून देऊन आपली व्यवस्था वाटेल

त्या रीतीने लावण्यास मोकळी ठेवावयाची नसून तिला घराच्या शेजारी एक झोपडी बांधून देऊन तिच्याकडून असे आणखी प्रमाद होऊ नयेत ह्याची खबरदारी घ्यावी आणि तिला प्राणधारणेला अवश्य इतके अन्न आणि मलिन वस्त्रे द्यावी. (मनु. ११·१७६). स्त्रियांच्या बाबतीत हलक्या जातीच्या अथवा निंद्य पुरुषाबरोबर संभोग करणे अथवा पतीचा वध करणे अथवा गर्भपात करणे ह्या गोष्टींचा विशेष निषेध सांगितला आहे आणि अशा स्त्रीचा अन्न वस्त्र न देताही पूर्णपणे त्याग करावा [चतस्रस्तु परित्याज्याः शिष्यगा गुरुगा च या। पतिघ्नी च विशेषेण जुङ्गित्तोपगता च या ॥
—वसिष्ठ (२१·१०)] असे वसिष्टाने (२१·१०) म्हटले आहे.

**चार महापातके** (एक अथवा अनेक) **करणाऱ्याशी सहवास करणे.** ह्या कृत्याबद्दल त्या महापातकाकरिता शास्त्रात सांगितलेले प्रायश्चित्त करावे लागते. (मनु. ११·१८१). असा संसर्ग अज्ञानाने झाला असल्यास प्रायश्चित्त निम्मे असते. जाणून बुजून सहवास करणाऱ्याने मूळ पातकाबद्दलच्या प्रायश्चित्ताच्या पाऊणपट प्रायश्चित्त करावे असे व्यासाने सांगितले आहे. अशा संसर्गाबद्दल ब्राह्मणाने करावयाच्या आणि शूद्राने करावयाच्या प्रायश्चित्तांत भेद असतो. एक वर्षाहून कमी मुदतीपर्यंत सहवास झाला असल्यास प्रायश्चित्त त्या प्रमाणात कमी करण्यात येई. एखादा मनुष्य पतित झाल्यानंतर त्याला झालेला पुत्रदेखील पतित मानला जात असे आणि त्याला वारसा हक्कातून वगळण्यात येत असे. तथापि पतिताच्या कन्यांची व्यवस्था वेगळ्या रीतीने करण्यात येई आणि अशा कन्येला विवाह करिता येत असे आणि तिने विवाह केल्यास तिच्या पतीला कोणताही दोष लागत नसे. (वसिष्ठ ११·५१।५३ इ.).

**अनुपातके**. मनु (११·५५-५८), याज्ञ. (३·२२८-२३३) ह्यांनी ज्या पातकांना कोणत्यातरी महापातकांच्या समान असल्याचे म्हटले आहे त्यांना विष्णु ध. सू. (अध्याय ३६) मध्ये **अनुपातक** अशी संज्ञा दिली असून असा नियम सांगितला आहे की अशी पातके करणाऱ्याने अश्वमेध यज्ञ अथवा तीर्थयात्रा केल्यास तो शुद्ध होतो. असेही दिसून येते की महापातकांबद्दल करावयाच्या प्रायश्चित्तापेक्षा किंचित् कमी (म्हणजे पाऊणपट) प्रायश्चित केल्याने अशा पातकांची निष्कृति होते.

**उपपातके**. उपपातकांची संख्या फार मोठी आहे. त्यांच्यासंबंधी महत्त्वाचे सामान्य नियम पुढे दिले आहेत : अनेक उपपातके करणारा मनुष्य उपोषण करून तीन वेळा सर्व वेदांचे पठण केल्याने शुद्ध होतो असे सामविधान ब्रा. (१·५·१४) मध्ये सांगितले आहे. मनु (११·११७) प्रभृतींनी असे सांगितले आहे की शास्त्रात गोवधाबद्दल सांगितलेले प्रायश्चित केल्याने अथवा एक महिनाभर दुधावर राहिल्याने अथवा पराक अथवा गोसव प्रायश्चित्त केल्याने (अवकीर्णिन् पातकांव्यतिरिक्त) सर्व उपपातकांपासून शुध्दि होते. एकाच वेळी अनेक उपपातके केली असतील तर त्यांच्याकरिता **गोसव** प्रायश्चित्त असते.

उपपातकांत **गोवधाच्या** पातकाला पहिले स्थान असते. निरनिराळ्या स्मृतींनी गोवधाबद्दल निरनिराळी प्रायश्चित्ते सांगितली आहेत. गौतमाने (२२·१८) भिक्षेवर उदरनिर्वाह करून तीन वर्षेपर्यंत अरण्यात राहणे आणि १०० गाई आणि एक बैल दान करणे हे प्रायश्चित्त सांगितले आहे. याज्ञ. ने (२·२६३-६४) जी चार प्रायश्चित्ते सांगितली आहेत त्यापैकी एक प्रायश्चित्त असे आहे की एक महिनाभर इंद्रियाचे नियमन करून पंचगव्यावर उदरनिर्वाह करावा, गाईंच्या गोठ्यात झोपावे, दिवसा त्या गाईंच्या मागे जावे आणि महिन्याच्या अंती एक गाय दान द्यावी. गाय कोणाच्या मालकीची होती त्याला अनुसरून स्मृतींनी निरनिराळी प्रायश्चिते सांगितली आहेत. गोवधाबद्दल प्रायश्चित्त करण्यापूर्वी ते पातक करणाऱ्याने त्या जनावरांची किंमत गाईच्या मालकाला भरून दिली पाहिजे. (ब्रह्मपुराण).

गाय अथवा बैल ह्यांच्या व्यतिरिक्त **इतर प्राण्यांच्या वधाबद्दल** निरनिराळी प्रायश्चित्ते सांगितली आहेत आणि ऋषींच्या अशा दयार्द्र बुद्धीचा इतका अतिरेक झाला की यज्ञ आणि शेती ह्यांच्या व्यतिरिक्त इतर कारणांकरिता आंबा, फणस ह्यांच्यासारखे मोठ वृक्ष अथवा झुडपे, वेली तोडल्यास त्याबद्दल १०० ऋचा पठण करण्याचे प्रायश्चित मनु (११·१४२) प्रभृतींनी सांगितले आहे. ह्या नियमांमुळे मनुष्यांना उपयुक्त असणाऱ्या आणि सौंदर्य वाढविणाऱ्या झाडांचा आणि झुडपांचा आणि रानांचा नाश होण्याचा टळला.

**पारदार्य.** (दुसऱ्याच्या पत्नीबरोबर व्यभिचार). त्याचप्रमाणे परपुरुषाबरोबर संभोग ही कृत्येही उपपातके असतात. **प्रतिलोम व्यभिचार** हे महापातक असून **अनुलोम व्यभिचार** उपपातक असते. (बृहद्यम ४·४८). व्यभिचाराबद्दल पुरुषाला आणि स्त्रीला सारखेच कडक प्रायश्चित्त करावे लागत असे. (मनु ११·१७६ इ.).

**व्रात्यता.** विहितकाळी उपनयन न झालेल्या व्यक्तीला **व्रात्य** अथवा **पतितसावित्रीक** अशी संज्ञा असून त्याला व्रात्यस्तोम आणि उद्दालक व्रत हे विधी करावे लागत. काही ग्रंथांनी ३ कृच्छ्रइतके सौम्य प्रायश्चित सांगून नंतर उपनयन करावे असे सांगितले आहे. (मनु.११·१९१). एखाद्या मनुष्याच्या पूर्वीच्या पिढ्यांत देखील उपनयन झाले नसले तर त्याला प्रायश्चित्त देऊन त्याचे उपनयन करता येईल किंवा नाही ह्याविषयी मतवैचित्र्य आहे. काहींच्या मते जर एखाद्या मनुष्याच्या प्रपितामहाच्या पित्यापासूनच्या सर्व पिढ्या उपनयनावाचून गेल्या असल्या तर त्याला शुद्ध करून घेता येत नाही. (प्राय. मुक्ता पृष्ठ ८०अ).

**व्रतलोप**. ज्या ब्रह्मचाऱ्याने एखाद्या स्त्रीबरोबर संभोग केला असेल त्याला **अवकीर्णिन्** अशी संज्ञा असून त्याबद्दल अनेक प्रायश्चित्ते सांगितली आहेत. उदाहरणार्थ, वसिष्ठाने (२३·१-३) म्हटले आहे की अशा ब्रह्मचाऱ्याने अरण्यातील एका चवाठ्यावर साधा अग्नि पेटवून त्यात राक्षसांप्रीत्यर्थ एका गाढवाचे हवन करावे.

**प्रत्यवसित**. जर एखादा संन्यासी पुन्हा गृहस्थाश्रमात आला तर त्याला **प्रत्यवसित** असे म्हणतात. प्रत्यवसिताची शुद्धि चांद्रायण अथवा तप्तकृच्छ्र ही प्रायश्चित्ते करून होते असे यम (२३-२२) प्रभृति काही ग्रंथकारांनी सांगितले आहे. तथापि वृद्ध पराशराने (परा. मा० २ भाग २ पा. ११) म्हटले आहे की अशा व्यक्तींनी प्रायश्चित्त केले तरी त्यांना चांडाळासमान मानावे आणि त्यांना त्यानंतर झालेल्या संततीला चांडालांत राहावयास लावावे. महान् संत ज्ञानेश्वर आणि त्यांचे बंधु ह्यांचा पैठण येथे जो छळ झाला असे म्हणतात त्याचा उलगडा ह्या नियमाने होतो. पराशर माधवीयात (२. भाग १ पा ३७३) अशा मनुष्याला **आरूढपतित** असे म्हटले आहे.

**स्पर्शदोष**. काही विशिष्ट स्थितींतील मनुष्ये, हाडासारखे पदार्थ, रजस्वला स्त्री, कावळे, इत्यादिकांच्या स्पर्शामुळे येणाऱ्या दोषाच्या शुद्धीकरिता निरनिराळे नियम सांगितले आहेत, अशा प्रकारच्या बऱ्याच दोषांची शुद्धि अंगावरील वस्त्रासहित स्नान केल्याने होते. (गौत. १४·२८). काही दोषांच्या बाबतीत ज्या अवयवाला स्पर्श झाला असेल तो अवयव पाण्याने धुवून टाकून आचमन केल्याने शुद्धि होते. (शातातप-प्राय. वि. पा. ४७३). धार्मिक उत्सवात आणि विवाहाच्या मिरवणुकीत, युद्धात, परचक्र आलेले असताना अथवा आग लागली असता अथवा संकटात स्पर्श केल्यास कोणतीही शुद्धी करण्याची आवश्यकता नाही असे काही ग्रंथांत सांगितले आहे. (अत्रि, शातातप इ.).

**परिग्रह**. (दान स्वीकारणे) ह्या बाबतीत ब्राह्मणांच्या पुढे फार उच्च आदर्श ठेविला असल्या कारणाने जर एखाद्या ब्राह्मणाने आपत्तीत नसताना एखाद्या क्षत्रियापासून अथवा ज्यांच्याकडून दान घेऊ नये त्यांच्याकडून दान स्वीकारले तर त्याला निरनिराळी प्रायश्चित्ते करावी लागत. तथापि आपत्काळी ब्राह्मणाला कोणाकडूनही दान स्वीकारण्यास मनु (१०·१०२-१०३) आणि याज्ञ. (३·४१) ह्यांनी मोकळीक ठेविली आहे.

**धर्मभ्रष्टाची शुद्धि.** म्लेच्छांनी ज्यांना बलात्काराने धर्मभ्रष्ट केले असेल त्यांना परत स्वधर्मात घेता येते किंवा नाही ह्या प्रश्नाचा विचार काही स्मृतींनी आणि निबंधग्रंथांनी केला आहे. ह्याबाबतीत म्लेच्छ कोणाला म्हणावे ह्यासंबंधी काही मतभेद आहे. जे बलात्काराने दिले असेल अथवा ज्याचा उपभोग बलात्काराने घेतलेला असेल आणि जे बलात्काराने लिहवून घेतले असेल आणि जो व्यवहार बलात्काराने घडविला असेल ते सर्व रद्द करण्यास पात्र असते असे मनु (८·१६९) प्रभृतींनी सांगितले आहे. असे असल्यामुळे बलात्काराने ज्यांचे धर्मांतर केले गेले असेल आणि ज्यांना परत स्वधर्मात येण्याची उत्कट इच्छा असेल त्यांना परत येण्यास उत्तेजन दिले पाहिजे. ह्या कृत्याला परावर्तन असे म्हणणे अधिक सयुक्तिक होईल.

ज्या कृत्यांना **जातिभ्रंशकर** अशी संज्ञा दिली आहे त्यांच्यापैकी एखादे कृत्य पूर्णपणे जाणून बुजून केले असेल तर त्याबद्दल **सांतपन** प्रायश्चित्त करावे आणि असे कृत्य अज्ञानाने केले असेल तर **प्राजापत्य** प्रायश्चित्त करावे असे मनूने (११·१२४) म्हटले आहे. ज्यांना **संकरीकरण** अथवा **अपात्रीकरण** अशी संज्ञा आहे त्यांच्याबद्दल **चांद्रायण** प्रायश्चित्त करावे. **मलावह** कृत्यांकरिता तीन दिवस जवाच्या कांजीने पोळून घेण्याचे प्रायश्चित्त करावे. (मनु. ११·१२५). **संकीर्ण** पातकांकरिता कोणते प्रायश्चित्त करावे हे केलेल्या कृत्याच्या स्वरूपावरून आणि पातक करणाऱ्याच्या सामर्थ्यावरून तसेच देशकालपरिस्थितीचा विचार करून ठरवावे असे मनु (११·२०९) प्रभृतींनी सांगितले आहे.

**प्रायश्चित्त करण्याला योग्य काल**. ह्यासंबंधी मुख्य [ नैमित्तिकानि काम्यानि निपतन्ति यथा यथा।
तथा तथा हि कार्याणि न कालं तु विलम्बयेत् ॥
— दक्ष (२·७३), प्रायश्चित्ततत्त्व पा. ५१२ ] नियम असा आहे की एखादे अयोग्य कृत्य केल्यावर तात्काल शुद्धि करावी (दक्ष २·७३). तथापि काही विशिष्ट महिने, वार, तिथि विशिष्ट कृत्यांकरिता विहित असल्याचे सांगितले आहे. एका ग्रंथात म्हटले आहे की शिष्टांच्या मताप्रमाणे प्रायश्चित्त करावयाचा संकल्प कृष्णपक्षातील चतुर्दशी तिथीला करावा आणि प्रत्यक्ष विधी अमावास्येला करावा. (प्रायश्चित्तेंदुशेखर पा. १५)

**विधि**. पातकांकरिता आणि प्रमादांकरिता विद्वानांच्या परिषदेने सांगितलेली प्रायश्चित्ते करण्याचा विधि भिन्न भिन्न काळी भिन्न भिन्न प्रकारचा असे. सर्व धार्मिक विधींमध्ये आचारशुद्ध आणि वेदवेत्त्या ब्राह्मणांना भोजन घालावे. (आप. ध. सू. २ ६ १५ ९). सर्व प्रकारच्या प्रायश्चित्तांचे एक अंग म्हणून ब्रह्मचर्य, दया, क्षमा आदि **यम** आणि स्नान, मौन, उपोषण आदि **नियम** आचरण करावे लागतात. (याज्ञ. ३ ३१२।१३). काही प्रसंगी मस्तकाचे मुंडन करणे हे कृत्य प्रायश्चित्ताचे एक अंग असते. केशांचे मुंडन करण्याच्या अथवा वपन करण्यासंबंधीही तपशीलाचे अनेक नियम आहेत. अशी कल्पना असावी असे दिसते की मनुष्य जे काही पातक करितो ते त्याच्या केसांमध्ये एकवटते. (प्राय. प्र. पा. १९). सुवासिनी स्त्रिया, कुमारिका ह्यांचे सर्व

केस एकत्र करून फक्त दोन बोटे केस कापावे; विधवा आणि संन्यासिनी ह्यांच्या सबंध मस्तकाचे मुंडन करावे. प्रायश्चित्ताच्या अंगभूत असणारी स्नाने भस्म, गोमय, मृत्तिका, पाणी, पंचगव्य आणि कुशोदक ह्यांच्यासहित करण्यात येतात.

**गुप्त प्रायश्चित्ते**. प्रायश्चित्तांचे दोन प्रकार असतात. **प्रकाश** म्हणजे उघडपणे करावयाची आणि **रहस्य** म्हणजे गुप्तपणे करावयाची. गुप्त प्रायश्चित्तांची योजना आहिताग्नि, विनीत, वृद्ध अथवा विद्वान लोकांकरिता असते आणि प्रकाश प्रायश्चित्तांची योजना इतर लोकांकरिता असते. (वसि. २५·२). ज्यावेळी एखाद्या मनुष्याचे पातक त्याच्या स्वतःशिवाय दुसऱ्या कोणाला माहित नसेल त्यावेळी त्या मनुष्याने गुप्त प्रायश्चित्त करण्यास प्रत्यवाय नसतो. व्यभिचाराच्या बाबतीत आणि महापातक करणाऱ्याबरोबर घडलेल्या सहवासाच्या बाबतीत असा व्यभिचार ज्या स्त्रीबरोबर केला असतो तिला ते पातक माहित असले तरी आणि महापातक करणाऱ्या ज्या व्यक्तीबरोबर सहवास घडला असेल त्या व्यक्तीला ती गोष्ट माहित असली तरीदेखील त्या दोषाबद्दल गुप्त प्रायश्चित्त करिता येते. एखाद्या मनुष्याला आपल्या पातकाला विहित प्रायश्चित्त कोणते ह्याची माहिती असेल तर त्याने ते प्रायश्चित्त परिषदेकडे न जाताही करावे. परंतु जर त्याला योग्य प्रायश्चित्त माहित नसेल तर त्याने काही जाणत्या मनुष्यांचा खाजगी रीतीने सल्ला घ्यावा आणि एखाद्या विशिष्ट पातकाला कोणते प्रायश्चित्त करावे असा मोघम प्रश्न विचारावा. अशा गुप्त प्रायश्चित्तांमध्ये प्राणायाम, दाने, होम, जप, उपोषण, हविष्यान्नभक्षण इत्यादिकांचा समावेश होतो.

प्राचीन स्मृतींनी सांगितलेली काही प्रायश्चित्ते भयंकर आणि देहान्त घडविणारी आहेत असे ऋषींच्या निदर्शनास आले. त्यामुळे पुढील काळात अधिकाधिक **दयार्द्रबुद्धीची** आणि अधिकाधिक **सोपी** अशी प्रायश्चित्ते सांगण्यात येऊ लागली. हारीताने (परा. मा. २ भाग १ पा. २३५) म्हटले आहे की धर्मशास्त्राचे अध्ययन करणाऱ्या ब्राह्मणांनी पातकी मनुष्याचे वय, काल आणि शक्ती ह्यांना अनुरूप असे प्रायश्चित्त सांगावे. ते प्रायश्चित्त असे असावे की त्याच्यामुळे पातकी मनुष्याचा जीव न गमावता तो शुद्ध व्हावा. ज्याच्यायोगाने पातकी मनुष्याला अति त्रास पोचेल असे प्रायश्चित्त सांगू नये. शंखाने [तस्करश्वापदाकीर्णे बहुव्यालमृगे वने।
न व्रतं ब्राह्मणः कुर्यात् प्राणबाधाभयात्सदा ॥
शरीरं धर्मसर्वस्वं रक्षणीयं प्रयत्नतः।
शरीरात्स्रवते धर्मः पर्वतात्सलिलं यथा ॥
—शंख १७·६३ आणि ६५ (अपरार्क पा १२३१)] (१७·६३ आणि ६५) ही असे म्हटले आहे की शरीर हे धर्माचे सार असल्याकारणाने त्याचे संरक्षण प्रयत्नाने केले पाहिजे. शरीरापासून धर्माची उत्पत्ती होते.

जसजसा काळ बदलत गेला तसतसे (**प्रत्याम्नाय** नावाचे) **सोपे** पर्याय सापडले आणि ते शास्त्रग्रंथांत सांगण्यात आले. प्रत्याम्नाय हा शब्द प्रायश्चित्त ह्या अर्थाने आप. (५·२०·१८) आणि शांख्यायन श्रौत सूत्रात (१४·५१·६) आला आहे. प्रायश्चित्ताच्या बाबतीत **सुवर्ण** हा गाईच्याबद्दल पर्याय असल्याचे गौतमाने (१९·१६ आणि १८) म्हटले आहे आणि ब्रह्मपुराणात (परा. मा २ भाग २ पा. १९७) एका गाईच्या अभावी एक निष्क, अथवा अर्ध निष्क अथवा पाव निष्क दान द्यावा असे सांगितले आहे. अशाच प्रकारचे गायत्री मंत्राचा जप, ब्राह्मण भोजन इत्यादी अनेक प्रत्याम्नाय मोठ्या प्रायश्चित्तांच्या बदली सांगितले आहेत. ह्यामुळे मध्ययुगीन काळापासून महापातकांच्या बाबतीत देखील अशा तऱ्हेची उतरत्या श्रेणीच्या प्रत्याम्नायांची परंपरा निर्माण झाली. स्मृतींत सांगितलेल्या ह्या पर्यायांमुळे आधुनिक काळात आसन्न मरण झालेले लोक आपल्या **सर्व पातकांबद्दल प्रायश्चित्त** म्हणून एक गाय अथवा द्रव्यरूपी दाने पुरोहिताला देतात.

# प्रकरण ५

## प्रायश्चित्तांची नावे आणि वर्णने

(मू. ग्रं. पा. ४/१३०-१५२).

प्रस्तुत प्रकरणात स्मृतींनी आणि निबंधग्रंथांनी सांगितलेल्या महत्वाच्या प्रायश्चित्तांची नावे आणि संक्षिप्त वर्णने देण्यात येतील. अशा प्रायश्चित्तांचे कृच्छ्र, चांद्रायण, सांतपन, प्राजापत्य, हे प्रमुख गट असून अर्ध्याहून अधिक प्रायश्चित्ते कृच्छ्र ह्या गटात येतात.

**कृच्छ्र.** सामविधान ब्राह्मणात (१·२·१) असे सांगितले आहे की कृच्छ्र करणाऱ्याने तीन दिवस केवळ दिवसा हविष्यान्न भक्षण करावे आणि रात्री काही खाऊ नये, नंतर पुढील तीन दिवस केवळ रात्री भोजन करावे, नंतरचे तीन दिवस त्याने अन्नाकरिता कोणाकडे भिक्षा मागू नये अथवा दुसऱ्याजवळ अन्न मागू नये आणि नंतर तीन दिवस पूर्ण उपोषण करावे. प्रायश्चित्त करणाऱ्याला शुद्ध होण्याची त्वरा असेल तर त्याने दिवसा उभे राहावे आणि रात्री बसल्या स्थितीत राहावे. ह्या तपशीलांत मुदत आणि इतर बाबी यांत निरनिराळे फरक करून अनेक उपपदे जोडून निरनिराळी प्रायश्चित्ते बनविली आहेत.

ह्या प्रायश्चित्तांची वर्णने गौतम, बौधायन, लौगाक्षि, प्रायश्चित्त प्रकाश, पराशरमाधवीय, आपस्तंब ध. सू., मनु प्रभृति ग्रंथकारांनी आणि ग्रंथांनी केली आहेत. पराशर माधवीय (२ भाग १ पा. ३०) आणि प्राय. प्रकाश (पृष्ठ ६४अ) ह्यांनी असे सांगितले आहे की कोणत्याही उपपदाशिवाय असलेल्या कृच्छ्र हा शब्दाचा अर्थ **'प्राजापत्य'** असा असतो.

कृच्छ्राचे काही भेद पुढे दिले आहेत :—

अतिकृच्छ्र, अर्धकृच्छ्र, आग्नेयकृच्छ्र, कृच्छ्रसंवत्सर, कृच्छ्रातिकृच्छ्र, गोमूत्रकृच्छ्र, जलकृच्छ्र, तप्तकृच्छ्र, तुलापुरुषकृच्छ्र, तोय अथवा वरुण कृच्छ्र, दधिकृच्छ्र, देवकृच्छ्र, धनदकृच्छ्र, नित्योपवासकृच्छ्र, पत्रकृच्छ्र, पर्णकृच्छ, पर्णकूर्च, पादकृच्छ्र पादोनकृच्छ्र, पुष्पकृच्छ्र, फलकृच्छ्र, बाल अथवा शिशुकृच्छ्र, ब्रह्मकृच्छ्र, महातप्तकृच्छ्र, महेश्वरकृच्छ्र, मूलकृच्छ्र, मैत्र अथवा व्यासकृच्छ्र, यज्ञकृच्छ्र, वायव्यकृच्छ्र, वृद्ध अथवा वृद्धि कृच्छ्र, शीतकृच्छ्र, श्रीकृच्छ्र, सुवर्णकृच्छ्र, सौम्यकृच्छ्र.

**चांद्रायण**. ज्या विधीमध्ये चंद्राच्या कलांना अनुसरून (अन्नग्रहणाच्या बाबतीत) वृद्धि आणि क्षय असतो त्या विधीला **चांद्रायण** [चन्द्रस्यायनमिवायनं चरणं यस्मिन् कर्मणि ह्रासवृद्धिभ्यां तच्चान्द्रायणम्। – मिताक्षरा (याज्ञ ३·३२३)] म्हणतात (मितायाज्ञ ३·३२३). ह्या प्रायश्चित्ताचे वर्णन बौधायन, याज्ञ., गौतम, वसिष्ट, विष्णु. ध. सू., पराशर, प्रायश्चित्तप्रकाश इत्यादि ग्रंथकारांनी आणि ग्रंथांत केले आहे. ह्या प्रायश्चित्ताचा प्रारंभ पौर्णिमेपासून अथवा अमावास्येपासून करावयाचा ह्याला अनुसरून ह्या प्रायश्चित्ताचे **यवमध्य** आणि **पिपीलिकामध्य** असे भेद असतात. तसेच मूळ अर्थाप्रमाणे क्षयवृद्धि करावयाची अथवा लाक्षणिक अर्थाला अनुसरून करावयाची ह्याप्रमाणे **मुख्य** आणि **गौण** असेही भेद असतात. ह्यातील तपशीलांतील भेदांना अनुसरून त्याचे आणखीही काही प्रकार असतात. **यवमध्य** म्हणजे शुद्ध प्रतिपदेला एक ग्रासाने आरंभ करून पौर्णिमेला १५ ग्रास घ्यावयाचे आणि वद्य प्रतिपदेला १४ ग्रास ह्याप्रमाणे एक एक ग्रास कमी करून अमावास्येला पूर्ण उपोषण करावयाचे. ह्याच्या उलट **पिपीलिकामध्य** प्रकारात पौर्णिमेला पूर्ण भोजन करून वद्य प्रतिपदेला १५ ग्रास

भक्षण करावे, नंतर प्रत्येक तिथीला एक एक ग्रास कमी करून अमावास्येला एक ग्रास भक्षण करावा, नंतर शुद्ध प्रतिपदेला दोन ग्रास भक्षण करावे आणि ह्याप्रमाणे शुद्ध १४ ला १५ ग्रास येतील आणि पौर्णिमेला पूर्ण उपोषण करावे असें कल्पतरु ह्या ग्रंथामध्ये सांगितले आहे. **सामान्य** (अथवा **सर्वतोमुख**) चांद्रायणात ३० दिवसांच्या एका महिन्यात एकूण २४० ग्रास इतके अन्न भक्षण करावयाचे असते आणि त्या ग्रासांची विभागणी (चंद्राच्या कलांना अनुसरून न करिता) व्रत करणाऱ्याने आपल्या इच्छेला अनुसरून करावयाची असते.

ग्रास केवढा असावा ह्याविषयी मतवैचित्र्य आहे. गौतमाने (२७·१०) असा नियम सांगितला आहे की घास घेताना तोंड ताणावे लागणार नाही एवढा ग्रास असावा. याज्ञ.(३·३२३) ने मयूरीच्या अंड्याएवढा आणि पराशराने कोंबंडीच्या अंड्याएवढा ग्रास सांगितला आहे. शंखाने न वाळलेल्या आमलका- (आवळ्या) च्या फळाइतका ग्रास असावा असे सांगितले आहे.

ह्याचे यतिचांद्रायण, शिशुचांद्रायण, सुरचांद्रायण इत्यादिही भेद आहेत. हे व्रत [अनादिष्टेषु पापेषु शुद्धिश्चान्द्रायणेन तु।
धर्मार्थ यश्चरेदेतच्चन्द्रस्यैति सलोकताम्॥ —याज्ञ. (३·३२६).] पातकनिवृत्तिकरिता तसेच पुण्यसंचयाकरिताही करिता येते.

**सांतपन**. ह्या प्रायांश्चत्ताचे वर्णन मनु, याज्ञ., बोधायन, शंख, अत्रि, विष्णु प्रभृति ग्रंथकारांनी केले आहे. ह्यात २१ दिवसपर्यंत निरनिराळ्या मुदतीपर्यंत पंचगव्यातील पदार्थ (गोमूत्र, गाईचे शेण, दूध, दही आणि तूप) प्राशन करून राहावयाचे असते, आणि मध्यंतरी निरनिराळ्या मुदतीपर्यंत उपोषण करावयाचे असते. मुदतीला अनुसरून ह्या प्रायश्चित्ताचे पाच प्रकार असतात.

गोमूत्र प्रभृति वर सांगितलेले पाच पदार्थ आणि सहावा कुशोदक हे सहा पदार्थ पृथक् पृथक् अनुक्रमाने सहा दिवस प्राशन केले आणि त्यानंतर एक दिवस उपोषण केले म्हणजे **महासांतपन** प्रायश्चित्त होते. शंख, बौधायन आणि जाबालि ह्यांच्या मताप्रमाणे महासांतपन २१ दिवसाच्या मुदतीचे असून त्यात वरील सहा पदार्थ प्रत्येकी तीन तीन दिवस प्राशन करावयाचे असून तीन दिवस उपोषण करावयाचे असते. हे पाच पदार्थ तीन तीन दिवस भक्षण करून करावयाचे १५ दिवसाचे प्रायश्चित्त यमाने [त्र्यहं पिबेत्तु गोमूत्रं त्र्यहंवै गोमयं पिबेत्।
त्र्यहं दधि त्र्यहं क्षीरं त्र्यहं सर्पिस्ततः शुचिः॥
महासान्तपनमेतत्सर्वपापप्रणाशनम्। —यम (मिता-याज्ञ ३·३१५)] सांगितले आहे. (मिता. याज्ञ. ३·३१५).

**पंचगव्य** आणि ब्रह्मकूर्च. ह्या प्रायश्चित्तांचाही पंचगव्यातील पदार्थांशी संबंध असतो. पंचगव्य प्रायश्चित्तामध्ये **पंचगव्यातील** पदार्थांचे **मिश्रण** करून ते प्राशन करून राहावयाचे असते. मनु, देवल, पराशर प्रभृति ग्रंथकारांनी निरनिराळ्या पातकांकरिता हे प्रायश्चित्त सांगितले आहे. विष्णु. (५४·७), अत्रि (३००) प्रभृति ग्रंथकारांनी शूद्रांना पंचगव्य प्राशन करण्यास निषेध केला असला तरी देवल (श्लोक ६१), आणि प्राय. मयूख (पा. १३) प्रभृति मध्ययुगीन काळात झालेल्या ग्रंथांनी शूद्रांना पंचगव्य प्रायश्चित्त करण्यास अनुमति दिली आहे.

जेव्हा एखादा मनुष्य एक दिवस उपोषण करतो आणि दुसऱ्या दिवशी पंचगव्यातील पदार्थ वेदमंत्रांनी मिसळून ते प्राशन करितो त्याला **ब्रह्मकूर्च** म्हणतात. (मिता. याज्ञ. ३·३१४). पराशराने (११·२७-२८) ब्रह्मकूर्च आणि पंचगव्य ही प्रायश्चिते ते समानार्थी मानली आहेत. मदनपारि. (पा. ७२९),

प्रायश्चित्त सार (पा. १८९) ह्यांनी सांतपनाला ब्रह्मकूर्च संज्ञा असल्याचे म्हटले आहे.

**प्राजापत्य.** कृच्छ्र ह्या शब्दाला कोणतेही उपपद लावलेले नसले म्हणजे त्याचा अर्थ प्राजापत्य असा होतो हे मागे सांगितले आहे. मनुप्रभृतींनी प्राजापत्याचे निरनिराळे प्रकार सांगितले आहेत. उदाहरणार्थ, तीन तीन दिवसांच्या चार आवृत्या करून एका आवृत्तीत तीन दिवस फक्त एक वेळ दिवसा भोजन करावयाचे, दुसऱ्या आवृत्तीतील तीन दिवस फक्त एक वेळ रात्री भोजन करावयाचे, तिसऱ्या आवृत्तीतील तीन दिवस फक्त एक वेळ न मागता मिळालेले अन्न भक्षण करावयाचे आणि चौथ्या आवृत्तीतील तीन दिवस पूर्ण उपोषण करावयाचे. (मनु ११·२११). ह्या प्रकाराला **स्थानविवृद्धी पूर्वक** प्रायश्चित्त म्हणतात. असेच थोड्याशा भेदाने '**दंडकलित**', '**आनुलोम्पेन**', '**प्रातिलोम्येन**' इत्यादि प्रकार होतात.

प्राजापत्य प्रायश्चित वेदमंत्रांचे पठण करून करिता येते अथवा (स्त्रिया आणि शूद्रांना) वेदमंत्रविरहित करिता येते.

ह्यांच्याशिवाय अनेक प्रायश्चित्ते सांगितली असून त्यात **पराक** (१२. दिवसपर्यंत इंद्रियनिग्रहपूर्वक काहीही अन्नभक्षण न करिता राहाणे; मनु ११·२१५),**याम्य** (एक महिनाभर गाईच्या शेणात सापडणाऱ्या सातूच्या दाण्यावर निर्वाह करणे; **विष्णुधर्मोत्तर**, प्राय. प्रका. पृ. ४८ब), **यावक** (गाईच्या शेणात सापडणाऱ्या यवाच्या दाण्यावर एक महिना राहणे; शंख १८·१०।११), **वज्र** (तुपात तळेलेले यवाचे दाणे गोमूत्रात भिजवून खाणे; अत्रि १६४), **सोमायन** (३० दिवसाचे निरनिराळ्या मुदतीचे पाच भाग करून एका भागात गाईच्या चारी स्तनांचें दूध पिणे, दुसऱ्या भागात तीन स्तनांचे; तिसऱ्या भागात दोन स्तनांचे, चौथ्या भागात एका स्तनाचे दूध पिणे आणि पाचव्या भागात संपूर्ण उपोषण करणे; मदनपारि पा ७४४-७४६), **एकभक्त** (एक महिनाभर दिवसातून फक्त एक वेळ भोजन करणे, प्राय. प्रका. पृष्ठ ४८अ), **अधमर्षण** (स्नानाकरिता पाण्यात उभे राहून दिवसातून तीन वेळा अधमर्षण सूक्ताचा (ऋ. १०-१९०·१ ते ३) जप करणे; गौत. २४·११), **अश्वमेधायभुयस्नान** (विष्णु ध. सू. ३६), इत्यादिकांचा समावेश होतो.

# प्रकरण ६

## प्रायश्चित्ते न केल्यामुळे होणारे परिणाम

(मू. ग्रं. पा. ४/१५३-१७८)

जर एखाद्या पातकी मनुष्याने प्रायश्चित्त केले नाही तर त्याला भयंकर आणि दूरगामी परिणाम भोगावे लागतात असे स्मृति, पुराणे, निबंधग्रंथ यांत सांगितले आहे. असे लोक भयंकर **नरकांत** पडतात आणि दीर्घकालपर्यंत नरकातील यातना सोसल्यानंतर उरलेली अवशिष्ट पातके भोगण्याकरिता ते वृक्ष, झुडपे, जीवजंतु इत्यादि रूपाने अथवा वाईट नखे, दात इत्यादि अपमानकारक चिन्हांनी युक्त अथवा रोगांनी पीडित असे ह्या लोकात जन्माला येतात. [प्रायश्चित्तविहीना ये राजभिश्चाप्यवासिताः।
नरकं प्रतिपद्यन्ते तिर्यग्योनिं तथैव च॥
मानुष्यमपि चासाद्य भवन्तीह तथाङिकताः।
—विष्णुधर्मोत्तर (२·७३·४-५)] (विष्णु धर्मोत्तर २·७३·४-५).

**स्वर्ग** आणि **नरक** ह्यांच्या स्वरूपांविषयी अनेक ग्रंथांत वर्णने केली आहेत. ऋग्वेदामध्ये **नरकाचा** अथवा नरकामधील यातनांचा स्पष्ट अथवा प्रत्यक्ष एकही उल्लेख आला नसला तरी त्या ग्रंथात देखील पातकी लोकांना अंधकारात अथवा खोल खड्ड्यात फेकण्यात येते अशी वर्णने (ऋ. २·२९·६; ४·५·५ इ.) आली आहेत. अथर्ववेद (२·१४·३), वाज. संहिता (३०·५), शतपथ ब्रा. (११·६·१-४), तैत्तिरीय आरण्यक (१·१९) इत्यादि वैदिक ग्रंथांत नरक लोकांचे आणि नरकातील भयंकर यातनांचे उल्लेख आले आहेत. उपनिषदांच्या काळी मृताला कोणकोणती गति प्राप्त होते ह्याविषयी निरनिराळी मते अस्तित्वात होती. तथापि रामायण, महाभारत आणि पुराणे ह्यांच्या काळात नरक यातनांच्या अस्तित्वाबदल जितका दृढविश्वास वाटत होता तितका तरी विश्वास उपनिषदांच्या काळात वाटत नसावा असे दिसते.

नरकाच्या उलट असणारा जो **स्वर्ग** त्याच्याबद्दलची माहिती ऋग्वेदकाळापासूनच्या निरनिराळ्या ग्रंथांत नरकापेक्षा अधिक स्पष्टपणे मिळते. ऋग्वेदामध्ये तीन स्वर्ग असल्याचे वर्णन आले आहे (ऋ. १·३५·६); तसेच स्वर्गातील जीवन हर्ष आणि आनंद ह्यांनी परिपूर्ण असते, तेथे राहणाऱ्यांच्या सर्व इच्छा परिपूर्ण केल्या जातात, ह्या जन्मात केलेल्या इष्टापूर्त कर्मांमुळे प्राप्त झालेल्या पुण्याचा तेथे उपभोग मिळतो, तेथे दूध आणि मध ह्यांचे प्रवाह असतात, तेथे रहाणाऱ्यांचे देह रोगमुक्त असतात, त्यांना आपल्या पूर्वजांचा समागम घडतो, अशा तऱ्हेची वर्णने निरनिराळ्या ग्रंथांत केली आहेत. सदाचरणाचे लोक आणि युद्धात मारले गेलेले वीर मृत्यूनंतर स्वर्गात जातात आणि त्यांना तेथे अप्सरांचा सहवास घडतो, स्वर्ग हे एक अखंड सुखाचे स्थान अथवा अवस्था आहे अशी कल्पना प्राचीन काळच्या बहुतेक समाजांत सर्वसाधारणपणे अस्तित्वात होती. बृहदा. (४·३·३३), तैत्ति. (२·८) प्रभृति उपनिषदांतही देवलोकातील सुखांची वर्णने आली असून त्यांत असेही म्हटले आहे की ज्या लोकांचे आचरण चांगले असते त्यांना त्वरित एखादा ब्राह्मण-क्षत्रियादींचा जन्म प्राप्त होतो आणि वाईट आचरणाऱ्या लोकांना एखादा कुत्रा, डुकर अथवा चांडाल ह्यांच्यासारखा वाईट जन्म प्राप्त होतो. (छां. उ. ५·१०·७).

वेदानंतरच्या काळात **कर्म** आणि **पुनर्जन्म** ह्यांच्यासंबंधीचे सिद्धांत सर्व भारतभर मान्य झाले आणि त्यावेळी वेदांच्या काळच्या स्वर्ग आणि नरक ह्यांच्या कल्पनात बदल करण्यात येऊन असे प्रतिपादन करण्यात येऊ लागले की स्वर्गातील सुखांचा तसेच नरकातील यातनांचा केव्हातरी अंत होतो आणि

पुण्यकर्मे करणारा ह्या लोकी चांगल्या जन्माला येतो आणि पाप करणारा पशु, वृक्ष ह्यांच्या अथवा रोगयुक्त अथवा व्यंगयुक्त मनुष्य ह्यांच्या जन्माला येतो.

नरकाच्या कल्पनेत **यमाला** महत्त्वाचे स्थान आहे. ऋग्वेंदात (१०·५८·१) यमाला वैवस्वत म्हणजे सूर्याचा पुत्र म्हटले आहे. यम ही भारतीय आर्य आणि इराणमधील आर्य ह्यांच्या सामान्य संस्कृतीतील एक देवता आहे. ऋग्वेदामध्ये त्याला राजा म्हटले असून लोकांना एकत्र करण्याचे कार्य त्याच्याकडे असते, त्याने स्वर्गात जाण्याचा मार्ग प्रथम तयार केला, यम आणि मृत्यू एकच असतो, यम देवांसमवेत सोम प्राशन करतो, त्याच्याजवळ चार डोळ्यांचे दोन कुत्रे असतात, यमाचे दूत मनुष्यांमध्ये फिरून लोकांच्या कृत्यांची नोंद ठेवीत असतात, घुबड अथवा कपोत पक्षी यमाचा दूत असतो आणि ते एक दुश्चिन्ह समजतात, पितर यमाच्या संगतीत सुख भोगीत असतात इत्यादिं वर्णने केली आहेत. अथर्ववेदामध्ये.[यो ममार प्रथमो मर्त्यानांयःप्रेयाय प्रथमो लोकमेतम्।
वैवस्वतं सङ्गमनं जनानां यमं राजानं हविषा सपर्यत॥
– अथर्व. (१८·३·१३)] (१८·३·१३) यम हा मनुष्यात प्रथम मृत्यू पावला असल्याचे सांगितले आहे. वराह (अ. २०५), अग्नि (अ. ३७१) प्रभृति निरनिराळ्या पुराणांतही यमाच्याबद्दल अशाच प्रकारची वर्णने केली आहेत.

निरुक्तामध्ये (१·११) नरक ह्या शब्दाची व्युत्पत्ती दोन प्रकारची सांगितली आहे. एक व्युत्पत्ती नि+अरक= खाली म्हणजे पृथ्वीच्या खालच्या प्रदेशात जाणे अशी आहे आणि दुसरी व्युत्पत्ती न+र+क=ज्या ठिकाणी आनंदाला तिळमात्र जागा नसते असे स्थळ अशी आहे. नरक हे स्थान पृथ्वीच्या खाली आणि पाण्याच्या वरच्या बाजूला तिन्ही लोकांच्या दक्षिणेस असून त्या ठिकाणी अग्निष्वात्त प्रभृति पितृगणांचे वास्तव्य असते असे भागवत पुराणात (५·२६·३-४) वर्णन केले आहे.

नरकांची संख्या निरनिराळ्या ग्रंथांत निरनिराळी सांगितली आहे. वेदान्त सूत्रात (३·१·१५) आणि विष्णुपुराणात (१·६·४१) नरक **सात** असल्याचे सांगितले आहे. विष्णुपुराणात दुसऱ्या एका ठिकाणी (२·६·२-५) २६ नरकांची नावे दिली आहेत; मनु (४·८८-९०), याज्ञ. (३·२२२-२४) प्रभृति स्मृतींत आणि बऱ्याच पुराणांत २१ नरकांचा उल्लेख केला असून काही पुराणांत २२, २५, २८, १४४ अशा निरनिराळ्या संख्या दिल्या आहेत आणि नरकांच्या संख्येची वाढ करण्याची प्रवृत्ती इतक्या कोटीला जाऊन पोचली. [खड्गशूलनिपातैश्च भिद्यन्ते पापकारिणः।
नरकाणां सहस्रेषु लक्षकोटिशतेषु च।
स्वकर्मोपार्जितैर्दोषैः पीड्यन्ते यमकिंकरैः॥
– ब्रह्मपुराण (२१५·८२।८३)] की ब्रह्म (२१५·८२-८३), विष्णु धर्मोत्तर (स्मृ. मुक्ता. प्राय. पा. ८५९), गरुड (प्रेत. ३·३) प्रभृति ग्रंथांत नरकांची संख्या सहस्रावधि, लक्षावधि आणि कोट्यवधि असल्याची विधाने केली आहेत.

त्याप्रमाणेच नरकवासाच्या कालावधीबद्दलही निरनिराळ्या ग्रंथांत निरनिराळी विधाने केली आहेत. उदाहरणार्थ, विष्णु. ध. सू. (४६·२३-१९) मध्ये म्हटले आहे की ज्यांनी अतिपातके, अनुपातके, संकरीकरण पातके केली असून त्यांच्याबद्दल प्रायश्चित्ते केली नसतील ते अनुक्रमे एक **कल्प**पर्यंत, एक **मन्वंतर पर्यत**, **चार युगे**पर्यंत निरनिराळ्या २१ नरकांत क्रमाक्रमाने यातना भोगतात आणि इतर पातके करणारे अनेक वर्षेपर्यंत त्यांतील यातना भोगतात.

बुद्ध आणि जैन धर्मांच्या प्राचीन ग्रंथांत देखील नरकाची कल्पना ब्राह्मण प्रणीत ग्रंथावरून उचलली

असावी असे दिसते.

नरकवासाप्रमाणे **स्वर्गलोकाची भपकेदार वर्णने** महाभारत, पुराणे इत्यादी ग्रंथांत आली आहेत. उपनिषदांत (कौषी. उप. १·३) देखील अग्निलोक, वायुलोक प्रभृति देवांच्या अनेक लोकांचे उल्लेख आले आहेत. स्वर्ग आणि तेथील सुखे ह्यांच्या बाबतीत दोन गोष्टी लक्षात ठेवण्यासारख्या आहेत. एक गोष्ट म्हणजे स्मृतींनी आणि पुराणांनी ह्या बाबतीत स्वीकारलेली **धंदेवाईक वृत्ती** -इतके दान दिले म्हणजे स्वर्गात इतका सुखोपभोग मिळतो अशा प्रकारचा देवघेवीचा व्यवहार त्यांत वर्णन केला आहे; आणि दुसरी गोष्ट म्हणजे स्वर्गातील सर्वात अधिक अशा सुखोपभोगाला **कालाची मर्यादा** असते—म्हणजे त्या सुखोपभोगाचा केव्हा तरी शेवट होतो आणि नंतर त्या लोकांना पुन्हा ह्या मर्त्य लोकात जन्म घ्यावा लागतो. क्रमाक्रमाने असा सिद्धांत प्रस्थापित करण्यात आला की ह्या जन्ममरणाच्या फेऱ्यांतून केवळ सत्कृत्यांच्या योगाने कायमची मुक्तता होत नाही.

स्वर्ग आणि नरक ह्या शब्दांनी कशाचा बोध होतो ह्याविषयी अत्यंत प्राचीन काळापासून कडाक्याचे वाद उत्पन्न झाले आहेत. वेद, स्मृति, पुराणे ह्यांत व्यक्त झालेला सर्वसाधारण समज असा होता की **स्वर्ग हे सुखोपभोगाचे स्थान** असून ते पृथ्वीच्या **वर** असते आणि **नरक हे यातना भोगण्याचे स्थान** असून ते पृथ्वीच्या **खाली** असते. प्राचीन काळच्या ज्योतिष शास्त्रावरील ग्रंथात देखील स्वर्ग हे स्थान पृथ्वीच्या वर सहस्त्रावधि योजने **दूर** असल्याचे सांगितले आहे. पराशर ह्या ज्योतिषाने पृथ्वीच्या मध्यभागी असणाऱ्या ८४ सहस्त्र योजने उंच असलेल्या सुवर्णाच्या **मेरु** पर्वताला स्वर्ग म्हणतात असे म्हटले आहे. (बृह. सं. १·११ - उत्पल टीका). ह्याच्या उलट शांतिपर्वात [न दृष्टपूर्वं प्रत्यक्षं परलोकं विदुर्बुधाः।
आगमाँस्त्वनतिक्रम्य श्रद्धातव्यं बुभूषता ॥ —शान्ति. (२८·४२).] असे स्पष्टपणे सांगितले आहे की, 'परलोक हा कोणी प्रत्यक्ष पाहिला असल्याचे शाहाणे लोक मानीत नाहीत; त्याच्याबद्दल श्रद्धा बाळगणे अवश्य आहे कारण तसे न केल्यास वेदाच्या विरुद्ध वागल्यासारखे होईल.' ब्रह्मपुराणात [मनः प्रीतिकरः स्वर्गो नरकस्तद्विपर्ययः।
नरकस्वर्गसंज्ञे वै पापपुण्ये द्विजोत्तमाः ॥
—ब्रह्मपुराण (२२·४४);
मनसः परिणामोऽयं सुखदुःखादि लक्षणः।
—ब्रह्मपुराण (२२·४७).] असे प्रतिपादन केले आहे की ज्याच्या योगाने **मनाला आनंद होतो तो स्वर्ग** आणि **त्याच्याविरूद्ध प्रकारचा तो नरक**; सत्कृत्यांना स्वर्ग म्हणतात आणि दुष्कृत्यांना नरक म्हणतात; स्वर्ग आणि नरक **ह्या सुखदुःख प्रदर्शित करणाऱ्या मनाच्या भावना** आहेत.

स्वर्ग आणि नरक ह्यांच्याबद्दल अशाच प्रकारच्या अनिश्चित कल्पना सर्व जगभर सर्व धर्मांच्या लोकांत प्रचलित होत्या. बायबलमधील नव्या करारात स्वर्ग हे स्थान पृथ्वीच्या आणि ढगांच्या **वर** असल्याचे आणि नरक हे स्थान पृथ्वीच्या **खाली** असून तेथे अंधकार आणि यातना भरलेल्या असल्याचे वर्णन केले आहे. ही वर्णने **अक्षरशः सत्य** आहेत असा विश्वास अलिकडील काळापर्यंत ख्रिस्ती धर्माच्या लोकात होता आणि अगदी अलिकडील काळात अनेक ख्रिस्ती धर्माचे लोक बायबल मधील ही वर्णने केवळ **लाक्षणिक स्वरूपाची** असल्याचे मानू लागले आहेत.

पातकी मनुष्याने जर त्याबद्दल प्रायश्चित्त केले नसले तर नरकातील यातना भोगल्यानंतर त्याला अवशिष्ट पातकाच्या योगाने वृक्ष, पशु इत्यादी जन्म मिळतो अथवा काही विशिष्ट व्यंगे असलेल्या अथवा विशिष्ट रोगांनी पीडित असा मनुष्य जन्म मिळतो. अशी व्यंगचिन्हे पातकाच्या स्वरूपाला अनुसरून कमी अधिक जन्में धारण करावी लागतात असे निरनिराळ्या ग्रंथांत सांगितले आहे. उदाहरणार्थ, शातातपाने

(१·१-५) म्हटले आहे की महापातक करणाऱ्याला अशी व्यंग चिन्हे सात जन्मपर्यंत धारण करावी लागतात, उपपातक करणाऱ्याला ५ जन्म पर्यंत आणि साधे पातक करणाऱ्याला तीन जन्मपर्यंत धारण करावी लागतात. ह्याप्रमाणेच शारीरिक, मानसिक आणि वाचिक अशी निरनिराळ्या प्रकारची पातके करणाऱ्याला कोणकोणते जन्म प्राप्त होतात ह्यांचीही सविस्तर वर्णने मनु- (अ. १२) प्रभृति निरनिराळ्या ग्रंथकारांनी केली आहेत. पातकी मनुष्यांना त्यांच्या पातकांना अनुरूप कोणकोणते रोग होतात ह्याचीही सविस्तर वर्णने निरनिराळ्या ग्रंथांत केली आहेत. उदाहरणार्थ, याज्ञ. ने (३·२०९-२११) म्हटले आहे की ब्रह्महत्या करणाऱ्याला क्षयाची पीडा होते, सुरापान करणाऱ्याचे दात काळे असतात, गुरुतल्पगमन करणाऱ्याला कुष्ठ रोग होतो, इत्यादि. चरक संहिते- (सूत्रस्थान १·११६) सारख्या वैद्यक ग्रंथात देखील पूर्व जन्मांत केलेल्या कर्मांचा परिणाम म्हणून रोग होतात असा विश्वास व्यक्त केला आहे. तथापि कोणत्या पातकाच्या योगाने कोणता रोग होतो अथवा कोणते व्यंग उत्पन्न होते ह्या बाबतीत स्मृतिग्रंथांची एकवाक्यता नाही.

ह्या सर्व विवेचनाला कर्मविपाक अशी संज्ञा आहे. कर्मन् हा शब्द सामान्यतः चांगले तसेच वाईट कृत्य ह्या अर्थाने वापरला जात असला तरी प्रायश्चित्ताच्या विवेचनात त्या शब्दाचा अर्थ प्रामुख्याने वाईट कृत्य असा असतो आणि म्हणून कर्मविपाक ह्याचा अर्थ वाईट कृत्यांची अथवा पातकांची फलनिष्पत्ती असा होतो. ही फलनिष्पत्ती [सति मूले तद्विपाको जात्यायुर्भोगाः। – योगसूत्र (२·१३)] **जाति** (पशु, कीटक इत्यादिक जन्म), **आयु :** (अल्प मुदतीपर्यंत जगणे) आणि **भोग** (नरक यातना इत्यादिकांचा अनुभव घेणे) अशी **तीन प्रकारची** होते असे योगसूत्र (२·१३) ह्या ग्रंथात सांगितले आहे.

कर्मविपाकाचा सिद्धांत बुद्ध आणि जैन धर्मांच्या ग्रंथांतही मान्य केला आहे. अशा प्रकारच्या चांगल्या अथवा वाईट कृत्यांच्यामुळे स्वर्ग अथवा नरक ह्यांचा अनुभव केवळ मनुष्यांनाच भोगावा लागतो, व्याघ्र इत्यादि खालच्या योनींतील प्राण्यांना असे अनुभव भोगावे लागत नाहीत असे मनु (१२·३), याज्ञ. (३·२०६) प्रभृतींनी सांगितले आहे. कर्मविपाकासंबंधीची ही वर्णने अक्षरशः खरी मानावयाची अथवा अर्थवादाच्या स्वरूपाची मानावयाची ह्याबद्दल मतवैचित्र्य आढळून येते. ह्या वर्णनांचा **सारांश** एवढाच असतो की जर एखाद्या जीवात्म्याची वाट पाहण्याची आणि आपल्या दुष्कृत्यांबद्दल होणाऱ्या यातना सहन करण्याची तयारी असेल तर त्याने निराश होण्याचे कारण नाही; त्याप्रमाणेच निरनिराळ्या ग्रंथांत वर्णन केलेल्या भिन्न भिन्न अवस्थांच्या योगाने घाबरून जाण्याचेही कारण नाही. दीर्घ काळानंतर आणि उत्क्रांती करीत करीत शेवटी जीवात्म्याला आपल्या श्रेष्टत्वाची जाणीव होऊ शकते आणि तो अखंड शांतीची आणि पूर्णत्वाची प्राप्ती करून घेऊ शकतो.

मांधातृकृत महार्णवकर्मविपाक (पुष्ठ ३३ब आणि ३४अ) ह्या ग्रंथात असे सांगितले आहे की दुष्कृत्यांचे परिणाम टाळण्याचे **दोन मार्ग** असतात; ते म्हणजे कृच्छ अथवा **प्रायश्चित्ते करणे** आणि **रोगांचा प्रतिकार** करणे हे होत. रोगांचा प्रतिकार करण्याच्या उपायांमध्ये सूर्य ह्या आरोग्याच्या अधिष्ठातृ देवतेची आणि विशिष्ट रोगांच्या विशिष्ट **देवतांची आराधना** करणे ह्यांचा समावेश होतो. अशा उपासनेसंबंधी सविस्तर माहिती त्या ग्रंथात दिली आहे. तसेच विशिष्ट रोग दूर करण्याकरिता कोणकोणती **दाने** द्यावी हेही त्यात सांगितले आहे. रोगांप्रमाणेच शारीरिक व्यंगांविषयीही त्या ग्रंथात विस्तृत विवेचन केले आहे. तथापि अशा उपायांवर आधुनिक काळात बहुधा कोणाचाही विश्वास बसणार नाही आणि ते उपायही बहुधा कोणी करीत नसावे.

# खंड ४ था

# विभाग २ रा : अन्त्येष्टि (म्हणजे मृत्यूनंतरचे विधि) आणि शुद्धि

(जन्म, मृत्यू इत्यादि कारणांनी आलेले अशौच अथवा अपवित्रपणा घालविणे).

## प्रकरण ७

### परलोक विद्या शास्त्र

(मू. ग्रं. पा. ४/१७९-२६६)

ह्या शास्त्रात मनुष्याला मृत्युनंतर काय होते ह्याचा विचार केलेला असतो. मृत्यूनंतर मनुष्याला कोणती स्थिति प्राप्त होते हे एक अत्यंत गूढ असून त्याच्या शोधाच्या बाबतीत आजपर्यंतचे सर्व लोक कुंठित झाले आहेत आणि हे रहस्य त्यांना उकलता आलेले नाही. भारत, इजिप्त, खाल्डिया, ग्रीस, इराण इत्यादि बहुतेक सर्व देशांतील प्राचीन काळच्या लोकांना हा एक अत्यंत महत्त्वाचा प्रश्न वाटत असे. प्रत्येक धर्मात ह्या विषयासंबंधी स्वतंत्र शास्त्र असते. ह्या शास्त्राची दोन प्रमुख अंगे असतात : एका अंगात व्यक्तीची मृत्यूनंतरची स्थिती, आत्म्याचे अमरत्व, पातक आणि त्याबद्दलची शिक्षा, स्वर्ग आणि नरक ह्या शब्दांचा अर्थ आणि त्यांची व्याप्ती ह्या विषयांचा विचार केलेला असतो आणि दुसऱ्या अंगात सर्व विश्व आणि त्याची उत्पत्ती, त्याचा शेवट आणि पुनरुज्जीवन, सर्व वस्तूंची अंतिम स्थिती ह्या विषयांचा विचार केलेला असतो. प्रस्तुत विभागात ह्यापैकी पहिल्या अंगात येणाऱ्या आणि तदनुषंगिक विषयांचे विवेचन प्राचीन भारतीय दृष्टिकोनातून करण्यात येईल. दुसऱ्या अंगात समाविष्ट होणाऱ्या विषयांचे विवेचन पुढे एका स्वतंत्र विभागात करण्यात येईल. प्राचीन काळच्या ग्रंथांत दुसऱ्या अंगांतील विषयांपेक्षा पहिल्या अंगात अंतर्भूत होणाऱ्या विषयांनाच अधिक महत्त्व दिलेले आढळते. परंतु आधुनिक काळच्या आणि कमी अधिक प्रमाणात शास्त्रीय दृष्टीच्या लोकांची प्रवृत्ती दुसऱ्या अंगात समाविष्ट होणाऱ्या विषयांकडे अधिक असते.

मृत्यू ही एक इष्ट अशी गोष्ट असून त्यामुळे देहाच्या योगाने आत्म्यावर घातलेल्या बंधनापासून आत्मा मुक्त होत असतो असे मानणारे काही लोक असतात आणि अशा लोकांत तत्त्वज्ञानाकडे प्रवृत्ति असणारे लोकच पुष्कळ असतात. तथापि सर्वसाधारणपणे मृत्यूकडे भीतियुक्त दृष्टीनेच पाहण्यात येते. मृत्यूबद्दल वाटणारे भय हे केवळ प्रत्यक्ष मृत्यूच्या योगाने होणाऱ्या यातनांच्या योगानेच उत्पन्न होते असे नसून मृत्यूनंतर मनुष्याची काय अवस्था होते ह्याबद्दलचे गूढ आहे त्यामुळे तसेच मनुष्याच्या मृत्यूनंतर त्याच्या मागून राहणाऱ्या लोकांची काय अवस्था होईल ह्याबद्दलच्या विचाराने उत्पन्न होत असते. मृत्यूच्या बाबतीत आद्य मानवी अवस्थेपासून तो सुधारलेल्या मानव समाजापर्यंतच्या सर्व समाजांनी अनेक कल्पना केल्या आहेत. कठ उपनिषदात (१·१·२०) म्हटले आहे की "जेव्हा एखादा मनुष्य मरण पावतो, तेव्हा संशय उत्पन्न होतो : काही लोक म्हणतात की शरीराला मरण आल्यानंतर आत्मा मागे अस्तित्वात असतो आणि काही लोक आत्म्याचे अस्तित्व मान्य करीत नाहीत." मृत्यूनंतर काय होते ह्या शंकेचे समाधान करण्याची नचिकेताने मृत्यूची देवता यम ह्याला विनंती केल्याचे त्या उपनिषदात वर्णन केले आहे. मृत्यूनंतर आत्मा अस्तित्वात राहतो असे मानणाऱ्या लोकांत देखील भिन्न भिन्न कल्पना असतात. कोणी म्हणतात की मृतात्मे राहण्याचे एक स्वतंत्र जग आहे आणि मृत्यूनंतर जे कांही मागे राहते ते त्या लोकी जाते; दुसऱ्या काही लोकांचे मत असे आहे की मृत्यूनंतर मनुष्याचा जो काही अंश अस्तित्वात राहतो तो त्या मनुष्याच्या ह्या लोकातील

चांगल्या अथवा वाईट आचरणाला अनुसरून स्वर्गाला अथवा नरक लोकाला जातो. प्राचीन काळच्या थोर ग्रीक ग्रंथकारांपैकी अनेकांचे मत असे होते.

कोणकोणत्या व्यक्तींना मृत्यू अतिशय सुखावह होतो आणि त्यांना आपदा आणि दुःख देत नाही ह्याचे वर्णन निरनिराळ्या पुराणांत केले आहे. त्या वर्णनांचा सारांश असा आहे की सदाचरणाने आणि धर्माला अनुसरून वागणाऱ्या व्यक्तींना मृत्यू सुखकारक असतो. (ब्रह्मपुराण २१४·३४-३९). महाभारतात देखील मनुष्यांना अकाली मृत्यू येण्याची आणि दीर्घ आयुष्य असण्याची कारणे अशाच प्रकारची सांगितली आहेत. (अनुशासन १०४·११-१२ इ.)

महाभारत, देवलप्रभृति स्मृति, वायु, मार्कंडेयप्रभृति पुराणे ह्यांत मृत्यू जवळ आल्याचे दर्शित करणारी चिन्हे वर्णन केली आहेत. शांतिपर्वात (३१८. ९-१७) म्हटले आहे की ज्या मनुष्याला पूर्वी दिसत असणारा अरुंधती नक्षत्राचा तारा अथवा ध्रुव नक्षत्र अथवा पूर्ण चंद्र दिसत नाही, अथवा ज्याला दुसऱ्या मनुष्याच्या बुबुळातील आपली स्वतःची प्रतिमा दिसत नाही तो फक्त एक वर्षपर्यंत जगेल, ज्याला चंद्रबिंबात छिद्र दिसते तो फक्त सहा महिने जगेल, ज्याला सूर्यबिंबात छिद्र दिसते अथवा ज्याला सुगंधी पदार्थ जवळ आणले असता प्रेताचा गंध येतो त्याचे आयुष्य फक्त सात दिवस बाकी राहिलेले असते, जेव्हा नाक आणि कान खाली वाकतात, शरीरातील उष्णता नाहीशी होते. टाळूमधून धूर निघू लागतो तेव्हा मृत्यू तात्काल येईल असे समजावे. अनेक ग्रंथांत स्वप्नांवरून सुचविली जाणारी जवळ आलेल्या मृत्यूची लक्षणे दिलेली असतात

एखादा मनुष्य रोगाने थकत चालला आणि मृत्यूच्या द्वाराशी येऊन ठेपला म्हणजे त्याला त्याच्या पलंगावरून खाली घेऊन जमिनीवर पसरलेल्या अंथरुणावर ठेवण्याची भारतातील निरनिराळ्या भागांत पूर्वी प्रथा होती आणि अद्यापही तशी प्रथा अस्तित्वात आहे. कौषीतकी सूत्रात (८०·३) असा नियम सांगितला आहे की जेव्हा एखाद्या मनुष्याची सर्व शक्ती क्षीण होऊ लागते तेव्हा त्याच्या पुत्राने अथवा अन्य नातलगाने सावलीत उगवलेल्या गवतावर कुश पसरावे आणि त्या मनुष्याला त्याच्या पलंगावरून खाली घ्यावे. जेव्हा एखादा मनुष्य आसन्नमरण होतो आणि त्याला त्याच्या पलंगावरून खाली जमिनीवर घेण्यात आलेले असते तेव्हा त्याच्या पुत्राने अथवा अन्य आप्ताने विशिष्ट प्रकारची गाय, जमीन, तीळ, सुवर्ण, तूप, वस्त्रे, धान्य प्रभृति दहा दाने द्यावी असे मध्ययुगीन काळच्या अनेक ग्रंथांत (शुद्धिप्रकाश पा. १५१-१५२) सांगितले आहे. तसेच त्याच्याकडूनं **व्रतोद्यापन, सर्वप्रायश्चित्त** ह्यांच्यासारखे विधि करवावेत आणि जर तो हे विधि करण्यास असमर्थ असेल तर त्याच्या पुत्राने अथवा अन्य आप्ताने हे विधि करून त्यांचे पुण्य मरणाऱ्या मनुष्याला द्यावे. एखदा मनुष्य पुष्कळ वेळा काही विशिष्ट व्रते करण्याचे ठरवितो परंतु त्या व्रतांचे सर्व विधि त्याच्याकडून सांगोपांग केले जात नाहीत. अशा अपुऱ्या व्रतांचे दोष दूर करण्याकरिता **व्रतोद्यापन** हा विधी करावयाचा असतो. त्या विधीमध्ये एखाद्या ब्राह्मणाचा सत्कार करून आणि त्याला सुवर्णासारखी दाने देऊन त्याच्याकडून ‘सर्व व्रते परिपूर्ण होवोत’ असे म्हणवून घेण्यात येते. **सर्वप्रायश्चित्त** ह्या विधीमध्ये एखाद्या ब्राह्मणाचा सत्कार करून आणि त्याला द्रव्य देऊन आणि कायिक, वाचिक, मानसिक, सांसर्गिक इत्यादी प्रकारची जी पातके एखादा मनुष्य करणे संभवनीय असते त्यांचा उल्लेख करून त्या ब्राह्मणाला एक सवत्स गाय अथवा तिचा मोबदला दान देण्यात येतो. त्याप्रमाणेच **महादाने** संज्ञा असलेली तीळ, लोखंड, इत्यादि दाने देतात; **पददाने** संज्ञा असलेली छत्री, चंदन, आंगठी, कुंभ, आसन इत्यादि दाने देतात (गरुड पु. २·४·७-९). त्या मनुष्याची इच्छा असल्यास **आतुर संन्यास** विधीने संन्यास देतात. असा संन्यास घेतला तर तो मनुष्य जन्ममरणाच्या चक्रात केव्हाही परत येत नाही असे गरुड पुराणात (२·४·३७) सांगितलें आहे.

अत्यंत प्राचीन काळापासून अशी एक दृढ भावना असे की मरणोन्मुख मनुष्याच्या मनात मृत्यूच्या वेळी जे विचार येत असतील त्यांना अनुसरून त्याने हा भौतिक देह सोडल्यावर त्याच्या आत्म्याला स्थिति प्राप्त होते. ही भावना 'अन्ते मतिः सा गतिः' ह्या सुपरिचित शब्दांत व्यक्त केली आहे. ह्याकरिता जेव्हा मरण जवळ येते तेव्हा मनुष्याने सर्व प्रकारचे ऐहिक विषयासंबंधीचे विचार टाकून द्यावे आणि आपल्या इष्ट देवतेचे चिंतन करावे, पवित्र वेदवचने ऐकावी, विष्णु अथवा शिवसहस्रनाम, भगवद्गीता, भागवत, ईशावास्योपनिषद इत्यादि त्याने ऐकावी असे अनेक ग्रंथात (अन्त्यकर्मदीपिका पा. १८) सांगितले आहे. ह्या भावनेचे मूळ उपनिषदात [सर्वं खल्विदं ब्रह्म तज्जलानिति शान्त उपासीताथ खलु क्रतुमयः पुरुषो यथाक्रतुरस्मिँल्लोके पुरुषो भवति तथेतः प्रेत्य भवति स क्रतुं कुर्वीत। —छां. उप. (३·१४·१).] (छां. ३·१४·१) आढळते आणि भगवद्गीतेतही (८·५-६) तसेच प्रतिपादन केले आहे.

**मरणाला उत्तम काल** कोणता ह्याबद्दल काही ग्रंथात वर्णने केली आहेत. उपनिषदांत आलेल्या उत्तरायण आणि दक्षिणायन ह्यांच्या विषयीच्या कल्पनांच्या आधारावर भगवद्गीतेतही (८·२३-२५) असे सांगितले आहे की "अग्नि, ज्योति, दिवस, शुक्लपक्ष, उत्तरायणाचे सहा महिने अशा काळी मृत्यु पावलेले ब्रह्मवेत्ते ब्रह्मपदाला जातात; धूर, रात्र, कृष्णपक्ष, दक्षिणायनाचे सहा महिने अशा काळात मरण पावलेले लोक चंद्रलोकात जातात आणि तेथून परत मृत्युलोकात जन्माला येतात. ह्या दोन मार्गांना शुक्ल आणि कृष्ण अथवा प्रकाशमय आणि अंधकारमय अशा संज्ञा असून एका मार्गाने प्राणी पुनर्जन्मरहित स्थितीला जातो आणि दुसऱ्या मार्गाने गेलेला प्राणी पुनः जन्ममरणांच्या भोवऱ्यात सापडतो" ह्याच कारणाकरिता प्रसिद्ध भारतीय वीर भीष्म उत्तरायणाच्या आरंभाची वाट पहात राहिले होते असे महाभारतात वर्णन केले आहे. याज्ञ. स्मृतीत (३·१९३-१९६) ह्या मार्गांना देवयान आणि पितृयान असे म्हटले आहे.

**अन्त्येष्टि** अथवा मृताच्या देहाचे विसर्जन करण्याचा विधि हा द्विजाने करावयाच्या (१६ अथवा अधिक) संस्कारांपैकी [आधानपुंससीमन्तजातनामान्नचौलकाः।
मौञ्जी व्रतानि गोदानं समावर्तविवाहकाः॥
अन्त्यं चैतानि कर्माणि प्रोच्यन्ते षोडशैव तु।
जातुकर्ण्य (संस्कारप्रकाश पा. १३५).] एक संस्कार असतो असे मनु [निषेकादिश्मशानान्तो मन्त्रैर्यस्यादितो विधिः। तस्य शास्त्रेऽधिकारोऽस्मिञ्ज्ञेयो नान्यस्य कस्यचित्॥ —मनु २·१६] (२·१६), याज्ञ. (१·१०) प्रभृति स्मृतींनी सांगितले आहे. हे संस्कार पूर्वीच्या काळी स्त्रियांचे देखील करीत असत, परंतु (विवाहाव्यतिरिक्त बाकीचे संस्कार) वेदमंत्ररहित केले जात. स्त्रियांप्रमाणेच शूद्रांचेही संस्कार वेदमंत्ररहित करण्यात येत असत. बौधायनाने पितृमेध सूत्रात (३·१·४) असे म्हटले आहे की प्रत्येक मानवी प्राण्याचे आवश्यक स्वरूपाचे दोन संस्कार असतात, ते म्हणजे **जातकर्म** (जन्माच्या वेळी करावयाचा विधि) आणि **मृतसंस्कार** (म्हणजे मृत्यूनंतर करावयाचे विधि) हे होत. करावयाचे विधी हे मृत मनुष्याच्या स्थितीला अनुसरून भिन्न भिन्न प्रकारचे असतात. प्रस्तुत प्रकरणात नमुन्यादाखल काही विधींचे थोडक्यात वर्णन केले आहे.

ऋग्वेदाच्या १० व्या मंडलातील १४ ते १८ ही पाच सूक्ते ह्या बाबतीत महत्त्वाची आहेत. त्या सूक्तांतील ऋचांचा बहुतेक सूत्रांनी दहनविधीमध्ये उपयोग केला असून सांप्रतकाळी देखील त्यांचा उपयोग करण्यात येतो आणि त्यांतील बहुतेक ऋचा इतर वेदांच्या संहितांमध्ये आढळतात. काही काही ऋचांचा उपयोग निरनिराळ्या सूत्रांनी दहनविधीतील भिन्न भन्न क्रियांच्या बाबतीत केला आहे. ज्या क्रमाने दहनविधीतील कर्मे प्रत्यक्ष करण्यात येत असत आणि बऱ्याच प्रमाणात अद्यापि देखील करण्यात येतात त्या क्रमाला आणि टप्प्यांना अनुसरून त्या पाच सूक्तांची मांडणी केली आहे. ह्या सूक्तांतील निरनिराळ्या ऋचा

अग्नि, यम, पूर्वी मृत झालेले पितर, मृतात्मा, भूमि इत्यादिकांना उद्देशून असून काही ऋचा मृताच्या पत्नीला उद्देशून आहेत. **बर्हिषदः** आणि **अग्निश्वात्ताः** अशी संज्ञा असलेल्या प्राचीन पितरांचे मत नवीनच मृत झालेल्या आणि परलोकी गेलेल्या आत्म्याच्या बदल चांगले व्हावे ह्याबद्दल चिंता व्यक्त केली आहे. प्राचीन पितरांना शिजलेल्या अन्नाचा हविः म्हणजे आहुती अर्पण करण्यात येत असत आणि ते पितर अर्पण केलेले अन्न भक्षण करीत असल्याचे मानले जात असे.

एखाद्या आहिताग्नि पुरुषाच्या मृत्यूनंतर करावयाचे विधि श्रौत आणि गुह्य सूत्रांत वर्णन केले आहेत. आश्व. श्रौ. सू. (६·१०) मध्ये म्हटले आहे की अशा दीक्षिताचा मृत देह तीर्थ संज्ञा असलेल्या मार्गाने बाहेर आणतात आणि अवभृथ स्नान करावयाच्या ठिकाणावर ठेवतात. त्या प्रेताच्या मस्तकावरील, ओठावरील आणि आंगावरील केस कापतात, नखे काढतात, नलद नावाच्या वनस्पतीची एक प्रकारची सुगंधी उटी प्रेताला लावतात; आणि नलदाच्या माळा त्यावर घालतात; कोणी कोणी पोटातील अन्तर्भाग कापून आतील विष्टा बाहेर काढतात आणि त्या भागात तूप आणि दही ह्यांचे मिश्रण (पृषदाज्य) भरतात; पावले दिसतील इतका तुकडा कापलेल्या एका कोऱ्या वस्त्राने प्रेत झाकतात; मंथन करून अग्नि तयार करतात आणि त्या अग्नीने प्रेताचे दहन करतात. त्यानंतरच्या दिवसात करावयाच्या कृत्यांत निरनिराळ्या शास्त्रांचे, स्तोत्रांचे आणि संस्तवांचे गायन करावयाचे असते ; अस्थि गोळा करून एका मडक्यात भरतात आणि ते मडके मृत आहिताग्नि ज्या आसनावर बसत असे त्या आसनावर ठेवतात.

चिता कशी रचावी, प्रेत कोणी वाहून न्यावे, इत्यादी बाबतीत सविस्तर नियम निरनिराळ्या श्रौत सूत्रांत सांगितलेले असतात. मृताच्या (तीन उच्च वर्णांपैकी कोणत्याही वर्णाची असलेल्या) पत्नीला त्या चितेवर प्रेताच्या उत्तरेकडे निजवितात आणि मृत मनुष्य क्षत्रिय असेल तर त्याचे धनुष्यदेखील उत्तरेकडे ठेवतात. त्या पत्नीचा दीर (मृताचा बंधु) अथवा तिच्या पतीचा एखादा प्रतिनिधी अथवा शिष्य अथवा वृद्ध सेवक त्या मृताच्या पत्नीला चितेवरून उठावयास सांगतो. त्यावेळी म्हणावयाच्या मंत्रात त्या पत्नीला उद्देशून म्हटले आहे की "हे पत्नी ! आता चैतन्यरहित असलेल्या तुझ्या पतीसमीप तू पडली आहेस; ज्या तुझ्या पतीने तुझे पाणिग्रहण केले होते आणि जो तुझ्यावर मनापासून प्रेम करीत होता, त्याच्या पत्नीचे व्रत तू सत्य केले आहेस."

मृत आहिताग्नीची यज्ञपात्रे त्याच्या प्रेतावर निरनिराळ्या ठिकाणी ठेवतात. जाते आणि धातूची यज्ञपात्रे मृताच्या पुत्राने स्वतःकरिता घ्यावी असे सांगितले आहे. मृताबरोबर **अनुस्तरणी** म्हणून एक गाय अथवा बकरी नेण्यात येते आणि तिच्या शरीरातील वपा प्रेताच्या मस्तकाला आणि मुखाला लावतात आणि त्या पशूचे निरनिराळे अवयव प्रेताच्या निरनिराळ्या अंगांवर ठेवतात आणि प्रेताचे शरीर त्या पशूच्या कातड्याने झाकतात. मृत मनुष्य चितेच्या धुराबरोबर स्वर्गलोकी जातो असे श्रुतीत सांगितले आहे. (शत. ब्रा. १२·५·२, ६-८).

प्रेताचे दहन झाल्यावर त्याचे नातलग उजवीकडून डावीकडे वळतात आणि मागे न पहाता स्मशानामधून दूर जातात. एखाद्या पाणी असलेल्या स्थळी येऊन पोचल्यावर तेथे स्थान करून मृताचे गोत्र नाव आणि व्यावहारिक नाव ह्यांचा उच्चार करून त्याला उद्देशून एक ओंजळभर पाणी अर्पण करतात, नंतर दुसरी वस्त्रे परिधान करून नक्षत्रे दिसू लागेपर्यंत खाली बसतात अभवा सूर्यबिंबाचा काही भाग दिसत असताना आपआपल्या घरात प्रवेश करण्यास प्रत्यवाय नसतो. घरात परत आल्यावर त्यांनी एखादा दगड, अग्नि, गाईचे शेण, जवाच्या लाह्या, तीळ आणि उदक ह्यांना स्पर्श करावा.

इतर गृह्यसूत्रात दिलेल्या नियमांपैकी काही विशेष नियमांचा उल्लेख करू. आहिताग्नीच्या प्रेताचे दहन त्याने बाळगिलेल्या तीन श्रौत-अग्नींच्या साहाय्याने करण्यात येते परंतु ज्याने फक्त स्मार्त अग्नि अथवा औपासन अग्नि बाळगिला असतो त्याचे प्रेत त्या अग्नींच्या साह्याने दहन करण्यात येते आणि ज्याने स्मार्त अथवा श्रौत ह्यांपैकी एकही अग्नि बाळगिला नसेल त्याच्या प्रेताचे दहन लौकिक (साध्या) अग्नीच्या साह्याने केले जाते. असा लौकिक अग्नि एखाद्या चांडाळाच्या घरचा अथवा पतिताच्या घरचा अथवा एखाद्या चितेमधील घेतला जाऊ नये असे देवलाने (मिता. याज्ञ.३·२) सांगितले आहे. गौतम-पितृमेधसूत्रात (२·३७ आणि ३९) सांगितले आहे की चितेवर ठेवलेल्या प्रेताला मृताच्या स्त्रिया प्रभृति सपिंडांनी आपल्या वस्त्रांच्या अंचलांनी वारा घालावा. अन्त्यक्रिया करणाऱ्याने एक कुंभ पाण्याने भरून घ्यावा आणि प्रेताच्या सभोवती तीन वेळा फिरावे. पुरोहित त्या कुंभावर एखाद्या दगडाने अथवा कुऱ्हाडीने तीन वेळा हलकेच ठोके मारतो. कर्म. करणाऱ्याने त्यानंतर उभे राहून तो कुंभ आपल्या मागल्या बाजूला खाली टाकावा आणि नंतर चिता पेटवावी. सत्याषाढ श्रौ. सू. (२८·१·३७-४६) मध्ये असे सांगितले आहे की प्रेत एखाद्या गाडीत घालून न्यावे अथवा चार मनुष्यांनी उचलून न्यावे आणि तसे नेत असताना चार ठिकाणी थांबावे, प्रत्येक ठिकाणी मातीची डिखळे खणून काढून त्यांच्यावर शिजलेला भात ठेवावा. वराहपुराणात (१८७·१०६-१०८) असे सांगितले आहे की क्रिया करणाऱ्याने चितेभोवती फिरावे आणि चितेच्या ज्या बाजूला प्रेताचे मस्तक असेल त्या बाजूकडे पेटलेला अग्नी लावावा.

आधुनिक काळी आश्वलायन गृह्यात आणि गरुडपुराण (२·४·४१ प्रभृती) मध्ये वर्णन केलेल्या विधीला अनुसरून सामान्यतः अन्त्यविधी करण्यात येतो. नारायणभट्टकृत अन्त्येष्टि पद्धति ह्या ग्रंथात सांगितलेल्या अन्त्यविधीमधील महत्त्वाच्या क्रिया पुढीलप्रमाणे आहेत :— (पश्चिम भारतातील ऋग्वेदानुयायी लोक सामान्यतः त्या पद्धतीप्रमाणे चालतात).

प्रेताला पाण्याने स्नान घालतात, त्याच्या कपाळावर एक तिलक लावतात, एका वस्त्राने प्रेत झाकण्यात येते, सर्वांगाला जटामासीचे गंध चोळतात, नलदाची माळ गळ्यात घालतात, अंत्यविधि करणारा प्रेताला आलेले प्रेतत्व नाहीसे होण्याकरिता त्याचे **और्ध्वदेहिक** कर्म (अन्त्य संस्कार) करण्याचा संकल्प करितो, दहन करावयाच्या जागेवर पाणी शिंपडतो, तिच्यावर तीन रेघा काढतो, खणलेल्या जागेत सोन्याचे तुकडे व तीळ टाकण्यात येतात, प्रेताच्या मुखातही तीळ घालतात, नंतर चिता रचण्यात येते आणि तिच्यावर कुश आणि कृष्णमृगाचे कातडे पसरतात, प्रेताचे मस्तक दक्षिणेकडे करून ते चितेवर ठेवतात, प्रेताच्या उत्तरेकडे मृताच्या पत्नीला बसविण्यात येते, प्रेताच्या मुखप्रभृति सात छिद्रांत सोन्याचे तुकडे अथवा तुपाचे थेंब सोडतात, परिस्तरण, परिसमूहन करतो, मृताची पूजा करण्याचा संकल्प करतो, जवाच्या पिठाचे गोळे तो प्रेताच्या कपाळ, मुख, दोन बाहू आणि हृदय ह्या पाच अवयवावर ठेवतो, प्रेताच्या मस्तकाकडे (प्रेत स्त्री असल्यास पायाकडे) अग्नि पेटवितात, नंतर क्रिया करणारा पाण्याने भरलेला कलश आपल्या डाव्या खांद्यावर घेऊन प्रेताला ३ डाव्या फेऱ्या घालतो आणि त्यावेळी त्या कलशाला तीन वेळा ठोके मारण्यात येतात, सगोत्र आणि नातलग त्या जळत असणाऱ्या प्रेताच्या सभोवती फिरतात, चितेच्या ज्या बाजूला प्रेताचे मस्तक असते त्या ठिकाणी तो कलश पूर्णपणे फोडण्यात येतो, नंतर ज्या दगडाने कलशाला छिद्र पाडलेले असते तो दगड असून (अश्मन्) जलाशयाच्या किनाऱ्यावर ठेवून त्यावर स्नान केलेले नातलग तिळमिश्रित पाणी ओंजळीने अर्पण करतात. हे पाणी प्रेताला दहन केल्यामुळे लागलेली तहान शमविण्याकरिता अर्पण करण्यात येते.

प्रेताला वाहून नेण्यासंबंधी अनेक नियम निरनिराळ्या सूत्रांनी सांगितले आहेत. सामान्य नियम असा असे की तीन उच्च वर्णांतील मनुष्याचे प्रेत त्या वर्णातील लोकांनी स्मशानात वाहून न्यावे आणि शक्य तर शूद्राने एखाद्या उच्च वर्णाच्या मनुष्याचे प्रेत वाहून नेऊ नये. ब्रह्मचाऱ्याला आपले मातापिता, गुरु, आचार्य आणि उपाध्याय ह्यांच्याव्यतिरिक्त अन्य कोणाही व्यक्तीचे प्रेत वाहून नेण्यास परवानगी नसे. ज्याला कोणी नातलग नाहीत अशा एखाद्या ब्राह्मणाचे प्रेत वाहून नेणे ह्या कृत्याची पराशराने (३·३९-४१) फार प्रशंसा केली आहे. सांप्रत काळी देखील सामान्यतः (विशेषतः खेडेगावात) मृताच्या जातीचे लोक प्रेत वाहून नेतात अथवा प्रेतामागून जातात. चितेला लागणारी लाकडे स्मशानात नेण्यासंबंधी आणि चिता रचण्यासंबंधी नियम असत. स्मृतींनी आणि पुराणांनी असे नियम सांगितले आहेत की प्रेताला प्रथम धुवून नंतर दहन करावे, नग्न स्थितीत जाळू नये तर कपड्याने आच्छादन करावे, प्रेताच्या पुढे अग्नि घेऊन चालावे, कपडे चांडालासारख्या लोकांना द्यावे.

अन्त्य संस्काराचे एक अंग म्हणून क्रिया करणाराने प्रेत दहन झाल्यानंतर आणि त्यानंतर स्नान केल्यानंतर करावयाच्या **वपना**संबंधी निरनिराळे नियम शास्त्रग्रंथात सांगितले आहेत. एका स्मृति [गङ्गायां
भास्करक्षेत्रे मातापित्रोर्गुरोर्मृतौ।
आधानकाले सोमे च वपनं सप्तसु स्मृतम् ॥

—स्मृतिवचन (मिता—याज्ञ ३·१७).] वचनात म्हटले आहे की मस्तक आणि मिशा ह्यांचे वपन पुढील सात ठिकाणी विहित सांगितले आहे :— गंगेवर, भास्करतीर्थावर (प्रयांग येथे), माता अथवा पिता अथवा गुरू ह्यांच्या मृत्यूच्या प्रसंगी, श्रौत अग्नीच्या स्थापनेच्या वेळी आणि सोमयाग करतेवेळी ही ती सात ठिकाणे होत. (मिताक्षरा -याज्ञ. ३·१७). दुसऱ्या एका ग्रंथात (संग्रह-शुद्धिप्रकाश पा. १६१) म्हटले आहे की जर दहन रात्री करावयाचे असेल तर वपन रात्री न करिता दुसऱ्या दिवशी करावे. इतर स्मृतींनी मृत्यूनंतर २, ३, ५ अथवा ७ ह्या दिवशी अथवा त्यानंतर ११ व्या दिवशी श्राद्ध करीपर्यंत कोणत्याही दिवशी वपन करण्यास प्रत्यवाय नसल्याचे सांगितले आहे. मृत मनुष्यापेक्षा लहान वयाच्या सर्व सपिंडांनी वपन करावे असे आप. ध. सूत्रात (१·३·१०·६) सांगितले आहे. कोणत्या दिवशी वपन केले पाहिजे ही गोष्ट प्रत्येक देशातील प्रघातावर अवलंबून असते असे मिताक्षरेने (याज्ञ. ३·१७) म्हटले आहे.

गरुडपुराणात (२·४·६७-६९) म्हटले आहे की प्रेत जळत असताना मोठ्याने रुदन करण्यास प्रत्यवाय नाही, परंतु दहन झाल्यानंतर आणि मृताला उद्देशून पाणी दिल्यानंतर रुदन करिता कामा नये.

मृताला उद्देशूनं त्याच्या सपिंडांनी आणि समानोदकांनी पाणी देण्याच्या (म्हणजे **उदकक्रिया** अथवा **उदकदान** करण्याच्या) बाबतीत थोडासा मतभेद आहे. आश्वलायन गृह्यामध्ये **एकवार** पाणी देण्यास सांगितले आहे. परंतु सत्या. श्रौ. (२८·२·७२) प्रभृति ग्रंथांत मृत्यूच्या दिवशी आणि त्यानंतर ११ व्या दिवसापर्यंत प्रत्येक दिवशी मृताचे गोत्र आणि नाव उच्चारून तिलमिश्रित ३ अंजुली उदक मृताला उद्देशून द्यावे असे सांगितले आहे. हरदत्ताने म्हटले आहे की (पहिल्या दिवशी तीन अंजुली, तिसऱ्या दिवशी नऊ अंजुली, सातव्या दिवशी तीस अंजुली आणि नवव्या दिवशी तेहतीस अंजुली ह्याप्रमाणे) सर्वही दिवस मिळून एकूण ७५ अंजुली उदक द्यावयाचे असते. अंजुलींची संख्या निरनिराळ्या ग्रंथांत निरनिराळी सांगितली असून ही संख्या मृताच्या जातीवर अवलंबून असते असेही काही स्मृतींनी म्हटले आहे.

मृताच्या हिताकरिता तिळाच्या तेलाने भरलेला एक दिवा मृत्यूनंतर दहा दिवसपर्यंत सतत जळत ठेवावा, एक मातीचे पात्र पाण्याने भरून ठेवावे आणि दोन प्रहरच्या भोजनाच्या वेळी मृताचे नाव आणि गोत्र ह्यांचा उच्चार करून मूठभर शिजलेला भात जमिनीवर ठेवावा असेही एका स्मृतिवचनात सांगितले आहे. ह्या

विधीला **पाथेय श्राद्ध** असे नाव आहे कारण त्याच्या योगाने मृताला ह्या लोकातून पितृलोकी जात असताना मार्गात साहाय्य होते. (धर्मसिंधु पा. ४६). एखाद्या मनुष्याच्या मृत्यूच्या दिवशी त्याच्या सपिंडांनी वपन आणि स्नान करून आपल्या गावात आणि घरात प्रवेश केल्यानंतर **नभप्रच्छादन** नावाचे एक श्राद्ध करावे असे काही निबंधग्रंथांत सांगितले आहे. ह्या श्राद्धामध्ये एका कलशात तांदुळाचे दाणे भरतात, त्याच्या सभोवती एक वस्त्र गुंडाळतात आणि एका काशाच्या पात्रात तूप आणि सामर्थ्यानुरूप सुवर्ण (अथवा नाणी) ठेवून ते सर्व सामान विष्णूचे स्मरण करून मृताच्या हिताकरिता एका गरीब ब्राह्मणाला देतात.

मृताला उद्देशून उदकक्रिया केल्यानंतर तांदुळाच्या अथवा जवाच्या पिठाचा तिळमिश्रित पिंड दर्भावर अर्पण करावा असे स्मृतींनी आणि पुराणांनी (कूर्म पुराण २३·७०) सांगितले आहे. असा पिंड किती दिवसपर्यंत द्यावा ह्याबद्दल मतभेद आहे. याज्ञ. (३·१६) ने तो तीन दिवस देण्यास सांगितले आहे परंतु वि. ध. सू. (१९·१३) मध्ये मृताशौच असेपर्यंत प्रतिदिवशी असा पिंड द्यावयास सांगितले आहे. मृताला उद्देशून द्यावयाचे पाणी कोणीही सपिंडाने आणि प्रत्येक सपिंडाने दिले तरी चालते परंतु पिंड मात्र मृताच्या पुत्राने (आणि अनेक पुत्र असल्यास ज्येष्ठ पुत्राने तो दोषरहित असल्यास) दिला पाहिजे. मृताला पुत्र नसल्यास त्याच्या सर्वांत निकटच्या सपिंडाने असा पिंड अर्पण केल्यास चालतो. असे पिंड किती द्यावयाचे ह्याबद्दल मतभेद आहेत.

जो मनुष्य मृत्यूच्या दिवशी अन्त्य संस्काराला एकवार प्रारंभ करील तो मृताच्या गोत्राचा नसला तरी त्याने दहा दिवसपर्यंतचे सर्व विधी केलेच पाहिजेत असे गृह्यपरिशिष्टात [असगोत्रः सग्रोत्रो वा यदि स्त्री यदि वा पुमान्।
प्रथमेऽहनि यो दद्यात्स दशाहं समापयेत् ॥
—गुह्यपरिशिष्ट (मिताक्षरा-याज्ञ १·२५५ आणि ३·१६).] आणि गरुड पुराणात (प्रेत. ५·१९-२०) सांगितले आहे. परंतु ११ व्या आणि त्याच्या नंतरच्या दिवसांचे विधि पुत्राने अथवा त्याच्या अभावी एकाद्या जवळच्या सपिंडाने करावे. मत्स्य पुराणात (अपरार्क पा. ८८९)म्हटले आहे की मृताला उद्देशून बारा दिवसपर्यंत पिंड अर्पण करावे, ते त्याचे (परलोकच्या) प्रवासातील अन्न होतात आणि त्याला समाधान देतात; मृत झालेल्या लोकांचे आत्मे जेथे राहतात त्या ठिकाणी मृताला बारा दिवसानंतर नेण्यात येते म्हणून बारा दिवसपर्यंत त्याला (म्हणजे त्याच्या जीवाला) त्याचे घर, पुत्र आणि पत्नी ही दिसत असतात. मृत्यूनंतर दहा दिवसांतील प्रत्येक पिंड अर्पण केल्यावर मृताला स्वर्गलोकातील देहाचे कोणकोणते अवयव मिळतात ह्याचे वर्णन गरुड पुराणात (प्रेत ५·३३ -३६) केले आहे.

कोणाही मनुष्याला त्याच्या सपिंड आणि समानोदक मृतांप्रमाणेच त्याच्या मातामहाला आणि त्याच्या पूर्वीच्या दोन पूर्वजांना आणि स्वतःच्या आचार्याला त्यांच्या मृत्यूच्या वेळी पाणी देणे अवश्य असते. अशा प्रकारचे मृताला पाणी देण्याचे प्रसंग वारंवार येऊ नयेत अशी इच्छा दर्शित करणाऱ्या काही रूढींचे काही ग्रंथांत उल्लेख केले आहेत. उदाहरणार्थ, पारस्कर गृह्यात (३·१०) असे म्हटले आहे की ज्यावेळी सपिंड स्नानाकरिता पाण्यात शिरण्याच्या बेतात असतात आणि त्यानंतर मृताला पाणी देणार असतात त्यावेळी ते आपल्या नातलगांजवळ ‘आम्ही उदकक्रिया करू’ असे म्हणून पाणी मागतात आणि जर मृत मनुष्य शंभर वर्षाहून कमी वयाचा असला तर तो नातलग उत्तर देतो की ‘आपण म्हणता तसे करा (म्हणजे उदकक्रिया करा) परंतु पुन्हा (अशी विनंती घेऊन) येऊ नका,’ आणि जर मृत मनुष्य शंभर वर्षाचा अथवा त्याहून अधिक वयाचा असला तर केवळ ‘तसे करा’ एवढेच उत्तर देतात.

मृताला काही विशिष्ट व्यक्तींनी पाणी देऊ नये आणि काही विशिष्ट मृतांना पाणी देऊ नये असे काही

नियम होते. षंढ अथवा तत्सम व्यक्ती, व्रात्य, सुवर्णाची चोरी करणारा, निषिद्ध प्रकारचे मद्य प्राशन करणारा ह्यांच्यासारख्या व्यक्तींनी मृताला उदक देऊ नये. चोर, पतीचा वध करणाऱ्या अथवा आत्महत्या करणाऱ्या स्त्रिया ह्यांच्यासारख्या काही व्यक्तींना उद्देशून पाणी देऊ नये आणि त्यांच्याबद्दल आशौचही पाळू नये असा नियम याज्ञ. - (३·६) ने सांगितला आहे.

जर एखाद्या मृत आहिताग्नीच्या अस्थिदेखील मिळणे शक्य झाले नाही तर पलाश वृक्षाच्या पानांची एक मनुष्यप्रतिमा तयार करून ती जवाच्या पिठाने आच्छादन करावी, तिला तूप लावावे आणि त्या प्रतिमेचे त्या आहिताग्नीच्या अग्नीसह् आणि यज्ञपात्रांसह दहन करावे असे सूत्रग्रंथांत सांगितले आहे. असा विधि आहिताग्नि नसणाऱ्याच्या बाबतीतही करावा असे ब्रह्मपुराणात (शुद्धिप्रकाश पा. १८७) सांगितले आहे. जेव्हा एखाद्या पुत्राला आपल्या दूर देशीं गेलेल्या पित्याकडून १५ वर्षेपर्यंत काही समाचार कळलेला नसतो तेव्हा त्याने एका प्रतिमेचे दहन करावे असे भविष्यपुराणात सांगितले आहे. (ह्या कृत्याला **आकृतिदहन** असे म्हणतात). जर एखादा परदेशाला गेलेला मनुष्य मृत झाला असे समजून त्याच्या प्रतिमेचे दहन केल्यानंतर तो मनुष्य जिवंत परत आला तर त्याने तुपात बुडी मारून नंतर स्थान करावे, आणि त्याचे जातकर्मापासून सर्व संस्कार करावे आणि नंतर त्याने आपल्या पत्नीबरोबर पुन्हा विवाह करावा अशा प्रकारचे नियम सत्या. (२९ ४·४१) प्रभृती ग्रंथांत सांगितले आहेत.

गर्भपात होऊन पडलेला गर्भ अथवा मृतावस्थेत जन्माला आलेले अर्भक, ज्याला दात आले नाहीत असे मूल यांना कपड्यात गुंडाळून पुरावे असे मनु (५·६८) प्रभृतींनी सांगितले आहे. कोवळ्या वयाच्या मुलांचे दहन करावयाचे नसते परंतु ह्या बाबतीत वयाची मर्यादा काय ह्याबद्दल मतभिन्नता आहे. मनूने (५·६८-६९) काही वैकल्पिक नियम दिले आहेत. उदाहरणार्थ, दोन वर्षे झाली नसलेल्या बालकांच्या प्रेताचे दहन करावे अथवा प्रेत पुरावे. काही ग्रंथांनी मुलाला ५ वे आणि मुलीला ७ वे वर्ष लागेपर्यंत त्यांच्या प्रेताचे अग्नीने दहन करू नये असे सांगितले आहे. निरनिराळ्या सूत्रांनी सांगितलेल्या नियमांचा मिताक्षरेने (याज्ञ. ३·२) पुढीलप्रमाणे सारांश सांगितला आहे. नामकरणापूर्वी पुरावे, नामकरणानंतर ३ ऱ्या वर्षापर्यंत विकल्पेकरून दहन करावे अथवा पुरावे, तिसऱ्या वर्षापासून उपनयनापर्यंत मंत्र न म्हणता दहन करावे, उपनयनानंतर मृताचे दहन सामान्य अग्नीने करावे परंतु आहिताग्नि पुरुषाला लागू पडणारे विधि करावे.

यति (संन्यासी) याला पुरीत असत आणि अद्यापि देखील त्याला पुरण्यात येते. प्राचीन ग्रंथांत निरनिराळ्या प्रकारच्या संन्याशांच्या अंत्यविधीमध्ये भेद सांगितले आहेत तथापि आधुनिक काळात संन्याशाचे प्रेत नेहमीं पुरण्यात येते आणि जाळण्यात येत नाही कारण हल्ली सर्व भारतभर परमहंस हा एकच प्रकार प्रचलित आहे. निर्णयसिंधूमध्ये (पा. ६३४-६३५) असा तपशील सांगितला आहे की यतीच्या मृत देहाला स्नान घालावे, नंतर त्याकरिता खणलेल्या खड्ड्यामध्ये ठेवावे, त्याच्या उजव्या हातात दंड ठेवावा, ताळूवर शंखाने छिद्र पाडावे, खड्डा मिठाने भरावा, कोल्हे, कुत्रे ह्यांच्यासारख्या जनावरांपासून संरक्षण करण्याकरिता खड्डा (वाळूने) चांगल्या प्रकारे भरून काढावा. धर्मसिंधूमध्ये (पा. ४९७) आणखी असा तपशील सांगितला आहे की ताळूला शंखाने अथवा कुऱ्हाडीने छिद्र पाडणे शक्य झाले नाही तर मस्तकावर एक गुळाचा गोळा ठेवावा आणि तो फोडावा. संन्याशाचे दहन का करीत नाहीत ह्याचे कारण असे असावे असे वाटते की गृहस्थाश्रमी पुरुषाचे दहन त्याच्या श्रौत अथवा स्मार्त अग्नीच्या साहाय्याने करण्यात येते, परंतु संन्याशाने हे अग्नी टाकून दिले असल्यामुळे त्याच्याजवळ कोणताच अग्नी नसतो आणि म्हणून त्याला पुरण्यात येते.

प्रसूत होताना अथवा प्रसूतीनंतर लागलीच मरण पावलेल्या स्त्रियांचे आणि रजस्वला असलेल्या स्त्रियांचे दहन कसे करावे ह्याविषयी विशिष्ट नियम घालण्यात आले होते. त्यांच्या देहाला अपवित्रता आलेली असते म्हणून त्यांचे दहन करण्यापूर्वी त्यांच्या देहाला पंचगव्याने स्नान घालावयास सांगितले आहे. गरोदर स्त्रियांच्या मृत्यूच्या बाबतीतही बौधा. पितृ. (३·९), निर्णय० (पा.६२२) प्रभृती ग्रंथात नियम दिले आहेत.

मृत देहांची व्यवस्था निरनिराळ्या काळी आणि निरनिराळ्या देशांत भिन्नभिन्न प्रकारांनी करण्यात येत असे. हे निरनिराळे प्रकार म्हणजे दहन करणे, जमिनीत पुरणे, पाण्यात बुडविणे, गिधाडासारख्या पक्षांनी खाऊन नाश करावा ह्यासाठी प्रेत उघड्यावर (झोरास्ट्रियन धर्मातल्या प्रमाणे) ठेवणे, गुहात सुरक्षित ठेवणे अथवा (इजिप्त देशातील पद्धतीप्रमाणे) मसाला घालून सुकविणे हे होत. ज्या काळापासूनचा वाङमयीन पुरावा मिळतो त्या काळापासून भारतात प्रेताचे दहन करणे हा सर्वसाधारण नियम होता; तथापि लहान बालके, संन्यासी इत्यादिकांसारख्या काही अपवादात्मक बाबतीत प्रेते पुरण्याचाही प्रघात होता. ऋग्वेदात (७·८९·१) आलेल्या काही उल्लेखांवरून असे दिसून येते की अत्यंत प्राचीन काळीदेखील प्रेत पुरण्याची पद्धति भारतात ज्ञात नव्हती असे नाही. अस्थि गोळा केल्यानंतर त्या एका भांड्यात ठेवून जमिनीत पुरण्यात येत आणि बराच काल लोटल्यानंतर त्या अस्थींवर एक ओटा **(स्मशान)** बांधण्यात येत असे, असे शत. ब्रा. प्रभृती ग्रंथांत म्हटले आहे. प्रेत कुजू नये म्हणून त्यामध्ये मसाला घालून अथवा त्याला सुगंधी द्रव्ये लावून काही काळ ठेवण्याची चालदेखील अगदीच अपरिचित नव्हती. दशरथाचा मृत देह तेल भरलेल्या कढईत भरत येईपर्यंत पुष्कळ दिवस ठेवला होता असे रामायणात वर्णन केले आहे. (अयोध्या ६६·१४-१६, ७६·४).

भारतातील पुरातन काळच्या बुद्ध धर्मीय लोकांत प्रेताची व्यवस्था लावताना धार्मिक स्वरूपाचा फारसा काही विधि करण्यात येत नसे. बुद्धाच्या मृत्यूचे आणि अन्त्य विधीचे जे वर्णन महापरिनिब्बान सुत्तन्त ह्या ग्रंथात केले आहे त्यावरून असे दिसून येते की बुद्धधर्मीयांचा विधी साधा असला तरी तो आश्व. गृ. सू. मधील काही नियमांशी बराच जुळता आहे. बुद्धाचा मृत देह एका नव्या वस्त्रात गुंडाळण्यात आला, त्यानंतर पिंजलेल्या कापसात गुंडाळण्यात आला, नंतर दुसऱ्या एका नव्या वस्त्रात गुंडाळण्यात आला, अशा रीतीने वस्त्रांचे आणि पिंजलेल्या कापसांचे ५०० थर त्या देहावर लपेटण्यात आले; त्यानंतर तो देह एक तेलाने भरलेल्या लोखंडाच्या पात्रात ठेवण्यात आला आणि त्या पात्रावर तेल भरलेले दुसरे एक लोखंडाचे पात्र झाकण घालण्यात आले. नंतर सर्व प्रकारच्या सुगंधी पदार्थाची चिता रचून त्या देहाचे दहन करण्यात आले. त्या देहाचे जे अवशेष राहिले ते निरनिराळ्या लोकांनी वाटून घेतले आणि त्यांनी आपल्याला मिळालेल्या अवशेषांवर ओटे (स्तूप) बांधले. ज्यांना फक्त चितेतील कोळसेच मिळाले त्यांनी देखील त्या कोळशांवर एक स्तूप बांधला आणि द्रोण ब्राह्मणाने ज्या कुंभात अस्थि गोळा करण्यात आल्या होत्या त्या कुंभावर एक स्तूप बांधला.

गरुड पुराणात (२·४·९१-१००) पत्नीने मृत पतीच्या चितेवर स्वतःला जाळून घेण्यासंबंधी म्हणजे सती जाण्यासंबंधी मोठे रसभरित वर्णन केले असून पुढे असे म्हटले आहे की ब्राह्मणाच्या पत्नीने आपल्या पतीच्या देहाव्यतिरिक्त (अथवा देहाचे दहन झाल्यानंतर) आपणास जाळून घेऊ नये परंतु क्षत्रिय अणि इतर वर्णाच्या स्त्रियांनी तसे केल्यास प्रत्यवाय नाही; गरोदर स्त्रिया अथवा अल्पवयी बालके असणाऱ्या स्त्रिया ह्यांनी सती जाऊ नये, एखादी स्त्री सती गेल्याखेरीज ती पुन्हा पुन्हा स्त्री जन्माला येण्याच्या आपत्तीतून मुक्त होत नाही असेही त्यात सांगितले आहे. सती जाण्याची चाल चांडालासहित सर्व वर्णांच्या स्त्रियांना साधारण

असे.

याज्ञ. (३·७) प्रभृति ग्रंथांत असे सांगितले आहे की मृताला उद्देशून त्याच्या पुत्रादि नातलगांनी उदक दिल्यानंतर आणि स्नान केल्यानंतर एखाद्या हिरवळीच्या मऊ जागेत बसावे आणि तेथे त्यांना वयस्क लोकांनी (त्यांचे दुःख कमी करण्याकरिता) प्राचीन कथा सांगाव्या. इंद्रादि देव, दैत्य, मोठमोठे राजे आणि ऋषि ह्यांच्यावर देखील कालाची सत्ता चालत असते, जन्माला आलेल्या प्रत्येक व्यक्तीला मरण निश्चयाने येत असते, मनुष्य मरण पावल्यावर तो परलोकी जाताना त्याच्याबरोबर (पत्नीव्यतिरिक्त) कोणीही जाऊ शकत नाही, त्याने केलेली सत्कृत्ये आणि दुष्टकृत्ये त्याच्या आत्म्याबरोबर जातात, श्राद्ध केल्याने मृताचे फार हित होते, मृताच्या मागे राहिलेल्या नातलगांनी श्राद्ध करावे आणि शोक करणे सोडून द्यावे कारण त्यापासून कोणाचाच लाभ होत नाही आणि धर्म हाच काय तो मृताच्या बरोबर तो जेथे जेथे जाईल तेथे तेथे जात असतो अशा प्रकारचे विवेचन विष्णु. ध. सू. (२०·२२-५३) मध्ये केले आहे. गरुड पुराण (२ ४ ८१-८४) प्रभृति दुसऱ्याही ग्रंथांत अशाच प्रकारचे विचार प्रदर्शित केले आहेत.

वयस्क लोकांनी सांगितलेल्या तत्वज्ञानाच्या गोष्टी ऐकल्यानंतर मृताच्या नातलगांनी आपल्या घरी परत यावे, दाराशी उभे राहून मनःसंयमन करावे, निंबाची पाने चावावी, आचमन करावे, अग्नि, पाणी, गोमय, पांढऱ्या मोहऱ्या ह्यांना स्पर्श करावा आणि घरात प्रवेश करावा, घराच्या दाराजवळ मृताला उद्देशून एक पिंड अर्पण करावा. त्या दिवशी अन्न विकत घ्यावे अथवा दुसऱ्या कोणाच्या घरून आणावे, एक दिवसपर्यंत फक्त दिवसा भोजन करावे आणि तीन दिवसपर्यंत काहीही काम करू नये. याज्ञ. (३·१४) ने म्हटले आहे की ही वरील कृत्ये ज्या लोकांनी प्रेत वाहून नेले असेल अथवा त्याला शृंगारले असेल त्यांनी देखील केली पाहिजेत.

शांखा. गृह्य (४·१५·१०) प्रभृति अनेक ग्रंथांत ज्यांचा एखादा निकट सपिंड नातलग मृत झाला असेल त्यांनी प्रेताच्या दहनानंतर लागलीच आणि त्यानंतर तीन दिवसपर्यंत पाळावयाचे अनेक नियम सांगितले आहेत. उदाहरणार्थ, अशा स्त्रीपुरुषांनी उघड्या जमिनीवर निजावे, हविष्य अन्नावरच उदरनिर्वाह करावा, (वैदिक अग्निसंबंधीच्या कृत्याव्यतिरिक्त) त्यांची नेहमीची धर्मकृत्ये एक, तीन अथवा नऊ रात्रीपर्यत अथवा अस्थि गोळा करीपर्यंत करू नयेत, ब्रह्मचर्याने राहावे, तीन रात्रीपर्यंत दूध आणि पाणी एका मातीच्या भांड्यात उघड्या जागेवर (एका शिंक्यावर) ठेवावे आणि ‘हे प्रेता! ह्या पाण्यात स्नान कर आणि हे दूध पी’ असे शब्द उच्चारावे, श्रौत आणि स्मार्त विधि दुसऱ्या कोणाकडून करवावे. (प्रस्तुत काळी देखील अग्निहोत्री आपले श्रौत नित्य होम आशौचामध्ये स्वतः करतात परंतु कोणी कोणी ती कृत्ये दुसऱ्याकडून करवून घेतात). आशौच असताना देखील विष्णुसहस्रनाम स्तोत्र म्हणण्यास प्रत्यवाय नसतो असे नित्याचारपद्धती (पा. ५४४) मध्ये म्हटले आहे.

**अस्थिसंचयन**. ह्याचा अर्थ दहन केलेल्या प्रेताची जळकी हाडे (**अस्थि**) गोळा करण्याचा विधि. हा विधी कोणत्या दिवशी करावा ह्याविषयी बरेच मतवैचित्र्य आहे. हा विधि दहनानंतर **दुसऱ्या** अथवा ३, ५, ७ ह्या दिवशी करावा असे काही ग्रंथांत सांगितले आहे (सत्या. श्री. २८·३·१) तर पहिल्या दिवसापासून ४ थ्या दिवसापर्यंत अस्थिसंचयन करावे असे काही ग्रंथांत म्हटले आहे (यम ८७) आणि चारी वर्णाच्या लोकांनी अनुक्रमे ४, ५, ७ आणि ९ ह्या दिवशी करावा असे कोणी म्हटले आहे. (यम ८८). दहनाच्या जागी शमीच्या डाहाळीने पाणीमिश्रित दूध शिंपडावे, नंतर विधि करणाराने आंगठा आणि चौथे बोट ह्यांनी एक एक सुटे हाड उचलून एका मडक्यात भरावे, पायाची हाडे प्रथम भरावी, मस्तकाची हाडे सर्वात शेवटी भरावी,

हाडांना लागलेली राख काढून टाकल्यानंतर ते मडके एका खड्ड्यात ठेवावे, त्यावर माती टाकावी आणि तो खड्डा भरून काढावा, नंतर स्नान करून मृताला उद्देशून श्राद्ध समर्पण करावे. (आश्व. गृ. ४-५).

**आधुनिक काळी**, विशेषतः लहान मोठ्या शहरांत अस्थि गोळा करण्याचे कार्य दहनानंतर लागलीच करण्यात येते. गोळा केलेल्या अस्थि गंगेच्या पाण्यात टाकाव्या कारण गंगेच्या पाण्यात जितके अस्थिकण राहतील तितकी सहस्त्र वर्षेपर्यंत मृत मनुष्य स्वर्गात वास करतो. (विष्णु. ध. सू. १९·११-१२). आधुनिक-काळी देखील पुष्कळ हिंदू लोक आपल्या मातापितरांच्या अथवा निकट नातलगांच्या अस्थि प्रयाग येथे गंगेवर घेऊन जातात अथवा दुसऱ्या एखाद्या पुण्यनदीवर घेऊन जातात अथवा समुद्रात टाकतात. ज्याचे उपनयन झालेले नसेल त्याच्या बाबतीत अस्थिसंचयन नसते असे निर्णयसिंधू (पा. ५८८) मध्ये सांगितले आहे.

आश्व. गुह्य (४·६) प्रभृति काही ग्रंथांनी मृताच्या अस्थि गोळा केल्यानंतर एक **शांतीचा** विधि करावयास सांगितले आहे. (हा विधीला शां. श्रौ. ४·६ मध्ये **परिधिकर्म** अशी संज्ञा दिली आहे). दुसऱ्या काही (विष्णु ध. सू. १९·१९) ग्रंथांनी हा शांतिविधि आशौचाचे दहा दिवस होऊन गेल्यानंतर करावा असे म्हटले आहे. ह्या शांतीचे विधि निरनिराळ्या ग्रंथांनी भिन्नभिन्न सांगितलें आहेत.

शत. ब्रा. (१३·८·१-४) आणि कात्या श्रौ. (२१·३·१ आणि ६) ह्यांत समाधीसंबंधी (स्मशानासंबंधी) मनोरंजक माहिती दिली आहे. त्यांत म्हटले आहे की अशी समाधी मृत्यूनंतर लागलीच करू नये कारण तसे केल्यास (क्रिया करणाऱ्याकडून) मृताचे पातक ताजे होण्याचा संभव असतो. म्हणून अशी समाधी मृत्यूनंतर पुष्कळ काळाने आणि ज्यावेळी (मृत्यूनंतर) किती वर्षे होऊन गेली हेदेखील लोकांच्या स्मरणातून गेले असेल त्यानंतर करावी. समाधि कोणत्या महिन्यात, नक्षत्रावर करावी, कोणत्या आकाराची करावी, कोणत्या वृक्षांच्या जवळ करू नये इत्यादि बाबतीत बरेच तपशीलाचे नियम निरनिराळ्या ग्रंथांत दिले आहेत. ओटा बांधण्याच्या संबंधात **धवन** नावाच्या एका सांकेतिक विधीचा उल्लेख सत्या. सू. (२९·१·१३-३२) मध्ये केला आहे. तो विधि बहुधा मृताला त्याच्या पत्नीच्या एकनिष्ठेविषयी खात्री पटविण्याकरिता करीत असावे असे वाटते. हा धवनाचा कार्यक्रम आधुनिक काळी भारतात मुळीच करण्यात येत नाही.

प्राचीन भारतात प्रेताची व्यवस्था चार टप्प्यांनी लावण्यात येत असे. ते टप्पे म्हणजे दहन, अस्थि गोळा करणे, एका भांड्यात घालून जमिनीत पुरणे, शांतिकर्म करणे आणि अस्थींच्यावर एक ओटा अथवा समाधी रचणे. शेवटी सांगितलेला प्रकार प्रत्येकाच्या बाबतीत केला जातच असे असे नाही. अपरार्काने (पा. ८८५-८८६) उद्धृत केलेल्या ब्रह्मपुराणातील एका अवतरणात असे म्हटले आहे की दहन केलेल्या मनुष्याच्या अस्थि एका भांड्यात गोळा कराव्या आणि एखाद्या वृक्षाच्या बुंध्याजवळ पुराव्या अथवा गंगेत टाकाव्या; ज्या ठिकाणी दहन केले असेल ती जागा गाईचे शेण आणि पाणी ह्यांनी शुद्ध करावी आणि त्या जागेवर एक पुष्करक वृक्ष लावावा अथवा त्या जागेवर एक एडूक (इमारत) बांधावी.

शतपथ ब्राह्मणात वर्णन केलेल्या अन्त्यविधीसारख्या अत्यंत प्राचीन विधीमध्ये देखील मृताबरोबर दुसऱ्या कोणाला पुरण्याचा अथवा जाळण्याचा उल्लेख सापडत नाही. वेदकांळाच्या पूर्वीच्या काळी काही काही प्रसंगी मृत पतीच्या चितेवर त्याच्या पत्नीने आपणास जाळून घेतले असण्याचा (म्हणजे **सती गेल्याचा**) संभव आहे. विष्णु. ध. सू. सारख्या त्या नंतरच्या काळात झालेल्या ग्रंथांत पतीच्या मृत्यूनंतर

त्याच्या पत्नीने पूर्ण ब्रह्मचर्य व्रताने राहावे अथवा **सती जावे** अशी शिफारस केली आहे.

एखाद्या मनुष्याच्या मृत्यूनंतर त्याला उद्देशून श्राद्ध करण्याचा ज्यांना अधिकार असतो त्यांनाच त्याचा **अन्त्य विधि करण्याचा अधिकार** असतो. असा अधिकार एखाद्या मनुष्याला कोणत्या क्रमाने येतो ह्याविषयी बराच मतभेद आहे. एखाद्या मनुष्याची मिळकत स्वीकारणे आणि त्याच्या मत्यूनंतर १० व्या दिवसापर्यंतचे विधि करणे ह्या दोहोंत अतिशय निकट संबंध असे. मिताक्षरेने आणि दायभागाने ह्या बाबतीत प्रतिपादन केलेल्या मतांचा उल्लेख मागे खंड २ मध्ये केला आहे. निर्णयसिंधूमध्ये (पा. ३८१) श्राद्धाधिकारी व्यक्तींचा क्रम पुढीलप्रमाणे दिला आहे :- औरस पुत्र, त्यानंतर पौत्र, त्यानंतर प्रपौत्र, नंतर दत्तक पुत्र एकाहून अधिक पुत्र असल्यास सर्वात मोठा पुत्रच फक्त अधिकारी असतो; सर्वात मोठा पुत्र गैरहजर असला अथवा **पतित** असला तर त्याच्या खालच्या क्रमाचा पुत्र अधिकारी होतो (सर्वात लहान पुत्र होत नाही). पुत्र विभक्त असतील तर सपिंडीकरणापर्यंतचे सर्व विधि सर्वात मोठ्या पुत्रानेच फक्त करावे परंतु **वार्षिक श्राद्ध** प्रत्येक पुत्राने पृथक केल्यास चालेल. पुत्र विभक्त नसतील तर वार्षिक श्राद्धासहित सर्व विधि फक्त सर्वात मोठ्या पुत्राने करावे. प्रपौत्रापर्यंतचा कोणी सरळ वंशज नसेल आणि दत्तक पुत्रही नसेल तर पत्नीने अन्त्य संस्कार आणि वार्षिक आणि इतर श्राद्धे समंत्रक करण्यास प्रत्यवाय नाही. काही प्रसंगी पत्नीच्या अभावी त्याच्या कन्येला त्याचे और्ध्वदेहिक संस्कार करण्याचा अधिकार असतो. ह्या बाबतीत निरनिराळ्या ग्रंथांत बराच तपशील दिलेला असतो.

मृत स्त्रीच्या बाबतीत तिचे और्ध्वदेहिक विधि करण्याचा अधिकार कोणाला असतो ह्याबद्दल धर्मसिंधूमध्ये (पा. ३७०) पुढील क्रम दिला आहे :— मृत स्त्री **अविवाहित** असेल तर तिचा पिता, त्यानंतर तिचा भ्राता इत्यादि; मृत स्त्री **विवाहित** असेल तर तिचा पुत्र, त्यानंतर सापत्न पुत्र, त्यानंतर पौत्र, त्यानंतर सापत्न प्रपौत्र; त्यांच्या अभावी तिचा पती, त्याच्या अभावी कन्या, तिच्या नंतर कन्येचा पुत्र, त्यानंतर पतीचा भ्राता, त्याचा पुत्र आणि त्यानंतर स्नुषा; त्यानंतर मृत स्त्रीचा पिता, त्यानंतर तिचा भ्राता, त्यानंतर भ्रात्याचा पुत्र आणि त्यानंतर इतर लोकांकडे अधिकार जातो.

बौधायनसूत्र, मार्कंडेय पुराण (३ ४५) प्रभृति अनेक ग्रंथांत एखाद्या मनुष्याला तो जिवंत असताना आपले स्वतःचे और्ध्वदेहिक करण्यास अनुमती दिली आहे. तसेच जर एखादा मनुष्य **पतित** झाला असून प्रायश्चित्त करण्यास कबूल नसला तर त्याला **घटस्फोटाच्या** विधीने हिंदु समाजातून बहिष्कृत करण्यात येई; गौतम (२०·२) आणि मनु (११·१८२-८३) ह्यांनी असे सांगितले आहे की असा मनुष्य मृत झाला असे समजून त्याच्या नातलगांनी त्याला पाणी अर्पण करणे आणि श्राद्ध करणे ह्यांच्यासारखे विधी करावे आणि त्याच्यानिमित्त आशौचही पाळावे.

अनेक ग्रंथकारांनी उद्धृत केलेल्या विष्णुपुराणातील (३·१३·३४-३९) अवतरणात एखाद्या मनुष्याच्या मृत्यूनंतर करावयाच्या विधींचे (क्रियांचे) **पूर्व, मध्यम** आणि **उत्तर** असे तीन गट पाडले आहेत. दहनापासून १२ व्या दिवसाच्या अखेरीपर्यंत करावयाच्या विधींना **पूर्वक्रिया** अशी संज्ञा दिली असून मासिक श्राद्धे, सपिंडीकरण आणि एकोद्दिष्ट ह्या विधींना **मध्यम क्रिया** आणि सपिंडीकरणानंतर केलेल्या विधींना **उत्तरक्रिया** असे म्हटले आहे आणि ह्यांपैकी उत्तरक्रिया मात्र मृताचा पुत्र, पौत्र, प्रपौत्र, कन्येचा पुत्र अथवा कन्येच्या पुत्राचा पुत्र ह्यांनीच केल्या पाहिजेत असे सांगितले आहे. स्त्रियांच्या बाबतीत देखील प्रतिवर्षी मृत्यूच्या दिवशी तिच्याकरिता त्यांनी एकोद्दिष्ट श्राद्ध करावे.

श्राद्धांचे **नवश्राद्ध** (मृत्यूनंतर १० दिवसपर्यंत करावयाचे विधि), **नवमिश्र** (दहा दिवसानंतर सहा ऋतूंपर्यंत करावयाचे विधी) आणि **पुराण** (एक वर्षानंतर करावयाचे विधि) असेही वर्ग करण्यात येतात. मृत मनुष्य सपिंडीकरणापर्यंत **प्रेत** असतो आणि तो सपिंडीकरणानंतर **पितृ** ह्या दर्जाला पोचतो.

आधुनिक काळात, पहिल्या दिवसाचा दहनाचा आणि अस्थि गोळा करण्याचा विधी झाल्यानंतर मृतासंबंधी कृत्यांना सामान्यतः दहाव्या दिवशी प्रारंभ होतो. दहाव्या दिवशी करावयाच्या विधीमध्ये प्रेताला होणारी भूक आणि तहान ह्यांची पीडा दूर करण्याच्या उद्देशाने एक पिंड अर्पण करण्यात येतो. आणि त्याची पूजा केल्यानंतर तो पिंड त्या जागेहून दुसऱ्या जागी उचलून ठेवण्यात येतो. त्यानंतर सुक्या मातीची एक त्रिकोणी वेदि तयार करतात आणि त्या वेदीवर (निरनिराळ्या ग्रंथांच्या मताप्रमाणे) तीन, चार अथवा पाच पाण्याने भरलेले कलश ठेवतात आणि त्या प्रत्येकावर शिजलेल्या भाताचा एक एक गोळा ठेवतात. हा कलश आणि पिंड प्रेताच्या सेवेला सादर होवो आणि त्याची क्षुधा आणि तृषा शांत होवोत अशी प्रार्थना प्रेताच्या स्नेह्याला उद्देशून आणि यमाला, कावळ्यांना आणि रुद्राला उद्देशून करण्यात येते. त्या प्रत्येकाला पादुका, छत्री, पताका आणि पोळी अर्पण करण्यात येते. नंतर पश्चिमेकडे ठेवलेला **पिंड एखादा कावळा उचलीपर्यंत आणि तो भक्षण करीपर्यंत** क्रिया करणारा वाट पाहतो. त्यानंतर **अश्म्याला** तेल चोपडतात आणि तो पाण्यात टाकतात आणि क्रिया करणारा आणि नातलग प्रेताला उद्देशून जलाशयाच्या तीरावर एक अथवा तीन ओंजळी पाणी अर्पण करतात.

काही पुराणांत आणि निबंधग्रंथांत असे प्रतिपादन केले आहे की एखादा मनुष्य मरण पावल्यानंतर त्याचा जीव **अतिवाहिक** संज्ञा असणारा देह धारण करतो. हा देह तेज,वायु, आणि आकाश ह्या तीन मूल तत्त्वांचा बनलेला असतो आणि उरलेली पृथ्वी आणि पाणी ही दोन मूल तत्वे ह्या लोकी राहतात. प्रेताचे दहन करतेवेळी आणि त्यानंतर दहा दिवसपर्यंत जे पिंड अर्पण करण्यात येतात त्यांच्या साहाय्याने मृताचा आत्मा **दुसरा एक देह** प्राप्त करून **घेतो**. अशा दुसऱ्या देहाला **भोगदेह** (म्हणजे अर्पण केलेल्या पिंडांचा उपभोग घेणारा देह) अशी संज्ञा आहे. वर्षाच्या अंती जेव्हा सपिंडीकरण करण्यात येते तेव्हा मृताचा आत्मा **तिसरा एक देह** मिळवितो आणि त्या देहाने तो आत्मा मृताने केलेल्या कर्मांच्या स्वरूपाला अनुसरून स्वर्गलोकीं अथवा नरकलोकी जातो. ह्या तपशीलाच्या बाबतीत मतवैचित्र्य आहे.

ह्या वर्णनांच्या बुडाशी असणारी कल्पना अशी होती की एखादा मनुष्य मरण पावल्यानंतर जेव्हा त्याचा देह (दहन वगैरेच्या योगाने) नष्ट केला जातो तेव्हा त्या मृताच्या आत्म्याला दुसऱ्या जन्माला जाण्यास भाग पडेपर्यंत एक तात्पुरता देह धारण करावा लागतो. ही कल्पना सर्वात जुन्या अशा वेदकाळापासून अस्तित्वात होती. (ऋ. १०·१५·१४ इ.).

# प्रकरण ८

## शुद्धि

(मू. ग्रं. पा. ४/२६७-३३३)

शुद्धि हा फार व्यापक विषय असून त्यात जन्म आणि मृत्यू ह्यांच्यामुळे येणाऱ्या आशौचानंतर करावयाच्या शुद्धतेचा तसेच एखाद्या अपवित्र पदार्थाच्या संसर्गामुळे येणाऱ्या अथवा काही विशिष्ट गोष्टी घडल्यामुळे येणाऱ्या विटाळाच्या शुद्धतेचा समावेश होतो आणि पात्रे, विहिरी, अन्न इत्यादी अशुद्ध झाल्यास त्यांना शुद्ध करून घेण्याचाही त्यात अंतर्भाव होतो. तथापि आशौच हीच शुद्धि ह्या सदरात येणाऱ्या बाबींत सर्वांत महत्त्वाची बाब आहे. (मनु. ५·८३, याज्ञ. ३·१४ प्रभृति). स्मृतींनी शुद्धि हा शब्द आशौचानंतर करावयाची शुद्धता ह्या अर्थाने वापरला आहे. म्हणून जनन आणि मरण ह्यांच्या नंतर येणाऱ्या आशौचाचा प्रथमतः विचार करू.

**आशौच** हा शब्द शुचि ह्या शब्दापासून बनलेला आहे. देवलस्मृतिसारख्या काही ग्रंथांत 'आशुच्य' असेही रूप आढळते. आशौचाचा समानार्थी **म्हणून 'अघ'** हा शब्द पुष्कळदा वापरण्यात येतो. आशौचाचे स्वरूप दोन प्रकारचे असते म्हणजे त्याच्या योगाने धार्मिक कृत्ये करण्याचा अधिकार नष्ट होतो आणि त्याच्या योगाने मनुष्य स्पर्श करण्यास अपात्र होतो. (मिता-याज्ञ. ३·१८). आशौच दोन प्रकारचे असते, एक प्रकार **जननाशौच** म्हणजे जन्माच्या निमित्ताने उत्पन्न होणारे आशौच (अथवा **सूतक**) आणि दुसरा प्रकार **मृतकाशौच** अथवा **मरणाशौच** (ह्यालाच **शावाशौच** असेही म्हणतात). सूतक हा शब्द ऐत. ब्राह्मणात (३२·८) आला असून तेथे तो बहुधा जन्म आणि मृत्यु ह्या दोन्ही कारणांनी येणाऱ्या आशौचाच्या अर्थाने वापरला आहे. मराठीसारख्या काही अर्वाचीन भाषांत सूतक हा शब्द केवळ मृत्यूच्या योगाने येणारी अशुद्धता ह्या अर्थानेच वापरण्यात येतो.

एखाद्याचा जन्म झाल्याकारणाने आणि मृत्यू झाल्याकारणाने त्याच्या कुटुंबातील लोकांना अथवा त्याच्या नातलगांना आशौच का उत्पन्न व्हावे ह्या प्रश्नांची थोड्या ग्रंथकारांनी चर्चा केली आहे. ह्या बाबतीत असा एक तर्क करणे शक्य आहे : वेदकाळच्या आर्यांच्या अत्यंत प्राचीन पूर्वजांना असे आढळून आले असावे की जर एखाद्या व्यक्तीने एखाद्या प्रेताला स्पर्श केला अथवा मृत मनुष्य जिवंत असताना वापरीत असलेली वस्त्रे वापरली तर त्या व्यक्तीला देखील मृताला झालेले रोग (आणि विशेषतः प्लेग, पटकी, विषमज्वर इत्यादी संसर्गजन्य रोग) होतात आणि अशा व्यक्तीला समाजापासून दहा दिवसपर्यंत दूर ठेवल्यास समाजाचा अशा रोगांपासून बचाव होतो. ह्याकरिता ज्यांनी प्रेताला स्पर्श केला असेल अथवा ते उचलून नेले असेल त्यांना आणि मृताच्या कुटुंबातील व्यक्तींना अशुद्ध मानण्यात येऊ लागले आणि त्यांना दहा दिवसपर्यंत इतरांपासून दूर ठेवण्यात येऊ लागले. क्रमाक्रमाने ही योजना कोणत्याही रोगाने अथवा कारणाने आलेल्या मृत्यूच्या बाबतीत लागू करण्यात येऊ लागली आणि मृत्यूमुळे घालण्यात येणारे निर्बंध क्रमाक्रमाने एखाद्या अपत्याच्या जन्मामुळे त्याच्या निकट संबंधाच्या लोकांना येणाऱ्या अशुद्धतेच्या बाबतीतही घालण्यात येऊ लागले असावेत. ते कसेही झालेले असो निदान स्मृतिग्रंथांनी जनन आणि मुत्यू ह्यांच्या योगाने उद्भवणाऱ्या आशौचांना एकाच दर्जाचे मानले आहे. उदाहरणार्थ मनूने (५·६१) म्हटले आहे की 'मृत्यूच्या बाबतीत सपिंडांना दहा दिवस आशौच असते हा शास्त्रात सांगितलेला नियम जननाच्या बावतीतही लागतो.'

शुद्धि (आणि आशौच) ह्या विषयावरील ग्रंथांची संख्या फार मोठी आहे आणि त्यांत सूत्रे, स्मृति, पुराणे आणि निबंधग्रंथ ह्यांचा समावेश होतो. स्मृतींमध्ये ह्या विषयावर एकमेकाविरुद्ध असणारी इतकी वचने आहेत आणि ती मध्ययुगीन काळातील रूढीला इतकी सोडून आहेत की मिताक्षरेला त्यांची एकवाक्यता करण्याचे काम सोडून द्यावे लागले. आशौच किती दिवस पाळावे ह्याविषयी अत्रि (८३) प्रभृति काही स्मृतींनी असा नियम सांगितला आहे की ज्या ब्राह्मणाने तीन श्रौत अग्नींची स्थापना केली असेल आणि जो वेदपारंगत असेल त्याने (जनन आणि मृत्यु ह्या दोन्ही प्रकारचे) आशौच फक्त एक दिवसपर्यंत पालन करावे, ज्याने फक्त वेदाध्ययन केले असून श्रौत अग्नींची स्थापना मुळीच केली नसेल त्याने तीन दिवसपर्यंत आशौच पालन करावे आणि ज्याने ह्यांपैकी काहीही केले नसेल त्याने दहा दिवस आशौच पालन करावे. मनूने–(५·५९) ही आशौचाच्या मुदतीबद्दल १०, ४, ३, आणि १ दिवस असे भिन्न भिन्न पर्याय सांगितले आहेत परंतु ते कोणाला लागू पडतात हे सांगितले नाही. आपण विद्वान आहोत असे समजणाऱ्या काही लोकांनी थोडे दिवसपर्यंत आशौच पाळले असेल आणि त्यांची विद्वत्ता शेजाऱ्यांना मान्य नसल्यामुळे त्यांनी वेदपारंगत आणि अग्निहोत्री लोकांना दिलेली आशौचाच्या बाबतीतील सवलत अशा लोकांना लागू पडत नाही असे म्हटले असण्याचा संभव आहे आणि त्या वादाचा परिणाम असा झाला असावा की त्यानंतर विद्वान्, अविद्वान् सर्वांनीच दहा दिवस आशौच पाळले पाहिजे असा नियम करण्यात आला आणि कमी दिवसांसंबंधीचे नियम **कलिवर्ज्य** प्रकरणात सामील करण्यात आले.

आशौचाच्या मुदतींत जातीप्रमाणे १० दिवसांपासून एक महिन्यापर्यंत भिन्नता असते असे मनुप्रभृति बऱ्याच स्मृतींनी सांगितले आहे. उलटपक्षी, शातातपाने सर्व वर्णांना, १० दिवस आशौच असल्याचे सांगितले
[सर्वेषामेव वर्णानां सूतके मृतके तथा।
दशाहाच्छुद्धिरेतेषामिति शातातषोऽब्रवीत्॥
–शातातप (मिता–याज्ञ ३·२२).]आहे. (मितायाज्ञ. ३·२२).

आंशौचाचा कालावधि अनेक गोष्टींवर अवलंबून असे. मृत व्यक्ति पुरुष होती किंवा स्त्री होती, लहान अर्भक होती किंवा मोठी होती, तिचे उपनयन झाले होते किंवा नाही, मृताचा मृत्यू नातलगाच्या जवळ झाला होता अथवा दूर ठिकाणी झाला होता, नाते जवळचे होते किंवा दूरचे होते, मृत्यू झाल्यानंतर अथवा जन्म झाल्यानंतर ती वार्ता नातलगाला कळेपर्यंत किती काल लोटला होता, इत्यादि गोष्टींना अनुसरून आशौचाचा कालावधि कमीअधिक असे. एखाद्या स्त्रीला प्रसूतीनंतर येणारे आशौच (सूतिकाशौच), रजस्वला स्त्रीला (मासिक पाळीच्या वेळी) येणारे आशौच, एखादी व्यक्ती मृत झाल्यामुळे इतरांना येणारे आशौच आणि एखाद्या बालकाचा जन्म झाल्यामुळे इतरांना येणारे आशौच ह्या निरनिराळ्या प्रकारांनी येणाऱ्या आशौचांतील तीव्रतेत भेद असे आणि शेवटी उल्लेख केलेले आशौच सर्वात कमी तीव्र असे.

दक्षस्मृती– (६·२-३) मध्ये आशौचाचे निरनिराळे प्रकार सांगताना काही व्यक्तींना येणारे आशौच आमरणान्त म्हणजे **भस्मान्त** असते असे सांगितले आहे. भस्मान्त म्हणजे देहाची राख होईपर्यंत चालणारे अशी व्याख्या देऊन त्या व्याख्येत अंतर्भाव होणाऱ्या व्यक्तींचे वर्णनही त्या स्मृतीत केले आहे. दक्षाने म्हटले (६·८-१०) आहे की जे लोक स्नान केल्याशिवाय अथवा देवांना उद्देशून हवन केल्याशिंवाय अथवा दान दिल्याशिवाय भोजन करितात ते सर्व लोक मरणापर्यंत अशुद्ध राहतात. ह्याशिवाय निरंतर व्याधिग्रस्त, स्त्रीजित ह्यांच्यासारख्या आणखीही अनेक प्रकारच्या व्यक्तींचा समावेश भस्मान्त शब्दाच्या अर्थात केला आहे. तथापि ह्या वचनांचा अर्थ शब्दशः घ्यावयाचा नसून अश प्रकारच्या मनुष्यांशी इतरांनी संबंध येऊ देऊ नये एवढाच त्यांचा आशय आंहे.

एखाद्या गावात कोणी मृत-झाल्यास त्याचे प्रेत गावाबाहेर काढले जाईपर्यंत सर्व गावाला आशौच असते. (स्मृति. मुक्ताफल पा. ५४१). तथापि हा नियम एखाद्या नगराला अथवा मोठ्या गावाला (ज्या गावात ४०० पेक्षा अधिक ब्राह्मणांची घरे असतील त्या गावाला) लागत नाही.

जन्म अथवा मृत्यू रात्री झाला असला अथवा त्याबद्दलची वार्ता कळली तर कोणत्या दिवसापासून आशौचाची मुदत मोजावयाची ह्या प्रश्नाच्या बाबतीत दोन मते आहेत. एका मताप्रमाणे मध्यरात्रीपूर्वीचा काळ पूर्व दिवसात अंतर्भूत होतो आणि मध्य रात्रीनंतरचा काळ दुसऱ्या दिवसात अंतर्भूत होतो असे समजावे. दुसऱ्या मताप्रमाणे रात्रीचे तीन भाग पाडून पहिल्या दोन विभागात जन्म अथवा मृत्यू झाला तर तो पूर्व दिवस आशौचाची मुदत मोजताना धरावा आणि तिसऱ्या विभागात जन्म अथवा मृत्यू झाला तर आशौचाची मुदत पुढील दिवसापासून मोजावी. धर्मसिंधुसारख्या (पा. ४३५) काही निबंधग्रंथांनी ह्या बाबतीत देशातील रूढीप्रमाणे चालावे असे सांगितले आहे.

एखादा विवाहविधी (तसेच चौल आणि उपनयन विधि), देवतेचा उत्साह आणि एखादा यज्ञ चालत असताना, जनन अथवा मृत्यूनिमित्त आशौच विधिकर्त्याला आले तर त्या कार्याकरिता काढून ठेवलेली (द्रव्य आणि इतर) सामुग्री त्या देवतेला अथवा ब्राह्मणांना अर्पण करावी अथवा दान द्यावी आणि तसे करण्याने कोणताही दोष उत्पन्न होत नाही असा नियम स्मृतींनी (पराशर ३·२७) सांगितला आहे. आधुनिक काळीदेखील हा नियम उपनयन आणि विवाह विधींच्या बाबतीत पाळण्यात येतो. यज्ञ अथवा विवाहविधी नक्की केव्हा सुरू झाला असे समजावे ह्याविषयी लघु विष्णूने असे सांगितले आहे की यज्ञाच्या बाबतीत ऋत्विजांची निवड केली त्यावेळी यज्ञ सुरू झाल्याचे समजावे; व्रते आणि जप ह्यांच्या बाबतीत संकल्प केला त्यावेळी ती कृत्ये सुरू झाल्याचे समजावे, विवाहाचे बाबतीत नांदीश्राद्ध करण्यात येईल त्यावेळी विधीला सुरुवात झाल्याचे समजावे आणि श्राद्धाच्या बाबतीत ब्राह्मणांना द्यावयाचे अन्न पूर्णपणे शिजून तयार होईल तेव्हा त्या विधीला आरंभ झाल्याचे समजावे.

**आशौच सन्निपात** अथवा **आशौच संपात** म्हणजे एक आशौच पाळीत असणाऱ्या व्यक्तीला दुसऱ्या आशौचाची वार्ता समजणे. ह्या संबंधीचे नियम बऱ्याच प्राचीन काळी घालण्यात आले होते आणि ते सोईच्या आणि व्यावहारिक बुद्धीच्या दृष्टीने केलेले होते. पहिल्या आशौचाचे उरलेले दिवस गेल्यानंतर दुसरे आशौच पाळले पाहिजे असे ठरविल्यास लोकांना जो त्रास होण्याचा संभव आहे तो त्रास कमी करण्याच्या हेतूने असा नियम सांगितला आहे की एक आशौच पाळीत असताना दुसरे आशौच आले तर पहिल्या आशौचाचे उरलेले दिवस गेल्यानंतर शुद्धि होते. (गौत. ध. सू.१४·५) ह्या बाबतीत अनेक तपशीलाचे मतभेद आहेत.

काही काही आशौचे **सद्यःशौच** असतात म्हणजे त्यांच्यापासून त्याच दिवशी शुद्धि होते. याज्ञ. (३·२९) प्रभृति स्मुतींनी हा शब्दाचा असा अर्थ केला आहे की ते आशौच सबंध दिवसभर अथवा तीन अथवा दहा दिवसपर्यंत चालत नसून फक्त स्नान करीपर्यंत अथवा ज्या दिवशी एखादे कृत्य घडले त्या दिवसाच्या अंतापर्यंत अथवा रात्रीच्या अंतापर्यंत आशौच असते. सद्यः शौच ह्या शब्दाचा अर्थ काही ठिकाणी 'आशौचाचा अभाव' असा असतो आणि काही ठिकाणी 'स्नान' असा असतो असे शुद्धिप्रकाश (पा. ९२) ह्या ग्रंथात सांगितले आहे. गौतमाने (१४ ४३-४४) म्हटले आहे की राजाच्या बाबतीत सद्यःशौच असते कारण तसे न केल्यास त्याच्या कर्तव्यकर्मात अडथळे उत्पन्न होतील आणि ब्राह्मणांच्या बाबतीतही त्यांच्या अध्यापन करण्याच्या कर्तव्यात खंड पडू नये म्हणून त्यांना सद्यःशौच असते. दुसऱ्याही अनेक व्यक्तींना सद्यः शोच असते.

**ब्रह्मचाऱ्याला** सर्व प्रकारच्या आशौचापासून सर्व काळी मुक्तता असते परंतु त्याला **समावर्तना**नंतर (आचार्याचे घरून परत आल्यानंतर) त्याच्या ब्रह्मचर्याच्या अवधीमध्ये मृत झालेल्या **सर्व** नातलगांबद्दल तीन दिवस आशौच पाळावे लागे. (मनु. ५·८८).

काही व्यक्तींच्या बाबतीत आशौच नसते आणि त्यांचे दहन करण्याला आणि त्यांना पाणी देण्याला सांगितलेले नसते. कूर्मपुराणात (उत्तरार्ध २३ ६०-६३) असा नियम सांगितला आहे की जो मनुष्य अग्नि, विष ह्यांच्यासारख्या उपायांनी **आत्महत्या** करतो त्याच्याबद्दल आशौच नसते. परंतु काही परिस्थितीतील लोकांना महाप्रस्थानाला जाऊन अथवा प्रयाग येथे जाऊन मरण्याला अनुमति असते. जर एखाद्या मनुष्याने शास्त्राने सांगितलेल्या मार्गाने आपली हत्या केली तर त्यात कोणताही दोष नसे आणि त्याच्याबद्दल आशौच पाळावे लागे आणि त्याला उद्देशून पाणी द्यावे लागे आणि श्राद्ध करावे लागे. (महाप्रस्थांनाला निघणे इत्यादि गोष्टींचा कलिवर्ज्यात समावेश होतो).

जे लोक **शास्त्रसंमत नसलेल्या** कोणत्याही मार्गाने आत्महत्या करतात त्यांच्या मृत्यूनंतर एक वर्षाने **नारायण बलि** करावा लागे आणि त्यानंतर श्राद्धाचे विधि करण्यास प्रत्यवाय नसे. वृद्धयाज्ञ. (मिता-याज्ञ. ३·६). विष्णु ध. सू. मध्ये (हारलता पा. २१२) नारायणबलि हा विधी गाईनी आणि ब्राह्मणांनी मारलेल्या आणि पतित झालेल्या लोकांकरिताही करावा असे सांगितले आहे. तो विधि साप, वीज दाढायुक्त प्राण्यांकडून मारले गेलेल्या अथवा एखाद्या दूरच्या देशात मृत झालेल्या व्यक्तींकरिता अथवा यति आणि योगी ह्यांच्याकरिता करावयास सांगितला आहे. नारायणबलीच्या विधीची निरनिराळी वर्णने निरनिराळ्या ग्रंथांत केली आहेत.

गाई आणि ब्राह्मण ह्यांच्याकरिता मारले गेलेले, राजाच्या क्रोधामुळे मरण आलेले, युद्धात मरण पावलेले अशा लोकांबद्दल (ह्यांच्या सपिंडांना) आशौच पाळावे लागत नाही. ज्या मनुष्याने जिवंतपणी आपले स्वतःचे श्राद्ध केले असेल त्याच्या बाबतीत त्याच्या सपिंडांनी आशौच पाळू नये अथवा पाळावे. ब्रह्मचाऱ्याच्या मृत्यूनंतर आशौच पाळावे लागते. आणि युद्धात मरण पावलेल्या करिता आशौच नसते असे जरी सर्व धर्मग्रंथात सांगितले असले तरी निदान ब्राह्मणांमध्ये तरी शिष्टांची रूढि आशौच पाळण्याची आहे असे धर्मसिंधूमध्ये (पा. ४४९) सांगितले आहे.

पराशराने (३·१२-१३) असा नियम सांगितला आहे की जर एखादा मनुष्य पुष्कळ वर्षे दूर देशात गेला असला आणि तो त्या ठिकाणी मृत झाल्याचा शोध लागला परंतु त्याच्या मृत्यूची निश्चित तिथी कळली नसली तर अशा परिस्थितीत कृष्ण पक्षातील अष्टमी अथवा एकादशी अथवा अमावास्या, ह्यांपैकी कोणती तरी एक तिथि त्याची मृत्युतिथि गृहीत धरावी आणि पाणी, पिंड त्या तिथीला द्यावे आणि श्राद्ध त्या तिथीला करावे. उलटपक्षी अशा परिस्थितीत और्ध्वदेहिक विधी त्यानंतर येणाऱ्या कृष्ण पक्षातील एकादशीच्या दिवशी करावे असे लघुहारीताने (शुद्धि कौ. पा. १७) म्हटले आहे.

आशौचाच्या बाबतीत देशाचार पाळला पाहिजे असे निबंधग्रंथांनी विशेष आवर्जून सांगितले आहे.

आशौचाची मुदत पुरी झाल्यावर आशौच पाळीत असणाऱ्या मनुष्याने गावाबाहेर जावे, श्मश्रु करवावी, अंगाला तिळाचे अथवा पांढऱ्या मोहऱ्यांचे उटणे लावून स्नान करावे, वस्त्रे बदलावी आणि नंतर

घरात प्रवेश करावा. त्यानंतर त्याने **एक शांति करावी आणि ब्राह्मणांचा सत्कार करावा असे विष्णु.** ध. सू. (१९·१८-१९) सांगितले आहे. इतर ग्रंथांत ह्यापेक्षा अधिक विस्तृत कार्यक्रम सांगितला आहे. हारलता प्रभृति ग्रंथांत सांगितले आहे की शांतोदक शिंपडल्याखेरीज आशौच पूर्णपणे दूर होत नाही.

समाजाच्या बदललेल्या परिस्थितीत प्रस्तुत ग्रंथकाराची अशी शिफारस आहे की **जनना**शौचाच्या बाबतीत फक्त मातेने दहा दिवसपर्यंत आशौच पाळावे आणि दुसऱ्या कोणालाही जननाशौच पाळावे लागू नये. हा नियम प्राचीन स्मृतींना सामान्यतः धरून आहे.

**मृताशौचाच्या** बाबतीत पुढील चार नियम सामान्यतः पुरेसे व्हावे.

(१) **दहा** दिवसाचे आशौच पिता आणि माता ह्यांनी पुत्राच्या बाबतीत आणि पुत्राने माता आणि पिता ह्यांच्या बाबतीत, तसेच पति आणि पत्नी ह्यांनी परस्परांच्या बाबतीत पाळावे आणि जो कोणी एखाद्याचे दहन आणि और्ध्वदेहिक संस्कार करील त्याने पाळावे; (२) मृताच्या जवळ एकत्र कुटुंबात राहणाऱ्या इतरांना **तीन** दिवस आशौच पुरे व्हावे; (३) मृताच्या इतर सर्व नातलगांच्या बाबतीत मृत्यूनंतर एक वर्षाच्या आत जेव्हा त्यांना मृत्यूची वार्ता कळेल तेव्हा फक्त **स्नान** केल्यास पुरेसे व्हावे; (४) मृत्यूची वार्ता मृत्यूनंतर एक वर्षाहून अधिक काळानंतर नातलगांना कळेल तर पहिल्या नियमात उल्लेख केलेल्या व्यक्तीखेरीज इतर कोणाही नातलगांना **स्नान करण्याचीही आवश्यकता नसावी** आणि पहिल्या नियमात सांगितलेल्या व्यक्तींची **स्नान** केल्याने शुद्धि व्हावी.

आता आशौचानंतर येणारी शुद्धि **वगळून इतर प्रकारच्या शुद्धीसंबंधी** विचार करू. ही शुद्धि दोन प्रकारची असते. एक **शरीरशुद्धी** आणि दुसरी **बाह्य पदार्थाची शुद्धी** (मनु. ५·११०; अपरार्क पा. २५३). ऋग्वेदात देखील शूद्धि आणि शुचि असणे ह्यांना फार महत्त्व दिले असल्याचे दिसून येते. यज्ञात वापरावयाची पात्रे आणि हवन करावयाचे पदार्थ ह्यांच्या शुद्धतेच्या बाबतीत फार काळजी घेण्यात येत असे. आठ आत्मगुणांपैकी (म्हणजे आत्म्याच्या गुणांपैकी) **शौच** हा एक आहे. (गौ. ८·२४). हरदत्ताने उद्धृत केलेल्या एका श्लोकात द्रव्याची शुद्धता, मानसिक शुद्धता, शारीरिक शुद्धता आणि वाणीची शुद्धता असे चार प्रकारचे शौच सांगितले आहे. सर्व प्रकारच्या शुद्धीमध्ये **मानसिक शुद्धि सर्वश्रेष्ठ** असते असे मनूने (५·१०६) सांगितले आहे.

प्राचीन आणि मध्ययुगीन काळचे भारतातील लोक प्रत्येकाने दिवसातून **एकदा स्नान** करण्याचा आग्रह करीत असत आणि काही विशिष्ट प्रसंगी दिवसातून **दोन वेळा** आणि **तीन वेळा** स्नान करण्याचीही ते शिफारस करीत असत. आप. श्रौतामध्ये (२·१२) असे सांगितले आहे की ज्या मनुष्याला शुद्धि प्राप्त व्हावी अशी इच्छा असेल त्याने **पवित्रेष्टि** करावी आणि जर कोणी मनुष्याने प्रत्येक ऋतूमध्ये वैश्वानरी, व्रातपती आणि पवित्रेष्टि अशा तीन इष्टि केल्या तर तो (आपल्या कुलांतील) दहा पिढ्यांना पवित्र करतो.

**द्रव्यशुद्धि म्हणजे वस्तूंची शुद्धता**. ह्या बाबतीत काही सर्वसामान्य नियम आहेत. बालकाला काही वयापर्यंत अथवा काही विशिष्ट संस्कार होईपर्यंत रजस्वला स्त्रीच्या स्पर्शाने अपवित्रता येत नाही (आप. ध. सू. २·६१५ १७-२०) काही वस्तु अथवा गोष्टी नेहमी पवित्र असतात. उदाहरणार्थ, जे पाण्यान धुतले असेल अथवा (संशय उत्पन्न झाल्यास) ब्राह्मणांनी ते पवित्र असल्याचे स्पष्टपणे सांगितले असेल आणि जे एखाद्या अशुद्ध पदार्थाने अशुद्ध झाल्याचे दृष्टीस पडले नसेल ते पदार्थ नेहमी पवित्र असतात (मनु ५·१२७-१३३).

काही विशिष्ट पक्षी आणि पशु नेहमी शुद्ध असतात अथवा त्यांच्या शरीराचे काही विशिष्ट भाग नेहमी शुद्ध असतात. उदाहरणार्थ, याज्ञ. ने (१·१९४) म्हटले आहे की बकऱ्याची आणि घोड्यांची तोंडे शुद्ध असतात परंतु गाईच्या मुखाव्यतिरिक्त इतर भागच शुद्ध असतात. अत्रीने [मक्षिका सन्ततिर्धारा भूमिस्तोय हुताशनः|
मर्जारश्चैव दर्वी च नकुलश्च सदा शुचिः ॥
अत्रि (५·१३)] (५·१३) सांगितले आहे की माशी, मांजर आणि मुंगूस हे प्राणी, कोणत्याही पातळ पदार्थाचा अखंड प्रवाह, पृथ्वी, पाणी, अग्नि, लाकडाची पळी हे नेहमी शुद्ध असतात.

ज्याच्या योगाने एखाद्या पदार्थातील स्वाभाविक अथवा दुसऱ्या अशुद्ध पदार्थाच्या संसर्गाने आलेला मल (अशुद्धता) दूर होतो त्याला त्या पदार्थाची **शुद्धि करणारा** असे समजावे असे शंखाने (अपरार्क पा. २५६) म्हटले आहे. पाणी, माती, रिठ्याच्या फळांची पूड, (अथवा पाणी घालून केलेले मिश्रण), बेलफळ, तांदूळ आणि मोहरीची पेंड, क्षार (राखाडी), गोमूत्र आणि गोमय हे पदार्थ (अशुद्ध झालेल्या) सर्व वस्तूंची शुद्धिकारक असतात असेही शंखलिखित स्मृतीत (चतुर्वर्ग खं. ३ भा १ पा ८१७) म्हटले आहे. मनु. (५·११८) प्रभृतींनी असा नियम सांगितला आहे की बरेच धान्य अथवा कपडे अपवित्र झाले असतील त्यावेळी त्यांच्यावर पाणी शिंपडल्याने ते धान्य अथवा ते कपडे शुद्ध होतात. परंतु एखाद्या मनुष्याला उचलून नेता येण्यासारखे थोडे धान्य अथवा कपडे असल्यास ते पाण्याने धुतले पाहिजेत. देवलाने (अपरार्क पा. २७०) शौच ह्या शब्दाची व्याख्या अशी दिली आहे की शौच म्हणजे एखाद्या पदार्थाला लागलेला अशुद्ध करणारा लेप, ओषटपणा आणि वास, माती, पाणी, शेण हांच्यासारख्या वस्तूंचा उपयोग करून काढून टाकणे.

निरनिराळ्या पदार्थांची शुद्धि कशी होते ह्यासंबंधी विस्तृत नियम निरनिराळ्या ग्रंथांत सांगितले आहेत. उदाहरणार्थ, गौतम ध. सू. मध्ये (१·२८·३३) दिलेल्या नियमात असे सांगितले आहे की धातूचे पदार्थ घासण्याने, मातीची भांडी अग्नीत भाजण्याने, लाकडी जिन्नस वरचा भाग छिनून काढण्याने, कापड अथवा सूत पाण्यात धुतल्याने शुद्ध होतात. भूमीच्या शुद्धीच्या बाबतीत मनूने (५·१२४) अशी भूमि केरसुणीने झाडल्याने, शेणाने सारविल्याने, पाणी शिंपडल्याने, खणून काढल्याने आणि त्या जागेवर एक अहोरात्र गाई बांधल्याने शुद्ध होते असे सांगितले आहे.

देवालयातील मूर्ती चांडालासारख्याच्या स्पर्शाने अपवित्र झाली असली अथवा अग्नीने जळली असली अथवा ब्राह्मणाचे रक्त पडून अपवित्र झाली असली तर त्या मूर्तीची पुनःप्रतिष्ठा करावी असे निर्णयसिंधूमध्ये (३ पूर्वार्ध पा. ३५१-५२) म्हटले आहे. अपवित्र झालेल्या मूर्ती ज्या पदार्थांच्या केलेल्या असतील ते पदार्थ ज्या प्रकाराने शुद्ध करतात त्या प्रकाराने शुद्ध कराव्या आणि नंतर त्यांची पुनः प्रतिष्ठा करावी असे विष्णु. ध. सू. (२३·३४) मध्ये सांगितले आहे.

एखाद्या ब्राह्मणाच्या घरातील, देवालयातील आणि गाईच्या गोठ्यातील जमीन (अशुद्ध झालेली नसल्यास) नेहमी शुद्ध असल्याचे समजावे असे यमाने म्हटले आहे. एखादे घर अशुद्ध झाले असल्यास ते कसे शुद्ध करावे ह्याविषयी विस्तृत नियम निरनिराळ्या ग्रंथांनी दिले आहेत. याज्ञ. ने (१·१८७) म्हटले आहे की एखादे घर अशुद्ध झाले असेल तर झाडल्याने आणि शेणाने सारविल्यामुळे शुद्ध होते. परंतु जर एखादा कुत्रा, शूद्र, पतित, म्लेच्छ अथवा चांडाल एखाद्या ब्राह्मणाच्या घरात मरण पावला तर ते घर निरनिराळ्या मुदतीपर्यंत रिकामे ठेवावे आणि त्याशिवाय त्यानंतर घर शुद्ध करण्याकरिता निरनिराळे प्रकार करावे असे संवर्ताने म्हटले आहे (अपरार्क पा. २६५).

पाण्याच्या शूद्धीसंबंधीही स्मृतिग्रंथांत आणि निबंधग्रंथांत बरेच विवेचन करण्यात आले आहे. उदाहरणार्थ, आप. ध. सू. (१·५·१५·२) मध्ये असा सामान्य नियम सांगितला आहे की जमिनीवर साचलेल्या पाण्याने आचमन केल्याने मनुष्य शुद्ध होतो. परंतु. बौधा. (१·५·६५); याज्ञ. (१·१९२) प्रभृतींनी आणखी असे सांगितले आहे की जर जमिनीवर साचलेले पाणी एखाद्या गाईची तहान भागेल इतके असेल, ते एखाद्या अशुद्ध पदार्थाच्या योगाने ते दूषित झाले नसेल आणि त्याला पाण्याची स्वाभाविक चव, रंग, वास असेल तर ते शुद्ध असते. देवलाने (अपरार्क-या. १·१९२) म्हटले आहे की स्वच्छ पात्रातून आणलेले पाणी शुद्ध असते परंतु जर ते एक अथवा अधिक रात्रीपर्यंत राहिले (म्हणजे साठवून ठेवल्यामुळे शिळे झाले) तर ते फेकून द्यावे. जे पाणी कोणालाही ढवळता येत नाही ते आणि डोंगरातून वाहणाऱ्या झऱ्यातील पाणी ह्यांना कोणताही दोष नसतो. [अक्षोभ्यानि तडागानि नदीवापीसरांसि च।
चण्डालाद्यशुचिस्पर्शे तीर्थतः परिवर्जयेत्।
अक्षोभ्याणामपां नास्ति प्रस्रुतानां च दूषणम् ॥
—देवल (अपरार्क पा २७२).] (देवल-अपरार्क पा. २७२)

बृहस्पतीने (अपरार्क पा. २७२) असा नियम सांगितला आहे की जर एखाद्या विहिरीत पाच नखे असणाऱ्या प्राण्याचे (मनुष्याचे अथवा पशूचे) प्रेत सापडले अथवा इतर कोणत्याही कारणांनी ती विहीर अत्यंत अशुद्ध झाली असेल तर त्या विहिरीतील सर्व पाणी बाहेर काढावे आणि ती कपड्याने पुसून कोरडी करावी आणि त्यानंतर जर ती विहीर पक्कया विटांनी बांधली असेल तर तिच्या भिंतींना अग्नीच्या ज्वाला चाटवाव्या आणि नवे (झऱ्यातून) पाणी येऊ लागले म्हणजे पंचगव्य ओतावे. आपस्तंबाने (शुद्धि. कौ. पा. २९९) म्हटले आहे की प्रेत पडण्यासारख्या कृत्यामुळे अशुद्ध झालेल्या विहिरीतील १०० कलश भरून पाणी बाहेर काढावे आणि जर त्यापेक्षाही अधिक पाणी त्या विहिरीत असेल तर त्या पाण्यात पंचगव्य ओतून शुद्धि करावी.

पराशराने (७·३४) असे सांगितले [रथ्याकर्दमयोतानि नावः पन्थास्तृणानि च।
मरुतार्केण शुध्यन्ति पक्वेष्टकचितनि च ॥
—पराशर (७·३४).] आहे की रस्त्यावरील चिखल, आणि पाणी, नावा, रस्ते, गवत आणि भाजलेल्या विटांनी बांधलेली कोणतीही वस्तु ह्यांची शुद्धि वारा आणि सूर्य ह्यांच्या योगाने होते.

पाणपोईतील पाणी अथवा कोणाच्याही उपयोगाकरिता विहिरीजवळ ठेवलेल्या कलशातील पाणी आणि कातड्याच्या पिशवीतून (पखालीतून) आणलेले पाणी अथवा कोणाच्याही उपयोगाकरिता ठेवलेल्या दगडाच्या अथवा लाकडाच्या डोणीतील पाणी हीं पिण्यास अयोग्य असतात, परंतु **आपत्तीत** सापडलेल्या मनुष्याने असे पाणी देखील त्याला वाटेल तितके प्राशन करण्यास प्रत्यवाय नाही. (यम - अपरांर्क पा. २७३).

निरनिराळ्या धातूंच्या शुद्धीकरणासंबंधी निरनिराळ्या ग्रंथांनी नियम सांगितले आहेत परंतु त्याबद्दल सर्व ग्रंथांची एकवाक्यता नाही. मनूने (५·११३ प्रभृति) म्हटले आहे की (सुवर्णासारखे) धातु, (पाचेसारखी) रत्ने, आणि पाषाणाचे बनविलेले सर्व पदार्थ ह्यांची शुद्धि राखाडी, पाणी आणि चिखल ह्यांनी होते. सुवर्ण आणि चांदी ह्यांना थोडेसे मालिन्य आले असल्यास पाण्याने आणि अतिशय मालिन्य आले असल्यास त्यांची शुद्धी अग्नीने होते. तांबे, लोखंड, कांसे प्रभृति धातूंची शुद्धि (ज्या प्रकारचा अशुद्धपणा आला असेल त्याला अनुसरून) क्षार, अम्ल आणि पाणी ह्यांच्या साहाय्याने करावी. वसिष्ठाने (३·५८,

६१-६३) म्हटले आहे की कांसे राखेने शुद्ध होते, सुवर्ण आणि चांदी फक्त पाण्याने शुद्ध होतात आणि तांबे अम्लाच्या साहाय्याने शुद्ध होते.

नेहमी वापरण्यात येणारी भांडी आणि पात्र अशुद्ध झाल्यास कशी शुद्ध करावी ह्याबद्दलही विस्तृत नियम सांगितले आहेत. उदाहरणार्थ, शुद्धिप्रकाश (पां. ११७-११८) ह्या ग्रंथात उद्धृत केलेल्या एका अवतरणात म्हटले आहे की, सुवर्ण, चांदी, शंख, पाषाण, रत्न, कांसे, पितळ, जस्त, शिसे, यांची बनविलेली पात्रे नुसत्या पाण्याने शुद्ध होतात, मात्र त्यात मळ अथवा अशुद्ध पदार्थ चिकटून राहिलेला नसला पाहिजे; जर अशी पात्रे उच्छिष्ट अन्न अथवा त्यासारख्या पदार्थाच्या संसर्गाने अपवित्र झाली असतील तर ती राख आणि पाणी, अथवा अम्ल पदार्थ आणि पाणी ह्यांच्या साहाय्याने शुद्ध करण्यात येतात, जर अशी पात्रे शूद्रांनी वापरल्यामुळे अथवा उच्छिष्ट अन्नाच्या संसर्गाने दीर्घ काळपर्यंत अपवित्र झाली असतील तर ती पहिल्याने क्षाराने (राखेने) आणि पाण्याने तीन वेळा घासावी नंतर (भग्न न होता, न वितळता अथवा जळून न जाता) जितका वेळपर्यंत अग्नीत राहू शकतील तितका वेळ अग्नीत ठेवावी आणि नंतर ती शुद्ध होतात. ह्याशिवाय अशी अपवित्र पात्रे जमिनीत पुरून ठेवावी, अथवा तापवावी, अथवा दीर्घ काळपर्यंत गोमूत्रात अथवा एखाद्या मोठया नदीच्या पाण्यात बुडवून ठेवावी असे निरनिराळे मार्गही सांगितले आहेत. धातूची पात्रे दीर्घकाळपर्यंत अशुद्ध पदार्थांच्या संपर्काने अपवित्र झाली असतील तर ती पुन्हा घडविल्याने (म्हणजे नवीन तयार केल्याने) शुद्ध होतात.

लाकडाची अथवा मातीची पात्रे अतिशय अपवित्र झाल्यास टाकून द्यावी; (विष्णु. २३·२ आणि ५) परंतु लाकडाची पात्रे किंचित् प्रमाणावर अशुद्ध झाली असतील तर ती रंधल्याने अथवा तासल्याने शुद्ध होतात अथवा माती, शेण अथवा पाणी ह्यांच्या साहाय्याने शुद्ध होतात आणि मातीची पात्रे अतिशय अपवित्र झाली नसतील तर अग्नीत भाजून काढल्याने शुद्ध होतात. (देवल शुद्धिप्रकाश पा. ११८).

श्रौतयज्ञात वापरावयाची यज्ञपात्रे आणि उपकरणी शुद्ध करण्यासंबंधी विशेष नियम सांगितले आहेत. वेदामध्ये असे सांगितले आहे की चमस- पात्रातून सोमरस प्राशन केला असेल तर त्यांना उच्छिष्टाचा दोष लागत नाही. मनूने (५·११६-११७) म्हटले आहे की यज्ञपात्रे प्रथमतः उजव्या हाताने (अथवा दर्भांनी) चोळावी आणि नंतर चमस आणि चषक (फुलपात्रे) यज्ञात पुन्हा उपयोगात आणण्यापूर्वी पाण्याने धुवावी; चरुस्थाली, स्रुच् ही पात्रे गरम पाण्याने धुतल्यास शुद्ध होतात; स्फ्य, सूप, गाडी, उखळ आणि मुसळ ही उपकरणे पाण्याने (अथवा याज्ञ. च्या मताने पाणी शिंपडल्याने) शुद्ध होतात.

अपवित्र झालेले धान्य आणि शिजलेले अन्न शुद्ध करण्यासंबंधी अनेक नियम सांगितले असून ते व्यावहारिक ज्ञान, सोय आणि नुकसान ह्यांचा विचार करून घातलेले आहेत. उदाहरणार्थ, विष्णूने (२३·२५) असे सांगितले आहे की जेव्हा भाताची (अथवा दुसऱ्या एखाद्या धान्याची) रास अपवित्र झाली असेल तेव्हा त्या राशीमधील जेवढा भाग प्रत्यक्ष अशुद्ध झाला असेल तेवढा काढून टाकावा आणि बाकीचे धान्य कुटावे आणि पाण्याने धुवावे; एक द्रोण परिमाणापेक्षा अधिक शिजलेले अन्न अपवित्र झाले तर त्याला मुळीच दोष लागत नाही परंतु प्रत्यक्ष घाण झालेला भाग तेवढाच फेकून द्यावा आणि बाकीच्या अन्नावर सुवर्ण टाकलेले आणि गायत्री मंत्र जप केलेले पाणी शिंपडावे आणि ते अन्न एका बकरीच्या दुष्टीसमोर धरावे आणि अग्नीही त्या अन्नाच्या जवळ आणावा. आप. ध. सू. (१,५·१६·२४-२९) मध्ये असा नियम सांगितला आहे की ज्या अन्नात (पूर्वीच) केस असतील अथवा (नखांसारखे) दुसरे काही अशुद्ध पदार्थ असतील अथवा ज्यात अशुद्ध पदार्थावर उपजीविका करणारा एखादा जंतु असेल अथवा जे अन्न कोणी पायाने

तुडविले असेल अथवा ज्यात उंदराची विष्टा अथवा एखादा अवयव सापडला असेल ते अन्न भक्षण करू नये. शुद्धिप्रकाश ह्या ग्रंथात म्हटले आहे की एक द्रोणापेक्षा अधिक असणारे अन्न धनिकांनी फेकून देऊ नये आणि एक आढकापेक्षा अधिक असणारे अन्न गरीब लोकांनी फेकून देऊ नये.

द्रव पदार्थ (तेल, तूप इत्यादी) अल्प प्रमाणात असल्यास त्यांची शुद्धि दोन कुशाच्या काड्या त्यात बुडविल्याने अथवा एखाद्या वस्त्रावरून दुसऱ्या पात्रात गाळून घेतल्याने होते आणि जर त्यांचे प्रमाण मोठे असेल तर त्यांच्यावर पाणी शिंपडल्याने त्यांची शुद्धि [द्रवाणां चैव सर्वेषां शुद्धिरुत्पवनं स्मृतम्।
प्रोक्षणं संहतानां च दारवाणां च तक्षणम् ॥
–मनु (५·११५).] होते. (मनु ५·११५). हिंगासारखे चीक अथवा डिंक, गूळ, क्षार, केशर, लोकर, कापूस ह्यांच्या बाबतीत केवळ प्रोक्षणाने शुद्धि होते. (शंख). कच्चे मांस, मध तूप इत्यादि पदार्थ एखाद्या चांडालाच्याही पात्रात असले तरीदेखील त्या पात्रातून दुसऱ्या पात्रात ओतून घेतल्याबरोबर शुद्ध होतात. (चतुर्विशति मत).

शुभ्र वर्णाचे वस्त्र कमरेभोवती अथवा उत्तरीय म्हणून वापरीत असताना ते कोणाच्याही स्पर्शाने अपवित्र होत नाही आणि अशी दोन्ही प्रकारची वस्त्रे अंगावर असताना भोजन करण्यास अथवा मलमूत्र विसर्जन करण्यास प्रत्यवाय नसतो (लघु आश्वलायन १·२८-३०); त्रसराचे वस्त्र धुतल्याने शुद्ध होते आणि रेशमी वस्त्र सर्वदा शुद्धि असते. पराशराने (७·२८) म्हटले आहे की बांबू आणि झाडाच्या साली ह्यांची बनविलेली वस्त्रे, तागाची आणि कापसाची वस्त्रे लोकरीची वस्त्रे, आणि भोजवृक्षाच्या सालीची वस्त्रे केवळ प्रोक्षणानेच शुद्ध होतात.

वनस्पति, मुळे आणि फळे ह्यांची शुद्धि धान्यासारखी करण्यात येते. शंख, शिंगे, हाडे आणि (हत्तीच्या अथवा डुकराच्यासारख्या जनावरांचे) सुळे ह्यांची शुद्धि तागाच्या कपड्यांच्या सारखी (म्हणजे पांढऱ्या मोहरीच्या गंधाच्या साहाय्याने) अथवा गोमूत्राने अथवा पाण्याने करण्यात येते (मनु ५·१२०-१२१).

प्राचीन काळचे आणि मध्ययुगीन काळचे भारतीय लोक मन, शरीर, धार्मिक विधि करावयाचे स्थळ, वापरावयाची वस्त्रे, पात्रे आणि खाण्याच्या पदार्थातील घटक आणि देवतार्चनात लागणाऱ्या पदार्थातील घटक ह्यांच्या शुद्धीला अत्यंत महत्त्व देत असत. द्रव्यशुद्धीसंबंधीचे काही काही नियम आधुनिक काळच्या लोकांना अतिशय कडक वाटण्याचा संभव आहे; तथापि ही गोष्ट विसरता कामा नये की प्राचीन काळच्या भारतीयांच्या मनात अन्नाच्या शुद्धतेमुंळे विचाराची शुद्धि उत्पन्न होत असते ('आहारशुद्धौ सत्त्वशुद्धिः' छां. उ. ७·२६·२ आणि हारीत) ही कल्पना बिंबलेली होती. शुद्धीकरणासंबंधीचे (धान्याच्या मोठ्या राशी संबंधीच्या अथवा शिजलेल्या अन्नाच्या राशीसंबंधीच्या नियमांसारखे) त्यांचे नियम व्यावहारिक बुद्धि आणि सोय ह्यांच्या आधारावर घातलेले होते हे मान्य होण्यासारखे आहे. कोणत्या ठिकाणी आणि कोणत्या परिस्थितीत अन्न भक्षण करावे ह्यांच्या बाबतीत आम्ही बहुधा दुसऱ्या टोकाकडे जात आहो.

# खंड ४

# विभाग ३ रा

# प्रकरण ९

## श्राद्ध

(मू. ग्रं. पा. ४/३३४-५१५)

हा विषय अनेक दृष्टीने फार व्यावहारिक महत्त्वाचा आहे.

धर्मशास्त्रावरील निरनिराळ्या ग्रंथांत श्राद्धाच्या व्याख्या दिल्या आहेत. ब्रह्मपुराणात [देशे काले चपात्रेच श्रद्धया विधिना च यत्।
पितृमुदिश्य विप्रेभ्यो दत्तं श्राद्धमुदाहृतम् ॥
—ब्रह्मपुराण (परा.माध. १·२ पान २९९)] (परा. मा. १·२ पा. २९९) असे म्हटले आहे की "पितरांना उद्देशून (त्यांच्या हिताकरिता) जे जे काही योग्य काळी, योग्य स्थळी, सत्पात्र व्यक्तींना आणि ब्राह्मणांना धर्मशास्त्रात सांगितलेल्या विधीला अनुसरून श्रद्धापूर्वक देण्यात येते त्याला श्राद्ध म्हणतात." याज्ञ. ने (१·२६८) म्हटले आहे की पितर म्हणजे श्राद्धामध्ये देवता असणारे वसु, रुद्र आणि आदित्य श्राद्धाच्या योगाने संतुष्ट होऊन मनुष्यांच्या पूर्वजांना संतोष देतात. ह्या श्लोकापासून असे समजावयाचे असते की श्राद्ध करणाऱ्याचे तीन पूर्वज-पिता, पितामह आणि प्रपितामह ह्यांचे श्राद्धामध्ये अनुक्रमे त्या त्या पितरांच्या अधिष्ठात्र्या देवता ज्या वसु, रुद्र आणि आदित्य ह्यांच्याशी ऐक्य असते.श्राद्ध ह्या शब्दाने होम, पिंडदान आणि निमंत्रित ब्राह्मणांचे समाधान ह्या तीन गोष्टींचा बोध होतो आणि ह्या तिहींपैकी कोणत्यातरी एका गोष्टीला गौण अर्थाने '**श्राद्ध**' हा शब्द लावला जातो.

कर्म, पुनर्जन्म आणि कर्मविपाक ह्यांच्या सिद्धांतावर पूर्ण श्रद्धा असणाऱ्याला त्या सिद्धांताचा आणि श्राद्धाच्या मूलभूत कल्पनेचा म्हणजे मृत पितरांना भाताचे पिंड अर्पण केल्याने त्या मृतांच्या आत्म्यांना संतोष होतो ह्या भावनेचा समन्वय करणे फार कठीण जाईल. पुनर्जन्माच्या सिद्धांताप्रमाणे एक शरीर सोडणारा आत्मा दुसऱ्या आणि नव्या शरीरात प्रवेश करीत असतो. परंतु तीन मृत पूर्वजांना भाताचे पिंड अर्पण करण्याच्या सिद्धांताप्रमाणे त्या मृत पूर्वजांचे आत्मे ५० अथवा १०० वर्षे लोटून गेली तरीदेखील अतिवाहिक देहाने त्या पिंडांच्या वासाचा अथवा सुगंधाचा उपभोग घेण्यास पात्र असावे लागतात. मत्स्य पुराणात (१९·३-९) अशा स्वरूपाच्या प्रश्नाला उत्तर देताना म्हटले आहे की पिता, पितामह आणि प्रपितामह हे वेदवचनांप्रमाणे अनुक्रमे वसु, रुद्र आणि आदित्य ह्यांच्याशी एकरूप झालेले असतात. श्राद्धात उल्लेख केलेले नाव आणि गोत्र, उच्चारलेले मंत्र आणि श्रद्धा ह्यांच्या योगाने श्राद्धात अर्पण केलेल्या आहुती पितरांकडे नेल्या जातात, जर एखाद्याचा पिता (आपल्या पुण्य कर्मांच्या योगाने) देव झाला असेल तर श्राद्धामध्ये अर्पण केलेल्या अन्नाचे अमृत होते आणि त्या देवस्वरूप झालेल्याला ते मिळते, जर तो असुर झाला असेल तर ते अन्न निरनिराळ्या उपभोगांच्या रूपांने त्याला मिळते, जर तो पशु झाला असेल तर ते अन्न त्याच्याकरिता गवताचे रूप घेते आणि जर तो सर्प झाला असेल तर ते अन्न वायुरूप घेऊन त्याच्या सेवेला हजर राहते. विश्वरूपाने (याज्ञ. १·२·६५) असे उत्तर दिले आहे की ही बाब सर्वस्वी शास्त्रावर अवलंबून आहे आणि ज्यावेळी श्राद्ध केल्याने पितर संतुष्ट होतात. आणि करणाऱ्याला इष्ट फल प्राप्त होते

असे शास्त्रात सांगितलेले असते त्यावेळी त्याविरुद्ध कोणतीही शंका काढता कामा नये. विश्वरूपाने असेही म्हटले आहे की वसुप्रभृति देवांना सर्वत्र संचार करण्याची शक्ति असल्यामुळे पितर जेथे कोठे असतील तेथे त्यांना संतुष्ट करण्यास ते समर्थ असतात. मागाहूनच्या काळात झालेल्या ग्रंथकारांनी अशी शंका घेणाऱ्याला नास्तिक म्हटले आहे तसे विश्वरूपाने म्हटले नाही.

ह्यासारखेच खुलासे निरनिराळ्या ग्रंथकारांनी दिले आहेत परंतु ते समाधानकारक वाटत नाहीत. श्राद्ध ही संस्था फार प्राचीन काळची असून पुनर्जन्म आणि कर्मविपाक हे सिद्धांत त्या मानाने अलिकडील काळातील असण्याचा फार संभव आहे आणि हिंदुधर्म हा सर्वसंग्राहक असल्या कारणाने त्याने परलोकासंबंधी सिद्धांत मान्य करताना श्राद्धसंस्था तशीच राखली असण्याचा संभव आहे. श्राद्धसंस्था एका दृष्टीने अत्यंत चांगली आहे. तिच्या योगाने जे आपले पूर्वज आणि नातलग जिवंत असताना आपल्यास प्रिय होते आणि निकट राहत होते त्यांचे स्मरण करण्याची एक संधि मिळते..

पितरांच्या अंगात जिवंत मनुष्यांचे हित अथवा अहित करण्याचे सामर्थ्य असते अशा प्रकारची कल्पना वेदांच्या काळी अस्तित्वात असल्याचे ऋग्वेदामधील (ऋ. १०·१५·६ इ.) उल्लेखांवरून आढळून येते. त्यामुळे प्राथमिक स्थितीत असणाऱ्या समाजांचे मृतांची पूजा करणे हे एक प्रमुख लक्षण बनले. अत्यंत प्राचीन काळी मृत पूर्वजांचा राग घालविण्याच्या उद्देशाने त्यांना उद्देशून काही पदार्थ अर्पण करण्याचा प्रघात पडला असेल आणि त्यांना उद्देशून काही विधि करण्यात येऊ लागले असतील आणि तो प्रघात आणि ते विधी पुढील काळात त्या मृत पूर्वजांविषयीच्या शुद्ध प्रेमाचे लक्षण म्हणून चालू राहिले असावे. पितरांच्या विषयी निरनिराळ्या कल्पना वेदांच्या नंतर झालेल्या ग्रंथांत व्यक्त करण्यात आल्या आहेत. उदाहरणार्थ, बौ. ध. सू. (२·८·१४) मध्ये एका ब्राह्मण ग्रंथातील वचनाचा असा सारांश दिला आहे की पितर पक्षांच्या स्वरूपात वावरत असतात. वायुपुराणात (७५·१३-१५) म्हटले आहे की पितर वायुरूपी देह धारण करून श्राद्धांत आमंत्रण केलेल्या ब्राह्मणांच्या देहात प्रवेश करितात आणि त्या ब्राह्मणांचा सत्कार केला गेला म्हणजे पितर संतुष्ट होतात. मत्स्यपुराणात (१८·५-७) असे सांगितले आहे की मृताला उद्देशून मृत्यूनंतर १२ दिवसपर्यंत अर्पण केलेले पिंड मृताला त्याच्या प्रवासात खाण्यास उपयोगी पडतात आणि त्याला फार संतोष देतात. मृत देहातून बाहेर पडणाऱ्या आत्म्याला मृत्यूनंतर १२ दिवसपर्यंत पितृ-लोकात नेण्यात येत नसून तो आपले घर, पुत्र, पत्नी ह्यांच्या आजूबाजूला घुटमळत असतो.

'पितृ' ह्या शब्दाचा अर्थ 'पिता' असा आहे. परंतु 'पितरः' हा शब्द दोन अर्थाने योजला जातो : (१) एखाद्या मनुष्याने तीन मृत पूर्वज आणि (२) मानव जातीचे अतिशय प्राचीन काळचे आणि एका स्वतंत्र लोकात वास करीत असल्याचे मानले जाणारे पूर्वज. ऋग्वेदामध्ये (१०·१५·१) पितरांचे कनिष्ठ, मध्यम आणि उच्चतर असे तीन प्रकार असल्याचे सांगून त्यांचे अंगिरस, वैरूप, अथर्वन्, भृगु, नवग्व आणि दशग्व असे निरनिराळे गट वर्णन केले आहेत. (ऋ. १०·१४·५-६). अनेक मंत्रात प्राचीन पूर्वज आणि सप्तर्षि हे एकच असल्याचे म्हटले असून केव्हा केव्हा नवग्व आणि दशग्व ह्यांनादेखील सप्तर्षी म्हटले आहे (ऋ. ४·४२·८ आणि ६·२२·२). पितरांना अर्पण केलेल्या आहुती अग्नि त्याच्याकडे वाहून नेतो. दहन केलेल्या व्यक्तीच्या आत्म्याला पितृलोकाला घेऊन जातो (ऋ. १०·१६·१-२ आणि ५); देहाचे दहन केल्यावर मृताच्या आत्म्याला एक वायुमय देह प्राप्त होतो आणिं तो यमाच्या आणि पितरांच्यां संगतीत राहतो (ऋ. १०·१४·१) इत्यादी कल्पना ऋग्वेदात आल्या आहेत. अंतरिक्ष हा यमाचा प्रदेश असून तेथे मृतांचे आत्मे एकत्र राहतात असेही ऋग्वेदात आणि तै. ब्रा. (१·३·१०·५) [तृतीये वा इतो लोके पितरः॥ —तै. ब्रा. (१·३·१०·५)] मध्ये वर्णन केले आहे.

पितरांचे सोमवन्तः, बहिषदः आणि अग्निष्वात्ताः असेही विभाग करण्यात येतात. ज्यांनी सोमयाग केलेला असतो ते **सोमवन्त,** ज्यांनी शिजलेल्या अन्नाच्या आहुती दिलेल्या असतात ते **बर्हिषद** आणि ज्यांनी ह्या दोहोपैकी एकही कृत्य केलेले नसते आणि दहन करतेवेळी ज्यांना अग्नीने भक्षण केलेले असते ते **अग्निष्वात्त** अशा व्याख्या शत. ब्रा. (२·६·१·७) मध्ये दिल्या आहेत. ह्याशिवाय निरनिराळ्या पुराणांत आणि स्मृतीमध्ये पितरांचे निरनिराळे गट सांगितले आहेत. पितर हे देवांपेक्षा भिन्न वर्गातील असल्याचे मानले जात असे. मनूने (३·२०१) म्हटले आहे की ऋषींपासून पितरांची उत्पत्ती झाली, पितरांपासून देवांची आणि मानवांची उत्पत्ती झाली आणि देवांपासून सर्व चराचर विश्वाची उत्पत्ती झाली. सर्वसाधारण नियम असा आहे की देवांच्या प्रीत्यर्थ करावयाच्या यज्ञाचा आरंभ मध्याह्न काळापूर्वी करावयाचा असतो आणि पितृयज्ञाचा प्रारंभ मध्याह्न काळानंतर करावयाचा असतो असे शांख्या. ब्रा. (५·५) मध्ये म्हटले आहे. शत. ब्रा. (२·१·३·४) मध्ये देवांना अमर म्हटले असून पितरांना मर्त्य म्हटले आहे. पितरांना देवांची काही काही लक्षणे लागतात अशीही वर्णने आढळतात. पितरांच्या ठिकाणी अतिश्रेष्ठ देवांच्या अंगात असणारे सामर्थ्य होते असे ऋग्वेदात (७·७६·४) म्हटले असून त्यांनी निरनिराळे वर द्यावे आणि आपले हित करावे ह्यासाठी प्रेम आणि आदरपूर्वक त्यांच्या प्रार्थना केल्या आहेत (ऋ. १०·१५·४). पितरांबद्दल भीतीचीही भावना अस्तित्वात होती आणि आमचा हातून घडलेल्या अपराधांबद्दल प्राचीन पितरांनी आणि देवांनी आम्हाला इहलोकी पीडा न द्यावी अशा प्रार्थना ऋग्वेदामध्ये (१०·१५·६) केल्या आहेत.

वेदांनंतरच्या ग्रंथांत आणि विशेषतः पुराणांत पितरांच्या उत्पत्तीविषयी आणि त्यांच्या प्रकारांविषयी बरीच माहिती दिलेली आहे. उदाहरणार्थ, वायु (५६·१८), वराह (१३·१६) प्रभृति पुराणात स्वर्गात राहणाऱ्या सात प्रकारच्या पितरांच्या उत्पत्तीबद्दल माहिती दिली असून त्यांपैकी चार प्रकारचे पितर **मूर्तिमत्** (साकार) असतात आणि तीन प्रकारचे पितर **अमूर्त** (निराकार) असतात असे म्हटले आहे.

सूत्रकालापासून (ख्रि. पू. ६०० च्या सुमारापासून) तों मध्ययुगीन कालातील सर्वात अलीकडील धर्मशास्त्रावरील ग्रंथांपर्यंत झालेल्या सर्व ग्रंथांच्या कर्त्यांनी **श्राद्ध** संस्थेचे महत्त्व अथवा श्राद्धापासून प्राप्त होणारे लाभ ह्यांची अतिशय प्रशंसा केली आहे. ह्या ग्रंथामधील सर्वात प्राचीन असणाऱ्या आप. ध. सू. (२·७·१६·१-३) ह्या ग्रंथात श्राद्दाच्या उत्पत्तीबद्दल पुढील मनोरंजक माहिती दिली आहे : “प्राचीन काळी ह्या पृथ्वीवर मनुष्ये आणि देव एकत्र राहत असत. पुढे यज्ञांच्या योगाने देव स्वर्गलोकात गेले आणि मनुष्ये मागे पृथ्वीवर राहिली. नंतर मनुष्ये मागे राहिलेली पाहून मनूने **‘श्राद्ध’** संज्ञा असणारा एक विधी निर्माण केला अणि त्या विधीमुळे मनुष्य मात्रांची प्रवृत्ती मुक्तीकडे (अथवा सुखाकडे) होते. ह्या विधीमध्ये पितर ह्याच देवता असतात परंतु (ज्या अग्नीमध्ये देवांना आहुती अर्पण करतात त्या) आहवनीय अग्नीच्या ऐवजी (भोजन घातलेले) ब्राह्मण असतात.”

पिंडपितृयज्ञ, महापितृयज्ञ आणि अष्टका ह्या नावांच्या विधींचे उल्लेख जुन्या वेदवाङ्मयात आले असले तरी प्रत्यक्ष ‘श्राद्ध’ हा शब्द विश्वसनीय म्हणता येईल अशा प्राचीन वेदमंत्रात आढळत नाही. कठ उपनिषदात (१·३·१७) ‘श्राद्ध’ हा शब्द आला आहे. तथापि त्या व्यतिरिक्त श्राद्ध शब्दाचे उल्लेख फक्त सूत्रग्रंथात आले आहेत. ह्यावरून असे सयुक्तिक अनुमान काढता येते की पितरांसंबंधी फारच थोडे (वर उल्लेख केले आहेत तेवढेच) विधि प्राचीन काळी माहित होते आणि म्हणून पितरांसंबंधीच्या निरनिराळ्या विधींचा जिच्या योगाने बोध होईल अशा एका सर्वसामान्य संज्ञेची आवश्यकता फार प्राचीन काळापासून उत्पन्न झाली नाही. परंतु जेव्हा पितरांच्या प्रीत्यर्थ करा वयाच्या विधींची संख्या वाढली तेव्हा **‘श्राद्ध’** ही

सर्वसामान्य संज्ञा सुचली.

श्राद्ध ही संस्था ख्रि. पू. अनेक शतकांपासून चालत आली असून ज्या मनूला ऋग्वेदामध्ये मानवजातीचा आद्य जनक म्हटले आहे त्या मनूच्या इतकी प्राचीन आहे. निरनिरळ्या सूत्रग्रंथांत आणि पुराणांत श्राद्धापासून प्राप्त होणाऱ्या लाभांची जी वर्णने आली आहेत त्यातील काहींचा नमुन्याकरिता उल्लेख करू. पितरांकरिता केलेल्या विधींच्या योगाने दीर्घायुष्य, स्वर्ग, कीर्ति आणि वैभव ह्यांची प्राप्ती होते असे बौ. ध. सू. (२·८·१) मध्ये म्हटले आहे. जगाला श्राद्धापासून आधार मिळतो आणि श्राद्धापासून योग (मोक्ष) उत्पन्न होतो असे हरिवंश पुराणात (१·२१·१) सांगितले आहे. कूर्मपुराणात म्हटले आहे की अमावास्येच्या दिवशी पितर वायुरूप देह धारण करून आपण वास्तव्य केलेल्या पूर्वीच्या घराच्या दाराशी येतात आणि जो मनुष्य अमावास्येच्या दिवशी पाण्याने अथवा भाजीने देखील पितरांना श्राद्ध अर्पण करीत नाही त्याला शाप देऊन निघून जातात. श्राद्धापेक्षा अधिक श्रेयस्कर दुसरे काही नसते असे सुमंतूने म्हटले आहे.

'श्राद्ध' हा शब्द श्रद्धा ह्या शब्दापासून बनला आहे. श्राद्धांमध्ये श्राद्ध करणाऱ्याच्या मनामध्ये अशी दृढश्रद्धा अथवा विश्वास असतो की प्रेताच्या अथवा पितरांच्या संतोषाकरिता जे जे काही ब्राह्मणांना दिले असते ते ते त्या प्रेताला अथवा पितरांना कोणत्या तरी स्वरूपात पोचेल. ऋग्वेदामध्ये (१०·१५१ १-५) श्रद्धेला देवता कल्पून संबोधले आहे. धार्मिक कृत्यांच्या- (उपयुक्तते-) विषयी असणाऱ्या विश्वासाला श्रद्धा म्हणतात अशी व्याख्या [प्रत्ययो धर्मकार्येषु तथा श्रद्धेत्युदाहृता।
नास्ति ह्यश्रद्दधानस्य धर्मकृत्ये.प्रयोजनम्॥
—देवल (कृत्यरत्नाकर पा. १६).] देवलाने (कृत्यरत्ना. पा. १६) दिली आहे.

अत्यंत प्राचीन काळी मृत पूर्वजांच्या संबंधी जे तीनच विधी असत त्यांपैकी पिंड पितृयज्ञ आणि महापितृयज्ञ ह्या दोन विधींची वर्णने खंड २ मध्ये करण्यात आली आहेत. त्यांपैकी तिसरा विधी '**अष्टका**' ह्यासंबंधी थोडेसे विवेचन पुढे केले आहे.

'अष्टका' हा सात पाकयज्ञांपैकी पहिला असल्याचे आणि चाळीस संस्कारांपैकी एक असल्याचे गौतमाने (८·१९) सांगितले आहे. अष्टका ह्याचा अर्थ कोणत्याही महिन्यातील पौर्णिमेनंतर येणारी अष्टमी तिथी असा असावा असे शत. ब्रा.(६·४·२·१०) मधील वर्णनावरून दिसते. जैमिनीने (६·५·३२-३७) **एकाष्टका** असा शब्द वापरला असून ती माघ महिन्यातील पौर्णिमेनंतरची अष्टमी तिथी असल्याचे सांगितले आहे. काही गृह्यसूत्रात (आश्व. गृ. २·४·१) अष्टका दिवस (आणि विधि) चार असल्याचे वर्णन केले असून इतर काहींनी ती संख्या तीन असल्याचे म्हटले आहे. हे चार दिवस म्हणजे मार्गशीर्ष, पौष, माघ आणि फाल्गुन महिन्यातील कृष्ण पक्षातील अष्टमी हे असून काहींनी (मानव गृ. २·८·इ.) फाल्गुन अथवा मार्गशीर्ष वगळून तीनच अष्टका दिवस सांगितलें आहेत. ह्या सर्व अष्टकात मांस अर्पण करावयाचे असते. खादिर गृह्यात (३·४·१) एका गाईची हत्त्या करावयास सांगितले असून त्याबाबतीत मेंढी, बकरी अथवा गेंडा, हरीण इत्यादी अनेक पर्याय बोधायनाने (२·११·५१-६१) सांगितले आहेत. अष्टकाविधीची देवता कोणती ह्याबद्दल अतिशय मतवैचित्र्य आढळते. आश्व. गृह्यामध्ये (२·४८·१२) आठ पर्याय सांगितले आहेत. गोभिल गृह्यात (३·१०·१) अष्टकाची देवता रात्रि ही असल्याचे म्हटले आहे.

अष्टकाविधीच्या कार्यक्रमात तीन भाग असतात. ते म्हणजे होम, ब्राह्मणांना भोजनाकरिता आमंत्रण करणे (भोजनानंतर त्यांची बोळवणी करण्यापर्यंतचे विधि) आणि **अन्याष्टक्य** अथवा अन्वाष्टका नावाचा

विधि. ज्यावेळी अष्टका तीन अथवा चार मानल्या जात असत त्यावेळी हे सर्व विधि प्रत्येक अष्टकेमध्ये करण्यात येत असत. ज्यावेळी अष्टकाविधि फक्त एकाच महिन्यात म्हणजे माघ महिन्यातील पौर्णिमेनंतर करण्यात येऊ लागला त्यावेळी हे तीन विधि कृष्ण पक्षातील सप्तमी, अष्टमी आणि नवमी ह्या तीन दिवशी केले जात आणि ज्या वेळी त्या विधीचा संकोच एकाच दिवसात करण्यात आला त्यावेळी हे सर्व विधि त्याच दिवशी करीत असले पाहिजेत.

अष्टकाश्राद्धाचा कालांतराने लोप झाला आणि ती श्राद्धे सध्याच्या काळी करण्यात येत नाहीत.

आश्वलायन गृह्यामध्ये (२·५·९) '**माध्यावर्ष**' नावाच्या एका विधीचा उल्लेख केला आहे. तो विधी अष्टकासारखाच असतो परंतु काहींच्या मते तो भाद्रपद कृष्ण पक्षात त्रयोदशीच्या दिवशी करावयाचा असतो. विष्णु ध. सू० (७८·५२-५३) मध्ये देखील भाद्रपद कृष्ण त्रयोदशीच्या दिवशी करावयाच्या श्राद्धाची फार प्रशंसा केली आहे. ह्या विधीचे वास्तविक नाव **मांध्यवर्ष** अथवा **मधावर्ष** (म्हणजे पावसाळ्यात चंद्र मघा नक्षत्रात असताना करावयाचे श्राद्ध) असे असावे असे दिसते. ह्या प्राचीन काळच्या भाद्रपद कृष्ण त्रयोदशीला करण्यात येणाऱ्या विधीपासूनच बहुधा मागाहूनच्या काळातील **महालयश्राद्धाची** उत्पत्ती झाली असावी असे दिसते.

गोभिलगृह्यात (४·४·३) '**अन्वाहार्य**' नावाचे एक श्राद्ध सांगितले आहे. ते श्राद्ध पिंडपितृयज्ञाच्या नंतर त्याच दिवशी करावयाचे असे. मनूने (३·१२२-१२३) म्हटले आहे की पितृयज्ञ (म्हणजे पिंडपितृयज्ञ) केल्यानंतर आहिताग्नि ब्राह्मणाने प्रतिमासी अमावास्येच्या दिवशी '**पिंडान्वाहार्य**' नावाचा और्ध्वदेहिक यज्ञ करावा. सांप्रत काळी बहुतेक अग्निहोत्री (निदान दक्षिणेतील अग्निहोत्री) पिंडपितृयज्ञ मुळीच करीत नाहीत अथवा वर्षातून फक्त एकदा करतात आणि पिंडान्वाहार्य श्राद्ध कोणीही करीत नाही. त्याप्रमाणेच स्मार्त यज्ञांमध्ये आता कोणीही पशूंचे बलिदान करीत नाहीत तर **त्याऐवजी माष म्हणजे उडिदाच्या दाण्यांचा उपयोग** करतात. श्रौत यज्ञातदेखील मांसाची आहुती न देणारे परंतु पिष्टपशूचा (पशूच्या पिठाच्या प्रतिमेचा) उपयोग करणारे आहिताग्नि अस्तित्वात आहेत.

**श्राद्धाशी संबंध असणाऱ्या निरनिराळ्या बाबी.** ह्यातील पहिली बाब **श्राद्ध करण्याचा अधिकार** कोणाला असतो ही होय. विष्णु ध. सू. सारख्या काही ग्रंथांनी असा नियम सांगितला आहे की जो कोणी मृताची संपत्ती स्वीकारतो त्याने मृताला. उद्देशून पिंड दिले पाहिजेत (म्हणजे त्याच्या प्रीत्यर्थ श्राद्ध केले पाहिजे) आणि दुसऱ्या काही ग्रंथांत असे सांगितले आहे की ज्या कोणाकडे मृताला पिंड देण्याचा अग्राधिकार जात असेल त्याने त्या मृताची संपत्ती घ्यावी. गोभिल [न योषायाः पतिर्दद्यादपुत्राया अपि क्वचित्।
न पुत्रस्य पिताचैव नानुजस्य तथाग्रजः॥
—गोभिलस्मृति (३·७० आणि २·१०४)] स्मृतीत (३·७० आणि २·१०४) असा सर्वसाधारण नियम सांगितला आहे की पत्नी जरी अपत्यहीन मृत झाली तरीही पतीने तिला पिंड अर्पण करू नये, त्याचप्रमाणे पित्याने आपल्या पुत्राला अथवा वरिष्ठ भ्रात्याने कनिष्ठ भ्रात्याला पिंड देऊ नये. षट्त्रिंशन्मतामध्येही तसेच म्हटले आहे. (अपरार्क पा. ५३८). तथापि हा सर्वसाधारण नियम बाजूला सारून कोणालाही कोणाकरिता प्रेमास्तव (सपिंडीकरणाव्यतिरिक्त) श्राद्ध करण्याला आणि विशेषतः गया येथे श्राद्ध करण्याला बौधायनाने आणि वृद्ध शांतातपाने (स्मृ. चं. श्राद्ध पा. ३३७) अनुमती दिली आहे. एखाद्या मुलाचे उपनयन झाले नसेल तर त्याला वेदमंत्रांचा उच्चार करण्याचा अधिकार नसतो. तथापि बहुतेक सर्व शास्त्रकारांनी असा एक अपवाद मान्य केला आहे की पुत्राचे उपनयन झालेले नसले तरी त्याला आपल्या पित्याच्या

अन्त्यविधीकरिता लागणारे वेदोक्त मंत्र उच्चारता येतात.

ह्या विवेचनावरून असे दिसून येईल की पुरुष आणि स्त्रिया, वयात आलेले आणि अल्पवयी पुरुष, उपनयन झालेले आणि उपनयन न झालेले ह्यांच्यावर श्राद्ध करण्याची जबाबदारी असते.

श्राद्ध हे पिता, पितामह आणि प्रपितामह ह्या तीन निकटच्या पूर्वजांना उद्देशून करण्यात येत असे. बौ. ध. सू. (१·६·११३-११५) मध्ये असे म्हटले आहे की प्रपितामह, पितामह, पिता, (वरील तिघांना पिंड अर्पण करणारा) मनुष्य स्वतः, त्याचे सहोदर भ्राते, त्याचा समान. जातीच्या पत्नीपासून झालेला पुत्र, पौत्र, आणि प्रपौत्र ह्या सात व्यक्तींच्या गटाला **अविभक्त-दाय सपिंड** अशी संज्ञा असते. पुत्र ह्या शब्दाच्या विस्तृत अर्थामध्ये प्रपौत्रांचा अंतर्भाव होतो आणि तो पुत्राप्रमाणे अथवा पौत्राप्रमाणे श्राद्ध करण्याला आणि मृतांची संपत्ती स्वीकारण्याला आणि ऋणे देण्याला अधिकारी होतो. (दायभाग ११-३४).

ज्याप्रमाणे **राजा** हा अंतिम वारस असतो आणि सर्व अज्ञानांचा पालकही असतो त्याप्रमाणेच (ज्याचे कोणी नातलग जिवंत नसतील अशा) एखाद्या व्यक्तीचे श्राद्ध करण्याच्या बाबतीत राजा हा त्या व्यक्तीच्या पुत्रासारखा असतो.

श्राद्धाचे नित्य, नैमित्तिक आणि काम्य असे तीन विभाग करण्यात येतात. जो विधी (प्रतिदिवशी, अमावास्येला अथवा अष्टकाच्या दिवसासारख्या) एखाद्या विवक्षित अथवा निश्चित प्रसंगी करावयाचा असतो त्या विधीला **नित्यविधी** म्हणतात; जो विधी (पुत्राच्या जन्मासारख्या) एखाद्या अनिश्चित प्रसंगी करावयास शास्त्रात सांगितलेले असते त्याला **नैमित्तिकविधी** म्हणतात आणि काही विशिष्ट लाभ अथवा फल प्राप्त व्हावे अशी इच्छा असल्यास जो विधि करावा असे. शास्त्रात सांगितलेले असते त्याला **काम्यविधी** म्हणतात. पितृयज्ञासहित प्रतिदिवशी करावयाचे पाच यज्ञ (भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ, पितृयज्ञ, देवयज्ञ आणि ब्रह्मयज्ञ) हे नित्यविधि असतात म्हणजे कोणत्याही लाभाची अपेक्षा न करिता ते विधि केलेच पाहिजेत आणि न केल्यास पातक लागेल.

आप. ध. सू. (२·७·१६·४-७) मध्ये श्राद्ध करण्यास योग्य असे पुढील काल सांगितले आहेत : श्राद्ध प्रत्येक महिन्यातील **कृष्णपक्षातच** केले पाहिजे. श्राद्धाला **अपराह्नकाल** अधिक योग्य असतो. प्रत्येक महिन्यातील **कृष्णपक्षातील** आरंभींच्या दिवसांपेक्षा **अखेरचे दिवस** श्राद्धाला अधिक योग्य असतात. गया येथे कोणत्याही दिवशी श्राद्ध करावे असे अग्निपुराणात (११५·८) सांगितले आहे.

मनु (३·२७६), याज्ञ. (१·२१७-२१८) तसेच निरनिराळी पुराणे ह्यात **श्राद्धाला विहित काळ** कोणते हे संकलित करून पुढीलप्रमाणे सांगितले आहेत.

अमावास्या, अष्टका दिन, (पुत्रजन्मासारखे) भाग्यवान दिवस, एखाद्या महिन्याचा कृष्णपक्ष, दोन अयनदिन, तांदुळासारख्या पदार्थांची विपुल प्राप्ती, सत्पात्र ब्राह्मणांचे आगमन, विषुव दिन (मेष आणि तूला संक्रांत), संक्रांत, व्यतिपात, गजच्छाया योग, सूर्य-चंद्रांची ग्रहणे, ज्यावेळी श्राद्धकर्त्याला श्राद्ध करण्याची तीव्र इच्छा होईल. तो काळ हे श्राद्ध करण्याचे योग्य काळ असतात.

निरनिराळ्या दिवशी केलेल्या श्राद्धापासून प्राप्त होणारी फले अनेक ग्रंथांत सांगितली आहेत. परंतु

निरनिराळ्या ग्रंथांत दिलेली फले एकमेकांशी जुळत नाहीत. रात्र अथवा संधिकाळ ह्यांच्याव्यतिरिक्त काही विशिष्ट काळी श्राद्ध करू नये असेही काही ग्रंथांत सांगितले आहे. (मनु. ३·२८० इ.)

**श्राद्ध करण्याला योग्य स्थाने**. ह्यासंबंधी निरनिराळ्या ग्रंथात निरनिराळे नियम सांगितले आहेत. उदाहरणार्थ, मनूने (३·२०६-२०७) असे सांगितले आहे की श्राद्ध करण्याकरिता दक्षिणेकडे उतरती असणारी जागा शोधून काढण्याचा प्रयत्न करावा. **शुद्ध असलेली आणि (फार लोकांची) वर्दळ नसलेली** जागा असावी. याज्ञ - (१·२२७) ने म्हटले आहे की श्राद्ध करावयाची जागा सर्व बाजूंनी आच्छादित असावी, शुद्ध असावी आणि दक्षिणेकडे उतरती असावी. यमाने (अपरार्क पा. ४७१) म्हटले आहे. की पुण्यंभूमीवर, नदीतीरावर, तीर्थांच्या ठिकाणी आणि विशेषतः स्वतःच्या स्वामित्वाच्या जागेत, डोंगराच्या जवळ असणाऱ्या लतामंडपात आणि पर्वतांच्या शिखरावर श्राद्ध करावे.

विष्णु. ध. सु. (अ. ८५) मध्ये असे सांगितले आहे की म्लेच्छ देशात (चातुर्वर्ण्य संस्था अस्तित्वात नसणाऱ्या देशात) श्राद्ध करू नये. वायुपुराणातही (अ-७७) श्राद्ध करण्यास **पात्र** असणाऱ्या देशांची नावे दिली आहेत. ब्रह्मपुराणात काहीसे चकित करणारे असे विधान केले आहे की (२२०·८-१०) किरात देश, कलिंग, **कोकण**, क्रिमि (क्रिवि?), दशार्ण, कुमार्य (कन्या कुमारी), तंगण, सिंधु नदीची उत्तरतीरे आणि नर्मदा नदीची दक्षिणतीरे आणि करतोयाचा पूर्वभाग हे प्रदेश श्राद्धाला वर्ज्य करावेत.

अत्यंत प्राचीन काळापासून असे नियम असत की काही विशिष्ट व्यक्तींना आणि प्राण्यांना श्राद्ध करावयाच्या जागेतून घालवून द्यावेत आणि त्यांना श्राद्धविधीकडे पाहून अथवा दुसऱ्या निरनिराळ्या प्रकारांनी श्राद्धविधीला व्यत्यय आणण्याची संधि देऊ नये. उदाहरणार्थ गौतमाने (१५·२५-२८) असे सांगितले आहे की कुत्रे, चांडाल आणि महापातक केलेली व्यक्ती ह्यांनी पाहिलेले अन्न अशुद्ध (आणि म्हणून अपात्र) होते, ह्याकरिता कोणीही श्राद्ध करावयाचे ते आच्छादन असलेल्या (अथवा पडद्याने झाकलेल्या) जागेत करावे अथवा त्या जागेभोवती तीळ पसरून टाकावेत अथवा एखाद्या पंक्तिपावन करणाऱ्या ब्राह्मणाने (कुत्रे अथवा चांडाल ह्यांनी अन्नाकडे पाहणे ह्यांच्यासारखे) दोष काढून टाकण्याकरिता शांति करावी.

### श्राद्धाचे प्रकार

श्राद्धाचे नित्य, नैमित्तिक आणि काम्य ह्या वर्गीकरणासारखेच **एकोद्दिष्ट** आणि **पार्वण** असेही प्रकार करण्यात येतात. **एकोद्दिष्ट** श्राद्ध हे एकाच मृत व्यक्तीला उद्देशून केलेले असते आणि **पार्वण** श्राद्ध एखाद्या महिन्याच्या अमावास्येला अथवा भाद्रपद कृष्ण पक्षात अथवा संक्रांतीला करण्यात येते. आणि त्यात पित्याच्या बाजूच्या तीन पूर्वजांची पूजा मुख्यत्वेकरून करण्यात येते. ह्याशिवाय निरनिराळ्या ग्रंथात श्राद्धाचे अनेक प्रकार सांगितले आहेत. षण्णवति-श्राद्ध ह्याच्यासारख्या ग्रंथांत तर वर्षातून करावयाच्या ९६ श्राद्धांची दिली आहे. अशा याद्यावरून अनेक शतकांच्या काळात श्राद्धाची कल्पना कशी अतिरेकाला गेली होती ह्याची कल्पना येते. फारच थोडे लोक वर्षात इतकी श्राद्धे करू शकत असावे आणि बाकीचे बहुतेक लोक एक महालयश्राद्ध आणि त्याखेरीज आणखी एक दोन श्राद्धे करण्यावर समाधान मानीत असावेत हे न सांगताही समजण्यासारखे आहे. हे लक्षात ठेवण्यासारखे आहे की मनूने (३·१२२) प्रथमतः असा नियम सांगितला होता की प्रत्येक महिन्यातील अमावास्येला **सविस्तर** श्राद्ध करावे, परंतु तसे करणे जवळजवळ अशक्य होईल हे जाणून त्याने (३·२८१) अशी शिफारस केली की वर्षातून तीन अमावास्यांना (हेमन्त, ग्रीष्म आणि वर्षा ऋतूतील अमावास्यांना) **सविस्तर** श्राद्धे करावी आणि प्रत्येक दिवशी पंच महायज्ञाने अंतर्भूत

असलेले श्राद्ध करावे. (३·८२-८३) देवलाने **सविस्तर** श्राद्ध वर्षातून **एकदाच** करावे असे म्हटले आहे. (स्मृ. चं. श्राद्ध पा. २९७).

ह्यानंतरची महत्त्वाची बाब म्हणजे **श्राद्धाच्या दिवशी भोजनास आमंत्रण करावयाच्या ब्राह्मणांचे गुण** ही होय. श्राद्ध करणारा कोणत्याही वर्णाचा असला तरी **फक्त ब्राह्मणांनाच** श्राद्धातील भोजनाला आमंत्रण करण्याची पात्रता पूर्वी असे आणि सध्याही आहे. असे आढळून येते की गृह्यसूत्रात अशा ब्राह्मणांच्या अंगात आवश्यक असणारे थोडेच गुण सांगितले होते, परंतु स्मृति आणि पुराणे ह्यांनी आणखी गुणांची भर घातली आणि ज्यांना श्राद्धाला आमंत्रण करू नये अशा लोकांच्या अधिकाधिक लांब याद्या बनविल्या. उदाहरणार्थ आश्वलायन [ब्राह्मणान् श्रुतशीलवृत्तसंपन्नानेकेन वा।

आश्व. गुह्य (४·७·२)] प्रभृत्ति अनेक गृह्य सूत्रात असा नियम सांगितला आहे की आमंत्रण करावयाचे ब्राह्मण वेदविद्यापारंगत, सच्छीलसंपन्न, प्रशंसनीय आचरणाचे, शुद्ध, अव्यंग असे असावेत. ह्याच्यापेक्षा कितीतरी अधिक गुण आवश्यक असल्याचे निरनिराळ्या ग्रंथात सांगितलेले पाहून मनुस्मृतीवरील टीकाकार मेधातिथि ह्यान (मनु ३·१४७) म्हटले आहे की **ह्या सर्व वचनांचा सारांश एवढाच** आहे की जो कोणी **वेदाध्ययन केलेला विद्वान ब्राह्मण, श्रोत्रिय पित्याचा पुत्र असेल** आणि ज्याचा **श्राद्ध करणाऱ्याबरोबर नातलग संबंध नसेल त्याला श्राद्धला आमंत्रण करावे** आणि **ह्याखेरीज जे काही** ह्या वचनात **सांगितले आहे ते केवळ अर्थवाद** (म्हणजे स्तुतीपर) आहे.

अशा प्रकारचा ब्राह्मण मिळविणे हा सर्वात चांगला मार्ग असला तरी जर तशा प्रकारचा ब्राह्मण मिळविणे शक्य नसेल तर त्याच्या खालोखालचा उत्तम (अनुकल्प) मार्ग स्वीकारावा असे मनु- (३·१४७) प्रभृतींनी सांगितले असून त्यासंबंधी नियम दिले आहेत. मात्र अशा प्रकारचा अनुकल्प मार्ग सर्वोत्तम मार्ग स्वीकारणे शक्य नसेल तरच स्वीकारावा असे मनूने (११·३०) म्हटले आहे. श्राद्धाचे भोजन करण्याने विशिष्ट दोष लागतो असे स्मृतींनी सांगितले असून त्या दोषाच्या निष्कृतिकरिता प्रायश्चित्त सांगितले आहे. सांप्रतकाळीदेखील अतिशय विद्वान असणारे ब्राह्मण श्राद्धात भोजनाला जाण्यास कबूल नसतात आणि विशेषतः ज्या व्यक्तीच्या प्रीत्यर्थ श्राद्ध करावयाचे त्याच्या मुत्यूनंतर थोडक्या (तीन अथवा पाच) वर्षांच्या आत असे ब्राह्मण श्राद्धात भोजनाला जाण्यास तयार नसतात.

विशिष्ट गुणसंपन्न असणाऱ्या मनुष्यात वृद्धांपेक्षा **तरुणांना** अधिक पसंत करावे असे गौतमाने (१५·१०) म्हटले आहे तर समान गुणांनी संपन्न असणाऱ्या ब्राह्मणातील अधिक वयाच्या **वृद्धांना** अग्रमान द्यावा आणि वृद्धांमध्येही द्रव्यप्राप्तीची इच्छा असणाऱ्या **दरिद्री वृद्धांना** आधी पसंत करावे असे आप. ध. सू. (२·७·१७·१०) मध्ये म्हटले आहे. काही ग्रंथांनी **संन्याशांना** अथवा **योग्यांना** श्राद्धात भोजनाला बोलवावे असे विशेष आग्रहाने सांगितले आहे [विशेषेण च योगिनः। अत्र पितृगीता गाथा भवति।
अपि स स्यात्कुलेऽस्माकं भोजयेद्यस्तु योगिनम्।
"विप्रं श्राद्धे प्रयत्नेन येन तुप्यामहे वयम्॥
—विष्णुधर्मसूत्र (८३·१९।२०)] (विष्णु ध. सू. ८३·१९।२०).

श्राद्धात भोजन घालावयाच्या ब्राह्मणांच्या ठिकाणी वेदविद्या असण्यावर अतिशय जोर दिलेलां असला तरी ते ब्राह्मण चांगल्या शीलाचे आहेत किंवा नाही आणि सदाचरणाचे नियम पाळतात किंवा नाहीत म्हणजे '**श्रुतशीलवृत्तसंपन्न**' आहेत किंवा नाही हे पाहणे अवश्य असे. मनूने (३·११८) म्हटले आहे की "तीन वेद जाणणाऱ्या परंतु अनियंत्रित वर्तनाच्या ब्राह्मणापेक्षा फक्त गायत्री मंत्र येणारा परंतु नियन्त्रित वर्तनाचा ब्राह्मण अधिक ग्राह्य समजावा." श्राद्धाला आमंत्रण करावयाच्या ब्राह्मणांच्या पात्रतेविषयी असा कटाक्ष

असण्याचे कारण श्राद्धाच्या वेळी पितर वायुरूप धारण करून ब्राह्मणांच्या देहात प्रवेश करतात ही कल्पनाच होय. विद्या, शील आणि सद्वर्तन ह्या गोष्टी आवश्यक असल्याकारणाने त्या ब्राह्मणांचे पूर्व वृत्त, गुण आणि दोष ह्यांची चौकशी करणे श्राद्धकर्त्याला भाग पडते. ह्यासंबंधी अनेक नियम निरनिराळ्या ग्रंथांत सांगितले आहेत. मनूने (३·१४९) म्हटले आहे की देवांच्या प्रीत्यर्थ करावयाच्या विधीमध्ये अशी चौकशी न केली तरी चालेल, परंतु पितरांना उद्देशून करावयाच्या श्राद्धाच्या वेळी अशी चौकशी करणे योग्य आणि न्याय्य असते. नृसिंह पुराणात (श्राद्ध प्रकरण पा. १०२) म्हटले आहे की श्राद्धाच्या वेळी साहजिक रीतीने आलेल्या अतिथीच्या शीलाबद्दल आणि विद्येबद्दल चौकशी करू नये. स्कंद पुराणात (अपरार्क पा. ४५५) असे सांगितले आहे की जेव्हा कोणी मनुष्य सरळ प्रामाणिकपणे चौकशी न करिता श्राद्ध अर्पण करतो तेव्हा त्याचे पितर संतुष्ट होतात आणि देवही संतुष्ट होतात. हेमाद्रीने (श्राद्ध पा. ५१३) असा खुलासा केला आहे की अशी वचने पुण्यक्षेत्रात केलेल्या श्राद्धांना अथवा दानांना अथवा अतिथींना लागतात.

शारीरिक आणि मानसिक दोष आणि आजार, विशिष्ट व्यवसाय करणे, नैतिक अपराध करणे, काही विशिष्ट देशात वास्तव्य करणे ह्यांच्यासारख्या, अनेक प्रकारच्या कारणांस्तव ब्राह्मणांना **अपांक्तेय** (म्हणजे ब्राह्मणांच्या रांगेत भोजनाला बसण्याला अथवा श्राद्धात भोजन करणाऱ्यांच्या रांगेला दूषित करणारे) ठरविण्यात येत असे. परंतु श्राद्धात ज्यांना आमंत्रण करू नये असे ब्राह्मण आणि अपांक्तेय अथवा पंक्तिदूषक ब्राह्मण ह्यांच्यामध्ये भेद करणे अवश्य असते. उदाहरणार्थ, कोणाही एखाद्या स्नेह्याला अथवा सगोत्र बाह्मणाला जरी तो विद्वान असला तरी साधारण श्राद्धाला आमंत्रण करू नये, परंतु स्नेही अथवा सगोत्र ब्राह्मण हे अपांक्तेय नसतात. अपांक्तेय ब्राह्मणांच्या मोठमोठ्या याद्या निरनिराळ्या ग्रंथांत दिल्या आहेत. मनूने (३·१५०-१६६) दिलेल्या यादीमध्ये निरनिराळ्या ९३ प्रकारच्या व्यक्तींचा समावेश केला आहे. आणि म्हटले (३·१७०-१८२) आहे की अशा अपात्र ब्राह्मणांना भोजन घातल्याने पितरांच्या संतोषाचा नाश होतो आणि अशा ब्राह्मणांनी भक्षण केलेले अन्न विष्टेसमान होते असे समजावे. सौर पुराणात अंग, वंग, सौराष्ट्र, गुर्जर, कोंकण, द्रविड, प्रभृती काही देशातील ब्राह्मण श्राद्धामध्ये वर्ज्य करावेत असे सांगितले आहे. (हेमा. श्रा. पा. ५०५). परंतु त्या श्लोकांचा शब्दशः अर्थ केला तर आधुनिक काळच्या अर्ध्या भारतातील ब्राह्मण श्राद्धात आमंत्रण करण्यास अपात्र ठरतील. बहुधा त्या ग्रंथाच्या कर्त्याला वाटणाऱ्या वृथा अभिमानामुळे आणि त्याच्या पूर्वग्रहामुळे त्याने (पूर्णत्वाचे आदर्शभूत म्हणून) वरील सारखी शिफारस केली असावी.

श्राद्ध करणाऱ्याने काही **विशेष नियम** पाळावयाचे असतात. उदाहरणार्थ, विष्णु. ध. सू. (७९·१९-२१) मध्ये असा नियम सांगितला आहे की श्राद्ध करणाऱ्याने क्रोधाचा त्याग करावा, अश्रु गाळू नये आणि घाईने काही करू नये. आप. ध. सू. (२·७·१७·२४) मध्ये म्हटले आहे की श्राद्धकर्त्याने (बाह्मणांना आमंत्रण करावयास जाण्याच्या वेळेपासून) श्राद्धविधि समाप्त होईपर्यंत अन्न भक्षण करू नये. भविष्यपुराणात (१·१८५-५३) सांगितले आहे की देव, पितर आणि मनुष्य ह्याची पूजा आणि (ब्राह्मणांना) भोजन घालणे ह्या क्रिया अंगावर वस्त्र पांघरून घेतल्याशिवाय करू नयेत; नाहीतर त्याविधीपासून फलप्राप्ती होत नाही.

श्राद्धाला बोलवावयाच्या **बाह्मणांची संख्या किती असावी** ह्याविषयी अनेक पर्याय सांगितले आहेत. मनु (३·१२५) प्रभृति ग्रंथात असा नियम सांगितला आहे की **देवांप्रीत्यर्थ** करावयाच्या विधीमध्ये **दोन** ब्राह्मणांना भोजन घालावे आणि **पितरांप्रीत्यर्थ तीन** ब्राह्मणांना भोजन घालावे अथवा **दोनही कार्यांकरिता** फक्त **एक एक** ब्राह्मणाला भोजन घालावे आणि श्रीमंत असणाऱ्या मनुष्याने देखील **ह्यापेक्षा अधिक ब्राह्मणांना बोलावू नये**. ह्याच्यां उलट दुसऱ्या काही स्मृतींनी श्राद्धात विपुल द्रव्य वाटावे असे सांगितले आहे. (बृह. वायुपुराण इ.).

श्राद्धविवेक, श्राद्धतत्त्व (पा. १९४ आणि १९९) प्रभृति निबंधग्रंथात असे सांगितले आहे की जर कोणी **ब्राह्मण मिळाला नाही तर** सात अथवा नऊ दर्भ घेऊन **ब्राह्मणांच्या प्रतिमा तयार कराव्यात** आणि श्राद्ध करावे आणि नंतर दक्षिणा आणि इतर पदार्थ दुसऱ्या ब्राह्मणांना द्यावेत.

ब्राह्मणांना **आमंत्रण करण्याच्या पद्धतीसंबंधी** नियम घालण्यात आले होते. आप. ध. सू. (२·७·१७·११-१३) मध्ये म्हटले आहे की श्राद्ध कर्त्याने पूर्व दिवशी ब्राह्मणांना विनंती करावी, श्राद्धाच्या दिवशी (आज श्राद्ध आहे अशीं पुन्हा विनंती करावी आणि नंतर (अन्न तयार आहे, असे शब्द उच्चारून) तिसऱ्यांदा आमंत्रण करावे. मनूने (३·१८७) सांगितले आहे की श्राद्धाच्या पूर्व दिवशी अथवा श्राद्ध करावयाच्याच दिवशी आमंत्रण करावे.

वैश्वदेविक ब्राह्मणांना प्रथम आमंत्रण करावे अथवा पितरांप्रीत्यर्थ असणाऱ्या ब्राह्मणांना प्रथम आमंत्रण करावे ह्याविषयी स्मृतिग्रंथात मतवैचित्र्य आहे.

ह्या संबंधात काही ग्रंथांत 'आमंत्रण' हा शब्द आणि काही ग्रंथांत 'निमंत्रण हा शब्द योजला आहे आणि मनूने (३·१८७ आणि १९१) हे दोन्ही समानार्थी मानले असल्याचे दिसते. परंतु पाणिनीने (३·३·१८१) ह्या दोन शब्दांच्या अर्थामध्ये भेद केला आहे आणि महाभाष्यात (खं. २ पा. १६५) असा खुलासा केला आहे की जे बोलावणे योग्य कारणाशिवाय नाकारले तर दोष अथवा पातक लागते. त्याला निमंत्रण म्हणतात आणि जे बोलावणे (दोष न लागता) नाकारता येते त्याला आमंत्रण म्हणतात.

आमंत्रण द्यावयाचे ते श्राद्ध करणाऱ्याने स्वतः अथवा त्याच्या पुत्राने, अथवा शिष्याने अथवा एखाद्या ब्राह्मणाने द्यावे, परंतु ते अन्य वर्णाच्या व्यक्तीमार्फत अथवा एखाद्या स्त्रीच्या द्वारा अथवा एखाद्या बालकाच्या द्वारा अथवा अन्य गोत्राच्या व्यक्तीच्या द्वारा देऊ नये अथवा दुरून देऊ नये (प्रजापति ६४).

कात्यायनाने (श्राद्धतत्त्व पा. १८९) असा नियम सांगितला आहे की, ज्या ब्राह्मणाला एखाद्या दोषरहित असणाऱ्या श्राद्ध करणाऱ्याने (श्राद्धात भोजनाकरिता) आमंत्रण केले असेल त्याने ते आमंत्रण नाकारू नये अथवा आमंत्रण केल्यानंतर (आणि ते स्वीकारल्यानंतर) दुसऱ्या इसमाकडून (कच्च्या) अन्नाचे देखील दान स्वीकारू नये. मनूने (३·१९०) असा नियम सांगितला आहे की जर देवांप्रीत्यर्थ अथवा पितरांप्रीत्यर्थ यज्ञाचे शास्त्रोक्त पद्धतीचे आमंत्रण आल्यानंतर आणि स्वीकारल्यानंतर एखाद्या ब्राह्मणाने त्या आमंत्रणाचे उल्लंघन केले तर त्याला पातक लागते आणि (दुसऱ्या जन्मात) तो डुक्कर होतो. तथापि जर तो रोगामुळे अथवा अन्य योग्य कारणाने जाण्यास असमर्थ असेल तर त्याला वरील नियम लागू पडत नाही.

श्राद्धाला आमंत्रण केलेल्या ब्राह्मणांनी आणि स्वतः श्राद्ध करणाऱ्याने पालन करावयाचे काही कडक आणि विस्तृत नियम स्मृतींनी सांगितले आहेत. त्यांपैकी बरेच नियम दोघांनाही लागू पडणारे आहेत. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास, आमंत्रण करणारा आणि आमंत्रित ह्या दोघांनी पुढीलप्रमाणे वर्तन करावे, स्त्रीसंभोग, पुन्हा भोजन, मिथ्या भाषण, त्वरा, वेदाध्ययन, श्रमाचे काम, जुगार, ओझे वाहून नेणे, दाने देणे आणि स्वीकारणे, चोरी, प्रवास, दिवसा निद्रा, कलह ही कृत्ये वर्ज्य करावीत. श्राद्ध करणाऱ्यानेच फक्त तांबूल भक्षण करणे, श्मश्रू करणे, आंगाला तेल लावणे, झाडाच्या खांदीने दात घासणे ह्या गोष्टी वर्ज्य कराव्यात, आणि (फक्त) आमंत्रित ब्राह्मणानेच आमंत्रण घेतल्यानंतर गैरहजर राहू नये, भोजनाला

बोलावल्यानंतर उशीर करू नये (श्राद्धकलिका आणि पितृभक्ति ह्या निबंधग्रंथातील श्राद्ध प्रकरण पहावे).

श्राद्धात उपयोग करण्यास **योग्य पदार्थ** कोणते आणि **योग्य पात्रे** कोणती तसेच कोणत्या पदार्थांचा आणि पात्रांचा श्राद्धात उपयोग करू नये ह्याविषयी विस्तृत नियम प्राचीन कालापासून घालण्यात आलेले आहेत. आप. [तत्र द्रव्याणि तिलमाषा व्रीहियवा आपो मूलफलानि।
स्नेहवति त्वेवान्ने पितृणां प्रीतिर्द्राघीयांसं च कालम्।
तथा धर्माहृतेन द्रव्येण तीर्थप्रतिपन्नेन।
—आप. ध. सू. (२·७·१६·२२-२४)] ध. सू (२·७·१६·२२-२४) मध्ये सांगितले आहे की तीळ, माष (उडीद), तांदूळ, यव, पाणी, मुळे आणि फळे हे श्राद्धात उपयोग करावयाचे पदार्थ असतात; परंतु तुपात दीर्घ कालपर्यंत मिश्रित केलेल्या पदार्थांच्या योगाने पितर अतिशय संतुष्ट होतात. त्याचप्रमाणे योग्य मार्गाने मिळविलेल्या आणि सत्पात्र व्यक्तींना दिलेल्या धनानेही पितर संतुष्ट होतात. याज्ञ. (१·२५८) ने म्हटले आहे की **हविष्यान्न** म्हणजे यज्ञात अर्पण करण्यास पात्र असणारे अन्न श्राद्धात वाढावे. हविष्यान्नाचा खुलासा मनूने (३·२५७) असा केला आहे की अरण्यात राहणारे तापसी जे अन्न भक्षण करतात ते अन्न, (गाईचे) दुध, सोमरस, मसाला न घालता तयार केलेले मांस (अथवा दुर्गंधी न येणारे मांस),सैंधव मीठ हे पदार्थ स्वाभाविकरीत्या यज्ञात अर्पण करण्यासारखे (म्हणजे हविः) असतात. मार्कंडेय पुराणात (२९·१४-१५) असे सांगितले आहे की लांच घेऊन मिळविलेल्या अथवा (महापातक केलेल्या) पतितापासून मिळालेल्या अथवा कन्येचे मूल्य म्हणून घेतलेल्या अथवा धर्माविरुद्ध मानलेल्या अथवा दुसऱ्याकडून श्राद्धाकरिता याचना करून मिळविलेल्या द्रव्याचा श्राद्धामध्ये उपयोग करू नये. मनूने (३·२५५) थोडक्यात असे सांगितले आहे की श्राद्वामध्ये अपराह्नकाळ दर्भ, श्राद्धाकरिता जागेची (अथवा घराची) योग्य रीतीने शुद्धता करणे, तीळ, (अन्नादिकांवर) सढळ खर्च, स्वादिष्ट अथवा रुचकर अन्न आणि उच्च दर्जाचे ब्राह्मण ही द्रव्ये (म्हणजे अत्यंत आवश्यक गोष्टी) असतात.

विशिष्ट प्रकारची धान्ये आणि कडधान्ये **निषिद्ध** असतात. उदाहरणार्थ, मत्स्य(१५·३६-३८) प्रभृती पुराणांनी [द्वेष्याणि संप्रवक्ष्यामि श्राद्धे वर्ज्याणि यानि तु॥
मसूरशणनिष्पावराजभाषकुसिम्भिकाः।
...कोद्रवोदारचणकाः कपित्थं मधुकातसी॥
—मत्स्य (१५·३६।३८)] मसुर, राजमाष, कोद्रव, चणे, कपित्थ, मधूक आणि आळशी ही धान्ये आणि कडधान्ये निषिद्ध असल्याचे सांगितले आहे. दुसऱ्या काही ग्रंथात (षट्त्रिंशन्मत, हेमाद्रि श्राद्ध पा. ५४४)) तीळ, माष आणि मुद्ग ह्यांच्याव्यतिरिक्त काळ्या रंगाच्या सालीची सर्व प्रकारची कडधान्ये, तसेच समुद्राच्या पाण्यापासून तयार केलेले मीठ हे पदार्थ श्राद्धात निषिद्ध असल्याचे सांगितले आहे. (विष्णु. ध. सू. ७९·१८). गाईचे दूध अथवा दुधात शिजविलेले तांदूळ (ह्याला **पायस** अशी संज्ञा आहे) श्राद्धात अर्पण केल्यास पितर एक वर्षपर्यंत संतुष्ट होतात असे (मनूने (३·२७१) सांगितले असून म्हैस, हरिणी, शेळी अथवा मेंढी, उंटीण, मनुष्य स्त्री आणि एक खूर असणारे सर्व प्राणी ह्यांचे दूध आणि अशा दुधापासून तयार केलेले दही आणि तूप ह्यांचा उपयोग श्राद्धात करण्यास ब्रह्मप्रभृति (२२०·१६९). निरनिराळ्या ग्रंथात निषेध केला आहे. स्मृत्यर्थसार (पा.५२-५३) मध्ये असे म्हटले आहे की मीठ वेगळे वाढण्याला निषेध असला तरी शाकभाज्या शिजविताना त्यात मीठ घालण्यास मनाई नाही.

फुलांच्या बाबतीतही अनेक नियम सांगितले आहेत. ब्रह्मपुराणात (२२०-१६२-१६५) जाति, चंपक, मल्लिका, आंब्याचा मोहोर, तुळशी, तगर, केतकी आणि निरनिराळ्या प्रकारची कमळे, **श्राद्धास वाहाण्यास योग्य** असल्याचे सांगितले असून उग्र वास येणारी अथवा मुळीच वास नसणारी फुले काटेरी वनस्पतीचा

मोहोर आणि लाल रंगाची फुले वाहू नयेत असे विष्णु. ध. सू. (७९·५-६) मध्ये सांगितले आहे.

श्राद्धामध्ये तिळांच्या उपयोगाला फार महत्त्व दिले आहे. तिळांच्या योगाने असुर, दानव आणि दैत्य पळून जातात असे गरुड पुराणात (प्रेतखंड २·१६) म्हटले असून तिलरहित श्राद्ध केल्यास यातुधान आणि पिशाच्चे हवि पळवून नेतात असे अनुशासन पर्वात (९०·२२) सांगितले आहे.

श्राद्धामध्ये कोणती पात्रे ध्यावीत ह्याविषयी निरनिराळे नियम सांगितले आहेत. वायु (७४·१-२) प्रभृति अनेक पुराणात चांदीच्या पात्रांचा पितरांप्रीत्यर्थ करावयाच्या विधींमध्ये उपयोग करावा असे सांगितले आहे आणि देवांच्या प्रीत्यर्थ करावयाच्या विधीमध्ये उपयोग करू नये असे सांगितले आहे. सोने आणि चांदी ह्यांच्या अभावी तांबे, कांसे इत्यादी दुसऱ्या धातूंची पात्रे वापरावीत. स्वयंपाकाची पात्रे तांब्याची अथवा कोणत्याही धातूची असावी परंतु मातीचे केलेले आणि अग्नीमध्ये भाजलेले आणि पाण्यात बुडविलेले पात्र अन्न शिजविण्याकरिता **सर्वात उत्तम** असते आणि लोखंडाच्या पात्रात शिजविलेले अन्न कावळ्याच्या मांसासारखे (म्हणजे निषिद्ध) असते असे प्रजापतीने (११२) म्हटले आहे. ब्राह्मणांनी भोजनाकरिता वापरावयाची पात्रे, सुवर्णाची, चांदीची अथवा पंच धातूची केलेली असावी अथवा त्यांनी पत्रावळीवर भोजन करावे असे प्रजापतीने (११५) सांगितले आहे.

श्राद्धामध्ये मांसाचा उपयोग करावा किंवा नाही ह्याविषयी अत्यंत प्राचीन काळापासून मतवैचित्र्य अस्तित्वात आहे. श्राद्धामध्ये मांसाचा उपयोग केला पाहिजे आणि श्राद्धातील ब्राह्मणांनी मांस भक्षण केलेच पाहिजे असे अनेक ग्रंथात (आप. ध. सू. २·८·१९·१३-१५) म्हटले आहें. कोणत्या प्राण्याच्या मांसापासून पितरांना किती काळपर्यंत संतोष होतो ह्याची वर्णने निरनिराळ्या ग्रंथांत केली आहेत. (मनु ३·२६७-२७२ इ.) क्रमाक्रमाने १२ व्या आणि १३ व्या शतकात आणि त्यांच्या नंतर झालेल्या ग्रंथांत श्राद्धांत मांस वाढणे ह्याचा कलिवर्ज्यात समावेश करण्यात आला आणि सांप्रत काळी (उत्तर भारतातील) जे ब्राह्मण आपणास मत्स्याहार करण्याची शास्त्रात परवानगी असल्याचे मानतात त्यांच्या व्यतिरिक्त कोणतेही ब्राह्मण श्राद्धामध्ये मांस वाढीत नाहीत. बृहन्नारदीय पुराणात म्हटले आहे की मध, मांस इत्यादी पदार्थ आपआपल्या देशातील **रूढीला** अनुसरून वाढावेत आणि उत्तर भारतातील रूढी ही त्या पुराणातील मताला अनुसरून असल्याचे म्हणता येईल. (पृथ्वीचंद्रोदयश्राद्ध. पृ. ४१६)

जर एखादा मनुष्य दरिद्री असला तर त्याने काय करावे ह्याविषयी काही दयार्द्र बुद्धीचे नियम विष्णुपुराणा-(३·४·२४-३०) सारख्या पुराणात सांगितले आहेत. त्यांनी असे म्हटले आहे की अशा मनुष्याने ब्राह्मणांना पोटभर भोजन अथवा मांस देण्याऐवजी केवळ कच्चे धान्य अथवा स्वाभाविकपणे वाढणाऱ्या भाज्या द्याव्यात आणि जर त्याला कच्चे धान्य अथवा भाज्या देखील देण्याचे सामर्थ्य नसेल तर त्याने अल्पशी दक्षिणा द्यावी अथवा त्याने एखाद्या ब्राह्मणाला आपल्या ओंजळीत पाणी घेऊन ते पाणी आणि थोडेसे तिळाचे दाणे अर्पण करावेत अथवा एखाद्या गाईला एक दिवस पुरेल इतके गवत घालावे आणि जर त्याला ह्यांपैकी एकही गोष्ट करणे शक्य नसेल तर त्याने झाडांच्या झाडीत जावे, खांका दिसतील अशा रीतीने आपले हात वर करावेत आणि सूर्यासारख्या विश्वाचे रक्षण करणाऱ्यांना उद्देशून पुढील शब्द उच्चारावेत. माझ्याजवळ संपत्ती नाही, पैसे नाहीत अथवा श्राद्ध ह्या स्वरूपाने देण्यासारखे दुसरेही काही नाही, मी माझ्या पितरांना वंदन करतो, माझे पितर माझ्या भक्तीच्या योगाने संतुष्ट होवोत, मी हे माझे हात अंतरिक्षात पसरले आहेत.

**पार्वण श्राद्धाचे वर्णन**

पार्वण श्राद्ध इतर सर्व श्राद्धांचा (अष्टका श्राद्धाचा देखील) आदर्श अथवा नमुना असतो. ह्या कार्यक्रमाच्या बाबतीत सूत्रांच्या कालापासून आधुनिक काळापर्यंत अतिशय मतवैचित्र्य आढळून येते. श्राद्धविधीमधील मुख्य कृत्ये अथवा टप्पे सामान्यतः एकसारखेच असले तरी मंत्रांच्या, तपशीलाच्या आणि निरनिराळ्या कृत्यांच्या क्रमाच्या बाबतीत भिन्नता असते. ह्या सर्व तपशीलाच्या बाबतीत प्रत्येकाने आपल्या स्वतःच्या सूत्राप्रमाणे चालावे असे कात्यायनाने (स्मृ. चं. श्राद्ध पा. २५८) म्हटले आहे.

पार्वणश्राद्धाच्या मूलभूत कल्पनांपैकी बऱ्याच कल्पना शंत. ब्रा. (२·४·२.) (२२-२४) मध्ये दर्शित केल्या आहेत. कात्यायन श्रौत सू. (४·१) मध्ये दिलेले पार्वणश्राद्धाचे वर्णन शत ब्रा. मधील वर्णनाशी जुळते आहे परंतु त्यात काही तपशील अधिक घातले आहेत.

वाज. सं. (२·२९-३४) मधील बरेच मंत्र शाकमेधामधील पिंडपितृयज्ञात योजले आहेत. त्याप्रमाणेच मैत्रायणी संहिते-(१·१०·३·१०-२१) मधील काही मंत्र शाकमेधामधील पितृयज्ञात घेतले आहेत; आणि त्यांच्यापैकी पुष्कळ मंत्र वाज. सं. मधील अथवा तै. ब्रा. मधील मंत्रांसारखे आहेत.

आश्वलायन गृह्यात (४·७-८) दिलेले पार्वण श्राद्धाचे वर्णन जराशा विस्तृत प्रमाणात पुढे दिले आहे. एखाद्या **पार्वण** श्राद्धात अथवा **काम्य** (म्हणजे काही फलाची प्राप्ती होण्याकरिता केलेल्या) श्राद्धात अथवा **आभ्युदयिक** श्राद्धात अथवा **एकोद्दिष्ट** श्राद्धात, श्राद्ध करणारा विद्यासंपन्न, शीलसंपन्न आणि सदाचरणी ब्राह्मणांना अथवा ज्यांच्याजवळ (ह्या तिहींपैकी निदान) एकतरी गुण असेल अशा ब्राह्मणांना योग्य वेळी आमंत्रण करितो. ते ब्राह्मण स्नान करून आल्यावर श्राद्धकर्ता त्यांचे पाय धुतो. नंतर ते आचमन करतात आणि श्राद्धकर्ता त्यांना आसनांवर उत्तराभिमुख बसवितो. प्रत्येक पितराकरिता एक एक अथवा दोघांकरिता अथवा तिघांकरिता एक असे ब्राह्मण बोलाविलेले असतात. आमंत्रित ब्राह्मणांची संख्या जितकी मोठी असेल तितके अधिक फल प्राप्त होते. तथापि सर्व पितरांकरिता मिळून फक्त एकच ब्राह्मण (प्रथम श्राद्धाव्यतिरिक्त) केव्हाही बोलावू नये. निमंत्रित ब्राह्मण आसनावर बसल्यानंतर त्यांच्या हातावर पाणी द्यावे आणि दुमडलेल्या दर्भाच्या काड्या आसन म्हणून द्याव्या. नंतर त्यांना पुन्हा पाणी द्यावे. तसेच चांदीसारख्या धातूच्या अथवा दगडाच्या अथवा मातीच्या अथवा ह्यांच्यापैकी कोणत्या तरी एकाच पदार्थाच्या केलेल्या तीन पात्रात पाणी ओतावे. आणि ती पात्रे दर्भांनी आच्छादन करावी. नंतर त्या पाण्यात तीळ टाकावे. हे विधि करताना यज्ञोपवीत डाव्या खांद्यावर धारण करावे आणि निरनिराळी कृत्ये उजवीकडून डावीकडे करीत जावे. नंतर श्राद्धकर्त्याने त्या ब्राह्मणांना डाव्या हाताचा आंगठा आणि तर्जनी ह्यांच्या दरम्यानच्या भागाने अथवा डाव्या हाताने धरलेल्या उजव्या हाताने अर्घ्याचे पाणी पिता, पितामह आणि प्रपितामह ह्यांच्या प्रीत्यर्थ अर्पण करावे. अर्घ्य देण्याच्या पूर्वी श्राद्धकर्ता पितरांना उद्देशून साधे पाणी अर्पण करतो. ह्या निरनिराळ्या कृत्यांच्या वेळी विशिष्ट मंत्र उच्चारावयाचे असतात. सर्व ब्राह्मणांना दिलेले पाणी ब्राह्मणांपुढे ठेवलेल्या तीन पात्रांपैकी पहिल्या पात्रात एकच करण्यात येते. आणि ते पात्र श्राद्धविधि पुरा होईपर्यंत तसेच ठेवण्यात येते. त्या पात्राच्या ठिकाणी पितर गुप्त रीतीने वास करीत असतात असे शौनकाने सांगितले आहे. तिन्ही पात्रातील एकत्र पाणी केल्यानंतर त्या पात्रात जे पाणी शिल्लक राहिलेले असेल ते ज्या श्राद्धकर्त्याला पुत्र व्हावा अशी इच्छा असेल तो आपल्या तोंडाला चोळतो. नंतर (पिंडपितृ यज्ञाकरिता तयार केलेल्या स्थालीपाकामधील) थोडे अन्न घेऊन त्यावर तूप ओतले जाते. आणि ते अन्न ब्राह्मणांची परवानगी घेऊन अग्नीमध्ये अर्पण करण्यात येते अथवा ब्राह्मणांच्या हातावर अर्पण करण्यात येते. जर ते अन्न ब्राह्मणांच्या हातावर अर्पण केले असले तर त्या ब्राह्मणांनी आचमन केल्यानंतर त्यांना दुसरे अन्न देण्यात येते आणि

उरलेले अन्न ब्राह्मणांना वाढावयाच्या अन्नात मिसळण्यात येते. श्राद्धात वाढलेल्या अन्नाने ब्राह्मण तृप्त झाल्याचे दिसले म्हणजे श्राद्धकर्त्याने त्या ब्राह्मणांना 'मधु' शब्द आलेल्या (ऋ. १·९०·६-८) तसेच दुसऱ्या काही विशिष्ट ऋचा ऐकवाव्यात. नंतर त्याने भोजन परिपूर्ण होते ना असे ब्राह्मणांना विचारावे आणि त्यांनी भोजन परिपूर्ण होते असे उत्तर द्यावे. नंतर स्थालीपाकांतील अन्नामधून पिंड करण्याकरिता अन्न काढून घ्यावे आणि उरलेले अन्न ब्राह्मणांना वाढावे आणि ब्राह्मणांनी अन्नग्रहण केल्यानंतर उरलेल्या अन्नाचा त्यांच्या परवानगीने आपल्या कुटुंबातील मंडळींकरिता आणि स्नेह्यांकरिता उपयोग करावा. ब्राह्मणांचे भोजन संपल्यानंतर कोणाच्या मताप्रमाणे त्यांनी आचमन करण्यापूर्वी आणि कोणाच्या मताप्रमाणे ब्राह्मण भोजन संपवून उठल्यानंतर आणि त्यांनी आचमन केल्यानंतर पिंडदान करण्यात येते. आणि उरलेल्या अन्नाच्या जवळ जमिनीवर अन्न पसरण्यात येते. नंतर श्राद्धकर्ता आपल्या डाव्या खांद्यावर यज्ञोपवीत धारण करतो आणि अर्घ्यजल ठेवलेले पहिले पात्र उलटे करतो आणि ब्राह्मणांना दक्षिणा देतो. नंतर ब्राह्मणांना 'ओम् स्वधा म्हणा' अशी विनंती करून अथवा आपण स्वतः 'ओम् स्वधा' असे म्हणून आणि त्यांनी 'ओम् स्वधा' म्हटल्यावर तो त्या ब्राह्मणांची बोळवण करतो.

इतर गृह्यसूत्रात वर्णन केलेल्या श्राद्धविधीमध्ये काही काही भेद आहेत. उदाहरणार्थ, आश्वलायन गृह्यातील **अग्नौकरण** फक्त अन्नानेच करण्यात येते परंतु आप. गृ. (२१·३-४) मधील अग्नौकरणात अन्नाच्या आहुती आणि तुपाच्या आहुती ह्यांचा समावेश होतो. कात्यायन गृ. (श्राद्धतत्त्व १-३) मध्ये ब्राह्मण भोजन करीत असताना म्हणावयाचे अनेक मंत्र सांगितले आहेत.

गृह्मसूत्रांप्रमाणेच मनु (३·२०८-२६५)प्रभृति निरनिराळ्या स्मृतींमध्येही श्राद्धविधीच्या कार्यक्रमाची विस्तृत वर्णने दिली आहेत. उदाहरणार्थ याज्ञ. स्मृतीत करावयाच्या विधीत दोन ब्राह्मणांनी पूर्वाभिमुख बसावे आणि पितरांसंबंधीच्या वधीभध्ये तीन ब्राह्मणांनी उत्तराभिमुख बसावे अथवा दैव आणि पित्र्य ह्या दोन्ही विधीमध्ये प्रत्येकी एक एक ब्राह्मण बसवावा. आमंत्रित ब्राह्मणांच्या अनुज्ञेने श्राद्धकर्त्याने प्रथम विश्वेदेवांना आवाहन करावे, त्या ब्राह्मणांच्या हातावर गंध, फुले, अर्घ्य, हात धुण्याकरिता पाणी, सुगंधी द्रव्ये अर्पण करावी आणि त्यांना धूप, दीप आणि वस्त्रे अर्पण करावी. नंतर त्याने ब्राह्मणांची अनुज्ञा घेऊन पितरांना आवाहन करावे आणि (दैवविधीमध्ये) पूर्वी केलेली अर्घ्य देण्यासारखी सर्व कृत्ये पितरांप्रीत्यर्थ करावी. भोजनाकरिता श्राद्धकर्त्याला ज्या प्रकारची पात्रे मिळविणे शक्य असेल त्या (मातीच्या पात्राव्यतिरिक्त) पात्रात आणि विशेषतः (पितरांकरिता असलेल्या ब्राह्मणांच्या भोजनाकरिता) चांदीच्या पात्रात अन्न वाढावे. ब्राह्मणांना आवडणारे हविष्यान्न त्यांची तृप्ति होईपर्यंत (म्हणजे त्यांच्या पात्रात काही अन्न शिल्लक राहीपर्यंत) वाढावे.

मनूने (३·२३२) श्राद्धाच्या वेळी म्हणावयाच्या (धर्मशास्त्रे, आख्यांने, इतिहास, पुराणे, श्रीसूक्तासारखी खिलसूत्रे ह्यांच्यासारख्या) ग्रंथांचा उल्लेख केला आहे. निरनिराळ्या पुराणात श्राद्धाची वर्णने आली आहेत. ब्राह्मणांची बोळवण करण्याच्या व्यवस्थेसंबंधी गरुडपुराणात (आचारखंड २१८-२० प्रभृति) असे सांगितले आहे की पितरांच्या स्थानी बसलेले ब्राह्मण प्रथम जावेत (त्यातही प्रपितामहाच्या जागी बसलेला ब्राह्मण प्रथम जावा, नंतर पितामहाच्या जागी बसलेला ब्राह्मण जावा) आणि त्यांच्यानंतर विश्वेदेवांचा प्रतिनिधी असणारा ब्राह्मण जावा. श्राद्धकर्त्याने (सीमेपर्यंत) ब्राह्मणांच्या बरोबर जाऊन आणि त्यांना प्रदक्षिणा करून परत यावे आणि ब्राह्मणांनी भोजन करून (घरात शिल्लक राहिलेले) अन्न भक्षण करावे. पुराणांनी गृह्यसूत्रे, मनुस्मृति आणि याज्ञ. स्मृति ह्यांचेच बहुतांशी अनुकरण केलेले असते आणि पुष्कळ वेळा त्याच मंत्रांचा आणि संकल्पांचा उपयोग केलेला असतो. परंतु काही काही ठिकाणी त्यात काही

अधिक तपशील दिलेला असतो.

निरनिराळ्या गृह्यसूत्रांत, स्मृतींत आणि पुराणांत सांगितलेल्या श्राद्धाच्या तपशीलात भेद असल्याकारणाने असा एक महत्वाचा प्रश्न उपस्थित होतो की एखाद्या मनुष्याने श्राद्ध करताना फक्त आपल्या स्वतःच्या वेदाच्या अथवा शाखेच्या गृह्मसूत्रात सांगितलेल्याप्रमाणे विधी करावा अथवा आपल्या स्वतःच्या शाखच्या कल्पामध्ये अथवा गृह्यसूत्रामध्ये नसलेल्या परंतु इतर सूत्रांत आणि स्मृतींत आढळणाऱ्या अनेक बाबींचा त्यात समावेश करावा. ह्या प्रश्नाच्या बाबतीत बरेच मतवैचित्र्य आहे. काहींच्या मताप्रमाणे इतर सूत्रांत दिलेल्या तपशीलांचा समावेश केल्याने स्वतःच्या कुलातील चालत आलेल्या रूढींचा त्याग केल्याचा दोष लागण्याचा संभव असतो आणि स्वतःच्या ऋषीला अप्रमाण ठरविल्यासारखे होते. ह्यांच्याविरुद्ध मताचे लोक जै. (२·४·८·३३) च्या 'शाखांतराधिकरण न्याय' अथवा 'सर्वशाखाप्रत्यय न्यायाचा' आधार घेतात. ह्या मताच्या सर्वसंग्रह नावाच्या ग्रंथात असे म्हटले आहे की ज्या ठिकाणी स्वतःच्या गृह्मसूत्रात एखाद्या कृत्याविषयी काहीही सांगितलेले नसेल अथवा ते कृत्य कोणत्या वेळी करावे हे सांगितले नसेल त्यावेळी पर्याय समजावा आणि कोणत्या तरी ऋषीच्या मताप्रमाणे वागावे. प्राचीन गृह्यसूत्रांनी देखील असेच धोरण स्वीकारले असल्याचे दिसते.

ह्या सर्वशाखाप्रत्ययन्यायाचा परिणाम असा झाला की मध्ययुगीन कालात झालेल्या निबंधग्रंथांनी मुळात फारशा विस्तृत नसणाऱ्या अनेक श्राद्धांच्या वर्णनात सर्व स्मृतींतील आणि पुराणातील तपशीलांची अधिकाधिक भर घालण्यास सुरुवात केली.

श्राद्ध ह्या विषयाशी संबंध असणाऱ्या ज्या बाबींबद्दल मतवैचित्र्य आहे अथवा ज्या बाबी सामान्यतः महत्वाच्या आहेत अशा काही बाबींसंबंधी थोडेसे विवेचन पुढे केले आहे.

**ब्राह्मणांचा सत्कार**. कूर्म पुराणात (उत्तरार्ध २२·२०-२१) असे सांगितले आहे की श्राद्धकर्त्याने मध्याह्न काळ उलटून जाण्यापूर्वी आमंत्रित ब्राह्मणांना आपल्या घरी आणावे; त्या ब्राह्मणांनी श्मश्रू करविलेली असावी आणि नखे काढलेली असावीत; त्यांना दांत घासण्याकरिता लागणारे सामान द्यावे आणि त्यांना भिन्न भिन्न आसनांवर बसण्याची विनंति करावी; त्यांना तेल द्यावे आणि स्नानाकरिता पाणी द्यावे. त्यांच्या स्वागताकरिता घरापुढे दोन मंडले करावीत असे काही पुराणांनी सांगितले आहे. (नारदपुराण-पूर्वार्ध २८·३२-३३).

**विश्वेदेवांची पूजा**. काही स्मृतींनी श्राद्धामधील दहा विश्वेदेवांची नावे दिलीं आहेत. बृहस्पती स्मृतीत (अपरार्क पा. ४७८) म्हटले आहे की एखाद्या इष्टीमध्ये केलेल्या श्राद्धात ऋतु आणि दक्ष हे विश्वेदेव असतात, नांदीमुख श्राद्धात वसु आणि सत्य हे विश्वेदेव असतात, काम्य श्राद्धात धूरि आणि लोचन हे विश्वेदेव असतात, नैमित्तिक श्राद्धात काल आणि काम हे विश्वेदेव असतात आणि पार्वण श्राद्धात पुरूरव आणि आर्द्रव हे विश्वेदेव असतात.

**ब्राह्मणांनी कसे बसावे**. वैश्वदेव ब्राह्मणांना पूर्वाभिमुख वसवावेत आणि पित्र्य ब्राह्मणांना उत्तराभिमुख बसवावेत असा सर्वसाधारण नियम आहे. (याज्ञ. १·२२८) तथापि ह्या बाबतीत कमीत कमी पांच तरी भिन्न मते असल्याचे हेमाद्रीने (श्राद्ध पा. १२००) म्हटले आहे.

**श्राद्धामध्ये अर्पण केलेल्या वस्तूंचा खरा ग्राहक कोण**. काही ग्रंथकारांच्या मताप्रमाणे ब्राह्मण हेच ग्राहक असल्याचे मानतात आणि दुसरे काही ग्रंथकार पितर हेच ग्राहक असल्याचे प्रतिपादन करतात, परंतु पितर परलोकात गेले असल्यामुळे आणि त्यांना शरीराने येता येत नसल्यामुळे, गंध, पुष्पासारख्या वस्तु त्यावेळी पितरांहून भिन्न नाहीत असे मानलेल्या ब्राह्मणांच्या फक्त हवाली करण्यात येतात अथवा त्यांना देण्यात येतात. तथापि ब्राह्मणांना दिलेले पाणी आणि दक्षिणा हे पदार्थ फक्त त्यांच्या करिताच असतात. (स्मृ. चं. श्राद्ध-पा. ४४७-४४९)

**अग्नौकरणासंबंधी** बरीच चर्चा निरनिराळ्या ग्रंथकारांनी केली आहे.

मिताक्षरेने (याज्ञ. १·२३६) असा निर्णय केला आहे की ज्याने श्रौत अग्नींची स्थापना केली असेल तो अन्वाष्टक्य श्राद्धांपैकी पूर्वदिवशीच्यासारख्या काही श्राद्धांत आणि पार्वण श्राद्धांत दक्षिणाग्नीमध्ये होम करतो, परंतु काम्य, आभ्युदयिक, एकोद्दिष्ट प्रभृति श्राद्धात पित्र्य ब्राह्मणांच्या हातावरच. फक्त होम करतो. अग्नौकरणामध्ये आहुतींची संख्या शत. ब्रा. (२·४·२·१२-१३) प्रमाणे **दोन** असते, तै. ब्रा. (१·३·१०·२-३) प्रमाणे **तीन** असते, आप गृ. (२०·९) प्रमाणे सात अन्नाच्या आणि सहा तुपाच्या मिळून **तेरा** आहुती असतात.

**अन्न कसे वाढावे**. ह्या आणि तदतुपंगिक बाबींसंबंधी पाळावयाच्या शिष्टाचाराबद्दल अनेक नियम प्राचीन काळापासून घालून दिलेले असून सांप्रत काळी देखील ते पाळण्यात येतात. उदाहरणार्थ, अन्न वाढावयाचे ते श्राद्ध कर्त्याने स्वतः अथवा त्याच्या समान जातीच्या पत्नीने अथवा शुद्ध केलेल्या एखाद्या सेवकाने वाढावे (मार्क. पुराण). अन्नाने भरलेली पात्रे श्राद्धकर्त्याने स्वतः दोन्ही हातांनी उचलून आणावी. दोन हातात न धरलेल्या पात्रांतील जे अन्न ब्राह्मणांजवळ आणण्यात येते ते दुष्ट असुरांकडून हरण केले जाते. (मनु ३·२२४ प्रभृति). जेव्हा अन्न उष्ण असते, ब्राह्मण मुकाट्याने भोजन करीत असतात आणि अन्नाचे चांगले गुण ब्राह्मणांनी सांगितलेले नसतात त्यावेळी पितर ते अन्न भक्षण करितात (मनु).

**अन्न कोणी शिजवावे**. प्रजापति-स्मृती (५७-६२) मध्ये सांगितले आहे की श्राद्धकर्त्याची पत्नी, त्याच्या गोत्रातील एखादी भाग्यशाली (अथवा सुंदर) सौभाग्यवती (सधवा) आणि जिला एखादा पुत्र अथवा वंधु आहे, जी आपल्या वडील माणसांच्या सेवेत तत्पर असते, श्राद्धकर्त्याच्या आचार्याची पत्नी, श्राद्धकर्त्याची चुलती, आत्या अथवा मावशी, भगिनी, कन्या अथवा सून ह्यांच्यापैकी सधवा असणारी ह्यांनी श्राद्धाचे अन्न शिजवावे.

ब्राह्मणांनी **भोजनाला प्रारंभ करण्यापूर्वी** वैश्वदेव ब्राह्मणांच्या पात्रात **प्रथम अन्न** वाढावे आणि नंतर पित्र्य ब्राह्मणांच्या पात्रात वाढावे (विष्णु. ध. सू. ७३·१३-१४). परंतु ब्राह्मणांनी भोजनाला प्रारंभ केला म्हणजे ह्याप्रमाणे क्रम राखण्याची आवश्यकता नाही. जे.जे अन्न एखाद्या ब्राह्मणाला हवे आहे असे दिसून येईल ते ते अन्न त्याला वाढावे (मनु. ३·२३१). वाढावयाचे अन्न नुसत्या हाताने अथवा एकाच हाताने वाढू नये तर एखाद्या लाकडी पळीने अथवा दुसऱ्या एखाद्या (लोखंडाव्यतिरिक्त) पात्राने वाढावे. उजव्या हाताला डाव्या हाताचा आधार देऊन वाढावे. पदार्थात न घातलेले नुसते **मीठ** वाढू नये (विष्णु ध. सू. ७९·१२). श्राद्धाचे भोजन करीत असलेल्या ब्राह्मणांनी त्यांना वाढलेल्या अन्नाचे चांगले अथवा वाईट गुण सांगू नये, मिथ्या भाषण करू नये, एकमेकांची स्तुती करू नये, आणखी वाढू नका असेही (हातांनी केलेल्या खुणेखेरीज) सांगू नये [शंखलिखितौ । ब्राह्मणा अन्नगुणं दोष नाभिवदेयुर्नानृतं ब्रूयुरन्योन्यं न प्रशंसेयुरन्नपानं न प्रभूतमिति ब्रूयुरन्य हस्तसंज्ञाया. ।

हेमाद्रि (श्रा) पा. १०१९] (शंखलिखित.हेमाद्रि-श्राद्ध पा. १०१९).

**कोणत्या प्रसंगी पिंड अर्पण करावेत.** शांख्या. गृ. (४·१·९), मनु, (३ २६०-२६१) प्रभृति ग्रथांत असे सांगितलें आहे की ब्राह्मणांनी भोजन संपविल्यानंतर श्राद्धकर्त्याने शिजविलेल्या भाताचे पिंड अर्पण करावेत. शिजलेल्या भातात तीळ मिश्रित करून त्याचे पिंड केलेले असतात. आश्वला. गृहा (४·८·१२-१३) प्रभृति काही ग्रंथांत असे सांगितलें आहे की ब्राह्मणांनी तोंड स्वच्छ केल्यावर आणि आचमन घेतल्यानंतर पिंड अर्पण करावेत. विष्णु ध सू. (७३·१५-२४) मध्ये असे सांगितले आहे की ब्राह्मण भोजन करीत असतानाच पितरांना पिंड अर्पण करावयाचे असतात. आप. (२४·९) आणि हिरण्य. (२·१२·२-३) गृह्य यात असे मत दिले आहे की. ब्राह्मणांनी भोजन केल्यावर आणि ते निघून गेल्यावर आणि श्राद्धकर्त्याने त्यांच्या मागोमाग जाऊन त्यांना प्रदक्षिणा घातल्यानंतर पिंड अर्पण करावेत. दुसऱ्या काही ग्रंथकारांच्या मताप्रमाणे आमंत्रित ब्राह्मणांचा सत्कार केल्यानंतर अथवा अग्नौकरणानंतर **प्रथमतः** पितरांना पिंड अर्पण करावेत आणि नंतर ब्राह्मणांनी भोजन करावे. (ब्रह्माण्ड पुराण-उपोद्घात १२·२४-२६)

हेमाद्रीने सांगितले आहे की ज्यांच्या गृह्यसूत्रांत पिंडदानाचा एखाद्या विशिष्ट कालाचा उल्लेख केलेला नसेल त्यांनी ब्राह्मणांचे भोजन होऊन त्यांनी आचमन केल्यावर पिंड अर्पण करावेत.

**मृत पूर्वजांच्या पत्न्यांचा त्यांच्या पतींच्या बरोबर समावेश** केव्हापासून करण्यात येऊ लागला ह्या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर देणे अशक्य आहे. ह्याविषयी निरनिराळी मते आहेत. हेमाद्रीने (श्राद्ध. पा. १००) असा निष्कर्ष काढला आहे की महालयश्राद्ध, अथवा गयेला केलेले श्राद्ध ह्यांच्यासारख्या क्वचित प्रसंगाखेरीज सख्खी माता, सख्खी पितामही आणि सख्खी प्रपितामही ह्यांचाच फक्त सर्वसाधारणपणे माता, पितामही आणि प्रपितामही ह्या शब्दात समावेश होतो.

**पिंडांसंबंधी काही विशिष्ट गोष्टी. पिंडाचा आकार** केवढा असावा ह्या संबंधी बरीच चर्चा धर्मशास्त्रावरील ग्रंथात केली आहे. आणि निरनिराळ्या ग्रंथात निरनिराळे नियम सांगितले आहेत. उदाहरणार्थ, स्कंदपुराणात (७·१·२०६) म्हटले आहे की दोन वर्षाच्या वासराला सहज रीतीने आपल्या तोंडात घेता येईल इतक्या आकाराचा पिंड असावा. अंगिरसाने (स्मृ. चं. पा. २७५) असे सांगितले आहे की कपित्थाच्या अथवा बिल्वाच्या फळाच्या आकाराचे अथवा कोंबडीच्या अंड्याच्या आकाराचे अथवा आमलक अथवा बदर फलाच्या आकाराचे पिंड असावेत. मैत्रायणीय सूत्रात (हेमाद्रि, श्राद्ध. पा. १४३०) सांगितले आहे की पित्याला अर्पण करावयाच्या पिंडापेक्षा पितामहाला अर्पण करावयाचा पिंड मोठा असावा आणि तो (तीन पिंडामधील) मध्यम पिंड असावा, आणि प्रपितामहाला अर्पण करावयाचा पिंड सर्वात मोठा असावा. पिंड उलट क्रमाने अर्पण करावेत म्हणजे पहिल्याने प्रपितामहाला, नंतर पितामहाला आणि नंतर पित्याला ह्या क्रमाने द्यावेत असे शौनकाथर्वण श्राद्ध-कल्प ह्या ग्रंथात सांगितले आहे. ह्या पद्धतीचा 'पितामह प्रभृतीन् वा' असा उल्लेख आप. श्रौत सूत्रात (१·९·४) केला आहे. (हेमाद्रि-श्राद्ध पा. १४४२).

**पिंडांची अंतिम व्यवस्था.** ह्याविषयीही निरनिराळी मते अस्तित्वात होती. वाज. सं. आणि दुसऱ्या अनेक सूत्रांत सांगितले आहे की श्राद्धकर्त्याच्या पत्नीला पुत्रप्राप्तीची इच्छा असेल तर तिने पित्याच्या बाजूच्या पूर्वजांना अर्पण केलेल्या तीन पिडांपैकी मध्यम पिंड भक्षण करावा. असाच नियम मनु (३·२६२-२६३) प्रभृतींनीही सांगितला आहे. (मध्यम पिंडाव्यतिरिक्त) इतर दोन पिंड पाण्यात अथवा अग्नीत टाकावेत अथवा एखाद्या ब्राह्मणाला अथवा गाईला खावयास द्यावेत असे गोभिल गृह्यात

(४·३·३१-३४) सांगितले आहे. वराहपुराणात (१९०·१२१) म्हटले आहे **की प्रथम पिंड** श्राद्धकर्त्याने स्वतः भक्षण करावा; मिध्यम पिंड आपल्या पत्नीला द्यावा आणि तिसरा पिंड पाण्यात टाकावा वष्णु धर्मोत्तर पु. (१·१४१·८) मध्ये असे सांगितले आहे की जर **एखाद्या**. तीर्थाच्या ठिकाणी श्राद्ध केले असेल तर पिंड त्या पवित्र तीर्थात टाकावेत. आणखीही निरनिराळे प्रकारचे विनियोग निरनिराळ्या **ग्रंथात** सांगितले आहेत.

शिजलेल्या भाताचे अथवा पिठाचे **पिंड सर्व श्राद्धात अर्पण करावयाचे नसतात**. पुलस्त्याने (श्राद्धकल्पलता, पा. ८६-८९) सांगितले आहे की दोन अयन दिवशी कैलेली श्राद्धे, दोन विषुव दिनी केलेली श्राद्धे, कोणत्याहीं संक्रांतीला केलेले श्राद्ध तसेच एकादशी, त्रयोदशी ह्या दिवशी आणि मघा आणि कृत्तिका नक्षत्रावर केलेली श्राद्धे, ह्यात पुत्र आणि धन ह्यांची इच्छा करणाऱ्या मनुष्याने पिंड अर्पण करू नयेत.

**श्राद्धामधील प्रमुख कृत्य कोणते** ह्याविषयी तीन मते अस्तित्वात आहेत. गोविंदराजासारखे (मनु. ३·१२९) काही ग्रंथकार **ब्राह्मणांना भोजन घालणे** हे प्रमुख कृत्य मानतात आणि त्याला मनूच्या (३·१२९) ह्या श्लोकाचा आधार सांगतात. त्या श्लोकामध्ये श्राद्धापासून प्राप्त होणाऱ्या फलाचा विद्वान् ब्राह्मणाला भोजन घालण्याशी संबंध जोडला आहे. शिवाय काही श्राद्धांत पिंडदान नसते हे वर सांगितलेच आहे. कर्कासारख्या दुसऱ्या काही ग्रंथकारांच्या मताप्रमाणे **पिंडदान** हेच अत्यंत महत्त्वाचे कृत्य असते. ह्या मताला आधार म्हणून ते असे सांगतात की गयेला केलेल्या श्राद्धामध्ये पिंडदान हेच अत्यंत महत्वाचे कृत्य असते. **ब्राह्मणांना भोजन घालणे** आणि **पिंड अर्पण करणे ह्या** दोन्ही गोष्टी श्राद्धामधील प्रमुख कृत्ये असतात असेही तिसरे एक मत आहे. वाजसनेयी शाखेच्या लोकांत पिंडदान हे प्रमुख कृत्य असते,ऋग्वेदीयांत ब्राह्मणभोजन हे प्रमुख कृत्य असते आणि सामवेदी लोकात दोन्ही कृत्ये प्रमुख असतात. (धर्मप्रदीप-निर्णयसिंधु-उत्तरार्ध पा. ३७२) हरदत्त, हेमाद्रि प्रभृति ग्रंथकार भोजन, पिंडदान आणि अग्नौकरण ही तीन कृत्ये प्रमुख मानतात असे दिसते. (संस्कार रत्नमाला पा. १००३).

**लेपभाजः पितर.** श्राद्ध कर्त्याच्या प्रपितामहापलीकडील चौथ्या पिढीपासूनच्या तीन पूर्वजांना श्राद्ध करणाऱ्याच्या हाताला चिकटलेल्या अन्नाच्या कणांचाच अधिकार असतो. त्यांना लेपभाजः अशी (मत्स्य १८·२९) संज्ञा आहे. मनूने (३·२१६) असा नियम सांगितला आहे की श्राद्धकर्त्याने तीन पिंड दर्भावर ठेवावे आणि त्यानंतर आपल्या हाताला चिकटून राहिलेले अन्नाचे कण आणि पाण्याचे कण (पिंड ठेवलेल्या) दर्भाच्या बुंध्यानी झाडून टाकावेत आणि असे झाडलेले कण ज्यांना 'लेपभागिन्' अशी संज्ञा आहे अशा (म्हणजे प्रपितामहापूर्वीच्या तीन) पूर्वजांकरिता असतात.

श्राद्धविधीला आरंभ करण्यापूर्वी **वैश्वदेव करावा** अथवा तो विधी समाप्त झाल्यानंतर करावा ह्याविषयीही मतवैचित्र्य आहे. ब्राह्मणांची बोळवण केल्यानंतर आह्निक बलिप्रदान करावे असे मनूने (३·२६५) सांगितले आहे. देवल प्रभृति ग्रंथकारांनी सांगितले आहे की पितरांप्रीत्यर्थ विधी संपूर्ण झाल्यानंतर वैश्वदेव करावा. निर्णयसिंधूमध्ये (३ पा. ४८९) असे म्हटले आहे की ज्या अर्थी बहुतेक स्मृतींनी श्राद्धानंतर वैश्वदेव करावा असे सांगितले आहे त्याअर्थी सर्वांनी **श्राद्ध संपूर्ण झाल्यानंतर वैश्वदेव करावा.**

आधुनिक काळी करण्यात येत असलेल्या **पार्वणश्राद्धाच्या** बाबतीत सर्वात अधिक पर्याय अस्तित्वात आहेत. श्राद्धविधीतील तपशील भारताच्या निरनिराळ्या भागात निरनिराळ्या प्रकारचे आहेत. प्रस्तुत ग्रंथात **पश्चिम भारतातील ऋग्वेदानुयायी** लोक करीत असलेल्या **प्रतिसांवत्तरिक** (दरवर्षी

करावयाच्या) श्राद्धविधीचे थोडक्यात वर्णन पुढे दिले आहे. हा विधी सर्वसंग्राहक स्वरूपाचा आहे म्हणजे तो आश्वलायन श्रौत सूत्रे, स्मृति आणि पुराणे ह्यांनी अनुसरून आहे.

श्राद्धकर्ता शुभ्र वस्त्रे परिधान करतो (म्हणजे नेसतो आणि पांघरतो) आणि दर्भाच्या अथवा लोकरीच्या आसनावर अथवा हरिणाच्या कातड्यावर बसतो. दोन वेळा आचमन करतो आणि करंगळीजवळच्या बोटात पवित्र धारण करतो. शेंडीला गाठ मारतो आणि शेंडीला आणि यज्ञोपवीताला कुश बांधतो. कुशाच्या तीन काड्या आणि तीळ नेसलेल्या धोतराच्या डाव्या बाजुला खोचतो. नंतर प्राणायाम करितो.

नंतरं देशकालाचा उल्लेख करून अग्नौकरण, पिंडदान इत्यादी कृत्यांसह (सांवत्सरिक) श्राद्ध करण्याचा **संकल्प** म्हणजे निर्धार जाहीर करतो. आमंत्रित ब्राह्मण 'तसे कर' असे उत्तर देतात. नंतर एका तांब्याच्या पात्रात पाणी ओतून त्यात चंदनाचे गंध, यवाचे दाणे, सुवर्ण (अथवा काहीतरी नाणे), फुले आणि तुळशीत पाने टाकतो. नंतर यज्ञोपवीत प्राचीनावीती प्रकारचे धारण करून दुसऱ्या एका पात्रात पाणी ओतून त्यात तिळाचे दाणे, भृंगिराजाचे (माक्याचे) पान टाकतो. तसेच सुपारी, सुवर्ण (अथवा एखादे नाणे) टाकतो. जेव्हा यज्ञोपवीत डाव्या खांद्यावरून (आणि उजव्या हाताखालून) लोंबत असते तेव्हा त्याला **'सव्य'** असे म्हणतात आणि जेव्हा ते उजव्या खांद्यावरून (आणि डाव्या हाताखालून) लोंबत असते तेव्हा त्याला **'अपसव्य'** असे म्हणतात. नंतर पुरुषसूक्त आणि दुसऱ्या काही ऋचा आणि गायत्री मंत्र उच्चारतो. नंतर गरुड पुराणातील (आचारकांड २१६·१-२) 'अपवित्रः पवित्रो वा' हा सुप्रसिद्ध मंत्र उच्चारून स्थळ आणि सामुग्री वगैरे शुद्ध होवोत अशी प्रार्थना करितो. नंतर जमिनीवर एखादे नाणे ठेवून आणि तीळ, पाणी आणि कुश हातात घेऊन बाह्मणांना तीन प्रदक्षिणा घालतो. नंतर ब्राह्मणांना दोन नमस्कार केल्यानंतर अपसव्य होऊन मला श्राद्ध करण्याचा अधिकार असो असे आपण म्हणा अशी ब्राह्मणांना विनंती करितो आणि 'श्राद्ध करण्यच्या अधिकार असो' असे ते उत्तर देतात. नंतर सव्य होऊन श्राद्धाला हा योग्य काल आहे आणि श्राद्धाकरिता शिजविलेले अन्न अर्पण करण्यास पात्र आहे असे म्हणण्याबद्दल ब्राह्मणांना विनंती करितो आणि 'ते तसेच असो' असे उत्तर देतात. नंतर बाह्मणांची अनुमती घेऊन तो वैश्वदेविक (म्हणजे विश्वेदेवांकरिता असणाऱ्या) ब्राह्मणांना आमंत्रण देतो आणि त्यांच्या उजव्या गुडघ्यांला स्पर्श करतो. नंतर अपसव्य करून पित्र्य (पितरांकरिता असणाऱ्या) ब्राह्मणांच्या डाव्या गुडघ्याला स्पर्श करून त्यांना आमंत्रण देतो. नंतर दैव आणि पित्र्य ब्राह्मणांकरिता मंडले करतो. नंतर सव्य करून आसन, गंध, फुले, इत्यादी उपचार दैव ब्राह्मणांना अर्पण करतो आणि अपसव्य करून पित्र्य ब्राह्मणांना अर्पण करतो. दैव ब्राह्मणांचे सव्याने स्वागत करून त्यांना पाद्य अर्पण करतो आणि त्यांचे पाय धुतो. अपसव्य करून पित्र्य ब्राह्मणांचे तसेच स्वागत करून त्यांना पाय अर्पण करतो.

नंतर एवढा वेळपर्यंत बोटात धारण केलेले पवित्र टाकून देऊन हातपाय धुतो, आचमन करितो आणि दोन पक्कि धारण करतो. नंतर सव्याने दैव ब्राह्मणांना आणि अपसव्याने पित्र्य ब्राह्यणांना आसनावर बसण्याची विनंती करून श्राद्धाला प्रारंभ करण्याबदल ब्राह्मणांची अनुमती मागतो. ब्राह्मण त्या प्रमाणे कर असे म्हणतात. त्यानंतर राक्षस, असुर आणि पिशाच्च ह्यांना त्या जागेतून हाकून लावण्यात येते, श्राद्धाचे स्थळ गया होवो अशी प्रार्थना करण्यात येते, श्राद्धाकरिता शिजविलेल्या अन्नावर पाणी प्रोक्षण करून ते शुद्ध करण्यात येते आणि पितरांना आवाहन करण्यात येते. नंतर दैव ब्राह्यणांना आसन देऊनं त्यांना दैव ब्राह्मण होण्याचे आमंत्रण स्वीकारण्याची विनंती करण्यात येते. ते आमंत्रण त्यांनी स्वीकारल्यावर त्यांच्या समोरची भूमी पाण्याने शिंपडण्यात येते. तिच्यावर दोन दर्भ ठेवून दोन पात्रे उपडी मांडतात. नंतर ती पात्रे सुलट

करून त्यावर पाणी शिंपडतो आणि दोन कूर्च ठेवून त्यात पाणी ओततो. त्या अर्ध्यपात्रात यव, गंध, फुले, तुळशीपत्रे टाकून अर्ध्यजले तयार करतो. नंतर दैव ब्राह्मणांच्या उजव्या गुडघ्यावर कुश आणि यव घेतलेला आपला डावा हात ठेवून पुरूरव आणि आर्द्रव संज्ञा असलेल्या विश्वेदेवांना त्या ब्राह्मणांच्या मध्ये येण्याविषयी विनंती करतो. आणि उरलेले यवाचे दाणे दैव ब्राह्मणांच्या पायाजवळ जमिनीवर टाकतो. नंतर तो दैव ब्राह्मणांना पाणी अर्पण करतो. नंतर अर्ध्यपात्रांवर ठेवलेले दर्भ आणि त्या पात्रातील अर्ध्य त्या ब्राह्मणांना अर्पण करतो. नंतर (चंदनाचे गंध इत्यादी) सुगंधी पदार्थ, फुले, तुळशीची पाने, धूप, दीप आणि वस्त्राच्याऐवजी यथाशक्ती द्रव्य, विलेपनाकरिता गोपीचंदन, यज्ञोपवीत आणि पवित्राकरिता दोन कुश हे पदार्थ अर्पण करतो. श्राद्धविधीमध्ये असलेल्या न्यूनाची परिपूर्णता होण्याकरिता अच्युताचे स्मरण करतो. नंतर दैव ब्राह्मणांच्या अनुज्ञेने पितरांची पूजा करतो.

वर सांगितलेला सर्व कार्यक्रम पित्र्य ब्राह्मणांच्या पूजेत करण्यात येतो. मात्र त्यात काही थोडे फेरफार करण्यात येतात. उदाहरणार्थ दोन दर्भांच्या जागी तीन दर्भ दक्षिणेकडे अग्रे करून जमिनीवर पसरण्यात येतात, तीन पात्रे मांडण्यात येतात, प्रत्येक पात्रावर दुमडलेले तीन दर्भ ठेवण्यात येतात, यवाच्या जागी तिळांचा उपयोग करण्यात येतो, तुलसीपत्राच्या जागी भृंगराज (माका) पत्राचा उपयोग करतात, आवाहन करतेवेळी श्राद्धकर्ता कुश आणि तीळ आपल्या डाव्या हातात घेऊन पित्र्य ब्राह्मणांच्या डाव्या गुडघ्यावर ठेवतो. पितरांची पूजा अपसव्याने करण्यात येते. 'स्वाहा नमः' च्या जागी 'स्वधा नमः' हे शब्द म्हणतात. श्राद्धकर्त्याला पुत्रप्राप्तीची इच्छा असेल तर पहिल्या पित्र्य पात्रातील अर्ध्य दिल्यानंतर ब्राह्मणांच्या हातातून गळलेले पाण्याचे थेंब (संस्रव) एकत्र गोळा करून त्या पाण्याने श्राद्धकर्ता आपले तोंड चोपडतो आणि 'तुला पुत्र होवो' असा आशीर्वाद ब्राह्मण देतात. ते संस्रवपात्र दैवब्राह्मणांच्या उत्तरेकडे दर्भावर ठेवतात. नंतर पित्र्य ब्राह्मणांना गंध, फुले, तुळशीपत्रे, भृंगराजपत्रे, धूप, दीप, वस्त्र अथवा त्याऐवजी द्रव्य, गोपीचंदन, यज्ञोपवीत, सुपारी, पवित्राकरिता कुश हे पदार्थ अर्पण करण्यात येतात. नंतर सव्य करून भोजनाची पात्रे मांडण्याकरिता जमिनीवर मंडले तयार करतात. दैवब्राह्मणांच्या पात्रासाठी चौकोनी आणि पित्र्यब्राह्मणांच्या पात्रासाठी वर्तुळाकार मंडल करतात. भोजनाची पात्रे त्या मंडलात मांडण्यात येऊन त्यांच्या सभोवती भस्माच्या रेघा काढण्यात येतात. अशा विभूतीच्या रेषेने सर्वांचे रक्षण होवो अशी प्रार्थना करतो. ह्या मंडलाच्या योगाने एकाच पंक्तीत बसल्याचा दोष नाहीसा होतो. नंतर ब्राह्मणांच्या उजव्या हाताची शुद्धि करण्यात येते. नंतर पित्र्य ब्राह्मणाच्या हातावर **अग्नौकरण** करण्यात येते. अपसव्य करून श्राद्धकर्ता शिजलेले थोडेसे अन्न घेऊन त्याच्यावर तूप घालतो आणि त्याचे विभाग करतो. मध्ये आणि पूर्वेकडे असलेले भाग काढून घेऊन त्यांच्या आहुती ब्राह्मणाच्या हातावर अर्पण करतो. नंतर ब्राह्मणांनी त्यांच्या हातावरील अन्न तूप ओतलेल्या अन्नपात्रात टाकावे. त्यानंतर त्रिसुपर्ण,अन्नसूक्ते आणि इतर सूक्ते पठण करण्यात येतात.

नंतर सव्य करून गायत्री मंत्राने अन्नावर प्रोक्षण करण्यात येते. आपला उजवा हात वर आणि डावा हात खाली अशा रीतीने दैवब्राह्मणाचे पात्र धरून काही मंत्र म्हटल्यानंतर ब्राह्मणाच्या अंगठ्याचे मूळ उलटे वळवून पात्रात वाढलेल्या अन्नामध्ये खुपसण्यात येते आणि त्या अन्नात उजवीकडून डावीकडे फिरवले जाते. नंतर पुरूरव आणि आद्रव संज्ञा असणाऱ्या विश्वेदेवांना ते अन्न अर्पण करण्यात येते. ते अन्न गया येथे विष्णुपदासारख्या चौदा स्थानावर अर्पण केल्यासारखे अक्षय्य असो अशी प्रार्थना करण्यात येते. नंतर अपसव्य करून तसाच कार्यक्रम काही भेदाने पित्र्य ब्राह्मणांच्या बाबतीत करण्यात येतो. पात्र धरताना डावा हात वर आणि उजवा हात खाली धरतात.

नंतर **नैवेद्य** अर्पण करण्यात येतो. नंतर मधुमती ऋचा (ऋ १·९०·६-८) म्हणण्यात येते. मधु हा शब्द तीन वेळा उच्चारण्यात येतो. नंतर ब्राह्मणांना आपोशनाकरिता (सव्य करून) पाणी दिल्यावर पाण्याने हात स्वच्छ धुवून दहा गायत्रीचा जप करण्यात येतो. 'तुम्हाला पाहिजे असेल ते तुम्ही मागावे, शांत मनाने बसून तुमच्या इच्छेप्रमाणे भोजन करावे, शिजविलेल्या अन्नापैकी आणि भाज्यांपैकी तुम्हाला आवडेल ते तुम्ही घ्यावे आणि जे आवडणार नाही त्याचा तुम्ही त्याग करावा, स्वस्थपणे भोजन करावे' अशी ब्राह्मणांची प्रार्थना करण्यात येते आणि 'आम्ही भोजन करतो' अशी ब्राह्मण उत्तर देतात. भोजनाच्या समाप्तीच्या सुमाराला थोडासा भात आणि दही वाढावे आणि अमृतासारखे गंगेचे पाणी अर्पण करावे. ब्राह्मणांनी 'आम्हाला पुरेसे झाले आहे' असे म्हटल्यावर मधुमती ऋचांचे पठण करण्यात येते. नंतर सव्याने विश्वेदेवांना आणि अपसव्याने पितरांना तुम्ही संतुष्ट झाला आहा का असे विचारण्यात येतें आणि त्यांनी संतुष्ट झाल्याचे उत्तर दिल्यावर उरलेल्या अन्नाचे काय करावे असे विचारण्यात येते आणि 'ते तुमच्या मित्रांच्या आणि नातलगांच्या समवेत भक्षण करावे' असे ब्राह्मण उत्तर देतात.

नंतर **पिंडदान** करण्यात येते. भोजन करणाऱ्या ब्राह्मणांच्या पात्रांच्या बाजूला जे अन्न उरले असेल ते श्राद्धकर्त्याच्या कुटुंबात जन्मलेल्या सर्व (मृत) दासांना आणि दासींना प्राप्त होत असते. नंतर ब्राह्मणांना 'अमृतापिधानामसि' असे म्हणून पाणी देण्यात येते.

भूमीवर पाणी प्रोक्षण करून त्यावर आग्नेयीकडे अग्रे केलेले दर्भ पसरतात. त्यावर तिलमिश्रित पाणी शिंपडण्यात येते. नंतर पित्याच्या नावाचा व गोत्राचा उच्चार करून 'वसुरूपाच्या' हे पित्या हा पिंड तुझ्याकरिता आणि तुझ्या मागून येणाऱ्यांकरिता आहे, 'स्वधा' असे म्हणून पिंड अर्पण करण्यात येतो. तसेच पिंड पितामह आणि प्रपितामह ह्यांना अर्पण करतात. पितामहाच्या बाबतीत 'रुद्र रूपाच्या' हे शब्द आणि प्रपितामहाच्या बाबतीत 'आदित्य रूपाच्या' हे शब्द घालतात. नंतर 'तत् सत्' असे म्हणून पिंड ठेवलेल्या दर्भांच्या मुळावर आपल्या हाताला चिकटलेले (भात, तूप आणि पाणी ह्यांचे) कण असे कण मिळण्याची पात्रता असणाऱ्यांच्या संतोषाकरिता पुसतो. नंतर पिंडांना तूप आणि तिळाचे तेल, काजळ, वस्त्रे अर्पण करण्यात येतात. वस्त्रांच्या बाबतीत एखाद्या वस्त्राची दशी अथवा लोकरीची गुंडी ठेवतात. नंतर पाद्य, अर्घ्य, आचमनाकरिता पाणी, स्नान, गंध, फुले,भृंगिराजपत्रे, धूप, दीप आणि (अपूप आणि पायसाचा) नैवेद्य, तांबूल आणि दक्षिणा हे उपचार अर्पण केले जातात. नंतर पितरांना वंदन करून त्यांची प्रार्थना करण्यात येते. नंतर अपसव्य करून पिंडाला हालविण्यात येते. आम्हाला शुभकारक ऐश्वर्य आणि सर्व वीर पुत्र द्या अशी तीन वेळा प्रार्थना करण्यात येते आणि पितरांनी प्राचीन मार्गांनी गमन करावे अशी विनंती करण्यात येते.

नंतर सव्य करून सोमपान करणाऱ्या देवांकरिता आणि अपसव्य करून श्राद्धकर्त्याच्या कुलात संस्काररहित मरण पावलेल्या मुलांना, मुलींना, अन्न जमिनीवर अर्पण करण्यात येते. तसेच श्राद्धकर्त्याच्या कुलात जन्म पावलेल्या आणि मृत झालेल्या आणि दहन केलेल्या आणि दहन न केलेल्या व्यक्तींना उद्देशून एक पिंड आणि तिळमिश्रित पाणी अर्पण करण्यात येते.

नंतर श्राद्धकर्ता हात पाय धुतो, दोन वेळा आचमन करतो आणि बोटात एक पवित्र धारण करतो. नंतर दीर्घायुष्य, ऐश्वर्य, शांति, उत्कर्ष, तृप्ती प्राप्त होण्याबद्दल प्रार्थना करण्यात येतात. नंतर दैवब्राह्मणांना सुवर्ण आणि पित्र्य ब्राह्मणांना रजत दक्षिणा देण्यात येते. नंतर पिंडांवर तिळाचे दाणे आणि पाणी अर्पण करतात. श्राद्धकर्ता आपल्या कपाळावर चंदनाचे गंध लावतो, पिडांना नमस्कार करून आपल्या

कुटुंबाकरिता आशीर्वादांची याचना करतो आणि त्यांच्याशिवाय आणखी असा एक आशीर्वाद मागतो की 'लोक आमच्या जवळ याचना करोत परंतु आम्हाला कोणाची याचना करावी लागू नये' त्याप्रमाणे ब्राह्मण आशीर्वाद देतात.

नंतर ब्राह्मणांच्या अनुज्ञेने **पिंड उचलण्यात येतात** आणि ब्राह्मणांनी भोजन केलेली पात्रे उचलण्यात येतात. नंतर आमंत्रित ब्राह्मणांची **बोळवण** करण्यात येते. नंतर शेवटी "पिता, पितामह आणि प्रपितामह ह्यांची रूपे धारण करणारा जनार्दन वासुदेव ह्या यज्ञाने म्हणजे पितरांकरिता केलेल्या प्रतिसांवत्सरिक श्राद्धाने संतुष्ट होवो. हा पितरांकरिता केलेला यज्ञ आहे. तत् सत्. ते ब्रह्माला अर्पण असो" अशी प्रार्थना करून तीन वेळा विष्णूला नमस्कार करतो आणि दोन वेळा आचमन करतो...

बृहस्पती आणि वृद्ध पराशर ह्यांनी पिंडदानाचे फल असे सांगितले आहे की "पितर जर देवलोकी असतील तर ते अग्नीमध्ये अर्पण केलेल्या अन्नाने तृप्त होतात, जर ते पितृलोकी असतील तर ते ब्राह्मणांच्या भोजनाने तृप्त होतात आणि जर ते नरकात असतील तर ते जमिनीवर अर्पण केलेल्या पिंडांच्या योगाने तृप्त होतात." (पुथ्वीचंद्र पृष्ठ ११० ब).

हिरण्यकेशी शाखेच्या लोकांत आधुनिक काळी प्रचलित असलेला पार्वण श्राद्धाचा कार्यक्रम बहुतांशाने आश्वलायन गृह्यसूत्रात दिलेल्या कार्यक्रमाशी जुळता आहे. गोपीनाथकृत संस्कारमाला ह्या ग्रंथात (पा. ९८५) अमावास्येला करावयाच्या **मासिश्राद्ध** आणि **मासिक श्राद्ध** ह्या दोन श्राद्धांचा उल्लेख केला आहे. तथापि आधुनिक काळी ही श्राद्धे प्राचीन काळच्या नियमांना धरून कोणीही करीत नाही.

पितृशाखेतील तीन पूर्वजांपैकी एक अथवा अधिक पुरुष जिवंत असेल तेव्हा श्राद्ध कसे करावे ह्याबद्दल फार प्राचीन काळापासूनच्या ग्रंथकारांनी विचार केलेला होता आणि त्याबद्दल भिन्न भिन्न मते प्रतिपादन करण्यात आली आहेत. ह्या सर्व मतांची एकवाक्यता करणे अशक्य आहे. कल्पतरू (श्राद्ध पा. २४०) ह्या ग्रंथात म्हटले आहे की ज्याचा पिता जिवंत असेल त्याच्यापुढे तीन पर्याय असतात : (१) त्याने जिवंत असलेला पिता वगळून पिता ज्या तीन पूर्वजांना पिंड अर्पण करतो त्यांना पिंड द्यावेत (मनु, ३·२२०; विष्णु. ध. सू. ७५·१) (२) अग्नीमध्ये होम करावा (आश्व. श्रौ. सू.); (३) त्याने पिंडपितृयज्ञ अथवा पार्वण श्राद्ध हे विधी मुळीच करू नये (गोभिल स्मृति २·९३). श्राद्ध करणाऱ्याची माता जिवंत असली तर त्याबाबतीतही असेच नियम लागू पडतात असे अग्निपुराणात (११७·६०) सांगितले आहे.

गोभिल स्मृतीत (३·१५७) असा नियम सांगितला आहे की श्रुतीमध्ये सांगितलेला. एखादा कार्यक्रम जसाच्या तसा आचरणे शक्य नसेल तर त्या श्रुतिवाक्याचे पालन **अनुकल्पाच्या** (म्हणजे एखाद्या पर्यायाच्या) योगाने करावे. एखाद्याला अनेक ब्राह्मण मिळाले नाहीत, फक्त एकच मिळाला तर त्याने एकाच ब्राह्मणाला बोलावून पार्वणश्राद्ध करावे आणि त्या श्राद्धात सहा पिंड अर्पण करावे आणि दैव ब्राह्मणांना भोजनाच्या ऐवजी नैवेद्य दाखवून ते अन्न अग्नीमध्ये टाकावे. असे शंखाने (१४·१०) म्हटले आहे. एकही ब्राह्मण मिळू शकला नाही तर ब्राह्मण बटूच्या कुशाच्या प्रतिमा कराव्या आणि विचारावे लागणारे प्रश्न श्राद्धकर्त्याने विचारावे आणि त्यांची उत्तरे स्वतःच द्यावी (देवल, हेमाद्रि श्रा. पा. १५२६).

जेव्हा एखादा ब्राह्मण तसेच सामग्री मिळू शकत नसेल, अथवा कोणी एखादा प्रवासात असेल अथवा त्याला पुत्र झाला असेल अथवा त्याची स्त्री रजस्वला झाली असेल तेव्हा **आमश्राद्ध** (म्हणजे कच्च्या

धान्याच्या साहाय्याने केलेले श्राद्ध) करावे असे स्कंद पुराणात [द्रव्याभावे द्विजाभावे प्रवासे पुत्रजन्मनि। आमश्राद्धं प्रकुर्वीत यस्य भार्या रजस्वला ॥

स्कंद (७·१·२०६·५२).] (७·१·२०६-५२) सांगितले आहे. शूद्रांनी नेहमीच आमश्राद्ध करावे असा नियम आहे. कच्चे धान्य देखील देणे शक्य नसेल तर श्राद्धकर्त्याने **हेमश्राद्ध** (द्रव्याने केलेले श्राद्ध) करावे. प्रत्यक्ष अन्न द्यावयाकरिता जेवढे धान्य लागेल त्याच्या दुप्पट परिमाणाचे धान्य आमश्राद्धामध्ये द्यावे लागते आणि (अन्न शिजविण्याकरिता जितके धान्य लागते त्याच्या किंमतीच्या) चारपट धन हेमश्राद्धात द्यावे लागते.

आमश्राद्ध पूर्वाह्णात करावयाचे असते, एकोद्दिष्ट मध्याह्नसमयी करावयाचे असते. पार्वणश्राद्ध अपराह्ण काळी करावयाचे असून वृद्धिश्राद्ध दिवसाच्या पांच भागापैकी पहिल्या भागात करावयाचे असते. (हारीत आणि शातातपअपरार्क पा. ४६८)

# प्रकरण १०

## एकोद्दिष्ट आणि इतर श्राद्धें

(मू. ग्रं. पा. ४।५१६-५५१)

**एकोद्दिष्ट श्राद्ध**. ज्यात एकाच मृत व्यक्तीला आवाहन करावयाचे असते अथवा जे एकाच मृत व्यक्तीच्या हिताकरिता करावयाचे असते त्याला **एकोद्दिष्ट श्राद्ध** [तत्र त्रिपुरुषोद्देशेन यत् क्रियते तत्यार्वणम्, एकपुरुषोद्देशेन क्रियमाणमेकोद्दिष्टम्। —मिता. (याज्ञ १·२१७).] म्हणतात. (मिता. याज्ञ १-२१७). ह्या श्राद्धत फक्त एकच अर्ध्य, एकच पवित्र, एकच पिंड अर्पण करावयाचा असतो; त्यात आवाहन नसते, अग्नौकरण नसते आणि विश्वेदेवांकरिता कोणाही ब्राह्मणाला आमंत्रण करावयाचे नसते. दुसरेही काही भेद पार्वणश्राद्धात आणि ह्या श्राद्धात असतात. एखादा द्विजातीय मनुष्य मृत झाल्यानंतर सपिंडीकरणापर्यंत त्या प्रेताला उद्देशून प्रत्येक महिन्यात जे श्राद्ध करण्यात येते ते एकोदिष्ट प्रकारचे असते. (मनु. ३-२५७). ह्या श्राद्धाचे **नव, नवमिश्र** आणि **पुराण** असे तीन प्रकार असतात. मृत्यूनंतर १० व्या अथवा ११ व्या दिवसापर्यंत केल्या जाणाऱ्या श्राद्धांना **नवश्राद्ध** म्हणतात; ११ व्या दिवसापासून पुढे मृत्यूनंतर एक वर्षपर्यंत (अथवा सहा महिनेपर्यंत) करण्यात येणाऱ्या श्राद्धांना **नवमिश्र** (अथवा **मिश्र**) श्राद्धे म्हणतात. एक वर्षानंतर करण्यात येणाऱ्या श्राद्धांना '**पुराण**' म्हणतात. मृत्यूनंतर तीन पक्ष जी श्राद्धे करण्यातं येतात त्यांना '**ध्रुवाणि**' असे म्हणतात. (अपरार्क पा. ५२१).

नवश्राद्धात कोणती श्राद्धे समाविष्ट होतात ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे. काही ग्रंथांनी १६ **श्राद्धे** आवश्यक सांगितली असून ती न केल्यास मृतात्म्याची प्रेतत्वापासून आणि पिशाच्च अवस्थेपासून मुक्तता होत नाही असे म्हटले आहे. (यम—श्रा. क्रि. कौ. पा. ३६२). ह्या १६ श्राद्धामध्ये ११ व्या दिवसापासून वर्षपर्यंत मृत्यूच्या तिथीला प्रत्येक महिन्यात केलेली १२ श्राद्धे, दोन सहा महिने पूर्ण होण्याच्या पूर्व दिवशी करावयाची दोन श्राद्धे, ११ व्या दिवशी करावयाचे पहिले श्राद्ध आणि सपिंडीकरण श्राद्ध ह्यांचा [द्वादश प्रतिमास्यानि आद्यपाण्मासिके तथा।सपिण्डीकरणं चैव एतद्वै श्राद्धषोडशम्। —गोभिलस्मृति (३·६७).] समावेश होतो. (गोभिलस्मृति ३-६७). पूर्वीच्या काळी (आणि आताही) सर्वही १६ श्राद्धे ११ व्या दिवशी करण्यात येत असत. पूर्वीच्या काळी असा नियम होता की अडचणीच्या प्रसंगी १६ श्राद्धे करून एक वर्ष पुरे होण्याच्या आधीदेखील सपिंडीकरण करावे. आता हा अपवादच नियम झाला आहे.

**सपिंडीकरण** अथवा **सपिंडन.** ज्या पितृगणांना पिंड अर्पण करण्यात येतात त्या पितृगणात मृतव्यक्तीचा समावेश करण्याच्या विधीला **सपिंडीकरण** म्हणतात. हे श्राद्ध करण्याचे विहित काल प्राचीन ग्रंथकारांनी निरनिराळे सांगितले आहेत. मृत्यूपासून १ वर्षाच्या अखेरीला, अथवा ३ महिन्यानंतर अथवा पुत्रजन्मासारखी एखादी भाग्यशाली गोष्ट घडून आल्यास त्या दिवशी हे श्राद्ध करता येते. (कौषीतकी गृह्य ४-२). ह्याशिवायही अनेक कुलाचार असतात म्हणून मदनपारिजात (पान ६३१) ह्या ग्रंथात उद्धृत केलेल्या व्यासाच्या वचनात म्हटले आहे की सपिंडीकरणाला मृत्यूनंतरचा १२ वा दिवस हा प्रशस्त असतो. शूद्रांच्या बाबतीत मृत्यूनंतरचा १२ वा हा एकच दिवस सपिंडीकरणाला विहित असतो असे विष्णु. ध. सू.-(२१-२०) त म्हटले आहे. सपिंडीकरणानंतर प्रत्येक महिन्यात श्राद्ध करावे किंवा नाही ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे. भट्टोजीने (चतुर्विंशतिमतसंग्रह पा. १७१) म्हटले आहे की जेव्हा एक वर्ष पुरे होण्याच्या अगोदर सपिंडीकरण करण्यात आले असेल तेव्हा सर्वही १६ श्राद्धे सपिंडीकरणाच्या पूर्वी केली पाहिजेत आणि तरीही एक वर्षभर मासिक श्राद्धे त्यांच्या त्यांच्या विहित काळी पुन्हा करावी.

मृत व्यक्तीचे वारस संपत्तीच्या बाबतीत विभक्त असले तरी नवश्राद्धे, १६ श्राद्धे आणि सपिंडीकरण श्राद्ध एकानेच म्हणजे ज्येष्ठ पुत्रानेच केली पाहिजेत. (उशनस्-अपरार्क पा. ५२४) एक वर्ष उलटून गेल्यानंतर प्रत्येक वारसाने पृथक् पृथक् श्राद्धे करण्यास प्रत्यवाय नाही. एक वर्षांच्या आत सपिंडीकरण केले असले तरीही सबंध वर्षभर मृताच्या हितार्थ **अन्न** आणि. **उदक भरलेला कुंभ** ब्राह्मणाला अर्पण करावे (याज्ञ १·२५५).

**सपिंडीकरणाचे विधान** पार्वणश्राद्धाप्रमाणेच असते. काल आणि काम हे विश्वेदेव असतात. अर्घ्याची चार पात्रे असतात- एक पात्र मृता (प्रेता) करिता आणि तीन त्याच्या पूर्वीच्या पितृशाखेतील तीन पूर्वजांकरिता असतात. दैवब्राह्मण एक प्रेताचे प्रतिनिधित्व करण्याकरिता आणि दुसरा तीन पूर्वजांच्या करिता असतो. इतके ब्राह्मण न मिळाल्यास एक विश्वेदेवांकरिता, एक प्रेताकरिता आणि एक तीन पूर्वजांकरिता असावा.ब्राह्मणांच्या अनुज्ञेने प्रेताकरिता असलेल्या अर्ध्यपात्रांवरील कुश तीन पूर्वजांकरिता असलेल्या पात्रात टाकावे. प्रेतपात्रात वगळून ठेवलेल्या पाण्याचा अर्ध्य प्रेताचे प्रतिनिधित्व करणाऱ्या ब्राह्मणाला अर्पण करावे.

चार पिंड तयार करावे. एक प्रेताकरिता आणि तीन पूर्वजांकरिता तोन. ब्राह्मणांच्या अनुज्ञेने प्रेतपिंडाचे ३ भाग करावे आणि ते पूर्वजांच्या तीन पिंडांत मिळवावे (कोणाच्या मते दोन भाग करून ते दोन पिंडांच्या मध्यभागी ठेवावे).

सपिंडीकरणाचा विधि पुरा झाला म्हणजे मृतव्यक्ती प्रेत ह्या नात्याने अस्तित्वात राहत नाही आणि स्वतःच एक पितर बनते. त्यानंतर प्रपितामह पिंडाला पात्र होणाऱ्या पितरांच्या यादीतून वगळला जाऊन लेपभाक् होतो. आणि त्यानंतर केलेल्या पार्वणश्राद्धात प्रेतव्यक्ती पिंडात अंशभाक् होते.

स्त्रियांचे सपिंडीकरण कोणाबरोबर करावे ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे. स्त्री निपुत्रिक मरण पावली आणि तिचा पती जिवंत असला तर तिचे सपिंडीकरण तिच्या सासूबरोबर करण्यात येते. पती मृत असेल तर तिचे सपिंडीकरण करता येत नाही. मृत स्त्री पुत्रिका असेल तर तिचे सपिंडीकरण तिच्या पित्याबरोबर करावे. मृत स्त्रीला सापत्न पुत्र असेल तर त्याने तिचे सपिंडीकरण स्वतःच्या पित्याबरोबर करावे. मृत व्यक्तीचे उपनयन झाले नसेल तर सपिंडन नसते. (निर्णयसिंधु ३ पा. ३८८)

एखाद्या कुलांतील मृत व्यक्तीचे सपिंडन करीपर्यंत ज्या शुभ कार्यात **आभ्युदयिक** (नांदीश्राद्ध) करण्याची आवश्यकता असते असे (सीमंतोन्नयनासारखे अत्यंत आवश्यक कार्य वगळून) कोणतेही शुभ कार्य करिता येत नाही.

धर्मत्याग केलेल्या, निंद्य मानलेल्या मिश्र विवाहापासून झालेल्या, नास्तिक मत स्वीकारलेल्या, बुद्धिपुरस्सर व्यभिचार करणाऱ्या स्त्रिया, पतीला अथवा गर्भाला अपाय करणाऱ्या स्त्रिया, निंद्य मानलेल्या प्रकारची आत्महत्या करणाऱ्या अशासारख्या व्यक्तींच्या बाबतीत उदक अर्पण करता येत नाही आणि सपिंडीकरणासारखे विधी करता येत नाहीत. (मनु. ५·८९।९०) आत्महत्या करणाऱ्या अथवा अपघाताने मृत झालेल्या व्यक्तींचे श्राद्ध भाद्रपद वद्य चतुर्दशीच्या दिवशी करण्यास प्रत्यवाय नसतो.

**संन्याशांच्या** बाबतीत त्यांना प्रेतत्वस्थिती भोगावी लागत नाही म्हणून एकोद्दिष्ट अथवा सपिंडीकरण करू नये. फक्त ११ व्या दिवशी आणि त्यानंतर प्रतिवर्षी पार्वणश्राद्ध करावे.

**आभ्युदयिक अथवा नांदीश्राद्ध**. हे श्राद्ध फक्त पुत्राचा जन्म, चौल, उपनयन, विवाह ह्यांच्यासारख्या शुभ प्रसंगी अथवा (तलाव, विहीर, उद्यान अर्पण करण्यासारख्या) पूर्तकृत्य करावयाच्या प्रसंगी करता येते. ह्या श्राद्धात सत्य आणि वसु हे विश्वेदेव असतात. ब्राह्मण समसंख्य असावे. यज्ञोपवित नेहमीसारखे धारण करतात. तिळांच्या ऐवजी यवांचा उपयोग करावा. पितरांना उद्देशून एकवार अर्घ्य अर्पण करावा, गंध, धूप, दीप हे उपचार दोन वेळा अर्पण करावे. ब्राह्मणांच्या हातावर होम करावा. ह्या श्राद्धांत कोणी पिंड अर्पण करीत नाहीत, कोणी करतात. पिंड मातांना, पित्याकडील तीन पूर्वजांना आणि मातेकडील तीन पूर्वजांना अर्पण करावयाचे असतात. माता, पितामही आणि प्रपितामही ह्यांच्या प्रीत्यर्थ करावयाच्या श्राद्धाची कल्पना अन्वाष्टक्या श्राद्धावरून सुचली असण्याचा संभव आहे.

**नांदीश्राद्ध** आणि **वृद्धिश्राद्ध** हे शब्द समानार्थी आहेत. जेव्हा एखादी वृद्धि (अथवा यशस्वी गोष्ट) झाली असेल तेव्हा नांदीमुख पितरांना पिंड अर्पण करून त्यांची पूजा करावी. नांदीश्राद्धामध्ये मातृश्राद्ध, पितृश्राद्ध आणि मातामहश्राद्ध ह्या तिहींचा समावेश होतो. आभ्युदयिक श्राद्ध पूर्त कार्याच्या वेळीही करण्यात येते म्हणून आभ्युदयिक श्राद्ध हा शब्द नांदीश्राद्धापेक्षा अधिक व्यापक असतो.

वृद्धिश्राद्धामध्ये मातृगणांचा सत्कार प्रथम करावयाचा असतो, पितृगणांचा त्यानंतर आणि मातामहगणांचा शेवटी करावयाचा असतो. (अपरार्क पा. ५१७) ब्रह्मपुराणात म्हटले आहे की प्रपितामहाच्या पलीकडील पितृशाखेतील तीन पूर्वजांना **नांदीमुख** [पिता पितामहश्चैव तथैव प्रपितामहः।
त्रयो ह्यश्रुमुखाह्येते पितरः संप्रकीर्तिताः ॥
तेभ्यः पूर्वे त्रयो ये तु ते तु नान्दीमुखा इति ॥
ब्रह्मपुराण (हेमाद्रि—श्राद्ध—पा. १०७).] अशी संज्ञा आहे. (हेमाद्रि. श्राद्ध पा. १०७).

मातृ ह्या शब्दाचे दोन अर्थ असतात. सर्वविधींच्या आरंभी गणेशासह मातांचे पूजन करावे असे गोभिल स्मृतीत (१·१३) सांगितले आहे आणि गौरी, पद्मा, शची इत्यादि १४ मातांची नांवे दिली आहेत. मार्कंडेय पुराणांत (८८·११।२० आणि ३८) ब्राह्मी आदी सात मातांची नांवे दिली आहेत. वृद्धिश्राद्धात अंतर्भूत असणाऱ्या मातृश्राद्धांत मातादिगणाकरिता आणि मातामही गणांकरिता पुरेसे ब्राह्मण उपलब्ध न झाल्यास प्रत्येक गटाकरिता पुत्रवंती सुवासिनी स्त्रियांना भोजनाला बोलावून त्यांचा सत्कार करावा असे वृद्ध वसिष्ठाने म्हटले आहे (अपरार्क पा. ५१७).

**प्रतिसांवत्सरिक अथवा प्रत्याब्दिक श्राद्ध**. हे श्राद्ध प्रतिवर्षी मृत्यूच्या तिथीला करावयाचे असते. मृत्युमहिना माहित नसला तर मार्गशीर्ष अथवा माघ महिन्यांत करावे. तिथि माहित नसल्यास मृतमनुष्य ज्या तिथीला घरून निघाला ती अथवा त्याच्या मृत्यूची वार्ता प्रथम ज्या तिथीला समजली ती तिथि आणि महिना मुत्युतिथि आणि महिना समजावा (बृहस्पति—अपरार्क पा. ५४५).

**महालय श्राद्ध**— आषाढ पौर्णिमेनंतर पांचव्या पंधरवड्यात हे श्राद्ध करावे. त्यावेळी सूर्य कन्याराशींत असला अथवा नसला तरी करावे. सूर्य कन्याराशींत असलेले १६दिवस अतिश्रेष्ठ ऋतूच्या योग्यतेचे असतात. सूर्य कन्याराशींत असलेल्या कृष्णपक्षांत श्राद्ध करणे शक्य न झाल्यास सूर्य तूला राशीत असताना देखील हे श्राद्ध करण्यास प्रत्यवाय नसतो. असे श्राद्ध केल्याशिवाय सूर्य वृश्चिक राशींत प्रविष्ट

झाला तर पितर निराश होऊन आणि वंशजांना शाप देऊन परत स्वस्थानी जातात असे पद्म पुराणात (सृष्टि खंड ४७·२२५।२२८) सांगितले आहे. भाद्रपद कृष्ण पक्षात केलेली श्राध्दे महालये असतात कारण तो पक्ष पितरांकरिता महा (उत्सवाचा) आलय (स्थान) असतो. सूर्य कन्याराशींत असतो तेव्हा त्याला **महालय** आणि **गजच्छाया** असेही म्हणतात (वृद्धमनु–श्राद्धसार पा. ११३). हे श्राद्ध कोणत्या तिथीला करावे ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे. कोणाच्या मताप्रमाणे हे श्राद्ध सूर्य वृश्चिक राशींत प्रवेश करीपर्यंत कोणत्याही तिथीला करावे. (स्मृ. मुक्ता. श्राद्ध पा. ७४७) महालयश्राद्ध पार्वणश्राद्धाच्या विधीप्रमाणे करावयाचे असते. कोणाला पार्वणश्राध्दाच्या विधीप्रमाणे सविस्तर करता येणे शक्य नसेल तर त्याने **संकल्पविधीने** करावे. त्या विधीत आवाहन, अर्ध्य, होम आणि पिंडदान हे विधि नसतात. फक्त एक अथवा अधिक ब्राह्मणांना नुसते भोजन घातले पाहिजे. (मदनपारि. पा. ६०९।१०).

**मातामहश्राद्ध** अथवा **दौहित्रप्रतिपद्श्राद्ध.** दौहित्र म्हणजे कन्येचा पुत्र. ह्याचे मातापिता जिवंत असतील तर त्यालाच मात्र आपल्या मातामहाप्रीत्यर्थ (आणि मातामही मृत असल्यास तिच्याही प्रीत्यर्थ) आश्विन शुद्ध. प्रतिपदेला एक श्राद्ध करिता येते. सामान्यतः हे श्राद्ध पिंडदान विरहित करण्यात येते. कन्येच्या पुत्राचे उपनयन झाले नसले तरीदेखील हे श्राद्ध करण्यास प्रत्यवाय नसतो. श्राद्धसार (पा. २४) ह्या ग्रंथात म्हटले आहे की मातामहश्राद्धाला केवळ शिष्टाचाराचाच आधार आहे.

**अविधवानवमीश्राद्ध.** स्वतःची माता, अथवा कुटुंबातील दुसरी कोणी स्त्री तिचा पती जिवंत असताना मृत झाली असेल तर तिच्या प्रीत्यर्थ भाद्रपद कृष्ण पक्षातील नवमीच्या दिवशी हे श्राद्ध करण्यात येते. त्या स्त्रीचा पती मृत झाल्यानंतर ते श्राद्ध बंद पडते. त्या श्राद्धाला केवळ एका ब्राह्मणालाच भोजन घालावयाचे नसून एका सुवासिनीलाही भोजन घालून मेखला, माला, बांगड्या ह्या वस्तु तिला द्याव्या असे मार्कंडेय पुराणात सांगितले आहे.

**दक्षिणा.** प्रत्येक श्राद्धाच्या विधीच्या अंती आपल्या सामर्थ्यानुसार दक्षिणा द्यावयाची असते. श्राद्धविधीतील मंत्रात अथवा योग्य काळात अथवा कार्यक्रमात जे काही उणे असेल ते दक्षिणेच्या योगाने पूर्ण होते असे स्कंद पुराणात (४-२१८-१२।१४) सांगितले आहे. दक्षिणाविरहित केलेले श्राद्ध निष्फल असते. मृताने वापरलेली शय्या, पलंग, घोडा आदि पदार्थ ब्राह्मणांना दान द्याव्या. पादत्राणे आणि छत्री देखील ब्राह्मणाला दान द्याव्या. शय्यादानाचा स्वीकार करणे हे कृत्य पूर्वीच्या काळी कमी प्रतीचे समजले जात असे आणि सांप्रतकाळी देखील सामान्यतः विद्वान नसलेले दरिद्री ब्राह्मणच केवळ शय्यादानाचा स्वीकार करितात. शय्यादान स्वीकारणाऱ्याला पुनः उपनयन करावे लागते असे पद्मपुराणात (सृष्टिखण्ड १०·१७।१८) म्हटले आहे.

**दत्तकपुत्र.** प्राचीन काळी जे १२ प्रकारचे पुत्र संमत असल्याचे धरीत असत त्यांच्यापैकी क्षेत्रज, पुत्रिकापुत्र आणि दत्तक हे अतिशय महत्वाचे असून त्याना दोन पिते असल्यामुळे त्यानी कोणत्या पित्याला पिंड अर्पण करावे हा प्रश्न असे. क्षेत्रज आणि पुत्रिकापुत्र हे प्रकार अनेक शतकांपासून प्रचारातून गेले असल्यामुळे त्यांच्याविषयी आता व्यावहारिक महत्त्व राहिलेले नाही. परंतु दत्तक पुत्र हा प्रकार अद्यापि प्रचारात आहे. बौधा. ध. सूत्रात (२·२·२२।२३) असे म्हटले आहे की दोन पित्यांच्या पुत्राने आपल्या दोन्ही पित्यांना उद्देशून पिंड अर्पण करावा आणि प्रत्येक पिंडाच्या बाबतीत दोन नावे उच्चारावी. अशा रीतीने सहाजणांना-तीन पिंड मिळतात. दुसऱ्या काही ग्रंथांनी असे सांगितले आहे की ज्यावेळी एकाच पिढीत दोन पूर्वज असतात त्या वेळी त्या प्रत्येक पिढीतील पूर्वजांना दोन पृथक् पिंड अर्पण करावे. निर्णयसिंधु (३. पा.

३८९), धर्मसिंधु (३ उत्तरार्ध पा. ३७१) प्रभुति ग्रंथांत असे सांगितले आहे. की अन्य कुलात दत्तक दिलेल्या पुत्राला जर त्याच्या जनक पित्याला त्याच्या मृत्यूच्या वेळी दुसरा पुत्र नसेल तर त्या जनक पित्याचे श्राद्ध करिता येते आणि त्याची संपत्ती देखील वारसाहक्काने घेता येते.

**वृषोत्सर्ग** (बैल मोकळा सोडणे). हा विधी कार्तिक अथवा आश्विन महिन्यातील पौर्णिमेच्या दिवशी केला जातो. त्या बैलाबरोबर चार कालवडी—त्याच्या पत्न्या म्हणून सोडाव्या असे सांगितलें आहे. असा बैल मोकळा न सोडला तर कितीही श्राध्दे केली तरी ती मृत व्यक्ति प्रेतच राहते असे गरूड पुराणात (२·५·४०) सांगितले असून पुढे (२·५·४४।४५) असेही म्हटले आहे की जर बैल उपलब्ध न होईल तर दर्भ, पीठ, माती ह्यांची बैलाची प्रतिमा करून ती मोकळी सोडावी.. सांप्रतकाळी देखील लोक एक बैल मोकळा सोडतात, परंतु बैलांच्या किमती वाढल्या कारणाने हा विधि तुरळक वेळीच करण्यात येतो. असा बैल कोणी धरू नये, अथवा त्याला वाहनाच्या कामी लावू नये, गाईचे दूध काढू नये अथवा तिला गोठ्यांत बांधू नये. जर एखादा बैल श्रम करण्यापासून मोकळा केला आणि सुखकारक परिस्थितीत ठेवला तर ते कृत्य मृताला अन्य लोकांतील सुखाला कारणीभूत होण्याचा संभव आहे अशी कल्पना ह्या कृत्याच्या मागे मूलभूत असावी असे वाटते.

**जीवत्श्राद्ध** अथवा **जीवश्राद्ध.** हे श्राद्ध कोणाही मनुष्याला आपण जिवंत असताना आपल्या स्वतःच्या आत्म्याच्या हिताकरिता करिता येते. बौ. गृ. शेष सू. (३·१९) सारख्या ग्रंथात केलेल्या वर्णनावरून असे दिसून येते की ह्या विधीमध्ये श्राद्ध करणारा आपली स्वतःची सुताची अथवा पळसाच्या डाहाळीची प्रतिमा तयार करून तिचे दहन करतो, उदक आणि पिंड देऊन स्वतःप्रीत्यर्थ और्ध्वदेहिक विधी करतो, आशौच पालन करतो, ११ व्या दिवशी एकोद्दिष्ट श्राद्ध करतो, वर्षपर्यंत प्रत्येक महिन्यात आणि त्यानंतर प्रतिवर्षी १२ वर्षेपर्यंत श्राध्दे करितो.

एखाद्या जिवंत मनुष्याने आपले स्वतःचे श्राद्ध करण्याचा हा विधी श्राद्धाच्या प्राचीन कल्पनेशी विसंगत आहे. लोक श्रांद्धाच्या कल्पनेने भ्रांत होऊन त्यांनी आपल्या भ्रमिष्ट मनाचे समाधान करण्याकरिता हा विधी शोधून काढला.

**गाय दान देणे.** आशौच निवृत्तीनंतर एक सवत्स (विशेषेकरून कपिला) गाय एखाद्या ब्राह्मणाला दान देण्याचा प्रघात आहे. मृत्यूपूर्वी वैतरणी गाईचे दान क्वचितच ठिकाणी देण्यात येते.

**अधिकमास.** सर्व कृत्यांकरिता निषिद्ध मानला जात असला तरी नवश्राद्धे, ग्रहणात करावयाची श्राध्दे ह्यांच्यासारखी काही श्राध्दे अधिक महिन्यात देखील करावी असे व्यासाने सांगितले आहे. (श्राद्धतत्व पा. २८३). अधिक मासामध्ये मृत झालेल्या व्यक्तीचे श्राद्ध अधिक मासात करण्यास प्रत्यवाय नसतो (भृगु-स्मृ. चं. श्राद्ध पा. ३७५)

**संघातश्राद्ध**. जेव्हा एखाद्या अपघातात वगैरे एकाच वेळी अनेक व्यक्ती मृत झाल्या असतील तर त्यांची श्राध्दे करण्याचा क्रम श्राद्ध करणाऱ्याच्या ह्या व्यक्तींशी असलेल्या नात्यांवरून ठरत असतो. माता आणि पिता एकाच वेळी मृत झाली तर पित्याचे दहन आणि इतर संस्कार प्रथम करून नंतर मातेचे संस्कार करावे. (पृथ्वीचंद्र, प. २६५ अ)

**अडचणीमुळे** श्राद्ध करणे अशक्य झाल्यास ती अडचण दूर झाल्याच्या दिवशी श्राद्ध करावे. (ऋष्यशुंग-अपरार्क पा. ५६१). आजारीपणामुळे अथवा पत्नी रजस्वला झाल्यामुळे अथवा इतर कारणाने सामानाची. तयारी. करणे शक्य न झाल्यास **आमश्राद्ध** करावे (पद्मपु. पातालखंड १०१·६८-७१).

**श्राद्धात भोजन करण्यामुळे उत्पन्न होणारा दोष.** श्राद्धाला अत्यंत विद्वान ब्राह्मण बोलवावा असे निरनिराळ्या ग्रंथांत आग्रहपूर्वक सांगितले असले तरी श्राद्धात भोजन करण्याबद्दल निषेधही सांगितला आहे. आणि निरनिराळ्या प्रकारच्या श्राद्धात भोजन करण्याबद्दल निरनिराळी कमीअधिक प्रतींची प्रायश्चित्ते करावयास सांगितली आहेत. वेदाध्ययनाच्या योगाने प्राप्त झालेली आत्मिक शक्ति दाने स्वीकारण्याने नाश पावते म्हणून विद्येच्या योगाने अथवा तपाने दाने स्वीकारण्यास पात्र असलेल्याही ब्राह्मणाने अशी दाने पुन्हा पुन्हा स्वीकारू नयेत असे याज्ञ. (१·२१३) ने म्हटले आहे.

**श्राद्धविधीचे महत्त्व.** ऋग्वेदासारख्या प्राचीन ग्रंथावरून असे दिसून येते की मनुष्याच्या मरणानंतर लागलीच करण्यात येणाऱ्या विधींच्या हेतूमध्ये मृताविषयी प्रेमभावनेबरोबर थोडासा भीतीचाही अंश असतो. मृतात्मा पितरांच्या अवस्थेला पोहोचेपर्यंत त्याला एक तात्पुरता देह प्राप्त व्हावा असा त्या विधींचा उद्देश असतो. कालाच्या ओघात मृत पूर्वजांच्या उद्देशाने करावयाचे विधी अधिकाधिक वेळा करण्यात येऊ लागले. अशा विधीत श्रम, द्रव्य आणि काल ह्यांचा अधिक व्यय होऊ लागला. चालू विसाव्या शतकात लोकांनी काय करावे हा प्रश्न आहे. हल्ली बहुतेक ब्राह्मण आवश्यक सांगितलेले पंचमहायजही करीत नाहीत. तथापि ते वर्षांतून एकवार आपल्या पूर्वजांना उद्देशून श्राद्ध करण्याबद्दल उत्सुक असतात. तेव्हा सर्व लोकांना आचरण्याला उपयुक्त असा पुढील मध्यम मार्ग सुचविता येईल. ज्यांना श्राद्धविधीच्या ठिकाणी मतांचे हित करण्याचे सामर्थ्य आहे अशी श्रद्धा असेल त्यांनीं लहान प्रमाणावर श्राद्ध करण्यास प्रत्यवाय नाही. श्राध्दाच्या बाबतीत आणि विशेषतः आमंत्रण करावयाच्या ब्राह्मणांच्या संख्येच्या बाबतीत केव्हाही उधळेपणा करू नये [द्वौ दैवे पितृकृत्ये त्रीनेकैकमुभयत्र वा।
भोजयेदीश्वरोपीह न कुर्याद्विस्तरं बुधः॥
पद्मपुराण (५·९·९८)] ही पद्मपुराणात (५·९·९८) दिलेली ताकीद त्यांनी ध्यानात ठेवावी. ज्यांना श्राद्धांच्या ठिकाणी श्रध्दा नसेल अथवा डळमळित झाली असेल त्यांनी देखील असे लक्षात ठेवावे की श्राद्धाची मूलभूत कल्पना खात्रीने प्रशंसनीय आहे. आपल्या स्वतःच्या निकट संबंधाच्या आणि प्रिय आप्तांविषयी कोमल आणि प्रेमाची भावना आणि स्मृती ठेवण्याकरिता वर्षातून एक दिवस नेमून ठेवावा आणि अशा मृतांप्रीत्यर्थ आप्त, मित्र आणि विद्वान लोकांना भोजनाला आमंत्रण करावे. गरीब परंतु विद्वान असणाऱ्या शीलसंपन्न, उच्च विचाराच्या आणि साधी राहणी आणि उच्च विचार ह्या तत्त्वावर राहणाऱ्या लोकांना आर्थिक देणग्या द्यावयाचा प्रघात ठेवावा. असे कृत्य आपल्या मागील परंपरेला धरून होईल आणि त्यामुळे रूढीमध्ये नवीन जोम आणि नवचैतन्य उत्पन्न केल्यासारखेही होईल.

गया येथे पिंड आणि उदक अर्पण करताना जो संकल्प करावा लागतो त्यात असे म्हटलेले असते
[ये केचित्प्रेतरूपेण वर्तन्ते पितरो मम।
ते सर्वे तृप्तिमायान्तु सक्तुभिस्तिलमिश्रितैः॥
आब्रह्मस्तम्बपर्यन्तं यत्किंचित्सचराचरम्।
मया दत्तेन तोयेन तृप्तिमायान्तु सर्वशः॥
वायु (११०·६३। ६४).] (वायुपुराण ११०·६३-६४) की 'जे कोणी माझे पूर्वज प्रेतरूपाने असतील ते तिलमिश्रित सक्तूच्या पिंडाच्या योगाने संतुष्ट होवोत आणि ब्रह्मापासून गवताच्या काडीपर्यत असलेले सर्व चर अचर मी अर्पण केलेल्या पाण्याने तृप्त होवो.' ह्या संकल्पापेक्षा अधिक उदात्त काहीही असू शकणार नाही. ह्या संकल्पातील मूलभूत कल्पना नीटपणे समजून घेऊन प्रत्यक्ष व्यवहारात आचरली गेली तर सर्व

विश्व आपले आप्त होईल. ह्या करिता आपल्या जुन्या संस्कारातील दीर्घकालपर्यंत जमत गेलेल्या निष्कारण अधिक गोष्टींचा त्याग करिताना त्यांच्यामधील सुवर्णासारखे चांगले भाग फेकून दिले असे होऊ नये ह्याची काळजी घेतली पाहिजे.

# खंड ४ था

# विभाग ४ था

# प्रकरण ११ वे

## तीर्थयात्रा

(मू. ग्रं. पा. ४।५५२-५८४)

सर्व धर्मांनी काही विशिष्ट प्रदेशांना पावित्र्य असल्याचे मानलेले असते आणि अशा प्रदेशांचे दर्शन घेणे ह्या कृत्याला धार्मिक कर्तव्याचे स्वरूप दिलेले असते. अथवा ती गोष्ट अत्यंत प्रशस्त असल्याचे मानलेले असते. उदाहरणार्थ, प्रत्येक मुसलमानाने आयुष्यात एकदा तरी पैगंबराचे जन्मस्थान मक्का ह्या स्थानाचे दर्शन घेणे हे त्याचे अवश्य कर्तव्य असते. त्याप्रमाणेच बुध्दाशी संबंध असणारी लुंबिनी, बोधगया, सारनाथ, कुसीनारा ही स्थाने बुद्धधर्मानुयायी पवित्र मानतात; ख्रिस्ती धर्मानुयायी ख्रिस्ताचे जन्मस्थान जरूसलेम पवित्र मानतात.

भारतात देखील मोठाल्या नद्या, पर्वत आणि अरण्ये नेहमीच पवित्र आणि देवांची वसतिस्थाने मानण्यात आली आहेत. प्राचीन आणि मध्ययुगीन काळात तीर्थयात्रांच्या योगाने सर्व समाजाचे आणि यात्रेकरूंचे अनेक फायदे झाले आहेत. भारत देश अनेक राज्यात विभागलेला होता आणि त्यात भिन्न भिन्न पंथांचे अनुयायी राहत होते तरीदेखील वाराणसी आणि रामेश्वर ह्यांच्यासारखी स्थाने सर्व लोक पवित्र असल्याचे मानीत असत. अशा तीर्थांच्या आणि क्षेत्रांच्या ठिकाणी सर्व लोक एकच होत असत. आणि त्यामुळे त्यांच्यामधील भेदभाव कमी होण्याला मदत होत असे. तीर्थक्षेत्रांशी संबंध असणाऱ्या परंपरा, तेथे करावी लागणारी व्रते आणि विधी, सत्पुरुष आणि तत्त्वज्ञानी पुरुष ह्यांची संगती आणि अशा ठिकाणचे एकंदर वातावरण ह्यांच्या योगाने यात्रेकरूंच्या मनावर जी उदात्त भावना उत्पन्न होत असे ती तीर्थयात्रेहून परत घरी आल्यानंतरही बराच काळ टिकत असे, आणि स्वार्थि व्यवसायापासून परावृत्त करण्याला आणि उच्चतर आणि अधिक टिकाऊ अशा नैतिक आणि आध्यात्मिक तत्वांचा विचार करण्याला आवश्यक असणारी चेतना मिळत असे. ह्या प्रकारच्या उघड दिसणाऱ्या फायद्यांमुळे आणि पवित्र क्षेत्रांच्या ठिकाणी देवता वास्तव्य करीत असतात अशा श्रद्धेमुळे धर्मशास्त्रकारांनी तीर्थांना जाण्याला विशेष महत्त्व दिले आहे. प्राचीन धर्मशास्त्रावरील [क्षमा सत्यं दमः शौचं दानमिन्द्रियसंशयः।
अहिंसा गुरुशुश्रूषा तीर्थानुसरणं दया।
आर्जवं लोभशून्यत्वं देवब्राम्हणपूजनम्।
अनभ्यसूया च तथा धर्मः सामान्य उच्यते॥
विष्णुधर्मसूत्र (२·१६।१७).] ग्रंथात (विष्णु ध. सू. २. १६-१७) सर्व लोकांना सामान्य असणारे जे धर्म सांगितले आहेत त्यात क्षमा, सत्य, मनःसंयमन प्रभृती नैतिक गोष्टींबरोबरच तीर्थांना जाणे ह्या गोष्टीचाही समावेश केला आहे. तीर्थक्षेत्रातील धंदेवाईक भिक्षुकांच्या लोभीपणामुळे आणि अज्ञानामुळे आधुनिक काळच्या ज्या लोकांची आपल्या परंपरागत धार्मिक समजुतीवरील श्रद्धा कमी झाली असेल अथवा सर्वस्वी नष्ट झाली असेल त्यांनी देखील तीर्थासंबंधीच्या प्राचीन काळच्या लोकांच्या भावनांचा विचार करताना फार कठोरपणा करू नये.

'तीर्थ' हा शब्द ऋग्वेद आणि इतर वेद संहिता यात पुष्कळ वेळा आला आहे. ऋग्वेदामध्ये त्याचा अर्थ काही ठिकाणी मार्ग, नदीतील पाय उतार, असा आढळतो (ऋ. १·१६९·६ इ.) आणि काही ठिकाणी पवित्र स्थान असा असतो (ऋ. १०-३१-३). इतर वेदांच्या संहिता (तै. सं. ४·५·११-१।२). आणि ब्राह्मण ग्रंथ ह्यात तीर्थ ह्याचा अर्थ पुण्यनदी, जलाशय, मार्ग असा असतो (शांख्या. ब्रा. २·९). ज्याप्रमाणे मनुष्याच्या शरीराचे उजवा हात अथवा उजवा कान ह्यांच्यासारखे काही भाग इतर भागांपेक्षा अधिक शुद्ध मानले जातात त्याप्रमाणेच पृथ्वीवरील काही स्थाने त्यातील भव्यतेमुळे अथवा अद्‌भुतपणामुळे अथवा कोणा सत्पुरुषाने त्या स्थानांचा मान, तपाचरण इत्यादी कामाकरिता उपयोग केला असल्यामुळे पवित्र मानण्यात येतात. (पद्मपुराण-उत्तर-खंड २३७·२५।२७). ह्याकरिता तीर्थ ह्याचा अर्थ ज्या स्थानात अथवा प्रदेशात कोणत्याही आकस्मिक कारणाशिवाय त्यांच्या अंगच्या विशिष्ट गुणांमुळे अधिक पुण्यसंचय होऊ लागतो असे एखादे स्थान अथवा प्रदेश असा करिता येईल. अथवा ज्या स्थानांना ज्ञानवान् आणि श्रेष्ठ ऋषी तीर्थे म्हणतात ती तीर्थे असेही म्हणता येईल.

ऋग्वेदामध्ये सर्वसाधारण जलाशयांना आणि नद्यांना आणि काही विशिष्ट नद्यांना पवित्र मानून त्यांचा अत्यंत आदरपूर्वक उल्लेख केलेला आढळतो आणि त्यांच्या अंगी देवतात्य कल्पिलेले असते, त्यांच्या योगाने सर्व पातकांचा नाश होतो असे मानलेले असते. सरस्वती, सरयु, सिंधु ह्या मोठ्या नद्यांना देवी आणि माता असे म्हटले आहे. सरस्वती नदीचा तर फार वेळा उल्लेख केला असून ती सर्व नद्यात आणि देवतात श्रेष्ठ असल्याचे म्हटले आहे. (ऋ. १·३·११।१२). ऋग्वेदातील सूत्रांच्या रचनाकाळी सरस्वती ही एक विपुल पाणी असलेली नदी होती आणि पुढे ब्राह्मणग्रंथांच्या काळी ती वाळवंटात लुप्त झाली.

गौतम, बौधा आणि वसिष्ठ ह्यांच्या [सर्वे शिलोच्चयाः सर्वाः स्रवन्त्याह्रदास्तीर्थान्यृषिनिवासा गोष्ठपरिस्कन्दा इति देशाः ॥ गौ. १९·१४.] सूत्रात सामान्य असलेल्या एका सूत्रात (गौ. १९·१४) असे म्हटले आहे की सर्व पर्वत, सर्व नद्या, पवित्र सरोवरे, तीर्थे, ऋषींची वसतिस्थाने, गाईचे गोठे आणि देवालये हे प्रदेश पवित्र आणि पापनाशक असतात. पुराणात आणि काव्यग्रथांत हिमालयाला देवतात्मा म्हटले असून त्याचे सर्व प्रदेश पवित्र असतात असे वर्णन केले आहे. (वायु. ७७-११७; कुमारसंभव १·१). बर्फाच्छादित शिखरे असणाऱ्या पर्वतांची, अनेक लोकांचे पोषण करणाऱ्या मोठ्या नद्यांची आणि मोठाल्या अरण्यांची शोभा आणि भव्यता पाहून बहुतेक सर्व लोकांच्या मनावर साहजिकपणे फार परिणाम होतो आणि त्यांच्या अंगी काही तरी देवी सामर्थ्य असावे असे वाटू लागते.

सूत्रग्रंथात आणि मनु, याज्ञवल्क्य ह्यांच्यासारख्या प्राचीन स्मृतीमध्ये तीर्थांना फारसे महत्व देण्यात आलेले नाही. परंतु महाभारत आणि पुराणे ह्यात तीर्थांची अतिशय प्रशंसा केलेली असून त्यांचे महत्व यज्ञांपेक्षाही अधिक असल्याचे वर्णन केले आहे. तथापि तीर्थशात्रेचे संपूर्ण फल मिळवावयाचे असल्यास उच्च नैतिक आणि आध्यात्मिक गुण संपादन करणे अति महत्वाचे आहे असेही महाभारतात (वन ८२·९-१२) आणि पुराणात (स्कंद, काशी ६·४८-५१) म्हटले आहे. स्कंद, पद्म ह्यांच्यासाररख्या काही पुराणात असे सांगितले आहे की भूमीवरील तीर्थाप्रमाणेच सत्य, दम, इंद्रियनिग्रह, ब्रह्मचर्य प्रभृति सद्‌गुण हे तीर्थे असतात आणि मनाची शुद्धता हे सर्वात श्रेष्ठ तीर्थ असते. लोभी, ढोंगी, अशासारख्या मनुष्यांनी सर्व तीर्थांत स्नाने केली तरीदेखील ते पातकीच राहतात. मासे पुण्ययकारक जलात उत्पन्न होतात आणि तेथेच राहात असतात तरी त्यांची मने शुद्ध झालेली नसल्यामुळे ते स्वर्गाला जात नाहीत. (स्कंद काशी ६·१, पद्म, उत्तरार्ध ३·२३७).

तीर्थांची संख्या अगणित आहे. मत्स्यपुराणात (११०·७) म्हटले आहे की आकाशात, अंतरिक्षात आणि पृथ्वीवर ३॥ कोटी तीर्थे असून त्या सर्वांचा गंगा नदीत समावेश होतो. वनपर्वात (८३·२०२) म्हटले आहे की पुष्करतीर्थात दशसहस्र कोटी तीर्थे वास करितात. वेळोवेळी पूर्वीच्या तीर्थात नवीन तीर्थांची भर पडत गेली आणि. त्या ठिकाणी राहणाऱ्या कायमच्या रहिवाशांना आणि विशेषतः तीर्थोपाध्यायांना होणाऱ्या द्रव्यप्राप्तीच्या योगाने त्या लोकांना संशयास्पद स्वरूपाची अनेक माहात्म्ये रचण्याला उत्तेजन मिळाले आणि त्यांनी ती माहात्म्ये महाभारत आणि पुराणे ह्यांचा प्रसिद्ध कर्ता व्यास ह्याच्या नावावर प्रसिद्ध केली. बहुतेक निबंधग्रंथकारांनी ह्या बाबतीत निवड करण्याचा मार्ग स्वीकारला आहे आणि त्यांनी आपआपल्या ग्रंथात प्रसिद्ध आणि आपल्यास विशेष माहिती असणारी, अशाच तीर्थांचा समावेश केला आहे. पुराणे, माहात्म्ये आणि निबंधग्रंथ यात फार अतिशयोक्ती करण्याची प्रवृत्ती आढळते. एखाद्या तीर्थाचे वर्णन वाचले तर कोणाला असे वाटण्याचा संभव आहे की त्या विशिष्ट तीर्थाची यात्रा केल्याने स्वतःच्या ह्या आणि पुढील अनेक जन्मातील सर्व इच्छा पूर्ण होतील आणि त्या दुसऱ्या कोणत्याही तीर्थाला जाण्याची अथवा कोणता यज्ञ करण्याची आवश्यकता राहणार नाही. मत्स्य पुराणात (१८२-१६।१७) म्हटले आहे की काशी येथे मृत्यूपर्यंत केवळ वास करण्याने मनुष्य ब्रह्महत्येच्या महापातकापासून मुक्त होतो इतकेच नाही तर तो जन्ममृत्यूच्या अखंडचक्रातून मुक्त होऊन त्याला पुन्हा जन्म येत नाही.

ब्रह्मपुराणात (७०·१६-१९) तीर्थाचे चार प्रकार सांगितले आहेत : **दव** (देवांनी निर्माण केलेली), **आसुर** ('गयासुरासारख्या असुराशी संबंध असणारी), **आर्ष** (प्रभास, नरनारायण ह्यांच्यासारखी ऋषींनी स्थापन केलेली) आणि **मानुष** (अंबरीष, मनु, कुरु ह्यांच्यासारख्या राजांनी उत्पन्न केलेली).

तीर्थयात्रा करण्याचा **अधिकार** सर्व वर्णाच्या आणि आश्रमांतील पुरुषांनाच असतो असे नसून स्त्रियांना देखील असतो असे वनपर्वात (८२·३३-३४) म्हटले आहे. ब्रह्म पुराणात असे सांगितले आहे की ब्रह्मचाऱ्यांना त्यांच्या गुरूने आज्ञा केली तरच तीर्थयात्रा करिता येते आणि गृहस्थाश्रमी पुरुषाने जर त्याची पत्नी जिवंत असेल तर तिला बरोबर घेऊनच तीर्थयात्रेला गेले पाहिजे; तसे न केल्यास त्याला तीर्थयात्रेचे संपूर्ण फल प्राप्त होणार नाही. पवित्र तीर्थाची यात्रा करणे हे कृत्य स्त्रिया आणि शूद्र ह्यांच्या बाबतीत पातकयुक्त असल्याचे [जपस्तपस्तीर्थयात्रा प्रव्रज्या मन्त्रसाधनम्।
देवताराधनं चेति स्त्रीशूद्रपतनानि षट्॥ तीर्थप्रकाश (पा. २१).] स्मृतिग्रंथात (तीर्थ प्र. पा. २१) सांगितले आहे परंतु ते वचन स्त्रियांच्या बाबतीत त्या पतीच्या संमतीशिवाय गेल्यास लागते आणि शूद्रांच्या बाबतीत विद्वान ब्राह्मणांची सेवा करणे ह्या त्यांच्या मुख्य कर्तव्याशी विरोध येईल अशा रीतीने केलेल्या तीर्थयात्रेला लागते.

हिंदु स्त्रीला तिच्या पतीच्या मिळकतीवर जरी मर्यादित अधिकार असतो तरी तिला आपल्या पतीच्या पारलौकिक हिताकरिता श्राद्ध करण्याकरिता गयेची अथवा पंढरपुरची यात्रा करण्याला लागणाऱ्या खर्चाकरिता आपल्या पतीच्या मिळकतीचा लहानसा भाग विकण्याचा हक्क असतो असे निर्णय न्यायालयांनी दिले आहेत. .. (गणपत वि. तुळशीराम, ३६ मुंबई ८८).

बृहस्पतीच्या [तीर्थे विवाहे यात्रायां संग्रामे देशविप्लवे।
नगरग्रामदाहे च स्पृष्टास्पृष्टिनं दुष्यति॥
बृहस्पती (कल्पतरू–शुद्धि पा १६९, स्मृ. चं १ पा ११२)] (स्मृ. चं. १ पा. १२२) एका वचनात असे म्हटले आहे की पवित्र क्षेत्रात, विवाह समारंभात, धार्मिक समारंभात अथवा मिरवणुकीत, युद्धप्रसंगी, देशावर परचक्र आले असताना, अथवा एखाद्या गावाला आग लागली असताना अस्पृश्य व्यक्तीचा अथवा वस्तूचा स्पर्श झाल्यास

कोणताही दोष लागत नाही.

तीर्थयात्रा करण्याला उत्तेजन देण्याकरिता धर्मशास्त्रकारांनी (विष्णु ध. सू. ५·१३२-१३३) असा नियम घालून ठेवला आहे की तीर्थयात्रा करणाऱ्याकडून नदीपार करण्याबद्दल नाववाल्याने मूल्य घेऊ नये, जकात वसूल करणाऱ्याने जकात घेऊ नये. हा नियम हिंदु राजे देखील पाळीत नसत आणि मुसलमान राजांनी तर यात्रेकरूवर कर बसविले होते. कोणी कवींद्राचार्य नावाच्या थोर ग्रंथकाराने आपल्या वक्तृत्वाने शहाजहान बादशहाचे मन वळवून प्रयाग आणि गया येथे जाणाऱ्या हिंदु यात्रेकरूवरील कर माफ करविला होता असे इतिहासावरून समजते. (कवीन्द-चन्द्रोदय पा. २३).

यात्रेला निघताना काही विशिष्ट विधी करावयास सांगितले आहेत (ब्रह्मपुराण तीर्थकल्प पा. ६). यात्रेला निघण्याचे ठरविलेल्या दिवसाच्या पूर्व दिवशी फक्त एक वेळ भोजन करावे, दुसऱ्या दिवशी क्षौर करावे आणि उपोषण करावे. नंतर संकल्प करावा. अशा संकल्पामध्ये जेथे जेथे जाण्याचा बेत असेल अशा सर्व पुण्यक्षेत्रांची नावे समाविष्ट न करता अशा क्षेत्रांपैकी शेवटी असणाऱ्या क्षेत्राचे तेवढे नाव घालावे म्हणजे त्याच्या आधी लागणाऱ्या सर्व क्षेत्रांचा त्यात अंतर्भाव होईल. अथवा पहिल्याने लागणाऱ्या क्षेत्राचा संकल्प करावा आणि तेथे गेल्यावर त्याच्या पुढील क्षेत्राचा संकल्प करावा. नंतर गणेशादी देवतांची पूजा करून पार्वण श्राद्ध करावे आणि त्यात विपुल तूप द्यावे. निदान तीन ब्राह्मणांचा सत्कार करावा आणि त्यांना काही द्रव्य दान द्यावे. नंतर शास्त्रात सांगितल्याप्रमाणे यात्रेचा पोषाख घालावा. ह्या पोषाखाला कार्पटी पोषाख म्हणतात. ह्यात तांब्याची आंगठी, तांब्याचे कडे आणि तांबूस रंगाची वस्त्रे धारण करावयाची असतात. कोणाच्या मते हा पोषाख फक्त गया येथे धारण करावयाचा असतो आणि कोणाच्या मते सर्व तीर्थांना जाताना धारण करावयाचा असतो. नंतर गावाला अथवा स्वतःच्या घराला प्रदक्षिणा घालावी (वायुपुराण ११०·२।३). एक कोसापेक्षा दूर नसणाऱ्या दुसऱ्या गावी जावे. गयेला जावयाचे असल्यास श्राद्धाकरिता शिजविलेल्या अन्नामधील उरलेले अन्न आणि तूप भक्षण करावे आणि उपोषण सोडावे. अन्य तीर्थांनाजावयाचे असल्यास उपोषण घरीच सोडावे आणि नंतर प्रवासाला प्रारंभ करावा. दुसऱ्या दिवशी स्वतःच्या कपड्यासह स्नान करून यात्रेचा पोषाख धारण करावा आणि पूर्वेकडे मुख करून मध्याह्न काळापूर्वी तीर्थयात्रेला सुरुवात करावी. शक्य तर अनवाणी चालावे.

तीर्थयात्रा कोणत्या साधनाने करावी ह्याबद्दल पुराणात आणि निबंधग्रंथात अनेक नियम दिले आहेत. प्रयाग येथे बैलांनी ओढलेल्या वाहनात बसून जाऊ नये असे मत्स्यपुराणात (१०६·४।९) सांगितले आहे. आणि हा नियम फक्त प्रयागच्या यात्रेपुरताच आहे असे काही निधंधग्रंथात म्हटले आहे. घोड्यावर अथवा घोड्याने ओढलेल्या वाहनात बसून प्रवास केल्यास यात्रेचे फल मुळीच मिळत नाही, पालखीत बसून गेल्यास अर्धे फल मिळते परंतु अनवाणी चालत गेल्यास संपूर्ण फल प्राप्त होते. नेहमी पादत्राणे घालून प्रवास करावा, उन्हाळ्यात आणि पावसाळ्यात छत्री घेऊन प्रवास करावा. अरण्यातून जाताना हातात काठी घ्यावी असेही नियम कोणी सांगितले आहेत. गंगासागरसारख्या ज्याठिकाणी अन्य मार्गाने जाता येत नाही तेथे गलबतातून जाण्यास हरकत नाही.

तीर्थयात्रेला निघताना क्षौर करावे अथवा नाही ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे. तीर्थावर गेल्यानंतर देखील क्षौर कोठे करावे ह्याबद्दल मतभेद आहे. क्षौर आणि मुंडन ह्यात भेद असतो. केवळ मस्तकावरील केस काढणे ह्याला क्षौर म्हणतात आणि मस्तकावरील तसेच दाढीमिशा ह्यांचे केस काढणे ह्याला मुंडण म्हणतात. नारदीय पुराणात म्हटले आहे की गया येथे फक्त मुंडनाचा निषेध असतो आणि गंगानदीवर

प्रयागाव्यतिरिक्त अन्य कोठेही मुंडन सांगितलेले नाही. (नारदीय उत्तर ६२·५४ आणि ६२·५२). पतियुक्त स्त्रियांच्या बाबतीत दोन (अथवा तीन) बोटे लांबीचे केसच फक्त कापण्यात येतात.

अशा तऱ्हेच्या मतवैचित्र्यामुळे अखेरचा निर्णय प्रत्येक देशातील रुढीवर अथवा व्यक्तीच्या इच्छेवर अवलंबून राहतो.

यात्रेचे फल **प्रतिनिधिद्वारा** प्राप्त करून घेता येते असे स्मृतींनी आणि पुराणांनी सांगितले आहे. एखाद्या मनुष्याचा प्रतिनिधी म्हणून कुशाची केलेली प्रतिमा पवित्र तीर्थातील पाण्यात बुचकळल्यास त्या मनुष्याला (त्याने स्वतः स्नान करून मिळाले असते त्याच्या) अष्टमांश पुण्य प्राप्त होते. स्वतःची माता, पिता, गुरु, स्नेही ह्यांच्या हिताकरिता कोणी एखाद्या क्षेत्रात स्नान केले तर त्या व्यक्तींना त्या तीर्थयात्रेचे द्वादशांश फल मिळते. (अत्रि ५०·५१). जो कोणी मोल घेऊन पुण्यक्षेत्रांची यात्रा करितो त्याला फक्त सोळावा भाग फल मिळते. जो विद्याभ्यास, व्यापार ह्यांच्यासारख्या दुसऱ्या काही कामाकरिता तीर्थाला जातो त्याला अर्धे फल मिळते. (पैठीनसी). जो धनिक मनुष्य स्वतःचे द्रव्य खर्चून अथवा वाहनांची व्यवस्था करून दुसऱ्या कोणाला तीर्थयात्रा करण्याला साह्य करितो त्याला त्या यात्रेचे चतुर्थांश फल मिळते. (प्रभासखण्ड)

पुण्यक्षेत्रातील ब्राह्मणांच्या योग्यतेविषयी चिकित्सा करू नये असे सांगितले आहे. (पद्म. ५·२९·२१२). तथापि श्राद्धाला आमंत्रण करताना ज्या ब्राह्मणाच्या ठिकाणी निषेधार्ह दोष असल्याचे निश्चित माहित असेल त्याला वगळावा असे निबंधग्रंथात म्हटले आहे. (कल्पतरु पा. १०). गया येथे ब्रह्मदेवाने तेथे स्थापन केलेल्या ब्राह्मणांनाच फक्त आमंत्रण करावे, ते तृप्त झाले म्हणजे पितरांसह देव तृप्त होतात. अशा तऱ्हेच्या पुराणात (वायु ८२·२५।२७) वर्णन केलेल्या कथांचा असा परिणाम झाला की गया येथील ब्राह्मण ही एक धंदेवाईक संस्था बनली आणि ते दुसऱ्या कोणास प्रवेश करण्यास प्रतिकार करतात. तथापि गयावळांना असा अधिकार नाही आणि कोणीही यात्रेकरू कोणालाही आपला पुरोहित नेमू शकतो असे न्यायालयांनी निर्णय दिले आहेत.

धर्मशास्त्रात समाविष्ट होणाऱ्या कोणत्याही विषयावरील ग्रंथापेक्षा तीर्थासंबंधीचे ग्रंथ बहुधा सर्वात अधिक आहेत. महाभारत आणि पुराणे ह्यात तीर्थे, उपतीर्थे आणि त्यांच्या संबंधीच्या आख्यायिका ह्यासंबंधी आलेल्या श्लोकांची संख्या निदान ४०,००० भरेल. ह्याशिवाय कल्पतरु, त्रिस्थली, सेतु ह्यांच्यासारखे सुप्रसिद्ध निबंधग्रंथ आणि तीर्थासंबंधी ग्रंथ आहेत. तीर्थासंबंधी अद्यापपर्यंत न छापलेलेही अनेक ग्रंथ आहेत; शिवाय एकेका तीर्थाची वर्णने केलेलेही अनेक ग्रंथ आहेत.

# प्रकरण १२

## गंगानदी – प्रयाग

(मू. ग्रं. पा. ४।५८५-६१७)

गंगा नदी सर्व नद्यांमध्ये अधिक पवित्र आहे आणि तिच्या काठी कनखल, हरिद्वार, प्रयाग आणि काशी ह्यांच्यासारखी फार प्रशंसनीय तीर्थे आहेत म्हणून व्यक्तिशः तीर्थाच्या वर्णनाला गंगेपासून प्रारंभ करणे अत्यंत उचित होईल. ऋग्वेदातील नदीस्तुती सूक्तामध्ये (१०·७५·५-६) वर्णन केलेल्या नद्यात गंगा ही पहिली नदी आहे. महाभारत आणि अनेक पुराणे ह्यात गंगेच्या श्रेष्ठत्वाबद्दल आणि तिच्या पावित्र्याबद्दल शतावधी श्लोक आले आहेत. गंगेसारख्या मोठ्या नद्या आणि हिमालयासारखे थोर पर्वत ह्यांच्याकडे भारतातील बहुतेक लोक दोन दृष्टीने पाहतात. त्या म्हणजे एक दृष्टी त्यांच्या बाह्य स्वरूपाविषयीची आणि दुसरी दृष्टी त्यांच्या आध्यात्मिक सामर्थ्याविषयीची. कोणत्याही मोठ्या नदीमध्ये तिच्यामधील पाण्याच्या परिमाणाशिवाय तिला सामर्थ्य देणारे एक आध्यात्मिक अथवा दैवी चैतन्य वास करीत असते असे मानले जाते. गंगेचा आणि तिच्या यात्रेचा गौरव करणारे अनेक स्वतंत्र ग्रंथ आहेत. उदाहरणार्थ, गणेश्वरकृत गंगापट्टलक (रचना इ. स. १३५०), मिथिलाधिपति पद्मसिंहाची राणी विश्वासदेवीकृत गंगावाक्यावली, गणपतीकृत गंगाभक्तितरंगिणी, वर्धमानकृत गंगाकृत्यविवेक, इत्यादी.

वनपर्वात (५८·८८।९७) म्हटले आहे [पुनाति कीर्तिता पापं दृष्टा भद्रं प्रयच्छति।
अवगाढा च पीता च पुनात्यासप्तमं कुलम् ॥
वनपूर्व (८५,८८).] की कलियुगात गंगा सर्वात पवित्र असून तिच्या नावाचा उच्चार केल्यास ती पापी मनुष्याला पापमुक्त करते, तिच्या दर्शनाने चांगले ऐश्वर्य प्राप्त करून देते, तिच्यामध्ये स्नान केल्यास ती सातव्या पिढीतील पूर्वजांपर्यंत स्नान करणाऱ्याच्या कुलाला पवित्र करते. अनुशासन पर्वात (२६·३१) म्हटले आहे की गंगेच्या पवित्र उदकात स्नान केल्याने मनुष्याला पुण्याची जी प्राप्ती होते तशी प्राप्ती शतावधी वेदोक्त यज्ञयाग केल्यानेही होत नाही. मनुस्मृतीतील (८·९२) वर्णनावरून असे दिसून येते त्या ग्रंथाच्या काळी गंगानदी आणि कुरुक्षेत्र ही सर्वात अधिक पवित्र स्थाने समजली जात असत. विष्णु पुराणात (२०८·१०९) गंगा नदी विष्णूच्या डाव्या पावलापासून उगम पावली असल्याचे सांगितले आहे. काही पुराणात (मत्स्य १२१·३८।४१) असे वर्णन केले आहे की शंकरांनी आपल्या जटेतून गंगेचे सात प्रवाह सोडून दिले. त्यातील नलिनी, ल्हादिनी, पावनी हे तीन प्रवाह पूर्वेकडे जातात; सीता, चक्षु, सिंधु हे तीन प्रवाह पश्चिमेकडे जातात आणि भागीरथी दक्षिणेकडे येते. कूर्म (१·४६-३१) प्रभृति काही पुराणांनी असे म्हटले आहे की गंगानदी प्रथमतः सीता, अलकनंदा, सुचक्षु आणि भद्रा अशा चार प्रवाहांनी वाहते. आणि नंतर अलकनंदा दक्षिणेकडे वाहत जाऊन भारतवर्षात येते आणि सात मुखांनी समुद्राला मिळते.

गंगेच्या पुण्यक्षेत्राची व्याप्ती किती असते ह्याबद्दल नारदीय पुराणात (उत्तर ४३·११९।१२०) म्हटले आहे की गंगेच्या तीरापासून एक गव्युती (सुमारे २ मैल) अंतरापर्यंतच्या प्रदेशाला **क्षेत्र** असे म्हणतात. मनुष्याने अशा क्षेत्राच्या मर्यादेत राहावे परंतु गंगेच्या तीरावरच राहू नये. गंगेच्या तीरावर वास करणे इष्ट नसते. त्याच पुराणात (उत्तर ४३·११६-११८) सांगितले आहे की भाद्रपद कृष्ण चतुर्दशीच्या दिवशी नदीचे पाणी जेथपर्यंत पोहोचते. तेथपर्यंतच्या प्रदेशाला**'गर्भ'** अशी संज्ञा आहे, त्याच्या पलिकडील १५० हस्ताइतक्या भागाला **'तीर'** म्हणतात आणि प्रत्येक तीरापासून दोन क्रोशपर्यंतच्या भागाला **'क्षेत्र'** म्हणतात. ब्रह्मपुराणातही तसेच सांगितले आहे. (प्राय. तत्व. पा. ४९९).

कोणी यात्रेकरू गंगेपर्यंत येऊन पोहोचला म्हणजे त्याने प्रथम स्नानाचा संकल्प करावयाचा असतो. त्यासंबंधी निरनिराळ्या निबंधग्रंथात अनेक पर्याय दिले आहेत. मत्स्यपुराणात (अ. १०२) वर्णन केलेली पद्धती सर्व वर्णाच्या आणि वेदशाखांच्या लोकांना लागू पडण्यासारखी सर्वसामान्य आहे. त्यात म्हटले आहे की स्नानाशिवाय शारीरिक शुद्धता आणि शुद्ध विचार असू शकत नाहीत. ह्याकरिता मन शुद्ध करण्यासाठी प्रथमतः स्नान करावे असे धर्मशास्त्रात सांगितले आहे. स्नानाकरिता एखादे पवित्रस्थान निश्चित करावे आणि गंगेचे आवाहन करावे. आणि तिची प्रार्थना करावी. स्नान करणाऱ्याने आपले हात जुळून त्यात पाणी घेऊन त्यावर सात वेळा मंत्राचा उच्चार करावा आणि ते पाणी आपल्या मस्तकावर तीन, चार, पाच अथवा सात वेळा उडवावे. नंतर नदीच्या तीरावरील मातीची प्रार्थना करावी. नंतर स्नान करावे आणि आचमन करून गंगेच्या बाहेर यावे. दोन शुभ्र आणि स्वच्छ वस्त्रे परिधान करावी. नंतर तीन लोकांप्रीत्यर्थ आपल्या स्वतःच्या पितरांप्रीत्यर्थ तर्पण करावे. नंतर ब्राम्हण, सुवर्ण आणि गाय ह्यांना स्पर्श करावा आणि विष्णूच्या देवालयात अथवा स्वतःच्या घरी जावे.

विष्णु. ध. सू. (१९·११।१२) मध्ये अशी शिफारस केली आहे की दहन केलेल्या देहाची रक्षा अथवा अस्थि गंगेमध्ये प्रयाग, काशी अथवा दुसऱ्या पवित्र क्षेत्रांच्या ठिकाणी टाकाव्या. एखाद्या मनुष्याचे हाड (अथवा हाडाचा कण) गंगेच्या पाण्यात जोपर्यंत राहतो तोपर्यंत तो मनुष्य स्वर्गात राहतो असे अग्निपुराणात म्हटले आहे. अस्थींप्रमाणेच मृताची नखे अथवा केस देखील गंगेत टाकल्याने तेच फल प्राप्त होते असे नारदीय पुराणात (उत्तर ६२·५१) सांगितले आहे.

अमावास्या, संक्रांती, ग्रहण ह्यांच्यासारख्या विशिष्ट दिवशी गंगेत स्नान केल्यास अतिशय पुण्य प्राप्त होते असे काशीखंडात (२७·१२९-१३१) सांगितले आहे.

**त्रिस्थली.** प्रयाग काशी आणि गया ह्या तीन मोठ्या तीर्थांना त्रिस्थली असे म्हणतात. ह्या तीन तीर्थाचे विवेचन ह्यापुढे ह्याच अनुक्रमाने करण्यात येईल. नारायणभट्ट ह्या प्रसिद्ध ग्रंथकाराने 'त्रिस्थली सेतु' ह्या नावाचा ग्रंथ इ. स. १५८० च्या सुमारास लिहिला असून त्यात ह्या तीन क्षेत्रांच्या तीर्थयात्रेचे विस्तृत विवेचन केले आहे.

**प्रयाग.** गंगा आणि यमुना ह्यांच्या संगमाचा एक अत्यंत प्राचीन उल्लेख एका खिलसूत्रात (ऋ. १०·७५) आला असून त्यात म्हटले आहे की ज्या ठिकाणी शुभ्र आणि कृष्ण असणाऱ्या नद्यांचा संगम होतो त्या ठिकाणी स्नान करणारे स्वर्गाला जातात, जे धैर्यवान लोक त्या ठिकाणी देहत्याग करतात त्यांना अमृतत्व प्राप्त होते. प्रयागाच्या महत्त्वाचे वर्णन महाभारतात (वन ८५·६९-९७ इ.) तसेच मत्स्य, कूर्म प्रभृति अनेक पुराणात आले आहे. रामायणात (२·५४·६) ह्या दोन नद्यांच्या संगमाचा उल्लेख केला आहे परंतु त्यातील वर्णनावरून सांप्रतकाळच्या प्रयागाच्या जागेवर त्याकाळी अरण्य होते असे दिसून येते. पद्मपुराणात (६·२३·२७।३५) प्रयागाला तीर्थराज म्हटले असून असे वर्णन केले आहे की त्या ठिकाणी ब्रह्मदेवाने यज्ञ केला. होता, त्याची एक वेदी प्रयाग येथे असून दुसऱ्या दोन कुरुक्षेत्र आणि गया येथे आहेत. प्रयाग येथे मृत्यू पावणारे पुन्हा जन्माला येत नाहीत असे कूर्म पुराणात (१·३६·२०) सांगितले आहे.

प्रयाग ह्या शब्दाच्या निरनिराळ्या व्युत्पत्ती निरनिराळ्या ग्रंथात दिल्या आहेत. उदाहरणार्थ, प्रयाग हा शब्द 'यज्' ह्या धातूपासून झाला असून ब्रह्मदेवाने प्राचीन काळी तेथे यज्ञ केला होता म्हणून त्याला

प्रयाग असे नाव पडले असे वनपर्वात (८७·१८।१९) म्हटले आहे. स्कंद पुराणात (काशी ७·४९) प्र आणि याग हे वेगवेगळे शब्द घेऊन सर्व यज्ञात ते श्रेष्ठ असल्यामुळे त्याला प्रयाग हे नाव पडले असे म्हटले आहे.

प्रयाग मंडल आणि प्रयाग अथवा त्रिवेणी ह्यात भेद आहे. प्रयागाचा परीघ ५ योजने असल्याचे मत्स्यपुराणात (१०८·९।१०) सांगितले आहे. ब्रह्मयूपापासून सर्व बाजूने १॥ योजनेइतकी जमीन धरली म्हणजे ५ योजनांचा परीघ होतो असे त्रिस्थली सेतु ह्या ग्रंथात (पा. १५) म्हटले असून हा प्रदेशाला **प्रयागमंडल** म्हणतात. **प्रयागाची** व्याप्ती पूर्वेस प्रतिष्ठान नावाचा कूप, उत्तरेस वासुकी डोह, पश्चिमेस कंबल आणि अश्वतरनाग आणि दक्षिणेस बहुमूलक अशी मत्स्य (१०४·५) ह्या ग्रंथात दिली आहे. ज्या ठिकाणी एखाद्या विशिष्ट उपतीर्थाचा उल्लेख केलेला नसेल त्या ठिकाणी प्रयाग येथील स्नान ह्याचा पुराणातील अर्थ वेणीमध्ये (म्हणजे दोन नद्यांच्या संगमात) स्नान असा असतो.

मत्स्यपुराणात (१११·४—१०) म्हटले आहे की कल्पाच्या शेवटी जेव्हा रुद्र सर्व विश्वाचा संहार करितो त्यावेळी प्रयाग क्षेत्राचा नाश होत नाही आणि त्या क्षेत्रात ब्रह्मा, विष्णु आणि महादेव गुप्त रीतीने वास करितात.

ब्रह्मांडपुराणातं [कुरुक्षेत्रे प्रयागे च गडःगासागरसडःगमे।
गडःगायां पुष्करे सेतौ गडःगाद्वारे च नैमिषे।
यद्दानं दीयते शक्त्या तदानन्त्याय कल्पते॥
ब्रह्माड (त्रिस्थलीसेतु पा. २४)].(त्रिस्थलीसेतु पा. २४) म्हटले आहे की कुरुक्षेत्र, **प्रयाग**, पुष्कर, सेतुबंध, गंगाद्वार, नैमिष, येथे आणि जेथे गंगा समुद्राला मिळते त्या स्थळी यात्रेकरू जी दाने आपल्या ऐपतीप्रमाणे देईल त्यांच्यापासून अक्षय फल प्राप्त होते.

प्रयाग येथे करावयाच्या निरनिराळ्या कृत्यांपैकी **वपन** हे एक असून शिष्ट आणि विद्वान लोक आणि निबंधग्रंथकार असे वपन आवश्यक असल्याचे मान्य करितात. त्रिस्थली सेतु ह्या ग्रंथात असे सांगितले आहे की प्रयागाच्या एकाच तीर्थयात्रेत विधिपूर्वक वपन फक्त एकदाच होते. उपनयन न झालेल्या मुलाचा जर चूडासंस्कार झालेला असेल तर त्याने देखील वपन केले पाहिजे. मनुष्याची सर्व पातके त्याच्या केसाच्या मुळाशी असतात अशा अर्थाच्या शास्त्रवचनाच्या आधारावर विधवा स्त्रियांनी इतकेच नव्हे तर पतियुक्त स्त्रियांनी देखील आपल्या मस्तकाचे वपन करावे असे काही लोक म्हणतात. दुसऱ्या कोणाच्या मताप्रमाणे पतियुक्त स्त्रियांनी आपल्या वेणीचा दोन अथवा तीन बोटे रुंदीचा भाग कापून त्रिवेणीमध्ये अर्पण करावा. वेणीसंबंधाचा हा नियम बहुधा गंगायमुना ह्या नद्यांच्या संगमाला लावलेल्या वेणी ह्या शब्दावरून सुचला असावा.

गंगा आणि यमुना ह्यांच्या संगमावर अथवा अक्षय वटाजवळ आत्महत्या केली तर पातक लागते किंवा नाही आणि अशी आत्महत्या कोणत्या प्रसंगी केली असता पापदायक होत नाही ह्या प्रश्नावर प्राचीन आणि मध्ययुगीन काळच्या अनेक ग्रंथकारांनी चर्चा केली आहे. आत्महत्येचा निषेध करण्याकडे धर्मशास्त्रांचा सर्वसाधारण कल असतो. परंतु त्या नियमाला जे अपवाद सांगितले आहेत त्यांत प्रयाग येथे संगमावर अथवा अक्षय वटाच्या खांदीवस्थ उडी मारून आत्महत्या करणे हा एक अपवाद असून अशा आत्महत्येला निषेध नाही असे पुराणांनी (पद्म सृष्टि. ६०-६५ इ.) सांगितले आहे. कालीदासासारख्या कवींनी देखील पवित्र संगमावर मृत्यू आल्यास तत्वज्ञान न होता देखील मोक्ष प्राप्त होतो असे मानल्यासारखे दिसून येते. अशा रीतीने अनेक राजांनी प्रयाग येथे अथवा तुंगभद्रेवर आत्महत्या केल्याची ऐतिहासिक उदाहरणे आहेत.

चिनी प्रवासी ह्युएनत्संग ह्यानेही धर्मभावनेने आत्महत्या करण्याच्या ह्या चालीचा उल्लेख केला आहे. जैन लोक अहिंसा तत्त्वाला अतिशय महत्व देत असताना देखील काही विशिष्ट परिस्थितीत धर्मबुद्धीने आत्महत्या (ह्याला 'सल्लेखना' अशी संज्ञा आहे) करण्याला उत्तेजन देत असत.

कालांतराने प्रयाग अथवा काशी येथे आत्महत्या करणे अथवा महाप्रस्थानाला निघणे ह्या कृत्याविषयी लोकमत विरुद्ध होत गेले आणि त्या कृत्यांचा कलियुगात वर्ज्य करावयाच्या कृत्यांत समावेश करण्यात आला.

**अक्षयवट.** प्रयागामध्ये समाविष्ट होणाऱ्या अनेक उपतीर्थात हे सर्वात महत्त्वाचे आहे. अक्षयवट म्हणजे नाश न पावणारे वडाचे झाड. ह्याच्या बुंध्यापाशी आत्महत्या करून मरण पावणारा विष्णुलोकाला अथवा रुद्र लोकाला जातो असे पुराणात (अग्नि, १११·१३ इ.) सांगितले आहे.

ह्याच्याशिवाय पुढील उपतीर्थांचे निरनिराळ्या पुराणात उल्लेख केले आहेत : **कंबल** आणि **अश्वतर** नावाचे दोन नाग. हे यमुनेच्या दक्षिण (आणि कोणाच्या मते उत्तर) तीरावर आहेत. (वनपर्व, मत्स्य, पद्य, आदि, अग्नि, कूर्म).

**प्रतिष्ठान** अथवा **समुद्रकूप**. वनपर्वावरून (८५·७७) हे प्रयागाचेच दुसरे नाव असावे. (वनपर्व, मत्स्य, कूर्म, पद्य, आदि). हा कूप गंगेच्या पूर्वच्या बाजूला आहे.

**संध्यावट** (मत्स्य, कूर्म, अग्नि).

**हंसप्रपतन.** हे स्थान प्रतिष्ठानाच्या उत्तरेला आणि गंगेच्या पूर्वेला आहे. (मत्स्य, कूर्म, अग्नि, पद्य, आदि).

**कोटितीर्थ**. (मत्स्य, कूर्म, अग्नि, पद्य, आदि).

**भोगवती.** ही प्रजापतीची वेदी वासुकीच्या उत्तरेला आहे (वनपर्व, मत्स्य, अग्नि, पद्य, आदि)

**दशाश्वमेधक.** (मत्स्य, पद्य, आदि).

**उर्वशीपुलिन**. (मत्स्य, पद्य, आदि, अग्नि, कूर्म).

**ऋणप्रमोचन.** यमुनेच्या उत्तर तीरावर आणि प्रयागाच्या दक्षिणेला (कूर्म, पद्य, आदि).

**मानस.** गंगेच्या उत्तर तीरावर (मत्स्य, पथ, आदि, अग्नि).

**अग्नितीर्थ.** यमुनेच्या दक्षिण तीरावर (मत्स्य, कूर्म, पद्य, आदि).

**विरज.** यमुनेच्या उत्तर तीरावर (पद्य, आदि)

**अनरक.** धर्मराजाच्या पश्चिमेला (कूर्म).

एखादा मनुष्य प्रयाग येथे जाताना मार्गांत प्रयागाचे स्मरण करीत मरण पावला तर त्यालां प्रयाग येथे न पोहोचतां देखील ब्रह्मलोकाची प्राप्ती होते असे मत्स्य पुराणात (१०५·८।१२) म्हटले आहे.

माघ महिन्यात संगमावर स्नान करण्याचे अतिशय माहात्म्य अनुशासन पर्वात (२५·३६।३७) आणि काही पुराणात (मत्स्य १०७·७) वर्णन केले आहे. पद्म आदि पुराणांनी माघ महिन्यातील तीन दिवस स्नान करावे असे म्हटले आहे. हे तीन दिवस कोणते ह्याबिषयी बराच मतभेद आहे. असे तीन दिवस कोणाच्या मताप्रमाणे मकरसंक्रमण, रथसप्तमी आणि माघी पूर्णिमा हे असतात; दुसऱ्या कोणाच्या मताप्रमाणे माघ शुद्ध १० पासून अनुक्रमाने तीन दिवस अथवा माघातील पहिले तीन दिवस अथवा माघ शु. १३ पासून अनुक्रमे तीन दिवस अथवा माघ महिन्यातील कोणतेही तीन दिवस असतात.

# प्रकरण १३

## काशी

(मू. ग्रं. पा. ४।६१८-६४२).

काशी अथवा वाराणसी पेक्षा अधिक प्राचीन असणारे, अखंड चालत आलेले आणि अधिक लोकप्रिय असे दुसरे नगर सर्व पृथ्वीमध्ये क्वचितच आढळेल. वाराणसी निदान तीस शतके तरी पवित्र क्षेत्र म्हणून समजली जात आहे. भारतातील कोणत्याही नगराच्या बाबतीत इतक्या प्रमाणावर हिंदूंच्या धार्मिक भावना उत्पन्न होत नाहीत. हिंदूंच्या मनाने काशी हे नगर धार्मिक पावित्र्याच्या आणि विद्वत्तेच्या फार मोठ्या आणि अखंड चालत आलेल्या परंपरेचे प्रतीक आहे. हिंदुधर्मच नव्हे तर जगातील मोठ्या धर्मांपैकी एक असणारा जो बुद्धधर्म त्याची तत्त्वे शाक्य मुनी गौतम ह्याने त्याला आत्मज्ञान झाल्यानंतर प्रथम ह्या ठिकाणीच प्रकट केली. रामायण, महाभारत आणि पुराणे ह्यात काशीसंबंधी सहस्रवधि श्लोक आढळतात. ह्या नगरासंबंधी गेल्या कित्येक शतकात अनेक ग्रंथ लिहिले गेले आहेत.

शत. ब्रा. (१३·५·४·२१) मध्ये उद्धृत केलेल्या गाथांमध्ये काशीचा उल्लेख आला आहे. ब्राह्मण ग्रंथांच्या काळी काशी ही काशी देशाची राजधानी असून ती वारणावती नदीच्या काठावर होती. बृह. उप. (२·१·१) कौषीतकी उप. (४·१), पाणिनीचे व्याकरण (४·२·११६) ह्यांच्यासारख्या प्राचीन ग्रंथांत काशीचे उल्लेख आले आहेत. वेदानंतरच्या काळात झालेल्या रामायण, भारता— (मनु. ३०·१० इ.) सारख्या आदिकाव्यांत आणि पुराणांत (वायु अ. ९२ ब्रह्म अ.११) काशी ह्या अत्यंत पवित्र नगराची स्थापना दिवोदासाने केली असल्याची वर्णने आली आहेत. ह्या दिवोदासाचा उल्लेख ऋग्वेदामध्ये- (४·३०·२०) ही केला असून इंद्राने दिवोदासाला १०० दगडी नगरे दिल्याचे वर्णन केले आहे. पतंजलीच्या महाभाष्यात (खंड २ पा. ४१३) काशी येथे तयार केलेल्या तलम कापडाचा उल्लेख केला आहे. ह्या सर्व उल्लेखांवरून असे दिसून येते की शत. ब्रा. च्या रचनेच्या पुष्कळ पूर्वी काशी हे एका देशाचे नाव होते आणि ते नाव ख्रि. पू. २ ऱ्या शतकापर्यंत चालू होते. फा हि एन हा चिनी प्रवासी काशी राज्यातील वाराणसी ह्या नगराला आला होता असे त्याच्या लेखावरून दिसते. ह्यावरून इ. स. ४०० च्या सुमारापर्यंत देखील काशी हे एका देशाचे नाव असून वाराणसी ही त्या देशाची राजधानी होती असे दिसते. महाभाष्यात केलेल्या उल्लेखावरून त्या ग्रंथाच्या काळी काशी हे एका नगराचे नाव झाले होते आणि एका देशाचेही नाव होते असे दिसते. अनुशासन पर्वात (अ. ३०) अशी कथा आली आहे की सुदेवाचा पुत्र दिवोदास ह्याने गोमती नदीच्या उत्तर तीरावर वाराणसी नावाचे सर्व वर्णाच्या लोकांची दाट वस्ती असलेले एक नगर स्थापन केले.

हरिवंश पुराणात (खं. १ अ.२९) दिवोदास आणि वाराणसी ह्यांच्यासंबंधी एक विस्तृत आणि काहीशी गुंतागुंतीची कथा आली आहे. त्यात असे वर्णन केले आहे की धन्वंतरी हा काशीचा राजा होता आणि त्याचा पौत्र दिवोदास होता. दिवोदासाने हस्तगत केलेल्या वाराणसी नगराचा नाश करण्याकरिता शंकरांनी निकुंभ नावाचा गण पाठविला होता. त्याने वाराणसी नगर १०००वर्षे ओसाड राहील असा शाप दिला. जेव्हा ते नगर ओसाड पडले तेव्हा त्याला अविमुक्त असे नाव पडले आणि शंकर तेथे येऊन राहू लागले. पुढे दिवोदासाचा पौत्र आणि काशीचा राजा अलर्क ह्याने वाराणसीची पुन्हा स्थापना केली. ह्या कथेमध्ये सत्याचा एवढाच अंश असण्याचा संभव आहे की वाराणसी हे नगर अनेक वेळा ओसाड पडले होते. आणि पुष्कळ वेळा निरनिराळ्या राजांच्या ताब्यात गेले होते. वायु (अ. ९२) आणि ब्रह्म (अ.११) पुराणात देखील धन्वंतरी, दिवोदास आणि वाराणसी ह्यांच्यासंबंधी कथा आल्या आहेत.

पतंजलीच्या महाभाष्यात (खंड १ पा. ३८०) वाराणसी गंगेच्या काठावर असल्याची आणि तिला व्यापारी लोक जित्वरी असे म्हणत असल्याची माहिती दिली आहे.

बुद्धधर्माच्या जातक ग्रंथांवरून असे समजते की बुद्धाच्या काळी (ख्रि. पू. ५ व्या शतकापूर्वी) वाराणसी हे एक मोठे आणि सुप्रसिद्ध नगर असून ते एक अत्यंत पवित्र क्षेत्र आणि आर्यांच्या संस्कृतीचे केन्द्र झाले होते.

विष्णु पुराणात (५·३४) पौंड्रक वासुदेवाची कथा आली आहे. त्याला काशीच्या राजाचे साह्य होते. कृष्णाने पौंड्रकाचा वध केल्यावर त्याच्या पुत्राने शंकरांना प्रसन्न करून घेतले आणि त्यांच्यापासून एक कृत्या मिळविली. त्या कृत्येने वाराणसीमध्ये प्रवेश केला आणि तिचा पाठलाग करणाऱ्या कृष्णाच्या चक्राने वाराणसी नगरच जाळून टाकले. ह्या कथेत काशी, वाराणसी आणि अविमुक्त ही नावे समान अर्थाने आली आहेत. ही कथा महाभारत (सभा अ. १४·१८-२०) आणि ब्रह्मपुराण (अ. २०७) ह्यातही आली आहे. ह्या कथेवरून काही लोकांनी असा निष्कर्ष काढला आहे की महादेव हे अनार्य लोंकांचे दैवत होते आणि वाराणसी हे आर्यांच्या भारतातील आगमनानंतर अनार्य लोकांच्या संप्रदायाचे केन्द्र होते. ह्या निष्कर्षांना घेतलेला आधार डळमळित आहे. पुराणात वर्णन केलेल्या काही थोडया कथा लोकांच्या मनरंजनाकरिता गूढ, अद्‌भुत, भयानक अशी वर्णने करण्याच्या हेतूने सांगितलेल्या आहेत. आणि त्यांच्या वरून पुराणांच्या पूर्वी सहस्त्रावधी वर्षे अस्तित्वात असलेल्या परिस्थितीसंबंधी दूरान्वित आणि ऐतिहासिक निष्कर्ष काढणे सयुक्तिक होणार नाही.

अनेक शतकेपर्यंत वाराणसी हे क्षेत्र वाराणसी, काशी, अविमुक्त, आनंदकानन आणि महास्मशान ह्या पाच नावांनी प्रसिद्ध आहे. काशीखंडात (२६·३४) ह्या नावाच्या व्युत्पत्या दिल्या आहेत. **वाराणसी** हे नाव त्या नगराच्या उत्तर आणि दक्षिण सीमा असलेल्या वारणा आणि असि ह्या नद्यांवरून पडले आहे. जाबालोपनिषदात (२ रा परिच्छेद) ह्या नदीचे नाव नासी असे दिले आहे. आणि त्याचे कारण ती नदी सर्व पातके नष्ट करते असे दिले आहे. निर्वाणाच्या (मोक्षाच्या) मार्गावर हे नगर प्रकाश पाडते म्हणून त्याला **काशी** हे नाव पडले. शंकर (आणि पार्वती) ह्या क्षेत्राचा केव्हाही त्याग करीत नाहीत म्हणून त्याला **अविमुक्त** असे नाव पडले. अवि म्हणजे पाप आणि हे क्षेत्र पापापासून मुक्त असल्यामुळे त्याला अविमुक्त असे म्हणतात असे लिंगपुराणात (पूर्वार्ध ९२·१४३) म्हटलें आहे. वाराणसी क्षेत्र शंकराना फार प्रिय आहे आणि त्यांना त्याच्यापासून फार आनंद होतो म्हणून त्याला **आनंदकानन** अथवा **आनंदवन** हे नाव पडलें. वाराणसी येथे मृत्यू आल्यास मनुष्य संसारातून मुक्त होतो अशी भावना असल्याकारणाने वृद्ध, पंगु असे लोक वाराणसी येथे गर्दी करतात. आसन्नमरण झालेल्या लोकांना गंगेच्या काठावर आणून ठेवतात आणि मेल्यानंतर त्यांचे तेथे दहन करितात. त्यामुळे गंगेच्या काठी मणिकर्णिका घाटावर प्रेतांचे दहन नेहमी चाललेले दिसून येते. म्हणून ह्या क्षेत्राला **महास्मशान** अथवा **स्मशान** म्हणतात. इतर ठिकाणी स्मशान हे स्थळ अपवित्र मानले जाते परंतु गंगा असलेले हे क्षेत्र अत्यंत पवित्र मानले जाते. ज्यावेळी कल्पाच्या अंती जगाचा अंतसमय प्राप्त होतो तेव्हा पंचमहाभूते ह्या ठिकाणी प्रेतरूपाने पडून राहतात असे स्कंद पुराणात (काशी खंडात) म्हटले आहे. (३०·१०३-१०४)

काशी, वाराणसी आणि अविमुक्त ही नावे पुराणात सामान्यतः समानार्थाने योजण्यात येतात तरी काही ठिकाणी त्यांच्या अर्थामध्ये भेद केलेला आढळतो. वाराणसी हे नाव ज्या प्रदेशाला लावण्यात येत असे

त्याच्या चतुःसीमा पुढील प्रमाणे होत्या : पूर्वेला गंगा नदी, दक्षिणेला असि, पश्चिमेला देहली विनायकाचे मंदिर आणि उत्तरेला वरणा नदी. (पद्म. पाताल- त्रिस्थ. से. पा. १००). इ. स. च्या ७ व्या शतकात आलेल्या ह्यु एनत्संगाने असे वर्णन केले आहे की वाराणसीची लांबी १८ ली (सुमारे ३ ॥ मैल) आणि रुंदी ५ ते ६ ली (सुमारे १ मैलापेक्षा थोडी अधिक) होती. ह्यावरून असे उघड होते की त्याकाळी ह्या नगरच्या दोन सीमा हल्लीप्रमाणेच वरणा आणि असि ह्या होत्या.

काही पुराणात असे वर्णन केले आहे की काशी क्षेत्रात प्रत्येक पावलागणिक पवित्र क्षेत्र असते आणि ज्या ठिकाणी शंकराचे लिंग नाही अशी तिळाएवढी देखील जागा काशीमध्ये [तीर्थानि सन्ति भूयांसि काश्यामत्र पदे पदे। न पत्र्चनदतीर्थस्य कोट्यंशेन समान्यपि ॥

स्कन्द-काशीखंड (५९·११८).] नाही. (स्कंद-काशी ५९·११८; १०·१०३) ह्युयएनत्संगाच्या काळी वाराणसी येथे १०० देवालये होती आणि त्यातील एका देवालयातील महेश्वराची तांब्याची मूर्ती १०० फूट उंचीची होती. दुर्दैवाने मुसलमान राजकर्त्यांच्या धर्मवेडामुळे आणि निष्ठुरपणामुळे हिंदूंची बहुतेक देवालये इ. स. ११९४ ते १६७० पर्यंत निरनिराळ्या वेळी नष्ट करण्यात आली आणि त्यांच्या जागी मशिदी, कबरी उभारण्यात आल्या आणि जमीनदोस्त केलेल्या देवालयांचे सामान अशा मशिदी बांधण्याच्या आणि धरणे बांधण्याच्या कामात वापरण्यात आले. प्रसिद्ध विश्वेश्वराचे मंदीर अनेक वेळा नष्ट करण्यात आले होते. इ. स. १६६९ मध्ये औरंगजेबाच्या अधिकाऱ्यांनी विश्वनाथाचे मंदिर नष्ट करून त्याच्या जागी एक मशीद बांधली आणि त्याने वाराणसीचे नाव बदलून मुहम्मदाबाद असे ठेविले होते. औरंगजेबाच्या काळी वाराणसी मध्ये वीस देखील देवालये सापडणे कठीण झाले होते. पुढे मराठे राज्यकर्त्यांनी आणि त्याच्या सरदारांनी अनेक देवालये बांधली आणि ब्रिटिशांच्या अंमलात आणखी पुष्कळ देवालये बांधली गेली. इ. स. १८२८ च्या सुमारास वाराणसी येथे १०० हिंदूंची देवालये आणि ३३३ मशिदी होत्या.

**विश्वेश्वर** अथवा **विश्वनाथ** ही वाराणसीची अधिष्ठात्री देवता आहे आणि विश्वेश्वराचे देवालय हे तेथील प्रमुख आणि सर्वात पवित्र देवालय आहे. औरंगजेबाने विश्वेश्वराचे देवालय पाडून टाकल्यानंतर १०० हून अधिक वर्षेपर्यत वाराणसी येथे विश्वेश्वराचे देवालय अस्तित्वात नव्हते. त्या देवालयातील लिंग बहुधा प्रसंगानुसार निरनिराळ्या ठिकाणी हलविण्यात आले असावे आणि यात्रेकरू (नमस्कार, प्रदक्षिणा ह्यांच्यासारखे) पूजेचे काही भाग त्या देवालयाच्या मूळच्या जागेवर करीत असत. परंतु स्नान घालण्यासारखे काही प्रकार करिता येत नसत. सध्याचे विश्वनाथाचे मंदिर देवी अहल्याबाई होळकर हिने १८ व्या शतकाच्या अखेरच्या २५ वर्षांच्या काळात बांधले होते. विश्वेश्वराच्या लिंगाच्या बाबतीत अत्यंत पातकी मनुष्याला देखील त्याची पूजा करण्यास आणि त्यावर गंगेचे पाणी ओतण्यास प्रत्यवाय नसतो (त्रिस्थळी सेतु).

**अविमुक्तेश्वरलिंग** आणि **विश्वनाथ** ही दोन लिंगे पृथक् असल्याचे काशीखंडात (१०·९३) म्हटले आहे. मत्स्य पुराणात [तीर्थानां पञ्चकं सारं विश्वेशानन्दकानने।
दशाश्वमेधं लोलार्कः केशवो बिन्दुमाधवः।
पञ्चमी तु महाश्रेष्ठा प्रोच्यते मणिकर्णिका।
एभिस्तु तीर्थवर्यैश्च वर्ण्यते ह्यविमुक्तकम् ॥

मत्स्य (१८५·६८।६९).] (१८५·६८-६९) आनंदकाननातील ५ प्रमुख तीर्थाची नावे पुढीलप्रमाणे दिली आहेत. दशाश्वमेध, लोलार्क, केशव, बिंदुमाधव आणि मणिकर्णिका, अलिकडील काळात असि-गंगासंगम, दशाश्वमेध, मणिकर्णिका, पंचगंगाघाट, वरणा-गंगासंगम ह्या पाच तीर्थांना **पंचतीर्थी** अशी संज्ञा देतात.

दगडी पायऱ्या असलेला **अजस्त्र घाट** हा वाराणसी येथील मोठा भव्य देखावा असतो. वाराणसीच्या बाजूने वाहताना गंगेने एक मोठे वळण घेतले आहे आणि त्यामुळे तिचा प्रवाह उत्तरेकडे (हिमालयाच्या बाजूकडे) वाहतो आणि ह्या कारणाने ती ह्या ठिकाणी विशेष पवित्र समजली जाते.

**दशाश्वमेध घाट** शेकडो वर्षे प्रसिद्ध आहे. काशी खंडात (५२·६६-६८) म्हटले आहे की पूर्वी ह्या तीर्थाला **रुद्रसरस्** असे म्हणत असत परंतु तेथे ब्रह्मदेवाने १० अश्वमेध यज्ञ केल्यामुळे त्याला दशाश्वमेध तीर्थ म्हणू लागले.

**मणिकर्णिका कुंड.** ह्यालाच **मुक्तिक्षेत्र** म्हणतात. वाराणसी येथील सर्व तीर्थात हे अत्यंत पवित्र समजले जाते. हे कुंड विष्णूने आपल्या चक्राने खणले आणि आपल्या अंगच्या घामाने भरून काढले आणि त्याच्या काठावर दीर्घ तपश्चर्या केली. तेव्हा शंकर संतुष्ट होऊन तेथे आले आणि त्यांनी आपले मस्तक डोलविले. तेव्हा त्यांच्या कानातील एक रत्नजडित भूषण त्या कुंडात पडले आणि तेव्हापासून त्या कुंडाला मणिकर्णिका कुंड असे नाव पडले असे काशी खंडात (२६·५१-६३) म्हटले आहे. ह्या कुंडाच्या जवळच **तारकेश्वराचे देवालय** आहे. ह्या ठिकाणी **शिव आसन्नमरण** मनुष्याच्या कानात पवित्र तारक मंत्र सांगतो असा समज आहे.

**पंचगंगा घाट.** ह्या ठिकाणी किरणा, धूतपापाप्रभृति ५ **नद्यांचा संगम झाला** आहे असे मानतात.

**वरणासंगम.** वरणा नदी ही वाराणसीची उत्तर सीमा असून त्या संगमाजवळ उत्तरेकडील घाटांचे शेवटचे टोक जाऊन पोचते. हे घाट निदान एक हजार वर्षापासून तरी अस्तित्वात आहेत. ही गोष्ट त्या निरनिराळ्या घाटांवर दिले गेलेल्या दानपत्रांवरून सिद्ध होते. कनोज येथील राजांनी **आदिकेशव** घाटावर अशी अनेक दानपत्रे दिली होती. (इं. अँ. खं. १९ पा.२४९;एपि. इं. खं.१४ पा.१९७ इ०)

सर्व तीर्थयात्रांत अतिशय पुण्यदायक समजली जाणारी **पंचक्रोशीची यात्रा** ही एक आहे. पंचक्रोशीचा रस्ता सुमारे ५० मैल लांबीचा असून त्याच्या योगाने वाराणसीच्या सभोवती पाच कोश त्रिज्येचे अर्धवर्तुळ बनते. ह्या रस्त्याच्या बाजूला अनेक देवालये आहेत आणि यात्रेकरू मणिकर्णिका येथून निघून पाच दिवसात निरनिराळे मुक्काम करीत सहावे दिवशी परत मणिकर्णिकेवर येतो आणि **साक्षी विनायकाचे** दर्शन घेतो. यात्रेकरूने ही यात्रा केल्याची साक्ष हा गणपती देतो म्हणून त्याला **साक्षी विनायक** म्हणतात.

**ज्ञानव्यापी** अथवा **ज्ञानोद** हे वाराणसी येथील अनेक उपतीर्थांतील एक आहे. काशीखंडात (अ. ३३) असे सांगितले आहे की जेव्हा शंकराने विश्वेश्वराचे लिंग पाहिले तेव्हा त्याला त्या लिंगाला थंड पाण्याने स्नान घालावे अशी इच्छा झाली. त्याने आपल्या त्रिशूलाने विश्वेश्वराच्या देवालयाच्या दक्षिणेला एक कुंड खणले आणि त्या पाण्याने विश्वेश्वराच्या लिंगाला स्नान घातले. तेव्हा विश्वेश्वराने ह्या तीर्थाला असा वर दिला की ते सर्व तीर्थात श्रेष्ठ होईल आणि शंकर ज्ञानस्वरूपी असल्यामुळे ह्या तीर्थाला **ज्ञानवापी** अथवा **ज्ञानोद** म्हणतील.

**दुर्गचे देवालय**. हे अतिशय लोकप्रिय देवालयांपैकी एक आहे.

**भैरवनाथाचे देवालय.** विश्वेश्वराच्या देवालयाच्या उत्तरेस सुमारे १ मैलावर हे देवालय आहे.

भैरवनाथ हा **काशीचा कोतवाल** अथवा संरक्षक आहे. त्याच्या हातात एक जाडा सोटा असतो. त्याचे वाहन कुत्रा आहे.

**ढुंढीविनायक.** काशीमध्ये गणेशाची अनेक देवालये आहेत. ह्या गणेशाला लावलेल्या ढुंढि ह्या नावाची उत्पत्ती ढुंढ-शोधणे ह्या धातूपासून झाल्याचे काशीखंडात (५७-३३) सांगितले आहे.

**व्यासांची कथा.** काशी खंडात (अ. ९६) म्हटले आहे की व्यास महर्षी काशी येथे भिक्षा मागण्याकरिता फिरत असताना एके दिवशी त्यांना काही भिक्षा मिळाली नाही म्हणून ते काशीला शाप देण्याला प्रवृत्त झाले. ते जाणून विश्वेश्वरानी एका गृहस्थाचे रूप घेऊन व्यासांना सर्वोत्कृष्ट अन्न दिले आणि सांगितले की तू फार रागीट आहेस तेव्हा तू ह्या क्षेत्रात प्रवेश करू नकोस. व्यासांना फक्त अष्टमी आणि चतुर्दशी ह्या दोन तिथींना काशीत प्रवेश करण्यास विश्वेश्वरांनी अनुमती दिली आहे.

काशी येथील १४ लिंगांना **महालिंगे** अशी संज्ञा आहे. (काशी ७३·३२-३६) त्या सर्वात विश्वेश्वर हे सर्वात त्वरित फल देणारे असल्याचे काशीखंडात सांगितले आहे. आणि काशी येथे राहणाऱ्या प्रत्येक मनुष्यान प्रतिदिवशी गंगेवर गेले पाहिजे, मणिकर्णिकेत स्नान केले पाहिजे आणि विश्वेश्वराचे दर्शन घेतले पाहिजे असा नियम दिला आहे.

काशीच्या उत्तरेस थोड्याशा अंतरावर विष्णूने आपणास राहण्याकरिता **धर्मक्षेत्र** नावाचे एक स्थान योजले आणि तेथे बुद्धाचे रूप धारण केले अशी कथा काशीखंडात (५८·७१-७२) दिली आहे. हा उल्लेख काशीच्या उत्तरेस सुमारे ५ मैलावर असलेल्या **सारनाथ** ह्या ठिकाणचा आहे. येथे बुद्धाने आपले पहिले व्याख्यान दिले होते.

शिवभक्तांना महासंकटात देखील शंकरांच्या पादोदकाहून अन्य कोणाचाही आधार नसतो आणि असाध्य असे रोग देखील विश्वेश्वराच्या तीर्थाच्या स्पर्शाने दूर होतात असे काशी खंडात (६७·८२-८३) सांगितले आहे.

संन्याशाच्या बाबतीत असा सर्वसाधारण नियम असतो की त्यांनी पावसाळ्यात दोन अथवा चार महिने सोडून इतर केव्हाही एका ठिकाणी राहू नये तर फिरत असावे. परंतु वाराणसीमध्ये प्रवेश केल्यानंतर ह्या नियमाच्या जागी असा नियम होतो की संन्याशांनी वाराणसी सोडून मुळीच जाऊ नये. (मत्स्य १८४·३२।३४)

# प्रकरण १४

## गया

(मू. ग्रं. पा. ४।६४३-६७९).

धार्मिक प्रवृत्तीच्या सर्व हिंदु लोकांच्या अंतःकरणात आधुनिक काळी देखील गया ह्या क्षेत्राला एक अद्वितीय प्रकारचे स्थान आहे. गयेबद्दलचा आधारभूत मानला जाणारा अतिशय महत्त्वाचा ग्रंथ **गयामाहात्म्य** हा आहे. हे माहात्म्य वायु पुराणांच्या शेवटी अध्याय १०५ ते ११२ मध्ये आलेले आहे. वायुपुराणातील ह्या अध्यायांच्या प्राचीनपणाबद्दल विद्वानांचे एकमत नाही. कोणी (राजेन्द्रलाल मित्रासारखे) ह्या माहात्म्याचा रचनाकाळ इ. स. चे तिसरे अथवा चौथे शतक असावे असे मानतात तर दुसरे कोणी (डॉ. बारुवासारखे) गयासुराची कथा इ. स. च्या चौदाव्या अथवा पंधराव्या शतकात रचली असावी असे प्रतिपादन करितात.

ऋग्वेदामधील दोन सूक्तांचा (१०·६३ आणि १०·६४) कर्ता प्लाताचा पुत्र गय हा आहे. त्यापैकी एका सूक्तामध्ये गय हे विशेषनाम म्हणून योजले आहे. गय ह्या शब्दाचे ऋग्वेदात दुसरेही अनेक अर्थ आहेत. अथर्ववेदामध्ये (१·१४·४) गयाचा उल्लेख केला असून तो जादूचे चमत्कार करणारा अथवा जादूगार असल्याचे वर्णन केले आहे. वेदांच्या संहिता मध्ये देखील असुर, दास आणि राक्षस ह्यांना चमत्कार करिता येत असल्याची उदाहरणे आहेत. 'इदं विष्णुर्विचक्रमे त्रेधा निदधे पदम्' (ऋ. १·२२·१७) ह्या ऋचेचा खुलासा निरुक्तामध्ये दोन प्रकारचा सांगितला आहे. एक खुलासा असा आहे की हे वर्णन निसर्गातील एका चमत्काराचे आहे; आणि दुसऱ्याने खुलासा (निरुक्त १२·१९) असा आहे की 'विष्णूने आपले पाऊल तीन प्रकाराने टाकले; शाकपूणीच्या मताप्रमाणे पहिले पाऊल पृथ्वीवर, दुसरे अंतरिक्षात (आकाशात) आणि तिसरे स्वर्गलोकात ठेवले; और्णवाभाच्या मताप्रमाणे विष्णूने पहिले पाऊल **समारोहणावर**, दुसरे **विष्णुपदावर** आणि तिसरे **गयाशिरस्वर** ठेवले. त्या वैदिक ऋचेचा अर्थ काहीही असो ही गोष्ट उघड आहे की हे दोन प्रकारचे खुलासे निरुक्ताकार यास्क ह्यांच्या काळाच्या (ख्रि. पू. ८००-५००) पूर्वी अनेक शतके निर्माण झाले होते. गयशिरस् हे नाव वनपर्वात (८७·११) विष्णु. ध. सू. मध्ये (८५·४), स्कंद पुराणात (१·२·१३-२१) आणि महावग्गा (१·२१·१) सारख्या बुद्धधर्माच्या प्राचीन ग्रंथामध्ये आले आहे. और्णवाभाने उल्लेख केलेल्या तीन स्थानांपैकी विष्णुपद आणि गयाशिरस् ही दोन स्थाने सुप्रसिद्ध-असून गया येथे आहेत, त्या अर्थी 'समारोहण' हे देखील एक स्थान असले पाहिजे आणि ते इतर दोन स्थानांच्या जवळच कोठेतरी असले पाहिजे असे प्रतिपादन करणे गैरवाजवी होणार नाही. 'समारोहण' म्हणजे'वर चढणे' आणि कदाचित गया येथील 'उद्यंत' टेकडी हे ते स्थान असणे शक्य आहे. नारदीय पुराणात (उत्तर ४६-१६) गयशिरस् तीर्थाची व्याप्ती क्रौंचपदापासून फल्गुतीर्थापर्यंत असल्याचे म्हटले आहे. अनुशासन पर्वात (२५·४२) आलेल्या गयेच्या वर्णनात अश्मपुष्ठ (प्रेतशीला), निरविंद पर्वत आणि क्रौंचपदी ह्या स्थानांचा उल्लेख केला आहे. इ. स. ३९९ ते ४१३ पर्यत भारतात प्रवास करणाऱ्या फाहिएन ह्या चिनी प्रवाशाने असे म्हटले आहे की हिदुधर्माचीं गया पूर्णपणे ओसाड आणि छिन्नभिन्न झालेली होती. इ. स. च्या ७ व्या शतकात आलेल्या ह्युएनत्संगने असे म्हटले आहे की हिंदु वस्तीच्या गयेमध्ये १००० ब्राह्मण कुटुंबे राहत होती. ह्यावरून असे दिसते की गया नगर अनेक परिस्थितीतून गेले असावे आणि इ. स. ४०० पूर्वी गयेची धरणीकंपाने नासधूस झाली असेल. (तो प्रदेश अर्वाचीन काळी देखील जोराचे धरणीकंप होणारा आहे). पुढे जेव्हा बुद्धधर्माला उतरती कळा लागली आणि तो लुप्त झाला तेव्हा गयेमध्ये बुद्ध धर्माच्या अवशेषांचा देखील समावेश होऊ लागला. वायुपुराणात गयेची व्याप्ती प्रेतशिलेपासून महाबोधीवृक्षापर्यत असल्याचे वर्णन केले आहे.

गयामाहात्म्य हे कदाचित वायुपुराणाच्या मुख्य संहितेनंतरच्या काळातील असले तरी ते वर उल्लेख केलेल्या काही विद्वानांच्या मताप्रमाणे इ. स. १३ व्या अथवा १४ व्या शतकानंतरचे असणे शक्य नाही. वास्तविक रीतीने पाहता गया माहात्म्य हे वनपर्व, अनुशासनपर्व, पद्मपुराण, नारदीय पुराण ह्यांच्यासारख्या अनेक ग्रंथातील माहिती घेऊन बनविलेले मिश्रण आहे. आणि त्यातील कित्येक श्लोक ह्या दुसऱ्या ग्रंथातील श्लोकांशी जुळते आहेत. ह्यावरून गयामाहात्म्याचा काळ इ. स. ७ व्या आणि १० व्या शतकांच्या दरम्यानचा असावां असे वाटते.

गयेबद्दल निरनिराळ्या ग्रंथात जी वर्णने आली आहेत त्यात फल्गु नदी, गयशिरस् पर्वत, अक्षयवट, ब्रह्मशिरस्, उत्तरमानस, मतंगवापी, विष्णुपद इत्यादी स्थानांचे उल्लेख केले आहेत; गया येथे केलेल्या पिंड दानाचे महत्त्व वर्णन केले, आहे आणि अनेक [एष्टव्या बहवः पुत्रा यद्ये कोपि गयां व्रजेत्।
यजेत वाश्वमेधेन नीलं वा वृषमुत्सृजेत् ॥........
विष्णुसूत्र (८५-६७)] पुत्रांची इच्छा करावी का की त्यांच्यापैकी एकतरी गयेला जाईल तर त्याचे पितर संतुष्ट होण्याचा संभव असतो' अशा आशयाचे प्रसिद्ध श्लोक त्यात आले आहेत. (विष्णुधर्मसूत्र ८५-६७)

गया माहात्म्यामध्ये सुमारे ५६० श्लोक आहेत. आणि त्यात गया येथील निरनिराळ्या स्थानासंबंधी कथा दिल्या असून गया यात्रेतील निरनिराळ्या विधींची सविस्तर वर्णने दिली आहेत. गया हे नाव त्या क्षेत्राला पडण्याचे कारण असे दिले आहे की श्वेतवाराह कल्पामध्ये ह्या ठिकाणी गयाने एक यज्ञ केला होता. पुढे गयासुराला हरीने आपल्या गदेने आणि त्याच्या मस्तकावर शिला ठेवून स्थिर केले. ह्याकरिता हरीने आपल्या पहिल्या (आदि) गदेचा उपयोग केला होता म्हणून त्याला **आदिगदाधर** असे नाव पडले. गयासुराला गदेने पीडा दिल्याबद्दल त्याने देवांजवळ तक्रार केली म्हणून देवांनी त्याला निरनिराळे वर दिले. त्यात ज्या लोकांना त्या स्थानावर पिंडयुक्त श्राद्ध अर्पण करण्यात येईल ते ब्रह्मलोकाला जावे आणि सर्व तीर्थे गयाशिरस क्षेत्रात समाविष्ट असावी इत्यादी वरांचा समावेश होता. गयासुराला स्थिर करण्याकरिता त्याच्या मस्तकावर ठेवलेल्या शिलेची आणि हरीने घेतलेल्या गदेची कथाही त्या माहात्म्यात वर्णन केल्या आहेत.

गया येथील तीर्थोपाध्यांना **गयावळ** म्हणतात. त्यांच्यासंबंधी अशी कथा दिली आहे की ब्रह्मदेवाने ह्या बाह्मणांना ५५ गाव, कामधेनु कल्पवृक्ष इत्यादी पदार्थ दिले होते अणि अशी आज्ञा केली होती की त्यांनी दुसऱ्या कोणाजवळ याचना करू नये. परंतु त्या आधाशी ब्राह्मणांनी एक यज्ञ केला आणि त्याकरिता द्रव्याची याचना केली. तेव्हा ब्रह्मदेव रागावला आणि त्याने आपण दिलेले सर्व पदार्थ ब्राह्मणांजवळून काढून घेतले. नंतर ब्राह्मण रडू लागले तेव्हा ब्रह्मदेव म्हणाला की तुम्ही गय येथे येणाऱ्या यात्रेकरूंच्या औदार्यावर उदरनिर्वाह कराल आणि जे तुमचा आदरसत्कार करतील त्यांनी ब्रह्मदेवाच आदरसत्कार केल्यासारखे होईल.

शिलेची कथा अशी आहे की ब्रह्मदेवाचा पुत्र मरीची ह्याने आपली पत्नी धर्मव्रता हिला गैरसमजुतीने तू शिला हो असा शाप दिला. तेव्हा त्या पत्नीने अग्नी मध्ये उभी राहून तप केले आणि विष्णूने प्रसन्न होऊन तिला जे वर दिले त्यात ती सर्वात अधिक पवित्र व्हावी, तिच्यावर जो श्राद्ध करील आणि पिंड अर्पण करील त्याचे पितर ब्रह्मलोकाला जाण्याला पात्र व्हावे इत्यादी वरांचा समावेश होतो.

गदेसंबंधीच्या कथेत म्हटले आहे की गद नावाचा एक असुर होता. त्याने ब्रह्मदेवाच्या विनंतीवरून हेति नावाच्या असुराला मारण्याकरिता शस्त्र तयार करण्याकरिता आपली हाडे दिली होती आणि त्या हाडांपासून विश्वकर्म्याने जे शस्त्र तयार केले त्याला गदा असे नाव पडले. गयासुराला स्थिर करण्याकरिता पुढे हरीने त्या गदेचा उपयोग केला म्हणून हरीला गदाधर हे नाव पडले.

गयामाहात्म्यात गया येथ करावयाच्या यात्रेचे जे वर्णन-केले आहे त्यात अनेक तीर्थात स्नान करावयास आणि श्राद्ध करावयास सांगितले आहे. अशा तीर्थांची संख्या फार मोठी असली तरी बहुसंख्य यात्रेकरू त्या सर्व ठिकाणी जात नाहीत. प्रत्येक यात्रेकरूने **फल्गुनदी, विष्णुपद** आणि **अक्षयवट** ह्या तीन स्थानांचे दर्शन घेणे अत्यावश्यक असते. ह्या सर्व ठिकाणी पूजा आणि पूर्वजांना पिंडदान हे विधी करावयाचे असतात. विष्णुपदाचे देवालय विष्णूच्या पावलाच्या ठशावर बांधलेलें आहे. गया येथील सर्व देवालयात ते मोठे आणि सर्वात अधिक महत्वाचे आहे. विष्णूचे समजले जाणारे पाऊल सुमारे १६ इंच लांबीचे आहे आणि सर्व जातीचे यात्रेकरू पावलाभोवतीच्या गाभाऱ्या सभोवती उभे राहून पूजेचे पदार्थ आणि पिंड गाभाऱ्याच्या आत फेकतात. **अक्षयवटाजवळ** करावयाचे विधी हे गयेच्या यात्रेतील अखेरचे विधी असतात. ह्या ठिकाणी गयावळ तीर्थोपाध्ये यात्रेकरूंचे हात फुलांच्या माळेने बांधतात आणि आपली दक्षिणा स्वीकारतात. नंतर यात्रेकरू प्रसाद म्हणून मिठाई देतात, त्याच्या कपाळावर गंधाचा तिलक लावतात, त्याच्या पाठीला स्पर्श करून 'सुफल' हा शब्द उच्चारतात आणि यात्रेकरूचे पितर स्वर्गाला गेल्याची घोषणा करून आशीर्वाद देतात. **फल्गु नदी** (मोठी नदी) येथील स्नानासंबंधी म्हटले आहे की जर ती कोरडी असली तर तिच्या मध्ये पाण्याकरिता एक खड्डा खणावा आणि त्या पाण्यात स्नान करावे.

गया येथील ज्या ठिकाणी गौतमाला आत्मज्ञान झाले त्या बोधीवृक्षाचे स्थान देखील हिंदूंच्या पवित्र स्थानांपैकी एक आहे. हा बोधीवृक्ष जगातील सर्वात जुना ऐतिहासिक वृक्ष आहे. त्या वृक्षाची एक खांदी अशोकाच्या काळी (इ. स. पूर्वी २५० वर्षे) सिंहलद्वीपात नेण्यात आली होती. आणि सिलोन मधील कँडी शहरात हल्ली देखील एक पिंपळाचे झाड दाखविण्यात येते आणि ते झाड अशोकाच्या वेळी लावलेली फांदी अथवा त्या फांदीची फांदी असल्याचे सांगण्यात येते.

गया येथे असणाऱ्या तीर्थांना कोणत्याही क्रमाने गेले तरी प्रत्यवाय नसतो परंतु त्यात प्रेतशिळेवर केलेले श्राद्ध पहिले असावे आणि अक्षयवटाजवळचे श्राद्ध हे अखेरचे असावे.

गया येथे कोणालाही जवळच्या नात्याच्या असलेल्या अथवा नसलेल्या मृत मनुष्याला पिंड देता येतो. तसेच आपल्या स्वतःला देखील पिंड देता येतो. मात्र असा पिंड तिळमिश्रित असू नये. गया श्राद्धात फक्त गयावळांचाच सत्कार केला पाहिजे हा नियम फक्त अक्षयवटाजवळच्या श्राद्धापुरता असतो असे नारायणभट्टाने मानले आहे.

**गयाक्षेत्र, गया,** आणि **गयाशिरस्.** निरनिराळ्या पुराणांनी गया क्षेत्राचा विस्तार ५ क्रोश असल्याचे म्हटले आहे. काशी, प्रयाग ह्यांच्यासारखी सर्व प्रसिद्ध तीर्थे पांचक्रोश असल्याचे वर्णन करण्याचा प्रघात पडून गेला होता. प्रेतशिळेपासून महाबोधीवृक्षापर्यंत सुमारे १३ मैल हा **गया** क्षेत्राचा विस्तार आहे असे वायुपुराणात (५०६-६५) सांगितले आहे. **गयाशिरस्** हे तीर्थ गयेपेक्षा लहान असून ते आणि **फल्गुतीर्थ** एकच असल्याचे समजले जाते (वायु. १११-२२) गयेची मर्यादा मुंडपृष्ठापासून सर्व बाजूला २ ॥ कोश असल्याचे मानतात.

गया येथे करावयाच्या श्राद्धामध्ये विकल्पाने ६, ९,१२ अशा भिन्न भिन्न देवता (पितर) असतात. त्या सर्वात प्रेतशिलेवर करावयाचे श्राद्ध आदर्श समजले जाते.

गया येथे कोणत्याही वेळी श्राद्ध करण्यास प्रत्यवाय नसतो. संन्याशाने पिंड अर्पण करू नये,त्याने फक्त आपला दंड दाखववावा (वर उचलावा) आणि विष्णुपदावर ठेवावा. गयेसारख्या एखाद्या तीर्थावर केलेल्या श्राद्धाचे संपूर्ण फल प्राप्त व्हावे अशी इच्छा असणाऱ्यांनी काम, क्रोध आणि लोभ ह्यांचा त्याग केला पाहिजे.

अत्यंत महत्त्वाच्या आणि पवित्र तीर्थांपैकी गंगा, प्रयाग, काशी आणि गया ह्या चार तीर्थाचे विवेचन काहीशा विस्तृत प्रमाणावर करण्यात आले. बाकीच्या तीर्थापैकी सहा, सात तीर्थांचे थोडक्यात वर्णन करण्यात येईल.

तीर्थाचे काही गट आहेत. अयोध्या, मथुरा, माया (हरिद्वार), काशी, कांची, अवंतिका (उज्ज्ञयिनी) आणि द्वारका ह्या **सात पुऱ्या** म्हणजे नगरे अतिशय पवित्र आणि मोक्ष देणारी समजली जातात. (ब्रह्मांड ४·४०·९१) काही ग्रंथात कांचीच्या ऐवजी कांती ह्या नगराचा उल्लेख असतो. बदरीनाथ, जगन्नाथपुरी, रामेश्वर आणि द्वारका हे **चार धाम** समजले जातात. सोमनाथ, मल्लिकार्जुन, महांकाळ, ओंकार, केदार, भीमाशंकर, विश्वेश्वर, त्र्यंबकेश्वर, नागेश, रामेश्वर, घृष्णेश्वर, वैद्यनाथ हीं शंकराची **बारा ज्योतिर्लिंगे** आहेत. (शिवपुराण ४·१·१८·२१-२४) स्कंद पुराणात अनेक लिंगांची नावे दिली असून त्या यादीत बारा ज्योतिलिंगांपैकी बहुतेक. आली आहेत. बार्हस्पत्य सूत्रात, (३·११९-१२६) विष्णु, शिव आणि शक्ती ह्या प्रत्येकाच्या आठ श्रेष्ट तीर्थांचा उल्लेख केला आहे. बदरिका, सालग्राम, पुरुषोत्तम, द्वारका, बिल्वाचल, अनंत, सिंधु, श्रीरंग ही **आठ विष्णूची तीर्थे** आहेत. अविमुक्त, गंगाद्वार, शिवक्षेत्र, रामेयमुना (?), शिवसरस्वती, मध्यशार्दूल, गजक्षेत्र हीं आठ **शिवतीर्थे** आहेत आणि ओग्वीण, जाल, पूर्ण, काम, कोल्ल, श्रीशैल, कांची आणि महेंद्र ही **शक्तीची आठ तीर्थ** आहेत.

## प्रकरण १५

## कुरुक्षेत्र आणि दुसरी काही प्रसिद्ध तीर्थे

(मू. ग्रं. पा. ४।६८०-७२२)

**कुरुक्षेत्र.** अंबाला शहराच्या पूर्वेला २५ मैलावर असणारा कुरुक्षेत्राचा प्रदेश अतिशय पवित्र मानलेला असून त्याचा इतिहास फार प्राचीन आहे. ऋग्वेद (१०·३३·४), अथर्ववेद (२०·१२७·८) यात कुरु हा शब्द आला आहे. छांदो. उप. (१·१०·१) आणि ब्राह्मणग्रंथ (ऐत. ब्रा. ३५·४ इ.) यात कुरु देशाचा अथवा कुरुक्षेत्राचा उल्लेख आला आहे. ब्राह्मण ग्रंथांच्या काळी अत्यंत पवित्र सरस्वती नंदी कुरुक्षेत्रापासून वाहत होती आणि कुरुक्षेत्र हे वैदिक संस्कृतीचे एक केन्द्र होते. ती एक अत्यंत पवित्र भूमी झाली होती आणि त्या ठिकाणी देवांनी यज्ञ केले असल्याची वर्णने (शत. ब्रा. ४·१·५·१३) तै. ब्रा. (५·१·१) इत्यादी ब्राह्मण ग्रंथात आली आहेत. ह्याच कारणाने कुरुक्षेत्राला **धर्मक्षेत्र** असेही म्हणत असत. भगवद्गितेच्या पहिल्या श्लोकात कुरु क्षेत्राला धर्मक्षेत्र म्हटले आहे. तै. आरण्यक (५·१·१) ह्या ग्रंथात अशी माहिती दिली आहे की कुरु क्षेत्र ही देवांनी केलेल्या एका सत्राची वेदी होती. आश्व. (१२·६) प्रभृती सूत्रात आणि ताण्ड्यप्रभृति ब्राह्मण ग्रंथात, तसेच पाणिनीय व्याकरण (४·१·१५१) ह्यात कुरु क्षेत्राचे उल्लेख आले आहेत. महाभारताच्या काळी सरस्वती नदीच्या दक्षिणेस आणि दृशद्वती नदीच्या उत्तरेला असणाऱ्या प्रदेशाचा कुरुक्षेत्रात अंतर्भाव होत असे. वनपर्वात (८६·६) ह्या प्रदेशाला **ब्रह्मावर्त** म्हटले असून त्याच प्रदेशाला वामनपुराणात (२२·४७) **कुरुजांगल** देश म्हटले आहे. मनूने (२·१७ आणि १८) कुरु क्षेत्राचा समावेश **ब्रह्मर्षि देशात** केला असून तो प्रदेश ब्रह्मावर्तापेक्षा जरा कमी पवित्र असतो असे म्हटले आहे. ह्याच प्रदेशात परशुरामाने आपल्या पित्याच्या वधाचा सूड घेण्याकरिता मारलेल्या क्षत्रियांच्या रक्ताचे पाच डोह केले होते म्हणून त्याला **समंत पंचक** (अथवा स्यमंत पंचक) असे नाव पडले. कुरुराजाने हा प्रदेश सुवर्णाच्या नांगराने सर्व बाजूंनी पांच क्रोशपर्यंत नांगरला होता म्हणून त्याला **कुरुक्षेत्र** असे नाव पडले.

नारदीय पुराणात (उत्तर अ. ६५) कुरुक्षेत्रातील सुमारे १०० तीर्थांची नावे दिली आहेत. त्यात (ज्या ठिकाणी कुरु राजा संन्यास घेऊन राहिला होता ते) **ब्रह्मसरस्,** (ज्या ठिकाणी भीष्मांवर प्रहार करण्याकरिता श्रीकृष्णाने चक्र धारण केले होते ते) **चक्रतीर्थ** (ज्या ठिकाणी पुत्राच्या वियोगामुळे व्यासांनी मरण्याचा निश्चय केला होता ते) **व्यासस्थळी** (अर्वाचीनबस्थली), (ज्या ठिकाणी भारतीय युद्धात मृत झालेल्या वीरांची प्रेते दहन करण्यात आली ते) **अस्थिपुर**, सरस्वतीच्या तीरावरील **पृथूदक** (अर्वाचीन पेहोवा) इत्यादी स्थाने प्रसिद्ध आहेत.

वामनपुराणात (३४·३ प्रभृ) कुरु क्षेत्रातील काम्यक, अदिती इत्यादी **सात वनांचा** उल्लेख केला आहे. शल्यपर्वात (अ. ३८) सुप्रभा, विशला प्रभृती **सात सरस्वती नद्यांची** नावे दिली असून त्यात कुरुक्षेत्रात असणारी **ओघवती नदी** ही एक आहे. कुरुक्षेत्राला **सन्नहती** अथवा **सन्निहत्या** असेही म्हणतात. ह्युएनत्संगानेही **स्थानेश्वर** (सांप्रतचे ठाणेश्वर) राजधानी असलेल्या प्रदेशांचा 'पुण्यभूमी' असा उल्लेख केला आहे. कौरव आणि पांडव ह्यांच्यामधील युद्ध ह्याच प्रदेशात झाले.

**मथुरा**. शूरसेन देशाची राजधानी असलेल्या मथुरा नगरीचा स्पष्ट उल्लेख वेदांमध्ये अद्यापि आढळलेला नाही. तथापि त्या नगराचे अस्तित्व ख्रि. पू. ५ व्या शतकापासून असल्याचा निर्विवाद पुरावा सापडतो. बुद्धधर्माच्या प्राचीन ग्रंथांत बुद्धाचा शिष्य महाकच्चायन बुद्ध धर्माचा प्रचार करण्याकरिता मथुरा

येथे गेला असल्याचे म्हटले आहे. मेग्यास्थेनिसला मथुरा आणि त्या नगराचा हरिकृष्णाशी असलेला संबंध माहीत असावा असे दिसते. जैमिनीच्या पूर्व मीमांसा सूत्रात (१·३·२१) मथुरेचा रहिवाशी ह्या अर्थाचा माथुर हा शब्द आला आहे. पतंजलीच्या महाभाष्यात (खं. १ पा. १८ इ.) मथुरा हा शब्द अनेक वेळा आला आहे. ब्रह्मपुराणात (१४·५४-५६) वृष्णि आणि अंधक ह्यांनी कालयवनाच्या भयाने मथुरानगर सोडून दिल्याचा उल्लेख आला आहे. रामाचा बंधु शत्रुघ्न ह्याने लवणासुराचा वध करून मथुरानगरीची स्थापना केली अशी कथा रामायण (उत्तरकांड ७०·६-९) आणि वायुपुराण (८८·१८५) ह्यात दिली आहे. ह्युएन्त्संगाने मथुरा नगरीचे वर्णन केले आहे आणि त्यात अशोकाने बांधलेले ३ स्तूप, ५ देवमंदिरे, २० संघ आराम (बुद्धधर्मीय मठ) आंणि १००० बुद्ध भिक्षु असल्याचे म्हटले आहे. शिला लेखांवरूनही (एपि. इ. खं. २० पा. ७९) मथुरा नगराच्या पुरातनत्वाबद्दल पुरावा मिळतो. कनिष्क, हविष्क, बासु इत्यादी कुषाण राजांच्या शिलालेखात मथुरानगराचे उल्लेख आले आहेत. (एपि. इ. खं. १७ पा.१००) विष्णुपुराणाच्या (६·८·३१) रचनाकालाच्या पूर्वी मथुरा येथे हरीच्या मूर्तीची स्थापना झाली होती. अल्बेरुणीनेही मथुरेचे वर्णन केले आहे. अग्नि, वराह, स्कंद, बृहन्नारदीय ह्यांच्या सारख्या अनेक पुराणात कृष्ण, राधा, मथुरा, वुन्दावन, गोवर्धन यांची आणि कृष्णाने त्या ठीकाणी केलेल्या पराक्रमांची वर्णने आली असून पद्म पुराणात (आदिखंड २९·४६-४७) मथुरेचे धार्मिकदृष्ट्या महत्त्ववर्णन केले आहे.

मथुरानगराचा परिसर २० योजने विस्तृत असल्याचे बृहन्नारदीय पुराणात (उत्तरार्ध ७९-८०) म्हटले असून मथुरा येथील आणि सभोवतालच्या अनेक तीर्थांची वर्णने त्या आणि वराहपुराणात (अ. १५३ इ.) केली आहेत. मथुरेजवळ मधु, ताल, कुमद प्रभृति १२ वने असल्याचे वराह आणि नारदीय पुराणात म्हटले आहे. **वृन्दावन** मथुरेच्या वायव्येला यमुनेच्या तीरावर होते आणि त्याचा विस्तार ५ योजने होता (विष्णुपुराण). **गोवर्धन** पर्वत मथुरेच्या पश्चिमेला सुमारे २ योजने अंतरावर असल्याचे वराहपुराणात म्हटले असून ते वर्णन बरेचसे वास्तविक असल्यासारखे दिसते. सांप्रतकाळी गोवर्धन वृन्दावनापासून १८ मैल दूर आहे. श्रेष्ठ वैष्णव संत चैतन्य वृंदावनात गेला होता आणि इ. स. च्या १६ व्या शतकात वृंदावन हे चैतन्याच्या भक्तिसंप्रदायाचे केन्द्र बनले होते. चैतन्याचा समकालीन वैष्णव संत वल्लभाचार्य याने गोकुळाच्या नमुन्याप्रमाणे महावनाच्या दक्षिणेला एक मैलावर नव्या गोकुळाची स्थापना केली होती (मणीलाल पारेखकृत ग्रंथ). मथुरेतील जुन्या देवालयांची अवस्था औरंगजेबाच्या आज्ञेवरून वाराणसी येथील देवालयांसारखीच झाली.

जरासंधाने **गिरिव्रज** (सांप्रतचे राजगिर) येथून फेंकलेली गदा ज्या ठिकाणी मथुरा येथे कृष्णाच्या समोर येऊन पडली त्या ठिकाणाला **'गदावसान'** असे नाव पडले (सभापर्व ३१९·२३-२५). हे नाव दुसऱ्या कोणत्याही ग्रंथात आढळले नाही.

**पुरुषोत्तमतीर्थ** (जगन्नाथ)

ओरिसा प्रांतात **भुवनेश्वर**, **जगन्नाथ**, **कोनारक** आणि **यजपुर** अथवा जयपुर हीं चार अतिशय महत्वाची तीर्थे असून त्यांना अनुक्रमे **चक्रतीर्थ**, **शंखक्षेत्र**, **पद्मक्षेत्र** आणि **गदाक्षेत्र** असे म्हणतात. त्यांपैकी पहिली दोन अद्यापि प्रशंसनीय गणली जातात परंतु दुसऱ्या दोन तीर्थांकडे सर्वस्वी दुर्लक्ष झाले आहे :

पुराणांपैकी ब्रह्म आणि बृहन्नारदीय ह्या दोन पुराणात आणि निबंधग्रंथांपैकी वाचस्पतिकृत तीर्थचिंतामणि, रघुनंदनकृत पुरुषोत्तमतत्त्व आणि तीर्थप्रकाश ह्या ग्रंथात पुरुषोत्तम तीर्थाची वर्णने आली

आहेत. ब्रह्मपुराणात (अ. ४३।४४) एका इंद्रद्युम्न राजाची कथा आली आहे. मालव देशातील अवंती (उज्जयिनी) येथील इंद्रद्युम्न राजा धर्मनिष्ठ आणि विद्वान होता. त्याने वासुदेव हाच सर्वात श्रेष्ठ देव असल्याचा निर्णय ठरविला आणि तो मोठे सैन्य, सेवक इत्यादिकांसह दक्षिण समुद्राच्या तीरावर आला. तेथे त्याने वासुदेवाचे एक विस्तृत क्षेत्र पाहिले आणि तेथे मुक्काम केला. पूर्वीच्या काळी दक्षिण समुद्राच्या तीरावर एक वटवृक्ष होता आणि त्यांच्याजवळ पुरुषोत्तमाची अथवा जगन्नाथाची इंद्रनील मण्याची केलेली एक मूर्ती होती. ती मूर्ती वाळूत रुतून गेली होती आणि लतावृक्षांनी झांकली होती. इंद्रद्युम्न राजाने त्या ठिकाणी एक अश्वमेध यज्ञ केला आणि एक मोठे देवालय बांधले. त्याच्या मनात त्या देवालयात वासुदेवाची मूर्ती स्थापन करावयाची इच्छा होती. स्वप्नात त्याला वासुदेव दिसला. आणि त्याने राजाला सांगितले की प्रातःकाळी एकटाच किनाऱ्यावर जा आणि पाण्याच्या रेषेवर वाढलेला वटवृक्ष कुऱ्हाडीने तोड. राजाने त्याप्रमाणे केले तेव्हा तेथे दोन ब्राह्मण प्रकट झाले. वास्तविकपणे ते दोघे विष्णु आणि विश्वकर्मा होते. विष्णूने सांगितल्यावरून विश्वकर्म्याने कृष्ण, बलराम आणि सुभद्रा यांच्या तीन मूर्ती तयार केल्या आणि त्या मूर्ती राजाला दिल्या आणि राजाने त्या मूर्तींची स्थापना त्याने बांधलेल्या देवालयात केली. स्कंदपुराणातील (उत्कल खंड) पुरुषोत्तम माहात्म्यातही ही कथा थोड्याशा भेदाने दिली आहे.

ह्या कथेतील दैवी चमत्काराचा भाग काढून टाकला तर असे असण्याचा संभव दिसतो की फार प्राचीन काळी पुरुषोत्तम क्षेत्रात कृष्णभक्तीचा सांप्रदाय उत्तर भारतातून आला आणि तुलनेने बऱ्याच प्राचीन काळी तेथे लाकडांच्या तीन मूर्तीची स्थापना करण्यात आली. मैत्रायणी उपनिषदात (१·४) ज्या अनेक चक्रवर्ती राजांची नावे दिली आहेत त्यात एका इंद्रद्युम्नाचा उल्लेख केला आहे.

पुरी हे बुद्ध धर्माचेही एक पवित्रस्थान असावे असे दिसते. धौलीटेकडीवरील एका दगडावर अशोकाचे आज्ञापत्र कोरलेले आहे. भूवनेश्वराच्या पश्चिमेला ५ मैलावर **खंडगिरी** टेकडीवर बुद्धकालीन लेणी आहेत.

सांप्रतकाळी जगन्नाथाच्या देवालयाच्या सभोवती मोठा प्राकार असून त्याच्या प्रत्येक बाजूला एक मोठे प्रवेशद्वार आहे. त्यातील पूर्वेकडील प्रवेशद्वार फार भव्य आहे. प्रवेशद्वारांच्या बाजूला सिंहाच्या प्रतिमा बसविल्या असल्यामुळे त्यांना **सिंहद्वार** म्हणतात. प्राकाराच्या आत निरनिराळ्या देवांच्या मूर्ती असलेली १२० देवालये आहेत. त्यांपैकी १३ शिवमंदिरे आहेत, कांही पार्वतीची आहेत, एक सूर्याचे आहे. हिंदुधर्मातील बहुतेक सर्व पंथाची देवालये पुरी येथे आहेत. देवालयाचा कळस १९२ फूट उंचीचा असून त्याच्यावर एक चक्र आहे. देवालय समुद्रकिनाऱ्यापासून सुमारे ७ फर्लांग अंतरावर एका २० फूट उंचीच्या उंचवट्यावर बांधलेले आहे. त्या उंचवट्याला **नीलगिरी** असे म्हणतात.

जगन्नाथाच्या मोठया देवालयाची काही वैशिष्ट्ये आहेत. जगन्नाथाच्या पटांगणात आणि सिंहद्वाराच्या बाहेर कोणत्याही प्रकारचा जातिभेद पाळण्यात येत नाही. जगन्नाथाला अर्पण केलेले शिजलेले अन्न इतकें शुद्ध मानले जाते की तेथील पंड्या ते अन्न कोणत्याही जातीच्या हिंदूपासून स्वीकारतो. ते अन्न वाळविण्यात येऊन भारतातील सर्व प्रांतात प्रसाद म्हणून नेण्यात येते. वैष्णवलोकांच्या पार्वणश्राद्धात ह्या पवित्र अन्नाचा एक दाणा पितरांना वाढण्यात येतो.

पुरी येथे होणाऱ्या २४ उत्सवातील **रंथयात्रा** हा सर्वात महत्त्वाचा उत्सव असतो. ही रथयात्रा आषाढ शुद्ध द्वितीयेला निघते. जगन्नाथ, बलराम आणि सुभद्रा यांचे तीन प्रचंड रथ अनेक यात्रेकरू आणि मजुरीने

लावलेले कामकरी ओढून २ मैलावर असलेल्या एका मंदिरापर्यंत नेले जातात. तेथे आषाढ शुद्ध दशमीपर्यंत त्या मूर्ती ठेवण्यात येतात आणि त्यानंतर ते रथ परत मोठ्या मंदिरात मूर्ती घेऊन आणण्यात येतात. ह्या रथांपुढे पडून भाविक लोक आत्महत्या करीत असत अशी वर्णने इंग्रजी ग्रंथात केली आहेत. परंतु त्या वर्णनांना आधार नाही. अशा आत्महत्येचा उल्लेख काही पुराणातही केला आहे. (ब्रह्म-पु. १७७·१६ इ.). गर्दीमुळे अपघाताने काही मृत्यु क्वचित प्रसंगी घडत असल्याचा संभव आहे.

पुरी येथील सर्वात जुने देवालय अलाबुकेश्वराचे आहे. ते देवालय भुवनेश्वराचे गोपुर बांधणाऱ्या ललाटेंदु केसरीने (इ. स. ६२३-६७७) बांधले होते. त्याच्या खालोखालचे जुने देवालय मार्कंडेश्वराचे असून तिसरा क्रम जगन्नाथाच्या देवालयाचा लागतो. ओरिसा प्रांतातील गंगावंश राजांच्या ताम्रपटातील श्लोकात ते मंदिर गंगेश्वर अथवा चोडगंग राजाने बांधल्याचा उल्लेख आहे. चोडगंगाचा राज्याभिषेक इ. स. १०७८ मध्ये झाला होता. कोणाच्या मताने ते मंदिर चोडगंगाने बांधले नसून त्याचा पणतु तिसरा अनंगभीम ह्याने बांधले होते आणि त्याच राजाने कटक येथील एका देवालयात पुरुषोत्तमाच्या मूर्तीची स्थापना केली होती. ते देवालय फिरोजशहाने भ्रष्ट केले. ह्या गंग राजांनी भुवनेश्वर, कोनारक आणि पुरी येथे भव्य देवालये बांधली होती आणि ती उत्तर भारतातील हिंदु शिल्पाची अस्तित्वात असलेली अति सुंदर अवशिष्टे आहेत.

जगन्नाथ येथील देवालयातील सेवेकऱ्यांची संख्या फार मोठी असून, त्या सर्वात कुर्ध्याचा राजा प्रमुख आहे आणि तो आपणाला 'जगन्नाथाचा झाडूवाला' असे म्हणवितो.

वाराणसीप्रमाणेच जगन्नाथ येथे **पाच प्रमुख तीर्थे** आहेत. ती म्हणजे मार्कंडेय डोह, वटवृक्ष, बलराम, इंद्रद्युम्न डोह आणि समुद्र. ब्रह्मपुराणात (१५७·१७) हा वटवृक्ष साक्षात् विष्णूच असल्याचे म्हटले आहे. इंद्रद्युम्न डोहाजवळ **गुंडिचा** नावाचे एक स्थान असून तेथे कृष्ण, बलराम आणि सुभद्रा ह्यांच्या मूर्ती ७ दिवसपर्यंत ठेवण्यात येतात.

महान वैष्णव संत **चैतन्य** इ. स. १५१५ मध्ये पुरी येथे कायम राहण्याकरिता आला आणि त्याने तेथे मृत्यूपर्यंत १८ वर्षे वास्तव्य केले. चैतन्याची पूजा ओरिसा प्रांतात विष्णूच्या बरोबरीने करण्यात येत असे.

जगन्नाथाच्या मोठ्या मंदिराच्या भिंतीवर बीभत्स आणि कामोद्दीपक अशी काही शिल्पचित्रे आहेत आणि नर्तिकांचेही अस्तित्व फार प्राचीन कालापासून चालत आले आहे ही खेदाची गोष्ट आहे. ब्रह्मपुराणात (अ. ६५) ही बलरामाच्या आणि कृष्णाच्या मूर्तीपुढे वाद्ये वाजविणाऱ्या आणि चवरी घेतलेल्या सुंदर वेश्यांचा उल्लेख केला आहे.

## नर्मदा

गंगेच्या खालोखाल **नर्मदा** आणि **गोदावरी** ह्या भारतातील अतिशय पुण्यकारक नद्या आहेत. वैदिक वाङ्मयात नर्मदेचा स्पष्ट उल्लेख अद्यापि उपलब्ध झाला नाही. श. ब्रा. (१२·९·३·१) मध्ये रेवोत्तरस् असे एक नाव आले आहे आणि रेवा हे नर्मदेचेच दुसरे नाव आणि रेवा नदीवरूनच रेवोत्तरस् हे नाव पडले. असण्याचा संभव आहे. पाणिनीच्या (४·२·८७) सूत्रांवरील वार्तिकात महिष्मत् ह्या शब्दाची व्युत्पत्ती दिली आहे. महिष्मत म्हणजे नर्मदेच्या काठावर असलेले माहिष्मती नगर असा सर्वसाधारण समज आहे. त्यावरून असा निष्कर्ष निघतो की ख्रि. पू. ४ थ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास होऊन गेलेल्या

वार्तिककाराला नर्मदा हे नाव बहुधा माहीत होते. रघुवंशाच्या ५ व्या सर्गात माहिष्मती ही अनूप देशाची राजधानी असून ती रेवा (म्हणजे नर्मदा) नदीच्या काठावर होती असे म्हटले आहे. महाभारतात आणि मत्स्य, पद्म, कूर्म प्रभृती काही पुराणात नर्मदा नदीचा उल्लेख पुष्कळ वेळा केला आहे आणि त्यात नर्मदेची आणि तिच्या काठावर असलेल्या तीर्थांची वर्णने केली आहेत. मत्स्य पुराणात (१९४·४५) नर्मदेच्या काठावरील तीर्थांची संख्या १० कोटी दिली आहे. कूर्म पुराणात (२·४०·१३) तीर्थांची संख्या ६० कोटी ६० लक्ष इतकी वाढविली आहे. नारदीय पुराणात (उत्तरार्ध ७७) ३॥ कोटी तीर्थे असल्याचे म्हटले आहे. श्राद्ध करण्यास उचित अशा तीर्थाची नावे सांगताना विष्णु. ध. सू. (८५·८) मध्ये नर्मदेच्या सर्व ठिकाणच्या तीरांचा समावेश केला आहे. अमरकंटक हे महेश्वर आणि पार्वती ह्यांचे निवासस्थान मानले जाते आणि नर्मदा नदी अमरकंटकापासून निघते म्हणून ती रुद्राच्या शरीरापासून उत्पन्न होते असे मत्स्य पुराणात (१८८·९१) वर्णन केले आहे. वायुपुराणात (७७·३२) नर्मदा ही पितरांची कन्या असल्याचे म्हटले आहे. आणि. तिच्या तीरावर अर्पण केलेले श्राद्ध अक्षय्य होते असे सांगितले आहे. मत्स्य, (१८६·२४-२५) आणि कूर्म पुराणात (२·४०·१२) नर्मदा नदीची लांबी १०० योजने आणि रुंदी २ योजने असल्याचे वर्णन केले आहे. सांप्रतकाळी नर्मदा नदीची लांबी सुमारे ८०० मैल आहे. नर्मदेच्या कोणत्याही तीर्थात आत्महत्या केल्याने मनुष्य जन्ममरणाच्या चक्रातून सुटतो असेही मत्स्य (१९४-२९।३०) आणि कूर्म पुराणात म्हटले आहे.

नर्मदेला मिळणाऱ्या अनेक नद्यांची नावे पुराणात दिली आहेत. त्यात **कपिला, विशल्या, एरंडी, इक्षुनदी, कावेरी** ह्यांचा समावेश होतो. नर्मदेच्या काठावर अनेक **उपतीर्थे** आहेत. त्यात पुढील प्रमुख आहेत. **महेश्वरतीर्थ** (म्हणजे ओंकार) ह्या ठिकाणी रुद्राने बाण मारून बाणासुराची तीन नगरे जाळून टाकली होती असे मत्स्य पुराणात सांगितले आहे; **शुक्लतीर्थ** ह्या ठिकाणी राजर्षि चाणक्याला सिद्धी प्राप्त झाली; **भृगुतीर्थ; जामदग्न्यतीर्थ** ह्या ठिकाणी नर्मदा समुद्राला मिळते आणि येथे **भगवान** जनार्दनाने सिद्धि प्राप्त करून घेतली. **माहिष्मती** हे नर्मदेच्या काठावरील सर्वात महत्त्वाचे स्थान आहे परंतु ते नेमके कोणते ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे. सर्वसाधारण मत असे आहे की इंदूरच्या दक्षिणेला सुमारे ४० मैलावर असलेचे ओंकार मांधाता बेट हीच माहिष्मती असावी. कालीदासाने रघुवंशात (६·४३) माहिष्मती नगर सर्व बाजूंनी नर्मदेने वेढलेले असल्याचे वर्णन केले आहे आणि ते नगर नर्मदेच्या अथवा रेवा नदीच्या तीरावर असल्याचे महाभारतात (उद्योग (१९·२३-२४) अनुशा. (१६६·४) आणि भागवतात (१०·७९·२१) म्हटले आहे. नर्मदेच्या काठावरील दुसरे एक प्राचीन नगर **भृगुकच्छ** (भरुकच्छ) अथवा **भडोच** हे आहे.

## गोदावरी

गोदावरी नदीचा उल्लेख वैदिक वाङ्मयात अद्यापि आढळला नाही. पाणिनीच्या (५·४·७५) सूत्रांवरील वार्तिकात गोदावरीचा उल्लेख केला असून तो **सप्तगोदावरीला** उद्देशून केला आहे. रामायण (अरण्य १३·१३), महाभारत (वन ८८·२) आणि पुराणे ह्यात गोदावरीचे अनेक उल्लेख आले असून ती दक्षिणेकडील एक पुण्यनदी असल्याचे म्हटले आहे. रामायणात (३·१३·१३ आणि २१) पंचवटी नावाच्या एका प्रख्यात देशाचा उल्लेख केला असून तो देश गोदावरीपासून जवळ आणि अगस्ति ऋषीच्या आश्रमापासून सुमारे २ योजने दूर असल्याचे सांगितले आहे. गोदावरी आणि तिच्यामधील उपतीर्थे ह्यांचे सविस्तर वर्णन ब्रह्मपुराणात (अ. ७०-१७५), केले असून हे अध्याय इ. स. १५०० च्या पूर्वी काही शतके तरी ब्रह्मपुराणात अंतर्भूत झालेले होते असे इतर ग्रंथात घेतलेल्या अवतरणांवरून दिसते.

ब्रह्मपुराणात गोदावरीला सामान्यतः **गौतमी** असे म्हटले आहे. गोदावरीची लांबी २०० योजने असून

तिच्यामध्ये ३॥ कोटी तीर्थे आहेत. **दंडकारण्य** हे धर्माचे आणि मुक्तीचे बीज असून त्यातील गौतमीने व्यापलेला प्रदेश विशेष पुण्यकारक आहे. गौतमाने गोदावरीला शंकराच्या जटेपासून ब्रह्मगिरी येथील आपल्या आश्रमापर्यंत कशी आणली ह्याची कथा पुढीलप्रमाणे आहे : गौतम आपल्या आश्रमात तपश्चर्या करीत असताना एकेकाळी १२ वर्षेपर्यंत मुळीच पाऊस पडला नाही. त्यामुळे सर्व ऋषि गौतमाच्या आश्रयाला आले. गौतमाने गंगेला आपल्या आश्रमात आणले. तो प्रातःकाळी साळी पेरीत असे आणि माध्यान्ह काळी पीक काढीत असे. असा क्रम पुष्कळ पाऊस पडून धान्य पुन्हा उत्पन्न होऊ लागेपर्यंत चालला. मग शंकर गौतमाच्या पुढे प्रकट झाले आणि गौतमाने त्यांना आपल्या आश्रमाच्या समीप राहण्याची विनंती केली. शंकर तेथे राहिल्याकारणाने ज्या डोंगरावर गौतमाचा आश्रम होता त्याला त्र्यंबक असे नाव पडले. गोदावरीच्या तीरावर सुमारे १०० तीर्थे असून त्यात **त्र्यंबक, कुशावर्त, गोवर्धन, प्रवरासंगम, निवासपुर, प्रवरासंगम, नासिक, पंचवटी,** जनस्थान ही प्रख्यात आहेत.

**नासिक.** हे स्थान ख्रि. पू. २०० वर्षांपासून तरी अस्तित्वात असले पाहिजे. कारण भारहूत येथील एका शिलालेखात नासिक ह्या स्थानाचा उल्लेख आहे आणि तो शिलालेख ख्रि. पू. २०० च्या सुमाराचा आहे. ख्रि. पू. अनेक शतके आणि ख्रिस्तानंतरच्या काळात नासिक हे एक भरभराटीत असलेले नगर होते ही गोष्ट पंडुलेण्यातील शिलालेखावरून आणि इ. स. १५० च्या सुमारास होऊन गेलेल्या टॉलेमीने केलेल्या उल्लेखावरून (पा.१५६) सिद्ध होते. नासिक आणि पंचवटी येथे अनेक प्राचीन देवालये होती परंतु त्यांपैकी क्वचितच आता अस्तित्वात असेल. सांप्रत असलेली देवालये पेशव्यांच्या कारकीर्दीत (इ. स. १७५०-१८१८) बांधण्यात आली होती. त्यांच्यापैकी पंचवटीमधील रामाचे देवालय, गोदावरीच्या डाव्या तीरावरील **नारोशंकराचे** (अथवा घंटेचे) देवालय, नासिक येथील **सुंदर नारायणाचे देवालय** ही विशेष प्रसिद्ध आहेत. पंचवटी येथील रामाचे देवालय हे पश्चिम भारतातील आधुनिक काळातील अत्यंत सुंदर असलेल्या देवालयांपैकी एक आहे. नासिकच्या पश्चिमेस ६ मैलावर असलेल्या **गोवर्धनापासून** आग्नेयेला १॥ मैल असलेल्या **तपोवना**पर्यंत स्नानाचे **अनेक धाट** आणि **पवित्र कुंडे** आहेत. त्यात **रामकुंड** हे सर्वात अधिक पवित्र स्थान आहे. नासिक येथे रामनवमीला मोठा धार्मिक उत्सव असतो.

**गोवर्धन** नगराचा उषवदाताच्या नासिक येथील शिलालेखात उल्लेख केला आहे. (एपि. इं. खं. ८ पा. ७२) **पंचवटी** हे स्थान रामायणाच्या काळापासून प्रसिद्ध आहे. जनस्थान. दंडकारण्यात होते आणि पंचवटी हा जनस्थानाचा भाग होता असे रामायणात (३·२१·१९-२०) सांगितले आहे. जनक कुलातील राजांनी ह्या ठिकाणी गोदावरीच्या प्रसादाने मुक्ती प्राप्त करून घेतली होती म्हणून त्याला जनस्थान नाव पडले असे ब्रह्मपुराणात (८८·२२-२४) म्हटले आहे.

जेव्हा गुरु सिंहराशीत प्रवेश करतो त्यावेळी गोदावरीमध्ये केलेले स्नान अत्यंत पुण्यदायक असल्याचे अद्यापीही मानले जाते. गुरु बारा वर्षांमध्ये एक वर्षपर्यंत सिंह राशीत असतो. त्या **सिंहस्थ वर्षी** भारताच्या सर्व भागातून सहस्त्रावधी यात्रेकरू नासिक येथे गोळा होतात.

**कांची** (सांप्रतचे **कांजीवरम्**)

भारतातील पुण्यकारक अशा सात नगरांपैकी कांची हे एक असून ते दक्षिण भारतातील अत्यंत प्राचीन नगरांपैकीही एक आहे. चिनी प्रवासी ह्युएनत्संग हा इ. स. ६४० च्या सुमारास येथे राहिला होता आणि त्याने अशी आख्यायिका लिहून ठेवली आहे की कांची नगराच्या आसपासच्या प्रदेशात बुद्ध अनेक

वेळा आला होता आणि काची येथे अशोकाने १०० फूट उंचीचा एक स्तूप उभारला होता. त्याच्या काळी कांचीचा परीघ १० ली (सुमारे चार मैल) होता आणि तेथे ८० देवांलये होती. कांची येथील पल्लव राजांच्या इतिहासाविषयी (इ. स. २५० ते ३५० च्या सुमारास) अनेक लेख प्रसिद्ध करण्यात आले आहेत. (एपि. इ. खं. ६ पा. ८४ इ.) ब्रह्मांड पुराणात (४·१९·१५), काशी आणि कांची ही दोन नगरे शंकराचे नेत्र असल्याचे [नेत्रद्वयं महेशस्य काशी-कान्चीपुरद्वयम् ।
विख्यातं वैष्णवक्षेत्रं शिवसांनिध्यकारकम् ॥
ब्रह्माण्ड (४·१९·१५).] म्हटले आहे. त्यात असेही सांगितले आहे की कांची हे प्रसिद्ध वैष्णव क्षेत्र आहे तथापि ते शंकराचे सान्निध्यही प्राप्त करून देते. बार्हस्पत्य सूत्रात (३·१२४) कांची हे **देवीचे स्थान** असल्याचे सांगितले आहे आणि देवी भागवतात (७·३८·८) ते **अन्नपूर्णा देवीचे स्थान** असल्याचे वर्णन केले आहे.

कांचीमध्ये अनेक देवालये आणि देवस्थाने आहेत. त्या सर्वात विष्णूचे **वैकुंठ पेरुमल** देवालय आणि पल्लव राजा राजसिंहाने बांधलेले **कैलासनाथाचे शैव देवालय** ही अतिशय प्रसिद्ध आहेत. ह्या शैव देवालयात एक मोठा सभामंडप आहे, आणि त्यात १००० खांब असल्याचे मानतात. कांची येथे एक जुने **जैनमंदिरही** आहे.

## पंढरपूर

मुंबई (आता महाराष्ट्र) राज्यामधील अत्यंत लोकप्रिय क्षेत्रांपैकी पंढरपूर हे एक आहे. लक्षावधि यात्रेकरू त्या ठिकाणी प्रतिवर्षी जातात. हे पुण्यक्षेत्र फार प्राचीन असल्याचे म्हणता येत नाही. सध्या उपलब्ध असलेल्या पुराव्याच्या आधारावर विठोबाच्या मंदिराची स्थापना केव्हा झाली हे निश्चितपणे सांगणे कठीण आहे. तथापि इ. स. च्या १३ व्या शतकाच्या मध्यभागीते देवालय खात्रीने अस्तित्वात होते असे म्हणण्याला पुरेसा पुरावा अस्तित्वात आहे. पद्मपुराणात (उत्तरखंड १७६·५६-५८) भीमरथीच्या तीरावर असलेल्या आणि फक्त दोन हात असलेल्या **विठ्ठल** (विष्णूच्या) मूर्तीचा केला आहे आणि त्या **मूर्तीला बिंदुमाधव** म्हणतात असे वर्णन केले आहे. पद्मपुराणातील हा भाग मागाहून घातलेला असावा आणि तो इ. स. १००० च्या सुमारापेक्षा जुना नसावा.

पंढरपूर येथील मुख्य देवालय विठोबाचे असून ते पंढरपूर येथील पवित्र मानल्या जाणाऱ्या भागाच्या मध्यभागी आहे. विठोबाच्या देवालयाच्या मागील बाजूला विठोबाची पत्नी **रुक्मिणी** हिचे देवालय आहे. विठोबाच्या अनेक सेवेकऱ्यांपैकी मुख्य सेवेकऱ्यांना '**बडवे**' म्हणतात आणि न्यायालयाच्या निर्णयाप्रमाणे ते देवालयाच्या मिळकतीचे आणि देवाच्या दागिन्यांचे विश्वस्त आणि संरक्षक आहेत. इतर सेवाधाऱ्यांमध्ये पुजारी, बेगारी, परिचारक, हरिदास, डिंग्रे, दिवटे, डंगे असे निरनिराळे प्रकार असून त्यांनी करावयाची कामे ठरवून दिलेली आहेत. रुख्मिणीच्या सेवेकऱ्यांचा एकच वर्ग असून त्यांना उत्यातअसे म्हणतात. ह्या देवालयांत स्त्री गायिका अथवा नर्तिका ह्यांचा संबंध नाही ही उल्लेखनीय गोष्ट आहे.

विठोबाची मूर्ती सुमारे ३ फूट ९ इंच उंचीची असून ती बैठकीसह एकाच अखंड दगडापासून घडविली असावी असे दिसते. विठोबाची मूर्ति हाताची कोपरे वर करून आणि कंबरेवर हात ठेवून उभी आहे. मूर्तीच्या मस्तकावर उंच आणि वरती वाटोळा असणारा मुकुट आहे. पुजारी आणि सामान्य लोक ते शिवलिंग असल्याचे मानतात. भारतात सध्या अस्तित्वात असलेल्या दुसऱ्या कोणत्याही वैष्णव सांप्रदायाच्या देवालयात पंढरपुरच्या देवालयातील मूर्तीसारखी मूर्ती असल्याचे आढळलेले नाही. तथापि भिलसानजिकच्या उदयपूर येथील लेण्यात इ. स. च्या ३ ऱ्या शतकातील दोन मूर्ति पंढरपुरच्या

मूर्तीसारख्या कंबरेवर हात ठेवून उभ्या असलेल्या आहेत आणि त्यांच्या हातात विठोबाच्या प्रमाणेच शंख आणि चक्र ही आयुधे आहेत.

विठोबाच्या देवालयाच्या पूर्वेला सुमारे ५०० यार्ड अंतरावर भीमा नदीच्या पात्रात **पुंडलिकाचे देवालय** असून ते पंढरपुर येथील अत्यंत लोकप्रिय देवस्थानांपैकी एक आहे. हे देवालय कोणत्याही देवाचे नाही. त्याच्यावरून पुंडलीक जेथे राहत होता त्या स्थानाचा बोध होतो. तो बहुधा पंढरपुरचा एक ब्राह्मण असून प्रारंभी आईबापांची अवहेलना करीत असे. परंतु पुढे त्याला उपरती होऊन तो आईबापांचा इतका आज्ञाधारक बनला की विठोबा देव त्याला दर्शन देण्याकरिता आला अशी आख्यायिका आहे. विठोबा आणि पुंडलिक ही नावे इतकी निगडित झाली आहेत की विठोबाचे भक्त वारकरी भोजनाला प्रारंभ करण्यापूर्वी आणि इतर प्रसंगी 'पुंडलिक वरदे हरि विठ्ठल' अशी घोषणा करितात.

पंढरपुरची विठोबाची मूर्ती केव्हा स्थापन केली हे सांगता येत नाही. परंतु शके ११७१ (इ. स.१२४९) मधील एका ताम्रपटात (इ. अँटि. खं. १४पा. ६८-७५) पंढरपुराला '**भीमरथीच्या तीरावरील पुंडरीकाक्ष क्षेत्र**' असे म्हटले आहे आणि विठोबाला 'विष्णु' असे म्हटले आहे. खुद्द पंढरपुर येथील शके ११९२ (इ. स. १२७०) मधील एका शिलालेखात कोणी केशवाचा पुत्र भानु ह्याने **पांडुरंगपुरामध्ये** आप्तोर्याम यज्ञ केला असल्याचे आणि त्या यज्ञामुळे विठ्ठल संतुष्ट झाल्याचे म्हटले आहे. विठोबाच्या देवालयातील एका खांबावर होयसलघराण्यातील सोमेश्वर नावाच्या राजाने शके ११५९ (इ. स. १२३७) मध्ये कोरलेला एक लेख असून भीमरथी नदीच्या तीरावर असलेल्या **पंडरगे** नावाच्या महाग्रामात राहणाऱ्या आणि पुंडरीक मुनीच्या अंतःकरणाला विकसित करणाऱ्या भगवान विठ्ठल देवाला एक अग्रहार देण्यात आला आहे. राष्ट्रकूट घराण्यातील अविधेय नावाच्या राजाने इ. स. ५१६ मध्ये दिलेल्या एका ताम्रपटातील लेखाने **पांडुरंगपल्ली** आणि दुसरी चार गावे **जयद-विठ्ठल** नावाच्या ब्राह्मणाला दान दिली होती ह्यावरून असा महत्वाचा निष्कर्ष निघतो की पंढरपूर हे कानडी लोकांना पंडरगे ह्या नावाने माहित होते आणि त्याला **पांडुरंगपल्ली** असेही म्हणत असत. त्या लेखात विठ्ठलदेवाचा प्रत्यक्ष उल्लेख केलेला नसला तरी दान घेणाऱ्या **जयद-विठ्ठाच्या** नावातील विठ्ठ हा भाग बहुधा विठ्ठल ह्या शब्दाचे आरंभीचे रूप असावे.

हेमाद्रीच्या ग्रंथातील तीर्थाविषयीच्या प्रकरणात पंढरपूर येथील विठोबासंबंधी पुढील कथा दिली आहे. भैमी नदीच्या दक्षिणतीरावर एक अति उत्तम तीर्थ आहे. आणि त्या ठिकाणी एक अत्यंत दुर्मिळ अशी उत्कृष्ट मूर्ती आहे. त्या तीर्थाला **पौंडरीक क्षेत्र** म्हणतात आणि त्या ठिकाणी सर्व देवातील श्रेष्ठ पांडुरंग वास्तव्य करितो. पुंडरीकाने २८ व्या कल्पामधील द्वापर युगाच्या अखेरीला थोर तपश्चर्या केली आणि आपल्या मातापित्याची अत्यंत भक्तिपूर्वक सेवा केली. भगवान कृष्ण गोवर्धन पर्वतावर गाई चारीत होता तो पुंडरीकाच्या पितृभक्तीने संतुष्ट झाला. त्यावेळी कृष्णाने गाई हाकण्याकरिता हातात काठी घेतली होती. त्याच्या मस्तकावर मुकुट होता. हातात एक गोफण होती, दंडात रत्नखचित बाहुभूषणे होती, कंबरेला गुह्यसूत्र वेष्टलेले होते आणि तीन पदरी कंबरपट्टा होता. त्याने आपली दोन्ही कोपरे वर करून हात कमरेवर ठेवलेले होते. त्याच्या पोटाला तीन वळ्या असल्याचे दिसत होते.

हेमाद्रीच्या ग्रंथातील हे प्रकरण उपलब्ध नसले तरी वरील श्लोक त्यात स्कंद पुराणातून उद्धृत केले असल्याचे म्हटले होते असे त्या ग्रंथातील अवतरण उद्धृत केलेल्या 'विठ्ठलभूषण' नावाच्या ग्रंथात म्हटले आहे. हेमाद्रीने आपला ग्रंथ इ. स. १२६०-१२७० ह्या सुमारास लिहिला होता. ह्यावरून असा निष्कर्ष निघतो की इ. स. १२६० च्या पूर्वी अनेक शतके पंढरपुर हे एक तीर्थ म्हणून प्रसिद्ध होते. तसेच संत पुंडरीक

अथवा पुंडलीक हाही त्याप्रमाणेच प्रसिद्ध होता आणि विठोबाची मूर्ती मुख्यत्वेकरून आजच्यांसारख्याच स्वरूपाची होती. पंढरपुरचे पावित्र्य आणि महत्त्व इ. स. च्या १५ व्या शतकात वाढले होते ही गोष्ट थोर वैष्णव संत चैतन्य आणि वल्लभ तेथे गेले होते ह्यावरून सिद्ध होते.

काही विद्वानांनी असे प्रतिपादन केले आहे की विठोबाची मूर्ती तुलनेने अलिकडील काळची आहे. मुंबई गॅझेटियरमध्ये असे म्हटले आहे की मुसलमान राजकर्त्यांनी भ्रष्ट करू नये म्हणून विठोबाची मूर्ती अनेक वेळा हालविण्यात आली होती. ती गोष्ट जरी खरी मानली तरी सध्याची मूर्ती मुख्य बाबतीत हेमाद्रीच्या वर्णनाशी जुळती अशीच आहे. इ. स. १८७३ च्या सुमारास दोघा गोसाव्यांनी मूर्तीची नासधूस केली होती आणि ती मूर्ती त्यानंतर पुन्हा स्थापन करण्यात आली आणि यात्रेकरूंना मूर्तीला आलिंगन देण्याची बंदी करण्यात आली. ह्याशिवाय त्या मूर्तीला शेकडो वर्षे दर दिवशी निदान एकदा आणि केव्हा केव्हा दिवसातून अनेक वेळा पंचामृताचे स्नान घातले जात आले आहे. जर हेमाद्रीच्या वर्णनातील काही तपशीलाच्या गोष्टी हल्लीच्या मूर्तीमध्ये स्पष्ट दिसत नसल्या तर त्या अशा स्नानामुळेही अस्पष्ट झाल्या असल्याचेही अनुमान करणे अवघड नाही.

विठोबाची मूर्ती वास्तविकपणे बुद्ध अथवा जैन धर्मातील आहे असे कोणी कोणी मानतात. परंतु तसे म्हणण्याला मुळीच आधार नाहीं. जेव्हा एकनाथ तुकारामासारखे संत विठोबाला बौद्धावतार म्हणतात तेव्हा त्यांच्या मनात विष्णूचा बुद्धावतार असतो म्हणजे विष्णूच असतो.

पंढरपुरची यात्रा करणाऱ्यांचे दोन वर्ग करिता येतील - एक नियमाने यात्रा करणारे आणि दुसरा वर्ग प्रसंगविशेषी यात्रा करणारे. नियमाने यात्रा करणाऱ्यांना **वारकरी** म्हणतात आणि त्यांचेही दोन वर्ग असतात- काही वारकरी दर महिन्याला जाणारे असतात आणि काही वर्षातून दोन वेळा आषाढी आणि कार्तिकी एकादशीला जातात. हा वारकरी सांप्रदाय समाजात समता उत्पन्न करणारा आहे. त्या सांप्रदायात तात्त्विकदृष्ट्या आणि पुष्कळ अंशाने व्यवहारातही जातिनिर्बंध मानण्यात येत नाही. वारकरी एक तुळशीच्या मण्यांची माळ धारण करतो, मांस खाण्याचे सोडून देतो. एकादशीला उपोषण करितो. व्यवसायात त्याने सत्य बोलले पाहिजे आणि कोणाला फसविता कामा नये.

# प्रकरण १६

## इतर तीर्थे आणि समारोप

(मू. ग्रं. पा. ४।७२३-८२७)

आतापर्यंत भारतातील प्रमुख अशा थोड्या तीर्थांची माहिती देण्यात आली. ज्या तीर्थांना आणि स्थानांना धर्मशास्त्राच्या दृष्टीने महत्त्व आहे अशाच तीर्थांची आणि स्थानांची अगदी त्रोटकपणे माहिती द्यावयाची म्हटले तरी त्याचा विस्तार किती होईल ह्याची कल्पना पुढे दिलेल्या आकड्यावरून होऊ शकेल. ब्रह्मपुराणात (अ. २६८-८३) ५२० हून अधिक तीर्थांची एक यादी दिली आहे. महाभारतातील भीष्मपर्वात (अध्याय ९) सुमारे १६० नद्यांचा उल्लेख केला आहे. गरुड पुराणात (१·८१·१-३१) सुमारे २०० आणि पद्मपुराणात (६·१२९) १०८ तीर्थांची नावे दिली आहेत. एकट्या वाराणसीमध्ये सुमारे १५०० देवालये आणि देवस्थाने आहेत. प्रत्येक मोठ्या तीर्थामध्ये अनेक उपतीर्थे असतात. अग्नितीर्थ, कोटीतीर्थ, चक्रतीर्थ, ह्यांच्यासारख्या नावांची अनेक तीर्थे भारताच्या निरनिराळ्या भागात आढळतात.

आता ह्या विसाव्या शतकातील आपण भारतीयांनी भारतातील पर्वत, नद्या आणि इतर पवित्र स्थाने ह्यांच्या बाबतीत कोणती भावना ठेवावी ह्याबद्दल थोडेसे विवेचन करणे अवश्य आहे. सध्याचे धर्मनिरपेक्ष शिक्षण आणि प्रचलित आर्थिक परिस्थिती, मानण्यात येणारी जीवनमूल्ये आणि लोकप्रवृत्ती ह्यांचा विचार केला म्हणजे त्यात नैतिक आणि आध्यात्मिक उन्नतीला मुळीच वाव नसल्याचे दिसून येते. आपण सर्व बाजूंनी काळज्या दुर्भिक्ष्य, दैन्य, अंतःकरणाचा कठोरपणा आणि गुन्हे ह्यांनी घेरलेले आहोत. ह्याकरिता, आपल्या देशाच्या हिताची काळजी असणाऱ्या सर्व लोकांनी ज्यांच्या योगाने मनाचा संकुचितपणा नाहीसा होईल आणि ते निदान काही काळ तरी उदात्त विचारात आणि आकांक्षात गुंतून राहील आणि सर्वव्यापी अशा द्रव्यार्जनाच्या विचारापासून अलिप्त होईल अशा सर्व संस्था आणि अशी सर्व कृत्ये ह्यांच्याबद्दल जिव्हाळा ठेवला पाहिजे. तीर्थयात्रा करणे हे अशापैकीच एक कृत्य आहे. तीर्थयात्रा केल्याने याचेकरूला स्वर्गप्राप्ती होते, पुण्य प्राप्त होते आणि संसारातून मुक्ति मिळते अशी ज्यांची श्रद्धा असेल त्यांनी तीर्थयात्रेला नवीन स्वरूप दिले पाहिजे, आपण केलेला धर्मादाय आळशी, अज्ञानी आणि व्यसनासक्त पंड्यांना मिळून त्याचा अपव्यय होणार नाही ह्याची काळजी घेतली पाहिजे. पुण्यक्षेत्रात चालू असलेल्या देवपूजांचे प्रकार सर्वस्वी आरोग्याच्या नियमांना धरून होतील अशा त्यात सुधारणा केल्या पाहिजेत. क्षेत्रातील उपाध्यायांनी हे लक्षात ठेवले पाहिजे की जर त्यांनी आपल्या वर्तनात सुधारणा केली नाही, सध्यापेक्षा अधिक अज्ञानी आणि आळशी न होण्याबद्दल प्रयत्न केला नाही आणि प्रामाणिक गुमास्ते आणि प्रवाशांना मार्गदर्शन करणारे होऊन येणाऱ्या यात्रेकरूंच्या उपयोगी पडण्याचा प्रयत्न केला नाही तर त्यांचा धंदा ह्यापुढे येणाऱ्या पिढ्यांत नष्ट झाल्याचे त्यांना आढळून येईल. पुण्यसंचयाच्या हेतूने पवित्र स्थानांना जाणाऱ्या लोकांची संख्या, जसजसा आधुनिक काळच्या धर्मनिरपेक्ष शिक्षणाचा होईल तसतशी खात्रीने कमीकमी होईल. तथापि, पवित्र मानलेल्या पर्वतांची आणि नद्यांची तीर्थयात्रा सर्वस्वी बंद पडणे ही गोष्ट भारताच्या नैतिक आणि आध्यात्मिक श्रेष्ठतेच्या दृष्टीने अनिष्ट अशी आहे. सर्व लोकांनी, मग. ते कितीही विद्वान असोत, काही विशिष्ट पवित्र स्थानांची यात्रा करावी अशी प्रस्तुत ग्रंथकाराची अत्यंत कळकळीची शिफारस आहे. आपल्या देशाने नुकतेच स्वातंत्र्य मिळविले आहे आणि आपल्या देशातील कोट्यवधि लोकांच्या शीलांचे संवर्धन करणे अथवा ते नष्ट करणे हे सर्वस्वी आपल्याच हातात आहे. ह्या देशात राहणाऱ्यां लोकात शारीरिक लक्षणे, अन्न, पोषाक आणि रीतिभाती ह्यात वैचित्र्य असूनही आपण सर्व एक आहोत. ज्याने धार्मिक बाबतीत आणि तत्त्वज्ञानाच्या बाबतीत, ग्रंथरचनेच्या बाबतीत, कलाकौशल्याच्या बाबतीत आणि पवित्र स्थानांच्या बाबतीत

महत्वाची कामगिरी केलेली नाही असा ह्या विशाल देशात एकही भाग अथवा प्रांत नाही, भारताच्या एका भागात राहणाऱ्या लोकांचे भवितव्य भारताच्या इतर सर्व भागात राहणाऱ्या लोकांच्या भवितव्याशी जोडलेले आहे, अशा तऱ्हेच्या खोल भावना तीर्थयात्रांच्या योगाने मनात उत्पन्न होतात. भारतातील दूरदूरच्या ठिकाणी वारंवार जाणे, इतर प्रांतातील लोकात मिसळणे आणि त्यांच्यातील चांगल्या गोष्टी, त्यांच्या गरजा आणि उणीवा समजून घेणे ह्या गोष्टी जर आपणास आपले स्वातंत्र्य जतन करावयाचे असेल तर अत्यंत आवश्यक आहेत. ज्याला आपल्या देशाला प्राप्त झालेल्या धार्मिक आणि आध्यात्मिक परंपरागत मूल्यवान ठेव्याचा अभिमान वाटत असेल अशा प्रत्येक भारतीयाने आपल्या आयुष्यातील काही तरी काळ पवित्र पर्वत, नद्या आणि इतर पुण्यक्षेत्रे ह्यांची वरचेवर यात्रा करण्याकडे खर्च करण्याचा निश्चय करावा. हिमालयाच्या बर्फाच्छादित कांचनगंगेसारख्या शिखरांचा देखावा, हरिद्वार येथील पवित्र गंगेचा रात्रीचा अथवा सूर्योदयाच्या वेळचा देखावा अथवा वाराणसी येथील भव्य घाटांवर दिसणारा देखावा आपल्या मनातील क्षुद्र भावना खात्रीने धुवून टाकतो आणि निदान त्यावेळेपुरती तरी आपली अंतःकरणे निसर्गाच्या सौंदर्याने आणि पावित्र्याने भरून जातात, आपले सर्व जीवन बऱ्याच काळपर्यंत उच्च पातळीवर राहते आणि आपले ब्रह्माशी तादात्म्य होते.

# खंड पाचवा : विभाग १ ला : व्रते आणि उत्सव

## प्रकरण १

### ऋग्वेदात आलेला 'व्रत' शब्द

(मू. ग्रं. पा. ५·१-२१)

ज्या शब्दांचा उपयोग आणि इतिहास कित्येक सहस्त्र वर्षांइतका जुना आहे अशा संस्कृतभाषेतील शब्दांपैकी **व्रत** हा एक शब्द आहे. ह्या शब्दाच्या अर्थाविषयी विद्वान लोकांत बरेच मतवैचित्र्य आढळते. कोणाच्या मते हा शब्द '**वृ**' वरणे ह्या धातूपासून झाला असून त्याचे अर्थ इच्छा, आज्ञापालन, नियमित अनुक्रम, धार्मिक कर्तव्य, उपासना, धार्मिक अथवा तपासंबंधी कृत्य अथवा विधि, प्रतिज्ञा, निश्चित हेतु असे निरनिराळे आहेत. दुसऱ्या काही विद्वानांनी तो शब्द **वृ** = **संरक्षण करणे** ह्या धातूपासून झाल्याचे सांगून त्याचा अर्थ प्रारंभी 'एखादी मर्यादित केलेली अथवा संरक्षण केलेली अथवा विशिष्ट कार्याकरिता बाजूला काढून ठेवलेली गोष्ट' असा होता आणि मागाहून त्याचा अर्थ 'निश्चित केलेली अथवा ठरविलेली गोष्ट' असा होऊ लागला आणि त्यानंतर त्याचा अर्थ 'सत्ता अथवा सामर्थ्य' असा झाला.

दुसऱ्या काही देशी आणि परदेशी विद्वानांनी व्रत हा शब्द **वृत्** = चालू राहणे, फिरणे ह्या धातूपासून झाला असून त्याचा अर्थ 'कार्यपद्धति, कार्यक्रम, वर्तुलाकार गति, मार्ग अथवा वर्तुलाकार मार्ग' असा होतो असे प्रतिपादन केले आहे. त्यांच्या मते व्रत हा शब्द 'वृ' धातूपासून होणे अशक्य आहे इतकेच नव्हे तर व्रत ह्या शब्दाचा अर्थ 'आज्ञा, आज्ञापालन करणे' अशासारखा असलेले एकही वाक्य ऋग्वेदामध्ये नाही.

प्रस्तुत ग्रंथकाराला **व्रत** हा शब्द '**वृत्**' धातूपासून झाला असल्याचे मान्य नाही. त्याच्या मताप्रमाणे तो शब्द वृ = निवडणे, पसंत करणे ह्या धातूपासून झाला आहे. वर म्हणजे एखाद्या कुमारिकेने अथवा तिच्या पालकाने अनेक पुरुषांपैकी '**निवडलेला** अथवा पसंत केलेला पति' हा शब्दही वृ धातू- पासूनच झालेला आहे. पसंत करण्याच्या क्रियेत पसंत करणाऱ्या व्यक्तीच्या इच्छेचा अथवा संकल्पाचा अंतर्भाव होतो, म्हणून वृ धातूचा अर्थ 'इच्छा करणे' असाही होतो. ह्याकरिता व्रत हा शब्द 'वृ' धातूपासून 'त' प्रत्यय लावून झाल्याचे मानले म्हणजे व्रत ह्याचा अर्थ 'संकल्प केलेले कृत्य अथवा संकल्प, अथवा इच्छा' असा होऊ शकतो. अधिकार अथवा सत्ता असणाऱ्या व्यक्तीची इच्छा ही इतरांना आज्ञेसारखी अथवा कायद्यासारखी होते. एखाद्या वरिष्ठ दर्जाच्या व्यक्तीने केलेल्या आज्ञेमध्ये त्या आज्ञेचे परिपालन करण्याच्या कर्तव्याचा अंतर्भाव होतो. आज्ञा बहुत कालपर्यंत पालन केल्या गेल्या अथवा कर्तव्ये एकाच प्रकाराने बहुत कालपर्यंत करण्यात आली म्हणजे त्या आज्ञांना अथवा कर्तव्यांना रूढीचे स्वरूप प्राप्त होते आणि तसे आचरण आवश्यक ठरते. देवांच्या आज्ञांना अनुसरून कांही विशिष्ट कृत्ये केलीच पाहिजेत अशी श्रद्धा लोकात उत्पन्न झाली अथवा लोकांना तसे वाटू लागले म्हणजे अशा कृत्यांना धार्मिक उपासनेचे अथवा धार्मिक कर्तव्याचे स्वरूप प्राप्त होते. जर एखाद्या व्यक्तीने देवाची कृपा व्हावी म्हणून आपल्या स्वतःच्या वर्तनाच्या बाबतीत अथवा अन्नाच्या बाबतीत काही विशिष्ट निर्बंध घालून घेतले म्हणजे अशा निर्बंधांना पवित्र प्रतिज्ञेचे अथवा धार्मिक नियमांचे स्वरूप प्राप्त होते. अशा रीतीने वृ धातूपासून झालेल्या व्रत शब्दाचे 'आज्ञा अथवा कायदा, आज्ञा पालन अथवा कर्तव्य, धार्मिक अथवा नैतिक रूढि' असे अर्थ होतात. व्रत शब्दाच्या वर दिलेल्या अर्थाचा उपयोग करून तो शब्द ऋग्वेदात ज्या वाक्यात आला आहे त्यातील बहुतेक वाक्यांची चांगली संगति लावता येणे शक्य आहे. अशा वाक्यांपैकी अर्ध्याहून अधिक वाक्यात व्रत ह्या शब्दाचा

यथोचित अर्थ 'आज्ञा अथवा निर्बंध' हाच असतो. काही वाक्यात 'धार्मिक आचार अथवा पवित्र उपासनेची पद्धति' हा अर्थ अनुरूप असतो. ऋग्वेदामध्ये अनेक ठिकाणी अव्रत (१·१०१·२), अपव्रत (१·५१·९), अन्यव्रत (५·२०·२) हे शब्द आले असून त्यातील बहुतेक सर्व ठिकाणी व्रत ह्या शब्दाचा अर्थ 'उपासनेची पद्धति' अथवा 'वैदिक उपासकांच्या नीतिपर अथवा धार्मिक कृति' असा असल्याचे धरणे अवश्य असते. काही वाक्यात (१०·५५·३) 'विव्रत' हा शब्द आला असून त्यात व्रत शब्दाचा अर्थ 'निर्बंध, कर्तव्य, आचरण' असा घेतला तरच त्या वाक्यांचा समाधानकारक अर्थ लावणे शक्य होते. तसेच 'तव व्रतें' हे शब्द ज्या ज्या ठिकाणी (६·५४·९) आले आहेत तेथे तेथे त्यांचा अर्थ 'तुझ्या निर्बंधाचे पालन करीत असताना' असाच सर्वसाधारणपणे समजला पाहिजे. त्याप्रमाणेच शुचिव्रत (८·४३·१६), महिव्रत (९·९७·७), प्रियव्रत (१०·१५०·३), धुनिव्रत (५·५८·२) धृतव्रत (१·२५·८), वृषव्रत (९,६५·११) व्रतपा अशा सारख्या शब्दांत आलेल्या व्रत शब्दाचा अर्थ 'निर्बंध' असाच असतो. ऋग्वेदातील बहुतेक सर्व वाक्यांत व्रत ह्या शब्दाचा अर्थ कसा होतो हे पाहण्याकरिता ऋग्वेदातील ज्या ज्या ऋचेत व्रत हा शब्द आला आहे अशा प्रत्येक ऋचेची छाननी करण्याची येथे आवश्यकता नाही.

ऋग्वेदामध्ये ऋत, व्रत आणि धर्मन् हे शब्द पुष्कळ वेळा आलेले असून काही ठिकाणी त्यांचे अर्थ परस्परांशी जुळते असतात. ऋग्वेदामध्ये (१·१८७·१) धर्मन् हा शब्द पुष्कळदा पुल्लिंगी विशेषण असून त्याचा अर्थ 'धारणा करणारा' अथवा 'आधार देणारा' असा असते. काही ठिकाणी (१·२२·१८) तो शब्द नपुंसक लिंगी असून त्याचा अर्थ 'धर्मासंबंधी विधी अथवा यज्ञ' असा असल्यासारखे दिसते आणि अशा रीतीने तो अर्थ व्रत ह्या शब्दांच्या एका प्रकारच्या अर्थाशी जुळतो. काही ठिकाणी धर्मन् ह्या शब्दाचा वर दिलेला अर्थ जुळत नाही आणि त्या ठिकाणी 'आचरणाची निश्चित तत्त्वे अथवा नियम' असा अर्थ असावा असे वाटते. काही ठिकाणी धर्मन् ह्या शब्दाचा अर्थ व्रत शब्दाच्याच सारखा बहुतेक असावा असे दिसते. [अचित्ती यत्तवधर्मा युयोपिम मा नस्तस्मादेनसो देव रीरिषः।
ऋ. (७·८९·५)] (ऋ. ७·८९·५ आणि १·२६·१) बहुतेक एकाच अर्थाच्या दोन ऋचांपैकी एकीत 'धर्माणि' असा शब्द आहे आणि दुसऱ्या ऋचेत 'धर्माणि' ह्या शब्दाच्या ऐवजी 'व्रतम्' हा शब्द आहे.

अशा रीतीने ऋग्वेदामध्ये देखील काही ऋचांत व्रत आणि धर्मन् ह्यांचे अर्थ संमिश्र झाल्यासारखे दिसत असले तरी दुसऱ्या काही ऋचांत ऋत, व्रत आणि धर्मन् हे तीनही शब्द अथवा त्यांच्यापैकी दोन शब्द आलेले आढळतात. पाश्चात्य विद्वान अथर्ववेदाचे जे भाग मागाहूनच्या काळात झाले असल्याचे मानतात त्या भागांत देखील 'धर्मन्' हा शब्द आलेला आहे. सामान्यतः म्हणावयाचे झाल्यास ऋत ह्या शब्दाचा अर्थ 'अत्यंत प्राचीन काळापासून अस्तित्वात असलेली विश्वरचना' असा आहे. व्रत ह्या शब्दाचा अर्थ "सर्व देवांनी अथवा व्यक्तिशः काही देवांनी घालून दिले असल्याचे मानण्यात येणारे निर्बंध अथवा नियम" असा आहे. धर्मन् ह्या शब्दाचा अर्थ 'धार्मिक विधि अथवा यज्ञ' असा होता. क्रमाक्रमाने ऋताची कल्पना अस्पष्ट होत जाऊन मागे पडली आणि ऋताची जागा सत्याने घेतली, धर्मन् हा सर्वसंग्राहक शब्द झाला आणि व्रत हा शब्द "धार्मिक अथवा पवित्र स्वरूपाची प्रतिज्ञा आणि समाजाचा एक घटक ह्या नात्याने अथवा एक स्वतंत्र व्यक्ति ह्या नात्याने मनुष्याने करावयाच्या आचरणासंबंधी निर्बंध" एवढाच मर्यादित अर्थाने वापरण्यात येऊ लागला.

# प्रकरण २

## वेदग्रंथांत, सूत्रांत आणि स्मृतिग्रंथांत आलेला व्रत शब्द

(मूळ ग्रंथ पा. ५/२२—५०)

### व्रताच्या व्याख्या आणि महत्त्व

मागील प्रकरणात ऋग्वेदामधील निरनिराळ्या वाक्यांत आलेल्या व्रत ह्या शब्दासंबंधी विवेचन केले. ऋग्वेदातील काही ऋचा तैत्तिरीय संहिता, अथर्ववेद, वाजसनेयी संहिता ह्यांच्यासारख्या इतर वेदांच्या संहितांमध्येही आढळतात आणि अशा ऋचांमध्ये देखील व्रत ह्या शब्दाचा अर्थ 'दैवी निर्बंध' अथवा 'आचरणाचे नैतिक आदर्श' असा असावा असे दिसते. ऋग्वेदाव्यतिरिक्त इतर वेदांच्या संहितांमध्ये 'व्रत' हा शब्द कोठे कोठे 'एखाद्या देवाचे निर्बंध' अथवा 'देवाचे नियम' ह्या अर्थाने योजण्यात येतो. तथापि इतर सर्व संहितांमध्ये आणि ब्राह्मण-ग्रंथांत आणि उपनिषदांत बऱ्याच ठिकाणी व्रत ह्या शब्दाचे सामान्यतः पुढील दोन **साधे अर्थ** असतात : (१) धार्मिक विधि अथवा धर्मसंबंधी प्रतिज्ञा अथवा धर्मसंबंधी प्रतिज्ञा केली असताना अन्नाच्या बाबतीत पाळावयाचे निर्बंध आणि (२) जेव्हा एखादा मनुष्य एखादा धार्मिक विधी अथवा कार्य करीत असेल तेव्हा त्या मनुष्याच्या उपजीविकेकरिता उपयोग करावयाची गाईचे दूध, यवागु (जवाची पेज), अथवा आमिक्षा (गरम दूध आणि दही ह्यांचे मिश्रण) ह्यांच्यासारखी शास्त्रात सांगितलेली अन्ने. यास्काचार्यांनी निरुक्तामध्ये (२·१४) हे दोन्ही अर्थ दिले आहेत.

ब्राह्मण ग्रंथांच्या काळीं व्रत ह्या शब्दाला दोन **गौण अर्थ** झाले होते असे दिसते. त्यांपैकी एक गौण अर्थ 'एखाद्या व्यक्तीचा विशिष्ट असा वर्तनक्रम' हा होता आणि दुसरा गौण अर्थ 'उपवास' हा होता. पहिल्या प्रकारच्या अर्थाचे उदाहरण ऐतरेय ब्राह्मणात (८·२८) आले आहे. त्यात म्हटले आहे की 'ब्रह्मणः परिमरः' नांवाच्या व्रताचे आचरण करणाऱ्या राजाने आपला शत्रु खाली बसण्यापूर्वी खाली बसू नये, आपला शत्रु आडवा होण्यापूर्वी आपण आडवे होऊ नये, शत्रु जागा आहे असे त्याला वाटले तर त्याने स्वतः जागत राहावे इत्यादि.

**उपवास** म्हणजे संमीप राहणे अथवा अन्नाविरहित राहणे अथवा काहीच न खाणे. उदाहरणार्थ, ऐतरेय ब्राह्मणामध्ये [तदाहुर्यद्दर्शपूर्णमासोरुपवसति न ह वा अव्रतस्य देवा हविरश्नन्ति तस्मादुपवसत्युत मे देवा हविरश्नीयुरिति। ऐ. ब्रा. (७·११)] (७·११) असे म्हटले आहे की ज्या यजमानाने व्रताचा अंगिकार केलेला नसतो त्याने अर्पण केलेल्या आहुतींचा देव स्वीकार करीत नाहीत. म्हणून आपल्या हवींचा देवांनी स्वीकार करावा ह्याकरिता यजमान दर्श आणि पूर्णमास इष्टीमध्ये रात्री गार्हपत्य प्रभृति अग्नींच्या समीप राहतो.

श्रौत, गृह्य आणि धर्मसूत्रांच्या बाबतीत देखील व्रत शब्दाचे वर उल्लेख केलेले दोन प्रमुख अर्थ त्या ग्रंथांत पुष्कळ वेळा आलेले आढळतात. उदाहरणार्थ, पारस्कर गृह्यसूत्रात (२·८) स्नातकाने समावर्तनानंतर तीन दिवस पुढील सारखी काही व्रते करावी असे सांगितले आहे : मांस भक्षण न करणे, पाणी पिण्याकरिता मातीचे पात्र न वापरणे, स्त्रिया, शूद्र, प्रेत आणि कावळे ह्यांचे दर्शन न घेणे, अथवा ह्यांच्याऐवजी केवळ सत्य भाषण करणे, इत्यादी. आप [पाणिग्रहणादधि गृहमेधिनोर्व्रतम्। कालयोर्भोजनम्। अतृप्तिश्चान्नस्य। पर्वसु चोभयोरुपवासः।

आप. ध. सू. (२·१·१-४).] ध. सू. (२·१·१।४) मध्ये विवाहाच्या दिवसापासून पती आणि पत्नी ह्यांनी

आचरावयाची दिवसातून फक्त दोन वेळा भोजन करणे, पर्व दिवशी उपोषण करणे ह्यांच्यासारखी काही विशिष्ट व्रते सांगितली आहेत.

एखाद्या दोषाच्या परिमार्जनाकरिता करावयाच्या प्रायश्चित्तांमध्ये अनेक कडक नियम पाळावे लागतात म्हणून मनु (११·११७), याज्ञवल्क्य (३·२५१) प्रभृति स्मृतींमध्ये प्रायश्चित्तांना 'व्रते' म्हटले आहे. महाभारतामध्ये व्रत हा शब्द मुख्यत्वेकरून अंगीकृत धर्मकृत्य अथवा अन्नासंबंधी अथवा सर्वसाधारण आचरणासंबंधी पालन करण्याची केलेली प्रतिज्ञा ह्या अर्थाने योजला आहे. उदाहरणार्थ, सभापर्व-(५८·१६) मध्ये युधिष्ठिर म्हणतो की कोणी द्यूताचे आव्हान दिले तर ते नाकारावयाचे नाही असे माझे निरंतरचे व्रत आहे.

व्रत शब्दाच्या गौण अर्थाव्यतिरिक्त त्या शब्दाचा मुख्य अर्थ ख्रिस्ती शकाच्या आरंभीच्या शतकांपासून पुढे "एखादी इष्ट गोष्ट साध्य करून घेण्याच्या इच्छेने एखाद्या देवतेची पूजा करणे आणि त्याच्याच बरोबर बहुधा अन्नभक्षणावर आणि वर्तनावर निर्बंध घालून एखाद्या विशिष्ट महिन्यात,एखाद्या विशिष्ट तिथीला आणि वारी अथवा दुसऱ्या एखाद्या काळीं करावयाचे धार्मिक कृत्य करण्याची अथवा निर्बंध पालन करावयाची प्रतिज्ञा करणे" असा होत आला आहे. ह्याच अर्थाने व्रत हा शब्द प्रस्तुत विभागात वापरण्यात येईल.

व्रते ही (१) **प्रायश्चित्ताच्या** (म्हणजे केलेल्या पातकांची निष्कृति करण्याकरिता केलेल्या कृत्यांच्या) स्वरूपाची असू शकतात; अथवा (२) **आवश्यक कृत्यांच्या** (म्हणजे ब्रह्मचारी अथवा स्नातक अथवा गृहस्थाश्रमी लोक ह्यांनी पालन करावयाच्या कृत्यांच्या) स्वरूपाची असू शकतात; अथवा (३) ती **ऐच्छिक** आणि काही विशिष्ट हेतु साध्य करण्याकरिता आपण होऊन स्वीकारलेली असू शकतात. प्रायश्चित्ताच्या स्वरूपाच्या व्रतांचे विवेचन खंड ४ मधील प्रायश्चित्तासंबंधीच्या प्रकरणात करण्यात आले आहे. ब्रह्मचारी प्रभृतींनी आचरावयाच्या आवश्यक व्रतांचे विवेचन खंड २ मध्ये करण्यात आले आहे. कमीअधिक प्रमाणात स्वतः होऊन स्वीकारलेल्या व्रतांचे अथवा प्रतिज्ञांचे विवेचन प्रस्तुत विभागात करण्यात येईल.

अशा तऱ्हेच्या प्रतिज्ञा सर्व धर्मात आढळतात. बायबल (इसाया १९।२१) ह्या ख्रिस्ती धर्मग्रंथात प्रतिज्ञांच्या पावित्र्याविषयी माहिती दिली आहे. जैन धर्मीय लोक **पांच महाव्रते** अथवा प्रतिज्ञा पालन करितात आणि बुद्धधर्मीय लोक **पंचशीलांचे** पालन करितात.

व्रतांच्या सर्वसंग्राहक व्याख्येच्या बाबतीत मध्ययुगीन कालातील निबंधग्रंथांत बरेच विवेचन केलेले आढळते. जैमिनीच्या पूर्वमीमांसा (६·२·२०) सूत्रावरील भाष्यात शबर स्वामींनी असा निष्कर्ष काढला आहे की 'मी अमुक गोष्ट करणार नाही' अशा स्वरूपाचा निश्चय करण्याचे मानसिक कर्म म्हणजे व्रत होय. याज्ञवल्क्यस्मृती (१·१२९) वरील मिताक्षरा टीकेत असे म्हटले आहे की 'कर्तव्य बुद्धीने एखादी गोष्ट करण्याचा अथवा न करण्याचा संकल्प करणे म्हणजे व्रत.' श्रीदत्ताने आपल्या समयप्रदीप ह्या ग्रंथात (पृ. २ ब). असे सांगितले आहे की ज्या संकल्पामध्ये शास्त्रांनी न सांगितलेली एखादी अट असते तो संकल्प व्रत नसतो, कारण संकल्प ही व्रतामधील प्रमुख गोष्ट असते. उदाहरणार्थ, जर एखाद्या मनुष्याने अशी प्रतिज्ञा केली की जर माझ्या पित्याने प्रतिबंध केला नाही तर मी उपोषण करणार नाही, तर अशी प्रतिज्ञा व्रत होत नाही आणि ते कृत्य केवळ शारीरिक पीडा होईल. रघुनंदनाने व्रत म्हणजे संकल्प हे मत मान्य न करिता असे प्रतिपादन केले आहे की व्रत म्हणजे ज्या निरनिराळ्या विधींबद्दल संकल्प केलेला असतो असे विधी आणि व्रत हा शास्त्राने सांगितलेला एक नियम असून उपवास हे त्याचे लक्षण असते. धर्मसिंधूने (पा. ९)

'पूजाप्रभृति तपशील असलेला एक धार्मिक विधि' अशी व्रताची व्याख्या दिली आहे. स्नान, संध्या, संकल्प, होम, ज्या देवतेच्या प्रीत्यर्थ एखादे व्रत अंगिकारलेले असेल त्या देवतेची पूजा, उपवास, ब्राह्मण, सुवासिनी स्त्रिया, कुमारिका यांना आणि गरीब आणि अपंग लोकांना भोजन घालणे, गाई, द्रव्य, अलंकार इत्यादिकांचे दान, व्रतकालावधीमध्ये आचरणाचे काही नियम पालन करणे ह्यांच्यासारख्या अनेक गोष्टींचा व्रतांमध्ये समावेश होतो.

व्रताचा अंगीकार करण्यापूर्वी कोणत्या गोष्टी कराव्या, व्रताच्या कालात कसे आचरण करावे ह्यांच्या संबंधी निरनिराळ्या ग्रंथांत काही नियम सांगितले आहेत. उदाहरणार्थ, एखादे व्रत अंगीकृत करण्यापूर्वी वृद्धि-श्राद्ध केले पाहिजे असे शातातपाने सांगितले आहे (व्रतार्क पा. ६ ब), अग्निपुराणात (१७५·१०।११) म्हटले [क्षमा सत्यं दया दानं शौचमिन्द्रियनिग्रहः।
देवपूजाग्निहवनं सन्तोषोऽस्तेयमेव च।
सर्वव्रतेष्वयं धर्मः सामान्यो दशधा स्मृतः॥
अग्निपु. (१७५·१०।११).] आहे की व्रत धारण करणाऱ्याने प्रतिदिनी स्नान केले पाहिजे, मर्यादित अन्नावर उपजीविका केली पाहिजे, गुरु, देव आणि ब्राह्मण ह्यांची पूजा आणि सत्कार केला पाहिजे, क्षार, लवण, मध आणि मांस ह्यांचा त्याग केला पाहिजे.

साधारणतः सर्व व्रतांच्या शेवटी जप, तप आणि दाने असतात. मूळच्या ग्रंथात थोडक्यात असणाऱ्या गोष्टींमध्ये भर घालून त्यांचा विस्तार करण्याकडे मध्ययुगीन कालच्या ग्रंथांची प्रवृत्ती असते. त्या प्रवृत्तीमुळे व्रताच्या आनुषंगिक कृत्यांचे आणखीही काही प्रकार निरनिराळ्या ग्रंथांनी सांगितले आहेत. बहुतेक व्रतांत ब्राह्मणभोजन घालावयाचे असते ही गोष्ट खरी असली तरी अंध, दरिद्री, पंगु ह्यांची मुळीच आठवण ठेवली जात नाही असे समजू नये. पुष्कळशा व्रतांत अंध, दरिद्री आणि पंगु ह्यांना अन्न द्यावे असे आवर्जून सांगितलेले असते. अवियोगव्रताचे वर्णन करताना कल्पतरु (व्रत ७५) आणि हेमाद्री (व्रत १·४४३) ह्या दोघांनी उद्धृत केलेल्या कालिकापुराणातील वचनामध्ये असा नियम सांगितला आहे की त्या व्रताच्या दिवशी चवदार आणि स्वादिष्ट अन्न आणि पेय अनाथ, अंध आणि बधिर ह्यांना मोकळ्या मनाने (कंजूषपणा न करिता) वाटावीत. भविष्यपुराणात अशी शिफारस केली आहे की एखादे व्रत आचरण करीत असणाऱ्या मनुष्याने अंध, संकटग्रस्त आणि असहाय लोकांना आपल्या सामर्थ्यानुसार अन्नदान करावे (भविष्य, उत्तर २२·३३।३४).

व्रत करीत असताना क्षमा, सत्य, दया, दान प्रभृति काही विशिष्ट सद्गुणांची जोपासना करावयाची असते. सर्व व्रतांच्या बाबतीत ब्रह्मचर्याचे पालन आणि हविष्यान्नाचे भक्षण करून राहावे असे नारदीय पुराणात (पूर्वार्ध ११०·४८) सांगितले आहे. हविष्यान्नाची. व्याख्या [मुन्यन्नानि पयः सोमो मांसं यच्चानुपस्कृतम्।
अक्षारलवणं चैव प्रकृत्या हविरुच्यते॥ मनु (३·२५७)] मनुने (३·२५७) अशी दिली आहे की नीवारासारखे मुनींना योग्य असणारे अन्न, दूध, सोमवल्लीचा रस, न सडलेले मांस आणि कृत्रिमपणे न केलेले मीठ ह्यांना स्वाभाविकपणे हवि म्हणतात.

पुराणांत ज्याप्रमाणे तीर्थयात्रांबद्दल अतिरिक्त प्रशंसा केलेली असते त्या प्रमाणेच व्रत करण्याबद्दलही अतिरिक्त प्रशंसा त्यांत केलेली असते. ख्रिस्त पूर्व अनेक शतकांपासून ब्रह्मचाऱ्याने पालन करावयाची व्रते प्रचारातून गेली होती आणि वेदोक्त यज्ञांशी संबंध असणारी व्रते फारच तुरळक प्रसंगी आचरली जात असत. पुराणात ज्यांना 'व्रत' अशी संज्ञा लावली आहे त्यांना गृह्य आणि धर्म सूत्रात आणि मनु, याज्ञवल्क्य प्रभृति प्राचीन स्मृतींत फारसे महत्त्वाचे स्थान देण्यात आलेले नाही. ख्रिस्ती शकाच्या

प्रारंभीच्या शतकांत प्राचीन काळच्या यज्ञ करण्याच्या पद्धतीला बौद्ध आणि जैन धर्म हे दोन मोठे बलिष्ठ प्रतिस्पर्धी उत्पन्न झाले आणि वैदिक धर्मातून फुटून निघालेल्या त्या दोन पंथांपासून सामान्य लोकांना परावृत्त करण्याकरिता व्रतांचे माहात्म्य वाढविणे ही युक्ति बहुधा वैदिक धर्मातील विद्वान लोकांना सुचली असावी. यज्ञ करण्यापेक्षा सोपी आणि सर्वसामान्य लोकांना परवडणारी अशी व्रते केल्याने स्वर्गप्राप्ती होते, पारलौकिक आणि आध्यात्मिक स्वरूपाची फले प्राप्त होतात असे त्यांनी लोकांना आश्वासन दिले आणि सामान्य लोकांत प्रचलित असणाऱ्या काही काही प्रघातांचा त्यांनी व्रते म्हणून स्वीकार केला. भविष्य पुराणात (उत्तर ७·१) असे म्हटले आहे की व्रते, उपवास आणि नियम ह्या नौकांच्या साहाय्याने मनुष्य नरकरूपी खोल सागर सहज तरून जातो. वेदांनी सांगितलेले आणि मनूने सांगितलेले विधी कलियुगात करणे शक्य नाही म्हणून दोन्ही पक्षांतील एकादशीच्या दिवशी उपवास करण्याचा सोपा, धन आणि कष्ट फारसे न लागणारा परंतु मोठे फल देणारा आणि सर्व पुराणांचे सार असणारा उपाय महाभारतात सांगितला आहे. अशाच प्रकारची वचने दुसऱ्याही पुराणांत आली आहेत. (हेमाद्रि व्रत १ पा. १०८९)

वेदोक्त यज्ञात आणि व्रतात काही विशिष्ट भेद असत. बहुतेक यज्ञांचे आश्वासित फल स्वर्गप्राप्ती हे असते. परंतु बहुतेक व्रतांच्या योगाने ह्याच आयुष्यात अधिक भरीव लाभ होतील असे पुराणांनी आश्वासन दिले होते. शिवाय शूद्र, कुमारिका, विवाहित स्त्रिया, विधवा ह्या सर्वांना इतकेच नव्हे तर वारयोषितांना देखील व्रते करिता येत असत. मध्ययुगीन कालात ज्यांना व्रते म्हणत असत त्या प्रकारची काही व्रते ख्रिस्तापूर्वीच्या आणि नंतरच्या काही थोड्या शतकांत देखील अस्तित्वात होती असे आश्व. ध. सूत्रे आणि मृच्छकटिक, शाकुंतल, रत्नावलि प्रभृति नाटके ह्यांच्यावरून सिद्ध होते. ख्रिस्ती शकाच्या आरंभीच्या शतकांत व्रतांची संख्या फारशी मोठी नव्हती. तथापि, क्रमाक्रमाने त्या संख्येत झपाट्याने भर पडत गेली. ११ व्या शतकात भोज राजाने केलेल्या राजमार्तंड ह्या ग्रंथात सुमारे २४ व्रतांचाच उल्लेख केला आहे. १२ व्या शतकात झालेल्या कृत्यकल्पतरु ह्या ग्रंथात सुमारे १७५ व्रतांचा उल्लेख केला आहे. तुलनेने त्या ग्रंथांच्या मागून बऱ्याच कालाने झालेल्या शूलपाणिकृत 'कालविवेक' ह्या ग्रंथात (इ. स. १३७५-१४३०) फक्त ११ च व्रतांचा उल्लेख केला आहे. हेमाद्रीच्या ग्रंथामध्ये सुमारे ७०० व्रतांचे विवेचन केले आहे. महामहोपाध्याय गोपीनाथ कविराज ह्यांनी इ. स. १९२९ मध्ये प्रसिद्ध केलेल्या व्रतकोशामध्ये १६२२ व्रतांची यादी दिली आहे. परंतु ती यादी निष्कारण फुगविलेली आणि वाढविलेली आहे. अशी निष्कारण वाढविलेली व्रते गाळून टाकली तर व्रतांची संख्या १००० पेक्षाही पुष्कळ कमी होईल.

कोणी मनुष्याने व्रताला आरंभ केला म्हणजे ते व्रत त्याने पुरे केलेच पाहिजे कारण जर त्याने निष्काळजीपणाने ते व्रत मध्येच टाकून दिले तर फार वाईट परिणाम होतील असे धर्मग्रंथांत सांगितलेले असते. तथापि, व्रत करीत असताना एखाद्याला मध्येच मरण आले तर त्यामुळे त्याला मिळणाऱ्या फलाची हानि होत नाही. जन्म अथवा मृत्युनिमित्त आशौच आले असताना कोणीही व्रताचा अंगिकार करू नये, परंतु एकदा आरंभ केल्यानंतर मध्यंतरी आशौच आल्यास व्रताला बाध येत नाही. स्त्रियांच्या [यत्तु सत्यव्रत :–
प्रारब्ध-दीर्घतपसां नारीणां यद्रजो भवेत् ।
न तत्रापि व्रतस्य स्यादुपरोधः कथं च नेति ॥
तत्प्रतिनिधिना कारयेदित्येतत्परम् । ... (नि. सिं. पा २९).] बाबतीत जर एखादे दीर्घकाळपर्यंत चालणारे व्रत त्यांनी आरंभिले असले तर मध्यंतरी आलेल्या मासिक रजोदर्शनामुळे,गरोदरपणामुळे अथवा प्रसूतीमुळे ते व्रत बंद होत नाही. जोपर्यंत त्या स्त्रियांना अपवित्रता असेल तोपर्यंत त्यांनी त्या व्रताचे विधि दुसऱ्या कोणाकडून करवावेत, परंतु उपोषणासारखी शारीरिक कृत्ये त्यांनी स्वतः करण्यास प्रत्यवाय नाही. व्रताचरण करणाऱ्याने शरीराला अथवा मस्तकाला तेल लावणे, तांबूल भक्षण करणे, चंदनाची उटी अंगाला लावणे, आणि ज्या गोष्टींच्या योगाने शारीरिक सामर्थ्य अथवा मनोविकार वृद्धिंगत होतील अशा गोष्टी वर्ज्य केल्या

पाहिजेत. (हेमाद्रि-व्रत १ पा. १००९). [गात्राभ्यङ्गं शिरोभ्यङ्गं ताम्बूलं चानुलेपनम्।
व्रतस्थो वर्जयेत्सर्वं यच्चान्यद्बलरागकृत्॥

हेमाद्रि (व्रतखंड १) पा. १००९.]

# प्रकरण ३

## व्रते करण्यास अधिकारी व्यक्ती, व्रतांच्या योगाने प्राप्त करून घ्यावयाच्या गोष्टी, व्रतांचे प्रकार आणि व्रतांसंबंधीचे ग्रंथ, व्रते करण्यास विहित काल

(मूळग्रंथ पा. ५।५१-८०)

**व्रताधिकारी** म्हणजे व्रत आचरण्यास अधिकारी व्यक्ति कोण ही एक महत्त्वाची बाब आहे. शूद्रांसहित सर्व जातींच्या पुरुषांना आणि स्त्रियांना व्रते करण्याचा अधिकार असतो. खरे पाहिल्यास पुराणांनी आणि निबंधग्रंथांनी अनेक व्रते केवळ स्त्रियांकरिताच सांगितली आहेत. [नास्ति स्त्रीणां पृथग्यज्ञो न व्रतं नाप्युपोषणम्। पतिं शुश्रूषते येन तेन स्वर्गे महीयते॥ मनु. (५·१५५).] मनु (५·१५५) प्रभृति स्मृतींनी आणि कित्येक पुराणांनी कोणत्याही स्त्रीला स्वतंत्रपणे व्रत अथवा उपोषण करिता येत नाही असे सांगितले असले तरी त्या वचनाचा अर्थ मध्ययुगीन काळात झालेल्या निबंधग्रंथांनी असा केला आहे की एखादे व्रत करण्यापूर्वी कुमारिकेने पित्याची, विवाहित स्त्रीने आपल्या पतीची आणि विधवा स्त्रीने आपल्या पुत्राची संमति मिळविली पाहिजे. शंखलिखिताचाही (स्मृति चं. पा. २९१) ह्या प्रकारच्या अर्थाला आधार आहे. एखाद्या व्रताकरिता करावा लागणारा होम एखाद्या स्त्रीला ब्राह्मणद्वारा करून घेता येईल असे व्यवहारमयूख ह्या ग्रंथात प्रतिपादन केले आहे. गरोदर असणाऱ्या अथवा नुकत्याच प्रसूत झालेल्या स्त्रीने उपोषणाच्या ऐवजी नक्त करावे आणि कुमारिकेने अथवा अन्य स्त्रीने (रजोदर्शन अथवा अन्य कारणाने) ती अपवित्र असेल तर आपले व्रत दुसऱ्याकरवीं करावे, परंतु ती पवित्र असो अथवा अपवित्र असो, उपोषणासारखी शारीरिक कृत्ये तिने स्वतः करण्यास प्रत्यवाय नाही असे तिथितत्व ह्या ग्रंथात (पा. १२१।१२२) म्हटले आहे.

जर एखाद्याला रोगामुळे अथवा अपघातासारख्या अन्य कारणांनी एखादे व्रत स्वतः करिता येत नसेल तर त्याने ते व्रत **प्रतिनिधिद्वारा** म्हणजे आपल्या वतीने दुसऱ्या कोणा व्यक्तीकडून करून घेता येते. अशा प्रतिनिधीसंबंधी काही नियम सांगितले आहेत.

**नित्य** आणि **नैमित्तिक** स्वरूपाच्या विधींच्या बाबतीत प्रतिनिधी योजता येतो आणि **काम्य** विधींच्या बाबतीत विधीला प्रारंभ केला असेल तर प्रतिनिधी नेमता येतो. असा प्रतिनिधी पुत्र, पत्नी, भ्राता, पती, भगिनी, शिष्य, पुरोहित आणि स्नेही हे असतात. पत्नीने अंगीकृत केलेले व्रत पतीला पुढे चालविता येते, तसेच पतीने अंगीकृत केलेले व्रत पत्नीला पुढे चालविता येते. पती आणि पत्नी दोघेही व्रत करण्यास असमर्थ असल्यास तिऱ्हाइताने व्रत पुढे चालवावे. असे केल्याने व्रताचा भंग होत नाही असे पैठीनसीने (नि. सिं. पा. २९) सांगितले आहे. जो कोणी आपल्या पित्याकरिता अथवा माता, भ्राता अथवा पत्नी ह्यांच्याकरिता आणि विशेषतः आपल्या गुरूकरिता उपोषण करितो त्याला शतपट पुण्य लागते, जो मनुष्य आपल्या मातापितरांकरिता अथवा त्यांच्यासारख्या आप्तांकरिता एकादशीचे उपोषण करितो त्याला आणि ज्याच्याकरिता उपोषण केले असेल त्याला असे दोघांना उपोषणाचे संपूर्ण फल प्राप्त होते असे कात्यायनाने सांगितले आहे. (नि. सिं. पा. २९).

देवी पुराणात (व्रतार्क पृ. ४ अ आणि ब) म्हटले आहे की म्लेच्छांना देखील व्रताचे ठिकाणी श्रद्धा असेल तर व्रते करिता येतात. यवन, किरात, गांधार, चीन, शबर प्रभृति लोकांना देखील वेदोक्त विधी करिता येतात; तलाव, उद्यान अशासारखी इष्टापूर्त कर्मे करिता येतात असे महाभारतात (शांति. ६५·१३।२५) म्हटले आहे.

एखादे उपोषण कोणाला सतत किती दिवसपर्यंत करिता येते ह्यासंबंधी महाभारतात [ब्रह्मक्षत्रे त्रिरात्रं तु विहितं कुरुनन्दन।
चतुर्थभक्तक्षपणं वैश्ये शूद्रे विधीयते।
त्रिरात्रं न तु धर्मज्ञैर्विहितं धर्मदर्शिभिः॥
अनुशासनपर्व (१०६·११ आणि १३)] (अनु. १०६·११ आणि १३) असा नियम सांगितला आहे की ब्राह्मण आणि क्षत्रिय ह्यांनी सतत दोन दिवसांहून अधिक मुदतीचे उपोषण करू नये, वैश्य आणि शूद्र ह्यांना सतत दोन दिवसाचाच उपवास करिता येतो आणि त्यांच्याकरिता तीन दिवसांचा उपवास शास्त्रांनी सांगितलेला नाही.

**व्रतांच्या योगाने प्राप्त करून घ्यावयाच्या गोष्टी.** मध्ययुगीन कालातील आणि अर्वाचीन काळी देखील केली जाणारी बहुतेक व्रते **काम्य** म्हणजे इहलोकात एखादा हेतु प्राप्त करून घेण्याच्या इच्छेने केलेली असतात आणि केव्हा केव्हा परलोकात एखादा हेतु साध्य करून घेण्याकरिता केलेली असतात अथवा इहलोकात आणि परलोकात एखादा हेतु साध्य करून घेण्याकरिता केलेली असतात. बहुतेक व्रतांना बाह्यतः धर्माचे स्वरूप दिलेले असले आणि उपोषण, पूजा, ब्रह्मचर्यपालन, सत्यनिष्ठा ह्यांच्यासारेखे काही नियम पालन करावयाचे असले तरी वास्तविकपणे ती व्रते ऐहिक स्वरूपाची असतात आणि त्यांत उघडपणे व्यावहारिक दृष्टी ठेवलेली असते. अशा ऐहिक फलांमध्ये पुण्य, दीर्घ आयुष्य, धन, शुचिर्भूतपणा, सुखोपभोग, स्वर्ग आणि मोक्षप्राप्ती इत्यादिकांचा समावेश असतो.

**व्रतांचे प्रकार.** निरनिराळ्या दृष्टीने व्रतांचे प्रकार करण्यात येतात. पद्मपुराणात (४·८४·४२।४४) व्रतांचे मानसिक व्रते, कायिक व्रते आणि वाचिक व्रते असे भेद केले आहेत. अहिंसा, सत्य, अस्तेय (चोरी न करणे), ब्रह्मचर्यपालन ह्यांच्यासारख्या व्रतांचा **मानसिक व्रतांत** समावेश होतो; एकभुक्त, नक्त, उपवास, अयाचितवृत्ती, ह्यांच्यासारख्या व्रतांचा **कायिक** व्रतांमध्ये समावेश होतो आणि वेदाध्ययन. करणे, देवाच्या नामाचा जप करणे अथवा कीर्तन करणे, सत्यभाषण करणे, कोणाची चाहाडी न करणे ह्यांचा **वाचिक** व्रतांमध्ये समावेश होतो.

व्रताला लागणाऱ्या कालाला अनुसरून व्रतांचे **मासव्रते**, **तिथिव्रते**, **नक्षत्रव्रते**, **वारव्रते** असेही वर्ग पाडता येतात. उपासना करावयाच्या देवतेला अनुसरून काही ग्रंथात **गणेशव्रते**, **सूर्यव्रते**, **शिवव्रते**, **विष्णुव्रते** अशी वर्गवारी केली आहे. व्रत करण्याला अधिकारी व्यक्ती कोण ह्याला अनुसरूनही व्रतांची वर्गवारी करिता येते. बहुतेक व्रते सर्व पुरुष आणि स्त्रिया ह्यांना करिता येतात. हरतालिका, वटसावित्री ह्यांच्यासारखी काही व्रते केवळ स्त्रियांकरिता असतात. काही व्रते केवळ पुरुषांनीच करावयाची असतात; काही व्रते केवळ राजांनी अथवा क्षत्रियांनी अथवा वैश्यांनी करावयाची असतात.

**व्रतासंबंधी ग्रंथ.** व्रतांसंबंधी ग्रंथांची संख्या फार मोठी आहे. तीर्थयात्रा आणि श्राद्धे ह्यांच्याव्यतिरिक्त धर्मशास्त्रातील दुसरा कोणताही असा विषय नाही की ज्याचे व्रतांच्या इतके पुराणांनी वर्णन केले आहे. काही पुराणात व्रतासंबंधी सहस्रावधी श्लोक आहेत. उदाहरणार्थ, भविष्य पुराणातील ब्रह्मपर्वात (अ. १६।२१६) ७५०० हून अधिक श्लोक आणि त्याच पुराणातील उत्तरखंडात ५००० हून अधिक श्लोक व्रतासंबंधी आले आहेत. सर्व पुराणे मिळून व्रतांच्या संबंधी किमान सुमारे २५००० तरी श्लोक आले आहेत. व्रते आणि उत्सव ह्यांच्यात निश्चित स्वरूपाचा भेद करणे अवघड आहे. कारण ज्यांना उत्सव म्हणतात त्यांत धार्मिक विधीचे काहीतरी अंग असतेच आणि उलटपक्षी पुष्कळ व्रतांमध्ये उत्सवासारखा काही भाग असतो. त्यामुळे ज्या

निरनिराळ्या विधींचा एका ग्रंथात व्रतांमध्ये समावेश केलेला असेल त्यांना काही लोक उत्सव अशी संज्ञा देतील आणि ती व्रते नव्हेतच असेही काही लोक म्हणतील.

व्रतविषयावरील टीका आणि निबंधग्रंथ अनेक आहेत. केवळ व्रतांचेच अथवा तिथींशी संबंध असणाऱ्या व्रतांचे विवेचन करणाऱ्या ग्रंथांत पुढील ग्रंथ प्रमुख आहेत : जीमूतवाहनाच्या **कालविवेक** ह्या ग्रंथात त्याच्यापूर्वी होऊन गेलेल्या आणि काल ह्या विषयाचे धार्मिक दृष्टीने विवेचन करणाऱ्या जितेंद्रिय, शंखधर, अंधूक, हरिवंश, योग्लोक प्रभृति ग्रंथकारांचा उल्लेख केला आहे. त्यातील काही ग्रंथकार ख्रि. श. च्या ११ व्या शतकाच्या पूर्वार्धापूर्वी होऊन गेलेले असले पाहिजेत. कारण रघुनंदनाने आपल्या मलमासतत्त्व ह्या ग्रंथात अंधूक भट्टाचा उल्लेख केला आहे आणि त्या उल्लेखावरून अंधूक भट्टाने आपला ग्रंथ इ. स. १०३५ च्या सुमारास लिहिला होता असे दिसते. तथापि त्या सर्वही ग्रंथकारांचे काल विषयावरील ग्रंथ अद्यापि उपलब्ध झालेले नाहीत.

धारानगरीचा राजा भोज ह्याच्या नावावर प्रसिद्ध असलेल्या दोन ग्रंथांत दुसऱ्या विषयांबरोबरच काल आणि व्रते ह्यांचे विवेचन केले आहे. हे दोन ग्रंथ इ. स. च्या ११ व्या शतकाच्या दुसऱ्या पादात लिहिलेले होते. त्यांच्यापैकी **राजमार्तंड** हा ग्रंथ हस्तलिखित स्थितीत उपलब्ध आहे.

व्रतासंबंधी विवेचन केलेल्या भोजराजाच्या नावावर प्रसिद्ध असणाऱ्या दुसऱ्या ग्रंथाचा निर्देश **भूपालसमुसच्चय**अथवा **भूपालकृत्यसमुच्चय** अथवा **कृत्यसमुच्चय** ह्या ग्रंथाची व्रत, दान इत्यादी विषयांवरील प्रकरणे अशाप्रकारे केलेला असतो. त्यातील अवतरणे मध्ययुगीन निबंधग्रंथांत घेतलेली आहेत परंतु तो ग्रंथ अद्यापि उपलब्ध झालेला नाही. तिथि, वार, नक्षत्रे, योग ह्यांचे ज्योतिषशास्त्रदृष्ट्या महत्त्व वर्णन केल्यावर **राजमार्तंड** ह्या ग्रंथात व्रतांचे आणि त्यांच्या विहित कालाचे विवेचन केलेले असून आज उपलब्ध असलेल्या व्रताविषयीच्या निबंधस्वरूपाच्या ग्रंथांत तोच सर्वात जुना ग्रंथ आहे.

प्रस्तुत ग्रंथामध्ये ज्यांचा आधार घेतला आहे त्यातील वैदिक ग्रंथ, सूत्रे, रामायण, भारत, पुराणे आणि राजमार्तड ह्यांच्याखेरीज दुसरे महत्वाचे ग्रंथ म्हणजे **कल्पतरु**, **हेमाद्रीचे व्रतप्रकरण**, माधवकृत **कालनिर्णय**, **कृत्यरत्नाकर**, **वर्षक्रियाकौमुदी**, **रघुनंदनाचे ग्रंथ** आणि **निर्णयसिंधु** हे आहेत.

प्रस्तुत विभागाचा संबंध ज्या व्रतांची वर्णने धर्मशास्त्रावरील ग्रंथांत दिली आहेत अथवा अशा ग्रंथांत ज्या व्रतांचा उल्लेख केला आहे अशा व्रतांशी आहे. अशा व्रतांची संख्या अतिशय मोठी आहे. सर्व भारतातील स्त्रिया अथवा आदिवासी समाजातील अथवा अशिक्षित लोक जी व्रते आचरतात ती सर्व व्रते अथवा बंगाली, हिंदी, अथवा मराठी ह्यांच्यासारख्या प्रादेशिक भाषांतील ग्रंथांत दिलेली व्रते ह्यांचा ह्या ग्रंथात समावेश केला नाही. काही ग्रंथकारांनी सामान्य जनसमाजात प्रचलित असलेल्या विधींसंबंधीचे ग्रंथ ह्यापूर्वीच प्रसिद्ध केले आहेत. तथापि सामान्यतः अशा ग्रंथांत धर्मशास्त्रातील वचनांचा अभावच दिसून येतो. श्री. ऋग्वेदी ह्यांचा 'आर्यांच्या सणांचा इतिहास' हा मराठी ग्रंथ आणि काही प्रमाणात श्री. अंडरहिल ह्यांचा 'भारतीयांचे धर्मसंबंधी वर्ष' हा ग्रंथ वरील विधानाला अपवाद आहे.

**व्रतांना आरंभ करण्याचा काल** काही व्रते काही विशिष्ट तिथींना अथवा विशिष्ट काली करावयाची असतात. अशा व्रतांव्यतिरिक्त इतर सर्वसाधारण व्रतांच्या बाबतीत विस्तृत नियम सांगितलेले असतात. उदाहरणार्थ, गर्गाने असे म्हटले आहे की ज्यावेळी गुरु आणि शुक्र ह्यांचा **अस्त** असतो अथवा ते **बाल** अथवा

**वृद्ध** अवस्थेत असतात तेव्हा आणि अधिक महिन्यात कोणत्याही व्रतांना **प्रारंभ** करू नये अथवा कोणत्याही व्रताचे **उद्यापन** करू नये. (हेमा. व्रत १ पा. २४५)

ज्यावेळी एखादा ग्रह सूर्याच्या निकट असल्यामुळे लोकांना दिसत नाही तेव्हा त्याचा **अस्त** झाला असे म्हणतात. एखाद्या ग्रहाच्या अस्तानंतर विशिष्ट मुदतीपर्यंत त्याची **बाल्यावस्था** असते आणि अस्त होण्यापूर्वी काही विशिष्ट मुदतीपर्यंत त्याची **वृद्धावस्था** असते.

**वारांपैकी** सोमवार, बुधवार, गुरुवार आणि शुक्रवार हे सर्व (धार्मिक) कृत्यांना शुभ असतात. रविवार, मंगळवार आणि शनिवार हे त्या वारी करावयास शास्त्रांनी सांगितलेल्या कृत्यांपुरतेच शुभ असतात असे रत्नमाला [सोमसौम्यगुरुशुक्रवासराः सर्व कर्मेसु भवन्ति सिद्धिदाः।
भानुभौमशनिवासरेषु च प्रोक्तमेव खलु कर्म सिध्यति॥
रत्नमाला(३·१५).] (३·१५) ह्या ग्रंथात म्हटले आहे. मंगळवार हा सर्व शुभ कृत्यांना प्रतिकूल असतो. तथापि तो शेतकी, सामवेदाचे अध्ययन आणि युद्धे ह्यांना प्रशस्त असतो असे भुजबल (पा. २०९) ह्या ग्रंथात सांगितले आहे.

**तिथि**. हा शब्द ऋग्वेद आणि इतर वैदिक वाङ्मयात स्वतंत्रपणे आलेला नाही. वेद ग्रंथांच्या नंतर झालेल्या ग्रंथांत अमावास्येच्या **सिनीवाली** आणि **कुहू** ह्या प्रकारांचा उल्लेख केला आहे. त्यांच्यापैकी सिनीवाली (म्हणजे चतुर्दशीसह असणारी अमावास्या) हिला ऋग्वेदामध्ये देवतेचे स्थान दिले आहे. अमावास्येप्रमाणेच **पौर्णमासी** ही **अनुमती** आणि **राका** ह्या दोन प्रकारची असते. ऋग्वेदामध्ये (२·३२·६।७) सिनीवालीला देवता मानली असून वाज० संहिते (१४·९) मध्ये अनुमतीचा उल्लेख केला आहे. निरुक्ता (११·३१) मध्ये ह्या सर्व संज्ञांबद्दल चर्चा केली आहे. हे शब्द प्राचीन काळी कशा रीतीने बनविण्यात आले असावेत हे अद्यापि देखील कोडे आहे. कोणी कोणी भाषाशास्त्रज्ञ आपले अज्ञान मान्य करण्याऐवजी ते शब्द बाबिलोनियन अथवा द्रविड भाषांतील काही शब्दांवरून बनले असावेत असे सांगण्याचा प्रयत्न करितात.

अत्यंत प्राचीन काळी देखील लोकांना पूर्णचंद्र, अर्धचंद्र, चंद्राचा पूर्ण अभाव आणि त्यानंतरचा अर्धचंद्र ही चंद्राची चार मुख्य रूपे सहज ओळखिता येत असली पाहिजेत. तै. ब्रा. (१·५·१०·५) मध्ये तर असे स्पष्ट म्हटले आहे की चंद्र १५ व्या दिवशी क्षीण होतो आणि १५ दिवसांनी पूर्ण होतो. ह्याचा अर्थ असा की तै.ब्रा. च्या रचना कालापूर्वी एका चांद्रमासात ३० चांद्रदिन (अथवा तिथी) असतात ही गोष्ट सुपरिचित होती. ऐतरेय ब्रा. (३२·९) मधील वर्णनावरून असे दिसून येते की ज्यावेळी एक तिथी दोन दिवसावर पसरलेली असते त्यावेळी एखाद्या विशिष्ट तिथीला करावयाचा विधी कोणत्या दिवशी करावा ह्याविषयी निरनिराळी मते ऐत. ब्रा. च्या रचनाकाळाच्या बऱ्याच पूर्वी उत्पन्न झाली होती. तै. ब्रा. आणि इतर ब्राह्मणग्रंथ ह्यांत आलेल्या उल्लेखावरून असे दिसून येते की त्या प्राचीन काळी एखाद्या दिवशी एखादी तिथि किती कालपर्यंत असते हे केव्हा केव्हा पूर्वीच अत्यंत सूक्ष्म रीतीने ठरविता येत नसे आणि त्यामुळे चंद्राचे नक्की स्थानही निश्चित ठरविता येत नसे.

ब्राह्मणग्रंथांप्रमाणेच **गृह्यसूत्रांत** आणि **धर्मसूत्रांतही** तिथि हा शब्द आला आहे. यज्ञातील अग्नि कोणत्या दिवशी स्थापन करावा ह्याविषयी नियम सांगताना गोभिल गुह्यात [तथा तिथिनक्षत्रपर्वसमवाये। गोभिलगुह्य (१·१·१३).] (१·१·१३) शुभतिथी आणि नक्षत्र ह्यांच्या समवायाचा म्हणजे एकत्र येण्याचा उल्लेख केला आहे. कौषितकिगृह्यात (१·२५) एखाद्या बालकाच्या जन्मतिथीचा उल्लेख केला आहे आणि तलावादिकांची

स्वत्वनिवृत्ती एखाद्या शुभ तिथीला करावी असे म्हटले आहे. ह्यावरून असे दिसते की वैदिक काळी (निदान ऐत ब्रा. च्या पूर्वी) म्हणजे सुमारे तीन हजार वर्षांपूर्वी विशिष्ट धार्मिक कृत्ये करण्याला विहित तिथी कोणत्या ह्याविषयीची मते आणि मतभेद अस्तित्वात होते आणि तिथी हा प्रत्यक्ष शब्द ख्रि. पू. ८०० च्या आधी नसला तरी निदान त्या काळाच्या सुमारास व्यवहारात होता असे मानणे भाग आहे कारण पतंजलीनी महाभाष्यात पौर्णमासी ह्या तिथीचा स्पष्ट निर्देश केला आहे.

चंद्राला सूर्याच्या पुढे १२ अंश जाण्याला लागणारा काल अथवा अवधि अशी तिथीची व्याख्या सूर्यसिद्धांतात [अर्काद्विनिःसृतः प्राचीं यद्यात्यहरहः शशी।
भागैर्द्वादशभिस्तत् स्यात्तिथिश्चान्द्रमसं दिनम् ॥
सूर्यसिद्धान्त (व.क्रि.कौ.पान २).] (व. क्रि. कौ. पा. २) दिली आहे. चंद्राची गति नियमित नाही म्हणून चंद्र केव्हा केव्हा १२ अंशाचे अंतर ६० घटिकात आक्रमण करितो, केव्हा केव्हा त्यापेक्षा अधिक (म्हणजे सुमारे ६५ पर्यंत) घटिकात आक्रमण करितो आणि केव्हा केव्हा सुमारे ५४ घटिकांइतक्या कमी कालात आक्रमण करितो. ह्यामुळे एखादा विवक्षित दिवस एका तिथीच्या समान असण्याचा संभव असतो, पुष्कळ वेळा एका दिवसात दोन तिथी असतात आणि एका व्यावहारिक दिवसात (एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतच्या अवधीत) तीन तिथी असण्याचीही शक्यता असते. उलटपक्षी एखादी तिथी तीन व्यावहारिक दिवसांना स्पर्श करण्याचाही संभव असतो.

जर एखादी तिथी सूर्योदयाच्या जरा पूर्वी सुरू झाली अथवा सूर्योदयांबरोबरच तिथीचा आरंभ झाला आणि त्यानंतर होणाऱ्या सूर्योदयानंतर ती तिथी समाप्त झाली तर त्या तिथीचे नाव (ती दोन सूर्योदयांच्या वेळी असल्यामुळे) दोन व्यावहारिक दिवसांना देण्यात येते आणि अशा रीतीने जेव्हा एकाच नावाच्या दोन तिथी एकामागून येतात तेव्हा त्या विवक्षित तिथीची **वृद्धि** असे म्हणतात. उलटपक्षी जर एखादी तिथि एका दिवशी सूर्योदयानंतर काही काळाने सुरू झाली आणि दुसऱ्या दिवशी सकाळी सूर्योदयापूर्वी समाप्त झाली तर ती तिथी कोणत्याच एका व्यावहारिक दिवसाशी जोडता येत नाही. आणि म्हणून ती तिथी पंचांगात गाळण्यात येते आणि त्यावेळी तिचा **क्षय** झाला असे म्हणतात. सामान्यतः एक तिथी एका व्यावहारिक दिवसापेक्षा कमी लांबीची असते. ह्या कारणाने तिथिवृद्धीपेक्षा तिथिक्षयच अधिक वेळा घडून येतो. जो व्यावहारिक दिवस तीन तिथींनी व्याप्त-असतो तो अत्यंत शुभ असल्याचे राजमार्तंड (पृष्ठ ८१ अ) ह्या ग्रंथात म्हटले आहे. उलटपक्षी जी तिथी तीन व्यावहारिक दिवसांना स्पर्श करिते ती तिथी विवाहाला, स्वारीवर निघण्यास अथवा एखाद्या शुभ धार्मिक कृत्याला अथवा उत्कर्षाकरिता करावयाच्या कृत्याला अशुभ असते असे (शुद्धिदीपिका) ह्या ग्रंथात म्हटले आहे.

गोभिल गृह्याच्या रचनाकाळाच्या बऱ्याच पूर्वी निरनिराळ्या तिथींच्या अधिष्ठात्री देवता असल्याचे मानण्यात येत असे. वराहमिहिराने बृहत्संहिता (९८·१।२) ह्या ग्रंथामध्ये दिलेली तिथिपतींची यादी आज उपलब्ध असलेल्या याद्यांत सर्वात प्राचीन काळची आहे. तथापि रत्नमाले (२) सारख्या ग्रंथांनी पुराणांना अनुसरून दिलेली तिथिपतींची नावे बृहत्संहितेच्या नावाहून निराळी आहेत.

वराहमिहिराने (बृ. सं. ९८·२।३) तिथींचे **नंदा, भद्रा, विजया** अथवा **जया, रिक्ता** आणि **पूर्णा** असे पाच विभाग केले आहेत आणि असे म्हटले आहे की त्या पाच प्रकारच्या तिथींना त्या तिथींच्या अधिपतींना अनुरूप अथवा नावांना अनुरूप अशीं कृत्ये करावीत आणि तशी कृत्ये यशस्वी होतात. अशा प्रकारे केलेल्या विभागणीत प्रतिपदा, षष्ठी आणि एकादशी ह्या नंदातिथि होतात; द्वितीया, सप्तमी आणि द्वादशी ह्या भद्रा

तिथी होतात; तुतीया, अष्टमी आणि त्रयोदशी ह्या जया तिथि होतात; चतुर्थी, नवमी आणि चतुर्दशी ह्या रिक्ता तिथि होतात आणि पंचमी, दशमी आणि पौर्णिमा ह्या पूर्णा तिथी होतात

काही विवक्षित तिथी आणि वार ह्यांचा **संयोग** झाला म्हणजे सर्व सिद्धी अथवा सर्व फले प्राप्त होतात. हे संयोग पुढील प्रमाणे आहेत :- नंदातिथी आणि शुक्रवार, भद्रा तिथी आणि बुधवार, जया तिथी आणि मंगळवार, रिक्ता तिथि आणि शनिवार आणि पूर्णा तिथि आणि गुरुवार. (आथर्वण [नन्दा भृगौ सोमसुतेच भद्रां भौमे जयां सूर्यसुते च रिक्ताम्।
पूर्णांगुरौ पत्र्चसु पत्र्च एते जयावहाः सर्वफलप्रदाश्च ॥
आथर्वण ज्योतिष (तिथिप्रकरण श्लो. १२)] ज्योतिष तिथिप्रकरण श्लो. १२)

एखाद्या विवक्षित तिथीला कोणता विवक्षित पदार्थ भक्षण करावा, कोणती कृत्ये करावी अथवा वर्ज्य करावी ह्याविषयीही नियम निरनिराळ्या ग्रंथात दिलेले आहेत.

**तिथींना अनुसरून कालगणना करण्याची पद्धती** अत्यंत प्राचीन काळची असून ती पद्धती **भारतामध्येच उत्पन्न झालेली आहे**. भारतीय ज्योतिषावर आणि फलज्योतिषावर ग्रीकांची छाप पडली आहे आणि भारतीयांनी नक्षत्रपद्धती चिनी लोकांपासून घेतलेली आहे अथवा बॉबिलोनियन लोकांपासून अथवा अरब लोकांपासून घेतली आहे अशा तऱ्हेची मते पाश्चात्य विद्वान करीत असले तरी तिथींची पद्धती भारतीयांनी अन्य कोणाकडून उसनी घेतली असल्याचे कोणी प्रतिपादन केल्याचे ऐकिवात नाही.

वेदांमधील आणि स्मृतींमधील **निर्बंध हे विधी** म्हणजे एखादी गोष्ट करावी आणि **निषेध** म्हणजे अमूक गोष्ट करू नये अशा दोन प्रकारच्या असतात. अशा दोनही प्रकारच्या निर्बंधांचे ' तिथि ' हे एक अंग असते. गर्गाने म्हटले आहे की तिथि, नक्षत्रे आणि वार हीं मुख्य विधीच्या अंगभूत असल्यामुळे पुण्य आणि पाप प्राप्त करून घेण्याची ती साधने असतात. परंतु त्यांना स्वतंत्र रीतीने पुण्य अथवा पाप ह्यांपैकी काहीही उत्पन्न करिता येत नाही. (तिथितत्व पा.४)

तिथींचे **पूर्णा** आणि **सखंडा** असे दोन भेद आहेत. जेव्हा एखादी तिथि सूर्योदयापासून सबंध दिवसभर ६० नाडिका (घटिका) पर्यंत व्यापलेली असते तेव्हा त्या तिथीला **पूर्णा** म्हणतात, म्हणजे ती सूर्योदयाबरोबर सुरू होते आणि दुसऱ्या दिवसाच्या सुर्योदयाच्या अगदी बरोबर समाप्त होते आणि तिची लांबी बरोबर ६० घटिका असते. अशा तिथींच्या व्यतिरिक्त इतर सर्व तिथी **सखंडा** असतात. सखंडा तिथींचे **शुद्धा** आणि **विद्धा** असे दोन प्रकार असतात. जी तिथी सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत अथवा (शिवरात्रीसारख्या काही तिथींच्या बाबतीत) सूर्योदयापासून मध्यरात्रीपर्यंत असते ती **शुद्धा** तिथी आणि बाकीच्या सखंडा तिथींना **विद्धा** म्हणतात. **वेध** दोन प्रकारचा असतो. एक **प्रातःकाळचा** वेध आणि दुसरा **सायंकाळचा** वेध. ज्यावेळी एखादी तिथि सूर्योदयापासून ६ घटिकांपर्यंत पुढील तिथीला स्पर्श करिते अथवा तिच्यात मिसळून जाते त्यावेळी **प्रातःकाळचा वेध** घडून येतो, आणि जेव्हा एखादी तिथि दुसऱ्या तिथीला सूर्यास्तापूर्वी ६ घटिका स्पर्श करिते त्यावेळी **सायंकाळचा वेध** घडून येतो. काही विशिष्ट तिथींच्या बाबतीत शास्त्रात सांगितलेला हा अवधि ६ घटिकांहून अधिक असतो.

शत. [पूर्वाह्णो वै देवानां मध्यन्दिनो मनुष्याणामपराह्णः पितृणाम्।
शतपथ ब्रा. (२·४·२·८).] ब्रा. (२·४·२·८) मध्ये सांगितले आहे की पूर्वाह्ण देवांकरिता असतो, मध्याह्न मनुष्यांकरिता असतो आणि अपराह्ण पितरांकरिता असतो. ह्याकरिता एखाद्या विशिष्ट तिथीला देवाप्रीत्यर्थ

करावयाच्या कृत्याचा प्रारंभ ती तिथी त्या दिवशी दुसऱ्या तिथीने विद्ध असली तरीदेखील प्रातःकाळीच केला पाहिजे. परंतु सायंकाळी अथवा रात्री करावयाची सर्व व्रते जरी ती तिथि दुसऱ्या तिथीने विद्ध असली तरीही सायंकाळी अथवा रात्री विद्यमान असलेल्या तिथीला केली पाहिजेत. एखादे धार्मिक कृत्य करण्याला प्रातःकाळ, माध्यान्ह काळ, अथवा सबंध दिवस इत्यादी जो काळ शास्त्रात सांगितलेला असेल तो सर्व काळ व्यापून असणारी तिथि त्या कृत्याला योग्य असते. एखादा विधी करावयास शास्त्रात सांगितलेला काळ ही केवळ **तपशिलाची गोष्ट** नसून त्या विधीचे तो काळ **निमित्त** असते, म्हणजे त्या कालाव्यतिरिक्त अन्य कालीं ते कृत्य केल्यास ते **न केल्यासारखे** होते. (जै. ६·२·२५ वरील शबरभाष्य) [न कालो गुणः। निमित्तं ह्येतदित्युक्तम्। तस्मादन्येषु कालेष्वविहितत्वात्कृतमप्यकृतं स्यात्।
जैमिनिवरील शबर भाष्य (६·२·२५).]

जर एखादी तिथि ज्या काळी अवश्य असते त्याकाळी दोन दिवस उपलब्ध असली अथवा त्या काळाच्या काही थोड्या अंशापर्यंतच ती तिथि उपलब्ध असली तर अशा परिस्थितीत सामान्यतः **युग्मवाक्य पद्धतीने** निर्णय करण्यात येतो. (ध. सिं. पा-८) द्वितीया आणि तृतीया, चतुर्थी आणि पंचमी, षष्ठी आणि सप्तमी, अष्टमी आणि नवमी, एकादशी आणि द्वादशी, चतुर्दशी आणि पौर्णिमा आणि अमावास्या आणि प्रतिपदा अशा सात जोड्या (युग्म) असतात आणि त्या परस्परांना लागू पडतात. उदाहरणार्थ द्वितीया तिथीला एखादे व्रत करावयाचे असले आणि त्या दिवशी द्वितीया **पूर्वविद्धा** (म्हणजे प्रतिपदेने युक्त) असली आणि पुढील दिवशी ती **परविद्धा** (म्हणजे तृतीयेने युक्त) असली तर ते व्रत त्या दोन दिवसांपैकी तृतीयेने युक्त असलेल्या दिवशी करणे अधिक प्रशस्त असते. त्याप्रमाणेच तृतीया तिथीला करावयाच्या व्रताच्या बाबतीत जर तृतीया एक दिवस द्वितीयेने विद्ध आणि दुसऱ्या दिवशी चतुर्थीने विद्ध असेल तर सर्वसाधारण नियमाने ते व्रत करण्याला द्वितीयायुक्त तृतीया हा दिवस अधिक चांगला समजावा.

युग्मवाक्याच्या नियमाला काही **अपवाद** असतात. कोणी ग्रंथकार हे नियम फक्त शुद्ध पक्षातील तिथींना लागतात असे म्हणतात. निर्णयसिंधू (पा. १८) सारखे दुसरे काही ग्रंथ ते नियम दोन्ही पक्षांना लागू पडतात असे म्हणतात. एकच तिथि एका व्रतामध्ये पूर्वविद्धा अधिक ग्राह्य समजली जाते आणि दुसऱ्या एखाद्या व्रतामध्ये देवता भिन्न असल्याकारणाने परविद्धा अधिक ग्राह्य धरली जाते.

पितरांसबंधीच्या विधींना युग्मवाक्याचे नियम लागू पडत नाहीत. जी तिथी सूर्यास्ताच्या वेळी अस्तित्वात असते त्या तिथीला पितर उपस्थित होतात. ती तिथी आणि अपराह्न हे काळ ब्रह्मदेवाने पितरांना दिले आहेत असे गृह्यपरिशिष्टात सांगितले आहे (व. क्रि. कौ. पा. १६)

करणात्मक नियमाला युग्म वाक्याचा नियम लागतो, निषेधात्मक नियमांना तो लागत नाही. एखाद्या विशिष्ट तिथींना तेल, मांस अशांसारखे पदार्थ खाऊ नये असा निषेधात्मक नियम त्या सर्व दिवसाला आणि त्या संपूर्ण तिथीला लागतो, भग ती तिथी ६५ घटिका असो आणि तीन दिवस व्यापून असो अथवा फक्त ५५ घटिका असून दोनच दिवस व्यापून असो. (तिथितत्व पा. ६)

एखाद्या व्रतामध्ये अनेक कृत्ये असून ती सर्व दिवसभर अथवा दिवसाच्या बऱ्याच मोठ्या भागभर चालावयाची असली तरी सूर्योदयाच्या वेळी अस्तित्वात असणारी तिथि मग ती सूर्योदयानंतर एक घटिकाभर फक्त असली तरी देखील दाने देण्याकरिता आणि व्रते करण्याकरिता **सकला** (म्हणजे पूर्णा) समजावी असे काही शास्त्रवचनात सांगितले आहे. (व. कि. कौ. पा. ५)

कालादर्श (पृ. ५ अ) हा ग्रंथामध्ये तिथीचे **खर्व** (६० घटिका इतक्या लांबीची), **दर्प** (६० घटिकांपेक्षा अधिक लांबीची), **हिंस्त्रा** अथवा **हिंसा** (६० धटिकांपेक्षा कमी लांबीची) असे वर्ग केले आहेत. राजमार्तंड ह्या ग्रंथातही असे वर्ग केले आहेत आणि त्यासंबंधी काही नियम सांगितले आहेत.

काही ग्रंथांत असा एक सर्वसाधारण नियम सांगितला आहे की ज्या नक्षत्रावरून महिन्यास नाव प्राप्त होते अशा नक्षत्रावर पूर्ण चंद्र असून तो गुरूशी संयुक्त असेल तर त्या तिथीच्या पूर्वी '**महा**' हा शब्द लावला जातो. [माससंज्ञे यदा ऋक्षे चन्द्रः सम्पूर्णमण्डलः।
गुरुणा याति संयोगं सा तिथिर्महती स्मृता ॥
कालविवेक पा. ३४७.] उदाहरणार्थ, कर्तिक महिन्यातील पौर्णिमेच्या दिवशी जर चंद्र आणि गुरु दोघेही कृत्तिका नक्षत्रात असले तर त्या पौर्णिमेला **महाकार्तिकी** असे म्हणता येईल. राजमार्तंड (पृ. ८१ अ, श्लो. १३८८) आणि भविष्यपुराण (व. क्रि. की. पा. ८७) ह्या ग्रंथांत अशा महाउपपद असणाऱ्या विशिष्ट पौर्णिमांच्या दिवशी काही विशिष्ट क्षेत्रात स्नान केल्यास फार मोठे फल प्राप्त होईल असे सांगितले आहे. उदाहरणार्थ, महामाघीला प्रयाग येथे, महाफाल्गुनीला नैमिषारण्यात, महाचैत्रीला शालग्राम येथे अशा जोड्या सांगितल्या आहेत.

काही विशिष्ट तिथींना कोणती कृत्ये वर्ज्य करावी ह्या विषयी धर्मशास्त्रात नियम सांगितलेले असतात. उदाहरणार्थ, देवलाने (कृ. र. पा. ५४७) म्हटले आहे की 'पौर्णिमा, चतुर्दशी आणि विशेषतः अष्टमी हा तिथींना तेल, मांस, स्त्रीसमागम आणि वस्तऱ्याचा उपयोग करणे ह्या गोष्टी वर्ज्य कराव्यात.' नारदीय पुराणात (१·१५६·१४०।१४१) असे सांगितले आहे की "षष्टी तिथीला तेल वर्ज्य करावे, अष्टमीला मांस वर्ज्य करावे, चतुर्दशीला वस्तऱ्याचा उपयोग वर्ज्य करावा, पौर्णिमेला आणि अमावास्येला स्त्रीसमागम वर्ज्य करावा."

# प्रकरण ४

## वेगवेगळीं व्रते – चैत्रप्रतिपदा, रामनवमी, अक्षय्य तृतीया, परशुरामजयंती, दशहरा, सावित्रीव्रत

(मू. ग्रं. पा. ५।८१-९४)

महाभारतात (शांतिपर्व कालविवेक पा. २५६) एखाद्या व्रताला प्रारंभ कसा करावा हे पुढीलप्रमाणे सांगितले आहे. आपल्या हातात उदकपूर्ण तांब्याचे पात्र घेऊन आणि उत्तरेकडे मुख करून एखाद्या उपवासाला अथवा व्रत म्हणून जे काही करावयाचे असेल त्या कृत्याला प्रारंभ करावा. देवलानेही [अभुक्त्वा प्रातराहारं स्नात्वाचम्य समाहितः।
सूर्याय देवताभ्यश्च निवेद्य व्रतमाचरेत्॥
देवल (कृत्यकल्पतरु-व्रत पा. ४)] (कल्पतरु व्रत पा. ४) म्हटले आहे की 'व्रत करणाऱ्याने' (पूर्वरात्री) भोजन न करिता आणि स्नान आणि आचमन करून आणि सूर्य आणि इतर देवता ह्यांच्यासमोर आपल्या हेतूचा उच्चार करून (म्हणजे **संकल्प** करून) व्रताचे आचरण करावे. एखाद्या व्रताचा अथवा उपवासाचा संकल्प सामान्यतः प्रातःकाळी करावा. एखाद्या तिथीचा प्रारंभ प्रातःकाळी होत नसला आणि माध्याह्नानंतर होत असला तरीदेखील जर एखादे व्रत त्या विशिष्ट तिथीला ती विद्धा असूनसुद्धा करावयाचे असेल तर त्या व्रताचा संकल्प प्रातःकाळी केला पाहिजे. संकल्पावाचून एखादे व्रत केल्यास त्यापासून अति अल्प फल मिळते आणि अर्धे पुण्य नष्ट होते. (कृत्यतत्व पा. ४२४.)

प्राचीन काळी आणि मध्ययुगीन कालात वर्षाचा प्रारंभ निरनिराळ्या काळी आणि निरनिराळ्या देशात भिन्नभिन्न महिन्यात होत असे. अमावास्येला पूर्ण होणारा महिना आणि चैत्र महिन्यापासून वर्षाचा आरंभ गृहीत धरून चैत्रापासून प्रत्येक महिन्यात आणि त्यातील निरनिराळ्या तिथींना येणारी महत्वाची व्रते आणि उत्सव ह्यांचे विवेचन करू.

**चैत्रप्रतिपदा**. महाराष्ट्रासारख्या ज्या काही प्रांतांत वर्षाचा आरंभ चैत्र महिन्यापासून होतो तेथे त्या महिन्याची पहिली तिथि जराशी समारंभाने आणि धार्मिक विधि करून साजरी करण्यात येते. हेमाद्रीचे व्रत प्रकरण (खं. १ पा. ३६०।३६५), कृत्यरत्नाकर (पा १०३।११०) ह्यांच्यासारख्या बहुतेक निबंधग्रंथांनी चैत्र शुद्ध प्रतिपदेच्य दिवशी करावयाचे वर्षारंभाचे विधि ब्रह्मपुराणाच्या आधारावर वर्णन केले आहेत. त्या पुराणात म्हटले आहे की ब्रह्मदेवाने चैत्र शुद्ध प्रतिपदेच्या दिवशी सूर्योदयाच्या वेळी जग निर्माण केले आणि कालगणनेला आरंभ केला. त्यादिवशी प्रथमतः ब्रह्मदेवाची पूजा करावी, नंतर इतर देव, कालाचे पळापासून युगापर्यंतचे विभाग इत्यादिकांचे पूजन करून शेवटी विष्णूचे पूजन करावे, ब्राह्मणांना अन्न आणि दक्षिणा देऊन त्यांचा सत्कार करावा; नातलगांना आणि सेवकांना बक्षिसे द्यावी; यविष्ठसंज्ञक अग्नीला होम अर्पण करावा; विशेष प्रकारचे अन्न तयार करावे आणि मोठा उत्सव करावा. चैत्रप्रतिपदेला जो वार असेल त्या वाराचा स्वामी हा वर्षाच स्वामी (राजा) असतो (नारदीय १·५६·१) आणि त्या दिवशी त्याची पूजा करावी. प्रत्येक गृहस्थाश्रमीयाने कमानी आणि पताका उभाराव्यात, तैलाभ्यंग स्नान करावे, निंबाची कडू असणारी पाने भक्षण करावी, पंचांग पठन करणाराकडून त्या वर्षाचा स्वामी, मंत्री,धान्याधिपति, रसाधिपति कोण देवता आहेत ही माहिती ऐकावी असे भविष्यपुराणात सांगितले आहे.

अद्यापिदेखील महाराष्ट्रात हा संप्रदाय चालू आहे. एका काठीला एखादे रेशमी वस्त्र अडकवितात आणि त्या काठीच्या टोकावर एक चांदीचे अथवा पितळेचे भांडे बसवून ती काठी उभी करतात, तिची पूजा

करतात, कडुनिंबाची पाने भक्षण करतात. सौराष्ट्रात संवताप्रमाणे वर्षारंभ होतो, तथापि तेथेही त्या दिवशी निंबाची पाने भक्षण करतात.

ज्या दिवशी सूर्योदयाच्या वेळी चैत्रप्रतिपदा असेल त्यादिवशी प्रतिपदेचा उत्सव करावा असा नियम आहे. प्रतिपदा तिथि दोन दिवस सूर्योदयाच्या वेळी असेल तर त्यांपैकी पहिल्या दिवशी उत्सव करावा. कोणत्याही दिवशी सूर्योदयाच्या वेळी प्रतिपदा नसेल तर अमावास्येने युक्त असणारी प्रतिपदा ग्राह्य समजावी. चैत्र अधिक मास असल्यास काही ग्रंथकारांच्या मताप्रमाणे अधिक महिन्यातील प्रतिपदेला वर्षारंभ करावा. दुसऱ्या काही ग्रंथकारांच्या मताप्रमाणे वर्षारंभ आणि वसंत ऋतूचा आरंभ अधिक महिन्यापासून होतो परंतु अभ्यंगस्नान, पंचांगश्रवण करणे इत्यादि कृत्ये शुद्ध चैत्रात [चैत्रस्य मलमासत्वे तैलाभ्यङ्ग—शकश्रवणादि शुद्ध एव कार्यम् । यद्यपि वत्सरवसन्तयोः प्रवृत्तिर्जाता तथापि तत्प्रयुक्तकृत्यम्... पूर्वमर्धं परित्यज्य उत्तर एव कार्यम् ।— समयमयूख पान १३]. करावीत. (समयमयूख पा. १३)

चैत्र शुद्ध प्रतिपदा हा वर्षाताल अत्यंत शुभ अशा साडेतीन मुहूर्तांपैकी एक असतो असा लोकांचा समज आहे.

**रामनवमी.** त्यानंतरचा चैत्र महिन्यातील महत्त्वाचा दिवस शुद्ध पक्षातील नवमी हा असतो. त्या दिवशी विष्णूचा ७ वा अवतार रामचंद्र ह्यांच्या जन्माचा उत्सव करण्यात येतो. हेमाद्रि प्रभृति अनेक ग्रंथकारांनी ह्या व्रताच्या बाबतीत अगस्त्यसंहिता आणि रामार्चनचंद्रिका (आनंदवनयतिकृत) ह्या ग्रंथांचा आधार घेतला आहे. रामसंप्रदाय हा कृष्णसंप्रदायाच्या मागून लोकप्रिय झाला असावा असे दिसते. अमरकोशात राम हा शब्द हलधर (बलराम) ह्या शब्दाचा समानार्थी असल्याचे सांगितले आहे.

रामाचा जन्म चैत्र शुद्ध नवमीचे दिवशी माध्याह्न काळी झाला आणि त्यावेळी चंद्र पुनर्वसु नक्षत्र व्यापून होता असे अगस्त्य संहितेत (हे. व्रत १ पा. ९४१) सांगितले आहे. जेव्हा नवमी तिथि दोन दिवस व्यापून असून फक्त पूर्व दिवशीच माध्याह्न काळी असेल तर पूर्व दिवशी व्रत करावे. दोन दिवस माध्याह्न काळी नवमी असेल अथवा कोणत्याही दिवशी माध्याह्न काळी नसेल तर दशमीयुक्त नवमीला व्रत करावे. अष्टमीयुक्त नवमीला व्रत करू नये. जर नवमी तिथि पुनर्वसुनक्षत्राने युक्त असेल तर ती तिथि अत्यंत पवित्र समजावी. अष्टमी, नवमी आणि पुनर्वसु एकत्र असले तरीदेखील दशमीयुक्त नवमीच्या दिवशी व्रत करावे. (माधवकृत कालनिर्णय पा. २२९।२३०) हे व्रत **काम्य** आणि **नित्य** असे दोनही प्रकारचे असल्याचे काही ग्रंथांत सांगितले आहे आणि ते केवळ **काम्य** असल्याचे काहींनी सांगितले आहे.

हेमाद्रि (व्रत १ पा. ९४१।९४६) प्रभृतींनी **ह्या व्रताचे विधान** असे सांगितले आहे की अष्टमीच्या दिवशी रामपूजना करिता एका ब्राह्मणाला आमंत्रण करून त्याचा सत्कार स्नान भोजनादिक उपचारांनी करावा. दुसऱ्या दिवशी व्रत करणाऱ्याने प्रातःकाली उठून स्नानादि नित्यकृत्ये करावी एक सुंदर मंडप उभारावा, त्यात जानकीसहित रामाच्या मूर्तीची स्थापना करावी, तिची माध्याह्नकाली पूजा करावी. त्यानंतरच्या दिवशी मूर्तीची पूजा करावी, आणि होम करून तुपाच्या अथवा पायसाच्या १०८ आहुती द्याव्या आणि त्या मूर्तीचे ब्राह्मणाला दान द्यावे. दुसऱ्या काही ग्रंथांत रामाच्या बाजूला भरत, शत्रुघ्न, लक्ष्मण, दशरथ, कौसल्या ह्यांच्याही मूर्ती स्थापन कराव्या आणि पूजा करावी असा तपशील अधिक सांगितला आहे.

चैत्र अधिक असल्यास रामनवमीचे व्रत अधिक मासात करावयाचे नसते.

आधुनिक काळी रामनवमीच्या दिवशी उपोषण फारच थोडे लोक करितात; होम, प्रतिमादान ह्या गोष्टी बहुधा कोणीच करीत नाहीत. परंतु त्या दिवशी माध्याह्नकाळी रामाच्या मंदिरात मोठ्या समारंभाने उत्सव करण्यात येतो, रामजन्माची कथा हरिदास वर्णन करितात, महाराष्ट्रात सुंठवड्याचा (सुंठ आणि साखर अथवा गूळ) प्रसाद वाटण्यात येतो. नासिक, तिरुपती, अयोध्या, आणि रामेश्वर ह्यांच्यासारख्या काही ठिकाणी हा उत्सव फारच मोठ्या थाटामाटाने केला जातो. आधुनिक काळी देखील हिंदूच्या जिव्हेवर असणारे रामनामा- व्यतिरिक्त दुसरे कोणतेही पवित्र नाव नाही.

**अक्षय्य तृतीया.** वैशाख महिन्यातील महत्त्वाची तिथि म्हणजे शुद्ध पक्षातील तृतीया ही होय. ह्या तिथीचा सर्वात प्राचीन काळचा उल्लेख विष्णु ध. सू. मध्ये आला आहे. ह्या दिवशी जे काही दान देण्यात येते ते अक्षय्य (म्हणजे कधी न संपणारे) होते म्हणून त्या तिथीला **अक्षय्य तृतीया** असे म्हणतात. मत्स्य पुराणात (६५·१।७) ही तसेच सांगितले आहे. ह्या तृतीयेला कृत्तिका नक्षत्र असेल तर ती विशेष प्रशस्त असते असेही त्या पुराणात म्हटले आहे. भविष्योत्तर पुराणात (३०·१।९) असे सांगितले आहे की ही तिथि **युगादि** तिथींपैकी एक असून त्या दिवशी कृत युगाचा आरंभ झाला होता. त्या दिवशी ब्राह्मणांना उदकाचा कलश, छत्री, पादत्राणे दान द्यावीत. ह्या दिवशींच्या धार्मिक विधींकरिता पूर्वाह्नकाळी असणारी तृतीया घ्यावी. जर दोन दिवस तृतीया पूर्वाह्नकाळी असेल तर व्रताकरिता दुसऱ्या दिवशीची ध्यावी.

युगादि संज्ञा असणाऱ्या तिथींवर केलेल्या श्राद्धापासून पितरांना अक्षय्य संतोष मिळतो असा नियम पुराणांत सांगितला आहे. परंतु युगादि श्राद्धामध्य पिंडदान करू नये. अक्षय्य तृतीया ही वर्षातील अत्यंत शुभ अशा साडेतीन मुहूर्तांपैकी एक असून तो स्वतः अर्धा मुहूर्त असतो अशी लोकांची समजूत आहे.

**परशुरामजयन्ती.** वैशाख शुद्ध तृतीयेलाच परशुरामाची जयन्ती साजरी करण्यात येते. स्कंद आणि भविष्य पुराणांत (निर्णयसिंधु पा ९५) असे सांगितले आहे की वैशाख शुद्ध तृतीयेच्या दिवशी रात्रीच्या पहिल्या प्रहरात विष्णूने रेणुकेच्या उदरी जन्म घेतला म्हणून त्या दिवशी रात्रीच्या पहिल्या प्रहरात जयंती साजरी करण्यात येते. जर तृतीया शुद्धा असेल तर व्रत (उपोषण) त्या दिवशी करावे. जर ती तिथि रात्रीच्या पहिल्या प्रहरात अल्प अंशाने देखील दोन दिवस व्यापून असेल तर उपोषण दुसऱ्या दिवशी करावे. तृतीया विद्धा असून सुद्धा रात्रीच्या पहिल्या प्रहरापर्यंत पोहोचत नसेल तर दोन दिवसांपैकी पहिल्या दिवशी उपोषण करावे. परशुरामाची काही देवालये आहेत त्यांत आणि विशेषतः रत्नागिरी जिल्ह्यातील चिपळूणनजीकच्या देवालयात परशुराम जयन्ती मोठ्या समारंभाने साजरी करण्यात येते. भारताच्या (सौराष्ट्रा-सारख्या) अनेक भागांत परशुरामजयन्ती साजरी करण्यात येत नाही.

**दशहराव्रत.** ज्येष्ठ महिन्यात शुद्ध दशमीच्या दिवशी **दशहरा** ह्या नावाचे एक व्रत असते. ब्रह्मपुराणात (६३·१५) सांगितले आहे की ज्येष्ठ शुद्ध दशमीला दशहरा असे म्हणण्याचे कारण ती दशप्रकारची पातके हरण करते. अशी कल्पना होती की ह्या तिथीला मंगळवार आणि हस्त असताना गंगा नदी भूलोकावर आली आणि म्हणून हे व्रत प्रारंभी गंगेमध्ये स्नान करण्याचे, गंगेची पूजा करण्याचे आणि दाने देण्याचे असावे असे दिसते. नंतरच्या काळात ह्या व्रतामध्ये कोणत्याही मोठ्या नदीमध्ये स्नान करून अर्घ्य, तीळ आणि उदक देणे ह्या कृत्यांचा समावेश होऊ लागला.

सांप्रत काळी कृष्णा, गोदावरी, नर्मदा, आणि गंगा ह्यांच्यासारख्या मोठ्या नद्यांच्या तीरावरील

निरनिराळ्या नगरांत आणि गावांत गंगेचा उत्सव करण्यात येतो. वाराणसी, प्रयाग, हरिद्वार नासिक ह्यांच्यासारख्या ठिकाणी हा उत्सव मोठ्या प्रमाणात केला जातो. जर ज्येष्ठ महिना अधिक असेल तर हे व्रत त्या महिन्यात करावे.

**सावित्रीव्रत.** ज्येष्ठ महिन्यात पौर्णिमेच्या दिवशी भारताच्या बऱ्याच भागांत अद्यापि देखील **सावित्री** व्रत अथवा **वटसावित्रीव्रत** पतियुक्त (सुवासिनी) स्त्रिया करितात. पतिव्रता स्त्री कशी असावी ह्याचा सावित्री हा आदर्श मानला जातो आणि तिची स्मृति सर्व भारतीय स्त्रियांनी दीर्घकालापासून जागृत ठेवली आहे. सावित्रीचे चरित्र अत्यंत लोकप्रिय असून ते महाभारत (वनपर्व, अ. २९३।२९९), मत्स्य, स्कंद (प्रभास अ. १६६) विष्णुधर्मोत्तर (२ अध्याय ३६।४१) यासारख्या अनेक ग्रंथांत सविस्तर वर्णन केले आहे. सावित्रीने सत्यवानबरोबर विवाह केला, सत्यवानाला एक वर्षाच्या अंती मृत्यु येणार आहे असे नारद मुनीने तिला सांगितले होते. नारदाने सांगितलेल्या दिवसाच्या पूर्वी तीन दिवस तिने उपवास सुरू केला, तो लाकडे आणि फुले आणि फळे आणण्याकरिता अरण्यात गेला असता सावित्री त्याच्याबरोबर गेली. मृत्यूची देवता यम सत्यवानाचे प्राण हरण करण्याकरिता आला असताना तिने त्याच्याशी युक्तिवाद करून त्याला इतके संतुष्ट केले की त्याने तिला अनेक वर देऊ केले आणि शेवटी मृत झालेल्या तिच्या पतीलाही त्याने जिवंत केले.

हेमाद्रि (व्रत खं. २ पा २५८।२७२) यात भविष्योत्तर पुराणात दिलेले **ब्रह्मसावित्री** नावाचे व्रत सांगितले आहे, परंतु ते व्रत ज्येष्ठ महिन्यात न करिता भाद्रपद महिन्यात त्रयोदशीपासून पौर्णिमेपर्यंत तीन दिवस करावे असे सांगितले आहे. हेमाद्रि (व्रत खं. २ पा २७२।२७९) वर स्कंद पुराणात दिलेले वटसावित्रीचे व्रत सांगितले आहे आणि हे **वटसावित्रीचे व्रत** ज्येष्ठ पौर्णिमेच्या दिवशी सौभाग्यवती (पतियुक्त) स्त्रीने अथवा पुत्रहीन विधवा स्त्रीने करावे असे सांगितले आहे. ह्या दुसऱ्या व्रताला व्रतकालविवेक ह्या ग्रंथात **महासावित्री व्रत** असे म्हटले आहे. निर्णय सिंधूने [एतच्चामावास्यायामप्युक्तं निर्णयामृते भविष्ये।
अमायां च तथा ज्येष्ठे वटमूले महासती।
त्रिरात्रोपोषिता नारी विधिनानेन पूजयेत्।...
हेमाद्रिसमयोद्द्योतादिषु भाद्रपदपूर्णिमायामुक्तं तत्तु नेदानीं प्रचरति।
निणंयसिंधु, पान १००.] (पा. १००) भाद्रपद महिन्यात करावयाच्या व्रताचा उल्लेख करून असे म्हटले आहे की ते व्रत त्या ग्रंथाच्या काळी प्रचारात नव्हते.

सांप्रत काळी प्रचारात असलेले **वटसावित्री व्रत** इ. स. च्या दहाव्या शतकाच्या पुष्कळ पूर्वीपासून आचरले जात असले पाहिजे. अग्नि पुराणात (१९४·५।८) ज्या व्रताचे थोडक्यात वर्णन केले आहे ते तत्वतः आधुनिक काळचे वटसावित्री व्रतच आहे. राजमार्तंड ह्या ग्रंथात (पृ. ८१ अ) म्हटले आहे की ज्येष्ठ महिन्यातील शुद्ध चतुर्दशीच्या दिवशी वैधव्यातून मुक्तता होण्याच्या हेतूने स्त्रिया भक्तिपूर्वक सावित्रीव्रत करितात. हा नियम महाराष्ट्रातील स्त्रिया पाळतात.

काही ग्रंथांत (निर्णयामृत) हे व्रत ज्येष्ठ महिन्यात अमावास्येला करावे असे सांगितले असून दुसऱ्या काही ग्रंथांत (क्रियातत्त्व पा. ४३०) ज्येष्ठ महिन्यातील कृष्णचतुर्दशीच्या दिवशी करावे असे सांगितले आहे.

जर पौर्णिमा दोन दिवस व्यापून असेल तर हे व्रत पौर्णिमायुक्त चतुर्दशीला करावे. तीन दिवस व्रत करावयाचे असेल तर त्याचा आरंभ द्वादशीला अथवा त्रयोदशीला करावा लागेल. तथापि चतुर्दशी १८ घटिकापर्यंत असून नंतर पौर्णिमा लागत असेल तर ती चतुर्दशी दिली पाहिजे असे कालनिर्णय (पा. ३०१)

ह्या ग्रंथात म्हटले आहे.

ह्या व्रतात वडाची पूजा करण्यात येते ह्याचे कारण बहुधा असे असावे की जेव्हा मृत्यु जवळ आला तेव्हा सत्यवानाने वटवृक्षाचा आश्रय केला होता आणि तो त्या वृक्षाच्या एका खांदीच्या आधारावर उभा राहिला होता.

मध्ययुगीन काळातील निबंधग्रंथांत ह्या व्रताचा कार्यक्रम पुढीलप्रमाणे सांगितला आहे. व्रत करणाऱ्या स्त्रीने भर्त्याला आणि पुत्रांना दीर्घ आयुष्य आणि आरोग्य प्राप्त व्हावे आणि ह्या व पुढील जन्मात वैधव्यातून मुक्तता व्हावी ह्या उद्देशाने व्रत करण्याचा संकल्प करावा. वटवृक्षाला कापसाचे सूत गुंडाळावे, त्याची पूजा करावी, सावित्रीच्या प्रतिमेची पूजा करावी, तिला अवैधव्य देण्याबद्दल प्रार्थना करावी, यम आणि नारद ह्यांची पूजा करावी, पुरोहिताला वायन द्यावें आणि दुसऱ्या दिवशी पारणा करावी. (व्रतार्क पृ. ३१२।३२०).

एखाद्या स्त्रीला तीन दिवस उपोषण करणे शक्य झाले नाही तर तिने त्रयोदशीला नक्त करावे, चतुर्दशीला अयाचित वृत्तीने मिळेल ते अन्न भक्षण करावे आणि पौर्णिमेला उपोषण करावे.

बंगाल प्रांतात वटसावित्री व्रत अस्तित्वात नाही. परंतु पुढील जन्मात सुखयुक्त सौभाग्य प्राप्त होण्याकरिता करावयाचे **सावित्री चतुर्दशी** नावाचे एक व्रत असते. ते व्रत ज्येष्ठ कृष्ण चतुर्दशीला करावयाचे असून १४ वर्षेपर्यंत चालू ठेवावयाचे असते.

अत्यंत महत्त्वाच्या व्रतांच्या बाबतीत देखील त्या व्रताचे मूळ काय असावे आणि ती व्रते प्राचीन काळी कशी उत्पन्न झाली असावी ह्या विषयीचे तर्क करण्याचा प्रयत्न प्रस्तुत ग्रंथात केलेला नाही. काही विद्वानांनी प्रस्तुत ग्रंथात आलेल्या व्रतांचे उगम शोधून काढण्याचे प्रयत्न केले आहेत. सावित्री व्रताच्या मागील संकेत योजनेचा खुलासा करण्याचा प्रयत्न कै. श्री. बी. ए. गुप्ते ह्यांनी इं. ॲन्टी. खंड ३५ (सन १९०६) पा. ११६-११९ वर केला आहे. श्री. गुप्ते ह्यांची पत्नी सावित्री व्रत करतेवेळी चंदनाच्या गंधाने काही चित्रे काढीत असे आणि ह्या गोष्टीच्या आधारावर श्री. गुप्ते ह्यांनी असे प्रतिपादन केले आहे की सावित्रीच्या कथेला आधार एका नैसर्गिक चमत्काराचा आहे. त्यांच्या पत्नीने काढिलेली चित्रे पाहून तो एखाद्या विवाहाचा देखावा असावा असे त्यांना सकृद्दर्शनी वाटले आणि त्यांची पत्नी जीं चिन्हे अथवा चित्रे काढीत असे तशा प्रकारानेच जे व्रत सर्व भारतभर शेकडो वर्षेपर्यंत सर्व लोक पाळीत आले आहेत असे त्यांना वाटते. त्यांनी केलेल्या तर्काच्या आड येणाऱ्या मुख्य गोष्टी म्हणजे दोन हजार वर्षाइतक्याही प्राचीन काळच्या कोणत्याही ग्रंथांत सावित्री व्रताचा उल्लेख केलेला नाही. तसेच सावित्रीव्रत सर्व भारतभर पाळण्यात येते परंतु श्री. गुप्ते ह्यांची पत्नी ज्या प्रकारचा देखावा काढीत असे त्या प्रकारचा देखावा सर्व भारतभर स्त्रिया काढीत असल्याचे प्रस्तुत ग्रंथकाराला आढळले नाही. (श्री. गुप्ते ह्यांची पत्नी बहुधा सुशिक्षित असून तिला एखाद्या मोठ्या शहरात कलाकौशल्याचे शिक्षण मिळाले असेल आणि तिने आपल्या कलात्मक कल्पना लहान शहरात आणि गावात राहणाऱ्या लक्षावधि साध्याभोळ्या स्त्रियांच्या कल्पनांना जोडून हा व्रताला सौंदर्य आणि वैचित्र्य आणण्याकडे आपल्या कौशल्याचा उपयोग केला असेल.)

# प्रकरण ५

## एकादशी

(मू. ग्रं. पा. ५।९५-१२१)

आषाढ महिन्यातील सर्वात महत्त्वाची तिथि एकादशी ही असते. आषाढ शुक्ल एकादशीला **महाएकादशी** आणि **शयनी** असेही म्हणतात.

पुराणांत आणि मध्ययुगीन कालात झालेल्या निबंधग्रंथांत एकादशीसंबंधी फार विस्तृत विवेचन आले आहे. एकादशीबद्दलचे शूलपाणीकृत एकादशी विवेक आणि रघुनंदनकृत एकादशीतत्त्व ह्यांच्यासारखे अनेक ग्रंथही आहेत.

काही [यानि कानि च पापानि ब्रह्महत्यासमानि च।
अन्नमाश्रित्य तिष्ठन्ति संप्राप्ते हरिवासरे ॥
तानि पापान्यवाप्नोति भुञ्जानो हरिवासरे।
रटन्तीह पुराणानि भूयो भूयो वरानने।
न भोक्तव्यं न भोक्तव्यं संप्राप्ते हरिवासरे ॥
नारदीय (हेमाद्रि-काल पान १५३ वरील अवतरण).] ग्रंथांत (नारदीय हेमाद्रि काल पा १५३) एकादशीच्या दिवशी अन्नभक्षण करू नये एवढेच सांगितले आहे, तर दुसऱ्या काही ग्रंथांत एकादशी व्रत करावे असे सांगितले आहे. एकादशीव्रत करावयाचे ह्याचा अर्थ केवळ अन्न भक्षण करण्याचा **निषेध** एवढाच नसून मी अन्न भक्षण करणार नाही अशी **प्रतिज्ञा** करणे ही गोष्टही त्यात येते. ज्या वचनांत व्रत करावे असे सांगितलेले असते अशा वचनांचेही दोन प्रकार असतात. काही वचनांत एकादशी व्रत पालन करणे ही **नित्य** (आवश्यक) गोष्ट असल्याचे सांगितलेले असते आणि काही वचनात एकादशी व्रत **काम्य** म्हणजे काही विशिष्ट हेतूने करावयास सांगितलेले असते. एकादशीव्रत हे **नित्य** आणि **काम्य** असे दोन्ही प्रकारचे असते. देवल, नारद, पद्मपुराण (नि. सि. ३६) इत्यादिकांची ह्या विषयासंबंधींची वचने परस्परविरोधी आहेत. त्या सर्व वचनांचा अर्थ असा असावा असे दिसते की फक्त शुद्ध एकादशीच्या दिवशी करावयाचा उपवास गहस्थाश्रमी पुरुषाला **नित्य** स्वरूपाचा असतो. परंतु त्याने **शयनी** (आषाढ- शुद्ध) एकादशी आणि **बोधिनी** (कार्तिक शुद्ध) एकादशी ह्यांच्या दरम्यान येणाऱ्या कृष्ण पक्षातील एकादशांचे दिवशी **काम्यव्रत** म्हणून उपवास करण्यास प्रत्यवाय नाही. तथापि त्याला जर पुत्र असेल तर त्याने शयनी आणि बोधिनी ह्यांच्या दरम्यानच्या कृष्ण पक्षातील एकादशांच्या दिवशी देखील उपवास करू नये. यतीने आणि विधवा स्त्रियांनी सर्व एकादशांना उपवास केला पाहिजे आणि पतियुक्त स्त्रियांनी शुद्ध एकादशीच्या दिवशीच फक्त उपोषण करावे. वैष्णव लोकांनी सर्व एकादशांचे दिवशी उपोषण केले पाहिजे.

नित्य आणि काम्य ह्यांच्याशिवाय पापनिवुत्तिकरिता **प्रायश्चित्त** ह्या दृष्टीनेही उपोषण करावयाचे असते. (खंड ४ पहा).

**एकादशी व्रतात** अंतर्भूत होणाऱ्या निरनिराळ्या गोष्टी संकलित करून पुढे दिल्या आहेत :—

**दशमीच्या दिवशी** व्रत करणारा **एकभुक्त** करतो म्हणजे दोन प्रहरी एकवार भोजन करतो आणि रात्रीचे भोजन वर्ज्य करितो. भोजनानंतर आपले दात पानांनी स्वच्छ करितो अथवा पाण्याच्या १६ गुळण्या

करून तोंड स्वच्छ करितो आणि त्या दिवशी रात्रीपासून एकादशी व्रताचे निर्बंध पालन करावयास प्रारंभ करतो.

**एकादशीच्या दिवशी** निजून उठल्यावर शरीर आणि मन स्वच्छ करून उपोषणाच **संकल्प** करतो. एकादशी **विद्धा** असेल तर संकल्प रात्री अथवा माध्याह्न काली करावा लागतो. हातात घेतलेल्या पात्रातील पाण्यावर 'ॐ नमो नारायणाय' ह्या अष्टाक्षरी मंत्राचा तीन वेळा उच्चार करतो आणि त्या पात्रातील पाणी प्राशन करतो. नंतर एक फुलांचा मंडप तयार करून त्यात विष्णूच्या प्रतिमेचे निरनिराळ्या उपचारांनी पूजन करितो. त्या दिवशी उपवास करितो, विष्णूच्या स्तुतिपर स्तोत्रे म्हणतो आणि भूमीवर साष्टांग नमस्कार घालतो. नंतर रात्री जागत बसतो.

**द्वादशीच्या दिवशी** स्नान करून हरीचे पूजन करितो आणि आपण केलेला उपवास देवाला अर्पण करतो. नंतर देवाची प्रार्थना करून **पारणा** करितो.

**काम्य** एकादशी व्रताच्या कार्यक्रमाची ही सामान्य रूपरेषा आहे.

**नित्य** (म्हणजे आवश्यक) एकादशीचे व्रत करणाऱ्याने संपूर्ण दिवस अन्न वर्ज्य करावे आणि त्याशिवाय (एकापेक्षा अधिक वेळा पाणी न पिणे, दिवसा न झोपणे ह्यांच्यासारखे) एकादशीच्या दिवशी पाळावयाचे निर्बंध पाळावे.

एकादशीच्या दिवशी उपोषण केल्याने मिळणाऱ्या फलांची अत्यंत अतिशयोक्तिपूर्ण वर्णने अनेक पुराणांनी आणि निबंध ग्रंथांनी केली आहेत. आठ वर्षांहून मोठा आणि ऐंशी वर्षांहून कमी वयाचा असणाऱ्या प्रत्येक मनुष्य मग तो कोणत्याही जातीचा अथवा कोणत्याही आश्रमातील असो तो एकादशी करण्याला अधिकारी असतो असे नारदाने (कालनिर्णय पा. २५७) सांगितले आहे. तथापि मनुष्यप्राण्याचे दुर्बलत्व जाणून ऋषींनी एकादशीला संपूर्ण उपोषण करण्याचा नियम शिथिल केला आणि **एकभुक्त नक्त**, **अयाचित, दान** प्रभृति पर्याय सांगितले आहेत. ह्याबाबतीत मनूने [प्रभु प्रथमकल्पस्य योऽनुकल्पेन वर्तते।
न साम्परायिकं तस्य दुर्मतेर्विद्यते फलम् ॥
मन. (११·३०).] (११-३०) सांगितलेला पुढील नियम लक्षात ठेवणे अवश्य आहे. त्याने म्हटले आहे की जर एखादा मनुष्य एखाद्या विधीचे मुख्य नियम पालन करण्यास समर्थ असून देखील (शास्त्रात सांगितलेल्या) पर्यायांचा अंगीकार करील तर त्या मूर्खाला त्या विधीचे पारलौकिक फल मिळणार नाही."

**एकभुक्त** म्हणजे दोन प्रहरानंतर दिवसातून फक्त एक वेळ भोजन करणे. माध्याह्न काळ कोणता ह्या विषयी मतवैचित्र्य आहे. निर्णयामृत (पा. १४।१५) प्रभृति ग्रंथांनी एकभुक्त ह्याचा अर्थ सूर्योदयापासून १३ व्या आणि १८ व्या घटिकांच्या दरम्यान केव्हातरी भोजन करणे असा केला आहे. एकभुक्त हे (एकादशीशी संबंध नसलेले) एक स्वतंत्रपणे करावयाचेही व्रत असते आणि निरनिराळ्या महिन्यांत आणि निरनिराळ्या तिथींना निरनिराळ्या ठिकाणी एकभुक्त व्रत केल्याने मिळणाऱ्या फलांची वर्णने महाभारतात (अनुशा. अ. १०६।१०७) केली आहेत.

**नक्त** म्हणजे कालाचा एक विभाग हा मुख्य अर्थ असून नक्तकालीं भोजन करणे हा त्या शब्दाचा गौण अर्थ असतो. **नक्तकाळ** कोणता ह्याबद्दल मतभेद आहेत. पुरुषार्थचिंतामणी ह्या ग्रंथात म्हटले आहे की सूर्यास्तानंतर ३ घटिका हा प्रदोष काळ. भविष्य पुराणात (कृ. क. व्रत पा३) सांगितले आहे की नक्षत्रे दिसू

लागतात तो नक्ताचा मुख्य काळ असून इतर काळ गौण असतात. **नक्त** हे [उपवासात्परं भैक्ष्यं भैश्यात्परमयाचितम्।
अयाचितात्परं नक्तं तस्मान्नक्तेन वर्तयेत् ॥
हविष्यभोजनं स्नानं सत्यमाहारवर्जनम्।
अग्निकार्यमधःशय्यां नक्तभोजी सदाचरेत् ॥
लिङ्गपुराण (पूर्वार्ध ८३·१०·१२।१३).] (उपवासाशी संबंध नसलेलेही) एक विशिष्ट व्रत असते (लिंग-पूर्वार्ध (८३·१०·१२।१३)

**अयाचित** ह्याचा अर्थ "याचना न करिता अथवा कोणाला विनंति न करिता मिळालेल्या अन्नावर उपजीविका करणे." अयाचित व्रताच्या बाबतीत भोजनाचा कोणताही विशिष्ट काळ सांगता येत नाही, कारण दुसरा इसम कोणत्याही वेळी अन्न घेऊन येण्याचा संभव असतो. तथापि, असे अन्न आणण्यात आल्यावर व्रत करणाऱ्याने ते फक्त एकवार भक्षण करावयाचे असते. अयाचित व्रतामध्ये दुसऱ्या कोणाजवळ अन्नाची याचना करावयाची नसते एवढेच नसून आपल्या पत्नीला अथवा सेवकाला आपल्या स्वतःच्या मालकीचे अन्न वाढण्याची विनंती करण्याला देखील बंदी असते. जर एखाद्याच्या पत्नीने अथवा सेवकाने शिजविलेले अन्न घेऊन येण्यास सांगितलेले नसताना जर आणले तरच त्या मनुष्याला भोजन करिता येते, अन्यथा त्याला भोजन करिता येत नाही.

प्राचीन काळी एकभुक्त, नक्त, अयाचित ह्या संज्ञा कृच्छ्रासारख्या प्रायश्चित्तांच्या बाबतीतच उपयोगात आणल्या जात असत आणि जेव्हा पुराणांच्या रचना काळात उपोषणासंबंधीची वर्णने सर्वत्र प्रचारात आली तेव्हा त्या वर्णनात त्या संज्ञांचा उपयोग करण्यात आला.

एकादशीला करावयाचा उपवास दोन प्रकारचा असतो. एका प्रकारात शिजलेले अन्न भक्षण करण्याचा निषेध असतो आणि दुसऱ्या प्रकारात उपवास हा एखाद्या व्रताच्या स्वरूपाचा असतो. साधा उपवास आणि उपवास व्रत ह्यांच्यामध्ये मुख्य भेद म्हणजे उपवास व्रतामध्ये **संकल्प** असतो आणि साध्या उपवासामध्ये संकल्प नसतो आणि एकादशीला शिजलेले अन्न भक्षण करू नये असे शास्त्रात सांगितलेले असते म्हणून उपवास करावयाचा असतो. तथापि, ब्रह्मचर्यासारखे निर्बंध आणि नियम पालन करणे ही गोष्ट दोन्ही प्रकारच्या उपवासात सामान्य असते. व्रत स्वरूपाच्या उपवासात देखील नित्य आणि काम्य असे दोन प्रकार असतात.

एकादशीच्या दिवशी केलेल्या उपवासापासून प्राप्त होणाऱ्या फलांचीं काही काही पुराणात केलेली अतिशयोक्तीची आणि विलक्षण वर्णने बाजूला ठेवली तर एकादशीच्या उपोषण करण्याच्या मुळाशी असलेली कल्पना धार्मिक आणि आध्यात्मिक स्वरूपाची आहे. असे उपोषण हे एक प्रकारचे मनाचे नियंत्रण असते आणि आनंदाने केलेल्या उपोषणाच्या योगाने मनुष्याच्या मनातील पाशवी विकार धुतले जाऊन तो ईश्वरी कृपाप्रसादाला पात्र होतो. बृह. उप. (४·४·२२) मध्ये असे म्हटले आहे की वेदाध्ययन, यज्ञ, दान आणि उपवासासारखे तप ह्यांच्या साधनाने ब्राह्मण परमात्म्याला जाणू इच्छितात. आनंदाने केलेल्या उपोषणापासून अशा प्रकारचा परिणाम होतो ही कल्पना ख्रिस्ती धर्मासारख्या अनेक धर्मात सामान्य आहे. (मॅथ्यू ६·१६-१८)

एकादशीच्या सांप्रदायाची वाढ होऊन बारा चांद्रमहिन्यांतील २४ एकादशांना आणि अधिक महिन्यांत येणाऱ्या दोन एकादशांना पृथक् पृथक् नावे कल्पिण्यात आली. ही नावे केव्हा देण्यात आली हे निश्चित सांगणे शक्य नसलेतरी त्यांच्यापैकी काही नावे सुमारे २००० वर्षांइतकी जुनी असली पाहिजेत.

अशी एक कल्पना होती की विष्णु आषाढ शुद्ध एकादशीच्या दिवशी निद्रा करितो आणि कार्तिक शुद्ध एकादशीच्या दिवशी जागा होतो. त्याच कल्पनेचा विस्तार होऊन तो भाद्रपद शुद्ध एकादशीच्या दिवशी एका कुशीवरून दुसऱ्या कुशीकडे वळतो आणि ह्या तीन एकादशांना वरील कल्पनेला अनुरूप **शयनी**, **बोधिनी** अथवा **प्रबोधिनी** आणि **परिवर्तिनी** अशा संज्ञा दिल्या गेल्या. कालिदासाच्या मेघदूत काव्यात विष्णु शेषाच्या शय्येवर निजतो आणि त्या शय्येवरून उठतो ह्या कल्पनेचा उल्लेख केला आहे (शापान्तो मे भुजगशयनादुत्थिते शार्ङ्गपाणौ). कालिदासाचा काळ इ. स. ३५० ते ४५० ह्यांच्या दरम्यान असल्याचे बहुतेक विद्वान मानतात. तेव्हा विष्णूच्या शयनासंबंधीची आख्यायिका दोन हजार वर्षांहून अधिक प्राचीन नसली तरी तितकी प्राचीन निश्चित आहे.

विष्णूच्या निद्रेच्या आणि जागे होण्याच्या कल्पनेचा पुढे विस्तार होऊन सर्व मोठमोठे देव आणि देवी निरनिराळ्या तिथींना निद्रा करितात आणि निरनिराळ्या तिथींना जागे होतात असें मानण्यात येऊ लागले. विष्णूच्या निद्रेच्या आणि जागे होण्याच्या तिथींबद्दलही मतवैचित्र्य उत्पन्न झाले आणि त्याच्या निद्रेच्या आणि जागे होण्याच्या तिथि आषाढ आणि कार्तिक एकादशीच्या ऐवजी द्वादशी अथवा पौर्णिमा असल्याचे मानण्यात येऊ लागले.

ही आख्यायिका कशी उत्पन्न झाली हे सांगणे कठिण आहे. आषाढ ते कार्तिक ह्या चार महिन्याच्या अवधीत भारतातील बऱ्याच भागात पाऊस पडत असतो आणि त्यामुळे प्राचीन काळी त्या अवधीत एका ठिकाणाहून दुसरीकडे प्रवास करणे जवळजवळ बंद होत असावे आणि त्यामुळे विष्णूच सर्व प्रकारच्या हालचाली बंद करितो अशी कल्पना उत्पन्न झाली असावी. कदाचित वैदिक आर्यांचे पूर्वज पूर्वी उत्तरेकडील प्रदेशांत राहत असताना चार महिने मुळीच सूर्यदर्शन होत नसे त्या परिस्थितीवरूनही ती आख्यायिका उत्पन्न झाली असण्याचा संभव आहे.

दशमीने युक्त अथवा द्वादशीने युक्त एकादशी तिथि आल्यास कोणत्या दिवशी उपोषण करावे आणि कोणत्या दिवशी पारणा करावी ह्यासंबंधीचे अनेक भानगडीचे नियम आहेत. त्यांच्यापैकी काही नियम फक्त वैष्णवांकरिताच असतात, काही स्मार्तांकरिता असतात आणि काही दोघांकरिता असतात अशी उपपत्ती लावून कालनिर्णय (पा. २५१।२५६) आणि निर्णयसिंधु (पा. ३७।४४) ह्या ग्रंथांनी त्या नियमांमधील मतभेद दूर करून त्यांत सुसंगती साधण्याचा प्रयत्न केला आहे. **वैष्णव** ह्या शब्दाच्या व्याख्या निरनिराळ्या ग्रंथांत दिल्या आहेत. पुराणांत दिलेल्या व्याख्यांपैकी काही अतिशय. मोघम स्वरूपाच्या असतात आणि त्या ज्यांना वैष्णव म्हणतात त्यांच्याशिवाय इतरांनाही लागू पडतात. पद्म, भागवत प्रभृति काही पुराणांत अशी व्याख्या दिली आहे की ज्याला पंचरात्र, वैखानस इत्यादि पंथांच्या वैष्णव आगमांना अनुसरून **दीक्षा** मिळालेली असते तो खरा वैष्णव होय. पुराणांनी अशा व्याख्या जरी सांगितलेल्या असल्या तरी भारतांतील सर्व प्रांतांत आणि सर्व शिष्ठांनी असे मान्य केले आहे की ज्यानां परंपरेने वैष्णव म्हणण्यात येते ते वैष्णव होत. (नि. सिं. पा. ४०).

एखाद्या व्रताची समाप्ती '**उद्यापन**' नावाचा विधि करून अथवा '**पारण**' (अथवा पारणा) करून होते. पारणा हा शब्द पार म्हणजे एखादी क्रिया पुरी करणे अथवा विधी पुरा करणे ह्या शब्दापासून झाला आहे. कूर्म [तत्र कूर्मपुराणे–
एकादश्यामुपोष्यैवं द्वादश्यां पारणं स्मृतम् ।
त्रयोदश्यां न तत् कुर्याद् द्वादशद्वादशीक्षयात् ॥

हे. (काल) पान २८०.]. पुराणात (हे. काल पा. २८०) सांगितले आहे की ‘एकादशीला उपवास करावा आणि द्वादशीला पारणा करावी परंतु पारणा त्रयोदशीला करू नये कारण त्यामुळे १२ द्वादशांचे पुण्य नष्ट होते.’ असे वचन असले तरीसुद्धा काही परिस्थितीत त्रयोदशीला पारणा करण्याला अनुमति असते. उदाहरणार्थ, जर पूर्व दिवशी एकादशी दशमीयुक्त असेल आणि दुसऱ्या दिवशी द्वादशीयुक्त असेल तर उपवास द्वादशीला करावयाचा असतो. परंतु उपवासाच्या दुसऱ्या दिवशी द्वादशी मुळीच नसेल तर पारणा त्रयोदशीला करण्यास प्रत्यवाय नसतो. एक व्रत समाप्त झाल्या-शिवाय दुसऱ्या व्रताला प्रारंभ करू नये (विष्णुधर्मोत्तर का. वि. पा. ४६३) असा नियम आहे. पारणेमध्ये भोजनाचा समावेश होतो परंतु जर एखाद्याला दोन निरनिराळ्या व्रतांकरिता दोन दिवस लागोपाठ उपवास करावयाचा असला तर अशा व्रत करणाऱ्याने एक उपवास झाल्यानंतर पाण्याचे आचमन घ्यावे, असे केल्याने पहिल्या व्रताची पारणा होते, आणि दुसऱ्या व्रताला बाधा येत नाही. कारण वेदामध्ये [यदपोऽश्नाति तन्नेवाशितं नेवानाशितं न क्षोधुको भवति। तै. सं. (१·६·७·४)] (तै. सं. १-६-७-४) असे सांगितले आहे की जेव्हा एखादा मनुष्य पाणी पितो तेव्हा ते भोजन केल्यासारखे होत नाही आणि भोजन न केल्यासारखेही होत नाही.

वैष्णवांनी द्वादशीयुक्त एकादशीलाच उपवास केला पाहिजे अशा आग्रहाचा पुष्कळवेळी असा परिणाम होतो की उपवासाच्या दुसऱ्या दिवशी द्वादशी संपण्यापूर्वी पारणा करिता यावी ह्याकरिता त्यांना अति लौकर उठावे लागते, स्नानादि प्रातःकाळची आणि माध्याह्न काळची आह्निक कृत्ये सूर्योदयाच्या पूर्वीच्या अल्प अवधीमध्ये उरकावी लागतात. सांप्रतकाळी काही परंपराभक्त वैष्णव असे करतात. (का. नि. पा. २४२).

# प्रकरण ६

## चातुर्मास्य व्रत

(मू. ग्रं. पा. ५।१२२-१२३)

**चातुर्मास्य** व्रताचा प्रारंभ आषाढ शुद्ध एकादशी, द्वादशी अथवा पूर्णिमा अथवा कर्क संक्रांत ह्यांच्यापैकी कोणत्याही दिवशी [चातुर्मासिकव्रतग्रहणे कालचतुष्टयम्। आषाढी पौर्णमासी शुक्ला एकादशी द्वादशी कर्कटसंक्रान्तिश्च। कालविवेक. पा. ३३२.]. करिता येतो. (कालविवेक पा. ३३२.). परंतु व्रताला आरंभ कोणत्याही दिवशी केला असला तरी तें व्रत कार्तिक शुद्ध द्वादशीला पुरे करावयाचे असते. व्रताला प्रारंभ करते वेळी गुरु अथवा शुक्र ह्यांचा अस्त असला अथवा तशा प्रकारची इतर परिस्थिती असली तरी व्रताला प्रारंभ करण्यास प्रत्यवाय नसतो.

व्रत करणाऱ्याने प्रारंभाच्या दिवशी उपवास करावा, विष्णूच्या प्रतिमेची पूजा करावी आणि स्वीकारलेले व्रत पुरे करण्याबद्दल देवाची प्रार्थना करावी असा विधि गरुडपुराणात (१-१२१-२।३) सांगितला आहे.

चातुर्मास्व व्रत करणाऱ्याला चार महिनेपर्यंत काही विशिष्ट खाद्य पदार्थ वर्ज्य करावयाचे असतात आणि दुसरे काही निर्बंध पाळावयाचे असतात. त्याने श्रावणमहिन्यात शाकभाज्या, भाद्रपदामध्ये दही, आश्विनामध्ये दूध आणि कार्तिकामध्ये डाळी वर्ज्य कराव्या. कोणाकोणाच्या मताप्रमाणे त्याने सर्व प्रकारच्या शाकभाज्या चारही महिने वर्ज्य कराव्या. त्याचप्रमाणे पलंगावर न निजणे, मांस, मध भक्षण न करणे ह्यांच्यासारखे काही निर्बंध पाळावयाचे असतात. हे निर्बंध एकादशीच्या दिवशी पालन करावयाच्या निर्बंधसारखेच असतात. निरनिराळे पदार्थ वर्ज्य केल्यास प्राप्त होणाऱ्या फलांची वर्णने पुराणांत आणि निर्बंधग्रंथांत केली आहेत. उदाहरणार्थ, गूळ वर्ज्य केल्यास मधुर आवाज प्राप्त होतो, तेल वर्ज्य केल्यास सुंदर अवयव प्राप्त होतात, दहीदूध वर्ज्य केल्यास गोलोक मिळतो (व्रतप्रकाश पृ. १०५ अ)

व्रत समाप्त झाले म्हणजे व्रत करणारा ब्राह्मणांना आमंत्रण करून त्यांना आपण केलेले व्रत निवेदन करतो, त्यांना भोजन घालतो, दक्षिणा देतो आणि व्रतामध्ये काही दोष असल्यास देवाने कृपा करून ते व्रत पूर्ण करावे अशी देवाची प्रार्थना करतो.

सांप्रत काळीदेखील हे व्रत विशेषतः स्त्रियांकडून पालन करण्यात येते.

वेदांच्या काळी **चातुर्मास्य** ह्या नांवाचे काही विशिष्ट यंज्ञ निरनिराळ्या ऋतूत करण्यात येत असत. फाल्गुन (अथवा चैत्र) पौर्णिमेला **वैश्वदेव**, आषाढ पौर्णिमेला **वरुणप्रघास**, कार्तिक पौर्णिमेला **साकमेध** असे यज्ञ करावयाचे असत परंतु ते यज्ञ श्रौतयज्ञ असत आणि पुराणातल्याप्रमाणे एखाद्या विशिष्ट तिथीला, वारावर, नक्षत्रावर करावयाचे विधि नसत. त्या यज्ञांची माहिती दुसऱ्या खंडामध्ये दिली आहे.

याज्ञवल्क्यस्मृतीमध्ये (३-२५१, २५२ प्रभृति) अनेक ठिकाणी व्रत हा शब्द आला आहे. परंतु त्याचा अर्थ पुराणात सांगितलेल्या एखाद्या विशिष्ट प्रसंगी करावयाचा विधि असा बहुतेक कोठेही नाही. ह्यावरून त्या स्मृतीच्या काळी पुराणोक्त व्रतांना फारसे महत्त्व प्राप्त झाले नव्हते असे दिसते.

# प्रकरण ७

## नगपंचमी, मनसा पूजा, रक्षाबंधन, कृष्णजन्माष्टमी ह्यांची व्रतें

(मू. ग्रं. पा. ५।१२४-१४३)

श्रावणमहिन्यात अनेक महत्त्वाची व्रतें असतात. श्रावण शुद्ध पंचमीच्या दिवशी करावयाचे **नागपंचमी** हे त्यांच्यापैकी एक व्रत आहे.

कोणी ग्रंथकार अक्षय्यतृतीयेच्या ऐवजी नागपंचमी हा वर्षातील साडेतीन मुहूर्तांपैकी अर्धामुहुर्त असल्याचे प्रतिपादन करितात. नागपंचमीच्या व्रतासंबंधी विवेचन भविष्यपुराण (ब्रह्मपर्व अध्या. ३२-१ ते ३९) ह्यात केले आहे. त्यात म्हटले आहे की श्रावण शुद्ध पंचमीच्या दिवशी वासुकी, तक्षक, कालिया, मणिभद्र, ऐरावत प्रभृति नागांना दुधाने स्नान घातल्यास ते विषबाधेपासून अभय देतात. ह्या नागांच्या सुवर्णाच्या, चांदीच्या अथवा मातीच्या प्रतिभा कराव्या, त्यांची पूजा करावी, ब्राह्मणांना भोजन घालावे. भविष्योत्तर पुराण (अ. ३६) ह्यांत दुसरा एक प्रकार वर्णन केला आहे. त्यांत असे सांगितले आहे की श्रावण शुद्ध पंचमीच्या दिवशी लोकांनी आपल्या घराच्या दाराच्या दोन्ही बाजूला शेणाने सर्पाच्या आकृत्या काढाव्या, आणि त्यांची दही, दूर्वा इत्यादिकांनी इजा करावी, अन्नाची वायने अर्पण करावी. असे केल्याने सर्पभय उत्पन्न होत नाही. सौराष्ट्रात श्रावण कृष्णपक्षात नागपंचमी पाळतात.

**मनसा पूजा**. बंगालमध्ये आणि (महाराष्ट्राव्यतिरिक्त) दक्षिण भारतांमध्ये श्रावण कृष्ण पंचमीला मनसादेवीची पूजा आपल्या अंगणात स्नुही वेलीच्या खांदीवर करण्यात येते. वामन निजल्यानंतर सूर्य मिथुन अथवा कर्क राशीत असताना जी कृष्णपक्षातील पंचमी येईल त्या दिवशी मनसाचा उदय होतो असे राजमार्तंड ह्या ग्रंथात सांगितले आहे. हिची पूजा सर्पदंशापासून मुक्तता मिळण्याकरिता करावयाची असते. ह्या विधीत अनंत प्रभृति नागांची पूजा करण्यात येते, निंबाची पाने घरात ठेवण्यात येतात, पूजा करणारा ती पाने भक्षण करितो आणि ब्राह्मणांनाही खावयास देतो. ब्रह्मवैवर्त पुराण (खंड २ अ. ४५-४६) यांत मनसा देवीची माहिती दिली आहे.

महाराष्ट्रात श्रावण शुद्ध पंचमीला लाकडी पाटावर गंधाने सर्पांची चित्रे काढतात अथवा पिवळा रंग दिलेली मातीची चित्रें विकत घेऊन त्यांची पूजा करितात, त्यांना दूध अर्पण करितात, गारुडी लोक सर्व प्रकारचे सर्प घेऊन लोकांच्या घरोघरी हिंडतात, लोक त्या सर्पांना दूध आणि गारुड्याला पैसा देतात.

व्रतकालविवेक ह्या ग्रंथामध्ये **ज्येष्ठ शुद्ध दशमीला** करावयाच्या मनसाव्रताचा उल्लेख केला आहे.

भारतात सर्पपूजेचा प्रकार केव्हा सुरू झाला हे गूढ आहे. ऋग्वेदामध्ये सर्पपूजेचा उल्लेख नाही. इंद्राने अहीला मारल्याचे उल्लेख ऋग्वेदामध्ये (२·३०·१; ३·४७·४) अनेक ठिकाणी केले आहेत. तै. संहिता (४·२·८·३)आणि वाज-संहिता (१३-६।८) यांत सर्पांना वंदन केले आहे. अथर्ववेदामध्ये (८·१४·१३।१५) तक्षक, धुतराष्ट्रप्रभृति काही सर्पांची नावे दिली आहेत. काठक सं. (५·६) आणि ऐत. ब्रा. (१३·७) ह्यात सर्पांचा देव, गंधर्व, प्रभृति पंचजनांमध्ये समावेश केला आहे. मागाहूनच्या वेदकालात सर्प ही गंधर्वांच्या सारखी एक जमात बनली होती असे ह्यावरून दिसते.

**सर्पबलि**. आश्वला. गृ. (२·१·१।१५) पारस्कर गृ. (२·१४) प्रभृती ग्रंथांमध्ये श्रावणी पूर्णिमेला करावयाच्या सर्पबलीचा विधि दिला आहे. ह्या विधीचे वर्णन मागे खंड २ मध्ये केले आहे. महाभारतात नागांचा उल्लेख अनेक वेळा केला आहे. (आदि. अ. ३५, १२३; उद्योग. अ. १०३; आश्वमेधिकपर्व अ. ७९।८१; वनपर्व अ. २०३; २७२ इ.) अर्जुनाने उलुपी नावाच्या नागकन्येशी विवाह केल्याचे वर्णन केले आहे. हे नागलोक एक जमात असावी असे वाटते. पुढे नागांचा विष्णु आणि शिव ह्यांच्याशी संबंध जोडण्यात आला. विष्णु शेषावर निद्रा करितो आणि शंकरांच्या अंगावर नागाची भूषणें असतात. भगवद्गीतेत (अ. १०) विभूति योग सांगताना सर्प आणि नाग ह्यांचे पृथक् उल्लेख केले आहेत. सर्प म्हणजे सरपटणारे सर्व प्राणी आणि नाग म्हणजे फणायुक्त सर्प असा ह्या दोहोंत बहुधा भेद असावा. सर्पदंशापासून पावसाळ्याच्या आरंभी होत असलेल्या मोठ्या मनुष्यहानीमुळे सर्पपूजेची प्रथा प्रसृत होत गेली असावी. गुह्यसूत्रात श्रावणी पूर्णिमेला करावयास सांगितलेली सर्पपूजा श्रावण शु. पंचमीला कदाचित पावसाळ्याच्या आरंभकालात पडलेल्या फरकामुळे करण्यात येऊ लागली असावी. द्रविड देशात पिंपळासारख्या पवित्र वृक्षांखाली सर्पाच्या दगडी प्रतिमा ठेवलेल्या आढळतात. सातारा जिल्ह्यात बत्तिसशिराळे, हैद्राबाद प्रांतातील भौम परांडे ह्यांच्यासारख्या काही ठिकाणी नागांची देवालये अस्तित्वात आहेत.

**रक्षाबंधन**. श्रावणपूर्णिमेला अपराह्णकाळी रक्षाबंधन नावाचा एक विधि करावयाचा असतो. अक्षता, मोहरीचे दाणे, निरनिराळ्या रंगाचे मणि सोन्याच्या तारेत ओवून एक **रक्षा** (अथवा राखी) अथवा कंकण तयार करून ती हातात बांधावयाची असते. भविष्योत्तर पुराणात (हेमाद्रि) अशी कथा आहे की इंद्राणीने इंद्राच्या उजव्या हातात राखी बांधली आणि त्यामुळे तो असुरांचा पराभव करण्यास समर्थ झाला. हा प्रधात सांप्रतकाळी देखील प्रचारात आहे. गुजरात आणि इतर काही ठिकाणी स्त्रिया आपल्या बंधूंच्या हातात राख्या बांधतात आणि परस्परांना भेटी देतात आणि घेतात.

**नारळी पूर्णिमा**. पश्चिम भारतातील समुद्रकिनाऱ्यावरील गावात (विशेषतः कोकणात आणि मलबार प्रांतात) श्रावणीपूर्णिमेला व्यापारी लोक समुद्राला फुले आणि एक नारळ अर्पण करितात. हा प्रघात हिंदूंप्रमाणे मुसलमान आणि पारशी लोकांतही प्रचलित आहे. श्रावणी पौर्णिमेनंतर समुद्र जरासा शांत होतो आणि पावसाळी वाऱ्याचा जोर कमी होतो. म्हणून खवळलेल्या समुद्राचा अधिपती वरुण ह्याला एक नारळ अर्पण करण्यात येतो.

**कृष्णजन्माष्टमी**. पौर्णिमान्त मासामध्ये प्रथम कृष्ण पक्ष येतो. त्यामुळे अमावास्येला संपणाऱ्या महिन्याप्रमाणे श्रावणकृष्ण पक्ष हा पौर्णिमान्त मासाप्रमाणे भाद्रपद कृष्णपक्ष असतो. ह्या कारणाने काही ग्रंथांत कृष्णजन्माष्टमी भाद्रपद कृष्णपक्षात साजरी करावयास सांगितलेले असते. कृष्णजन्माष्टमीचे माहात्म्य पद्म (३·१३), मस्त्य (अ. ५६), अग्नि (अ. १८३) ह्या पुराणांत दिले आहे.

कृष्णासंबंधी आणि कृष्णपूजेच्या प्राचीनत्वाविषयी थोडेसे विवेचन प्रथम करू. कृष्ण हे नाव प्राचीन आहे. वेदद्रष्ट्या ऋषीमध्ये कृष्ण नावाचा एक ऋषि असून त्याची काही सूक्ते ऋग्वेदामध्ये आहेत. छांदोग्य उप. (३·१७·६) मध्ये देवकीपुत्र कृष्णाचा उल्लेख केला आहे. जैनलोक कृष्णाला २२ वा तीर्थकर नेमि ह्याचा समकालीन मानतात आणि जैनांच्या प्राचीन इतिहासात कृष्णाशी संबंध असलेल्या अनेक कथा आहेत. महाभारतात कृष्णाचे चरित्र यादववंशातील एक राजपुत्र, पांडवाचा हितकर्ता, थोर योद्धा, मुत्सद्दी, तत्ववेत्ता ह्या नात्याने दिले आहे. त्याचप्रमाणे त्याला **विश्वाचा** सर्वश्रेष्ठ नाथ आणि प्रत्यक्ष विष्णु असेही मानिले आहे. हरिवंश, विष्णु, वायु, भागवत, ब्रह्मवैवर्त ह्या पुराणांत कृष्णाचे बाळपणचे गोकुळात

घालविलेले अद्‌भुतरम्य् चरित्र आले आहे. परंतु ते चरित्र महाभारतांत आढळत नाही.

पाणिनीची सूत्रे (४·३-९८), पतंजलीचे महाभाष्य, त्यावरील वार्तिक ह्या व्याकरणग्रंथांमध्ये कृष्णाशी संबंध असणाऱ्या कंस, सत्यभामा, अक्रूर, संकर्षण ह्यांच्यासारख्या अनेक लोकांचे आणि कंसवधासारख्या घटनांचे उल्लेख आले आहेत. वासुदेवाने कंसाचा वध केला ह्या आशयाचा एक श्लोक पतंजलीने उद्धृत केला आहे. त्यावरून कृष्णचरित्रातील काही घटनांचा उल्लेख असलेला एक अथवा अनेक काव्यग्रंथ ख्रि. पू. काही शतके अस्तित्वात आले असावेत असा निष्कर्ष निघतो. ख्रि. पू. दुसऱ्या शतकातील काही शिलालेखांत (एपि. इ. खं. १६ पा. २६।२७) संकर्षण आणि वासुदेव ह्यांचे उल्लेख आले आहेत. ह्या पुराव्यावरून असे दिसून येते की वासुदेवाच्या पूजेचा सांप्रदाय उत्तर आणि मध्यभारतात निदान ख्रि. पू. ५०० च्या काळापासून चालत आला आहे.

मध्ययुगीन काळातील उत्तरार्धानंतरचे वैष्णव लोक भागवत पुराणाला वेदासारखे महत्त्व देतात. परंतु मध्ययुगीन काळात झालेल्या निबंधग्रंथांमध्ये कृष्णजन्माष्टमीसंबंधी उद्धृत केलेल्या वचनात भागवत पुराणातील वचने क्वचितच आढळतात.

कृष्णजन्माची वेळ भागवत पुराणात मोघम दिली आहे. भविष्योत्तर पुराणात (४४·१।६९) स्वतः कृष्णच युधिष्ठिराला जन्माष्टमी व्रताच्या घटना सांगत असल्याचे दाखविले आहे आणि त्यात **जयन्ती** आणि **जन्माष्टमी** ह्यांच्यामध्ये भेद केला आहे. भविष्योत्तरपुराणाप्रमाणे कृष्णाचा जन्म भाद्रपद (श्रावण) कृष्ण अष्टमीला मध्यरात्री झाला आणि त्यावेळी रोहिणी नक्षत्रात चंद्र होता. ह्याकरिता जेव्हा भाद्रपद (श्रावण) कृष्ण अष्टमीला रोहिणी नक्षत्र नसेल त्यावेळी ती केवळ **जन्माष्टमी** असते आणि जेव्हा अष्टमीला रोहिणी नक्षत्राची जोड मिळते तेव्हा ती **जयन्ती** होते. जन्माष्टमी आणि जयन्ती ही दोन वेगवेगळी व्रते आहेत असे काही ग्रंथकारांनी (उदाहरणार्थ निर्णयसिंधु पा. १२६) मानले आहे आणि जयन्ती निर्णया- (पा. २६) सारख्या काही ग्रंथांनी असे प्रतिपादन केले आहे की लोक सामान्यतः जन्माष्टमी व्रतच करितात आणि जयन्ती व्रत करीत नाहीत.

कृष्णजन्मासंबंधी दुसऱ्याही काही वेळा सांगितल्या आहेत. वराहपुराणांत (४६·१२ व १४) कृष्णजन्म आषाढ शुद्ध द्वादशीला झाल्याचे सांगितले आहे. हरिवंश पुराणात (२·४·१६।१७) कृष्णजन्माच्या वेळी अभिजित् नक्षत्र असून विजय मुहूर्त होता असे म्हटले आहे. कदाचित ते मत एखाद्या प्राचीन परंपरेला अनुसरून असण्याचाही बराच संभव आहे.

जन्माष्टमी व्रत कोणत्या तिथीला आणि कोणत्या वेळी करावे ह्याविषयीही मतवैचित्र्य आहे. तिथितत्त्व (पा. ५४) ह्याग्रंथांत असे सांगितले आहे की जर जयन्ती (म्हणजे रोहिणीयुक्त अष्टमी) एकच दिवस असेल तर उपवास त्याच दिवशी करावा; जर अशी तिथि दोन दिवस व्यापून असेल तर मध्यरात्रीला अस्तित्वात असणाऱ्या अष्टमीच्या दिवशी उपवास करावा. ह्याबावतीतही आणखी सूक्ष्म भेद त्या ग्रंथाने सांगितले आहेत. जयन्तीचा उपवास बुधवारी अथवा सोमवारी आला तर त्याचे फार मोठे माहात्म्य असते (कालनिर्णय पा.२२४।२२५).

जन्माष्टमीच्या व्रतातील **प्रमुख गोष्टी** उपवास, कृष्णाची पूजा, जागर आणि पारणा ह्या असतात. ह्यापैकी उपवास मुख्य अथवा पूजा मुख्य ह्याविषयीही मतभेद आहेत. समयमयूखात पूजा मुख्य सांगितली

असून तिथितत्त्वात (पा. ४४) उपवास प्रमुख मानला आहे. पारणा केव्हा करावी ह्याविषयीही तपशीलात मतभेद आहेत.

**उद्यापन** आणि **पारणा** ह्यांत असा भेद आहे की एकादशीसारखी **जन्मभर** पालन करावयाची जीं व्रते असतात त्यांत जेव्हा उपवास करण्यात येईल तेव्हा उपवासानंतर **फक्त पारणा** करावी आणि जेव्हा एखादे व्रत एकच वेळ करावयाचे असते आणि त्यानंतर संपूर्ण करण्यात येते. तेव्हा त्या व्रताच्या संपूर्णाच्या वेळी करावयाच्या विधीला **उद्यापन** म्हणतात.

वरील कृत्यांखेरीज विशेषतः महाराष्ट्रामधील मुलांमध्ये आणि सामान्य लोकांत कृष्णजन्माच्या उत्सवाच्या दुसऱ्या दिवशी 'गोपाल काला' करण्याचा प्रघात आहे. हा प्रघात भारतातील सौराष्ट्रासारख्या दुसऱ्या भागात पाळण्यात येत नाही. दही आणि ताक यांनी भरलेली मातीची भांडी उंचावर टांगण्यात येतात आणि त्यांच्या खाली खेळ आणि नाचगाणी चालतात. नंतर त्या भांड्यांना भोके पाडून त्या भोकांतून खाली गळणाऱ्या दह्यात आणि ताकात लोक स्वतःला भिजवून घेतात. बालवयांत कृष्ण गवळी लोकात राहत असल्याच्या ज्या आख्यायिका अस्तित्वात आहेत त्यांच्यामुळेच बहुधा हा प्रघात उत्पन्न झाला असावा. प्रत्यक्ष भागवत [गोपाः परस्परं हृष्टा दधिक्षीरघृताम्बुभिः।
आसिञ्चन्तो विलिम्पन्तो नवनीतैश्च चिक्षिपुः॥
भागवत (१०·५·१४).] पुराणांत (१०·५·१४) असे वर्णन केले आहे की कृष्णजन्माच्या वेळी गोपाळांनी एकमेकांच्या अंगावर दही, दूध, तूप उडविले आणि एकमेकांचीं अंगे त्या पदार्थांनी माखून काढली.

कृत्यकल्पतरू आणि कृत्यरत्नाकर ह्या दोन ग्रंथांमध्ये कृष्णजन्माष्टमीचा एक संक्षिप्त कार्यक्रम दिला आहे. त्यांत म्हटले आहे की कलियुगातील २८ व्या कल्पामध्ये भाद्रपद कृष्ण अष्टमीला देवकीचा पुत्र कृष्ण पृथ्वीचा भार हरण करण्याकरिता आणि क्षत्रियांचे निर्दालन करण्याकरिता जन्माला आला. ह्या करिता त्याची (म्हणजे त्याच्या प्रतिमेची) तसेच देवकी आणि यशोदा ह्यांची पूजा त्या दिवशी करावी, निरनिराळीं पक्वान्नें त्यांना अर्पण करावीत, रात्री भक्ताने गाणी गात आणि नाचत जागरण करावे. नवमीच्या दिवशी अरुणोदयाच्या वेळी स्त्रियांनी रक्तवस्त्र परिधान करून आणि फुलांच्या मालांनी अलंकृत होऊन कृष्ण, यशोदा, देवकी ह्यांच्या प्रतिमा मस्तकावर घेऊन एखाद्या पवित्र नदीच्या तीरावर अथवा एखाद्या सुंदर तलावावर न्याव्या, त्या नदीमध्ये अथवा तलावात त्यांनी स्वतः स्नाने करावीत आणि त्या प्रतिमांना स्नान घालावे आणि नंतर घरी परत येऊन गुळ, मध, तूप घालून केलेले जवाचे अन्न भक्षण करावे.

ह्या संबंधांत प्रख्यात जर्मन विद्वान प्राध्यापक ए. वेबर ह्यानें 'कृष्णजन्माष्टमीच्या उत्सवाच्या उगमासंबंधी शोध' ह्या विषयावर सन १८६७ मध्ये बर्लिन येथे वाचलेल्या एका निबंधात केलेल्या विधानांचा उल्लेख करावासा वाटतो. प्रा. वेबर ह्याने असे दाखविण्याचा प्रयत्न केला होता की कृष्णजन्माष्टमीच्या उत्सवाचा कार्यक्रम भारताच्या बाहेरून भारतात आला होता; काही निबंधग्रंथांत सांगितलेली देवकीच्या छातीवर स्तनपान करीत असलेल्या कृष्णाच्या मूर्तीची कल्पना ख्रिस्तीधर्मातील येशूची माता मेरी (मॅडोना) हिच्या चित्रावरून सुचली असावी. नारदाने भक्तिमार्गाने मुक्ति प्राप्त होते हे तत्त्व श्वेतद्वीपातून आणले असे जे पुराणात सांगितले आहे ते श्वेतद्वीप म्हणजे अलेक्झांड्रिया नगर होय असेही वेबरने म्हटले होते आणि कालियामर्दनासारखी कृष्णाच्या जन्मातील कृत्ये ख्रिस्ती धर्मातील घटनांशी जुळत आहेत. वेबरच्या त्या निबंधावर त्यावेळी बरेच कडाक्याचे हल्ले चढविण्यात आले होते. सांप्रत काळचा क्वचितच एखादा संस्कृतज्ञ पंडित वेबरची कल्पना उचलून धरणारा निघेल. म्हणून वेबरच्या कल्पनांचे खंडन करण्यात फारसा वेळ

खर्च करण्याची आवश्यकता प्रस्तुत ग्रंथकाराला वाटत नाही. वेबरच्या पूर्वीही पाश्चिमात्य पंडितांनी असे प्रतिपादन केले होते की रामायण हे होमरच्या इलियड ह्या काव्याच्या आधारावर रचिले आहे, गीता हा ग्रंथ बायबलच्या आधारावर केलेला आहे. अशा तऱ्हेचे बहुतेक निष्कर्ष आता विस्मृतीच्या उदरात गडप झाले आहेत ही उचित अशीच गोष्ट आहे.

## प्रकरण ८

### हरितालिका, गणेशचतुर्थी, ऋषिपंचमी, अनंतचतुर्दशी हीं व्रते

(मू. ग्रं. पा. ५।१४४—१५३)

**हरितालिका**. भाद्रपद शुद्ध तृतीया तिथीला हरितालिका व्रत येते आणि ते फक्त स्त्रियांकरिताच असते. ह्या व्रताचे वर्णन मध्ययुगीन काळात झालेल्या निर्णयसिंधु (पा १३३), व्रतार्क (पृ ४४ ब ते ४९ ब) ह्यांच्यासारख्या निबंधग्रंथांतच फक्त केले आहे. राजमार्तंड ह्या इ. स. च्या ११ व्या शतकाच्या पूर्वार्धात झालेल्या ग्रंथामध्ये भाद्रपद शुद्ध **चतुर्थीला** करावयाच्या हरिता चतुर्थी ह्या व्रताचा उल्लेख केला असून ते व्रत पार्वतीला प्रिय असल्याचे म्हटले आहे. हरितालिकेचे व्रत महाराष्ट्रातील स्त्रियामध्ये फार प्रचारात आहे.

ह्या व्रतामध्ये स्त्रियांनी तेल आणि आवळकाठीचे चूर्ण अंगाला लावून स्नान करावे, रेशमीवस्त्रे परिधान करावीत आणि सर्व पातकांचा नाश होण्याकरिता आणि अखंड सौभाग्याची प्राप्ती व्हावी म्हणून उमामहेश्वर प्रसन्न होण्याकरिता हरितालिकेचे व्रत करीन असा संकल्प करावा. प्रथम गणेश पूजन करून नंतर उमा आणि शंकर ह्यांच्या प्रतिमांची षोडशोपचारांनी पूजा करावी. बांबूच्या पात्रात वायने आणि सौभाग्यसूचक कुंकू इत्यादि पदार्थ दान द्यावेत. सांप्रतकाळी स्त्रिया पार्वती, शिवलिंग आणि पार्वतीची एक सखी ह्यांच्या मातीच्या केलेल्या आणि रंगविलेल्या मूर्ती विकत घेतात आणि त्यांची पूजा करितात. पार्वतीला तिच्या आलिकांनी म्हणजे सख्यांनी घरातून हरण करून नेले होते म्हणून ह्या व्रताला हरितालिका असे म्हणतात असे व्रतराज ह्या ग्रंथात (पा. १०८) सांगितले [आलिभिर्हरिता यस्मात्तस्मात्सा हरितालिका। व्रतराज (पान १०८).] आहे. त्या ग्रंथात ह्या व्रताबद्दल शंकराने स्वतः पार्वतीला सांगितलेली अशी कथा दिली आहे की ते व्रत केल्यामुळे पार्वतीला शंकर हा पति मिळाला आणि तिला शंकराच्या अर्धांगाची स्थिति प्राप्त झाली. गौरीच्या शिवाबरोबर झालेल्या विवाहाची विस्तृत कथा वराहपुराणात (अ. २२) दिली आहे.

**गणेशचतुर्थी.** भाद्रपद शुद्ध चतुर्थीच्या दिवशी भारतातील अनेक प्रांतांत गणेशचतुर्थीचा उत्सव करण्यात येतो. हा उत्सव बंगाल आणि गुजरात ह्या प्रांतांत करण्यात येत नाही. गणेशचतुर्थीला **वरदचतुर्थी** असेही नाव असल्याचे समयमयूख ह्या ग्रंथात म्हटले आहे. हे व्रत करण्याचा मुख्य काल मध्यान्ह असतो असे बृहस्पतीने म्हटले आहे (नि. सिं. पा. १३३). ह्याकरिता ज्या दिवशी मध्याह्न काळी चतुर्थी तिथि असेल तो दिवस प्रशस्त मानतात. सांप्रतकाळी सुंदर रीतीने रंगविलेली गणेशाची मातीची मूर्ती घरी आणून तिची प्राणप्रतिष्ठा करतात आणि षोडशोपचारांनी तिची पूजा करितात. ह्या पूजेत २१ ही संख्या फार महत्त्वाची असते. उदा. गणेशाला २१ दूर्वा वाहतात, २१ मोदकांचा नैवेद्य दाखवितात. ह्यापूजेतील महत्वाचा मंत्र 'ॐ गणानां त्वां हवामहे०' (ऋ २-२३-१)=(तै.सं.२-३-१४-३) हा असतो. तो मंत्र वास्तविकपणे ब्रह्मणस्पतीला उद्देशून म्हटलेला आहे. परंतु मध्ययुगीन काळी आणि आधुनिक काळी प्रचलित असलेल्या गणेशासंबंधी कल्पनेतून त्या देवतेने ब्रह्मणस्पती ह्या वैदिक देवतेची लक्षणे स्वीकारिली आहेत.

गणेशाचे ध्यान करण्याचे स्वरूप एक दांत, सुपासारखे कान, सर्पाचे यज्ञोपवीत, पाश आणि अंकुश ही शस्त्रें धारण करणारा, असे सांगितलेले आहे. (नि. सिं. पा. १३३).

गणेशचतुर्थीच्या दिवशी संध्याकाळी जर कोणी चंद्र पाहिला तर त्याच्यावर चोरी अथवा त्याच्यासारखा अपराध केल्याचा मिथ्या आरोप करण्यात येतो अशी मध्ययुगीन काळात समजूत होती आणि

सांप्रत काळीदेखील तशीच समजूत आहे. जर कोणी त्या दिवशी चुकून चंद्र पाहिला तर त्याचा परिणाम टाळण्याकरिता पुराणातील पुढील अर्थाच्या श्लोकाचा जप करावा आणि स्यमंतक मण्याची कथा श्रवण करावी असे सांगितले आहे. त्या श्लोकाचा अर्थ : 'एका सिंहाने प्रसेनजिताचा वध केला, त्या सिंहाचा जांबवंताने वध केला; हे सुकुमारा! रडू नकोस; हा तुझा स्यमंतक मणि आहे.' ह्या श्लोकांत उल्लेख केलेली कथा महाभारतांत (मौसलपर्व अ. ३-२३) आणि विष्णु (४-१३·४२) [सिंहः प्रसेनमधीत् सिंहो जाम्बवत्ता हतः। सुकुमारक मा रोदीस्तव ह्येष स्यमन्तकः ॥

विष्णुपुराण (४·१३·४२).] प्रभृति अनेक इतर पुराणांत वर्णन केली आहे. कृष्णाने बालवयात गणेशचतुर्थीला चंद्र पाहिला होता. त्यामुळे पुढे त्याच्यावर द्वारकेतील सत्राजित नावाच्या यादवाचा स्यमंतक नांवाचा मणि चोरून घेतल्याचा आळ आला होता. कृष्णाने त्या मण्याचा शोध लावला आणि जांबवान अस्वलाशी युद्ध करून तो मणि परत सत्राजितास आणून दिला आणि अशा रीतीने आपल्यावर आलेल्या मिथ्या आरोपातून आपली मुक्तता करून घेतली.

भविष्यपुराणांत (ब्राह्मपर्व ३१·१) असे सांगितले आहे की भाद्रपद शुद्ध चतुर्थी तिथीला गणेशाची पूजा केल्यास त्या तिथीला शिवा म्हणतात. सांप्रत काळीं गणेशाची पूजा लोकांच्या आवडीला अनुसरून भाद्रपद शुद्ध चतुर्थीपासून दीड, दोन, पाच अथवा सात दिवस अथवा अनंत चतुर्दशीपर्यंत चालू राहते आणि नंतर मोठी मिरवणूक काढून गणेशाची मूर्ती एखाद्या विहिरीत, तलावात, नदीत अथवा समुद्रात विसर्जन करण्यात येते. महाराष्ट्रातील काही भागात भाद्रपद शुद्ध सप्तमी आणि अष्टमी ह्या दिवशी तेरड्यासारख्या वनस्पतीच्या जुडग्याच्या स्वरूपाच्या **गौरीची पूजा** करण्याची चाल आहे आणि त्या गौरीचे आणि गणेशाच्या मूर्तीचे विसर्जन नवमीच्या दिवशी एकाच वेळी करण्यात येते.

सांप्रत काळी गणेश हा फार लोकप्रिय देव असून प्रत्येक कार्याच्या आरंभी त्याची प्रार्थना करण्यात येते. तो बुद्धीचा आणि वाङ्मयाचा अधिपति असून तो कार्यात यश देणारा आणि विघ्नांचा नाश करणारा असल्याचे मानण्यात येते.

गणेशाच्या पूजेच्या आणि त्याच्या मूर्तीच्या प्राचीनत्वाविषयी विवेचन मागे खंड २ मध्ये केले आहे. ब्रह्मवैवर्त पुराणाचा गणेशखंड नांवाचा आणि ४६ अध्याय असलेला एक भाग आहे. तैत्तिरीय उप., बृहदा. उप. ह्यांच्यासारख्या प्राचीन उपनिषदांच्या धर्तीवर एक गणपति अथर्वशीर्ष स्तोत्र करण्यात आले असून त्यात गणेश हाच श्रेष्ट ब्रह्म असल्याचे (त्वमेव सर्व खल्विदं ब्रह्म) म्हटले आहे. गणेशाचे मस्तक हत्तीचे असते आणि त्याचे वाहन मूषक (उंदीर) असते. ह्याविषयी काही चमत्कारिक स्वरूपाच्या कथा काही पुराणांत दिल्या आहेत. उदाहरणार्थ नृसिंह पुराणांत (२६·२|२०) म्हटले आहे की देवांचे कार्य करण्याकरिता गणेशाने हत्तीचे रूप धारण करून सर्व दानवांना भिवविले.

**ऋषिपंचमी** व्रत. हे व्रत भाद्रपद शुद्ध पंचमीला येते. ते पूर्वी सर्व वर्णाच्या पुरुषांनी करावयाचे असे. परंतु सांप्रत काळी ते फार करून केवळ स्त्रियाच करितात. हेमाद्रीने [कश्यपोत्रिर्भरद्वाजो विश्वामित्रोथ गौतमः। जमदग्निर्वसिष्ठश्च सप्तैते ऋषयः स्मृताः ॥

हेमाद्रि (व्रतखंड १ पा. ५७१).] (व्रत १. पा. ५६८|५७२) ब्रह्मांडपुराणाच्या आधारावर ह्या व्रताचे वर्णन केले आहे. ह्या व्रतात कश्यप, अत्रि, भरद्वाज प्रभृति सात ऋषींची अरुंधतीसह पूजा करितात. व्रत करणाराने फक्त शाकभाज्या, देवभात, श्यामाक ही धान्ये, कंदमुळे, फळे खाऊन राहावे आणि जमीन नांगरून उत्पन्न होणारा कोणताही पदार्थ भक्षण करू नये. सांप्रत काळी देखील हे व्रत करणाऱ्या स्त्रिया बैलाच्या श्रमाने उत्पन्न झालेले कोणतेही धान्य भक्षण करीत नाहीत.

भविष्योत्तर पुराणात (व्रतार्क पृ. ९०) ह्या व्रताविषयीची कृष्णाने युधिष्ठिराला सांगितलेली एक कथा दिली आहे. वृत्राचा वध केल्यामुळे इंद्राला लागलेले ब्रह्महत्येचे पातक त्याने अग्नि, नद्या, पर्वत आणि रजस्वला स्त्रिया ह्या चार ठिकाणी विभागून दिले होते. ह्याकरिता स्त्रियांना त्यांच्या मासिक रजोदर्शनाच्या कालात दुसऱ्यांबरोबर झालेल्या संपर्कापासून लागणाऱ्या पातकापासून मुक्त होण्याकरिता त्यांनी हे व्रत करावे असे त्यात सांगितले आहे.

ह्या व्रतात ७ ही संख्या महत्वाची असते : हे व्रत ७ वर्षेपर्यंत पालन करावयाचे असते, ७ ब्राह्मणांना आमंत्रण करून त्यांना ७ ऋषींच्या सोन्याच्या अथवा चांदीच्या प्रतिमा दान करावयाच्या असतात. हे व्रत सौराष्ट्रांत पालन करण्यात येत नाही.

**अनंतचतुर्दशी**. भाद्रपद शुद्ध चतुर्दशीला हे व्रत करण्यात येते. ह्या व्रतात हरीची पूजा अनंताच्या स्वरूपात करावयाची असते आणि एक पवित्र कंकण हातात बांधावयाचे असते. हे कंकण कापसाच्या सुताचे अथवा रेशमाचे करावयाचे असून त्याला केशराचा रंग दिलेला असतो आणि त्याला चौदा गांठी मारलेल्या असतात.

अग्निपुराणात (अ. १९२) दिलेल्या वर्णनात अनंताच्या दर्भाच्या प्रतिमेची पूजा करावयास सांगितले आहे. हेमाद्रीने (व्रत प्रकरण खंड २ पा. २६।३६) कृष्णाने युधिष्ठिराला सांगितलेली कौंडिण्याची एक कथा दिली आहे. कौंडिण्याने तारुण्याच्या अविचाराने आणि गर्वाने आपल्या पत्नीच्या हातातील अनंताचा दोर तोडून टाकला. त्यामुळे त्याच्या सर्वस्वाचा नाश झाला. पुढे त्याला पश्चात्ताप झाल्यानंतर त्याच्यावर देवाने दया केली. ह्या व्रतांत मीठ निषिद्ध असते. ते १४ वर्षे करावयाचे असते. सांप्रत काळीदेखील हे व्रत करणारे अनेक लोक आहेत. परंतु त्यांची संख्या झपाट्याने कमी होत आहे.

# प्रकरण ९

## नवरात्र अथवा दुर्गोत्सव

(मू. ग्रं. पा.५।१५४-१८७)

आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून नवमीपर्यंत दुर्गापूजेचा उत्सव सर्व भारतभर कोणत्या ना कोणत्या स्वरूपात साजरा करण्यात येतो. ह्यालाच **नवरात्र** असेही नाव आहे. काही ग्रंथांत (निर्णयामृत पा. ५६) दुर्गोत्सव **शरद** (आश्विन शुद्ध पक्षात) आणि **वसंत** (चैत्र शुद्ध पक्षात) ह्या दोन्ही ऋतूत साजरा केला पाहिजे असे सांगितले आहे. तथापि आश्विन महिन्यातीलच दुर्गोत्सव विशेषतः बंगाल, बिहार आणि आसाम (कामरूप) ह्या प्रांतांमध्ये मोठ्या प्रमाणावर साजरा करण्यात येतो.

दुर्गापूजेचा उत्सव किती कालपर्यंत साजरा करावा ह्यासंबंधी पुढील-प्रमाणे पर्याय धर्मशास्त्रावरील ग्रंथांत (तिथितत्त्व पा. ६७) सांगितले आहेत : (१) भाद्रपद कृष्ण नवमीपासून आश्विन शुद्ध नवमीपर्यंत; (२) आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून नवमीपर्यंत; (३) आश्विन शुद्ध षष्ठीपासून नवमीपर्यंत (४) आश्विन शूद्ध सप्तमीपासून नवमीपर्यंत; (५) आश्विनशुद्ध अष्टमीपासून नवमीपर्यंत; (६) फक्त आश्विन शुद्ध अष्टमीला आणि (७) फक्त आश्विन शुद्ध नवमीला. दुर्गोत्सवासंबंधी अनेक ग्रंथ अस्तित्वात आहेत. व्रते, तिथि ह्यांच्यासंबंधी विवेचन करणाऱ्या सर्व ग्रंथांत ह्या पूजेसंबंधी उल्लेख असतो. त्याशिवाय शूलपाणीकृत दुर्गोत्सवविवेक, रघुनंदनकृत दुर्गार्चनपद्धति, विद्यापतिकृत दुर्गाभक्तितरंगिणी, ह्यांच्यासारखे खास निबंधग्रंथ आहेत. तसेच मार्कंडेयपुराणातील सप्तशती अथवा देवीमाहात्म्य, कालिकापुराण, बृहन्नंदीपुराण आणि देवीपुराण ह्यांतही **दुर्गा** आणि तिची पूजा ह्यांच्याबद्दल बरेच विवेचन आले आहे.

जो कोणी हा उत्सव करणार नाही त्याच्यावर देवी क्रुद्ध होते असे सांगितले असल्यामुळे दुर्गापूजा ही **नित्य** (आवश्यक) स्वरूपाची आहे. (कालिकापुराण ६३·१२।१३) आणि दुर्गोत्सव केल्याने अनेक शुभ फलांची प्राप्ती होते असे सांगितले असल्यामुळे ती **काम्य** स्वरूपाची आहे. (तिथितत्त्व पा. ६५) ही पूजा **सार्वजनिक** स्वरूपाची आहे. चारही वर्णांच्या लोकांना ती करता येते. ती सर्व लोकांनी जमून करावयाची असून इष्टमित्रांना निमंत्रण करण्यासारखे **सामाजिक** भागही त्या पूजेत असतात. चारी वर्ण इतकेच नव्हे तर म्लेच्छ समाज,जातिबहिष्कृत लोक, अंग, वंग आणि कलिंग देशातील लोक, किन्नर, बर्बर, शक ह्यांना देखील दुर्गेची पूजा करिता येते आणि देवीला पशु आणि मद्य हे पदार्थ बलि म्हणून अर्पण करिता येतात असे भविष्यपुराणात (नि. सिं. पा ११४) एके ठिकाणी म्हटले आहे. ही पूजा **सात्विकी, राजसी** आणि **तामसी** अशा तीन प्रकारची असल्याचे स्कंद आणि भविष्य पुराणांत सांगितले आहे (ति. त. पा. ६८). सात्विकी पूजा जप करून आणि मांसरहित नैवेद्य अर्पण करून करण्यात येते; राजसी पूजा बलिदान करून आणि मांसयुक्त नैवेद्य अर्पण करून आणि तामसी पूजा मद्य आणि मांस अर्पण करून करण्यात येते आणि तिच्यात जप नसतो आणि मंत्र नसतात.

इतर अनेक देव आणि देवींप्रमाणे दुर्गा ही आषाढ शुद्ध अष्टमी तिथीला चार महिन्यांकरिता निद्रिस्त होते आणि त्यामुळे आश्विन महिन्यात ती निद्रिस्त असते असे समजून दुर्गोत्सवामध्ये देवीला जागी करण्याचा एक विधि शास्त्रात सांगितला आहे. ह्या विधीला **बोधन** असे नाव आहे. हा विधि कोणत्या तिथीला करावा ह्याविषयी मतभेद आहेत आणि ती तिथि देवीला असणाऱ्या हातांच्या संख्येवरही अवलंबून असते. उदाहरणार्थ, १० हात असलेल्या देवीला आश्विन शुद्ध षष्ठीला जागृत करावी, १८ हात असलेल्या देवीची

पूजा करावयाची असेल तर तिला भाद्रपद कृष्ण नवमीला जागृत करावी, (ति. त. पा. ७१) पूजेचा आरंभ आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून करावयाचा असल्यास बोधनविधि शुद्ध षष्ठीला होतो (दुर्गार्चन पद्धति पा. ६६३).

दुर्गापूजेच्या उत्सवाला **षष्ठी** तिथीला आरंभ करावयाचा असला तर पूजा करणाऱ्याने त्या दिवशी प्रातःकाळी एका बिल्व वृक्षाजवळ जावे, एक घट स्थापन करावा आणि त्या वृक्षाची दुर्गा म्हणून पूजा करावी, तिला मंत्र म्हणून जागृत करावी आणि तिला पूजेकरिता येण्याचे आमंत्रण करावे, आरसा, दिवा ह्यांच्यासारखे अनेक शुभसूचक पदार्थ बिल्ववृक्षाजवळ ठेवावे. नंतर केळ, डाळिंब, कोथींबीर, हळद, बिल्व, अशोक प्रभृति नऊ वृक्षांच्या खांद्या अथवा पाने अपराजिता वेलीने एकत्र बांधून त्यांचा एक जुडगा करावा आणि त्या जुडग्याची आणि दुर्गेच्या प्रतिमेची पूजा करावी. त्या बिल्ववृक्षाच्या ठिकाणी देवीला वास्तव्य करावयास लावावे. (ति. त. पा. ७५।७६).

**सप्तमीच्या** दिवशी पूजकाने त्या बिल्ववृक्षाजवळ जाऊन त्याची पूजा करावी आणि त्या वृक्षाची अनुमति घेऊन त्याची एक खांदी तोडून घ्यावी आणि पूजेच्या मंडपात आणावी. तो नऊ वृक्षांच्या फांद्याचा अथवा पानांचा जुडगाही मंडपात आणावा आणि त्या दोहोंची स्थापना करावी; देवीची मूर्ती तसेच गणेश आणि इतर देवतांच्या मूर्ती ह्यांची **प्राणप्रतिष्ठा** करावी; देवीचे ध्यान करावे. पूजा केल्यानंतर एक बकरा अथवा त्याच्यासारख्या अन्य पशूचा बलि अर्पण करावा. हा बकरा अथवा रेडा कृष्णवर्णाचा असावा आणि निदान ५ वर्षांचा असावा. देवीच्या निरनिराळ्या हातांत चक्र, बाण, पाश प्रभृति आयुधे असावी, मस्तकावर चंद्राचे भूषण असावे, एक भयंकर स्वरूपाचा दैत्य दाखवावा आणि देवीने त्या दैत्याच्या छातीवर त्रिशूल भोसकला असल्याचे दाखवावे, देवीने त्या दैत्याचे केस हातात घेतलेले असावे, देवीचा सिंह दाखवून त्याच्या पाठीवर देवीचा उजवा पाय ठेवलेला दाखवावा, मस्तकरहित एक रेडा दाखवावा आणि त्यातून तो दैत्य बाहेर निघालेला दाखवावा, देवीचा डावा पाय दैत्याच्या अंगावर वरच्या बाजूला ठेवलेला दाखवावा, तिला तीन नेत्र असावेत, तिला लांब आणि कमळाच्या देठासारखे मृदु दहा हात असावेत, तिच्या अंगाचा वर्ण तप्त सुवर्णासारखा असावा.

अष्टमीच्या दिवशी (हिला **महाष्टमी** म्हणतात) पूजा करणाऱ्याने आपल्या पंचभूतात्मक शरीराच्या शुद्धिकरिता निरनिराळ्या अंगांचा **न्यास** करावा आणि शंखोदक अथवा तशाच दुसऱ्या पात्रातील पाणी आपल्या स्वतःच्या शरीरावर आणि पूजासाहित्यावर शिंपडावे; दुर्गेचे चिंतन करावे आणि तिला आसनादि निरनिराळे उपचार अर्पण करून पूजा करावी; तशीच सिंह, देवीची आयुधे, पादुका, ध्वज, नगारा, इत्यादि उपकरणांची पूजा करावी; नऊ वृक्षांच्या जुडग्याजवळ जाऊन त्यातील प्रत्येक वृक्षाची पृथक पृथक पूजा करावी; शिजलेला चरू आणि उडिदाची डाळ यांचा बलि अर्पण करावा.

अष्टमीच्या दिवशी कुमारिकांचा सत्कार करावयाचा असतो आणि त्यांना आणि ब्राह्मणांना भोजन घालावे लागते. प्रतिपदेपासून प्रारंभ करून नवमीपर्यंत एक अथवा अधिक कुमारिकांचा सत्कार करण्यास प्रत्यवाय नसतो परंतु अष्टमीच्या दिवशी तरी तसा सत्कार केला पाहिजे. त्या कुमारिका कशा आणि कोणत्या वर्णाच्या असाव्या ह्याबद्दल नियम शास्त्रांत सांगितले आहेत. भयंकर स्वरूपाच्या कृत्यामध्ये अस्पृश्य जातीच्या कुमारिकेचा सत्कार करावा असे सांगितले आहे. (दुर्गार्चन पद्धति पा. ६८१).

नवरात्री व्रतामध्ये व्रतकर्त्याने वेदपारायण ऐकावे आणि प्रतिपदेपासून नवमीपर्यंत स्वतः चंडीपाठ (देवीमाहात्म्य) म्हणावा अथवा त्याकरिता दुसऱ्या कोणा मनुष्याची योजना करावी. असा पाठ प्रतिपदेला

एक वेळा, द्वितीयेला दोन वेळा ह्याप्रमाणे नवमीला नऊ वेळा करावयाचा असतो आणि अशा पाठांपासून निरनिराळी फळे प्राप्त होतात असे सांगितले आहे. (ति. त. पा ६९।७२) प्राचीन काळी आणि मध्ययुगीन काळांत मंत्राच्या जपाला अतिशय महत्व देण्यात येत असे आणि सांप्रत काळी देखील इंग्रजी शिकलेले लोकदेखील मंत्राच्या सामर्थ्याविषयी गर्भित विश्वास पुष्कळ वेळा दाखवितात. भगवद्गीतेमध्ये देखील (अ. ४·२८) द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ ह्यांच्यापेक्षा जपयज्ञ अधिक श्रेष्ठ असल्याचे म्हटले आहे. जर एखाद्या मनुष्याने आपले मन एकाग्र करून जप केला तर मंत्राचा मोठा परिणाम होणे संभवनीयही आहे, चंडीपाठाचे **शतचंडी**, **सहस्त्रचंडी** असेही प्रकार आहेत. शतचंडी पाठामध्ये दहा ब्राह्मण नेमण्यात येतात आणि त्यांनी चार दिवसात सप्तशतीचे शंभर पाठ करावयाचे असतात. सहस्त्रचंडीमध्ये शंभर ब्राह्मण नेमण्यात येऊन त्यांनी चार दिवसात एक सहस्त्रपाठ करावयाचे असतात ह्याशिवाय मूलमंत्राचा एक लक्ष जप करण्याकरिता एक मनुष्य नेमण्यात येतो. शतचंडी आणि सहस्त्रचंडी ह्यांची सविस्तर वर्णने निर्णयसिंधु (पा १८५।१८६) मध्ये केली आहेत.

प्रत्येक दिवशीची पूजा झाल्यावर प्रसादाकरिता पूजा करणाऱ्याच्या कुटुंबातील मंडळी आणि इष्टमित्र जमतात. पूर्वीच्या काळी प्रसाद भक्षणाकरिता बसलेल्या लोकांची संख्या केव्हा केव्हा शेकड्यांनी मोजण्यासारखी असे. पूजा झाल्यानंतर होम करण्यात येतो.

महाष्टमीच्या दिवशीचे पूजा, होम इत्यादि विशिष्ट विधि केल्यानंतर उरलेली तिथि भक्ताने नृत्य गीत, वादन करून जागर करण्यात घालवावी. (दुर्गा प. पा. ६८१). महाष्टमीच्या मध्यरात्री देवीला एक बकरा अथवा रेडा ह्यांच्या सारख्या **पशूंचा बलि** द्यावा आणि नवमीच्या दिवशी **अनेक** बलि द्यावेत असे देवी पुराण आणि कालिकापुराण ह्यांत सांगितले आहे (ति. त. पा.८५-८६).

महाष्टमीची शेवटली घटिका आणि नवमीची पहिली घटिका अशा दोन घटिकाच्या अवधीला '**संधि**' अशी संज्ञा आहे आणि त्यावेळी योगिनींसह देवीची पूजा करावयाची असते. ती पूजा सर्वात अधिक पवित्र समजली जाते. ह्या पूजेमध्ये करावयाचे बलिदान महाष्टमीच्या शेवटल्या घटकेमध्ये न करिता महानवमी सुरू झाल्यानंतर करावयाचे असते (दु. प. पा. ६८१).

**महानवमीच्या** दिवशी महाष्टमीप्रमाणेच पूजा करावयाची असते. परंतु त्या दिवशी अष्टमीच्या दिवसापेक्षा अधिक संस्थेचे (बकरे वगैरे प्राणी) बलि द्यावयाचे असतात. नवमीला बलिदान अवश्य असते. त्यानंतर देवीच्या मस्तकापासून पायापर्यंत तिच्यापुढे **नीराजन** दिवे ओवाळावयाचे असतात. संपूर्ण शारदीय पूजेबद्दलची दक्षिणा पुरोहिताला नवमीला द्यावी. जर दक्षिणा दिली नाही तर सर्व विधि निष्फल होतो. पूजेच्या विधीमध्ये काही व्यंग असल्यास त्याबद्दल क्षमा करण्याची प्रार्थना देवीला करण्यात येते. एका ब्राह्मण कुमारिकेचे पाय धुवावेत, तिला पोटभर जेऊ घालावे आणि पूजकाच्या मस्तकावर अक्षता टाकण्यास तिला सांगावे. नंतर भक्तिपूर्वक त्या कुमारिकेची बोळवण करावी. घरातील मंडळी परस्परांना आलिंगन देतात. ज्या शेजाऱ्यांच्या घरी पूजा केली असेल त्यांच्याकडे जाऊन शुभेच्छा प्रदर्शित करितात.

**दशमीच्या** दिवशी देवीची षोडशोपचारांनी अथवा शक्य तितक्या उपचारांनी पूजा करून तिची प्रार्थना करण्यात येते. एक फूल घेऊन ते '**क्षमस्व**' असे म्हणून देवीच्या प्रतिमेवर टाकतात. नंतर देवीची प्रतिमा, बिल्व वृक्षाची खांदी, नऊ वृक्षांचा जुडगा त्यांच्या त्यांच्या स्थानापासून उचलून दुसऱ्या स्थानांवर ठेवावेत आणि त्यांच्या पुढे पिठाचे दिवे ओवाळावेत, नंतर वेदपठण करीत, शुभ खेळ आणि करमणुकीचे

प्रकार करीत एखाद्या नदीच्या अथवा तलावाच्या पाण्याजवळ जावे आणि एक वर्ष होऊन गेल्यावर पुन्हा परत येण्याकरिता स्वस्थानी जाण्याबद्दल देवीची प्रार्थना करावी आणि प्रतिमेचे त्या नदीत अथवा तलावात **विसर्जन** करावे. त्यानंतर **शाबरोत्सव** करावा.

ह्या **शाबरोत्सवामध्ये** शबरजमातीमधील लोकांप्रमाणे झाडाच्या पानांनी शरीर आच्छादित करावे, अंगाला चिखल फासावा, असंबद्ध हालचाली कराव्या, नृत्य करावे, गाणी गावीत आणि वाद्ये वाजवांवीत, स्त्री- पुरुषसंभोगाविषयी शब्द उच्चारावे. प्रत्येकाने ह्या शाबरोत्सवामध्ये सामील झाले पाहिजे. असे न करणारावर देवी क्रुद्ध होते आणि दारुण शाप देते असे कालिकापुराणात (ति. त. पा. ७५) म्हटले आहे. सर्व दर्जाचे लोक समान असतात हे मनावर बिंबविण्याकरिता वर्षातून निदान एक दिवस ह्या खेळात सर्वांनी सामील झाले पाहिजे असा नियम घातला असावा. ही शाबरोत्सवाची चाल सांप्रत काळी प्रचलित नाही असे दिसते. विसर्जनानंतर मित्रमित्रांना भेटतात आणि मिठाई वाटतात.

ह्या उत्सवाशी संबंध असणाऱ्या काही गोष्टींसंबंधी थोडेसे विवेचन करणे अवश्य आहे. दुर्गोत्सवात केल्या जाणाऱ्या **बलिदाना**संबंधी बरीच चर्चा निरनिराळ्या ग्रंथांत केली आहे. कालिकापुराणात (७१·३।५, ९५।९६) दुर्गेच्या आणि भैरवाप्रीत्यर्थ बलिदान करावयास पात्र असणाऱ्या अनेक प्राण्यांची नावे सांगितली आहेत. अशा प्राण्यात पक्षी, कांसवे, मगरी, मत्स्य, हरणे, कृष्णमृग, शरभ इत्यादिकांचा समावेश असला तरी सामान्यतः बकरे आणि रेडे ह्यांचेच फक्त बलिदान करण्यात येते. घोडा, हत्ती ह्यांचे बलिदान करू नये असे सांगितले असून ब्राह्मणाने सिंह, व्याघ्र अथवा मनुष्यप्राणी ह्यांचे बलिदान करू नये; तसेच प्राण्यांच्या माद्यांचे बलिदान करण्याचाही निषेध केला आहे. प्राण्यांची हत्या केली जात असली तरी सामान्यतः बलि दिलेल्या पशूचे **रक्त** आणि **मस्तक** हीच फक्त देवीला अर्पण केली जातात. मंत्रांनी पुनीत झालेले रक्त आणि शिर ह्यांना कालिकापुराणात अमृत म्हटले आहे. पूजकाने आपले स्वतःचे रक्तही देवीला अर्पण करावयाचे असते. बलिदान करते वेळी म्हणावयाच्या एका मंत्रात (मनु ५—३९ = विष्णु ध. सू. ५१—६१) असे म्हटले आहे की ब्रह्मदेवाने यज्ञाच्या आणि सर्वांच्या स्वास्थ्याकरिता प्राण्यांची उत्पत्ति केली होती, ह्याकरिता यज्ञात (पशूंची) हत्या करणे ही हत्या होत नाही. अशीही एक समजूत प्राचीन काळापासून होती की देवांच्या आणि पितरांच्या प्रीत्यर्थ केलेल्या यज्ञात मारलेला पशु स्वर्गात जातो (ऋ. १—१६२—२१ = वाज. सं. २३—१६ = मनु. ५—४२). जर कोणाला देवीला रक्त अर्पण करण्याविषयी तिटकारा असेल तर त्याने कोहळा, ऊंस, मद्य, आसवे इत्यादि पदार्थ अर्पण केल्यास देवीला सारखाच संतोष होतो असे शास्त्रात (कालिका ७१—२३/२४) सांगितले असले तरी सांप्रत काळी देखील ब्राह्मणांसकट उच्च समजल्या जाणाऱ्या जातींतील लोक आपल्या कुलांतील रूढीला अनुसरून दुर्गेला बकरे आणि क्वचित प्रसंगी रेडे बलि म्हणून अर्पण करतात. अहल्या कामधेनु ह्या ग्रंथात (पृ. ५४३ ब आणि ५४४ अ) वैष्णवाला बलिदानापासून किती वाईट वाटते ह्याचे वर्णन करून पुढे म्हटले आहे की ब्राह्मण जातीत बलिदान **कोहळ्याचे** असावे अथवा **पशूच्या पिठाच्या प्रतिमा** अथवा **साधे तूप** देवीला अर्पण करावे. इतर जातींच्या बाबतीत देखील कोहळा, बेलफळ, ऊस ह्यांचे तुकडे करावेत असे शास्त्रांत सांगितले आहे.

दुर्गापूजेशी संबंध असलेला दुसरा एक विषय म्हणजे दुर्गापूजेकरिता **प्रतिमा कशी असावी** हा आहे. मागे देवीचे ध्यान वर्णन केले आहे त्याप्रमाणे तिची प्रतिमा फक्त सिंह, महिषासुर ह्यांच्यासह करावयाची असते. परंतु सांप्रत काळी देवीच्या बाजूला लक्ष्मी, गणेश, सरस्वती आणि कार्तिक स्वामी ह्यांच्या प्रतिमा असतात. देवीची प्रतिमा सुवर्ण, रुपे, माती, पाषाण ह्यांचीही केलेली चालते अथवा नुसते चित्र असले तरी चालते. दुर्गापूजेकरिता प्रतिमाच पाहिजे असे नसून देवीची पूजा एखाद्या लिंगावर, स्थंडिलावर, लाकडी

अथवा पाषाणाच्या पादुकांवर, चित्रावर, त्रिशूळादि आयुधावर अथवा उदकामध्ये देखील करिता येते. सांप्रत काळी देवीची प्रतिमा वेत्र, बांबू, माती वगैरे पदार्थांची केलेली असते. देवीच्या हातांबद्दल मतवैचित्र्य आहे. २०, १८, १०, ४ अशा संख्या निरनिराळ्या ग्रंथांत सांगितल्या आहेत.

**नवरात्र** ह्याचा अर्थ कोणाच्या मते नऊ दिवस आणि नऊ रात्री चालणारे एक व्रत असा असतो आणि कोणाच्या मते नवरात्र हे व्रताचे नाव असून त्यांत क्षय अथवा वृद्धि तिथींना अनुसरून प्रतिपदेपासून नवमीपर्यंतचे आठ अथवा दहा दिवस असतात. ह्या व्रतामध्ये स्नापन (स्नान), पूजा, बलिदान आणि होम ह्या चार महत्त्वाच्या बाबी असून उपवास हे त्याचे एक अंग (गौण भाग) असते.

**पूजा केव्हा करावी** ह्याबद्दलही मतवैचित्र्य आहे. समयमयूखा- (पा. १४) सारख्या काही ग्रंथांत पूजा **प्रातःकाळी** करावी असे सांगितले असून निर्णयसिंधु सारख्या (पा. १६५) काही ग्रंथांत पूजा रात्री करावी असे प्रतिपादन केले आहे. देवीपुराण आणि कालिकापुराण ह्यांत प्रातःकाळ, माध्यान्हकाळ आणि रात्र अशा **तीन वेळा** पूजा करावी असे सांगितले आहे. कालतत्त्व ह्या ग्रंथात (पा. २८०) ह्या दोन्ही मतांचा समन्वय करण्याकरिता असे म्हटले आहे की प्रातःकाळी आणि माध्यान्हकाळी त्रोटक पूजा कराव्या आणि मुख्य आणि सविस्तर पूजा रात्री करावी. दुर्गापूजेमधील निरनिराळे विधि विशिष्ट नक्षत्रांवर आणि विशिष्ट तिथींना करावयास सांगितलेले असल्या कारणाने काहीसा घोटाळा उत्पन्न होतो. पुष्कळ वेळी एखाद्या विशिष्ट कृत्याकरिता शास्त्रांत सांगितलेली तिथि आणि नक्षत्र ही जुळत नाहीत. ह्याकरिता असे नियम करण्यात आले आहेत की जर शास्त्रात सांगितलेली तिथि आणि नक्षत्र जुळली तर त्यापासून इष्ट फले प्राप्त होतात; परंतु तिथि आणि नक्षत्र जुळत नसली तर **तिथि महत्त्वाची** मानावी आणि उक्त तिथीला अनुसरून निरनिराळे विधि करावे. तिथीच्या बाबतीत देखील कोणती तिथि स्वीकारावी ह्याविषयी मतभेद आहेत आणि पर्याय सांगितले आहेत.

दुर्गापूजेमध्ये **घटस्थापना** ही एक महत्त्वाची गोष्ट असते. प्राचीन वैदिक काळापासून पूर्णकलश हे पावित्र्याचे आणि ऐश्वर्याचे चिन्ह मानले आहे (ऋ ३-३२-१५ 'आपूर्णो अस्य कलशः'). बंगालसारखी मोठ्या प्रमाणावरील दुर्गापूजा महाराष्ट्रप्रभृति प्रांतात नसली तरीदेखील **घटस्थापनेचा विधि** महाराष्ट्र, गुजरात आणि सौराष्ट्र ह्या प्रांतांत करण्यात येतो. निर्णयसिंधु- (पा. ७६७) मध्ये ह्याचा विधि सांगितला आहे. प्रतिपदेच्या दिवशी प्रातःकाळी हा विधि करावयाचा असतो. पवित्र अशा मातीचा एक ओटा तयार करून त्यावर यव, गहु ह्यांचे दाणे पेरतात आणि सुवर्णाचा, चांदीचा, तांब्याचा अथवा मातीचा एक घट स्थापन करतात. ह्या घटामध्ये पाणी भरून त्यात चंदनाचे गंध, दूर्वा, सवौषधि, आंबा प्रभृति पाच वृक्षांची पाने इत्यादि पदार्थ टाकतात; त्याच्या सभोवती वस्त्र गुंडाळून त्यावर एक तांदुळांनी भरलेले पात्र ठेवतात आणि त्या पात्रावर वरुणाची पूजा करितात. दुर्गेचे ध्यान करून तिचे आवाहन करण्यात येते, शिजविलेला भात, कोहाळा, उडिदाची डाळ वगैरे तिला अर्पण करतात. महाराष्ट्रात नवरात्रामधील मुख्य गोष्टी घटस्थापना, त्यानंतर नवमीपर्यंत एक एक फुलांची माळ देवीला अर्पण करणे आणि पूजा करणाऱ्याने काही आचार पाळणे ह्या असतात. बंगाल प्रांतात सर्वतोभद्र मंडळात **नऊ घट** स्थापन करितात. ते गुलालाने भरलेले असून त्याच्यावर निरनिराळ्या रंगांची निशाणे लावतात. भारतातील काही भागात फक्त एकाच घटाची स्थापना केली जाते.

दुर्गापूजा सर्व लोकांकरिता असते. राजांनी आणि ज्यांच्याजवळ घोडे असतील अशा लोकांनी नवरात्रामध्ये द्वितीयेपासून नवमीपर्यंत **घोड्यांची पूजा** करावी असे देवीपुराणात सांगितले आहे (हेमा. व्रत

१ पा. ९०६). आश्विन शुद्ध प्रतिपदेपासून नवमीपर्यंत राजांनी घोड्यांसंबंधी **लोहाभिसारिक** अथवा **नीराजन** नावाचा एकविधि करावयाचा असे. त्या विधीचे वर्णन खंड २ मध्ये केले आहे.

कृत्यकल्पतरु ह्या ग्रंथात दुर्गाष्टमी नावाचे एक व्रत सांगितले आहे. परंतु त्याचा दुर्गापूजेशी संबंध नाही. हेमाद्रीने दुसरे एक व्रत सांगितले आहे ते व्रत श्रावणशुद्ध अष्टमीपासून एक वर्षपर्यंत प्रत्येक महिन्यातील शुद्ध अष्टमीला करावयाचे असते आणि त्यात कुमारिकांना आणि ब्राह्मणांना भोजन घालावयाचे असते. प्रत्येक महिन्यात भिन्न भिन्न अन्न द्यावयाचे असते (हे. व्रत १ पा. ८६६). दुर्गापूजेच्या **प्राचीन**त्वाविषयी मागे खंड २ मध्ये विवेचन केले आहे. निरनिराळ्या ग्रंथांतील उल्लेखावरून आणि नाण्यांसारख्या इतर पुराव्यावरून दुर्गापूजेचा सांप्रदाय इ. स. च्या पहिल्या अथवा दुसऱ्या शतकां इतका प्राचीन असावा असे दिसून येते.

चैत्र आणि आश्विन असे **दोन नवरात्र उत्सव** काही ग्रंथांत का सांगण्यात आले आहेत ह्याबद्दल काही तर्क करिता येतील. चैत्रात, वसंत ऋतूत तयार होणारी धान्ये तयार होतात आणि आश्विनात शरद ऋतूतील धान्ये तयार होतात. त्यामुळे अशा दोन पूजा उत्पन्न झाल्या असण्याचा संभव आहे. दुर्गा (कन्या) सिंहावर आरोहण करिते. ह्यात ज्योतिषशास्त्रदृष्ट्या काही संबंध असण्याचाही संभव आहे; परंतु तो संबंध स्पष्ट दाखविता येत नाही.

# प्रकरण १०

## विजयादशमी आणि दिवाळी

(मू. ग्रं. पा. १८८—२१०)

आश्विन शुक्ल पक्षातील दशमी तिथीला **विजयादशमी** म्हणतात. ह्या तिथीचे सविस्तर वर्णन हेमाद्री (व्रत. खंड १ पा ९७०—९७३), निर्णयसिन्धु (पा. ६९—७०), धर्मसिंन्धु (पा. ९६) प्रभृति अनेक ग्रंथांत केले आहे. निर्णयसिन्धुमध्ये (पा. १८९) उद्धृत केलेल्या कश्यपाच्या एका श्लोकात असे म्हटले आहे की रामाने दशमीच्या दिवशी श्रवण नक्षत्रावर रावणावर स्वारी केली होती म्हणून लोकांनी त्या तिथीवर आणि त्या नक्षत्रावर सीमोल्लंघन करावे. त्याच ग्रंथात आणि त्याच पानावर उद्धृत केलेल्या नारदाच्या श्लोकात विजय संज्ञा असणाऱ्या मुहूर्ताचे असे वर्णन केले आहे की, सायंकाळी संधिकालानंतर थोड्या वेळाने जेव्हा नक्षत्रे दिसू लागण्यास सुरुवात होते त्या काळाला विजय अशी संज्ञा असून त्या काळात केलेली सर्व कृत्ये यशस्वी होतात. भृगूच्या एका श्लोकांत (स. म. पा. ६९) म्हटले आहे की दिवसाच्या (१५ मुहूर्ता पैकी) अकराव्या मुहूर्ताला विजय म्हणतात; विजयाची इच्छा असणाऱ्या सर्वांनी त्यावेळी प्रयाण करावे. ह्यावरून विजय संज्ञा असणारा काल दोन प्रकारचा असल्याचे दिसून येते.

विजयादशमी हा वर्षातील अत्यंत शुभ असलेल्या तीन दिवसांपैकी एक आहे. (दुसरे दोन दिवस म्हणजे चैत्रशुक्ल प्रतिपदा आणि कार्तिक शुक्ल प्रतिपदा हे असतात). म्हणून जरी त्या दिवशी दुसरे शुभ योग नसले तरीदेखील भारतात लहान मुलें मुळाक्षरे शिकण्यास प्रारंभ करितात (म्हणजे सरस्वतीपूजन करितात), लोक नूतन व्यवसायाला सुरुवात करितात, आणि जर त्या दिवशी श्रवण नक्षत्र असेल तर राजाने आपल्या शत्रूवर स्वारी केल्यास त्याला विजय आणि शांति प्राप्त होते. दसरा अथवा विजयादशमी हा दिवस सर्व लोकांकरिता मोठा सणाचा असतो, परंतु तो क्षत्रिय, सरदार आणि राजे ह्यांना विशेष महत्वाचा असतो.

ह्या दिवशी करावयाची मुख्य कृत्ये म्हणजे अपराजिता (अजिंक्य) देवीची पूजा, शमीपूजा, सीमोल्लंघन करणे आणि परत घरी येणे, घरातील स्त्रियांकडून आपल्या समोर दिवा ओवाळून घेणे, नूतन वस्त्रे आणि अलंकार धारण करणे आणि राजाच्या बाबतीत घोडे, हत्ती आणि सैनिक ह्यांचा नीराजन विधि करणे, आणि स्वारीवर निघणे ही असतात.

**अपराजिता देवीची पूजा.** धर्मसिन्धूमध्ये (पा. ९६) असे वर्णन केले आहे की विजयादशमीच्या दिवशी आपल्या गावाच्या ईशान्यदिशेकडे जावे, तेथे एखाद्या स्वच्छ जागेवर जमीन (गोमयाने) सारवावी, आणि तिच्यावर चंदनाच्या गंधाने अथवा त्यासारख्या पदार्थाने एक अष्टकोनी आकृती काढावी. त्या आकृतीच्या मध्यभागी अपराजिता देवीचे आवाहन करावे, तिच्या दोन्ही बाजूला जया आणि विजया ह्यांचे आवाहन करावे आणि त्या तिन्ही देवतांची षोडशोपचारांनी पूजा करावी. पूजा करणारा राजा असेल तर त्याने स्वतःला विजय मिळवून देण्याबद्दल देवीची प्रार्थना करावी आणि सामान्य लोकांनी आपल्या स्वतःच्या संरक्षणाबद्दल प्रार्थना करावी. नंतर सर्व लोकांनी गावाच्या बाहेर ईशान्य दिशेला असलेल्या शमी वृक्षाकडे जावे आणि त्याची पूजा करावी. शमीपूजनाच्या पूर्वी अथवा नंतर लोकांनी सीमोल्लंघन (म्हणजे आपल्या गांवाच्या हद्दीपलिकडे जाणे) करावे. त्या दिवशी रामाने लंका जिंकून घेतली होती ह्याकरिता राम आणि सीता ह्यांच्या प्रतिमांचे पूजन करावे असे काही ग्रंथांत सांगितले आहे (अहल्याकामधेनु पुष्ठ २१८ अ).

सांप्रतकाळी भारतातील बऱ्याच भागात विजयादशमीच्या दिवशी शमीपूजा केली जाते. परंतु शमीचे झाड विरळा आढळते म्हणून महाराष्ट्रात आणि कोकण प्रांतात आपटा ह्या नावाच्या झाडाच्या खांद्या रानातून आणून एखाद्या देवालयाच्या जवळ मांडून ठेवतात आणि अपराह्णकाळी लोक त्या खांद्याची पाने लुटण्याची एक लटुपटूची लढाई करितात आणि ती पाने सोनें म्हणून शेजारी पाजारी, स्नेही आणि आप्तवर्ग ह्यांना वाटतात. ह्या प्रघाताला शास्त्राधार नाही असे धर्मसिंधु [प्राकृताः शमीशाखाश्छित्वानयन्ति तन्निर्मूलम्। धर्मसिंधु पा. ४६.] (पा. ४६) मध्ये म्हटले आहे. सौराष्ट्रात आणि दुसऱ्या अनेक प्रांतात अशा प्रकारची पाने वाटण्याची पद्धति नाही. काही ठिकाणी पूर्वीच्या काळी ह्या दिवशी एखादा रेडा अथवा बकरा बलि दिला जात असे.

भारतातील म्हैसूर, बडोदे ह्यांच्यासारख्या माजी संस्थानांत विजयादशमीच्या दिवशी दरबार भरत असत आणि मौल्यवान अलंकार घालून सजविलेल्या हत्तीघोड्यांसह मोठमोठ्या मिरवणुकी राजधानीच्या शहरांतून फिरविण्यात येत असत. प्राचीन आणि मध्ययुगीन काळात राजे लोक घोडे, हत्ती आणि सैनिक ह्यांचा आणि आपल्या स्वतःचा नीराजन विधी करीत असत (रघु. ४·२४।२५), (बृहत्संहिता अ. ४४).

उत्तरभारतातील काही गावात रामलीलेचा उत्सव दहा दिवसपर्यंत चालत राहतो आणि त्याची समाप्ती आश्विन शुद्ध दशमीच्या दिवशी कागद आणि बांबू ह्यांच्या पोकळ सांगाड्यांत दारुकामाचे फटाके घालून तयार केलेल्या रावण आणि त्याच्या सहकाऱ्यांच्या प्रतिमा जाळून करण्यात येते. दसरा अथवा विजयादशमीशी संबंध असलेल्या दुसऱ्या अनेक स्थानिक चालीरीती असतात. उदाहरणार्थ, ह्या दिवशी युद्धात वापरावयाच्या शस्त्रांची आणि आपआपल्या व्यवसायात आणि धंद्यांत लागणाऱ्या आउतांची पूजा करण्यात येते.

दसऱ्याच्या सणाची उत्पत्ती कशी झाली ह्याविषयी अनेक तर्क करण्यात आले आहेत. ह्या दिवशी काही ठिकाणी देवांना धान्याची कणसे वाहण्याची आणि आपआपल्या घराच्या दारावर अडकवून ठेवण्याची चाल आहे आणि त्यावरून काहींच्या मते हा सण कमी अधिक प्रमाणात शेतीसंबंधी आहे. ह्या सुमारास पाऊस थांबतो, धान्याची पिके तयार होतात आणि हे दिवस शत्रूवर स्वारी करण्यास सोईचे असतात आणि ह्या कारणाने काहींच्या मते ह्या उत्सवाची उत्पत्ती युद्धविषयक गरजेवरून झाली असावी. ही दुसरी उपपत्ती प्रस्तुत ग्रंथकाराला ग्राह्य वाटते. कारण भारताखेरीज इतर प्राचीन देशांत राजांनी युद्धाला जाण्याचा एक निश्चित काळ असे, असे दिसून येते (बायबल सॅम्युएल ११-१). शमीपूजनाचा प्रघात फार प्राचीन काळचा आहे. शमी हे शक्ती आणि पराक्रम ह्यांचें चिन्ह समजले जात असे. शमीचे लाकूड अत्यंत कठीण असल्यामुळे त्याच्या खांद्यांचा उपयोग वैदिक यज्ञांतील मंथन करून अग्नि उत्पन्न करण्याकरिता केला जात असे. अथर्ववेद (७-११-१), तै. ब्रा. (१·२·१·१६) आणि तै. आरण्यक (६·९·२) ह्यांत शमीचा उल्लेख आला आहे. नवरात्राशीदेखील दसऱ्याचा काही संबंध होता कारण नवरात्राचा उत्सव देवीने महिषासुरावर मिळविलेल्या विजयानिमित्तच करण्यात येतो. दसरा हा शब्द दश म्हणजे दहा आणि अहन् म्हणजे दिवस ह्या दोन शब्दांपासून बनलेला आहे.

**दिवाळी**. दिवे लावण्याचा, दिव्यांची आरास करण्याचा आणि दारुकाम उडविण्याचा हा सण सर्व सणांत अत्यंत आनंददायक असतो आणि तो सर्व भारतभर सर्वत्र मोठ्या प्रमाणावर साजरा करण्यात येतो. तथापि, ह्या सणात करण्यात येणाऱ्या कार्यक्रमांचा तपशील आणि त्यांची संख्या हे प्रकार निरनिराळ्या

काळी आणि निरनिराळ्या प्रांतात भिन्न भिन्न होते आणि सांप्रत काळीही भिन्नभिन्न आहेत. हा सण कोणत्याही एका देवाच्या अथवा देवीच्या प्रीत्यर्थ नसतो. तो चार अथवा पांच दिवसपर्यंत चालतो आणि त्यांत अनेक स्वतंत्र कृत्यांचा समावेश होतो. वास्तविक दिवाळी अशी संज्ञा असलेले तीनच दिवस असतात. ह्या सणाला निरनिराळ्या ग्रंथांत निरनिराळी नावे दिली आहेत. दीपालिका (भविष्योत्तर अ. १४०), सुखरात्री (राजमार्तंड पा. ३२९), यक्षरात्री (कामसूत्र), सुखसूप्तिका (हेमाद्रि-व्रत खंड २ पा. ३४८।३४९), कौमुदी उत्सव (निर्णय सिंधु आणि काल तत्त्व विवेचन पा. ३१५).

दीपावलीचा सण सामान्यतः पांच दिवसपर्यंत चालतो आणि त्यांत करावयाची मुख्य कृत्ये पुढीलप्रमाणे असतात : **आश्विनकृष्ण** १३ = धनाचीपूजा, **आश्विनकृष्ण** १४ = कृष्णाच्या नरकासुरावरील विजयाबद्दलचा उत्सव, **आश्विन अमावास्या** = लक्ष्मीपूजा, **कार्तिक शुक्ल** १ = विष्णूने बलीवर मिळविलेल्या विजयाबद्दलचा उत्सव, **कार्तिक शुक्ल** २ = बंधु भगिनी यांच्या प्रेमाची देवघेव. ह्या पांचहि दिवसात बहुतेक प्रतिदिवशी दिव्यांची आरास करण्यात येते आणि फटाके उडविण्यात येतात.

**आश्विन कृष्ण १३**. ह्या दिवसाला गुजरात आणि सौराष्ट्र प्रांतात 'धनतेरस' म्हणतात. ह्या दिवसापूर्वी घरांची साफसुफी करून आणि रंग देऊन ती शृंगारण्यात येतात, धातूची भांडी घासण्यात येतांत, आणि दिव्यांच्या आरासाला प्रारंभ होतो. ह्या दिवशी अपमृत्यूचा विनाश करण्याकरिता आणि यमाच्या सत्काराकरिता दिवे लावावे असे पद्मपुराणात (६·१२४·४-५) सांगितले आहे.

भविष्योत्तर पुराणात (अ. १४०) आश्विन कृष्ण चतुर्दशीपासून चार दिवस चालणाऱ्या दिवाळीच्या सणाचे सविस्तर वर्णन केले आहे. त्यातील प्रमुख कार्यक्रम पुढीलप्रमाणे आहे :

**नरकचतुंर्दशी**. ह्या दिवशी नरकाचे भय वाटणाऱ्या लोकांनी सूर्योदयाच्या वेळी तैलाभ्यंग स्नान करावे; अपामार्ग वृक्षाची पाने, नांगरलेल्या शेतातील मातीची ढेकळे आणि पानांचे काटे आपल्या मस्तकावर फेकावेत. नंतर यमाला उद्देशून तिळमिश्रित पाण्याने तर्पण करावे. नरकाचे निवारण व्हावे म्हणून एक दिवा लावावा आणि संध्याकाळी निरनिराळ्या देवालयात, मठात, शस्त्रगृहात, वृक्षांच्या पारावर, सभागृहात आणि अशाच इतर स्थानी दिव्यांची मनोहर आरास करावी. अशी कल्पना असे की दीपावलीतील चतुर्दशीच्या दिवशी लक्ष्मी तेलांत आणि गंगा सर्व उदकामध्ये वास करण्याकरिता येतात आणि जो कोणी त्या दिवशी तैलाभ्यंग स्नान करील त्याला यमलोकाचे दर्शन होत नाही. सांप्रतकाळी महाराष्ट्रातील लोक चतुर्दशीला स्नान केल्यानंतर कारीत (चिरांटा) नावाचे एक कडू फळ पायाखाली चिरडतात. हे फल बहुधा नरकासुराचे प्रतीक मानले असावे. तैलाभ्यंग स्नान अरुणोदयाच्या सुमारास करावयाचे असते. परंतु तसे करण्यास साधले नाही तर सूर्योदयानंतर देखील स्नान केल्यास चालते. ह्या दिवशी संन्याशांनी देखील तैलाभ्यंग करावे असे धर्मसिंधूमध्ये सांगितले आहे. प्रारंभी नरकाच्या भीतीने यमाला ह्या दिवशी संतुष्ट करावयाचे असल्यामुळे ह्या चतुर्दशीला नरकचतुर्दशी म्हणत असण्याचा संभव आहे. परंतु पुढे कृष्णाने नरकासुराचा वध केल्याच्या कथेचा उपयोग करण्यात आला. हा नरकासुर कामरूप देशातील प्राग्ज्योतिषपुर नगराचा राजा होता आणि विष्णूच्या वराह अवतारात विष्णूचा पृथ्वीशी संयोग होऊन त्याचा जन्म झाला होता अशी कथा आहे. सांप्रतकाळी लोकांना नरकासुराचे स्मरण होते परंतु यमतर्पण बहुधा कोणीच करीत नाही. ह्या राजाने देव, सिद्ध आणि राजे ह्यांच्या १६१०० कन्या पकडून नेऊन त्यांना आपल्या राजवाड्यात कोंडून ठेवल्या होत्या. कृष्णानें नरकासुराचा वध केला आणि त्याने त्या सर्व दुर्दैवी कन्यांबरोबर विवाह करून त्यांना उच्च दर्जा मिळवून दिला. (विष्णुपुराण ५·२९ आणि भागवत १० उत्तरार्ध

अ. ५८). पुराणांतील वर्णने ऐतिहासिक स्वरूपाची आहेत असे मानल्यास कृष्णाने हे कृत्य अत्यंत करुणेने प्रेरित होऊनच केले होते.

वर्षक्रियाकौमुदी (पा ४७०।४७१) आणि धर्मसिंधु (पा. १०४।१०६) ह्यांच्या सारख्या कांही ग्रंथांत असे सांगितले आहे की आश्विन कृष्ण १४ आणि अमावास्या ह्या दोन दिवशी संध्याकाळी हातात पेटलेल्या मशाली घेऊन यम लोकांतून महालयाकरिता पृथ्वीवर आलेल्या आपल्या मृत पूर्वजांना त्याचा मार्ग सापडो आणि ते आपआपल्या लोकी जाऊन पोहचोत अशी प्रार्थना करावी.

मध्ययुगीन काळात झालेल्या ग्रंथांत ह्या चतुर्दशीला पुढील कृत्ये करावी असे सांगितले आहे :— तैलाभ्यंग स्नान, यमाचे तर्पण, नरकाकरिता एक दिवा लावणे, रात्री दिव्यांची आरास करणे, मशाली हातात धारण करणे, शिवाची पूजा, महारात्रीची पूजा, नक्त म्हणजे फक्त रात्री भोजन करणे. ह्यापैकी सांप्रतकाळी सामान्यतः अभ्यंग स्नान, नरकाकरिता दिवा लावणे आणि रात्री दिव्यांची आरास करणे एवढ्याच गोष्टी करण्यात येतात आणि बाकीच्या गाळण्यात येतात. स्नान केल्यानंतर लोक नवीन वस्त्रे आणि अलंकार धारण करितात आणि पक्वान्नांसारख्या पदार्थांचा अल्पाहार करितात आणि माध्याह्नकाळी पोटभर भोजन करितात. कृत्यतत्त्व ह्या ग्रंथात (पा. ४५०) नरकचतुर्दशीला **भूतचतुर्दशी** असेही म्हटले आहे. नरक चतुर्दशी, अमावास्या आणि कार्तिक शुक्ल प्रतिपदा ह्या तीनही दिवशी प्रातःकाळी धन आणि ऐश्वर्य ह्याची इच्छा असणाऱ्याने तैलाभ्यंग स्नान करावे असे शास्त्रात सांगितले आहे.

**आश्विन कृष्ण अमावास्या**. हा फार महत्वाचा दिवस असतो. ह्या दिवशी प्रातःकाळी अभ्यंग स्नान करावे आणि अलक्ष्मी (म्हणजे अवदशा, दारिद्र्य) दूर होण्याकरिता लक्ष्मीची पूजा करावी. स्त्रियांनी पुरुषांना ओवाळावे असेही काही ग्रंथांत सांगितले आहे. भविष्योत्तर पुराणात (अ. १४०) ह्या दिवसाचा कार्यक्रम फार विस्तृत प्रमाणावर वर्णन केला आहे. त्यातील काही महत्वाच्या गोष्टी पुढीलप्रमाणे आहेत :— त्या दिवशी राजाने आपल्या राजधानीमध्ये 'आज बलीचे राज्य आहे' अशी घोषणा करावी; लोकांनीही आपआपल्या घरी नृत्यगायनादि प्रकार करावे; मध्यरात्र उलटून गेल्यानंतर आणि लोकांना झोप येऊ लागली म्हणजे नगरातील स्त्रियांनी सुपे आणि ढोल वाजवून मोठा आवाज करावा आणि आपआपल्या अंगणातून अलक्ष्मीला हाकलून द्यावे; सायंकाळी लक्ष्मीची पूजा करावी आणि देवालये, चवाठे, स्मशानभूमि इत्यादि ठिकाणी दिव्यांची आरास करावी; ब्राह्मणांना आणि भुकेलेल्या लोकांना भोजन घालावे.

बंगाल प्रांतात ह्या दिवशी कालीची पूजा करण्यात येते आणि ती लक्ष्मी आणि सरस्वती अशा दोन्ही असल्याचे मानले जाते.

सांप्रतकाळी हा दिवस मुख्यत्वेकरून दुकानदार आणि व्यापारी ह्यांच्याकरिता असतो. ते त्या दिवशी आपल्या जमाखर्चाच्या चोपड्यांची पूजा करितात आणि मित्रमंडळींना, गिऱ्हाइकांना आणि दुसऱ्या व्यापाऱ्यांना आमंत्रण करून त्यांना मिठाई, विडे देऊन त्यांचा सत्कार करितात, हिशोबाची जुनी खाती बंद करण्यात येतात आणि नविन खाती उघडण्यात येतात. अशी एक आख्यायिका प्रचलित आहे की ब्रह्मदेवाने ब्राह्मणांना रक्षाबंधन (श्रावण पोर्णिमा) हा त्यांचा सण म्हणून दिला, क्षत्रियांना दसरा हा सण दिला, व्यापाऱ्यांना दिवाळीचा सण दिला आणि शूद्रांना होळीचा सण दिला. लक्ष्मीची पूजा ज्या रात्री होते तिला **सुखरात्री** असे म्हणतात कारण जेव्हा सूर्य तूळ राशीत असतो तेव्हा लक्ष्मी जागृत होते. काही ग्रंथांत असे सांगितले आहे की ह्या सुखरात्रीला लक्ष्मीचीच केवळ पूजा करावयाची नसून कुबेराची देखील पूजा करावी.

(भविष्यपुराण, वर्षक्रियाकौमुदी पा. ४६९).

**कार्तिक शुक्ल प्रतिपदा**. हा दिवस वर्षातील अत्यंत शुभ अशा तीन दिवसापैकी एक असल्याचे मानतात. दीपावलीतील ज्या दिवशी स्वाती नक्षत्र असते तो दिवस अत्यंत प्रशस्त असतो असे धर्मसिंधूमध्ये (पा. १०६) म्हटले आहे. कार्तिक शुक्ल प्रतिपदा पुष्कळ वेळा स्वाति नक्षत्राने युक्त असते. ह्यादिवशी देखील तैलाभ्यंग स्नान आवश्यक असते.

ह्या तिथीला करावयाचे सर्वांत महत्वाचे कृत्य **बलीची पूजा** हे असते. ह्या दिवशी बलीला उद्देशून जी लहान मोठी दाने दिली जातात ती अक्षय्य होतात आणि विष्णूला संतोष देतात असे भविष्योत्तर पुराणात (१४०·५७) सांगितले आहे. बलीच्या पूजेचा विहित काल रात्र हा असतो. बलीची कथा वामन पुराण (अ. ७७ आणि ९२), मत्स्य (अ. २४५।२४६), कूर्म (अ. १—१७) इत्यादि पुराणांत वर्णन केली आहे. ही कथा प्राचीन काळची आहे. पाणिनि (३·१·२६) ह्या सूत्रावरील महाभाष्यात बलीला वामनाने पाताळात टाकल्याच्या कथेचा आणि त्या कथेच्या आधारावर केलेल्या नाटकांचा उल्लेख केला आहे. ह्यावरून असे निश्चित ठरते की बलीची कथा दोन हजार वर्षापूर्वी नाटकात आणि काव्यात ग्रथित केली गेली होती.

बलिप्रतिपदेला वामनपुराणात (हे. काल पा. ६१७) **वीर प्रतिपदा** असे नाव दिले आहे. तिला द्यूतप्रतिपदा असेही म्हणतात (कृत्यतत्त्व पा. ४५१). पुराणात (नि. सिं. पा. २०२) असे वर्णन केले आहे की ह्यादिवशी शंकर पार्वती यानी द्यूत खेळले होते आणि त्यात शंकराचा पराजय झाला होता. ह्याकरिता ह्या दिवशी प्रातःकाळी पुरुषांनी पण लावून द्यूत खेळावे आणि ज्या कोणाचा त्या द्यूतांत जय होईल त्याला नंतरचे वर्ष लाभदायक होईल परंतु ज्याचा द्यूतात पराजय होईल तो त्या वर्षी आपल्या संपत्तीला मुकेल. भारतांत अनेक प्रांतात ह्या दिवशी लोक जुगार खेळतात. नेपाळसारख्या लहान देशांत देखील बलिप्रतिपदेच्या दिवशी लावलेल्या पणांची एकूण रक्कम इ. स. १९५५ मध्ये तीस लक्ष रुपये झाली होती असे म्हणतात.

ह्या दिवशी सुद्धा दिव्यांची आरास करावी. बलीच्या राज्याच्या दिवशी दिवे लावल्याने लक्ष्मी स्थिर होते. (धर्मसिंधु पा. १०६). ह्यादिवशी करावयाच्या कृत्यांची जी विस्तृत यादी धर्मसिंधूमध्ये (पा. १०६) दिली आहे त्यात बलीची पूजा, दिव्यांची आरास, गाई बैलांचा सण आणि पूजा, गोवर्धनाची पूजा, मार्ग पालीबंधन (म्हणजे रस्त्यांचे रक्षण करणाऱ्या देवतेचे बंधन), नूतन वस्त्रे धारण करणे, द्यूत खेळणे, पुरुषांना सुवासिनी स्त्रियांनी दिवे ओवाळणे आणि शुभसूचक माला टांगणे ह्यांचा समावेश केला आहे. सांप्रतकाळी ह्या कृत्यांपैकी बलिपूजा, दिव्यांची आरास आणि द्यूत खेळणे ही तीन कृत्येच फक्त करण्यात येतात आणि बाकीची कृत्ये बहुधा कोठेही करण्यात येत नाहीत. गोवर्धन पूजेच्या बाबतीत जे लोक मथुरेच्या जवळपास अथवा गोवर्धन टेकडीजवळ राहत नसतील त्यानी शेणाचा अथवा शिंजविलेल्या अन्नाच्या राशीचा एक गोवर्धन करावा अथवा गोवर्धनाचे चित्र काढावे आणि कृष्णासह त्याची पूजा करावी असे पुराणात सांगितले आहे. गोवर्धन पूजेला पद्मपुराणात **अन्नकूट** असे म्हटले आहे. वराहपुराणातही (अ. १६४) गोवर्धन आणि अन्नकूट ह्यांचे वर्णन केले आहे.

मार्गपालीबंधनाच्या विधीमध्ये कुश अथवा काश गवतांचा एक दोर तयार करून त्याची पूजा करावी आणि त्या दोराच्या एका बाजूला राजपुत्र आणि दुसऱ्या बाजूला इतर कनिष्ठ दर्जाचे लोक ह्यांनी धरून रस्सीखेचीचा खेळ खेळावा असे सांगितले आहे. (नि. सिं. पा. २०२)

आश्विन कृष्ण चतुर्दशीपासून कार्तिक शुक्ल प्रतिपदेपर्यंतच्या तीन दिवसांना **कौमुदीमहोत्सव** म्हणतात. कु म्हणजे पृथ्वी आणि मुद म्हणजे आनंदित होणे. ज्यात पृथ्वीवरील लोकांना आनंद मिळतो तो सण अशी कौमुदी शब्दाची व्युत्पत्ती भविष्योत्तर पुराण (१४०·६१—६४) ह्यात दिली आहे. ह्या सणात कुमुदे (म्हणजे पाण्यातील कमळे) बलीला अर्पण करण्यात येतात म्हणून ह्या सणाला कौमुदी महोत्सव म्हणतात अशी दुसरी एक उपपत्ती त्याच पुराणात दिली आहे.

वेदकाळात आणि त्यानंतर अनेक शतके आश्विन महिन्यात अथवा शरद ऋतूमध्ये **अश्वयुजी** आणि **आग्रायण** अथवा **नवसस्येष्टि** ह्यांच्यासारखे काही विधि करण्यात येत असत. अश्वयुजी हा गौतम ध. सू. (८-१९) मध्ये वर्णन केलेल्या सात पाकयज्ञांपैकी एक असून तो आश्विन शुद्ध पौर्णिमेला करण्यात येत असे.

**भ्रातृद्वितीया** अथवा **यमद्वितीया**. कार्तिक शुक्ल द्वितीयेला हा अत्यंत सुंदर सण येतो. भविष्योत्तर पुराणात (१४-१८-२३) असे सांगितले आहे की ह्या दिवशी यमाला त्याची भगिनी यमुना हिने आपल्या घरी भोजन घातले होते म्हणून त्या दिवसाला यम द्वितीया असे नाव पडले. ह्यादिवशी शाहाण्या लोकांनी दुपारचे भोजन स्वतःच्या घरी न करिता भगिनीने प्रेमाने दिलेले अन्न स्वीकारावे. असे केल्याने आरोग्य आणि ऐश्वर्य ह्यांची वृद्धि होते. भगिनीला वस्त्र आणि अलंकार ह्यांच्या देणग्या द्याव्यात, ज्या कोणाला भगिनी नसेल त्याने चुलत भगिनी, आतेबहीण अशासारख्या एखाद्या भगिनीचा अथवा एखाद्या स्नेह्याच्या भगिनीचा सत्कार करावा. व्रतराजासारख्या (पा. ७८-९१) निबंध ग्रंथात ह्या विधीचा मोठा विस्तृत कार्यक्रम दिला आहे. सांप्रतकाळीं यमुना नदीच्या तीरावर अथवा तिच्याजवळ राहणारे लोक यमुना नदीत स्नान करितात आणि त्या दिवशी त्या नदीवर एक मेळा (जत्रा) भरतो. इतर ठिकाणी भाऊ बहिणीला भेटावयास जातो, तेथे भोजन करितो, त्याच्या समोर बहीण दिवा ओवाळते आणि भाऊ तिला काही तरी देणगी देतो; एवढ्याच गोष्टी सामान्यतः केल्या जातात.

भ्रातृद्वितीयेचा सण वास्तविकपणे स्वतंत्र आहे. परंतु दिवाळीचे आनंदाचे दिवस वाढविण्याकरिता तो सण दिवाळीच्या तीन दिवसांना जोडण्यात आला असावा. भगिनींचे विवाह होऊन त्या आपआपल्या सासरी गेल्या म्हणजे त्यांची आणि भ्रात्यांची भेट अनेक वर्षे देखील न होण्याचा संभव असतो. प्राचीन ग्रंथकारांनी भ्राते आणि भगिनी ह्यांना ह्या सणाच्याद्वारा वर्षाकाठी एक दिवस भेटीचा ठरवून देऊन त्यांच्या निरागस प्रेमसंबंधाबद्दल अतिशय गुणग्राहकता दाखविली आहे आणि ऋ (१०—१०) ह्या सूत्रामध्ये उलेख केलेल्या यम आणि यमी ह्या पौराणिक व्यक्तींचा त्या सणाशी संबंध जोडून त्याला थोडेसे धार्मिक स्वरूप दिले आहे. पद्मपुराणात असे सांगितले आहे की जे पुरुष आपल्या विवाहित भगिनींना वस्त्रादिक देणग्या देऊन संतुष्ट करितात ते एक वर्षपर्यंत कलहापासून आणि शत्रुभयापासून मुक्त होतात. भगिनीने तयार केलेल्या अन्नाचे भोजन करणाऱ्याला संपत्ती आणि उत्कृष्ट अन्नांची प्राप्ती होते असेही भविष्योत्तर आणि पद्मपुराणात सांगितले आहे.

ऋ. (१०-१०) ह्या सूक्तामध्ये जो यम आणि यमी ह्यांचा संवाद आला आहे त्यावरून काही पाश्चात्य विद्वानांनी असे अनुमान काढले आहे की प्राचीन आर्य लोकांत भाऊ आणि बहिणी ह्यांचा विवाह करण्याची प्रथा होती. प्रस्तुत ग्रंथकार ह्या अनुमानाचा तीव्र निषेध करितो. ऋग्वेदातील त्या कवीने असे स्पष्ट केले आहे की भविष्य काळात त्या सूक्तात वर्णन केल्यासारखे प्रकार (म्हणजे भगिनी भगिनीना न शोभण्यासारखी कृत्ये करण्याचा) संभव आहे. ह्या विद्वानांनी त्यांच्या तथाकथित संशोधनांच्या योगाने जितके कूट प्रश्न

सोडविले आहेत असे म्हणता येईल त्यांच्यापेक्षा ते विद्वान अधिक कूट प्रश्न कधीकधी निर्माण करितात.

वेदकाळात आणि मनु (२·११) आणि याज्ञ (१·५३) ह्यांच्या सारख्या स्मृतींच्या काळात भ्रातृहीन कुमारिकेचा विवाह होणे कठीण जात असे. तथापि भ्रातृ द्वितीयेच्या सणाची उत्पत्ती त्या कल्पनेपासून अथवा त्या रूढीपासून झाली असे म्हणणे फार दूरान्वय केल्यासारखे होईल.

# प्रकरण ११

## मकर संक्रांति आणि महाशिवरात्रि

(मू. ग्रं. पा. २११—२३६)

**मकर संक्रांति**. हे एक मोठे धार्मिक व्रत आणि सण आहे. संक्रांति ह्याचा अर्थ सूर्याचे एका राशीतून तिच्या पुढच्या राशीत होणारे (प्रत्यक्ष दिसणारे) गमन. एखाद्या संक्रांतीमध्ये सूर्य ज्या राशीत प्रवेश करतो त्या राशीचे नाव त्या संक्रांतीला देण्यात येते. जरी एखाद्या वर्षी अधिक महिना असला तरीही एका वर्षात १२ च संक्रांति असतात. संक्रांतीच्या दिवशीं स्नान करणे आणि देवांना आणि पितरांना उद्देशून दाने देणे ह्या महत्त्वाच्या गोष्टी असतात. देवीपुराणात (कालविवेक पा. ३८०) असे सांगितले आहे की जो मनुष्य संक्रांतीच्या पवित्र दिवशी स्नान करणार नाही तो सात जन्म रोगयुक्त आणि दरिद्री होईल. तसेच संक्रांतीच्या दिवशी देवांना आणि पितरांना उद्देशून जी जी दाने देण्यात येतात ती दाने सूर्य पुढील अनेक जन्मांत दान देणाऱ्याला पुन्हा परत देत असतो. संक्रांतीच्या दिवशी तिळमिश्रित पाण्याने स्नान करावे असे मत्स्य पुराणात (अ. ९८) सांगितले आहे. सामर्थ्यानुसार अलंकार, पलंग, सुवर्ण कलश, गाई इत्यादि दाने द्यावीत.

प्राचीन ग्रंथांत एकटया सूर्याच्या एका राशीतून दुसऱ्या राशीत प्रवेश करण्याच्या कालालाच पुण्यकाल मानलेले नसून सर्व ग्रहांचे एखाद्या नक्षत्रात अथवा राशीत प्रवेश होणारे कालही पुण्यकाल मानले आहेत. सूर्य आणि इतर ग्रह ह्यांच्या संक्रांतींचे पुण्यकाल किती असतात ह्याचे वर्णन हेमाद्रीने (काल प्रकरण, पा. ४३७) केले आहे. उदाहरणार्थ, त्याने म्हटले आहे की सूर्याच्या बाबतीत संक्रांतीचा पुण्यकाल संक्रांतीच्या पूर्वी आणि नंतर १६ घटिकापर्यंत असतो; चंद्राच्या बाबतीत संक्रांतीच्या पूर्वी आणि नंतर १ घ. १३ पळेपर्यंत असतो; मंगळाच्या बाबतीत ४ घटिका २. पळ (संक्रांतीच्या पूर्वी आणि नंतर) असतो; इत्यादि. जरी इतर ग्रहांच्या संक्रांती असतात तरी मागाहूनच्या काळांत झालेले ग्रंथकार नुसत्या संक्रांति ह्या शब्दाचा अर्थ सूर्याची संक्राति असाच मानीत असत. (स्मृ. कौ. पा. ५३१)

वर्षातील १२ संक्रांतींचे दोन अयन संक्रांति, दोन विषुव संक्रांति, चार षडशीति अथवा षडशीतिमुख (म्हणजे मिथुन, कन्या, धनु आणि मीन) संक्रांति आणि चार विष्णुपदी अथवा विष्णुपद संक्रांति (म्हणजे वृषभ, सिंह, वृश्चिक आणि कुंभ) असे चार गट केले आहेत. (पंचसिद्धान्तिका ३·२३।२४)

सूर्य एका राशीतून बाहेर पडून पुढच्या राशीत कोणत्या क्षणी प्रवेश करतो तो काळ साध्या मानवी डोळ्यांनी पाहणे अशक्य आहे. ह्याकरिता त्या क्षणाच्या पूर्वी आणि नंतर तीस घटिका ह्या अवधीला संक्रांतीचा काल म्हटला जातो. प्रत्यक्ष प्रवेश काल अत्यंत सूक्ष्म असल्याकारणाने त्या काळामध्ये धर्मशास्त्रात सांगितलेली कृत्ये करणे शक्य नसते. म्हणून त्या काळाच्या जवळपासचा काळ हाच योग्य काळ मानणे अवश्य असते. त्यातही प्रत्यक्ष प्रवेशाच्या अधिक जवळचा काळ अधिक पवित्र असतो. ह्याकरिता संक्रांतीमध्ये तीन, चार, पांच, सात, आट, नऊ अथवा बारा घटिका हा सात प्रकारचा पुण्यतम (सर्वांत पवित्र) काल असतो आणि ह्या कालावधीत खऱ्या पुण्याचा संचय होतो असे सांगितले आहे (हेमा. काल पा. ४०९). ह्या पुण्यकालाची मर्यादा निरनिराळ्या प्रकारच्या संक्रांतींच्या बाबतीत भिन्न असते.

संक्राति ज्या वारावर आली असेल त्या वाराला अनुसरून त्यांचे मंदा मंदाकिनी, ध्वांक्षी, घोरा,

महोदरी, राक्षसी आणि मिश्रित असे सात प्रकार केले आहेत. ह्यांच्या पैकीं निरनिराळ्या प्रकारच्या संक्रांति निरनिराळ्या जातींच्या आणि धंद्यांच्या लोकांना लाभदायक असतात. उदाहरणार्थ, मंदा (म्हणजे गुरुवारी येणारी) संक्रांति ब्राह्मणांना लाभदायक असते, मंदाकिनी (म्हणजे बुधवारी येणारी) संक्रांति क्षत्रियांना लाभदायक असते, इ.. नक्षत्रांचे ध्रुव, मृदु इत्यादि गट केले असून भिन्नभिन्न गटातील नक्षत्रावर येणाऱ्या संक्रांतींना निरनिराळी नावे असतात.

संक्रांति दिवसा अथवा रात्री घडू शकतात. तथापि मकर आणि कर्क ह्यांच्या व्यतिरिक्त इतर संक्रांतींच्या बाबतीत जर त्या रात्री घडून आल्या तर त्यांचा पुण्यकाल दिवसा असतो. ह्या पुण्यकालाबद्दलच्या नियमाला अनेक अपवादही सांगितले आहेत. ह्या पुण्यकालासंबंधीच्या चर्चेची आवश्यकता अशाकरिता असते की स्नान आणि दान ह्या क्रिया जर त्यांचे पूर्ण फल पाहिजे असेल तर त्या क्रिया पुण्य कालातच करणे अवश्य असते.

निरनिराळ्या संक्रांतीच्या वेळी काही विशेष प्रकारची दाने द्यावयास सांगितलेली आहेत. उदाहरणार्थ, हेमाद्रि (काल पा. ४१४।४१९) प्रभृति ग्रंथांत असे सांगितले आहे की मेष संक्रांतीच्या वेळी मेंढ्याचे दान द्याव, वृषभ संक्रांतीच्या वेळी गाय दान द्यावी, मिथुन संक्रांतीच्या वेळी वस्त्रें, अन्न आणि पेयें ह्यांचे दान द्यावे; इ..

मकर संक्रांतीच्या वेळी काही विशिष्ट प्रकारची दाने द्यावयाची असतात. स्कंदपुराणात त्या दिवशी तिलधेनु द्यावयास सांगितले आहे; विष्णुधर्मोतर पुराणात वस्त्र, तीळ, नांगराला जोडावयाच्या बैलांची जोडी ह्यांचे दान करण्यास सांगितले आहे; शिवरहस्यात असा नियम सांगितला आहे की शंकराने गोसव यज्ञ केल्यानंतर सर्व लोकांच्या संतोषाकरिता मकरसंक्रांतीच्या दिवशी तिळाची उत्पत्ती केली असल्यामुळे त्या दिवशी पुरुषांनी तिळमिश्रित पाण्याने स्नान करावे आणि अंगाला तीळ लावावे, देवांना आणि पितरांना उद्देशून तिलयुक्त पाण्याने तर्पण करावे, ब्राह्मणांना तिल दान द्यावे, तिळ भक्षण करावे, तिळांचा होम करावा, तिळाच्या तेलाने भरलेले दिवे शंकराच्या देवालयांत लावावे आणि ब्राह्मणाने तिळतांदुळांनी शिवाची पूजा करावी.

मकरसंक्रांतीप्रीत्यर्थ तीन दिवस अथवा एक दिवस उपवास करावा असे वृद्धवसिष्ठाने सांगितले आहे. तथापि पुत्र असलेल्या गृहस्थाश्रमी पुरुषाने संक्रांतीनिमित्त उपवास करू नये असे आपस्तंबाने म्हटले आहे. (हेमाद्रि. काल. पा. ४१२).

विष्णुधर्मसूत्रासारख्या (७७·१—२) काही ग्रंथांत संक्रांतीच्या दिवशीं श्राद्ध करावे असे सांगितले आहे. अशा श्राद्धात पिण्डदान नसावे असे निर्णयसिंधू मध्ये (पा. ६) म्हटले आहे. स्त्रीसंग, तेल आणि मांस भक्षण करणे ही कृत्ये संक्रातीसारख्या पर्वदिनी वर्ज्य असतात.

आधुनिक काळी मकरसंक्रांति हा धार्मिक स्वरूपाच्या सणापेक्षा अधिकत्वाने सामाजिक स्वरूपाचाच सण असतो. ह्या दिवशी उपवास करण्यात येत नाही आणि जरी पुष्कळवेळा समुद्रांत अथवा प्रयाग येथील गंगेत आणि इतर ठिकाणच्या तीर्थांत लोक स्नान करितात तरी क्वचितच एखादा श्राद्ध करितो. ह्या दिवशी विशेषेकरून महाराष्ट्रांत तिळाला विशेष महत्व दिले जाते आणि साध्या तिळ आणि गुळापासून तिळाचे केलेले आणि केशराचा रंग दिलेले निरनिराळे पदार्थ (हलवा वगैरे) लोक एकमेकांना देतात आणि

'तिळगुळ घ्या आणि गोड बोला' असे. म्हणतात. शातातपाच्या [तिलोद्वर्ती तिलस्नायी शुचिर्नित्यं तिलोदकी।
होता दाता च भोक्ता च षट्तिली नावसीदति ॥

शातातप (कालवि. पा. ३४४).] एका श्लोकामध्ये तिळाचे महत्व असे सांगितले आहे की जो मनुष्य तिळाचा सहा प्रकारांनी (आंगाला चोळणें, तिलमिश्रित पाण्याने स्नान करणे, तिलोदकाने पितरांना तर्पण करणे, तिळांचा अग्नीमध्ये होम करणे, दान देणे आणि भक्षण करणे) उपयोग करितो तो अधोगतीला जात नाही. (का. वि. पा. ३४४)

सांप्रतकाळीं मकरसंक्रांतीच्या दिवशी दाने देण्यात येतात, परंतु ती मुख्यत्वेकरून स्त्रियांकडून दिलीं जातात. स्त्रिया मातीची अथवा पितळेची भांडी, सुपाऱ्यासारख्या पदार्थांनी भरून उपाध्यायाला देतात आणि आपल्या मैत्रिणींना हळदकुंकू, सुपाऱ्या, ऊंस ह्यांच्यासारखे अनेक पदार्थ वाटतात.

दक्षिण भारतांत **पोंगल** नांवचा एक सण असतो आणि तो पश्चिम भारतांत पाळण्यांत येणाऱ्या संक्राती सारखाच असतो. पोंगल हा तमिल वर्षाचा पहिला दिवस असतो आणि तो सण तीन दिवस असतो.

आधुनिक ज्योतिषविषयक कालगणनेप्रमाणे दक्षिणायन २१ डिसेंबरला पुरे होते आणि त्या दिवशी उत्तरायण म्हणजे सूर्याचे प्रत्यक्ष दिसणारे उत्तरेकडे जाणे सुरू होते. तथापि भारतीय लोक प्राचीन पद्धतीने आणि प्राचीन काळच्या पुराव्याच्या आधारावर तयार केलेली पंचांगे वापरतात आणि ते सूर्याचे उत्तरेकडील गमन १४ जानेवारीला होते असे मानतात. अशा रीतीनें विषुवबिंदु मागे पडल्याकारणाने भारतीय लोक खऱ्या मकरसंक्रांतीच्या मागे सुमारे २३ दिवस असतात. ही गोष्ट मध्ययुगीन कालात झालेल्या हेमाद्रीसारख्यांच्या ग्रंथांत देखील मान्य केली होती आणि ह्याकरिता हेमाद्रीने (काल पान ४३६-३७) म्हटले आहे की संक्रांतीच्या (लौकिक व्यवहारातील) दिवसाच्या पूर्वी १२ दिवस खरा पुण्यकाल प्रवृत्त होतो आणि म्हणून संक्रांतीच्या प्रसंगी करावयाची दानासारखी कृत्ये लौकिक संक्रांतिदिनापूर्वी १२ दिवस करावी. (प्रस्तुत ग्रंथकाराच्या बालपणी मकरसंक्रांति त्यावेळी प्रचलित असलेल्या पंचांगानुसार १२ अथवा १३ जानेवारीला येत असे. परंतु आता वर सांगितल्याप्रमाणे विषुवबिन्दु मागे पडल्याकारणाने ती संक्रांति पौष महिन्यात जानेवारीच्या १३ किंवा १४ तारखेला येते).

संक्रांतीचा सण फार प्राचीन काळचा असणे शक्य नाही. सूर्याच्या सहा महिनेपर्यंत दृष्य स्वरूपाच्या उत्तरेकडील गतीचा उल्लेख शत. ब्रा. (२·१·३·१, ३ आणि ४) छां. उप. (४·१५·५ आणि ५·१०·१-२) ह्यांच्यासारख्या ब्राह्मण ग्रंथांत आणि उपनिषदांत ख्रि. पू. किमान १ हजार वर्षांमागच्या काळांत केला आहे. तथापि त्या ग्रंथांत 'उदगयन' हा शब्द स्पष्टपणे योजिलेला नाही. अयन हा शब्द ऋ. ३·३३·७ मध्ये आला आहे परंतु त्याचा धात्वर्थ 'गमन' अथवा 'स्थान' असा आहे. आश्व. गृ. (१·४·१-२) ह्याच्यासारख्या गृह्यसूत्रांत सूर्याचे उत्तरेकडे गमन ह्या अर्थाने 'उदगयन' हा शब्द आला आहे. जैमि. (६·८·२३) ह्या सूत्रात देवांप्रीत्यर्थ करावयाचे विधि उत्तरायणात करावे असा नियम सांगितला आहे. वस्तुस्थिति अशी आहे की प्राचीन काळच्या एकाही श्रौत, गृह्य अथवा धर्मसूत्रांत कोणत्याही राशीचा उल्लेख केलेला नाही, अथवा राशीशीं संबंध असणाऱ्या एखाद्या शुभ अथवा अशुभ योगाबद्दलचा नियम सांगितलेला नाही. उदगयन हा पुण्यकाल असल्याचे अनेक शतकांपासून मानण्यात येत असल्यामुळे ज्या वेळी राशींची योजना अंमलांत आली नव्हती त्यावेळी ज्या दिवसापासून सूर्याचे उत्तरेकडील गमन सुरू होते तो मकरसंक्रांतीचा दिवस स्वाभाविकपणेच फार पवित्र बनला. ह्या संक्रांतीला तिळाला एवढे महत्व का देण्यात आले हे सांगणे कठीण आहे. उदगयनाच्या प्रारंभी थंडी पडत असल्याकारणाने तिळासारखा सुलभतेने मिळणारा स्निग्ध पदार्थ

बहुधा त्या दिवशीच्या कृत्यांकरिता निवडण्यात आला असावा. काही झाले तरी मकरसंक्रांतीचा सण आणि त्या दिवशी करावयाची कृत्ये ह्या गोष्टी ख्रिस्ती शकाच्या आरंभकाळापेक्षा फारशा प्राचीन काळच्या नाहीत.

आधुनिक काळच्या पंचांगामध्ये मकरसंक्रांति ही देवता कल्पून तिच्यासंबंधी अनेक चमत्कारिक प्रकार दिलेले असतात. संक्रांति एखाद्या हत्तीसारख्या वाहनावर बसते आणि तिचे दुसरे एक उपवाहन असते; ती काळे, शुभ्र अथवा दुसऱ्या एखाद्या रंगाचे वस्त्र परिधान करिते, ती ज्या नक्षत्रावर आणि वारावर घडत असेल त्याप्रमाणे तिची दोन नावे असतात; ती कोणत्या तरी दिशेकडून येते आणि कोणत्या तरी दिशेकडे जाते आणि कोणत्या तरी दिशेकडे दृष्टि फेकते अशा कल्पना करण्यात येतात आणि असे भविष्य सांगितलेले असते की ज्या ज्या वस्तूंचा संक्राति स्वीकार करिते त्यांच्या किंमती वाढतील अगर त्यांचा नाश होईल आणि ती ज्या दिशेकडून येत असेल त्या दिशेकडील लोक सुखी होतील आणि ती ज्या दिशेकडे जात असेल त्या दिशेकडील लोक दुःखी होतील.

**महाशिवरात्री :** कोणत्याही महिन्याच्या कृष्णपक्षांतील चतुर्दशी तिथीला **शिवरात्रि** म्हणतात. तथापि माघ (अथवा पूर्णिमान्त मासगणनेप्रमाणे फाल्गुन) महिन्यातील कृष्णपक्षातील चतुर्दशी सर्वात श्रेष्ठ असते आणि पुष्कळ वेळा तिला **महाशिवरात्रि** असे म्हणण्यात येते.

माघ कृष्णचतुर्दशीला येणाऱ्या शिवरात्रीची माहात्म्ये गरुडपुराण (खंड १ अ. १२४). स्कंद (१·१·३३), पद्म (खंड ६ अ. २४०), अग्नि (अ. १९३) यांत दिली आहेत. काही तपशीलात भेद असला तरी ह्या सर्व ग्रंथांत दिलेल्या माहात्म्यातील मुख्य गोष्टी सारख्या आहेत.

ह्या सर्व माहात्म्यांत शिवरात्रिव्रताची अतिशय प्रशंसा केली आहे. त्या दिवशी उपवास करून, बिल्व वृक्षाच्या पानांनी शंकराची पूजा करावी आणि सर्व रात्रभर जागरण करावे म्हणजे शंकर त्या मनुष्याचे नरकापासून रक्षण करितो आणि त्याला सौख्य आणि मोक्ष देतो (तो मनुष्य स्वतःच शिवस्वरूपी होतो). त्या सर्व पुराणांपैकी गरुड पुराणातील कथा सर्वात प्राचीन असल्याचे दिसून येते. त्या कथेत असे वर्णन केले आहे की अबू पर्वतावर सुंदरसेन नावाचा एक निषादांचा राजा होता. तो ह्या शिवरात्रीच्या दिवशी शिकारीला गेला असता त्याला एकही श्वापद मिळाले नाही आणि तो भुकेने आणि तहानेने व्याकुळ होऊन एका तलावाच्या काठी सर्व रात्रभर जागत बसला. तेथे एका बिल्ववृक्षाच्या बुंध्याजवळ एक शिवलिंग होते आणि आपल्यास सुखाने बसता यावे म्हणून त्या निषादराजाने त्या बिल्ववृक्षाची पाने खुडून ती खाली टाकली आणि ती पाने त्याच्या नकळत शिवलिंगाच्या मस्तकावर पडली. धूळ खाली बसावी म्हणून त्याने त्या तलावातील पाणी त्या जागेवर शिंपडले. तेही त्या लिंगावर पडले. त्याचा एक बाण खाली त्या लिंगावर पडला तो त्याने गुडघे टेकून उचलून घेतला. दुसऱ्या दिवशी प्रातःकाळी घरी गेल्यावर त्याने आपल्या पत्नीने वाढलेल्या अन्नाचे भोजन केले. अशा रीतीने त्याच्याकडून, न कळत उपवास, लिंगाची पूजा, रात्रभर जागरण ही कृत्ये घडली आणि त्याने दुसऱ्या दिवशी पारणा केली. ह्या पुण्यसंचयामुळे तो निषादराजा मरण पावल्यानंतर त्याला शंकराच्या दूतांनी यमदूतांच्या हातून सोडविले आणि तो त्याच्या कुत्र्यासह शंकराचा अनुचर (सेवक) झाला. अग्निपुराणांतही सुंदरसेन नांवाच्या व्याधाचा उल्लेख केला आहे. स्कंदपुराणांतील कथा अधिक विस्तृत आहे. त्या कथेत चंड नावाच्या दुष्ट किराताचे वर्णन केले आहे. त्यानेही अशीच अजाणता शिवलिंगाची बिल्वपत्रांनी आणि पाण्याने पूजा केली होती आणि जागरण केले होते. त्याची पत्नीही त्या दिवशी अन्नपाण्यावाचून राहिली होती. म्हणून त्या उभयताना घेऊन यमदूत जात असताना शिवदूत तेथे आले आणि ती दोघे शिवलोकाला गेली. पद्मपुराणांतील कथाही एका निषादाची आहे.

शिवरात्रीच्या व्रतामध्ये प्रमुख बाब कोणती ह्याविषयी मतभेद आहे. तिथीतत्व ह्या ग्रंथांत (पा. १२५) उपोषण ही मुख्य बाव असल्याचे सांगितले आहे. उलटपक्षी हेमाद्रि (काल पा. ३०२), माधवाचार्य (कालनिर्णय पा. २९०।२९१) ह्यांनी उपवास, पूजा आणि जागरण ह्या तिन्ही क्रिया प्रमुख असल्याचे सांगितले आहे. दोनही प्रकारच्या मतांना आधार देणारी पुराणांतील वचने आहेत.

शिवरात्रि हा शब्द पंकज शब्दासारखा योगरूढ शब्द आहे म्हणजे शिवासंबंधी असणारी एक विशिष्ट रात्र असा त्या शब्दाचा अर्थ आहे. हे व्रत नित्य (आवश्यक) आणि काम्य असे दोन्ही प्रकारचे असते. ते न केल्यास पातक लागते असे स्कंदासारख्या पुराणात सांगितले आहे (का. नि. पा. २८८). तसेच हे व्रत प्रतिवर्षी करावे अशी वचने आहेत (स्कंद—का. नि. पा. २८८); आणि ते व्रत केल्याने कोणते फल प्राप्त होते हेही शास्त्रांत सांगितले आहे. (का. नि. पा. २९०).

हे व्रत स्त्रियांसहित सर्व मनुष्यांना करिता येते असे ईशानसंहितेमध्ये (कृत्यतत्त्व पा. ४६१) सांगितले आहे आणि जर कोणी शिवाचा अथवा दुसऱ्या कोणत्या देवतेचा भक्त ते व्रत टाकून देईल तर त्याने केलेल्या (त्या त्या देवतेच्या) पूजेचे सर्व फल नष्ट होते असेही त्या ग्रंथात म्हटले आहे. हे व्रत करणाराने अहिंसा, सत्य, अस्तेय इत्यादि गुणांचे पालन केले पाहिजे; ह्या व्रताचे ज्ञान गुरूपदेशाप्रमाणे चालणाऱ्यालाच सांगावे, अन्य कोणाला सांगितल्यास सांगणारा नरकाला जातो असे सांगितले आहे. (का. वि. पा. २९०).

ह्या व्रताचा विहितकाल रात्र असतो. स्कंदपुराणांत सांगितले आहे की निशीथ युक्त (म्हणजे रात्री) असणाऱ्या कृष्णपक्षातील चतुर्दशीला उपवास करावा. कारण ती तिथि शिवसायुज्यतेला नेते (स्कंद १-१·३३·८२). ह्याविषयी इतर ग्रंथात परस्परविरोधी मते दिली आहेत.

शिवरात्रिव्रत प्राचीन काळी कोणत्या प्रकाराने करण्यात येत असे ह्याचे वर्णन गरुड पुराणात (१·१२४·११-२३) दिले आहे. व्रत करणारा त्रयोदशीच्या दिवशी शिवाची पूजा करून काही विशिष्ट निर्बंध पालन करण्याचा निश्चय करतो, चतुर्दशीच्या दिवशी एखाद्या आचार्याजवळ जातो, लिंगाला पंचगव्य अथवा पंचामृत ह्याने स्नान घालतो आणि पूजा करितो, तिळ तांदुळ आणि तूप मिश्रित शिजलेला भात ह्यांच्या अग्नीमध्ये आहुती देतो, कथा श्रवण करतो; अशीच पूजा पुन्हा मध्य रात्री, तीन प्रहरानंतर आणि चौथा प्रहर झाल्यानंतर करतो, नंतर पातकांबदल क्षमा करण्याबद्दल शंकराची प्रार्थना करितो; पारणेच्या दिवशी शंकराच्या ध्यानात तत्पर असणाऱ्या व्यक्तींना भोजन घालतो, वस्त्रे, छत्री, दिवे इत्यादि पदार्थ दान देतो. असे हे व्रत १२ वर्षेपर्यंत चालवावयाचे असते. दुसऱ्या काही ग्रंथात अधिक तपशील दिले आहेत. (तिथितत्त्व पा. १२७ पहा).

जर कोणी शिवरात्रिव्रत २४ अथवा १४ अथवा १२ वर्षेपर्यंत करण्याचा संकल्प केला असेल तर ती मुदत पुरी झाल्यानंतर त्याला त्या व्रताचे उद्यापन करावे लागते.

आधुनिक काळी धर्मसिंधुप्रभृति ग्रंथांत सांगितलेला कार्यक्रम फारच थोडे लोक अनुसरतात. उपवास करण्यात येतो, शंकराची पूजा करण्यात येते आणि शंकराच्या कथा श्रवण करण्यात येतात. काही प्रांतांतील लोक भांग नावाचे एक पेय तयार करून ते पितात आणि ते पेय शंकराला फार प्रिय असते असे मानतात. पुष्कळ शिवमंदिरात शंकराच्या लिंगावर पाण्याची संतत धार धरण्यात येते.

व्रतराज ह्या ग्रंथात (पा ५७३—५८६) उद्धृत केलेल्या लिंगपुराणातील अवतरणात एक मृगी, तिची सखी आणि अर्भके ह्यांचा वध करण्यास प्रवृत्त झालेल्या एका शिकाऱ्याची (निषादाची) कथा दिली असून ती सर्वजण शेवटी मृगशीर्ष नक्षत्राचे आणि त्याच्या मागोमाग असणाऱ्या व्याधाच्या ताऱ्याचे रूप पावल्याचे वर्णन केले आहे.

हेमाद्रि (व्रतप्रकरण खंड २ पा. ७१—८७) ह्यात दुसऱ्या शिवरात्रिव्रतांचे वर्णन केले असून ती व्रते स्कंदपुराणात (१·१·३३) सांगितलेल्या तसेच हेमाद्रि (व्रतखंड २ पा. ८७—९२, ११४—१२२, १२२—१३०) ह्यांत सांगितलेल्या व्रतांपेक्षा भिन्न आहेत.

# प्रकरण १२

## होलिका आणि ग्रहण

(मू. ग्रं. पा. २३७—२५०)

**होलिका** अथवा **होळी** हा सण सर्व भारतभर निरनिराळ्या स्वरूपाने साजरा करण्यात येतो. हा सण निर्भेळ मौज करण्याचा आणि खेळ खेळण्याचा आहे. त्या सणातील 'होळी पेटविणे' हा प्रकार बंगालखेरीज बहुतेक सर्व प्रांतात अस्तित्वात आहे. बंगाल प्रांतात फाल्गुन पौर्णिमेला **दोलायात्रा** नावाचा विधि करण्यात येतो. त्या दिवशी कृष्णाच्या मूर्तीला झोपाळ्यावर बसवून त्याला झोके देण्यात येतात. परंतु हा प्रकार भारतातील इतर अनेक भागांत करण्यात येत नाही. ह्या सणाच्या अवधीसंबंधीही प्रांताप्रांतात भेद आढळून येतो. भारतातील अनेक भागात ह्या सणात रंगीत पाणी पिचकारीने आपल्या मित्रांच्या अंगावर उडविण्यात येते अथवा रंगाच्या (गुलालासारख्या) पुडी एकमेकांच्या अंगावर उडविण्यात येतात आणि करमणुकीच्या प्रकारात सांप्रतकाळीदेखील समाजातील उच्च वर्गातील लोक देखील भाग घेतात. कोकणासारख्या काही प्रांतात पुरुष स्त्रियांची सोंगे घेऊन अनेक साथीदारांसह शृंगारिक गाणी गात, आणि वाद्ये वाजवीत आणि नृत्य करीत चोहोकडे फिरतात. ह्या सणातील फक्त एकच असणारा धार्मिक भाग म्हणजे बंगाल प्रांतात प्रचलित असलेली कृष्णपूजा हा असतो. ज्या प्रांतात होळी पेटविण्याचा प्रघात आहे त्यांपैकी काही ठिकाणी होळी पेटविण्यापूर्वी पुरोहितामार्फत होलिका देवीची पूजा करण्यात येते आणि होळी पेटविल्यावर लोक होळीला प्रदक्षिणा घालतात आणि पेटलेल्या होळीत नारळ फेकतात आणि त्यांतील अर्धवट जळलेले नारळ बाहेर काढतात आणि त्यातील भाजलेले खोबरे तेथे जमलेल्या लोकांना प्रसाद म्हणून वाटतात. कांही प्रांतात तळहाताच्या मागील बाजू तोंडावर आपटून एक तऱ्हेचा आवाज काढतात.

हा सण फार प्राचीन आहे. प्रारंभी ह्या सणाचे नाव 'होलाका' असे होते आणि त्याचा उल्लेख जैमिनीच्या पूर्वमीमांसा सूत्रावरील (१·३·१५—२३) शबरस्वामींच्या भाष्यामध्ये केला आहे आणि त्यावरून हा सण भारतातील पूर्वेकडील प्रांतात फार रूढ होता असे दिसते. काठकगृह्य (७३—१) यामध्ये 'राका होलाके' असे एक सूत्र असून त्या सूत्रावरील टीकाकाराने असा खुलासा केला आहे की होला हा स्त्रियांच्या सौभाग्याकरिता करावयाचा एक विशिष्ट विधि असून त्यांत राका (म्हणजे पौर्णिमा) ही देवता असते. वात्सायनाच्या कामसूत्रात (१·४·४२) निरनिराळ्या प्रांतांत प्रचलित असलेल्या वीस खेळांची वर्णने केली आहेत आणि त्या खेळांत होलका ह्या खेळाचा समावेश केला आहे आणि त्या खेळांत फाल्गुन पौर्णिमेला एखाद्या शिंगातून अथवा त्याच्या सारख्या साधनाने एकमेकांच्या अंगावर रंगित पाणी उडविण्याचा प्रकार असल्याचे म्हटले आहे. हेमाद्रीने (काल पा. १०६) उद्धृत केलेल्या बृहद्‌यमाच्या एका श्लोकांत होलिकापौर्णिमेला 'हुताशनी' असे नांव दिले असून सांप्रत काळी देखील तेच नांव प्रचलित आहे. लिंग पुराणांत (हेमाद्रि-काल-पा.६४२) फाल्गुन पौर्णिमेला 'फाल्गुनिका' असे म्हटले आहे, आणि तो दिवस बालिश चेष्टांनी परिपूर्ण असतो आणि त्यामुळे लोकांची भरभराट होते असे म्हटले आहे. वराहपुराणात (हेमा-काल पा. ६४२) ह्या पूर्णिमेला 'पटवासविलासिनी' (म्हणजे रंगित पुडीच्या खेळांनी युक्त) असे विशेषण लावले आहे. भविष्योत्तर पुराणांत(हेमाद्रिव्रत-खंड २ पा १८४-१९०) कृष्ण युधिष्ठिर संवादात ह्या सणासंबंधी एक कथा दिली आहे. त्या कथेत असे म्हटले आहे की रघु राजा राज्य करीत असताना ढुंढा नांवाची एक राक्षसी मुलांना रात्री आणि दिवसा पीडा करीत असे. तिला मनुष्यापासून, देवांपासून मृत्यु येणार नाही असा ब्रह्मदेवाने वर दिला होता. तिच्या पीडेपासून निवारण करण्याचा रघूच्या पुरोहिताने असा उपाय सांगितला की फाल्गुनी पौर्णिमेच्या दिवशीं हसावे आणि मौज करीत घराच्या बाहेर लाकडांचा ढीग

करून तो पेटवावा, टाळ्या वाजवाव्या, अग्नीच्या सभोवती प्रदक्षिणा घालाव्या, गाणी गावीं, ग्राम्य भाषेतील अश्लील शब्द उच्चारावेत आणि अशा रीतीने केलेल्या आवाजाच्या ध्वनीच्या योगाने आणि पेटविलेल्या होमाच्या योगाने ती राक्षसी मरण पावेल. रघु राजाने त्याप्रमाणे केले आणि ती राक्षसी मरण पावली आणि तो दिवस 'अडाडा' आणि 'होलिका' ह्या नावाने प्रसिद्ध झाला. त्या कथेत पुढे असेही सांगितले आहे की दुसऱ्या दिवशी (म्हणजे पौर्णिमान्त मासगणनेप्रमाणे) चैत्र महिन्यांतील प्रतिपदेच्या दिवशी लोकांनी त्या होळींतील राखाडीला वंदन करावे, कामदेवाची पूजा करावी. त्या व्रताच्या पारणेच्या शेवटी म्हणावयाच्या श्लोकांत असे म्हटले आहे की जेव्हा हिवाळ्याचा ऋतु शुद्ध पौर्णिमेला समाप्त होतो आणि वसंतकाळाला प्रातःकाळी प्रारंभ होतो तेव्हा जो मनुष्य चंदनाच्या गंधासह आंब्याचा मोहोर भक्षण करितो तो सुखांत राहतो.

जैमिनीच्या सूत्रात आणि काठक गुह्यांत ज्या अर्थी होलिकेचा निर्देश केला आहे त्या अर्थी तो सण ख्रि. पू. काही शतके तरी अस्तित्वात असावा असे ठरते. कामसूत्र आणि भविष्योत्तर पुराण ह्यांनी ह्या उत्सवाचा वसंताशी संबंध जोडला आहे आणि तो उत्सव पौर्णिमान्तगणनेप्रमाणे वर्षाच्या अखेरीला करण्यात येत असे म्हणून होळी ही हिवाळ्याचा आणि थंडीचा अंत आणि उद्धार आणि कामोद्दीपक वसंताचे आगमन सुचविते, अश्लील स्वरूपाची गाणी, नाच आणि वाद्यवादन ह्यांची वसंताच्या आगमनामुळे वाटणाऱ्या आनंदाची ह्या उत्सवांत भर पडली. रंगित पाणी आणि रंगाच्या पुडी उडविणे हे वसंताच्यामुळे वाटणारा आनंद प्रदर्शित करणारे आणखी एक कृत्य आहे. रंग उडविण्याचे कृत्य काही प्रांतात होळीच्या दिवशीच करण्यात येते. महाराष्ट्रात ते कृत्य होळीनंतरच्या पाचव्या दिवशी करण्यात येते आणि त्या दिवसाला '**रंगपंचमी**' असे म्हणतात. होलिकोत्सव अनेक प्रांतांत जरी संमिश्र स्वरूपाचा असला आणि तो एकाहून अधिक दिवस चालत असला तरी त्याचे मूळ स्वरूप वसंतोत्सव हेच असते.

बंगाल प्रांतात प्रचलित असलेला दोलयात्रा पांच अथवा तीन दिवस चालतो. शूलपाणीने केलेल्या 'दोलायात्राविवेक' ह्या ग्रंथात दोलयात्रेचे असे विधान सांगितले आहे की फाल्गुनपौर्णिमेच्या अगोदर चतुर्दशीच्या रात्री अग्नीच्या प्रीत्यर्थ एक उत्सव करावा. नंतर गोविंदाची प्रतिमा करून तिची स्थापना एका झोपाळ्यावर करावी आणि तिची पूजा निरनिराळ्या उपचारांनी करावी; तो झोपाळा सात वेळा मागेपुढे हालवावा; पहिल्या दिवशी प्रदीप्त केलेला अग्नि उत्सवाचे दिवस संपेपर्यंत जळत ठेवावा; शेवटी, तो झोपाळा २१ वेळा हालवावा. हा उत्सव द्युमत्सेन राजाने वृंदावनात सुरू केला आणि त्या उत्सवामुळे मनुष्य सर्व पातकांपासून मुक्त होतो अशी कथा सांगितली आहे.

श्री. गुप्ते ह्यानी आपल्या 'हिंदूंचे सण आणि विधि' ह्या ग्रंथात (पा. ९२) होलिकोत्सव इजिप्त आणि ग्रीस देशातून भारतात आणण्यात आला असल्याचे सिद्ध करण्याचा फार प्रयत्न केला आहे. परंतु त्यांची कल्पना अत्यंत विलक्षण स्वरूपाची असून ती गंभीरपणे विचार करण्याच्या योग्यतेची नाही. त्यांना स्वतःला देखील त्या उत्सवाचे मूळ इजिप्तमध्ये आहे किंवा ग्रीसमध्ये आहे ह्याची खात्री नाही असे दिसते.

**ग्रहण** (सूर्यग्रहण आणि चंद्रग्रहण).

ग्रहणांना अत्यंत प्राचीन काळापासून फार महत्त्व देण्यात येत असे आणि त्या विषयावर वेळोवेळीं फार विस्तृत ग्रंथरचनाही होत आली आहे. हेमाद्रि (काल पा. ३७९-३९४), कालविवेक (पा. ५२१-५४३), कृत्यरत्नाकर (पा. ६२५-६३१), कालनिर्णय (पा. ३४६-३५८), धर्मसिंधु (पा. ३२-३५), इत्यादि अनेक ग्रंथांत ह्या विषयाचे विवेचन केले आहे.

सूर्याच्या खग्रास ग्रहणाचा ऋ. (५·४०·५।६।८) आणि शांख्या. ब्रा. (२४-३) ह्यात उल्लेख केला आहे. त्यांत स्वर्भानु नावाचा असुर सुर्यावर अंधकाराच्या योगाने आघात करितो आणि विषुवतापूर्वी तीन दिवस अत्रिऋषि सप्तदशस्तोम यज्ञ करून त्या असुराचा वध करून सूर्याला त्या अंधकारा-पासून मोकळा करितो अशी कल्पना केली आहे. बृहत्संहिता (५·८ आणि १३; ५·१४-१५) ह्या ग्रंथावरून असे दिसून येते की भारतीय ज्योतिषांना वराहमिहिराच्या आधी (म्हणजे इ. स. च्या ६ व्या शतकाच्या पूर्वार्धांच्या पूर्वी) अनेक शतके ग्रहणाचे कारण 'राहु' नसून चंद्रग्रहणात चंद्र पृथ्वीच्या छायेत प्रवेश करितो आणि सूर्यग्रहणात चंद्र सूर्यामध्ये प्रवेश करितो (म्हणजे सूर्य आणि पृथ्वी ह्यांच्या मध्ये येतो) हे ग्रहणाचे खरे कारण असल्याचे माहित होते. ग्रहणाची ही खरी कल्पना माहित असूनही त्याकाळचे (ज्योतिषी नसलेले) सामान्य लोक राहू हे ग्रहणाचे कारण असल्याचे मानित असत आणि ग्रहण हा स्नान, दान, जप, श्राद्ध इत्यादि कृत्ये करण्याचा विशेष काल असल्याचे समजत असत आणि अद्यापि देखील असेच मानले जाते. श्रुती, स्मृति, लौकिक भावना आणि ज्योतिषशास्त्राचे खरे सिद्धान्त ह्यांचा समन्वय करण्याकरिता वराहमिहिराने (बृ. सं. ५-१४-१५) असे म्हटले आहे की कोणा एका असुराला ब्रह्मदेवाने असा वर दिला होता की ग्रहणाच्या वेळी करण्यात येणाऱ्या दानांचा आणि आहुतींचा काही अंश तुला मिळून तू संतुष्ट होशील आणि त्याप्रमाणे तो असुर आपला भाग घेण्याकरिता ग्रहणाच्या वेळी हजर राहतो आणि म्हणून त्या असुराला अलंकारिक रीतीने राहू असे म्हणले जाते. सारासारविवेक, लौकिक प्रघात आणि धर्मसंबंधी भोळ्या समजुती ह्यांचे एकत्र वास्तव्य असणे शक्य नाही.

हेमाद्रि (काल पा. ३८४) वर उद्धृत केलेल्या व्यासाच्या एका श्लोकात असे म्हटले आहे की चंद्रग्रहण हे सामान्य दिवसापेक्षा लक्षपट अधिक पुण्यदायक असते आणि सूर्य ग्रहण हे चंद्रग्रहणाच्या दहापट अधिक पुण्यदायक असते.

एखाद्या मनुष्याने ग्रहण पाहिले म्हणजे त्याचे पहिले कर्तव्य स्नान करणे हे असते. षट्त्रिंशन्मत ह्या ग्रंथात (का. वि. पा. ५३३) सांगितले आहे की चारी वर्णांचे लोक राहुदर्शनाने (म्हणजे ग्रहण पाहिल्याने) अशुचि होतात, त्यानी स्नान करावे आणि नंतर नित्यकर्मे करावी, ग्रहणाच्या पूर्वी शिजविलेले अन्न टाकून द्यावे. ग्रहणाच्या वेळी सर्व ठिकाणची उदके गंगाजलासारखी पुण्यदायक होतात असेही काही ग्रंथात म्हटले आहे. (भुजबल पा. ३४८). त्यातही गंगा, गोदावरी अथवा प्रयाग येथे केलेले स्नान सर्वांत अधिक पुण्यदायक असते. धर्मसिंधु (पा. ३२-३५) मध्ये असे सांगितले आहे की ग्रहणाच्या स्पर्शकाली स्नान, मध्यकाली होम, देवपूजा आणि श्राद्ध ही कृत्ये केली पाहिजेत आणि ग्रहण सुटण्याच्या सुमारास दाने दिली पाहिजेत.

काही विशिष्ट महिन्यात झालेली ग्रहणे अधिक पुण्यदायक असतात आणि विशिष्ट नद्यांत केलेले स्नान अधिक पुण्यदायक असल्याचेही मानले जाते (देवीपुराण कृत्यकल्पतरू-नैयत. पा. ३७०।३७१).

स्नान, दान अथवा जप ही कृत्ये रात्री करू नयेत असा सामान्य नियम (आप. ध. सू. १·११·३२·८) असला तरी ग्रहणकाळ हा त्या नियमाला अपवाद आहे.

सूर्य चंद्राच्या ग्रहणाच्या वेळी एखाद्या सत्पात्र बाह्मणाला दक्षिणापूर्वक भूमिदान द्यावे असे महाभारतात (का. नि. पा. ३५४) सांगितले असून ही शिफारस प्राचीन काळच्या आणि मध्ययुगीन काळच्या

अनेक राजांनी पालन केल्याचे शिलालेखादिकांवरून दिसून येते (इं. ॲटि. खं. ६ पा. ७२-७५, एपि. इं. खं. ३ पा. १-७, एपि. इं. खं. ३ पा. १०३-११० इ.).

सांप्रतकाळी देखील शहरात आणि खेडेगावात कपडे आणि पैसे मागण्याकरिता ग्रहणाच्या वेळी गरीब लोक मोठा गोंगाट करीत हिंडत असतात.

ग्रहणात श्राद्ध करणे पुष्कळ वेळा कठीण जाते. एकतर बहुतेक ग्रहणे खंडग्रास असल्याकारणाने त्यांचा पर्वकाल अल्प असतो, आणि ग्रहणात अन्नग्रहणाचा निषेध असतो. ह्याकरिता ग्रहणात करावयाचे श्राद्ध आमश्राद्ध (कच्चे धान्य देऊन केलेले श्राद्ध) अथवा हेमश्राद्ध (द्रव्य देऊन केलेले श्राद्ध) असावे असा नियम काही स्मृतीत आणि निबंधग्रंथांत सांगितला आहे. ग्रहणांतील श्राद्धात भोजन करणाऱ्या ब्राह्मणाला प्रायश्चित्त करावे लागते. ह्या कारणाने अशा श्राद्धाला चांगला ब्राह्मण मिळणे कठीण असते.

सांप्रतकाळी अतिशय वितंडवादी लोकांव्यतिरिक्त इतर लोक ग्रहणाच्या वेळी स्नान करितात आणि काही दानेही देतात. परंतु ह्या गोष्टींच्या पलिकडे काही करीत नाहीत. ग्रहण हा काळ जपाकरिता आणि दीक्षा घेण्याकरिता आणि विशिष्ट देवतांचे मंत्र सिद्ध करण्याकरिता सर्वांत अधिक योग्य काळ असतो.

ग्रहणाचा पुण्यकाल ग्रहण डोळ्याने दिसत असेल तोपर्यंतच असतो असे काही ग्रंथांचे मत आहे परंतु ह्या बाबतीत बरेच मतवैचित्र्य आढळून येते. समयप्रकाश (पा. १२६) सारख्या ग्रंथांनी असा नियम दिला आहे की जेव्हा एखाद्या मनुष्याला ज्योतिषशास्त्रावरून असे कळून येईल की एखाद्या विशिष्ट देशात आणि एखाद्या विशिष्ट काली डोळ्यांनी ग्रहण दिसू शकेल तेव्हा त्याने त्या विवक्षित काळी (जरी त्याने प्रत्यक्ष ग्रहण पाहिले नसले तरी) स्नानादि कृत्ये करावी.

सूर्यग्रहण रविवारी आणि चंद्रग्रहण सोमवारी आले तर त्यायोगाला **चडामणि** योग म्हणतात आणि त्याचे फल इतर वारी आलेल्या ग्रहणाच्या कोटिपट असते (का. वि. पा. ५२३).

असा एक नियम आहे की चंद्रग्रहणाच्या पूर्वी तीन प्रहर आणि सूर्य ग्रहणाच्या पूर्वी चार प्रहर भोजन करू नये. ह्या अवधीला 'वेध' असे म्हणतात. सांप्रतकाळी हा नियम शहरात राहणारे आणि सुशिक्षित लोक सामान्यतः पाळीत नसले तरी काही काळापूर्वी बहुतेक सर्व वयात आलेले सुशिक्षित आणि अशिक्षित लोक हा नियम काटेकोरपणे पाळीत असत.

सूर्य अथवा चंद्र ग्रहण सुटण्यापूर्वी अस्त पावले तर प्रत्येकाने स्नान करावे आणि दुसऱ्या दिवशी सूर्य आणि चंद्र उदय पावल्यावर भोजन करावे.

फलज्योतिष शास्त्राच्या दृष्टीने ग्रहणांपासून काही परिणाम घडत असल्याचे मानण्यात येत असे (विष्णुधर्मोत्तर १-८५·५६, का. वि. ५४३ इ.).

# प्रकरण १३

## व्रतांची आणि उत्सवांची यादी

(मू. ग्रं. पा. २५१-४६२)

ह्या पूर्वीच्या प्रकरणांमध्ये काही थोड्या महत्वाच्या व्रतांची आणि उत्सवांची यादी दिली आहे. प्रस्तुत ग्रंथकाराने एक बरीच विस्तृत अशी एक यादी मूळ इंग्रजी ग्रंथात दिली आहे. त्या यादीत एकूण एक व्रतांचा आणि उत्सवाचा समावेश झाला आहे असे जरी नसले तरी आजपर्यंत झालेल्या इंग्रजी भाषेतील कोणत्याही ग्रंथात आणि इंग्रजी भाषेत आजपर्यंत कोणीही केलेल्या अशा प्रकारच्या यादीपेक्षा ती यादी अधिक विस्तृत आहे आणि त्यांच्यापेक्षा अधिक माहितीने भरलेली आहे. आजपर्यंतच्या झालेल्या याद्यांमध्ये पुढील याद्या उल्लेखनीय आहेत : (१) सर वुइल्यम जोन्म यानी एशियाटिक रिसर्चेस, खंड ३ मध्ये तिथितत्त्व (पा. २५७-२९७) ह्या ग्रंथाच्या आधारावर तयार केलेली हिंदूंच्या सणांची यादी; (२) प्रा. किल्हार्न यांनी इंडियन ॲन्टि क्वेरी खं. २६ पा. १७७-१८७ वर मुख्यत्वेकरून धर्मसिंधूच्या आधारावर तयार केलेली सणांची यादी; (३) इंडियन एफिमेरिस्, (खंड १ भाग १ पा. ५५-६९) यात दिलेली वर्णनात्मक मोठी यादी; (४) कै. मेघनाथ साहा ह्यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या 'कॅलेंडर रिफार्मकमिटि' (पंचांगसंशोधन समिती) च्या इ. स. १९५३ मध्ये प्रसिद्ध झालेल्या अहवालांत दिलेली उत्सवांची आणि सणांची यादी.

ह्यांच्याशिवाय बंगाली आणि भारतांतील इतर प्रादेशिक भाषांत लिहिलेले व्रतांसंबंधी काही थोडे ग्रंथ आहेत. प्रस्तुत ग्रंथकाराला त्या भाषांपैकी बहुतेक भाषा अवगत नसल्याकारणाने अशा ग्रंथांपैकी बऱ्याच ग्रंथांचा समावेश त्या यादीत करिता आला नाही. प्रस्तुत सारांश ग्रंथाच्या मर्यादेत अर्थातच ती यादी देणे शक्य नाही.

बहुतेक व्रते शंकरांनी पार्वतीला, कृष्णाने युद्धिष्ठिराला अशी निरनिराळ्या देवांनी तसेच मार्कंडेय, नारद, धौम्य, याज्ञवल्क्य, वसिष्ट ह्यांच्यासाररुया मोठ्या ऋषींनी प्रकट केली असल्याचे वर्णन पुराणात केलेले असते आणि असेही म्हटलेले असते की ते व्रत मोठे गुह्य असून देवांना आणि देवींना देखील कोणी कथन केलेले नव्हते अथवा माहित नव्हते.

व्रते आणि उत्सव ह्यांच्यामधील भेद अतिशय सूक्ष्म आहे. पुष्कळ व्रतांमध्ये समारंभाचा काही तरी अंश असतो आणि पुष्कळ उत्सवात कमी अधिक प्रमाणात धार्मिक भाग असतो. पुष्कळसे उत्सव प्रारंभी धार्मिक स्वरूपाचे असून पुढे ग्रीस देशातील आलिंपिक उत्सवांसारखे ते लौकिक स्वरूपाचे अथवा धर्मातीत स्वरूपाचे झाले आहेत.

आतापर्यंत वर्णन केलेल्या अनेक व्रतांच्या आणि उत्सवांच्या बाबतीत लोकांनी काय करावे ह्याचे येथे विवेचन केल्यास ती गोष्ट अप्रस्तुत होणार नाही. एके काळी आचरण्यात येणाऱ्या व्रतांपैकी आणि उत्सवांपैकी अनेक व्रते आणि उत्सव निरनिराळ्या कारणांनी लुप्त झाली आहेत. तथापि प्रस्तुत काळी (म्हणजे विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात) देखील सर्व व्रतांचा आणि उत्सवांचा त्याग करावा अशी शिफारस करणे योग्य होणार नाही. दिवाळी आणि होलिका ह्यांच्यासारखी ऋतुपरत्वे करण्याची काही काही व्रते आणि सण कायम ठेवावेत, परंतु त्यांच्यामधील (बलिप्रतिपदेच्या दिवशीचा जुगार आणि होलिकासणातील अश्लीलपणा अथवा घाण उडविणे ह्यांच्यासारखे) अतिरेकाचे भाग काढून टाकले पाहिजेत. रामनवमी,

विजयादशमी, कृष्णजन्माष्टमी ह्यांच्यासारखी इतर काही व्रते आणि उत्सव देखील पाळले पाहिजेत. कारण त्यांच्या योगाने पूर्वी होऊन गेलेल्या त्या थोर पुरुषांचे आणि अवतारांचे आणि त्यांनी आपल्या आयुष्यात जे श्रेष्ठ गुण प्रकट केले त्यांचे चालू पिढीला स्मरण होते. शिवाजी, गुरुगोविंदसिंग, टागोर, टिळक आणि गांधी ह्यांच्या जयंत्यांसारखे काही थोडे नवीन उत्सवही पूर्वीच्या उत्सवात समाविष्ट करण्यास प्रत्यवाय नाही. शिवाय, वटसावित्री आणि हरितालिका ह्यांच्यासारखी व्रतें स्त्रियांनी तशीच चालू ठेवावींत आणि शेवटची गोष्ट म्हणजे निर्हेतुक, निरागस आदर आणि प्रेमभाव दर्शित करणारे रक्षाबंधन आणि भ्रातृद्वितीया (भाऊबीज) ह्यांच्यासारखे उत्कृष्ट सण जतन करण्याच्या योग्यतेचे आहेत.

# खंड ५ वा

## विभाग २ रा : काल, मुहूर्त, धर्मशास्त्रावर ज्योतिषशास्त्राचा परिणाम आणि पंचांग

## प्रकरण १४

### कालासंबंधी कल्पना

(मू. ग्रं. पा. ५·४६३-४८५)

तत्त्वज्ञानातील सर्वात पहिला असा मोठा विषय म्हणजे **दिक्** (स्थळ) आणि काल (वेळ) ह्यांचे स्वरूप काय हा असतो. ह्यांबाबतीत जे निरनिराळे प्रश्न उपस्थित होतात त्यांत स्थल आणि काल हे तत्त्वतः खरे आहेत काय? जे विश्व आपणास भासमान होते ते स्थल आणि काल रहित आहे किंवा काय? ह्या विश्वाला कालाच्या दृष्टीने आरंभ आहे काय? स्थल आणि काल हे स्वतः पदार्थ आहेत अथवा पदार्थाचे गुणधर्म अथवा संबंध आहेत? इत्यादि प्रश्न महत्वाचे असून त्यांच्या बाबतीत अत्यंत प्राचीन कालापासून आतापर्यत. अतिशय मतवैचित्र्य आढळते. ह्याकरिता कालासंबंधी मुख्यत्वेकरून संस्कृत ग्रंथांत करण्यात आलेल्या कल्पनांचे संक्षिप्त विवेचन प्रस्तुत प्रकरणात करावयाचे आहे.

ऋग्वेदामध्ये 'काल' हा शब्द फक्त एकदाच (ऋ. १०-४२-९) मध्ये आला असून त्याचा अर्थ 'प्रसंग' असा आहे. अथर्ववेद (१९·५३·१-१० आणि १९·५४-१-५ ह्या) सूक्तांत कालासंबंधी एक अत्यंत उदात्त कल्पना ग्रथित केली आहे. त्यात म्हटले आहे की काल कधी वृद्ध होत नाही, त्याच्याहून अधिक असे कोणतेही तेज असत नाही, कालच सर्व पदार्थ निर्माण करतो, त्याच्यापासून प्रजापति, कश्यप, तप, ऋत, भविष्य, ऋक्, यजुस् उत्पन्न झाले, तोच सर्वात श्रेष्ठ देव आहे इ.

ह्यावरून असे दिसून येते की अत्यंत प्राचीन अशा वेदकालापासूनदेखील काल हा शब्द दोन अर्थांनी योजण्यात येत असे. ते दोन अर्थ म्हणजे 'अवधि' हा एक आणि परब्रह्म अथवा सर्व विश्वाचे आद्य उत्पत्तिस्थान हा दुसरा. शतपथ ब्रा. (१·७·३·३, २·४·२·४) मध्ये काल हा शब्द अवधि अथवा 'प्रसंग' ह्या अर्थाने पुष्कळ वेळा वापरला आहे. प्राचीन उपनिषदांत तो शब्द वर उल्लेख केलेल्या दोनही अर्थाने वापरलेला आढळतो. उदाहरणार्थ, छां. उप (२·३१·१), बृह. उप. [सोऽकामयत द्वितीयो म आत्मा जायेतेति ... नहपुरा ततः संवत्सरः आस तमेतावन्तं कालमबिभः। यावान् संवत्सरः तमेतावतः कालस्य परस्तादसृजत। बृह. उप. (१·२·४)] (१·२·४) ह्यांत काल हा शब्द 'योग्य' अथवा 'नियुक्त प्रसंग' ह्या अर्थाने योजला आहे; परंतु श्वेता. उप. (१·२, ६·२, ६·५) मध्ये त्या शब्दाचा दुसऱ्या अर्थाने उपयोग केला आहे. मैत्री उप. (६·१४।१५) मध्ये तो शब्द दोनही अर्थाने वापरला आहे. तै. उप. [यतो वा इमानि भूतानि जायन्ते येन जातानि जीवन्ति यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति ॥ तद्विजिज्ञासस्व तद् ब्रह्मेति। तै. उप. (३·१)] (३·१), महानारायण उप (११·१४) ह्यात काल हाच देव असल्याचे वर्णन केले आहे.

महाभारतात कालासंबंधी अनेक ठिकाणी विवेचन केले असून त्यात ह्या शब्दाचा वरील दोन्ही अर्थाने उपयोग केला आहे. उदा. आदि. (१·२४८।२५०), स्त्रीपर्व (२·२४), शांति (२०६-१३, ३२०·१०८-१०९ इ.), वन, (१२·२१।२२). भगवद्गीतेत देखील काल हा शब्द अनेक ठिकाणी (४·२, ८·७, ८·२७, ८·२३, १७·२०) पहिल्या अर्थाने वापरला आहे परंतु (१०·३० आणि ३३, ११·३२) ह्यांत काल ही

परमात्मा स्वरूपी कृष्णाची एक विभूति असल्याचे म्हटले आहे म्हणजे त्याचा दुसरा अर्थ केला आहे.

पाणिनीने (३·३-१६७) ह्या सूत्रात काळ हा शब्द वेळाचा विभाग अथवा योग्य वेळ ह्या अर्थाने योजला असून पतंजलीच्या महाभाष्यांत तोच अर्थ घेतला आहे. मनुस्मृति (१·२४) मध्येही काळ ह्या शब्दाचा तसाच अर्थ केला आहे. तत्वज्ञानाच्या निरनिराळ्या सांप्रदायांपैकी कांहींनी (उदा. वैशेषिक) कालाचा मूलभूत तत्त्वांत समावेश केला आहे; आणि काहीनी वर्तमान काळाचे अस्तित्व अमान्य करून काळ हा भूत आणि भविष्य असा दोन प्रकारचा असल्याचे प्रतिपादन केले आहे. नव्यन्याय सांप्रदायाच्या 'पदार्थनिरूपण' ह्या ग्रंथात रघुनाथाने असे प्रतिपादन केले आहे की स्थळ, काळ आणि देव हे भिन्न भिन्न पदार्थ नसून सर्व एकच असतात. योगसूत्रा (३·५२) वरील भाष्यांत म्हटले आहे की कालाला स्वतंत्र अस्तित्व नसते. परमाणूला त्याने व्यापलेल्या स्थानापासून दूर होण्याला अथवा त्याच्या पुढील स्थानाला पोहोचण्याला जो अवधि लागतो तो क्षण आणि अशा क्षणांच्या अखंड प्रवाहाला क्रम अथवा काल असे म्हणतात. बुद्धधर्मी तत्त्वज्ञांच्या माताप्रमाणे काल हा एक पदार्थ नसून ती एक कल्पना आहे. मनुष्याला इंद्रियांच्या द्वारा येणाऱ्या अनुभवांची आणि नैसर्गिक भावनांची काल ही एक वस्तुनिष्ठ अवस्था असते आणि कालाला त्या त्या पदार्थांपासून भिन्न असे अस्तित्व नसते. उलट जैन ग्रंथकारांच्या मताप्रमाण काल हा जीव, धर्म, अधर्म इत्यादि सहा पदार्थांपैकी एक असतो म्हणजे त्यांच्या मताप्रमाणे कालाला स्वतंत्र अस्तित्व असते.

कूर्मपुराण (१·५), वायु (३२·२९।३०), विष्णु (१·२·१३-१५,२६), भागवत (३-११,३-७), इत्यादि पुराणांत काल हा शब्द दोनही अर्थाने योजला आहे. वायु आणि कूर्म [कालः सृजति भूतानि कालः संहरते प्रजाः।
सर्वे कालस्य वशगा न कालः कस्यचिद्वशे ॥
कूर्मपुराण (२·३·१६).] (२-३·१६), ह्यांत म्हटले आहे की काल भूतांना उत्पन्न करितो आणि पुन्हा त्यांचा नाश करितो, सर्व कालाच्या आधीन असतात परंतु काल मात्र कोणाच्या आधीन नसतो. विष्णु पुराणात असे प्रतिपादन केले आहे की एक जन्मरहित, नित्य, अक्षय असणारे ब्रह्म अनादि आणि अन्त रहित कालांच्या रूपाने व्यक्त होते.

ज्योतिषशास्त्रावरील ग्रंथांपैकी सूर्यसिद्धान्त (१-१०।११) ह्या ग्रंथात असे म्हटले आहे की काल हा लोकांचा नाश करणारा असून त्याचे स्थूल आणि सूक्ष्म असे दोन प्रकार असतात. प्राण (श्वासोच्छ्वास) ह्यांच्यासारखे कालविभाग स्थूल अथवा इंद्रियगोचर स्वरूपाचे असतात. आणि त्रुटिसारखे कालविभाग सूक्ष्म म्हणजे इंद्रियगोचर नसणारे असतात. चरक संहिता (सूत्रस्थान १-४८०) ह्या वैद्यक-शास्त्रावरील ग्रंथात कालाचा नऊ द्रव्यांमध्ये समावेश केला असून तो अचेतन असतो असे सांगितले आहे. तत्त्ववेत्ता आणि व्याकरणकार असलेल्या भर्तृहरीने (वाक्यपदीय ह्या ग्रंथात) म्हटले आहे की काल हे एक द्रव्य असून तो सर्वव्यापी आणि क्रियानिरपेक्ष सतत चालणारा असतो. (वाक्यपदीय, प्रकीर्णक कांड, कालसमुद्देश श्लो. १, ३, ३२).

बृहत्संहितेच्या रचनाकालाइतक्या प्राचीन कालापासून निमेष, मुहूर्त, दिवस, रात्रि, पक्ष, मास, ऋतु, वर्ष प्रभृति सूक्ष्म विभागांचे उल्लेख केलेले आढळतात. सर्वांत सूक्ष्मापासून सर्वात मोठ्यापर्यंतच्या कालविभागांची प्राचीन काळची आणि अतिशय विस्तृत यादी वराहमिहिराच्या बृहत्संहिता [तथा च पौलिशे।
षट्प्राणास्तु विनाडी तत्षष्ठ्या नाडिका दिनं षष्ठ्या।
एतासां तत्त्रिंशन्मासस्तैर्द्वादशभिरब्दः॥
बृह. सं. (२) वरील उत्पलटीका (पा. २४).] (२ पा. २४) ह्या ग्रंथात आणि (२-२-६ ह्या) वैशेषिक सूत्रावरील प्रशस्तपादाच्या भाष्यात (पा. २७) पुढीलप्रमाणे दिली आहे : क्षण, लव, निमेष, काष्ठा, कला, मुहूर्त, याम

(प्रहर) अहोरात्र, अर्धमास, मास, ऋतु, अयन, संवत्सर, युग, मन्वंतर, कल्प, प्रलय आणि महाप्रलय. पुराणांमध्येही निमेषापासून प्रलय अथवा कल्पापर्यंतच्या कालविभागांची वर्णने दिलेली असतात. (उदा. ब्रह्म. २३१·६-१२, कूर्म १·५·६-१४, पद्म ५·३·४-२०, वायु ५७·६-३५ इ.). लघु अक्षर उच्चारण्याला लागणारा वेळ अशी निमेषाची व्याख्या वायु आणि विष्णुधर्मोत्तर पुराणात (१·७३·१) सांगितली असून निमेषापेक्षा लहान विभागाचे प्रत्यक्ष (इंद्रिय द्वारा) ज्ञान होऊ शकणार नाही असेही त्यात म्हटले आहे. कालाच्या सूक्ष्म विभागांची संख्या आणि त्यांचे परस्परांशी प्रमाण ह्यांच्या बाबतीत अतिशय मतवैचित्र्य आढळते. निरनिराळ्या ग्रंथांत दिलेल्या कोष्टकांपैकी दोन कोष्टके नमुन्यादाखल दिली आहेत :-

**मनु** (१·६४)
१८ निमेष = काष्ठा
३० काष्ठा = कला
३० कला = मुहूर्त
३० मुहूर्त = अहोरात्र

**भागवत** (३·११·३—१०)
२ (कालाचे) परमाणू = अणु
३ अणु = त्रसरेणु
३ त्रसरेणु = त्रुटि
१०० त्रुटि = वेध
३ वेध = लव
३ लव =निमेष
३ निमेष = क्षण
५ क्षण = काष्ठा
१५ काष्ठा = लघु
१५ लघु = नाडिका
२ नाडिका = मुहूर्त
३० मुहूर्त = अहोरात्र

इसवीसनापूर्वी अनेक शतकाइतक्या काळी ज्योतिषशास्त्राला वेदांच्या एका अंगाचे स्थान प्राप्त झाले होते. ऋग्वेद आणि यजुर्वेद ह्यांच्या वेदांगज्योतिषात (ऋग्वेद वेदांगज्योति-श्लोक ३५।३६, यजुर्वेद ज्यो. श्लोक ३-४) म्हटले आहे की वेद हे यज्ञाकरिता उत्पन्न झाले. यज्ञकर्मे कालाच्या अनुरोधाने करावयाची असतात, ह्याकरिता योग्य काळ कोणते ह्याविषयी नियम असलेले ज्योतिष जो जाणतो तोच यज्ञ जाणतो. वेदांग ज्योतिषांमध्ये गणित आणि ज्योतिष हे शब्द समानार्थी असल्याचे मानिले आहे. कालांतराने ज्योतिषशास्त्रामध्ये तंत्र, होरा आणि शाखा अशा तीन पृथक् विभागांचा समावेश होऊ लागला. **तंत्र** ह्या विभागात गणिताच्या साहाय्याने ग्रहांच्या गति ठरविण्यासंबंधी विचार केलेला असे; **होरा** ह्या विभागात कुंडल्यांचा संबंध असे (आणि म्हणून त्याला **जातक** असेही नाव असे) आणि **शाखा** ह्या विभागामध्ये शकुनासंबंधी अनेक विषयांचा समावेश होत असे. ह्या तीनही विभागांचे ज्या ग्रंथात संपूर्ण विवेचन आलेले असेल त्या ग्रंथाला **संहिता** अशी संज्ञा असे आणि ह्या तीनही विभागांचे चांगले ज्ञान असणाऱ्याला '**संहितापारग**' असे गर्गाने (बृ. सं. १-९ वरील उत्पलाच्या टीकेमधील अवतरण) म्हटले आहे. संहिता या शब्दाचा दुसरा (संकुचित स्वरूपाचा) अर्थ 'फक्त शाखा विभागाचे विवेचन केलेला ग्रंथ' असाही होतो. त्या विभागात ग्रहांच्या सरळ आणि वक्रगतीची फळे, अगस्ति आणि सप्तर्षी, ग्रहांच्या युति आणि विरोध, तेजोवलय, उल्का, भूकंप, पक्ष्यांची गमने आणि शब्द ह्यांच्याविषयी माहिती, नीराजन, उत्पातांच्या अनिष्ट परिणामांचे निरसन ह्यांच्यासारख्या विषयांचा समावेश होत असल्याकारणाने बहुधा त्या विभागाला शाखा म्हणत असावे. ह्या अर्थाने संहिता म्हणजे नैसर्गिक फलज्योतिषासारखेच एक शास्त्र होते असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. **होरा** ह्या विभागाचेही जातक, यात्रा आणि विवाह असे तीन पोट विभाग होते.

गृह्यसूत्रांचा आणि धर्मशास्त्रावरील ग्रंथांचा सर्वसामान्य परिपाठ त्यांना लागणारी खगोलशास्त्रासंबंधी माहिती ज्योतिषांकडून मिळविण्याचा असे. गोभिल-गृह्यात (१·५·१३) म्हटले आहे की खगोलशास्त्र हे एक वेगळे शास्त्र आहे. त्या शास्त्राचे अध्ययन करावे अथवा (अमावास्या आणि पूर्णिमा ह्यांच्या) पर्वांसंबंधी माहिती ते शास्त्र जाणणाऱ्याकडून मिळवावी. ज्योतिषशास्त्राच्या होरा आणि शाखा ह्या विभागांचा धर्मशास्त्रावर फार परिणाम झालेला असल्यामुळे मर्यादित स्वरूपात त्या विभागांचे विवेचन प्रसंगोपात्त प्रस्तुत ग्रंथात करावे लागले तरी खगोलशास्त्रासंबंधी अधिक विवेचन धर्मशास्त्राच्या इतिहासातून वगळण्याचे प्रस्तुत ग्रंथकाराने विस्तारभयास्तव काहीशा नाखुषीने ठरविले आहे.

भारतामध्ये प्रगत झालेल्या खगोलशास्त्राविषयी आणि फलज्योतिषशास्त्राविषयी वेबर, व्हिटने, थिबो ह्यांच्यासारख्या पाश्चात्य विद्वानांनी अनेक निराधार आणि सरसकट स्वरूपाची मते प्रदर्शित केली आहेत. बहुतेक जुन्या पाश्चात्य ग्रंथकारांच्या मनावर ग्रीक आणि रोमन वाङमयाच्या आणि इजिप्तमधील वाङ्मयाच्या श्रेष्ठत्वाविषयी अतिरंजित भावनांचा पगडा पडलेला असे. परंतु त्यानंतर बाबिलोन आणि मध्य आशियामधील प्राचीन वाङ्मय उपलब्ध झाल्यावर सर्व कलांचा उगम ग्रीक लोकांपासून झाला असल्याची मते आधुनिक काळच्या पाश्चात्य विद्वानांनी सोडून दिली आहेत ही आनंदाची गोष्ट आहे. ग्रीक लोकांना दशमान पद्धतीची आणि शून्य ह्या संज्ञेची माहिती नव्हती आणि ह्या गोष्टी त्यांनी अरब लोकांजवळून (आणि पर्यायाने भारतापासून) घेतल्या असल्याचे आता मान्य झाले आहे. काही काही विषयांची माहिती उपलब्ध संस्कृत ग्रंथांत आढळत नाही एवढ्यावरून ते विषय प्राचीनकाळी अस्तित्वात नव्हते असा निर्णय करिता येईलच असे नाही. संस्कृत भाषेतील विस्तृत वाङ्मय नष्टप्राय झाले असून प्रस्तुत काळी उपलब्ध असलेले वाङमय हे एकेकाळी अस्तित्वात असलेल्या वाङमयाचा एक अल्प भाग आहे. उपलब्ध वाङमयापैकी बरेचसे वाङमय धार्मिक स्वरूपाचे आहे. वेदांमध्ये आणि ब्राह्मणग्रंथांत खगोलशास्त्राचे जे उल्लेख आढळतात त्यांतील बहुतेक उल्लेख विशिष्ट हेतूने केलेले नसून आनुषंगिक अथवा प्रासंगिक स्वरूपाचे आहेत. एखाद्या विषयाचे ऐतिहासिक दृष्टीने आणि सांगोपांग विवेचन करण्याच्या हेतूने ते ग्रंथ झालेले नाहीत ह्या गोष्टीकडे ह्या पाश्चात्य विद्वानांनी दुर्लक्ष केले आहे.

खगोल शास्त्र आणि फलज्योतिषशास्त्र ह्यांच्या परस्पर संबंधाविषयी मत-वैचित्र्य अस्तित्वात आहे. आकाशात दिसणारे कमी अधिक तेजस्वी प्रकाशगोल, सूर्याचे वर्षातून काही काल उत्तरेकडे आणि काही काल दक्षिणेकडे होणारे गमन, धूमकेतु दिसणे, तारे तुटलेले दिसणे, सूर्य आणि चंद्र ह्यांना ग्रहणे लागणे, अशासारख्या घटना पाहून अप्रगत मनुष्यांना देखील आश्चर्य आणि त्याबरोबरच भयही वाटले असले पाहिजे आणि त्यांनी त्या प्रकारांवरून निरनिराळी शुभ आणि अशुभ अशी अनुमाने काढली असली पाहिजेत आणि त्यावरून कालांतराने खगोलशास्त्र आणि फलज्योतिषशास्त्र ह्यांचा उदय झाला असला पाहिजे. ही दोन्ही शास्त्रे सारखीच प्राचीन आहेत आणि प्राचीन काळी त्यांचे एकमेकांवर परिणाम घडून आले असले पाहिजेत. भारतीय खगोलशास्त्र आणि फलज्योतिष शास्त्र (विशेषतः निसर्गावर आधारलेले फलज्योतिषशास्त्र) ह्या दोहींची वाढ एकसमयावच्छेदेकरून झाली असल्याचे पुरावे पुराणांत आणि वैदिक वाङ्मयात आढळतात. अंतरिक्षातील तेजोगोलांचा पृथ्वीवरील घटनांवर आणि मनुष्यांवर परिणाम घडत असतो आणि तो परिणाम पूर्वी सांगता येतो हा फलज्योतिषशास्त्राचा मूलभूत सिद्धांत ओहोटी-भरती, ग्रहणे, वादळ, पर्जन्यवृष्टि ह्यांच्यासारख्या गोष्टींसंबंधी भविष्य वर्तविता येते ह्या आधुनिक काळच्या खगोलशास्त्राच्या आणि हवामानशास्त्राच्या सिद्धांतासारखा आहे. ताऱ्यांचा आणि ग्रहांचा पृथ्वीवरील पदार्थांवर आणि मनुष्यांच्या मनांवर आणि त्यांच्या दैनंदिन कृत्यांवर काही परिणाम होत असावा. परंतु खरा महत्वाचा वादाचा प्रश्न

असा आहे की ह्या परिणामांसंबंधी अचूक ज्ञान फलज्योतिषशास्त्रज्ञांनी मिळविले आहे किंवा नाहीं आणि ते परिणाम कळण्याची अचूक पद्धति त्यांनी शोधून काढली आहे किंवा नाही.

संस्कृत भाषेतील खगोलशास्त्रावरील आणि फलज्योतिषशास्त्रावरील ग्रंथांच्या रचनाकाळाचे काहीसे एकमेकांत मिसळलेले तीन कालखंड पाडता येतात. **पहिला खंड** वेद संहिता आणि ब्राह्मण ग्रंथ ह्यांचा रचनाकाल असून त्यात अज्ञात प्राचीन कालापासून ख्रि. पू. ८०० वर्षे इतक्या कालाचा समावेश होतो. **दुसरा खंड** वेदांग ज्योतिष, श्रौत, गृह्य आणि धर्मसूत्रें, मनु आणि याज्ञवल्क्य स्मृती, गर्ग आणि सूर्यप्रज्ञाप्ति ह्यांच्यासारखे जैन ग्रंथ ह्यांचा असून तो ख्रिस्ती शकाच्या तिसऱ्या शतकाच्या सुमारास समाप्त झाला. **तिसऱ्या खंडाचा** आरंभ ख्रिस्ती शकाच्या आरंभाच्या वेळेपासून होऊन त्यात प्रामुख्याने सिद्धान्त ह्या नांवाचे ग्रंथ होऊन गेले आणि आर्यभट (जन्म इ. स. ४७६), वराहमिहिर (इ. स. ४७५-५५० च्या सुमारास), ब्रह्मगुप्त (जन्म इस. ५९८) ह्यांच्या सारख्यांच्या ग्रंथांची निर्मिती झाली.

भारतीय खगोलशास्त्राचे ज्यांना सखोल अध्ययन करण्याची इच्छा असेल त्यांनी कै. शंकर बाळकृष्ण दीक्षित ह्यांनीं मराठीमध्ये लिहिलेल्या 'भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास' (रचना इ. स. १८९६) हा ग्रंथ काळजीपूर्वक वाचावा. त्या ग्रंथाची वाखाणणी सामान्यतः भारतीयांची प्रशंसा न करणाऱ्या थिबोसारख्या पाश्चात्य ग्रंथकारांनी देखील केली आहे. (ग्रुंड्रीज पा. ३) श्री. दीक्षित ह्यांनी असे प्रतिपादन केले आहे की भारतीय खगोलशास्त्र हे मुख्यत्वेकरून स्वतंत्र स्वरूपाचे असून ते भारतात घेतलेल्या ग्रहांच्या वेधांवर आधारलेले आहे. भारतीय खगोलशास्त्र ग्रीक खगोलशास्त्रावरून घेतलेले आहे अथवा त्याच्यावर ग्रीक खगोलशास्त्राची मोठी छाप पडलेली आहे ह्या पाश्चात्य ग्रंथकारांच्या विधानाहून श्री. दीक्षित ह्यांचे हे विधान किती तरी पटीने साधार आहे असे प्रस्तुत ग्रंथकाराचे नम्र मत आहे. ह्या विषयावरील पाश्चात्य आणि भारतीय ग्रंथकारांच्या ग्रंथांप्रमाणेच श्री. बा. गं. टिळक ह्यांचा मृगशीर्ष अथवा ओरायन आणि वेदामधील उत्तर ध्रुवाकडील आर्यांचे वसतिस्थान हे ग्रंथदेखील त्यांनी काळजीपूर्वक वाचावे.

# प्रकरण १५

## कालाची परिमाणे

(मू. ग्रं. पा. ५·४८६-५३६).

प्रस्तुत प्रकरणामध्ये युगापासून खाली मुहूर्तापर्यंतच्या कालगणनेच्या परिमाणांचा विचार करावयाचा आहे.

**युग**. हा शब्द ऋग्वेदामध्ये अनेक वेळा आला असून तो निरनिराळ्या अर्थाने योजिलेला असतो. त्यांपैकी 'एक अल्प कालावधि' आणि 'एक दीर्घ कालावधि' हे दोन अर्थ प्रमुख आहेत. ऋ. १·१५८·६, ३·२६·३. इत्यादि ऋचांमध्ये युग शब्दाचा अर्थ सामान्यतः 'पाच वर्षांचा अवधि' असा आहे. वेदाङग ज्योतिष (श्लोक १ आणि ५) ह्यातही एका युगामध्ये पाच वर्षे असल्याचे सांगितले आहे.

**संवत्सर**. ऋग्वेदातील १·११०·४, १·१४०-२ प्रभृति अनेक ऋचांत संवत्सर ह्या शब्दाचा अर्थ वर्ष असा आहे. (ऋ. १०·६२·२) मध्ये परिवत्सर हा शब्द आला आहे आणि त्या शब्दापासून निघालेले 'संवत्सरीण' (ऋ १०·८७·१७) 'परिवत्सरीण' (ऋ. ७·१०३·८) हे शब्द ऋग्वेदामध्ये आले आहेत. ऋग्वेदामध्ये देखील पाच वर्षे मिळून होणाऱ्या कालचक्रातील अनुक्रमाने येणारी दोन वर्षे असाही अर्थ संवत्सर आणि परिवत्सर ह्या शब्दांचा होत असे. तै. सं. (५·५·७·१—३) मध्ये वत्सर, संवत्सर, परिवत्सर, इदावत्सर, आणि इदुवत्सर हे शब्द आले आहेत. वाज. सं. (२७-४५) मध्ये इदुवत्सराच्या जागी इदावत्सर हा शब्द घातला आहे. अथर्ववेद (६·५५·३) यात इदावत्सर, परिवत्सर आणि संवत्सर ह्यांना नमस्कार केले आहेत. तै. ब्रा. (१·४·१०-१) मध्ये संवत्सर, परिवत्सर, इदावत्सर आणि अनुवत्सर ही नावे आली आहेत. अशा रीतीने निरनिराळ्या संहितांमध्ये काही विशिष्ट क्रमाने (सामान्यतः पाच) नावे दिलेली आढळतात. त्यावरून त्या सर्वांमिळून एका विशिष्ट कालखंडाचा बोध होत असावा असे वाटते. कौटिल्याने (२-२० पा. १०९) पाच संवत्सरांच्या युगाचा उल्लेख केला असून त्यांच्या पैकी २॥ वर्षांच्या अंती आणि ५ वर्षांच्या अंती येणाऱ्या दोन अधिक मासांचा उल्लेख केला आहे. महाभारतकाळी [क्षणा लवा मुहूर्ताश्च दिवा रात्रिस्तथैव च।
अर्धमासाश्च मासाश्च ऋतवः षट् च भारत ॥
संवत्सराः पञ्चयुगमहोरात्रश्चतुर्विधः।
महाभा. सभा. (११·३७।३८)] (सभा. ११·३७।३८) पाच वर्षांच्या युगाची माहिती होती. पितामह सिद्धान्त हा ग्रंथ उपलब्ध नाही परंतु त्या ग्रंथामध्ये युग ह्या शब्दाचा अर्थ सूर्य आणि चंद्र ह्यांची पाच वर्षे असा दिला होता आणि तीस महिन्यांनंतर एक अधिक मास जोडण्यात येत असे असेही त्यात सांगितल्याचे वराहमिहिराने (पंचसिद्धान्तिका १२—१.) म्हटले आहे. ऋ. (१·१६४·११-१३ आणि ४८) ऋचांत ऋताच्या चक्राचे वर्णन केले आहे. त्या चक्राला १२ अरे, ३६० शंकू (खिळे) असून त्याचे ३, ५, ६, १२, ३६० अथवा ७२० भाग पाडलेले असतात. हे चक्र म्हणजे राशिचक्र असल्याचे प्रतिपादन करणे शक्य आहे. अथर्व. (५·३५·४) मध्ये देखील संवत्सराला १२ अरे असतात आणि महिन्यांना ३० अरे असतात असे म्हटले आहे. ब्राह्मण ग्रंथांत देखील वर्षामध्ये ३६० दिवस आणि ७२० अहोरात्र असल्याचे वर्णन केले आहे (शत. ब्रा. ९·१·१·४३, ऐत. ब्रा. ७·७).

**अधिकमास**. वेद संहितांमध्ये आणि ब्राह्मण ग्रंथांत मध्येच घालण्यात येणाऱ्या १३ व्या महिन्याचा उल्लेख केला आहे. (ऋ. [वेद मासो धृतव्रतो द्वादश प्रजावतः। वेदा य उपजायते॥ (वरुण बारा महिने त्यांच्या प्रजांसह म्हणजे दिवसांसह जाणतो; तो **जोडला जाणारा महिना** देखील जाणतो) ऋ. (१·२५·८)] १-२५-८, तै. सं. ४-६-७/२, कौषी. ब्रा. १९-२,

वाज. सं, ७-३० आणि २२-३१ इ.). ऋग्वेदाच्या आणि तै. सं. च्या काळी एक संपूर्ण महिना जोडण्यांत येत असे एवढेच काय ते स्पष्टपणे कळते परंतु तो महिना कशा रीतीने आणि केव्हा जोडण्यांत येत असे ही गोष्ट स्पष्टपणे कळत नाही.

३६० दिवसाच्या वर्षाला भारतात मागाहूनच्या काळात **सावन** (म्हणजे यज्ञांत सोमरस पिळून काढण्याशी संबंध असणारे) **वर्ष** म्हणत आणि (३५४ दिवसाचे) चांद्रवर्ष सौर वर्षाशी जुळवून घेण्याकरिता सुमारे ३० महिन्यांनंतर एक महिना अधिक धरण्यात येई म्हणजे त्या वर्षात ३९० दिवस असत. अशा प्रकारची दोन पंचांगे असणारी व्यवस्था प्राचीन इजिप्त देशांत प्रचलित होती. त्या देशांत फक्त ३६५ दिवस असलेले एक अधिकृत पंचांग होते. त्यात ३० दिवस असलेले १२ महिने मिळून ३६० दिवस असून वर्षाच्या अखेरीला ५ दिवस मिळविलेले असत आणि वर्षाच्या मध्यंतरी एकही अधिक महिनां घातलेला नसे. त्या पंचांगातील प्रारंभाचा दिवस सौर वर्षाच्या दृष्टीने मागे मागे पडत असे आणि पहिल्या दिवसाची सबंध प्रदक्षिणा १४५६ अथवा १५०६ वर्षांत पुरी होत असे. त्याच वेळी त्या देशात दुसरेही एक पंचांग प्रचलित असे आणि त्याच्याशी तुलना करून वर उल्लेख केलेल्या पंचांगात फेरबदल करण्यात येत असत.

अधिक महिन्याला 'संसर्प, अहंस्पति, अहंस्पत्य' अशी नावे वेदसंहितांमध्ये दिली आहेत. (तै. सं. १- १४-४, मैत्रा. सं. ३-१२-१३).

**अयन**. शत. ब्रा. (२-१-३-२) यात सहा महिनेपर्यंत सूर्य उत्तरेकडे गमन करताना आणि सहा महिनेपर्यंत दक्षिणेकडे गमन करताना दिसतो (उदगावर्तते, दक्षिणावर्तते) असा उल्लेख केला आहे. तथापि त्या ठिकाणी 'अयन' हा शब्द योजलेला नाही. गति अथवा मार्ग ह्या अर्थाने अयन हा शब्द ऋ. (३-३३-७) मध्ये वापरलेला आढळतो. मागाहूनच्या काळात झालेल्या वाङ्मयात आलेल्या **उत्तरायण** आणि **दक्षिणायन** ह्या शब्दांचा अर्थ सूर्याची अनुक्रमे उत्तरभागात आणि दक्षिण भागांत (उघड दिसणारी) गति अथवा मार्ग एवढाच असतो. शत. ब्रा. मध्ये (२·१·३·१-५) आणि इतर ग्रंथांत वसंत, ग्रीष्म आणि वर्षा हा ऋतूंचा एक विभाग कल्पून ते देवांचे ऋतु असतात असे सांगितले आहे. वसंत आणि ग्रीष्म हे उत्तरायणातील महत्त्वाचे भाग असतात आणि वर्षाचे दोन सारखे भाग होण्याकरितां त्या दोन ऋतूंशी जोडलेल्या वर्षाऋतूला देखील देवांचा ऋतु मानण्यात येतो.

**ऋतु**. ऋ १·१५ ह्या सूक्तामध्ये ऋतु हा शब्द अनेक वेळा आलेला आहे. ऋग्वेदाच्या (२·३६ आणि २·३७ ह्या) सूक्तांना 'ऋतव्य सूक्ते' अशी संज्ञा आहे. ऋग्वेदामध्ये पाच ऋतूंची नावे दिली आहेत : **वसंत** (१०·१६१·४), **ग्रीष्म** (१०·९०·६), **प्रावृष** (७·१०३·३ आणि ९), **शरद** (२·१२·११), **हेमन्त** (१०·१६१·४) परंतु शिशिराचा निर्देश केलेला नाही. आलंकारिक रीतीने सहा ऋतूंचा उल्लेख ऋ १·१६४-१५ मध्ये केला आहे. अथर्व [ग्रीष्मो हेमन्तः शिशिरो वसन्तः शरद्वर्षाः स्विते नो दधात ।

अथर्व. (६·५५·२)] (६ ५५·२) मध्ये सर्वही ऋतूंचा उल्लेख केला आहे परंतु त्यांचा क्रम नेहमीपेक्षा भिन्न आहे. शत. ब्रा. (२·१·३·१६) मध्ये सहा ऋतु मिळून एक संवत्सर होतो असे सांगितले आहे. तै. ब्रा. (१·१·२·६) मध्ये वसंत हा ऋतूमधील पहिला असल्याचे म्हटले आहे (मुखं वा एतद् ऋतूंना यद् वसन्तः). शत. ब्रा. (२·१·३·१-५) यात असे म्हटले आहे की वसंत, ग्रीष्म आणि वर्षा हे **देवांचे ऋतु** असतात आणि शरद, हेमन्त आणि शिशिर हे **पितरांचे ऋतु** असतात. तसेच शुक्लपक्ष, दिवस आणि पूर्वाह्न हे **देवांचे काळ** असून कृष्णपक्ष, रात्र आणि अपराह्न हे **पितरांचे काळ** असतात. त्यात असा एक नियम सांगितला आहे की ब्राह्मणाने अग्न्याधान वसंतऋतूमध्ये, क्षत्रियाने ग्रीष्म ऋतूमध्ये आणि वैश्याने शरद ऋतूमध्ये करावे.

निदान अशोकाच्या आज्ञापत्रांच्या कालाइतक्या प्राचीन काळी 'वर्ष' आणि 'संवत्सर' हे शब्द 'एक वर्षाचा अवधि' ह्या एकाच अर्थाने ब्रह्मगिरी येथील शिलालेखात योजले आहेत. (अशोककालीन शिलालेख पा. १७५).

**ग्रह**. वेदकालीन भारतीयांना ग्रहांचे ज्ञान होते ही गोष्ट काही पाश्चात्य विद्वान अमान्य करितात. ग्रहांसंबंधी उल्लेख वेदांमध्ये फारसे आढळत नाहीत ह्याचे मुख्य कारण बहुधा असे असावे की (याज्ञ. १·२९५ ते ३०८ मध्ये वर्णन केलेला) ग्रहांची आराधना करण्याचा सांप्रदाय वेदांच्या काळीं उत्पन्न झालेला नव्हता. निदान बृहस्पति ह्या ग्रहाचा स्पष्ट निर्देश ऋ. ४·५०·४ = अथर्व २०·८८·४ आणि तै. ब्रा. ३·१·१·५ ह्यात केल्याचे आढळते. ऋ. ३·७·७ ह्या ऋचेत उल्लेख केलेले 'पाच बैल' म्हणजे ५ ग्रह असे मानले जाते. ऋ. १०·१२३·१ आणि ५ ह्यात उल्लेख केलेला **'वेन'** हा शब्द प्रकाशमान **शुक्राला** अनुलक्षून असावा असे मानता येईल. ऋ. १०·१२३·५ मध्ये केलेले सुंदर स्त्रीचे वर्णन हे प्रभातकाळी पूर्वेकडे उदय पावणाऱ्या शुक्राचे फार सुंदर वर्णन होऊ शकेल.

**महिने**. महिन्याच्या अर्थाचा **'मास्'** अथवा **'मास'** हा शब्द ऋ. १·२५·८ मध्ये आला असून **'मास'** हा शब्द ऋ. ३·३१·९ मध्येही आला आहे. ऋ. ८·९४·२ ह्या सारख्या काही ठिकाणी **मास्** (मोजणारा) ह्या शब्दाचा 'चंद्र' असाही अर्थ होतो. हे दोन्ही शब्द इंडोयुरोपियन भाषेतील आहेत. कारण त्यांची भिन्न भिन्न रूपे आर्य कुलातील म्हटल्या जाणाऱ्या अनेक भाषांत अस्तित्वात आहेत.

**नक्षत्रे**. 'नक्षत्र' ह्या शब्दाचे एकूण तीन अर्थ आहे : (१) सामान्यतः आकाशातील एक तारा, (२) राशिचक्राचे २७ समान भाग आणि (३) राशिचक्राच्या पट्ट्या (ZONE) मधील (एक अथवा अधिक तारे असणारा) तारकापुंज. वेदसंहितांमध्ये नक्षत्र शब्दाचे पहिल्या आणि तिसऱ्या प्रकारचे अर्थच बहुतेक ठिकाणी असतात असे प्रस्तुत ग्रंथकाराचे मत आहे. राशिचक्राचे २७ समान भाग पाडलेले असणे संभवनीय आहे. परंतु त्यापेक्षा अधिक सोपा, अधिक स्वाभाविक आणि बहुधा प्राचीन काळचा प्रघात कृत्तिका, मृगशीर्ष ह्यांच्या सारखे ठळक दिसणारे तारकापुंज पाहून त्यांना 'नक्षत्रें' अशी संज्ञा देण्याचा असावा. नक्षत्र हा शब्द ऋग्वेदादि संहिता आणि ब्राह्मण ग्रंथ ह्यांत पुष्कळ वेळा आला आहे. ऋ. (१·२४·१०) ह्यांत एक तारा ह्या अर्थाने 'ऋक्ष' हा शब्द आला आहे, अथर्व (६·४०·१) ह्यांत सप्तर्षि ह्या तारकासमूहाचा स्पष्ट निर्देश केला आहे आणि शत. ब्रा. (२·१·२·४) मध्ये असे म्हटले आहे कीं सप्तर्षींना पूर्वीच्या काळी 'ऋक्षाः' अशी संज्ञा होती. ऋ. (१०-५५-३) मध्ये २७ नक्षत्रांचा उल्लेख केला आहे. ऋ. [सूर्याया वहतुः प्रागात्सविता यमवासृजत्। अघासु हन्यन्ते गावोऽर्जुन्योः पर्युह्यते ॥ ऋ. (१०·८५·१३)] (१०·८५-१३) मध्ये तिष्य, अधा आणि अर्जुनि ह्या नक्षत्रांचा उल्लेख केला आहे. अथर्व (१९·७) मध्ये मघा आणि फल्गुनी ही नावे आली आहेत. उत्तराषाढानंतर आणि श्रवणाच्या पूर्वी 'अभिजित' हे नक्षत्र घातल्यास नक्षत्रांची संख्या २८ होते. वैदिक वाङ्मयांत, वेदांग ज्योतिषात इतकेच नव्हे तर याज्ञ. स्मृतीत देखील नक्षत्रांची गणना कृत्तिकापासून अपभरणी (अथवा भरणी) पर्यंत केलेली असते आणि त्याच्या उलट ख्रि. शकाच्या ३ ऱ्या अथवा ४ थ्या शतकांत झालेल्या ग्रंथांत आणि आधुनिक काळी अश्विनीपासून रेवती ह्या क्रमाने केलेली असते.

नक्षत्रांची नांवे, त्यांच्या देवता, त्यांची लिंगे आणि प्रत्येक नक्षत्रांत असणाऱ्या तारकांची संख्या ह्यांच्या बाबतींत थोडेसे मतवैचित्र्य आढळून येते. नक्षत्रांच्या संपूर्ण याद्या तै. सं. (४·४-१०-१।३), तै. ब्रा. (१-५ आणि ३·१), अथर्व (१९·७·२-५), काठक सं. (३९·१३), मैत्रायणी सं. (२-१३-२०) ह्यांत दिल्या

आहेत. वेदांगज्योतिषामध्येही अशा याद्या आल्या आहेत. अथर्वण नक्षत्रकल्प ह्या ग्रंथात (अध्याय ४) नक्षत्रांच्या देवता आणि प्रत्येक नक्षत्रात किती तारे असतात हे सांगितले आहे. वराहमिहिरांने (बृ. सं. अ. ९७·४।५) अभिजित् धरून अश्विनीपासून रेवतीपर्यंतच्या सर्व नक्षत्रांच्या देवता अनुक्रमाने दिल्या आहेत.

मृगशीर्ष नक्षत्राच्या बाबतीत तै. ब्रा. आणि काठक सं. ह्यांत इन्वका हे नाव दिले आहे. आर्द्रा ह्याच्या ऐवजी बाहु, पुष्याच्या जागी तिष्य, स्वातीच्या जागी निष्ठ्या, श्रवणाच्या जागी श्रोणा, धनिष्ठाच्या जागी श्रविष्ठा, भरणीच्या जागी अपभरणी ही नावे निरनिराळ्या ग्रंथांत दिली आहेत. त्याचप्रमाणे दोन आषाढांच्या बाबतीत काही ग्रंथांत भग ही देवता सांगितली आहे आणि दुसऱ्या काहीमध्ये अर्यमन् ही देवता दिली आहे, चित्रा नक्षत्राची देवता काही ग्रंथांत इंद्र आणि काही ग्रंथात त्वष्टृ दिली आहे, मूल नक्षत्राची देवता काही ग्रंथात पितर आणि काहीत निर्ऋतिं दिली आहे.

तै. ब्रा. मध्ये कृत्तिकापासून विशाखापर्यतच्या १४ नक्षत्रांना **देवनक्षत्रे** आणि अनुराधापासून अपभरणी अथवा भरणी पर्यतच्या १४ नक्षत्रांना **यमनक्षत्रे** अशा संज्ञा दिल्या आहेत.

नक्षत्रांच्या निरनिराळ्या तपशिलात असणाऱ्या भेदांसंबंधी निरनिराळे तर्क करण्यात आले आहेत. कोणाच्या मते ही नक्षत्रे भारताने परकीयांकडून घेतली असावीत. जर ही २७ (अथवा २८) नक्षत्रे एकाचवेळी साकल्याने एखाद्या परकीय लोकांकडून घेण्यात आली असतीं तर त्यांच्या तपशीलात हल्ली अस्तित्वात आहेत इतके भेद उत्पन्न झाले नसते. उलटपक्षी नक्षत्रांची माहिती ह्या देशातच उत्पन्न झाली असेल तर शेकडो वर्षांच्या अवधीत साहजिकपणेच मतवैचित्र्य उत्पन्न होणे शक्य आहे. ज्या प्राचीन वेदसंहितांमध्ये संपूर्ण नक्षत्ररचनेची माहिती दिली आहे त्यांच्या रचनाकालानंतर अनेक (सहस्त्र नसले तरी) शतके होऊन गेल्यानंतर ग्रीस आणि सीरिया ह्या देशांतील ग्रंथ रचले होते.

नक्षत्रांची माहिती भारतीयांनी परकीयांपासून घेतली असावी अथवा ती येथेच उत्पन्न झाली असावी ह्या प्रश्नावर कडाक्याचे वाद झाले आहेत. त्या वादाचा तपशील ह्या सारांशग्रंथात देणे शक्य नाही. काही थोडे मुद्दे येथे देऊ. ह्यासंबंधात चिनी, अरब, बाबिलोनियन, ग्रीक इत्यादि लोकांचा उल्लेख करण्यात येतो. खगोलशास्त्राचे ज्ञान अरब लोकांनी भारतीयांपासून मिळविले असल्याचे त्यानीच मान्य केले आहे. चिनी लोकांच्या सिऊ संबंधीच्या शास्त्रात प्रथमतः २४ सिऊ होते आणि ख्रि. पू. ११०० च्या सुमारास सिऊ २८ असल्याचे मानण्यांत आले. वेदग्रंथांच्या कालच्या नक्षत्रांची संख्या २४ असल्याचा पुरावा सांपडत नाही. बाबिलोनियामध्ये अथवा चीनमध्ये नक्षत्रांचा धर्मकृत्यांशी संबंध जोडण्यात आलेला नव्हता. वेदकाली अग्न्याधान काही विशिष्ट नक्षत्रावरच करावे लागत असे. माघ, फाल्गुन, चैत्र इत्यादि महिन्यांची नावे विशिष्ट नक्षत्रांपासूनच बनविलेली आहेत आणि तशी नावे ग्रीक, लॅटिन अथवा चिनी भाषेत नसून फक्त संस्कृत भाषेतच अस्तित्वात आहेत. तै. सं. आणि तै. ब्रा. ह्यांच्या रचनाकालाइतक्या प्राचीन कालापासून ज्या देवता निरनिराळ्या नक्षत्रांच्या अधिष्ठात्र्या असल्याचे मानण्यात येते त्यांच्यापैकी बहुतेक सर्व देवता केवळ वेदांत उल्लेख केलेल्याच आहेत आणि त्यांच्या समान स्वरूपाच्या देवता बाबिलोनिया अथवा चीन ह्या देशांत अस्तित्वात नाहीत. वेदसंहितामध्ये ज्याप्रमाणे २७ अथवा २८ नक्षत्रांची व्यवस्थित यादी दिलेली आहे, त्याप्रमाणे सर्वही २७ अथवा २८ नक्षत्रांची व्यवस्थित यादी बाबिलोनियामध्ये आढळलेली नाही. नक्षत्रांच्या भारतीय नावांपैकी प्रायः सर्व नाव अर्थपूर्ण आहेत अथवा त्यांच्या संबंधी प्राचीन कथा उपलब्ध आहेत. उदाहरणार्थ, आर्द्रा शब्दाचा अर्थ 'ओला' असा आहे आणि त्या नक्षत्राला ते नांव देण्याचे कारण त्या नक्षत्रात सूर्याने प्रवेश केला म्हणजे पावसाला सुरुवात होते. तसेच पुनर्वसु ह्याचा अर्थ 'पुन्हा मिळालेले धन'

असा असून त्या नक्षत्राला ते नांव मिळण्याचे कारण बहुधा असे असावे की जमिनीत पेरलेली धान्ये एकदा पुरली जाऊन त्या नक्षत्रात रुजून नवीन संपत्तीच्या रूपाने पुन्हा वर येतात. पुष्य नक्षत्राला ते नाव पडण्याचे कारण त्या नक्षत्रात कोवळे अंकूर वृद्धिंगत होतात आणि पुष्ट होतात. अशा रीतीने भारतीयांनी नक्षत्रांची माहिती परस्थांपासून घेतली ह्या विधानाला पूर्वग्रह आणि तर्क ह्यांच्याशिवाय फारच अल्प पुरावा आहे. त्या विधानाला आधार म्हणून सांगता येण्यासारखा मुख्य पुरावा म्हणजे भारतीयांच्याप्रमाणेच चिनी अथवा बाबिलोनियातील लोकांत २८ नक्षत्रे होती हा आहे. परंतु बाबिलोनियातील अथवा चिनी लोकांनीच नक्षत्राबद्दलची माहिती भारतीयांच्या पूर्वजांपासून मिळविली असावी अथवा भारतीयांना आणि त्या दोन्ही देशातील लोकांना इतिहासपूर्वकाळी ती माहिती दुसऱ्याच एखाद्या समाजापासून मिळाली असावी असेही अनुमान करणे शक्य आहे. लो. टिळकांनी आपल्या 'ओरायन' नांवाच्या ग्रंथात (विशेषतः पान ६१-९५ वर) केलेल्या संशोधनावरून आणि प्रा. जाकोबीच्या संशोधनावरून निदान एवढे तरी स्पष्ट झाले आहे की नक्षत्रांची कृत्तिकादि यादी ही भारतीयांना ज्ञात असलेली सर्वात जुनी यादी नसून भारतीयांमध्ये एकेकाळी तिच्यापेक्षाही जुनी गणनापद्धति अस्तित्वात होती आणि त्या पद्धतीमध्ये दक्षिणायन मृगशीर्ष नक्षत्रात होत असे.

**नक्षत्र** हा शब्द नक्ष् (जाणे) ह्या धातूपासून झाला असल्याचे यास्कानी सांगितले आहे. परंतु शत. ब्रा. (२-१-२-१७/१८) मध्ये आणि तै. ब्रा. (२-७-१८) यांत तो शब्द न+क्षत्र ह्या दोन पदांपासून झाला असल्याचे सांगितले आहे आणि ती व्युत्पत्ति पाणिनी (६·३·७५) मध्ये मान्य केली आहे. एखादे धार्मिक कृत्य ज्या नक्षत्रावर करावयाचे असेल ते नक्षत्र कसे निश्चित करावे ह्याची रीति तै. ब्रा. मध्ये सांगितली आहे.

ऐत. ब्रा. च्या रचनाकालाइतक्या प्राचीन कालीदेखील वेदकालीन भारतीयांनी 'सूर्य' एकच असतो आणि तो केव्हाही मावळत नाही असा निर्णय केला होता. "सूर्य अस्ताला गेला असे जेव्हा लोकांना वाटते तेव्हा असे होत असते की सूर्य दिवसाच्या अंताला जाऊन पोचतो, मागे वळतो आणि खालच्या भागात रात्र उत्पन्न करतो आणि वरच्या बाजूला दिवस करतो. जेव्हा लोकांना प्रातःकाळी सूर्य उगवतो असे वाटते तेव्हा त्याचा अर्थ रात्रीच्या अंताला पोचल्यावर सूर्य माघारा वळतो, खालच्या भागात दिवस करतो आणि वरती रात्र करतो. वास्तविकपणे तो केव्हाही अस्त पावत नाही."(ऐत. ब्रा. ३·४४) ह्याच्या उलट जैनांच्या सूर्यप्रज्ञाप्ति ह्या ग्रंथात दोन सूर्य आणि दोन चंद्र असतात असे म्हटले आहे आणि ग्रीस देशातील हिराक्लीटस् (ख्रि. पू. ६ वे शतक) ह्या ग्रंथकाराच्या मताप्रमाणे प्रत्येक दिवशी एक नवा सूर्य जन्माला येतो आणि मरण पावतो. (इस्लर पा. ४२)

ब्राह्मणग्रंथांच्या रचनाकाली दिवस आणि रात्र समान अवधीच्या असणाऱ्या **विषुवत्** अथवा विषुव दिवसाचा भारतीयांना शोध लागला होता. तै. ब्रा. (१·२·३) मध्ये अशा दिवसाला **दिवाकीर्त्य** म्हटले असून तो एखाद्या पर्णकुटीच्या दोन्ही पाख्यांना जोडणाऱ्या बांबूप्रमाणे दोन अर्धवर्षाना जोडतो असे वर्णन केले आहे.

वरील विवेचनावरून वेदकालीन लोकांना खगोलशास्त्राचे ज्ञान किती होते हे दिसून येईल. अनेक युरोपियन पंडितांच्या मते ग्रीक संस्कृतीचा भारतीयांवर परिणाम होण्यापूर्वी भारतीयांना असलेले खगोलशास्त्राचे ज्ञान अल्प आणि प्राथमिक स्वरूपाचे होते. (थिबो. ग्रुंड्रिजा पा. ३) व्हिटने ह्या अमेरिकन संस्कृत पंडिताने तर असेही म्हटले आहे की निरीक्षण करणे, माहिती गोळा करणे, ती टिपून ठेवणे आणि तिच्या आधारावर अनुमाने काढून शोध लावणे ह्या गोष्टी करण्याची भारतीयांना पात्रता नाही आणि तिकडे

त्यांची अगदी प्राचीन काळापासून प्रवृत्तिही नाही. परंतु ह्याच्या उलट स्थिती स्वतःला बुद्धिमान समजणाऱ्या व्हिटने प्रभृति लोकांच्या पूर्वजांची होती आणि त्यांनी टॉलेमीनंतर १००० वर्षेपर्यंत खगोलशास्त्राच्या बाबतीत महत्वाचा असा एकही शोध लावला नव्हता. पृथ्वीच्या आकाराच्या बाबतीत शास्त्रीय ज्ञानाची घमेंड असणाऱ्या ग्रीक लोकांची मते वेदकालीन पुरोहित वर्गाच्या पूर्वजांच्या मतांपेक्षा फारशी प्रगत झालेली नव्हती. ग्रीक लोकांनी शास्त्रीय ज्ञानाच्या एक दोन शाखांमध्ये प्रगति केली असली तर जगातील इजिप्त, मेसापोटेमिया प्रभृति दुसऱ्या अनेक लोकांनी तितक्याच महत्वाच्या अन्य शाखात ग्रीक लोकांपेक्षा किती तरी आघाडी मारली होती. निदान आधुनिक काळच्या ग्रंथकारांनी तरी एका समाजाचा उपहास करून दुसऱ्या समाजाची अतिरिक्त प्रशंसा करण्याचे कारण नाही. उलटपक्षी अशा ग्रंथकारांनी जगातील प्राचीन लोकांनी केलेल्या महत्कृत्यांसंबंधी साधार, समतोल, निःपक्षपाती आणि सावधगिरीचे निर्णय करण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

वेदांची रचना कोणत्या काळी झाली ह्यासंबंधीची माहिती अत्यंत अनिश्चित स्वरूपाची आहे. दीक्षित, टिळक प्रभृति विद्वानांनी वेदकाल ख्रि. पू. ४००० अथवा त्यापेक्षाही पूर्वीचा असल्याचे प्रतिपादन केले आहे. मॅक्समुलर प्रभृति अनेक पाश्चात्य पंडितांनी तो काल ख्रि. पू. १५०० ते ख्रि. पू. ८०० असल्याचे ठरविले आहे. तो काल जरी गृहीत धरला तरीदेखील ख्रि. पू. ९०० अथवा ८०० वर्षापेक्षा निश्चितपणे प्राचीन असल्याचे ज्याला म्हणता येईल असे वाङ्मय ग्रीसमध्ये उपलब्ध नाही. होमरच्या कविता आणि हेसिआडचे ग्रंथ हेच ग्रीसमधील आज उपलब्ध असलेले सर्वात प्राचीन वाङ्मय आहे. होमर आणि हेसिआडच्या पूर्वी (अनेक सहस्र नसले तरी) अनेक शतके झालेले वेदाङ्गज्योतिष त्या दोन ग्रीक ग्रंथकारांच्या इतके तरी प्रगत झालेले होते. इजिप्तमध्ये सौर वर्षाची लांबी बऱ्याच सूक्ष्म प्रमाणात ठरविली होती. तथापि ती सिरीयस अथवा सोयी ह्या ताऱ्याच्या उदयास्ताच्या निरीक्षणावरून ठरविली जात असे आणि तो उदयास्त नाईल नदीच्या पहिल्या पुराशी प्रायः जुळत असल्याकारणाने त्या कामात गणिताची मुळीच आवश्यकता लागत नसे. ख्रि. पू. ८०० च्या सुमारास देखील टॉलेमीचे आणि हेसिआडचे खगोलशास्त्राविषयीचे ज्ञान तुटपुंजे होते. ख्रि. पू. १३० च्या सुमारास हिपार्कस् ह्या श्रेष्ठ खगोलशास्त्रज्ञाने तयार केलेली सूची ख्रि. पू. ७४७ वर्षापूर्वीच्या काळातील मेसापोटेमियांतील वेधांच्या माहितीवर आधारलेली होती. इ. स. १५० च्या सुमारास लिहिलेला टॉलेमीच्या अल्फजेष्ट हा ग्रंथ हिपार्कसने घेतलेल्या वेधांवर आधारलेला होता आणि टॉलेमीच्या पूर्वी होऊन गेलेल्या ग्रंथकारांसंबंधीची माहिती टॉलेमीच्या ग्रंथांवरूनच काय ती मिळते.

सिद्धान्ताच्या वर्गातील कोणत्याही भारतीय ग्रंथामध्ये भारतीय खगोलशास्त्राला कोणत्याही यवन ज्ञानाचा आधार असल्याचे मान्य केलेले नाही. वराहमिहिराने फलज्योतिष शास्त्रामध्ये ग्रीक पारिभाषिक संज्ञांचा जसा अंगीकार केला आहे त्याप्रमाणे खगोलशास्त्रावरील सिद्धान्तवर्गातील संस्कृत ग्रंथात सर्वस्वी ग्रीक भाषेतून आलेल्या पारिभाषिक शब्दांची संख्या फारशी मोठी नाही. वराहमिहिराने आपल्या करणग्रंथामध्ये उल्लेख केलेल्या पाच सिद्धांतापैकी दोहोंची नावे **रोमक** आणि पौलिश अशी आहेत, ह्या गोष्टीच्या आधारावर वेबरप्रभृति पंडितांनी असे प्रतिपादन केले आहे की भारतीयांच्या खगोलशास्त्रावर ग्रीक खगोलशास्त्राचा परिणाम झाला असल्याचे स्पष्ट दिसते. वराहमिहिराने आणि इतरांनी जे ३६।३७ ग्रीक शब्द खगोलशास्त्रावरील संस्कृत ग्रंथात वापरले असल्याचे म्हणण्यात येते त्यांच्या व्यतिरिक्त वराहाच्या पूर्वीच्या सिद्धान्तग्रंथांत खगोलशास्त्रातील सर्वस्वी ग्रीक शब्द किती वापरले आहेत हे कळले पाहिजे. रोमक सिद्धान्त हा अलेक्झांड्रिया येथील परंपरेतील आहे असे जरी वादाकरिता मान्य केले तरीही त्यावरून सर्व सिद्धान्तग्रंथांवर ग्रीक खगोलशास्त्राचा परिणाम झाला असल्याचे सिद्ध होत नाही. रोमक सिद्धांतग्रंथाला अनुसरणारा एखादा ग्रंथ अथवा मुख्यत्वे त्याच्या आधारावर तयार केलेले एखादे पंचांग मध्ययुगीन कालात

अस्तित्वात असल्याचा प्रायः मुळीच पुरावा नाही. रोमक सिद्धांताचे वर्ष ३६५ दिवस ५ तास ५५ मिनिटे १२ सेकंद इतक्या लांबीचे आहे, आणि ते वर्ष हिपार्कसने ठरविलेल्या आणि टॉलेमीने मान्य केलेल्या वर्षाशीं तंतोतंत जुळते. रोमक सिद्धांतामध्ये दिलेल्या नियमांना अनुसरून निघणारी फलें यवनपुरातून जाणाऱ्या याम्योत्तर वृत्तावरील असतात (आणि उज्ञयिनीतून जाणाऱ्या वृत्तावरील नसतात). असें असण्याचा संभव आहे की रोमक सिद्धान्त हा ग्रंथ संस्कृत भाषेतील असल्याकारणाने तो भारतांत स्थायिक झालेल्या आणि संस्कृताशी तसेच ग्रीक भाषेशी परिचय असलेल्या एखाद्या ग्रीक मनुष्याने केला असावा आणि त्या ग्रीक मनुष्याला टॉलेमीच्या पूर्वीच्या आणि बहुधा हिपार्कसच्याही पूर्वीच्या ग्रीक अथवा अलेक्झांड्रिया परंपरेच्या खगोलशास्त्राची माहिती असावी आणि वराहाने आपल्या करणग्रंथामध्ये त्या रोमक सिद्धांताचा सारांश दिला असावा. वराहाने, ग्रीक खगोलशास्त्राविषयीची आपली आदरवुद्धि उदार मनाने व्यक्त केली आहे आणि यवनांमध्ये ते शास्त्र चांगल्या रीतीने परिणत झाले असल्याचे म्हटले आहे. त्याने उल्लेख केलेले शास्त्र **होराशास्त्र** अथवा **फलज्योतिष**शास्त्रच असले पाहिजे. अशाच तऱ्हेचे प्रशंसोद्गार यवनांच्या खगोलशास्त्रातील आणि गणितशास्त्रातील प्राविण्याविषयी वराहाने कोठेही काढलेले नाहीत. ह्यावरून यवनांच्या खगोलशास्त्राचा दर्जा इतका मोठा असल्याचे वराह समजत नसावा अथवा निदान त्याने आपले खगोलशास्त्रातील सिद्धांत ग्रीक खगोलशास्त्रज्ञांच्या ग्रंथांच्या आधारावर काढलेले नसावेत. वराहाने आपल्या फलज्योतिषशास्त्रावरील ग्रंथांत जे ग्रीक शब्द वापरले आहेत त्यांच्या व्यतिरिक्त दुसरा क्वचितच ग्रीक शब्द त्याने खगोलशास्त्रांत वापरला आहे.

पुलीश हें नांव भारतीयेतर असल्याचे थिबोप्रभृति पाश्चात्य ग्रंथकार मानतात. तथापि पौलिश सिद्धांताचा ग्रीक पौलिश ग्रंथाशी काही संबंध नाही.

प्राचीन काळच्या ज्या भारतीयांनी पाणिनीच्या सूत्रांसारखी संस्कृतभाषेची व्यवस्थित रचना केली, ज्यांनी योगासारखी मनाचे नियंत्रण करण्याची पद्धति तयार केली, भाषेचा उच्चार करण्यासंबंधी प्रातिशास्य आणि शिक्षा हे ग्रंथ निर्माण केले, बुद्धिबलासारख्या खेळाचा शोध लावला, बीजगणितात प्राविण्य संपादन केले, अंकगणनेची दशमानपद्धती शोधून काढली, त्या भारतीयांना सूर्य, चंद्र आणि ग्रह ज्या गतीने पृथ्वीभोवती फिरतात असे मानले जाते त्या गतीची समजूत करून देण्याकरिता उपयोगी पडणारी पद्धति स्वतःच्या बुद्धीने, दुसऱ्या कोणाचे साहाय्य न घेता स्वतंत्रपणे शोधून काढता आलीच नसती असे मानण्याला काहीच कारण नाही.

टॉलेमीच्या ग्रंथात आणि भारतीय खगोलशास्त्रावरील ग्रंथांत अनेक महत्वाच्या बाबतीत भिन्नता आहे. त्यांनी सांगितलेल्या ग्रहांच्या प्रदक्षिणामार्गांच्या मर्यादा भिन्न प्रकारच्या आहेत. तसेच भारतीयांचे खगोलशास्त्रावरील ग्रंथ ग्रीक ग्रंथांच्या आधारावर केलेले आहेत असे दाखविण्यास प्रत्यक्ष पुरावा अस्तित्वात नाही. भारतीयांच्या ग्रंथांशी जुळते आहेत असे म्हणता येईल असे ग्रीक ग्रंथ सांप्रतकाळी अस्तित्वात नाहीत. संस्कृतमधील खगोलशास्त्रावरील अति विस्तृत वाङ्मय नष्ट झाले आहे ही गोष्ट वराहमिहिराच्या ग्रंथांवरून आणि त्या ग्रंथांवरील उत्पला टीकेत उद्धृत केलेल्या अवतरणांवरून स्पष्ट होते. अशा परिस्थितीत भारतीय खगोलशास्त्र ग्रीक लोकांपासून घेतलेले आहे असे पुनः पुनः प्रतिपादन करण्यापेक्षा आधुनिक काळच्या पाश्चात्य लेखकांनी निदान तूर्त तरी अनिर्णित वृत्ति ठेवणे बरे.

आता अत्यंत प्राचीन काळातील वेदसंहितांमध्येदेखील फलज्योतिषशास्त्रासंबंधी काय माहिती मिळते ह्याचा विचार करू. मानवी मनाला पुढे काय होणार हे समजण्याची अतिशय जिज्ञासा असते आणि

काही विशिष्ट काल आणि दृश्ये शुभसूचक असल्याचे आणि इतर काही अशुभ असल्याचे मानण्याकडे मनुष्याची प्रवृत्ति असते. एखाद्या व्यक्तीच्या जन्मकाळी सूर्य, चंद्र आणि ग्रह ह्यांच्या स्थानांच्या आधारावर त्या व्यक्तीला प्राप्त होणाऱ्या दशांसंबंधीभविष्य वर्तविणारे जे शास्त्र ते **फलज्योतिषशास्त्र** असे सांप्रतकाळी सामान्यतः समजले जाते. परंतु प्राचीन काळी त्या शब्दाचा तसा अर्थ नव्हता अथवा तो शब्द त्या एकाच अर्थाने वापरला जात नसे. प्रायः आकाशातील दृश्यांचा आणि ग्रहांच्या स्थानांचा विचार करून त्यावरून देशातील लोकांवर, राज्यकर्त्यांवर, शेतांतील पिके, पूर, वादळ इत्यादि संकटांबद्दलचे नजिकच्या भविष्यकाळात काय परिणाम होतील ह्याबद्दल भविष्य सांगणे हे प्राचीन ॲसिरियन लोकांकडून मिळवलेल्या फलज्योतिषशास्त्राचे स्वरूप आहे. ह्या शास्त्राला **नैसर्गिक फलज्योतिषशास्त्र** असे म्हणता येईल. कुंडलीवरून भविष्य दर्शित करणारे फलज्योतिषशास्त्र मागाहूनच्या काळी निर्माण झाले. स्वप्ने, पक्ष्यांची उड्डाणे आणि त्यांचे शब्द ह्यांच्या सारख्या इतर अनेक गोष्टींवरून पुढील भविष्य समजत असे आणि बाबिलोन आणि रोममध्ये देवाप्रीत्यर्थ केलेल्या यज्ञात मारण्यात आलेल्या मेंढीच्या यकृतावरील गूढ चिन्हांवरूनही भविष्य वर्तवीत असत.

ऋग्वेदामध्ये देखील शुभसूचक दिवसांचा वारंवार उल्लेख केलेला आढळतो. ऋ ३·८·५, ३·२३·४ इत्यादि ऋचांत 'सुदिनत्वे अह्नम' असे शब्द आले आहेत. काही शुभकृत्ये काही विशिष्ट नक्षत्रांवर केली जात असत. रोहिणी, मृगशीर्ष प्रभृति नक्षत्रे विवाहविधि करण्याला शुभ असल्याचे बौ. गृ. सू. (१·१·२०) मध्ये सांगितले आहे. प्राचीन वेदवचनांत 'नैसर्गिक फलज्योतिष' आणि 'वैय्यक्तिक' फलज्योतिष ह्यात स्पष्ट भेद केलेला दिसून येत नाही. तै. ब्रा. (१·८·४·२) मध्ये असे सांगितले आहे की मित्र देवता असणाऱ्या अनुराधा नक्षत्रावर लोकांनी आपली शेते नांगरावी. त्याच ग्रंथांत [यां कामयेत दुहितरं प्रिया स्यादिति तां निष्ट्यायां दद्यात् प्रियेवभवति नैव तु पुनरागच्छति।
तै. ब्रा. (१·५·२).] (१·५·२) असे सांगितले आहे की आपली कन्या तिच्या पतीला प्रिय व्हावी अशी इच्छा असणाऱ्याने तिचा विवाह स्वाती नक्षत्रावर करावा. अथर्ववेदाच्या इतक्या प्राचीन काळीदेखील अशी समजूत होती की ज्येष्ठा अथवा मूळ नक्षत्रावर अथवा एखाद्या दुष्ट नक्षत्रावर जन्मलेला मुलगा स्वतः तरी मरण पावेल अथवा आपल्या पित्याचा अथवा मातेचा मृत्यु घडवून आणील (अथर्व ६·११०·२-३).

अशा रीतीने अत्यंत प्राचीन वैदिक काळी देखील जन्मनक्षत्राला अनुसरून अथवा शुभ अथवा अशुभ समजल्या जाणाऱ्या नक्षत्रांना अनुसरून भविष्य वर्तविले जात असे. (तै. ब्रा. १·५·२·१. अथवा ३·१·२·८) पाणिनीच्या पूर्वीच्या काळापासून पुष्य नक्षत्र अत्यंत शुभ नक्षत्र मानले जात असे. त्याने त्या नक्षत्राला 'सिद्ध' असे म्हटले आहे. तथापि त्या काळी काही नक्षत्रांवर ग्रहांच्या परिणामांविषयी नियम बनविलेले नसावेत असे दिसते. गुरूचा पुष्य नक्षत्रावर परिणाम होतो असे मात्र मानले जात असे हा कदाचित अपवाद समजावा लागेल. त्याकाळी मुख्यत्वेकरून नक्षत्रे, दिवस आणि निसर्गातील घटना आणि शरीरावरील चिन्हे ह्यांच्यावरूनच भविष्य वर्तविण्यात येत असे. बृ. सं. (९८·१४) मध्ये सांगितले आहे की प्रवासाला निघालेल्या मनुष्याला त्याने पूर्वजन्मात केलेल्या शुभाशुभ कृत्यांचे परिणाम पक्षी दर्शित करितात. वराहमिहिराच्या योगयात्रा (अ. १४) आणि अद्भुतसागर (पा. ५६९-५८२) ह्या ग्रंथांत पक्षी आणि इतर प्राणी ह्यांच्या योगाने दर्शित होणाऱ्या शकुनांसंबंधी सविस्तर विवेचन केले आहे.

शुभाशुभ दिवसांच्या आणि नक्षत्रांच्या कल्पनांवर अवलंबून राहण्याचा असा परिणाम झाला की काही लोक अशा गोष्टींकडे काळजीपूर्वक पाहू लागले आणि 'नक्षत्रविद्या' नांवाचे शास्त्र निर्माण झाले. अशा प्राचीन काळी देखील आपणास ताऱ्यांवरून भविष्य कळते असे सांगून भोळ्या भावार्थी लोकांना फसविणारे

कांही लोक असले पाहिजेत आणि त्यांच्यावरून फलज्योतिषाचा व्यवसाय करून उपजीविका करणाऱ्या 'नक्षत्रदर्श, नक्षत्रजीविन्, नक्षत्रादेशवृत्ती, गणक' इत्यादि संज्ञा असणाऱ्या ज्योतिषांची ख्रिस्तापूर्वी अनेक शतके इतक्या काळापासून अतिशय निंदा करण्यात येत असे. वाज. सं. [ प्रज्ञानाय नक्षत्रदर्शमाशिक्षायै प्रश्निनं। वाज. सं. (३०·१०).] (३०-१० आणि २०), आणि तै. ब्रा. (३-४-४) ह्यांत नक्षत्रदर्शाला प्रज्ञानाला बळी पडलेला म्हटले आहे. मनु (३-१६२) मध्ये अशा ब्राह्मणांना देवकार्यांत अथवा श्राद्धाकरिता आमंत्रण करू नये असे म्हटले आहे. हारित आणि लिखित ह्यांच्या प्राचीन सूत्रांत नक्षत्रजीविन् ह्यांना इतर ब्राह्मणांच्या पंक्तिमध्ये बसण्याला अपात्र मानले आहेत (कृत्य कल्प. श्राद्धप्रकरण पा. ८८).

कौटिल्याने नक्षत्रावरून बोधित होणाऱ्या ज्योतिषावर अतिरिक्त अवलंबून राहणे आणि त्या ज्योतिषाचा व्यवसाय करणे ह्या गोष्टी गर्हणीय मानल्या होत्या. (अर्थशास्त्र, अधिकरण ९ प्र. क्र. ४) तथापि त्याने अशा भविष्याकडे सर्वस्वी दुर्लक्ष केले नव्हते. अर्थशास्त्र (१-९) मध्ये राजाच्या पुरोहिताच्या अंगी अवश्य असणाऱ्या गुणांचे वर्णन करताना असे म्हटले आहे की त्याला दैवी आणि इतर चिन्हांचे चांगले ज्ञान असावे, त्याला दैवी आणि मनुष्यकृत आपत्तींचे निवारण अथर्ववेदात सांगितलेल्या उपायांनी करता येत असावे. कौटिल्यानंतर कांही शतकांनी झालेल्या याज्ञ. स्मृतीमध्ये देखील [पुरोहितं प्रकुर्वीत दैवज्ञमुदितोदितम्। दण्डनीत्यां च कुशलमथर्वाङ्गिरसे तथा ॥
याज्ञ. स्मृति (१·३१३).] (१-३१३) जवळजवळ कौटिल्यासारखाच नियम सांगितला आहे.

नक्षत्रावर अवलंबून असणाऱ्या फलज्योतिषशास्त्राच्या विकासाचा दुसरा एक टप्पा दुसऱ्या काही ग्रंथांवरून दिसून येतो. ह्या स्थितीतील फलज्योतिष कांहीसे कुंडलीवर आधारलेल्या फलज्योतिषशास्त्राच्या धर्तीचे होते. अशातऱ्हेच्या ज्योतिषशास्त्राचे अस्पष्ट उल्लेख फारशा प्राचीन काळच्या ग्रंथांत मिळत नाहीत. वैखानस स्मार्त सूत्र (४·१४) मध्ये जन्म, कर्म, सांघातिक, सामुदायिक आणि वैनाशिक अशा संज्ञा असणाऱ्या नक्षत्रांचा उल्लेख केला आहे. ह्या संज्ञांचा खुलासा वराहकृत योगयात्रा ह्या ग्रंथांत (९·१-३ आणि १०) केलेला आढळतो. एखाद्या मनुष्याचा ज्या नक्षत्रावर जन्म झालेला असेल तें **आद्य** (पहिलें), त्याच्यापासून दहावे नक्षत्र **कर्म**, १६ वे नक्षत्र **सांघातिक**, १८ वे नक्षत्र **समुदाय**, २३ वे **वैनाशिक** (अथवा मृत्युसंबंधी), २५ वे **मानस**. अशा रीतीने सर्व मनुष्यांचा ह्या नक्षत्रांशीं संबंध असतो आणि राजाचा (त्याच्या जातीशी, देशाशी, राज्याभिषेकाशी संबंध असणाऱ्या) आणखी **तीन** नक्षत्रांशी (म्हणजे एकूण ९ नक्षत्रांशी) संबंध असतो. ह्या नक्षत्रांवरून बोधित होणाऱ्या फलांसंबंधीचे नियमही त्या ग्रंथात सांगितले आहेत. ही नक्षत्रे दूषित झाली तर वाईट फले मिळतात. राजाच्या **जातीशी** संबंध असणारी नक्षत्रे कोणती हेही त्यात सांगितले आहे. उदाहरणार्थ, तीन पूर्वा आणि कृत्तिका ही ब्राह्मण जातीच्या राजाची नक्षत्रे असतात. **देशाशी** संबंध असणाऱ्या नक्षत्रांबद्दलचे नियम बृ. सं. (अध्याय १४) मध्ये सांगितले आहेत. टॉलेमीनेही देशाशी संबंध असणाऱ्या राशी सांगितल्या आहेत. परंतु वराह आणि टॉलेमी ह्यांच्यामध्ये काही भेद आहेत : टॉलेमीने त्या काळी ज्ञात असलेल्या सर्व देशांचा विचार केला आहे परंतु वराहाने फक्त भारतापुरताच विचार केला आहे. वराहाला टॉलेमीच्या ग्रंथाची जर माहिती असती तर त्याने भारताबाहेरील देशांसंबंधी देखील टॉलेमीचे अनुकरण केले असते. वराहाने भारताच्या पूर्वेपासून ईशान्येपर्यंतच्या आठ दिशांचे आठ आणि मध्य भागाचा एक मिळून ९ विभाग केले असून कृत्तिकापासून तीन तीन नक्षत्रांचा एक एक समूह त्या भागाला लावून दिला आहे. ह्या नक्षत्रांचा समूह जर सूर्य, मंगळ अथवा शनि ह्यांच्या योगाने दूषित झाला तर ते ते विभाग संकटापासून पीडित होतात. वराहाने राशींचा उल्लेख केला नाही. ही माहिती मार्कंडेय पुराण (५८-१०।५४), पराशर (अद्भुतसागर पा. २७१।२७४) आणि विष्णुधर्मोत्तर पुराण (१-८६-१।९), ह्यातही काही भेदाने दिली आहे. १२ राशि आणि १२ भाव (स्थाने) ह्यांच्या आधारावर असलेल्या

फलज्योतिषशास्त्रामध्येही पहिल्या स्थानापासून १० व्या स्थानाला **कर्म** अशी संज्ञा असून ८ व्या स्थानाला **मृत्यु** (विनाश) ही संज्ञा आहे.

महाभारत आणि रामायण ह्या ग्रंथांत अनेक ठिकाणी निरनिराळे ग्रह काही विशिष्ट नक्षत्रांत असताना सर्वसाधारण जनतेवर, युद्ध करणाऱ्या सैन्यावर आणि व्यक्तींवर अरिष्ट येणार असल्याचे सूचित होते अशी वर्णने आली आहेत. उदाहरणार्थ, रामायण युद्ध. १०३-३० आणि ३३; भीष्म ३·१२, १३ इ. उद्योग [प्राजापत्यं हि नक्षत्रं ग्रहस्तीक्ष्णो महाद्युतिः।
शनैश्चरः पीडयति पीडयन् प्राणिनोऽधिकम् ॥
उद्योगपर्व (१४३·८).] १४३।८।९ इत्यादि महाभारतात ग्रहांची स्थाने, नक्षत्रे आणि तिथि ह्यांचे उल्लेख अनेक वेळा आले आहेत. त्यांची परस्परांशी एकवाक्यता करणे अशक्यप्राय आहे. महाभारतात मंगळ, शनि ह्या ग्रहांसंबंधी अनेक ठिकाणी उल्लेख आले आहेत. ह्या बाबतीत एक अत्यंत उल्लेखनीय गोष्ट अशी आहे की निरनिराळे ग्रह कोणकोणत्या राशीत आहेत ह्याविषयी अथवा मंगळवार, रविवार ह्यांच्यासारख्या वारांविषयी एकदाही उल्लेख केला नाही.

आथर्वणज्योतिषामध्ये नक्षत्रावर आधारित फलज्योतिषासंबंधी काही अंशी निराळी रचना सांगितली आहे. त्यांत २७ नक्षत्राचे प्रत्येकी ३ असलेले नऊ समुच्चय सांगितले असून प्रत्येक समुच्चयातील प्रत्येक नक्षत्रात आणि त्याच समुच्चयांतील पुढील नक्षत्रात ९ चे अंतर आहे. निरनिराळ्या समुच्चयांना जन्म, कर्म, संपत्कर, विपत्कर इ. नांवे दिली असून त्यावरून १२ भाव असलेली कुंडली करण्याच्या दिशेकडे प्रगति झाल्याचे दिसून येते. उदाहरणार्थ, जन्म हे नाव कुंडलीमधील तनु अथवा लग्न ह्या भावाशी जुळते, आणि दोहोंची फलेही समान आहेत. संपत्कर हे नाव कुंडलीमधील 'धन' संज्ञा असलेल्या दुसऱ्या भावाशी जुळते आहे. अथर्वज्योतिषात आलेली वर उल्लेख केलेली नावे बृहद्योगयात्रा (पृ.५ व ४·१७), विष्णुधर्मोत्तर (२·१६६) यात आणि शारदातिलक (२·१२५।१२६) [जन्मसम्पद्विपत्क्षेम प्रत्यरिः साधको वधः।
मित्रं परममित्रं च जन्मादीनि पुनः पुनः ॥
शारदातिलक (२·१२५।१२६)] ह्या तांत्रिक ग्रंथांत देखील आली आहेत.

हल्ली उपलब्ध असलेल्या जातकग्रंथात सांगितलेल्या भावांच्या नावांसारखी निदान ५ नावे आथर्वण ज्योतिषात दिली आहेत ही लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे. सध्या उपलब्ध असलेल्या आथर्वणज्योतिषाची रचना केव्हा झाली हे सांगणे अवघड आहे. काही झाले तरी प्रस्तुत उपलब्ध असलेली त्या ग्रंथाची संहिता ख्रि. पू. दुसऱ्या अथवा पहिल्या शतकाच्या पूर्वीची असल्याचे म्हणता येणार नाही, आणि कदाचित ती त्या कालाच्या नंतरही काही वर्षांनी झाली असण्याचा संभव आहे. प्रस्तुतच्या संहितेमध्ये त्याकाळी प्रचलित असलेल्या कल्पनांचा फक्त संग्रह केला असावा आणि म्हणून त्यात दिलेली (जन्म, संपत, नैधन इ.) नावे त्या संहितेच्या रचनाकालापूर्वी अनेक शतके सुपरिचित असावी. विष्णुधर्मोत्तर पुराणही त्या काळी ज्ञात असलेल्या अनेक विद्यांच्या संग्रहाच्या स्वरूपाचे आहे आणि त्याची रचना इ. स. च्या ४ थ्या आणि ६ व्या शतकांच्या दरम्यानच्या कोणत्या तरी काली झाली असावी.

एखाद्या व्यक्तीने करावयाच्या धर्मविधींकरिता शुभकाल कोणते हे शास्त्रात सांगितले होते. उदाहरणार्थ, आप. गृ. (१·२·१२-१३ आणि १६) मध्ये म्हटले आहे की शिशिर ऋतूमधील पौष आणि माघ हे महिने आणि ग्रीष्मातील आषाढ महिना ह्यांच्या व्यतिरिक्त बाकीचे सर्व ऋतु आणि पुण्य म्हटली जाणारी नक्षत्रे विवाहाला योग्य असतात; पूर्वमीमांसासूत्रात (६·८·२३) [उदगयनपूर्वपक्षाहः पुण्याहेषु दैवानि स्मृतिरूपान्यर्थदर्शनात्।
पूर्वमीमांसासूत्र (६·८·२३).] असे म्हटले आहे की देवांप्रीत्यर्थ करावयाचे सर्व विधि उत्तरायण, शुक्ल पक्ष

यात आणि पुण्य (शुभ) नक्षत्रावर करावयाचे असतात. अशा रीतीने ब्रा. ग्रंथांच्या आणि सूत्रांच्या काली (म्हणजे ख्रि. पू. अनेक शतके) **पुण्यकारक** नक्षत्रें ही बहुतेक सर्व वैदिक आणि कौटुंबिक विधींमध्ये एक अत्यावश्यक बाब होती. प्राचीन शास्त्रग्रंथांत तिथीचा उल्लेख क्वचित केला जात असे, राशीचा आणि वाराचा उल्लेख केला जात नसे. बहुतेक सूत्रांत देखील उपनयन अथवा विवाह ह्यांच्यासारख्या संस्काराकरिता देखील विहित काल सांगताना गुरु आणि शुक्र ह्या ग्रहांचा उल्लेख केला जात नसे. एखाद्या गुह्यसंस्काराकरिता अथवा एखादे कार्य अंगीकृत करण्याकरिता पुण्यदिवस अथवा पुण्यनक्षत्र शोधून काढण्याच्या अटीला मध्ययुगीन कालातील संस्कृत ग्रंथात '**शुभ मुहूर्त** शोधणे' असे म्हटले आहे. ह्याकरिता **मुहूर्त** ह्या शब्दाचा अर्थ आणि इतिहास ह्यांचे विवेचन करणे अवश्य आहे.

# प्रकरण १६

## मुहूर्त

(मू. ग्रं. पा. ५·५३७-६०३)

**मुहूर्त** हा शब्द ऋग्वेदामध्ये दोन ठिकाणी (३·३३·५ आणि ३·५३·८) आला आहे. त्या दोन्ही ठिकाणी त्याचा अर्थ 'थोडा काळ, थोडे क्षण' असा आहे. शत. ब्रा. (१०·४·२·१८ आणि १२·३·२·५) यात मुहूर्त ह्या शब्दाचा अर्थ 'दिवसाचा पंधरावा भाग' असा आहे. तै. ब्रा. (३·१०·१·१-३) मध्ये दिवसाच्या १५ आणि रात्रीच्या १५ मुहूर्तांची नावे दिली आहेत. ऋग्वेदाचे वेदांगज्योतिष (श्लो. ७) यात असे सांगितले आहे की दोन नाडिकांचा (घटिकांचा) एक मुहूर्त होतो आणि सर्वात दीर्घ दिवसामध्ये आणि सर्वात लहान दिवसामध्ये सहा मुहूर्तांचे (१२ घटिकांचे) अंतर असते. हा दुसरा अर्थ मनु (१·६४), कौटिलीय (२·२०), वायु (५०·१६०) प्रभृति अनेक ग्रंथांत आला आहे. तेव्हा निदान प्राचीनकाळच्या ब्राह्मणग्रंथांच्या काळापासून तरी मुहूर्त ह्या शब्दाचा हा दुसरा अर्थ प्रचलित आहे.

तै. ब्रा. मध्ये दिलेल्या नावांहून भिन्न प्रकारची मुहूर्तांची नावे दुसऱ्या काही ग्रंथांत आढळतात. त्यावरून मुहूर्ताची नावे निदान दोन वेळी दिली गेली असावी असे दिसते. कालांतराने मुहूर्ताची नावे मागे पडली आणि वराहमिहिराच्या ग्रंथाच्या काळी ती प्रायः लुप्त झाली आणि दिवस आणि रात्र मिळून होणाऱ्या ३० मुहूर्तांच्या देवतांची नावे तेवढी शिल्लक राहिली. वराहमिहिराने बृ. सं. (४२·१२ आणि ९८·३) मध्ये अहोरात्रीतील मुहूर्तांचा जरी उल्लेख केला असला तरी त्याने त्यांची नावे दिली नाहीत. त्याच्याच बृ. योगयात्रा (६·२-४) ह्या ग्रंथात मुहूर्ताच्या देवतांची नावे दिली आहेत. बृ. सं. (९८·३) मध्ये त्याने असा नियम सांगितला आहे की 'जी कृत्यें काही विशिष्ट नक्षत्रांवर करावी असे सांगितले असेल ती कृत्ये त्या नक्षत्राच्या ज्या देवता असतील त्याच देवता असणाऱ्या तिथींवर अथवा करणांवर आणि मुहूर्तावर करण्यास प्रत्यवाय नसतो; त्यांच्या देवता समान असल्याकारणाने असे केल्याने कार्यसिद्धि होते.' उदाहरणार्थ, जर एखादे विशिष्ट कृत्य आर्द्रा नक्षत्रावर करावे असे सांगितले असेल तर ते कृत्य शिव मुहूर्तावर (दिवसातील पहिल्या मुहूर्तावर) केले तरी चालेल कारण त्या नक्षत्राची आणि त्या मुहूर्ताची देवता रुद्र हीच आहे. आथर्वण ज्योतिष (२·१-११ आणि ३·१-६) मध्ये दिवसाच्या कोणत्या मुहूर्तावर कोणती कृत्ये करावी ह्याविषयी विवेचन केले आहे.

अहोरात्रातील (प्रत्येकी २ घटिका असणारे) काही मुहूर्त शुभ असल्याचे ठरविले गेल्या कारणाने मुहूर्त ह्या शब्दाचा तिसऱ्या प्रकारचा अर्थ 'एखादे शुभ कृत्य करण्याला विहित असा काल' असा होऊ लागला आणि मध्ययुगीन काळात झालेल्या धर्मशास्त्रावरील ग्रंथांमध्ये मुहूर्त हा शब्द ह्या तिसऱ्या प्रकारच्या अर्थाने अनेक वेळा योजिला आहे.

ह्या तिसऱ्या अर्थाच्या मुहूर्ताला कोणकोणत्या गोष्टी लागतात हे चांगल्या रीतीने समजण्याकरिता ग्रह, बारा भाव (म्हणजे कुंडलीतील १२ स्थाने) आणि राशि ह्यांची काही माहिती असणे अवश्य आहे.

ह्या विषयांवरील विवेचनाला प्रारंभ करण्यापूर्वी ख्रि. पू. ४ थ्या शतकापासून भारतातील श्रेष्ठ प्रतीच्या बुद्धिमंतांच्या देखील मनात झालेल्या विचारक्रांतीचा उल्लेख करणे अगत्याचे आहे. मागे सांगितल्याप्रमाणे नक्षत्रादर्श, गणक आणि फलज्योतिष सांगण्याचा व्यवसाय करणाऱ्या ब्राह्मणांविषयी

प्राचीनकाळी चांगल्या प्रकारची भावना नव्हती आणि अशा ब्राह्मणांना श्राद्धाला आमंत्रण करण्यास अपात्र समजत असत. तथापि ख्रि. पू. ५००।६०० च्या सुमारास फलज्योतिषाला विशेषतः राजाच्या बाबतीत सर्वात महत्वाचा मानणारा एक लहानसा समाज अस्तित्वात होता. पुरोहिताच्या अंगात कोणते गुण असावे हे सांगताना गौ. ध. सू. (११·१२-१३, १५-१६) मध्ये असे म्हटले आहे की दैव (फलज्योतिष) आणि उत्पातांवरून बोधित होणारी फले ह्यांचे ज्ञान असणाऱ्याचा राजाने सत्कार करावा कारण देशाचे आणि राजाचे योगक्षेम ज्योतिषी आणि उत्पातचिन्तक ह्यांच्यावर अवलंबून असते. ही भावना बळावत जाऊन याज्ञवल्क्यासारख्या श्रेष्ठ स्मृतिकाराने (इ. स. चे १ ले शतक) असे स्पष्ट सांगितले आहे की एखाद्याच्या कुंडलीमध्ये जो ग्रह दुष्टस्थानी असेल त्याची प्रयत्न पूर्वक पूजा करावी (याज्ञ. ३०७-३०८). ब्रह्मदेवाने ग्रहांना असा वर दिला होता की तुमची पूजा केली असता तुम्हीं त्या पूजकाला सौख्य देऊन त्याचा आदर करा. ह्या करिता ग्रहांना अतिशय पूज्य मानले पाहिजेत. तथापि याज्ञवल्क्याने (१-३४९, ३५१) [दैवे पुरुषकारे च कर्मसिद्धिर्व्यवस्थिता।
यत्र दैवमभिव्यक्तं पौरुषं पौर्वदेहिकम् ॥
यथा ह्येकेन चक्रेण रथस्य न गतिर्भवेत्।
एवं पुरुषकारेण विना दैवे न सिध्यति ॥ याज्ञ.—१-३४९, ३५१.] असेही सांगितले आहे की पुरुषप्रयत्नाच्या अभावी दैव यशस्वी होऊ शकत नाही. दैव हा देखील पूर्वजन्यांतील फलोन्मुख झालेला पुरुषप्रयत्नच असतो. दैव आणि पुरुषप्रयत्न ह्यांच्या तुलनात्मक महत्वाविषयी धर्मशास्त्रावरील ग्रंथांत आणि विशेषतः महाभारतात पुष्कळ वेळा चर्चा केलेली असते आणि त्यात दैव अथवा पुरुषप्रयत्न ह्यांच्यापैकी एकाला प्रबल समजणारे आणि ह्या दोहोच्यामध्ये समन्वय करणारे असे तीन प्रकारचे विचार आढळतात आणि त्या तीनही मतांना आधारही दिलेले असतात. अशी स्थिति असूनदेखील राजापासून रंकापर्यंत प्रायः प्रत्येक मनुष्य फलज्योतिषाच्या पूर्णपूणे आहारी गेलेला होता आणि सांप्रतकाळीही उच्च शिक्षण घेतलेल्या भारतीयांच्या मनावरदेखील फलज्योतिषाचे मोठे वजन आहे.

कुंडलीच्या आधारावर भविष्य सांगणाऱ्या आणि व्यक्तीचा विचार करणाऱ्या फलज्योतिषशास्त्राला **होराशास्त्र** अथवा **जातक** असे नाव आहे. वराहमिहिराच्या काळचे विद्वान लोकदेखील होरा ह्या शब्दाचे मूळ विसरून गेले होते. बृ. जा. (१·३) मध्ये म्हटले आहे की कोणाकोणाच्या मताप्रमाणे 'होरा' हा शब्द अहोरात्र ह्या शब्दामधील पहिले आणि अंत्य अक्षर गाळून झाला आहे. होराशास्त्रावरून मनुष्याने पूर्वजन्मांत केलेल्या बऱ्या-वाईट कर्मांचा परिणाम काय होणार आहे हे सुगम रीतीने समजून येते. अशा रीतीने वराहमिहिराने कर्म आणि पुनर्जन्म ह्यांच्या सिद्धान्ताचा होराशास्त्राशी संबंध जोडला आहे. अशाच प्रकारची मते मध्ययुगीन काळात होऊन गेलल्या ग्रंथकारांनी व्यक्त केली आहेत. उदाहरणार्थ रघुनंदनाने आपल्या उद्वाहतत्व ह्या ग्रंथांत (पा. १२५) म्हटले आहे की ग्रह मनुष्याला एखादे कृत्य करण्याला भाग पाडित नसून कुंडलीवरून त्या व्यक्तीच्या पूर्वजन्मांत कोणकोणती पातके घडली होती हे दर्शित होते आणि त्या कर्मांना अनुसरून त्याच्या आयुष्यांत कोणकोणत्या गोष्टी घडण्याचा **संभव** आहे एवढेच समजून येते. तथापि वराहमिहिराने कित्येक वेळा फलज्योतिषासंबंधी निश्चित स्वरूपाची भाषाही वापरलेली आढळते.

फलज्योतिषशास्त्रावर दृढविश्वास असणारा एकटा भारत देशच नसून अलेक्झांडरच्या नंतरच्या ग्रीक लोकांचाही फलज्योतिषशास्त्रावर दृढविश्वास होता. बायबल ह्या ख्रिस्ती धर्माच्या ग्रंथाच्या पूर्वार्धात (जुन्या करारात) भविष्यकथन करणाऱ्या खाल्डिया देशातील लोकांचा उल्लेख केला आहे. खाल्डिया देशांतील लोक असे मानित असत की पाच ग्रह विशेषेकरून मनुष्याच्या भवितव्यावर सत्ता चालवित असतात आणि ते पाच ग्रह आणि बाबिलोनमधील लोकांच्या पाच देवता एकच होत. अलेक्झांडरने बाबिलोन जिंकून घेतल्यानंतर त्या देशातील फलज्योतिषशास्त्रवेत्ते ग्रीसमध्ये येण्याजाण्यास प्रारंभ झाला

आणि त्यांचा ग्रीक लोकांवर लवकरच पूर्ण पगडा पडला. त्यापूर्वी ग्रीसमधील लोक देवांना कौल लावून, स्वप्नांचा अर्थ करून, पक्ष्यांच्या उड्डाणावरून आणि स्वरांवरून आणि ग्रहणासारख्या अद्‌भुत दैवी घटनांवरून भावी गोष्टी जाणण्याचा प्रयत्न करीत असत.

ख्रि. पू. दुसऱ्या शतकात फलज्योतिषशास्त्राचा ग्रीसमधून रोममध्ये प्रवेश झाला आणि राशिचक्रांतील स्थानांची नावे ग्रीस आणि रोममध्ये सर्वत्र रूढ झाली. ग्रीक भाषेतील टॉलेमी ह्या ग्रंथकाराचा टेट्राबिल्बास हा ग्रंथ जवळजवळ १४०० वर्षे पर्यंत सर्वमान्य समजला जात असे आणि फलज्योतिषशास्त्रावर श्रद्धा असणारे लोक अद्यापि देखील तो ग्रंथ मोठा आधारभूत असल्याचे मानतात.

पुढे काही कारणांनी फलज्योतिषशास्त्राचे प्राबल्य युरोपखंडात कमी झाले. तथापि अद्यापि देखील युरोप आणि अमेरिकन संयुक्त संस्थाने यातील प्रंचड खप असणाऱ्या वर्तमानपत्रांत निरनिराळ्या राशींच्या लोकांची पुष्कळ वेळा मोघम-स्वरूपाची भविष्ये दर आठवड्याला प्रसिद्ध होत असतात. असे म्हणतात की एकट्या अमेरिकन संयुक्त संस्थानात सुमारे २५००० नोंदलेले फलज्योतिषी आहेत.

इंग्लंडमध्ये फलज्योतिषशास्त्राचे फार प्राबल्य होते ही गोष्ट त्या भाषेत असलेल्या फलज्योतिषशास्त्रातील काही पारिभाषिक शब्दांवरून दिसून येते. उदाहरणार्थ, 'मर्क्युरिअल' (बुधासारखा म्हणजे चंचल) स्वभाव 'सटर्नाइट' (शनीसारखा म्हणजे क्रूर) स्वभाव, 'ल्यूनाटिक' (चंद्राचा प्रभाव पडलेला म्हणजे विकृत मनाचा), 'ॲस्पेक्ट' (म्हणजे दृष्टि), 'कंजंक्शन' (युति), 'ॲसेंडंट' (उच्चीचा) इ.

फलज्योतिषशास्त्राच्या समर्थनार्थ टॉलेमीने (टेट्राबिल्बास १-२) जी कारणे सांगितली आहेत त्यांचा मथितार्थ असा आहे की जर सूर्य पृथ्वीवर निरनिराळे ऋतु उत्पन्न कंरतो, चंद्र समुद्रात भरती-ओहोटी घडवून आणतो, ग्रहांच्या स्थितीवरून वादळ, वाऱ्याची विशिष्ट चिन्हे इत्यादि घटना कळून येतात, तर एखाद्या व्यक्तीच्या जन्माच्या वेळच्या ग्रहांच्या परिस्थितीवरून त्या व्यक्तीचे शरीर, मन, स्वभाव ह्यांच्याविषयी भविष्य सांगता येणे शक्य आहे. त्याने असेही म्हटले आहे की एखाद्या व्यक्तीचे भवितव्य ठरविण्याला त्या व्यक्तीच्या जन्माच्या वेळची ग्रहांची परिस्थिति एवढा एकच आधार नसतो तर त्या व्यक्तीचा देश, समाज, त्या समाजातील रूढि, त्याच्या काळची परिस्थिति ह्यांच्या सारख्या इतर गोष्टींचेही भविष्यकथनाला महत्वाचे साह्य होते. राजमार्तंड (श्लोक ३९९-४०१) सारख्या भारतीय ग्रंथात देखील असे म्हटले आहे की ज्योतिष्याने लोकांच्या रूढींना अनुसरून चालावे. आपल्या स्वतःच्या कुलाचाराच्या आणि देशाचारांच्या विरुद्ध विद्वान मनुष्याने केव्हाही वर्तन करू नये.

टॉलेमीने असेही प्रतिपादन केले आहे की फलज्योतिषशास्त्र शक्य स्वरूपाचे आहे इतकेच नसून ते उपयुक्तही आहे. कारण एखाद्या संकटाची पूर्वसूचना मिळाल्यास मनुष्य त्यासंबंधी खबरदारी घेऊ शकतो. टॉलेमीने दिलेली कारणे अतिशय चातुर्याने मांडली आहेत आणि त्यांना थोडेसे शास्त्रीय स्वरूप असल्यासारखे दिसते. तथापि ती कारणे काहीशी मोघम स्वरूपाची असून सयुक्तिक अथवा खात्री पटविण्यासारखी तर मुळीच नाहीत.

**मुहूर्त** (म्हणजे एखादे कार्य करण्याला शुभ वेळ) ह्या विषयावर अनेक ग्रंथ आहेत. ग्रहांच्या शुभ दृष्टीला अनुसरून उपनयन आणि विवाह ह्यांच्या संबधी, घर बांधणे आणि गृहप्रवेश इत्यादि संबंधी अनेक नियम तसेच अंगावर पाल पडणे ह्यांच्यासारख्या शकुनासंबंधी अनेक नियम असून ते प्रस्तुत ग्रंथकाराच्या

लहानपणी पाळण्यात येत असत आणि जरी ह्या बाबतीत हळूहळू शिथिलता वाढत असली तरी अद्यापि देखील बरेच लोक ते नियम पाळतात. शकुनांच्या बाबतीत वराहमिहिराने (बृ. यो. २३·१) देखील असे तत्व प्रतिपादन केले आहे की मनुष्यांनी पूर्व जन्मात केलेल्या शुभाशुभ कर्माचीं फले प्रवासाला अथवा स्वारीवर निघतेवेळी शकुनांच्या रूपाने दिसून येतात.

श्मश्रु करणे, नूतन वस्त्र परिधान करणे ह्यांच्यासारख्या कृत्यांपासून विवाहासारख्या महत्वाच्या कार्यापर्यंत सर्व कृत्यांना मुहूर्त पाहण्याच्या कल्पनेने लोक कसे जवळजवळ वेडे होऊन गेले होते ही गोष्ट मुहूर्तमुक्तावलि ह्या ग्रंथात (श्लो. ४२) चोरी करण्याला देखील शुभ मुहूर्त कोणता हे सांगितले आहे ह्यावरून चांगली प्रत्ययाला येते.

मुहूर्तासंबंधीचे नियम नीट समजावे ह्याकरिता **जातक** ह्याविषयासंबंधी काही सोपी माहिती पुढे दिली आहे. अतिशय प्राचीनकाळी (निदान ख्रि. पू. १००० च्या सुमारास) नक्षत्रांचे पुण्यकारक आणि पापकारक, पुल्लिंगी आणि स्त्रीलिंगी, उग्र आणि क्रूर असे निरनिराळे विभाग करण्यात आले होते. बृह. सं. (९७-६-११) ह्यात नक्षत्रांचे ध्रुव आणि स्थिर, तीक्ष्ण अथवा दारुण, चर आणि चल इत्यादि आणखीही विभाग केले असून ह्या संज्ञांना अनुसरून कोणती कृत्ये कोणत्या प्रकारच्या नक्षत्रावर करावी ह्यासंबंधीचे नियम सांगितले आहेत. मुहूर्तचिंतामणि (२·२-८) ह्याच्यासारख्या काही ग्रंथांत नक्षत्रांप्रमाणेच वारांनाही ध्रुव, चर ह्यासारख्या संज्ञा दिल्या असून त्या नावाच्या नक्षत्रांना अनुरूप असणारी कृत्ये त्यांच्याच स्वरूपाच्या वारांवर करावी असे सांगितले आहे. बृहज्जातक (१६·२) ह्या श्लोकात अश्विनी प्रभृति २७ नक्षत्रांवर जन्म झालेल्या व्यक्तींची लक्षणे वर्णन केली आहेत. ज्योतिषरत्नमाला प्रभृति ग्रंथात २८ (अभिजित् सहित) नक्षत्रांचे अंधाक्ष, मंदाक्ष, मध्याक्ष आणि स्वाक्ष असे चार विभाग केले असून त्या संज्ञांना अनुसरून त्या त्या नक्षत्रांवर सांडलेल्या वस्तुसंबंधी नियम सांगितले आहेत. बृह. सं. (अ. १४) मध्ये भारत देशाचे ९ भाग करून ते कोणकोणत्या नक्षत्रांच्या गटांच्या नियंत्रणाखाली असतात हे सांगितले आहे. त्याच ग्रंथात (अ. १५) कोणत्या नक्षत्रांचे कोणकोणत्या पदार्थावर नियंत्रण असते हे सांगितले आहे. ह्या सर्व विभागणीचा हेतु त्या त्या संज्ञांना अनुसरून भविष्य सांगणे हा असतो.

ह्या विवेचनावरून असे दिसून येईल की फक्त नक्षत्रांच्या आधारावर असलेल्या फलज्योतिषशास्त्राची पूर्ण वाढ भारतामध्ये झालेली होती. परंतु ग्रीक भाषेतील टॉलेमीकृत फलज्योतिषशास्त्र केवळ राशींच्या आधारावर असून त्याने नक्षत्रांचा क्वचितच विचार केला आहे.

**राशिचक्रा**मध्ये १२ राशि असून त्यातील प्रत्येक राशि २¼ नक्षत्राएवढी असते. उदाहरणार्थ, मेषराशीमध्ये अश्विनि, भरणी आणि कृत्तिका नक्षत्राचा पहिला ¼ भाग (चरण) ह्यांचा समावेश होतो. मेषापासूनच्या १२ राशि देखील कालपुरुषाचे निरनिराळे अवयव असल्याचे मानतात. एखाद्या मनुष्याच्या जन्मकुंडलीमध्ये एखाद्या विशिष्ट राशीमध्ये एखादा ग्रह असला तर त्या ग्रहाचा परिणाम ती राशि कालपुरुषाच्या ज्या अवयवाच्या स्थानी असेल त्या अवयवावर होतो (सारावली ३·५-६).

वराहमिहिराने १२ राशींची संस्कृत नावे आणि त्या नावांच्या समानार्थी अनेक शब्द सांगितले आहेत. अशा समानार्थी नावांपैकी काही शब्द (बृ. जा. १·८) ह्या एका वेगळ्या श्लोकात दिले असून ते ग्रीक शब्दांची संस्कृत रूपांतरे आहेत अथवा ते शब्द ग्रीक भाषेतून घेतलेले आहेत असे वेबरप्रभृति अनेक ग्रंथकारांचे मत आहे. हे मत सर्वस्वी बरोबर नसले तरी त्या शब्दांपैकी बरेच शब्द ग्रीक भाषेतील राशींच्या नावाशी जुळणारे

आहेत हे मान्य करता येईल.

बृहज्ज्ञातक (१·५) मध्ये राशींची स्वरूपे वर्णन केली आहेत. मेष, वृषभ, कर्क, सिंह, वृश्चिक, मकर आणि मीन ह्या राशींची स्वरूपे चतुष्पाद पशूंच्या अथवा कीटकांच्या सारखी आहेत आणि बाकीच्या ५ राशींची स्वरूपे विशिष्ट लक्षणांनी युक्त असणाऱ्या मनुष्यांसारखी आहेत. ह्या राशींच्या नावाचे अर्थ बॉबिलोन, ग्रीस सहित युरोप आणि भारत ह्या सर्व ठिकाणी कमी अधिक प्रमाणात एकसारखे आहेत. तथापि (वृश्चिकासारख्या) काही थोड्या राशि सोडल्यास इतर सर्व ठिकाणी मेष प्रभृति राशींच्या तारकासमूहात आणि त्यांच्या नावांनी बोध होणाऱ्या पदार्थांच्या स्वाभाविक आकारात फारसे ठळक साम्य दिसत नाही. राशीना दिलेल्या नावांचे मूळ अज्ञात आहे. मेष, वृषभ इत्यादि नावे दिलेल्या राशि सर्वस्वी काल्पनिक आकृति आहेत आणि ती नावे त्या तारका पुंजांना एखाद्या व्यक्तीने कल्पनेने दिलेली आहेत.

अलेक्झांडरच्या काळापूर्वी इजिप्तमधील लोकांना राशिचक्राची काहीही माहिती नव्हती आणि रोमन लोकांच्या काळापूर्वी अस्तित्वात असलेली फारच थोडी राशिचक्रे उपलब्ध आहेत. ॲसिरिया देशासंबंधी संशोधन करणाऱ्या लोकांनी युफ्रेटिस नदीच्या खोऱ्यांत राहणाऱ्या लोकांना खगोलशास्त्राची माहिती होती ही गोष्ट उघडकीला आणली आणि तेव्हापासून राशिचक्राचा पहिला शोध बाबिलोन देशातील लोकांनी लावला असला पाहिजे असे प्रायः बहुतेक विद्वान मान्य करू लागले आणि जरी वेबरसारख्या काही ग्रंथकारांनी ते मत मान्य न करिता तो शोध ग्रीक लोकांनीच लावला असे प्रतिपादन केले असले तरी तूर्त तरी राशिचक्राचा उगम बाबिलोन मध्ये झाला ही गोष्ट मान्य केली पाहिजे असे वाटते. ह्या वादातील प्रतिपादनाचा विचार केल्यास प्रस्तुत ग्रंथकाराला असे वाटते की इजिप्त, मेसापोटेमिया (बॉबिलोन) आणि ग्रीस ह्या तीन प्रख्यात देशांपैकी राशींचा पहिला शोध बाबिलोनमध्ये लागला असण्याचा अधिक संभव आहे.

फलज्योतिषशास्त्राच्या दृष्टीने राशींचे अनेक विभाग करण्यात आले असून त्या विभागांचा भविष्य वर्तविण्याच्या कामी उपयोग करण्यात येतो. उदाहरणार्थ, पुल्लिंगी आणि स्त्रीलिंगी, शीर्षोदय, पृष्ठोदय, चर आणि स्थिर, सौम्य आणि क्रूर, दिनबल आणि निशाबल, निरनिराळ्या चार दिशांच्या स्वामी असणाऱ्या राशि इ.. शीर्षोदय राशीवर स्वारी केल्यास इच्छित फल प्राप्त होते प्ररंतु पृष्ठोदय राशीवर स्वारी केल्यास स्वतःच्या सैन्याचा पूर्ण पराजय होतो, क्रूर राशीवर जन्म झालेल्या व्यक्ती क्रूर स्वभावाच्या असतात अशा प्रकारची भविष्ये वर्तविण्यात येतात. बारा राशींचे भिन्नभिन्न रंग सांगितलेले आहेत. तसेच त्यांचे द्विपाद, चतुष्पाद, जलचर, कीटक असेही विभाग सांगितलेले आहेत. ह्या विभागांच्या बाबतीत वराहमिहिर आणि टॉलेमी ह्यांच्यामध्ये मतवैचित्र्य आढळते.

**ग्रहांचा राशींशी संबंध** आणि त्यांच्या संयोगामुळे होणारे परिणाम ह्यांचाही फलज्योतिषशास्त्रांत विचार केलेला असतो. वेदसंहिता आणि ब्राह्मणग्रंथ यांत गुरु (बृहस्पति) व्यतिरिक्त इतर ग्रहांचे स्पष्ट निर्देश प्रायः आढळत नाहीत हे पूर्वीच सांगितले आहे. ऋग्वेदाच्या काही ऋचांत पाच ग्रह आणि शुक्र ह्यांचा अस्पष्ट निर्देश असावा असे वाटते. छांदोग्य, मैत्रायणीय (७·६) ह्यांच्यासारख्या काही उपनिषदांत शनि, राहू, केतु यांचा उल्लेख आढळतो. परंतु ह्या ग्रहांपासून प्राप्त होणाऱ्या फलांविषयी प्राचीन वेदवाङ्मयात प्रायः काहीच वर्णन केलेले आढळत नाही. महाभारतात ग्रहांच्या अनिष्ट परिणामांविषयी अनेक ठिकाणी वर्णन आले आहे. परंतु त्या वर्णनात फक्त नक्षत्रांचाच उल्लेख केला आहे. कौटिल्याने (२ रा भाग अध्याय २४) म्हटले आहे की गुरुच्या स्थितीवरून, शुक्राच्या उदयास्त आणि गतीवरून, सूर्याच्या स्वाभाविक आणि अस्वाभाविक स्वरूपावरून पर्जन्यवृष्टीसंबंधी भविष्य करिता येते. ह्यावरून असे दिसते की ग्रहांच्या

स्थितीवरून सार्वत्रिक स्वरूपाची माहिती समजते असे फलज्योतिषशास्त्र भारतात ख्रि. पू. अनेक शतके अस्तित्वात होते. परंतु बाबिलोन देशातील लोकांनी ख्रि. पू. २००० वर्ष ग्रहांचे वेध घेतले होते आणि एखाद्या बालकाच्या जन्मकाळच्या ग्रहस्थितीवरून अनुकूल आणि प्रतिकूल भविष्ये वर्तविण्यात येत असत. प्रत्येक ग्रह काही विशिष्ट राशीत असताना उच्चीचा (म्हणजे सर्वात अधिक बलवान्) असतो ही माहितीही त्या लोकांना होती.

**बृहज्जातक** (२·२।३), सारावली (४·१०।११) आणि राजमार्तंड (श्लो. ८।१५) ह्या ग्रंथांत सूर्य, चंद्र आणि इतर सात ग्रह ह्यांची जी निरनिराळी नावे दिली आहेत त्यांच्यापैकी काही नावे ग्रीक भाषेतून घेतलेली आहेत असे पाश्चात्य देशातील ग्रंथकार मानतात. ह्या बाबतीत लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे ह्या अथवा इतर ग्रंथांत चंद्राच्या नावांपैकी एकही नाव ग्रीक भाषेतील असल्याचे मानण्यात येत नाही. गुरूच्या नावांपैकी **जीव** हे नाव ग्रीक भाषेतील असल्याचे पाश्चात्य ग्रंथकार मानतात परंतु तो शब्द ग्रीक शब्दावरून बनलेला आहे असे प्रस्तुत ग्रंथकाराला वाटत नाही. जीव हा शब्द ऋग्वेदात (१-१६४·३०, १०-१८·३७ इ.) अनेक ठिकाणी आला असून त्याचा अर्थ जिवंत प्राणी, एक व्यक्ति असा आहे. जेव्हा बृहस्पती हा सर्व ग्रहांमध्ये श्रेष्ठ मानण्यात येऊ लागला आणि तो ज्ञान आणि सुख ह्यांचा स्वामी असल्याचे मानू लागले त्यावेळी तो सर्व प्राण्यांचे जीवनसर्वस्व गणला गेला आणि त्याला जीव असे म्हणू लागले. सारावली (१०-११६) मध्ये म्हटले आहे की बृहस्पती हा मनुष्याचा जीव आहे (बृहस्पतिर्नृणां जीवः).

बृ. जा. (२-५।७) ह्या ग्रंथात ग्रहांचे स्वामी, त्यांच्या दिशा, पंचमहाभूतांपैकी भूत, वेद आणि ब्राह्मण प्रभृति वर्ण, शुभ अथवा अशुभ इत्यादि माहिती दिली आहे आणि ह्या माहितीचा भविष्य सांगण्याच्या कामी कसा उपयोग करावा हेही सांगितले आहे. ह्या बाबतीतदेखील भारतीय ज्योतिषात आणि यवनज्योतिषात काही काही ठिकाणी मतभेद आहेत. त्याप्रमाणेच निरनिराळ्या ग्रहांचा मनुष्याच्या शरीरातील कोणकोणत्या भागांवर, वस्त्रांवर, रसांवर प्रभाव असतो ही माहितीही त्या ग्रंथात दिली आहे. चोरी झाली त्यावेळी जो ग्रह बलवान असेल त्याला अनुसरून चोराचे स्थान सांगता येते अथवा कोणाला भोजनाचे आमंत्रण आलेल्या वेळी बलवान असणाऱ्या ग्रहाला अनुसरून त्याला वाढण्यात येणाऱ्या अन्नाचा प्रकार सांगता येतो. बृ. जा. मध्ये ग्रहांची लिंगे, त्यांची स्वगृहे म्हणजे उच्चस्थाने परमोच्चस्थाने, त्यांची नीच आणि परमनीच स्थाने असणाऱ्या राशि कोणत्या ही माहितीही दिली आहे.

कुंडलीमध्ये फलज्योतिषासंबंधी १२ स्थाने असतात आणि त्या स्थानांना जी नावे दिली आहेत त्यापैकी काही नावावरून त्या स्थानातील ग्रहस्थितीवरून कोणत्या विशिष्ट गोष्टींचे भविष्य ठरवावयाचे असते हे दर्शित होते. उदाहरणार्थ, कुंडलीमधील प्रथम स्थानाला होरा, तनु, शक्ति इत्यादि नावे आहेत आणि त्या स्थानातील ग्रहस्थितीवरून कुंडलीतील व्यक्तीच्या आरोग्याविषयी आणि देहाच्या वाढीसंबंधी भविष्य ठरविता येते; दुसऱ्या स्थानाला धन, कुटुंब, अर्थ इत्यादि नावे आहेत आणि त्या स्थानातील ग्रहस्थितीवरून त्या व्यक्तीची कुटुंबस्थिति, संपत्ती इत्यादीसंबंधी भविष्य ठरविता येते.

कुंडलीमधील काही विशिष्ट स्थानांना काही विशिष्ट संज्ञा दिलेल्या असतात. १ ले, ४ थे, ७ वे आणि १० वे ह्या सर्व स्थानांना **कंटक, केंद्र, चतुष्टय अशा संज्ञा** आहेत; केंद्राच्या पलीकडील (म्हणजे २, ५, ८ आणि ११ ह्या) स्थानांना **पणफर** ही संज्ञा आहे; ३ रे, ६ वे, ९ वे आणि १२ वे ह्या स्थानांना **आपोक्लिम** ही संज्ञा आहे; ६ वे, ८ वे आणि १२ वे ह्या स्थानांना **त्रिक** अशी संज्ञा आहे; ३ रे, ६ वे, १० वे आणि १२ वे ह्या स्थानांना **उपचय** अशी संज्ञा असून बाकीच्या सर्व स्थानांना **अपचय** अशी संज्ञा आहे.

फलज्योतिषशास्त्र भारतीयांनी ग्रीक लोकांपासून घेतलेले आहे असे मत पाश्चिमात्य ग्रंथकार प्रतिपादन करित असतात. थिबो ह्या ग्रंथकाराने (ग्रुंड्रीज पा. ६८) असे विधान केले आहे की वराहमिहिराने विकास केलेल्या भारतीय फलज्योतिषशास्त्रात आढळून येणारा प्रमुख मुद्दा १२ स्थानांचा सिद्धांत हा आहे. ज्या अर्थी तो सिद्धांत फर्मिकस सॅटर्नस् (इ. स. च्या ४ थ्या शतकाचा मध्य) ह्याच्या पूर्वी होऊन गेलेल्या कोणत्याही पाश्चिमात्य ग्रंथकारांच्या ग्रंथात आढळत नाही त्याअर्थी ग्रीक फलज्योतिषशास्त्राचा भारतामध्ये प्रवेश फर्मिकस आणि वराहमिहिर मिहिर (इ. स. चे ६ वे शतक) ह्यांच्या दरम्यानच्या काळच्या म्हणजे सुमारे १०० वर्षाच्या कालावधीतच झाला असला पाहिजे.

पाश्चिमात्य ग्रंथकारांच्या ह्या मतासंबंधी विस्तृत चर्चा करणे ह्या संक्षिप्त ग्रंथात शक्य नाही तथापि काही थोडे मुद्दे पुढे दिले आहेत. वराहमिहिराच्या ग्रंथात आणि त्या ग्रंथावरील उत्पल टीकेत वराहमिहिराच्या पूर्वी होऊन गेलेल्या गर्ग प्रभृति २० पेक्षा अधिक ग्रंथकारांचे शेकडो श्लोक उद्धृत केले आहेत. ह्या ग्रंथकारांनी निर्माण केलेले वाङ्मय बरेच विस्तृत असले पाहिजे आणि ते सर्व ग्रंथ सुमारे १०० वर्षाच्या अल्पावधीमध्ये होऊन गेले असणे शक्य नाही तर त्या कार्याला अनेक शतकांचा दीर्घकाळ लागला असला पाहिजे. उत्पल टीकेत गर्गाचे ३०० हून अधिक श्लोक उद्धृत केले आहेत आणि त्यावरून त्याला राशिचक्र, ग्रहांच्या उच्च दशा आणि दृष्टि यांची माहिती होती असे दिसून येते. गर्ग हा ग्रंथकार ख्रि. पू. ५० च्या सुमारास होऊन गेला असावा असे कर्न ह्या ग्रंथकाराने म्हटले आहे. त्याच्यापासून वराहमिहिरापर्यंतचा सुमारे ५ शतकांइतका काळ फलज्योतिषशास्त्रावरील अफाट वाङ्मय निर्माण होण्याला लागला असावा असे म्हणता येईल. गर्गानंतर कमीतकमी २०० वर्षानंतर टॉलेमी झाला आणि फर्मिकस टॉलेमीनंतर ४०० वर्षांनी झाला. तेव्हा राशिसंबंधी माहिती भारतीयांनी ग्रीक ग्रंथकारांपासून मिळविली हे विधान सिद्ध करण्याला काहीही पुरावा नाही. खुद्द ग्रीक लोकांनी कुंडलीवर आधारलेले फलज्योतिषशास्त्र अलेक्झांडरच्या स्वारीनंतर ख्रि. पू. ४ थ्या शतकात बाबिलोन देशातून मिळविले होते.

नक्षत्राधिष्ठित फलज्योतिषशास्त्रासंबंधीच्या सध्या उपलब्ध असलेल्या उल्लेखांवरून असे दिसून येते की फर्मिकसच्यापूर्वी शेकडो वर्षे निदान पाच भावांची नावे भारतात अस्तित्वात होती आणि असेही प्रतिपादन करणे शक्य आहे की वराहमिहिराच्या पूर्वी होऊन गेलेल्या आणि संस्कृत भाषेत ग्रंथ लिहिणाऱ्या ग्रीक ग्रंथकारांपासून फर्मिकसने आपले फलज्योतिषशास्त्र मिळविले असावे. इतकेच नव्हे तर ज्या टॉलेमीला भावांची माहिती होती त्याने देखील आपले फलज्योतिषशास्त्राचे ज्ञान भारतात स्थाईक झालेल्या ग्रीक ग्रंथकारांपासून संपादन केले असावे. ग्रीक लोक भारतात स्थाईक झाल्याबद्दल आणि त्यांनी संस्कृत भाषेत विस्तृत ग्रंथ लिहिले असल्याबद्दल भरपूर पुरावा अस्तित्वात आहे. वराहमिहिराने यवनांच्या (म्हणजे ग्रीकांच्या) मताचा पुष्कळ वेळा उल्लेख केला असून काही काही ठिकाणी त्या मताशी आपला विरोधही प्रदर्शित केला आहे. स्फूर्जीध्वज नावाच्या एका यवन राजाने सुमारे ४००० श्लोकांचा यवनजातक नावाचा एक विस्तृत ग्रंथ फलज्योतिषशास्त्रावर लिहिला होता आणि मीनराज ह्या नावाच्या दुसऱ्या एका यवन राजाने 'वृद्धयवनजातक' ह्या नावाचा अनेक सहस्त्र श्लोक असलेला संस्कृत ग्रंथ फलज्योतिषशास्त्रावर केलेला आहे.

काही पारिभाषिकं शब्दांविषयी विवेचन करावयाचे राहिले आहे.

**होरा**. ह्या शब्दाचा दुसरा अर्थ अर्धी राशि असा आहे.१, ३, ५ प्रभृति विषम क्रमाच्या राशींच्या

पूर्वार्धांचा स्वामी सूर्य असतो आणि उत्तरार्धांचा स्वामी चंद्र असतो. २·४·६ प्रभृति सम क्रमाच्या राशींच्या पूर्वार्धांचा स्वामी चंद्र असतो आणि उत्तरार्धांचा स्वामी सूर्य असतो. सूर्याच्या होऱ्यात जन्मलेल्या व्यक्ति उत्साही स्वभावाच्या असतात आणि चंद्राच्या होऱ्यात जन्मलेल्या व्यक्ति सौम्य स्वभावाच्या असतात. दुसऱ्या काही ग्रंथकारांच्या (उत्पलाच्या टीकेप्रमाणे यवनेश्वराच्या) मताप्रमाणे पहिल्या होऱ्याचा स्वामी हा त्या राशीचा असणारा स्वामीच असतो आणि दुसऱ्या होऱ्याचा स्वामी हा कुंडलीमधील ११ व्या स्थानाचा असणांरा स्वामी असतो. ह्या मताप्रमाणे सूर्य आणि चंद्राप्रमाणेच इतर ग्रहही होऱ्यांचे स्वामी होऊ शकतात. ३० अंश असलेल्या प्रत्येक राशीचे तीन विभाग करण्यात येतात आणि १० अंशाच्या त्या विभागाला **द्रेष्काण, द्रक्कण** अथवा **दृकाण** अथवा **दृगाण** अशी संज्ञा आहे (बृ. जा. ३·५). प्रत्येक राशीच्या ह्या तीन विभागांचे स्वामी अनुक्रमे त्या राशीचा स्वामी, ५ व्या राशीचा स्वामी आणि ९ व्या राशीचा स्वामी हे असतात. इजिप्तमध्ये प्रत्येकी १० दिवस असलेल्या ३६ कालखंडांचे एक वर्ष होत असे आणि त्या प्रत्येक कालखंडाची एक देवता असे. डेकान्स हा विषुववृत्तावरील विस्तृत पट्ट्यामधील एक ठळक दिसणारा तारकापुंज असे. जव्हा ग्रीक लोकांनी इजिप्तमध्ये राशिचक्राचा प्रसार केला तेव्हा ह्या देवतांचा समावेश राशींमध्ये केला गेला आणि त्यांना फलज्योतिषशास्त्राच्या दृष्टीने महत्व प्राप्त झाले. बृ. जा. ह्या ग्रंथांत **द्रेष्काणाध्याय** नावाचा एक ३६ श्लोकांचा स्वतंत्र अध्याय (अ. २७) आहे आणि त्यात द्रेष्काणांच्या स्वामी असणाऱ्या ३६ देवतांचे वर्णन केले आहे. हे सर्व वर्णन यवनांनी सांगितलेले असल्याचेही त्या अध्यायात म्हटले आहे. टॉलेमीच्या ग्रंथात ह्या वर्णनाच्या स्वरूपाचे काहीही आढळत नाही. ह्यावरून वराहमिहिराने टॉलेमीच्या पूर्वी होऊन गेलेल्या एखाद्या यवन ग्रंथकाराच्या संस्कृत ग्रंथाचा उल्लेख केला असावा. सारावली ह्या ग्रंथामध्येही ३६ द्रेष्काणांचे अध्याय ४९ मध्ये वर्णन केले आहे परंतु ते वर्णन वृ. जा. मधील वर्णनाशी जुळत नाही आणि सारावलीच्या कर्त्याच्या समोर बहुधा संस्कृत भाषेतील दुसरा एखादा यवन ग्रंथ असावा असे वाटते.

**षड्वर्ग**. एखाद्या ग्रहाची **राशि**, त्या राशीचा **होरा**, **द्रेष्काण**, **नवांश**, **द्वादशांश** आणि **त्रिंशांश** ह्या सहा प्रकारांपैकी प्रत्येकाला त्या ग्रहाचा **वर्ग** अथवा **षड्वर्ग** असे म्हणतात (बृ. जा. १·९).

**सुनफा योग**. ज्यावेळी सूर्याव्यतिरिक्त एखादा ग्रह चंद्र असलेल्या स्थानापासून दुसऱ्या स्थानात असतो तेव्हा सुनफा योग होतो. जेव्हा सूर्याव्यतिरिक्त एखादा ग्रह चंद्र असलेल्या स्थानापासून १२ व्या स्थानात असतो तेव्हा **अनफा** योग होतो. जेव्हा कोणी ग्रह चंद्रापासून २ रे आणि १२ वे ह्या स्थानांत असतात तेव्हा **दुरुंधरा** योग घडून येतो. जेव्हा वरील तीन योग घडून येत नाहीत आणि जेव्हा चंद्र केंद्रात नसतो अथवा केंद्रामध्ये (सूर्याव्यतिरिक्त) कोणताही ग्रह असत नाही तेव्हा **केमद्रुम** योग होतो. हे पाच शब्द ग्रीक भाषेतील असल्याचे सांगतात. एका अंशाचा ६० वा भाग ह्या अर्थाचा **'लिप्ता'** हा शब्दही ग्रीक भाषेतील असल्याचे सांगतात.

वराहमिहिराने ग्रीक भाषेतील जे शब्द वापरले आहेत असे म्हटले जाते त्यांची एकूण संख्या ३७ आहे. त्यांच्यापैकी ४ शब्द ग्रीक भाषेतील असल्याचे प्रस्तुत ग्रंथकाराला मान्य नाही. बाकीचे जे फक्त ३३ शब्द उरतात त्यांच्यापैकी १२ राशींची नावे आहेत, ६ ग्रहांची नावे आहेत आणि काही नावांची अनेक समानार्थी संस्कृत नावे वराहमिहिराने योजिली आहेत. अशी नावे वगळल्यास अनफा, सुनफा, ह्यांच्यासारखे ज्यांना भारतीय फलज्योतिषशास्त्रात अत्यंत गौण स्थान आहे असे जेमतेम १० ग्रीक शब्द बाकी राहतात आणि एवढ्या थोड्या ग्रीक शब्दांचा उपयोग केला आहे एवढ्यावरून समग्र भारतीय फलज्योतिषशास्त्र ग्रीक ग्रंथकारांच्या ग्रंथांवरून घेतलेले आहे असे म्हणणे अतिशयोक्तीचे आहे.

ग्रहांच्या परस्परांशी असलेल्या **मैत्री**बद्दल, **शत्रुत्वा**बद्दल आणि **उदासीनत्वा**बद्दल वृ. जा. प्रभृति ग्रंथात बरेच विवेचन केलेले असते. मित्र आणि शत्रु ह्यांचे **स्वाभाविक** आणि **नैमित्तिक** असे दोन प्रकार असतात. ह्या बाबतीत त्यांची देवाण घेवाण असतेच असे सांगता येत नाही. म्हणजे एखादा ग्रह एखाद्या ग्रहाचा मित्र अथवा शत्रु असल्यास तो दुसरा ग्रह पहिला ग्रहाचा मित्र अथवा शत्रु असतोच असे नाही.

**ग्रहांचे बल** चार प्रकारचे असते. स्थान, दिशा, चेष्टा आणि काल. प्रत्येक ग्रहाची **दीप्त, स्वस्थ, मुदित** इत्यादि नऊ **स्थित्यंतरे** हेतात. (सारावली ५-५) निरनिराळे ग्रह निरनिराळ्या **देशांत जन्मले** असल्याचें मानले जाते आणि जेव्हा हे ग्रह पीडित होतात तेव्हा त्यांच्या जन्मदेशांना विपत्ती प्राप्त होते असे मानतात.

दुसरे एक अत्यंत महत्वाचे तत्त्व **ग्रहांची दृष्टि** हे आहे (बृ. जा. २- १३) आणि त्या संबंधीचे पूर्णदृष्टि, अर्धदृष्टि, अपूर्णदृष्टि इत्यादि प्रकार असून त्यांबद्दल अनेक नियम सांगितलेले असतात. टॉलेमीच्या ग्रंथामध्ये देखील विरुद्ध, तृतीयांश, चतुर्थांश आणि षष्ठांश अशा चार प्रकारच्या दृष्टींचे विवेचन केले आहे. ह्या बाबतीत देखील वराहमिहिर आणि टॉलेमी ह्यांच्यामध्ये कांही महत्वाचे भेद आहेत.

आणखी एक महत्वाचे तत्त्व **गोचर** हे आहे. गोचर ह्याचा अर्थ जन्मराशीच्या दृष्टीने शुभ अथवा अशुभ गणल्या जाणाऱ्या स्थानी एखाद्या विशिष्ट ग्रहाचे अस्तित्व एखाद्या विशिष्ट काली शुभ आहे किंवा अशुभ आहे ह्याचा विचार करणे.

**कारक**. जितके ग्रह स्वगृही अथवा उच्चीचे अथवा मूलत्रिकोण असतील ते सर्व परस्परांचे **कारक** होतात. कुंडलीमधील १० व्या स्थानी असलेला ग्रह **विशेषतः कारक** असतो.

प्रत्येक ग्रहाचा अनेक व्यक्तींशीं अथवा विषयांशीं **विशेष संबंध** असतो. अथवा तो ग्रह त्या व्यक्तीवर अथवा वस्तूवर **स्वामित्व** करीत असतो.

सात ग्रहांच्या **दशा** आणि **अंतर्दशा** ह्यांच्यासंबंधी नियम असतात. **विंशोत्तरी** पद्धतीप्रमाणे मनुष्याचे जास्तीत जास्त आयुर्मान १२० वर्षाचे मानण्यात येते आणि **अष्टोत्तरी** पद्धतीमध्ये १०८ वर्षाचे समजले जाते. त्या अवधि निरनिराळ्या ग्रहांत कमी अधिक प्रमाणांत विभागलेल्या असतात. त्या विभागांना दशा म्हणतात आणि दशांच्या पोटविभागांना **अंतर्दशा** म्हणतात. (बृ. जा. अध्याय ८) सात ग्रह आणि लग्न ह्या आठ वस्तु अष्टवर्ग असून त्या आपली पूर्ण अथवा शुभ फले व्यक्तीच्या आयुष्यातील विशिष्ट कालखंडात आणि जेव्हा त्या वस्तु विशिष्ट स्थानात असतात तेव्हाच देत असतात असे समजले जाते. (बृ. जा. अ. ९)

**राशिचक्र** सूर्य, चंद्र आणि ग्रह ज्यांत फिरत असतात अशा सुमारे १६ अंश रुंदीच्या आकाशांतील पट्ट्याला राशिचक्र (इंग्रजीमध्ये झोडियाक) अशी संज्ञा आहे. सूर्याच्या भ्रमण मार्गाने ह्या पट्ट्याचे दोन भाग पडतात. **राशि** हा शब्द दोन अर्थानी योजिता येतो : (१) सूर्याच्या भ्रमण मार्गाच्या आसपास विखुरलेल्या आणि सरळ रांगेत नसलेल्या कमी अधिक आकार आणि तेज असलेल्या तारकासमुच्चयाचे १२ गट; (२) आकाशांतील पट्ट्याचे कृत्रिम रीतीने पाडलेले आणि प्रत्येकी ३० रेखांशाइतक्या लांबीचे १२ समान भाग. ह्या दोन अर्थांपैकीं पहिला अर्थ अधिक प्राचीन असल्याचे मानले जाते. बाबिलोन देशांतील अत्यंत प्राचीन काळचे (ख्रि. पू. ५६७) जे वेधसंग्रहाचे पुस्तक आहे त्यात तारकापुंजांची निवळ चिन्हे अथवा चित्रे दिली आहेत. ही चित्रे प्रथमतः कशी बनविण्यात आली तसेच त्या तारकापुंजांना चमत्कारिक आणि

काल्पनिक नावे कोणी दिली ह्याविषयी निश्चित माहिती उपलब्ध नाही. ह्या चित्रांचा प्रथम उल्लेख ख्रि. पू. १३ व्या शतकातील एका हिटाइट ग्रंथात आला असून ती त्या काळच्या हद्दीदर्शक दगडावर देखील आढळतात असे प्रेस्नरने म्हटले आहे. बाबिलोन देशात शेतांच्या हद्दी दाखविण्याकरिता अथवा लोकांचे हक्कसंबंध दाखविण्याकरिता असे दगड उभे पुरीत असत असे शिपारेलीने (जुन्या करारातील फलज्योतिषशास्त्र ह्या ग्रंथात पा. ८५ वर) म्हटले आहे. अशा प्रकारचे आजपर्यंत तीस दगड सापडले आहेत. त्या दगडांवर चित्रे खोदली असून जो कोणी असे दगड जागेवरून हलवील त्याला भयंकर स्वरूपाचे शाप दिलेले लेख कोरले आहेत. बाबिलोन देशांतील पहिल्या राजघराण्याचे जे शिक्के सापडले आहेत त्या शिक्क्यातील चिन्हामध्ये बाबिलोन देशातील पद्धतीची फक्त 'कर्क' आणि 'धनु' ह्या राशीची चिन्हे आढळत नाहीत. ख्रि. पू १२ व्या शतकातील बाबिलोन देशातील एका स्मारकावरील आकृतीमध्ये मध्यभागी चंद्र, सूर्य आणि शुक्र ह्यांची चित्रें असून त्यांच्या सभोवती जीं अनेक चित्रें काढली आहेत त्यांत विंचु (वृश्चिक), माशासारखी शेपटी असलेला बकरा (मकर) आणि धनुष्य धारण केलेला मनुष्य (धनु) ह्यांच्या आकृत्या सहज ओळखता येतात. ह्या पुराव्यावरून असे सिद्ध होते की बाबिलोनं देशामध्ये ख्रि. पू. १००० या काळी राशिचक्रातील चार पांच तरी राशी लोकांना सांपडल्या होत्या. ख्रि. पू. ६ व्या शतकाच्या सुमारास बाबिलोन देशांतील लोकाना राशिंचक्राचे संपूर्ण चित्र माहित होते असे मिस्नरने म्हटले आहे. सर्वात प्राचीन काळच्या कुंडल्या मेसापोटेमियामध्ये सांपडतात आणि ग्रीस अथवा इजिप्तमध्ये सापडत नाहीत. सर्वात प्रथम सापडलेली कुंडली बोडलियन येथे एका कोनाकृति शिलेवर खोदलेली असून ती ख्रि. पू. ४१० ह्या वर्षांच्या एप्रिल महिन्याच्या २९ व्या तारखेची आहे. अशा कुंडल्या मेसापोटेमिया देशात फक्त सात सापडल्या आहेत आणि त्यातील सर्वात जुनी ख्रि. पू. २६३ सालची आहे असे प्रा. न्यूजबारने म्हटले आहे. इजिप्त देशांतील ग्रीक भाषेतील सर्वांत जुनी कुंडली ख्रि. पू. ४ ह्या वर्षातील असून त्या नंतरच्या इ. स. ५०० पर्यंतच्या काळातील सुमारे ६० कुंडल्या न्यूजबारला माहीत होत्या. डेमोटिक आणि ग्रीक भाषेतील सर्वात जुनी कुंडली इ. स. १३ सालची आहे. न्यूजबारच्या मताप्रमाणे बाबिलोन देशांतील फलज्योतिषशास्त्रांत दिलेले राशींचे उदयकाल बृ. जा. (१·१९) मध्ये दिलेल्या कालाशी जुळतात.

बुद्ध गया येथील मंदिराच्या कठड्यामधील खांबांवर राशींच्या आकृत्यासारख्या आकृत्या आढळतात आणि त्या आकृत्या वृषभापासून तुला आणि धनु आणि मकर ह्या राशींच्या आकृत्यांशीं जुळतात. ह्या आकृत्या ख्रि. पू. पहिल्या शतकांत खोदलेल्या आहेत आणि त्या बाबिलोन देशांतील स्मारकावरील आणि हद्दीच्या दगडावरील आकृत्यांसाररख्या आहेत. बुद्ध गया येथील मंदिराच्या कठड्यामधील सर्व खांब हल्ली अस्तित्वात नाहीत.

बाबिलोन आणि भारत ह्या देशांच्या दरम्यान सांस्कृतिक संबंध होता आणि त्या देशांमधील दळणवळण जमिनीवरील (खुष्कीच्या) मार्गाने होत असे. इ. स. च्या ३ ऱ्या शतकांत लिहिलेल्या एका ग्रंथात असे वर्णन केले आहे की त्या काळी बाबिलोन देशातील लोकांचा भारतात फार आदरसत्कार केला जात असे. (फिलास्ट्राटस् कृत अपोलोनियसचे चरित्र)

ह्या सर्व विवेचनामध्ये असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे की ख्रि. पू. ४ थ्या आणि ३ ऱ्या शतकात बाबिलोन देशात अस्तित्वात असलेल्या स्मारकांवरील आणि हद्दींच्या दगडांवरील राशींच्या आकृत्या त्या देशांत प्रवासाकरिता गेलेल्या भारतीयांनी पाहिल्यावर त्यांना त्याबद्दल कुतूहल उत्पन्न झाले आणि त्या आकृत्यांचा हेतु समजल्यावर त्या भारतीयांनीं त्या आकृत्या आपल्या बरोबर स्वदेशांत आणल्या आणि आपल्या देशांत आधीच अस्तित्वांत असलेल्या नक्षत्रांवर आधारलेल्या फलज्योतिषशास्त्रांत त्या

आकृत्यांचा समावेश करून राशींच्या आधारावर अधिष्ठित असलेल्या फलज्योतिषशास्त्राची भारतीयांनीं अभिवृद्धि केली.

द्रेष्काणासंबंधीचे वर्णन यवनांच्या मताला अनुसरून केलेले असल्याचे वराहमिहिराने स्पष्टपणे म्हटले आहे. जर संपूर्ण भारतीय फलज्योतिषशास्त्र यवनांपासून घेतलेले. असते तर तसे म्हणण्याला वराहमिहिराला कोणतीही आडकाठी नव्हती. यवनांची फलज्योतिषशास्त्राची परंपरा आणि भारतीयांची परंपरा एकच नव्हत्या आणि यवनांनीं फलज्योतिषशास्त्रावर संस्कृत भाषेत ग्रंथ रचले होते. अनेक महत्त्वाच्या मुद्यांवर वराहमिहिराची मते यवनांच्या मतांपेक्षा भिन्न होती. ख्रि. पू. २०० च्या सुमारास वासंतिक विषुव बिंदु राशिचक्रातील मेष संज्ञक भागाच्या आरंभी होता आणि एरिस ह्या राशीची आकृति मेंढ्याच्या आकृतीशी फारच जुळती होती. जेव्हा भारतीय खगोलशास्त्रज्ञांनी मेषादि राशींचा उपयोग करण्यास प्रारंभ केला तेव्हा त्यानी नक्षत्रचक्राची गणना कृत्तिकानक्षत्रापासून करण्याचे सोडून देऊन अश्विनि नक्षत्रापासून करण्यास प्रारंभ केला आणि अश्विनि हे पहिले नक्षत्र मानले. तथापि आता विषुव बिंदु मागे पडल्यामुळे तो उत्तराभाद्रपदा नक्षत्रसमूहाच्या जवळ आला आहे. इ. स. च्या पूर्वीच्या शतकावधि काळात भारतीय फलज्योतिशास्त्रज्ञांनी राशींच्या रचनेसंबंधी प्राथमिक स्वरूपाचे किती परिश्रम केले होते ह्याचा शोध करणे आणि त्या परिश्रमांचे वर्णन करणे अवघड आहे. कारण ज्याप्रमाणे टॉलेमीच्या ग्रंथांच्या योगाने त्याच्या पूर्वी झालेले खगोल आणि फलज्योतिष शास्त्रावरील ग्रीक भाषेतील ग्रंथ क्रमाक्रमाने नष्ट झाले त्याप्रमाणेच वराहमिहिराच्या बृहज्ञातक ह्या उत्कृष्ठ ग्रंथाच्या योगाने त्याच्यापूर्वी होऊन गेलेले सर्व ग्रंथ मागे पडले आणि क्रमाक्रमाने नष्ट झाले. भारत आणि ग्रीस ह्या दोन्ही देशांवर बाबिलोन देशातील राक्षिचिन्हाची आणि फलज्योतिषशास्त्राचा प्रभाव पडला असल्याकारणाने ग्रीक आणि भारतीय परंपरांमध्ये काही समान वैशिष्ट्ये दृष्टीस पडत असण्याचा संभव आहे. तथापि वराहमिहीराने पूर्णत्वाला आणलेले भारतीय फलज्योतिषशास्त्र फर्मिकस आणि पोलस् अलेक्झांड्रिनस् ह्यांच्या जवळून **उसने** घेतले आहे असे विधान करणे अत्यंत दूरान्वयाचे होईल. न्यूजवाटरने म्हटले आहे की, भारतीयांनी केवळ ग्रीक पद्धतीचे सर्वस्वी अनुकरण केले नसून त्यानी ग्रीक लोकांच्या मूळ कल्पनांमध्ये आपली बुद्धिमत्ता खर्च करून फेरबदल केले होते. प्रस्तुत ग्रंथनगराचे गत असे आहे की राशि आणि भाव ह्यांच्या बावतीतील भारतीत फलज्योतिपशास्त्राचा विकास टॉलेमीच्या देखील पूर्वी झाला होता.

व्यक्तींच्या प्रमाणेंच संस्था, गलबते, इमारती, नगरे ह्यांच्याही कुंडल्या तयार करण्यात येतात. एखादा प्रश्न विचारण्यात येतो त्या वेळची कुंडली मांडून भविप्य सांगता येते. एखाद्या व्यक्तीची कुंडली तयार करण्याकरिता त्या व्यक्तीच्या जन्माचे वर्ष, महिना, दिवस, घटिका आणि जन्माचे स्थान ही माहीत असावी लागतात. मुंबई, पुणे, कलकत्ता ह्यांच्यासारख्या कांही शहरांच्या अक्षांशाच्या आणि रेखांशाच्या आधारावर पंचांगे तयार केलेली असतात. आणि त्यांत दिलेल्या कोष्टकांच्या साह्याने त्या विशिष्ट ठिकाणी एखाद्या व्यक्तीच्या जन्माच्या वेळी कोणते लग्न उदयास येत असते हे काढता येते. परंतु पुणे येथे तयार केलेल्या पंचांगाचा उपयोग वऱ्हाड अथवा मध्यभारतातील एखाद्या ठिकाणी जन्म झालेल्या व्यक्तीची कुंडली तयार करण्याच्या कामी केला तर जन्मकाळचे योग्य लग्न कोणते हे ठरविताना काही थोडी चूक होण्याचा संभव असतो.

कुंडल्या लिहिण्याच्या निरनिराळ्या पद्धती आहेत. काही कुंडल्या चौरस आकाराच्या कोष्टकात लिहितात आणि काही वर्तुळाकार कोष्टकात लिहितात. चौरस कोष्टकात लिहिलेल्या कुंडल्यांमध्ये देखील **लग्न** (व्यक्तीच्या जन्माच्या वेळी उदय पावत असलेली राशि) कोठे लिहावयाचे ह्याबाबतीत काही भेद

# प्रकरण १७

## धार्मिक विधींकरिता मुहूर्त

(मू. ग्रं. पा. ५·६०४-६४०)

प्रस्तुत प्रकरणात धार्मिक विधींकरिता आणि वैयक्तिक कृत्यांकरिता लागणाऱ्या मुहूर्तासंबंधी विवेचन करावयाचे असून त्या विवेचनांत काही थोड्याशाच विधींचा आणि कृत्यांचा विचार करण्यात येईल.

आथर्वणज्योतिष (७·१२ आणि १६) [चतुर्भिः कारयेत्कर्म सिद्धिहेतोर्विचक्षणः।
तिथिनक्षत्रकरणमुहूर्ते नेति निश्चयः॥
दूरस्थस्य मुहूर्तस्य क्रिया च त्वरिता यदि।
द्विजपुण्याहघोषेणकृतं स्यात्सर्वसम्पदम्॥
आथर्वणज्योतिष (७·१२ आणि १६).] यात असा एक सामान्य स्वरूपाचा नियम सांगितला आहे की एकादे कार्य अथवा विधि यशस्वी व्हावा अशी इच्छा असल्यास तिथि, नक्षत्र, करण आणि मुहूर्त ह्या चार गोष्टींची अनुकूलता पाहिली पाहिजे आणि जर सर्व गोष्टी साधत नसतील तर मुहूर्ताला सर्वात अधिक महत्व द्यावे आणि एकही गोष्ट उपलब्ध होत नसेल तर तो दिवस शुभ असल्याचे एखाद्या विद्वान ब्राह्मणाकडून घोषणा करवून घेऊन कार्य करावे म्हणजे यश प्राप्त होते. राजमार्तंड ह्या ग्रंथामध्ये उद्धृत केलेल्या भृगूच्या वचनात असे सांगितले आहे की ग्रहांची आणि दिवसाची शुद्धता जेव्हा स्वस्थता असेल तेव्हा विचारात घ्यावयाची असते, परंतु संकटकाली त्यांचा विचार करावयाचा नसतो. (राजमार्तंड पृ. २५ अ. श्लोक ३८८)

धर्मशास्त्रावरील प्राचीन काळच्या ग्रंथांची प्रवृत्ति सर्व धार्मिक विधींच्या बाबतीत सोपे नियम सांगण्याकडे होती, परंतु मध्ययुगीन काळात झालेल्या ग्रंथांची प्रवृत्ति मूळच्या सोप्या असलेल्या विधींमध्ये अनेक तपशील घालण्याकडे होती.

धार्मिक विधींच्या विवेचनाला प्रारंभ **जातकर्म** ह्या संस्कारापासून करणे उचित होईल. जातकर्म म्हणजे बालकाच्या जन्याच्या वेळी करावयाचे विधि. रत्नमाला ह्या ग्रंथात (१३·२) म्हटले आहे की हे विधि एखाद्या मृदु, ध्रुव, क्षिप्र अथवा चर नक्षत्रावर करावे आणि नाव ठेवण्याचा विधि गुरु अथवा शुक्र चतुष्टयात असताना म्हणजे बालकाच्या जन्मकुंडलीतील १, ४, ७ अथवा १० ह्या भावात असताना करावा. दुसऱ्या काही ग्रंथात (उदा. मुहूर्तमार्तंड ४·१९) जन्म, विवाह आणि यात्रा ह्यांच्या बाबतीत अशुभ असणाऱ्या **गण्डांत** संज्ञा असणाऱ्या योगांचा उल्लेख केला आहे. त्याप्रमाणेच एखाद्या बालकाचा जन्म आश्लेषा आणि मूळ ह्या नक्षत्रांच्या काही विशिष्ट भागात झाल्यास होणाऱ्या परिणामांचे वर्णन केले आहे. मनूने (२·३०) सांगितले आहे की नाव ठेवण्याचा विधि बालकाच्या जन्मापासून १० व्या अथवा १२ व्या दिवशी अथवा एखाद्या शुभ तिथीला, अथवा शुभ मुहूर्तावर अथवा नक्षत्रावर करावा. **चौल** अथवा चूडाकर्म (बालकाचे केस कापण्याचा विधि) जन्मानंतर तिसऱ्या वर्षी अथवा कुलाचाराप्रमाणे करावा असा साधा नियम आश्व. गृ. (१·१७·१) मध्ये दिला आहे, परंतु मनूने (२·३५) तो विधि पहिल्या अथवा तिसऱ्या वर्षी करावा असे सांगितले आहे. परंतु पुढे मध्ययुगीन काळात झालेल्या ग्रंथांत अनेक तपशीलांची भर घालण्यात आली. उदाहरणार्थ राजमार्तंड ह्या ग्रंथात ह्या विधीच्या वर्णनात (पृष्ठ १६—१८) बत्तीस श्लोक खर्च केले आहेत आणि स्मृ. चं. (१ पा.२३) ह्या ग्रंथात उद्धृत केलेल्या व्यासाच्या वचनात तो विधि कोणत्या नक्षत्रावर, कोणत्या तिथीवर, कोणत्या वारावर करू नये ह्याबद्दलचा तपशील दिला आहे. वयात आलेल्या पुरुषाने करावयाच्या **क्षौरा**करिता (हजामती करता) देखील कोणती नक्षत्रे विहित असतात ह्याबद्दल नियम सांगितले आहेत. (राजमार्तंड

पृ.१६ ब, १७ ब) तथापि त्याबरोबरच राजाची आज्ञा, दीक्षा धारण ह्यांच्या सारख्या काही विशिष्ट प्रसंगी कोणत्याही नक्षत्रावर क्षौर करता येते असे (रा.मा.पृ १८ अ) म्हटले आहे.

सर्व संस्कारात अतिशय महत्वाच्या मानलेल्या उपनयन, विवाह ह्यांच्या सारख्या संस्कारांच्या बाबतीत देखील प्राचीन कालच्या ग्रंथात साधे नियम दिले होते. कोणत्याही सूत्रात अथवा मनु, याज्ञ. ह्यांच्या स्मृतींत ग्रहांची स्थाने, राशि अथवा वार अथवा महिना ह्यांच्या संबंधी एक अक्षरही सांगितलेले नाही. परंतु पुढील कालात झालेल्या ग्रंथांत क्रमाक्रमाने राशि नक्षत्रादि तपशील असणाऱ्या नियमांची भर पडत गेली. अशा नियमांचा असा परिणाम झाला आहे की उपनयनाकरिता योग्य मुहूर्त शोधून काढणे ही फार गुंतागुंतीची बाब झाली आहे आणि असे मुहूर्त फारच तुरळक असतात. विवाहाकरिता आणि उपनयनाकरिता विहित महिन्यांच्या बाबतींत एका ग्रंथकाराने माघापासून ५ महिने उपनयनाला योग्य असल्याचे सांगितले आहे (नि.सिं.पा २६२); दुसऱ्या एकाने माघापासून सहा महिने योग्य असल्याचे म्हटले आहे (नि. सिं. पा. २६२). दुसऱ्या एका नियमात सांगितले आहे की (उपनयन आणि विवाह ह्यांच्यासारखे) कोणतेही शुभ विधि एखाद्या व्यक्तीच्या जन्मनक्षत्रावर, जन्म महिन्यात आणि जन्मवारी करू नये आणि ज्येष्ठ पुत्राचा अथवा कन्येचा कोणताही शुभविधि ज्येष्ठ महिन्यात करू नये (रत्नमाला १६–५). ह्या बाबतीत देखील मतवैचित्र्य आहे. कोणा ग्रंथकाराच्या मते फक्त जन्मतिथि तेवढी वर्ज्य करावी, कोणाच्या मते जन्ममासातील ८, १० दिवस वर्ज्य करावे आणि कोणाच्या मते जन्मपक्ष फक्त वर्ज्य करावा. उपनयनाचा हेतु मुलाला वेदाध्ययनाचा अधिकार प्राप्त करून देणे हा असे आणि बृहस्पती हा देवांचा आणि वाणीचा स्वामी असल्यामुळे उपनयनाकरिता गुरूचे फार महत्व असते आणि जर गुरु जन्मराशीपासून २, ५, ७, ९ अथवा ११ ह्या राशींत असेल तर तो अत्यंत **शुभ** असतो; १, ३, ६ अथवा १० ह्या राशीत असेल तर **मध्यम** असतो आणि शांतिविधि केल्यास **शुभ** होतो आणि ४, ८ अथवा १२ ह्या राशीत असेल तर तो **अशुभ** असतो (मुहू. चिं. ५·४६).

फलज्योतिषशास्त्रातील एक काहीसे सोईस्कर तत्त्व असे होते की जर एखाद्या राशीला काही दुष्ट ग्रह असले तर त्यांना शांतिविधि केल्याने अथवा विशिष्ट रत्ने आणि धातु वापरल्याने आणि जप, दान ह्यांच्यासारख्या दुसऱ्या काही मार्गांनी शांत करिता येते अथवा त्या ग्रहांच्या प्रभावाने होणारे दुष्परिणाम टाळता येतात अथवा बऱ्याच प्रमाणात कमी करिता येतात. गुरु अशुभ असण्यासंबंधीच्या नियमाला देखील काही अपवाद सांगितले आहेत. (धर्मसिं. पा. २०१)

गुरु सिंह राशींत (**सिंहस्थ**) असताना विवाह, उपनयन ह्यांच्यासारखे अनेक शुभ विधि करू नये असे राजमार्तंड (पृष्ठ ६७ ब आणि श्लोक १०५७) ह्या ग्रंथांत सांगितले आहे परंतु त्या बाबतींत मागाहून अनेक फेरबदल करण्यात आले आणि सिंहस्थ असताना गंगेच्या उत्तरेकडील आणि गोदावरीच्या दक्षिणेकडील कांहीं विशिष्ट प्रदेशांत विवाह आणि उपनयन निषिद्ध असतात. (नि. सिं. पा. ३०५). [पराशरः।
गोदाभागीरथीमध्ये नोद्वाहः सिंहगे गुरौ।
मघास्थे सर्व देशेषु तथा मीनगते रवौ॥ नि. सिं. पान ३०५.] तथापि वसिष्ठाच्या मताने विवाह आणि व्रतबन्ध त्या प्रदेशांत निषिद्ध नसतात [वसिष्ठोपि। विवाहो दक्षिणे कूले गौतम्या नेतरत्र तु।
भागीरथ्युत्तरे कूले गौतम्या दक्षिणे तथा।
विवाहो व्रतबन्धश्च सिंहस्थेज्ये न दुष्यति॥ नि. सिं. पा. ३०५.] (नि. सिं. पा. ३०५).

व्यावहारिक दृष्टीने शाहाणपणाचा असा एक नियम राजमार्तंड (पृ. २४ ब. श्लो ३९७।८) मध्ये सांगितला आहे की एखाद्या पर राजाने देश व्यापला असेल अथवा युद्ध चालू असेल अथवा मातापितरांचे

जीवित धोक्यांत असेल तेव्हा अतिप्रौढ कुमारिकेने शुभ कालाची वाट पहात राहू नये; ती अशुद्ध असताना आणि चंद्र, लग्नबल नसतानादेखील तिचा विवाह करावा. भुजबल ह्या ग्रंथात (उद्वाहतत्त्व पा. १२४) असे सांगितले आहे की सर्वही कुमारिकांच्या बाबतींत ग्रहांचा आणि वर्ष, मास इत्यादि गोष्टींचा विचार त्यांचे वय दहा वर्षाचे होण्यापूर्वी करावयाचा असतो.

विवाहाकरिता मुहूर्त शोधून काढणे हे फार गुंतागुंतीचे काम असल्याकारणाने **गोधूली** अथवा **गोरजस्** (शब्दशः अर्थ गाईंनी उधळलेली धूळ) मुहूर्ताचा एक सोपा मार्ग शोधून काढण्यात आला. सूर्य अस्तास जात असताना केशरासारखा अथवा रक्त चंदनाच्या गंधासारखा रक्त वर्णाचा दिसतो. प्रकाशामुळे तारे आकाशांत प्रकाशत नसतात आणि गोठ्याकडे परत येणाऱ्या गाईंच्या खुरांनीं उडविलेल्या धूळीच्या योगाने आकाशव्याप्त झालेले असते तो **गोघूलिका** मुहूर्त होय. ह्या मुहूर्तात ग्रह, तिथि, तारे अथवा नक्षत्रे अडथळा उत्पन्न करीत नाहीत. (राज मा. पृ. ३४ व आणि ३५ अ). शुभ आणि बलवान लग्न मिळणे शक्य नसेल तेव्हाच हा मुहूर्त शुभ असतो आणि तो फक्त शूद्रांकरिता असतो असेही काही ग्रंथांत सांगितले आहे (मू. मा. ४-३८). तथापि सांप्रतकाळी हा गोरज मुहूर्त सर्व उच्च वर्णाचे लोक केव्हा केव्हा स्वीकारतात.

विवाहाच्या बाबतीत **दशयोग चक्र, सप्तशलाका चक्र** ह्यांच्या सारख्या दुसऱ्याही काही फलज्योतिषशास्त्रातील गुंतागुंतीच्या योगांचा राजमार्तंड (पृ. ३५ ब-३६ ब) ह्यासारख्या ग्रंथांत उल्लेख केला आहे. तो तपशील प्रस्तुत ग्रंथामध्ये गाळला आहे. तथापि **वधुवरमेलनविचार** अथवा **घटितगुणविचार** अशी संज्ञा असणाऱ्या एका बाबीचा विचार करणे अवश्य आहे. वधुवर मेलन विचार म्हणजे नियोजित वधू आणि वर ज्या नक्षत्रांवर आणि राशीवर जन्मले असतील त्या नक्षत्रांना आणि राशींना अनुसरून वर्ण, वश्य, तारा, योनि, ग्रहमैत्री, राशिकूट आणि नाडी ह्या आठ बाबींचा विचार करणे. ह्या प्रत्येक बाबीला '**कूट**' अशी संज्ञा असून त्यांना एक अथवा अधिक गुण असतात आणि त्या सर्वांना मिळून ३६ **गुण** असतात. ह्या सर्वही बाबी अलिकडे झालेल्या ग्रंथांत दिलेल्या नसतात. उदाहरणार्थ, धर्मसिंधु ह्या ग्रंथात फक्त शेवटल्या चारांचा विचार केला आहे. त्यांपैकी गण आणि नाडी ह्या दोहोंना सांप्रतकाळी देखील ब्राह्मणात त्याचप्रमाणे इतर जातीत देखील फार महत्त्व देण्यात येते. ह्या दोन्ही बाबींचा विचार खंड २ मध्ये केला आहे. ह्या गुणांच्या बाबतीत एक सोपा आणि काही काहींच्या बाबतीत फार सोईस्कर होणारा नियम असा आहे की जेव्हा वधु आणि ह्यांची जन्मराशि एकच असून जन्मनक्षत्रे भिन्न असतील, अथवा जन्म नक्षत्रे समान असून जन्मराशि भिन्न असतील, अथवा दोघांचे जन्मनक्षत्र एकच असून त्यांचे जन्म भिन्न भिन्न चरणावर झालेले असतील तर तो विवाह शुभ होईल आणि मग गण, नाडी इत्यादि इतर बाबींचा विचार करण्याचे कारण नसते. (मुहूर्तचिंतामणि ६-३६). [राश्यैक्ये चेद्भिन्नमृक्षं द्वयोः स्यान्नक्षत्रैक्ये राशियुग्मं तथैव।
नाडीदोषो नो गणानां च दोषो नक्षत्रैक्ये पादभेदे शुभः स्यात्॥
मु. चिं. (६·३६).] प्रस्तुत ग्रंथकाराच्या तारुण्यात सुमारे साठ सत्तर वर्षापूर्वी जरी एखादी मुलगी इतर सर्व दृष्टीनी अगदी योग्य असली तरीदेखील जर फलज्योतिषशास्त्रदृष्ट्या गुण जमत नसतील तर सुखवस्तु कुटुंबात तिचा विवाह होणे अशक्यप्राय असे. सांप्रतकाळी देखील ह्या गोष्टी सर्वस्वी नाहीशा झालेल्या नाहीत. तथापि, बहुतेक सुशिक्षित कुटुंबात वधुवरांची वये वीस वर्षाची आणि त्याच्याही पलिकडील असतात आणि प्रेमविवाह देखील होत असतात. त्यामुळे ह्या फलज्योतिषविषयक गोष्टींची तीव्रता बरीच कमी झाली आहे.

**विवाहाच्या बा**बतीत गुरूच्या अनुकूल स्थितीला फार महत्त्व देण्यात येत असे. तसेच **चंद्रबल** आणि **ताराबल** ह्या दोहोंचीही आवश्यकता असते. जन्मनक्षत्रापासून ३, ५ आणि ७ ह्या क्रमांची नक्षत्रे शुभ कार्यात

आणि विशेषतः विवाहामध्ये वर्ज्य करावयाची असतात. चंद्र बलवान असेल तेथे ताराबलाचा विचार करण्याचे कारण नसते. परंतु कृष्णपक्षात जेव्हा चंद्र क्षीणबल असेल तेव्हा ताराबल महत्त्वाचे असते. ह्या अशुभ मानलेल्या तारांना देखील काही विशिष्ट पदार्थांची दाने देऊन संतुष्ट करिता येते. राजमार्तंड ह्या ग्रंथात (पृष्ठ ३९ अ, श्लोक ६११—६१२) असे म्हटले आहे की विवाहाच्या बाबतीत तिथीला एक पट महत्त्व मानले तर वार चौपट, नक्षत्रे १६ पट, योग १०० पट, सूर्य १००० पट आणि चंद्र लक्षपट प्रभावी असतात. ह्याकरिता बाकीच्या सर्व बाबींना बाजूला सारून चंद्राचे बल सर्वात श्रेष्ठ मानावे आणि त्याच्याकडे लक्ष द्यावे.

सांप्रतकाळी भारतासहित बहुतेक देशांत राजाचे पद नष्ट करण्यात आले आहे. ह्या कारणाने राज्यारोहणाला कोणता मुहूर्त चांगला ह्याविषयीचे विवेचन आता केवळ पुस्तकी महत्वाचे झाले आहे आणि तो तपशील प्रस्तुत ग्रंथात गाळला आहे. ज्यांना ह्याविषयाची माहिती पाहिजे असेल त्यांनी रत्नमाला (१४·१—८), मुहूर्तमार्तंड (८-१), मुहूर्तचिंतामणि (१०·१—४),जयस्वॉल ह्यांनी संपादन केलेला राजनीतिरत्नाकर (पा. ८२-८४) प्रभृति ग्रंथ पहावे.

**यात्रा.** हा फलज्योतिषशास्त्रदृष्ट्या एक अत्यंत महत्वाचा विशेष होता. यात्रा ह्या शब्दाचे दोन अर्थ आहेत : (१) तीर्थक्षेत्रांना जाण्याकरिता अथवा द्रव्य प्राप्त करून घेण्याकरिता प्रवासाला निघणे, (२) राजांनी जय संपादन करण्याकरिता शत्रूवर स्वारी करणे. पहिल्या प्रकारची यात्रा सर्व वर्णांच्या लोकांना सामान्य असते. परंतु दुसऱ्या प्रकारच्या यात्रेचा संबंध केवळ क्षत्रिय अथवा राजा ह्यांच्याशीच असतो. स्मृति, कौटिल्यकृत अर्थशास्त्र आणि पुराणे ह्यांनीही ह्या विषयाला फार महत्व दिले आहे. महाभारत (आश्रमवासिकपर्व ७·१२—१८), मनु (७·१८१—२१२), मत्स्य (अ २४०—२४३), अग्नि (२३३—२३५), अर्थशास्त्र (खंड ९ आणि १०) प्रभृति ग्रंथांत **यान** अथवा **यात्रा** ह्या विषयाचे सविस्तर विवेचन केले आहे. ह्या विषयामध्ये तिथिवारादि तपशील, शरीराचे स्फुरण, स्वप्ने, शकुन, गुह्यकादि देवतांची पूजा इत्यादि अनेक बाबींचा समावेश होतो. वराहमिहिराने ह्या विषयाला बृ. सं. मधील (४३—५०, ८८—९६ प्रभृति) अनेक अध्याय देऊन शिवाय बृहद्योगयात्रा, योगयात्रा आणि तिक्कनिका ह्या नावाचे तीन ग्रंथ रचिले आहेत आणि ११०० हून अधिक श्लोक रचिले आहेत.

जेव्हा एखादे युद्ध उपस्थित होते तेव्हा शुभतिथि, वार, नक्षत्रे ह्यांची वाट पाहू लागल्यास विलंब उत्पन्न होतो. ह्याकरिता काही विशिष्ट ग्रहांची काही विशिष्ट स्थानात होणारी युति आणि स्थिती (म्हणजे योग) ही गोष्ट फलज्योतिषशास्त्राच्या दृष्टीने मुख्य मानण्यात येते.

जर एखाद्या मनुष्याचे जन्मलग्न माहित नसेल तर यात्रेसंबंधी त्या मनुष्याने ज्यावेळी प्रश्न विचारला असेल त्या वेळच्या लग्नाचा उपयोग करून फलज्योतिष सांगतात. यात्रेच्या बाबतीत **वार** विशेष महत्वाचे मानले जातात. **तिथी** पैकी षष्ठी प्रभृति काही विशिष्ट तिथि यात्रेला **प्रशस्त नसतात**. **नक्षत्रां**पैकी अश्विनि, पुनर्वसु, अनुराधा प्रभृति ९ विशिष्ट नक्षत्रे यात्रेला **प्रशस्त असतात**. ज्या राजाच्या लग्नी गुरु असेल, बुध ४ थ्या आणि शुक्र ५ व्या स्थानी असतील, मंगळ आणि शनि ६ व्या स्थानात, सूर्य ३ ऱ्या स्थानात आणि चंद्र १० व्या स्थानात असतील त्याला पूर्णपणे इष्ट फले प्राप्त होतील. (योगयात्रा ४·६)

यात्रेच्या संबंधात काही विशिष्ट गोष्टींचा उल्लेख करू. पौषापासून चार महिन्यात झालेली पर्जन्यवृष्टि **अकाली** म्हटली जाते आणि अशा वृष्टिनंतर ७ दिवसपर्यंत व्रत आणि यात्रा वर्ज्य कराव्या. (रा. मा. पृ. २३ ब आणि २४ अ) घरी आलेल्या तिथीपासून नवव्या तिथीला घरी परत प्रवास करणे निषिद्ध मानले आहे. हाच

नियम वार आणि नक्षत्र ह्यांनाही लागतो (मु. चिं. ११·७९) [प्रवेशान्निर्गमं तस्मात् प्रवेशं नवमे तिथी। नक्षत्रेपि तथा वारे नैव कुर्यात्कदाचन ॥

मु. चिं. (११·७९).] समोर शुक्र दिसेल अशा रीतीने प्रयाण करू नये ह्याचा उल्लेख शांतिपर्व (१००·२०) आणि कुमारसंभव (३·४३) यांतही आला आहे.

जर एखाद्या राजाने अथवा इतर कोणी मनुष्याने यात्रेकरिता एखादा अतिशय शुभ दिवस आणि योग निश्चित केले असतील परंतु काही अकल्पित कारणामुळे त्याला प्रत्यक्ष निघण्याला अडथळा आला असेल तर त्याने '**प्रस्थान**' संज्ञा असलेला प्रकार करावा, म्हणजे प्रयाण करावे परंतु अगदी थोडे अंतर गेल्यावर परत यावे अथवा शुभ दिवशी काहीतरी वस्तु पुढे पाठवावी आणि त्यानंतर त्याच्या दर्जाप्रमाणे ९, ६, ४ अशा काही विशिष्ट दिवसांच्या आत प्रयाण करावे (रत्नमाला १५·५६). ब्राह्मणाने यज्ञोपवीत पाठवावे, क्षत्रियाने एखादे शस्त्र पाठवावे, वैश्याने मध पाठवावी आणि शूद्राने एखादे (नारळासारखे) पवित्र फल पाठवावे अथवा सर्वही वर्णाच्या लोकांनी त्यांना अंतःकरणापासून प्रिय असणारी एकादी वस्तु पुढे पाठवावी (मु. चिं. ११·८९). [कार्याद्यैरिह गमनस्य चेद्विलम्बो भूदेवादिभिरुपवीतमायुधं च। क्षौद्रं चामलफलमाशु चालनीयं सर्वेषां भवति यदेव हृत्प्रियं वा ॥

मु. चिं. (११·८९)] ह्या बाबतीतही अनेक तपशीलाचे नियम असून त्यांत मतवैचित्र्य आढळते. सांप्रतकाळी देखील काही लोक ह्या प्रस्थान योजनाचे अवलंबन करितात आणि थोडेसे तांदूळ, सुपारी, हळकुंड इत्यादि पदार्थ असलेली पुरचुंडी सामान्यतः एखाद्या स्नेहसंबंध असलेल्या शेजाऱ्याच्या घरी ठेवण्यात येते आणि प्रत्यक्ष प्रवासाला आरंभ करताना ती पुरचुंडी बरोबर घेऊन जाण्यात येते. एखादा राजा जेव्हा स्वारीवर निघतो तेव्हा त्याने काही **मंगले** पहावी, ऐकावी आणि त्यांना स्पर्श करावा. अशा मंगलाच्या विस्तृत याद्या निरनिराळ्या ग्रंथांत दिल्या आहेत. उदाहरणार्थ, अग्निपुराण (अ. २४३), रत्नमाला (१५·९७।९८), मु. मा. ७·१५-१६ इत्यादि. राजाने पहावयाच्या शुभ वस्तूंमध्ये सवत्स गाय, कुमारिका, चांगला पोषाक केलेले ब्राह्मण इत्यादिकांचा समावेश होतो; वेदघोष, शंखनगारा इत्यादि वाद्यांचे ध्वनि, पुण्याह असे शब्द, चास अथवा हंस इत्यादि पक्ष्यांचे ध्वनि त्याने श्रवण करावे इ. त्याचप्रमाणे काही पदार्थ आणि ध्वनि अशुभ मानले आहेत. योगयात्रा (१३·१४), मु. चिं. (११·९९-१००), राजनीतिप्रकाश (पा. ३३५·३६०) इ.

**वास्तु** म्हणजे घर बांधणे ही बाब गृह्य आणि धर्म सूत्रात देखील फार महत्वाची मानली आहे. घर बांधणे आणि त्यात प्रथम प्रवेश करणे ह्या गोष्टींच्या बाबतीत फलज्योतिषशास्त्राच्या दृष्टीने मत्स्य (३·२५३), रत्नमाला(अ. १७) हेमाद्रि (काल पा. ८१७—८२९) इत्यादि ग्रंथांत अनेक नियम सांगितले आहेत. **नूतन वस्त्र धारण** करण्याकरिता शुभ काल कोणते ह्याविषयी नि.सिं.(पा. ३५७) मध्ये नियम सांगितले आहेत. त्याचप्रमाणे **औषध घेण्यास प्रारंभ** करण्याकरिता शुभ मुहूर्त राज मा. (पृ. ६२ अ) ज्योतिस्तत्त्व (पा. ६७८), नि. सिं. (३६२) इत्यादि ग्रंथांत सांगितले आहेत. मध्ययुगीन कालांत झालेल्या राजमार्तंड, नि.सिं.ह्यांच्या सारख्या ग्रंथांत (मालाची खरेदी-विक्री, शेतीची कृत्यें, तैलाभ्यंग स्नान करणे ह्यांच्या सारख्या) धार्मिक स्वरूपाच्या नसणाऱ्या कृत्यांकरिता देखील शुभ आणि अशुभ काल कोणते ह्यांची वर्णनें केली आहेत.

ह्यावरून भारतांतील लोकांच्या मनावर गेली दोन हजार अथवा त्याहूनही अधिक कालपर्यंत ज्योतिषशास्त्राचा आणि शकुनांचा किती जबरदस्त पगडा पडलेला आहे हे दिसून येते. स्वतः वराहमिहिरानेच असे म्हटले आहे (बृहद्योगयात्रा १४—३) की जर सर्व शुभ आणि अशुभ चिन्हे एका बाजूला असली आणि मनाची (अंतःकरणाची) शुद्धि दुसऱ्या बाजूला असली तर मनाची शुद्धि हीच जयप्रद होईल अथवा जर सर्व शकुन एका बाजूला असले आणि दुसऱ्या बाजूला मनाची शुद्धि असली तर मनाची शुद्धि हीच

प्रभावी ठरते; युद्धामध्ये मन एकाएकी भ्रमाने ग्रस्त होणे आणि वारा सुटणे अशा गोष्टीदेखील जयाला अथवा पराजयाला कारण होण्याचा संभव [एकतश्च सकलानि निमितान्येकतश्च मनसः परिशुद्धिः।
चेतसोऽस्ति सहसाधिरणे भीर्मारुतोऽपि विजयाजयहेतुः॥
योगयात्रा (५·१५).] असतो. (योगयात्रा ५—१५) मत्स्य (२४३·२५-२७) मध्ये देखील युद्धाच्या बाबतींत मनाची शांतता हे जयाचे सर्वांत अधिक प्रभावी लक्षण असते अशा प्रकारची विधाने केली आहेत. रत्नमालेसाररख्या सर्वस्वी फलज्योतिषशास्त्रावरील ग्रंथांत देखील असेच सांगितले आहे (र.मा.१५—४८).

फलज्योतिषशास्त्रावर सर्व लोकांचा विश्वास असल्या कारणाने निरनिराळ्या पुराणांत आणि इतर ग्रंथांत दिलेल्या तपशीलाच्या आधारावर राम, परशुराम, शंकराचार्य ह्यांच्या सारख्या काही सुप्रसिद्ध अवतारी पुरुषांच्या कुंडल्या तयार करण्याचा मोह नेहमी उत्पन्न होतो. परंतु अशा तपशीलांत पुष्कळवेळा कांही विसंगति आढळून येतात आणि म्हणून त्या कुंडल्या कल्पित मानाव्या लागतात.

धर्मशास्त्राच्या इतिहासांत विवेचन केलेल्या निरनिराळ्या विषयांच्या बाबतीत सांप्रत काळी अथवा भविष्य काळांत कोणकोणते फेरबदल करावे ह्या संबंधी ग्रंथकाराने स्वतःचे मत प्रदर्शित करावे किंवा नाही ह्याबद्दल विद्वानांमध्ये मतवैचित्र्य आढळते. कोणाकोणाच्या मताप्रमाणे इतिहासकाराने अनेक शतकांच्या कालावधींत त्या त्या विषयांच्या बाबतीत कोणकोणते फेरबदल घडून आले एवढेच वर्णन केले पाहिजे आणि दुसऱ्या काहींच्या मताप्रमाणे ग्रंथकाराने त्या त्या विषयांच्या बाबतीत आपले निश्चित मत प्रदर्शित केले पाहिजे. ह्या दोन्ही प्रकारच्या टीका लक्षात ठेवून धर्मशास्त्राशीं संबंध येणाऱ्या भारतीय फलज्योतिषशास्त्राविषयी प्रस्तुत ग्रंथकाराने आपली स्वतःची वैय्यक्तिक मतें थोडक्यात पुढे दिली आहेत.

आधुनिक काळच्या विज्ञानशास्त्रज्ञांनीं, तत्त्ववेत्त्यांनीं आणि ब्रह्मज्ञान्यांनी सामान्यतः फलज्योतिषशास्त्राकडे दुर्लक्ष्यच केले आहे. काहींनी ते शास्त्र धर्मभोळेपणाचे आणि भ्रामक असल्याचे मानून त्याचा निषेधही केला आहे आणि प्रख्यात शास्त्रज्ञांनी निषेध केलेला असूनही पुढारलेल्या पाश्चिमात्य देशातील लक्षावधि लोकांमध्ये त्या शास्त्राचा मोठा प्रचार आहे. त्या शास्त्रावर कडक टीका करणाऱ्यांपैकी बऱ्याच जणांनी आपली टीका त्या शास्त्रावरील ग्रंथांचे अध्ययन न करिता केवळ पूर्वग्रहाच्या आधारावर केलेली असावी असे दिसते.

फलज्योतिषशास्त्राचे मूलभूत तत्त्व असे आहे की सूर्य, चंद्र आणि ग्रह ह्यांचा पृथ्वीवरील जीवनावर आणि पदार्थांवर काही तरी प्रभाव असतो आणि हे तत्त्व शास्त्रशुद्ध आहे. प्रश्न एवढाच आहे की बृहज्ञातकासारख्या ग्रंथात जी तत्त्वे प्रतिपादन केली आहेत त्यांची सयुक्तिक छाननी केल्यास आणि त्यांचा अनुभव घेतल्यास ती तत्त्वे टिकू शकतील किंवा नाही. अशी छाननी करून आणि अनुभव घेऊन त्या तत्त्वांना फारसा आधार नसून ती काल्पनिक आहेत असे जर विज्ञानशास्त्रज्ञांनी दाखवून दिले असते तर त्यांची टीका अधिक परिणामकारक झाली असती. ह्या संबंधात प्रस्तुत ग्रंथकाराच्या बाल्यावस्थेत ह्यात असलेल्या महाडकर ज्योतिषी ह्या नावाने प्रसिद्ध असलेल्या एका फलज्योतिषाचा उल्लेख करावा असे वाटते. तो गृहस्थ एका दिवाणी न्यायालयांत बेलिफाची नोकरी करीत असे आणि कोणाकडून पैसे न घेता त्यांच्या चेहऱ्यांकडे, डोळ्यांकडे आणि हातांकडे थोडी मिनिटे पाहून त्यांच्या कुंडलीमधील लग्न आणि ग्रहांची स्थाने प्रायः बिनचूक सांगत असे. ह्या घटनेवरून त्या काळाच्या अनेक सुशिक्षित लोकांना असे वाटू लागले की मनुष्याच्या शरीराच्या आकाराचा आणि त्या मनुष्याच्या जन्माच्या वेळच्या ग्रहांच्या स्थितीचा कांही तरी संबंध असतो. एवढ्यां बाबतीत तरी फलज्योतिषशास्त्रावरील ग्रंथ बरोबर आहेत. परंतु त्या

ज्योतिषाने जेव्हा त्या व्यक्तीच्या बिनचूक सांगितलेल्या कुंडल्यांच्या आधारावर त्या व्यक्तींच्या आयुष्यामधील महत्त्वाच्या गोष्टी सांगण्याचा व्यवसाय सुरू केला तेव्हा त्याचे भविष्य पुष्कळवेळा चुकत असे. ह्यावरून आणि प्रस्तुत ग्रंथकाराने स्वतः पाहिलेल्या शेकडो कुंडल्यांवरून असे वाटते की एखाद्या व्यक्तीच्या कुंडलीच्या आधारावर त्या व्यक्तींची शारीरिक लक्षणे सांगणे शक्य होईल. तथापि तसे प्रयत्न कोणी केलेले नाहीत अथवा केले असल्यास ते प्रसिद्ध केलेले नाहीत. तथापि एखाद्या मनुष्याच्या कुंडलीवरून त्याची मानसिक स्थिती अथवा भाग्यदशा आणि त्याच्या आयुष्यातील घटना ह्यांच्याबद्दलचे फारसे काही भविष्य सांगता येणार नाही असे वाटते.

तथापि अशा तपशीलाचीही **काही** भविष्ये खरी ठरतात ही गोष्टही नाकबूल करिता येत नाही. ह्या बाबतीत बडोदे येथील गायकवाडांच्या राजघराण्यातील गोविंदराव गायकवाड ह्याने इ. स. १७९३ मध्ये चिंतो महादेव गोळे ह्या नावाच्या एका ज्योतिषाला त्याने सांगितलेले भविष्य खरे ठरल्यामुळे पूर्वी केलेल्या कराराप्रमाणे एक गाव बक्षिस दिला होता त्या सनदेचा उल्लेख करण्यासारखा आहे. ती सनद इंडि. ॲटिक्वेरी खंड १६ पा. ३१७ वर छापली आहे. त्या सनदेतील वर्णनाचा सारांश असा आहे की गोविंदरावाला त्याचा राज्यावरील हक्क सोडून २५ वर्षे पुणे येथे राहावे लागले होते. त्या ज्योतिषाने गोविंदरावाला एक बंद केलेले पत्र दिले होते आणि त्यात दिलेले भविष्य खरे ठरल्यास गोविंदरावाने त्या ज्योतिष्याला ५ हजार रुपये वार्षिक उत्पन्नाचा एक गाव बक्षिस देण्याचे मान्य केले होते. त्या पत्रात असे लिहिले होते की इ. स. १७९२ मध्ये पुण्याचे पेशवे गोविंदरावाला एका विवक्षित दिवशी विवक्षित लग्न उदित असताना बोलावणे पाठवितील आणि त्याच्याकडून काही रक्कम आणि प्रदेश पेशव्यांना देण्याच्या अटीवर त्याला त्याच्या राज्यावर बसविण्याचे मान्य करितील आणि तीन शिरपेच, मोत्याचा तुरा, एक हत्ती आणि निळ्या रंगाचा घोडा असा आहेर करतील. त्या शिरपेचावर किती माणकें आणि हिरे असतील आणि त्या तुऱ्यात किती लहान आणि किती मोठी मोती असतील हा तपशील त्या पत्रात दिला होता. त्यानंतरही गोविंदरावाला ११ महिने पुण्यास रहावे लागेल आणि त्या मुदतीपैकी ८ महिने अत्यंत कष्टात काढावे लागतील आणि त्यानंतर पेशवे त्याने देऊ केलेला मुलूख गोविंदरावाला परत करतील आणि तो एका विशिष्ट महिन्यात बडोदे येथे परत जाईल. त्या सनदेमध्ये गंभीरपणे लिहिलेला हा सर्व तपशील अविश्वसनीय मानण्याला काही कारण नाही. हा सर्व तपशील त्या ज्योतिषाने कसा सांगितला हे कळत नाही. कारण प्रस्तुत ग्रंथकाराला ज्ञात असलेल्या कोणत्याही फलज्योतिषशास्त्रावरील ग्रंथामध्ये इतके तपशीलवार भविष्य सांगितलेले नाही अथवा तसे नियम दिलेले नाहीत.

ह्याच संदर्भात **भृगुसंहिता** नावाच्या एका संस्कृत ग्रंथाचा थोडक्यात निर्देश करणे अवश्य आहे. अशी समजूत आहे की त्या ग्रंथामध्ये मेषप्रभृति राशींवर जन्मलेल्या असंख्य व्यक्तींच्या कुंडल्या आहेत आणि व्यक्तींनी केलेल्या त्यांच्या पूर्वजन्मातील कृत्यांचा उल्लेख केलेला आहे, त्या कुंडल्यांमध्ये निरनिराळ्या ग्रहांची स्थाने दिली असून त्या व्यक्तीच्या प्रस्तुत जन्मामधील जन्मापासून मृत्युपर्यंतच्या प्रत्येक वर्षातील महत्वाच्या घटना दिलेल्या असतात. जे लोक स्वतःजवळ भृगुसंहिता असल्याचे भासवितात ते सामान्यतः तो समग्र ग्रंथ कोणालाही दाखविण्यास तयार नसतात. परंतु जे कोणी त्यांच्याकडे जातील त्याना आपल्या संग्रहात असल्याचे भासविलेल्या ग्रंथातील श्लोक वाचून दाखवितात आणि तो मजकूर ऐकून ते लोक पुष्कळ वेळा आश्चर्यचकित होतांत. ह्या सर्व प्रकारात बरीचशी फसवाफसवी असते. प्रस्तुत ग्रंथकाराने मुंबई विश्वविद्यालयाच्या संस्कृत हस्तलिखित ग्रंथांच्या संग्रहातील भृगुसंहिता नावाचे चार हस्तलिखित ग्रंथ पाहिले आहेत. हा ग्रंथ शुक्राला त्याचा पिता भृगु ह्याने ग्रंधमादन पर्वतावर सांगितला असल्याचे वर्णन केले असून त्यात, मेष, वृषभ, मिथुन आणि कर्क ह्या चार लग्नांपैकी प्रत्येकावरील सुमारे ६०० कुंडल्या आहेत.

आणि एकाच लग्नातील परंतु भिन्न भिन्न ग्रहस्थिति असणाऱ्या प्रत्येक कुंडलीचे वर्णन १५ ते २० श्लोकांत केले आहे. बारा राशि, नऊ ग्रह आणि बारा भाव इतक्या सगळ्यांची निरनिरळ्या प्रकाराने मांडणी केल्यास कोट्यवधि कुंडल्या होऊ शकतील आणि प्रत्येक कुंडलीला किमानं १५ श्लोक दिले तरी अनेक कोटि श्लोक होतील आणि असा ग्रंथ ठेवावयास एखाद्या मोठ्या ग्रंथसंग्रहालयात देखील जागा मिळणे शक्य होणार नाही. ह्या कारणांस्तव भृगुसंहितेमधील अवतरणाच्या आधारावर कुंडलीचे वर्णन करणे ही गोष्ट पुष्कळ वेळा लबाडीची असते.

एखादे बालक आश्लेषा अथवा ज्येष्ठा नक्षत्रावर अथवा गंड अथवा गंडान्त संज्ञा असणाऱ्या योगावर जन्मले असेल तर त्याच्या मातेला अथवा पित्याला अथवा स्वतः त्या बालकाला मृत्यु येतो आणि ह्या करिता त्या निरपराधी आणि असहाय्य बालकाचा त्याग करा असे ज्योतिषशास्त्रावरील ग्रंथात (भल्लाटनिर्ण. सिं. पा. २४४) सांगितलेले असते. प्रस्तुत ग्रंथकाराच्या एका निकट नातेवाईकाला पुष्कळ काळपर्यंत उत्कंठेने वाट पाहिल्यानंतर अशुभ मानलेल्या नक्षत्रावर एक पुत्र झाला होता आणि म्हणून ज्योतिषानी त्या बालकाचा एखाद्या पवित्र वृक्षाखाली त्याग करा अशी शिफारस केली होती. त्या गृहस्थाने निग्रहपूर्वक तसे करण्याचे नाकबूल केले आणि स्वतःचे मरण आनंदाने पत्करण्याचे ठरविले. तो गृहस्थ त्यानंतर ४० हून अधिक वर्षेपर्यंत जगला आणि तो पुत्रही बराच मोठा झाला असल्याचे प्रस्तुत ग्रंथकाराने पाहिले.

पृथ्वी ही विश्वाचा मध्यबिंदु असल्याचे टॉलेमीने मान्य केले होते आणि ग्रहांच्या गूढ स्वरूपाच्या गतींची उपपत्ती लावण्याकरिता त्याने अशी कल्पना केली होती कीं त्या ग्रहांच्या पृथ्वीभोवती होणाऱ्या प्रदक्षिणांच्या कक्षा चमत्कारिक आणि एकात एक गुंतलेल्या अशा आहेत. त्या कल्पनेच्या आधारावर टॉलेमीच्या अनुयायांना ग्रहणाचे भविष्य सांगता येत असे. टॉलेमीने गृहीत धरलेल्या ह्या दोन्ही कल्पना आधुनिक खगोलशास्त्राच्या ज्ञानाच्या दृष्टीने चुकीच्या आहेत. ह्यावरून असे सूचित होते की केव्हा केव्हा चुकीच्या गृहीत कृत्यांच्या आधारावर बिनचुक अनुमाने काढणे शक्य असते. वराहमिहिराच्या मताप्रमाणे कुंडलीवरून त्या व्यक्तीच्या आयुष्यात त्याच्या पूर्वीच्या एक अथवा अनेक जन्मांतील कर्मांना अनुसरून काय होण्याचा संभव आहे एवढेच दाखविले जाते. तथापि बऱ्याच लोकांचा पूर्वजन्माच्या सिद्धांतावर विश्वास देखील नसतो. केवळ भारतांतीलच नव्हे तर जगांतील अनेक प्रदेशांतील लक्षावधि लोकांच्या मनांत फलज्योतिषशास्त्राविषयी असणारा जिवंत आणि बळकट विश्वास विज्ञानशास्त्राला अथवा इतिहासकारांना नष्ट करणे शक्य होईल असे दिसत नाही. तथापि, ग्रह एखाद्या व्यक्तीला काही गोष्टी करावयास भाग पाडतात ह्या समजुतीमुळे गंभीर स्वरूपाचे परिणाम होणे शक्य आहे. मनुष्याने केलेल्या सर्व कृत्यांबद्दलची नैतिक जबाबदारी अशा समजुतीने नष्ट होण्याचा संभव आहे आणि एखादा गुन्हेगार असे प्रतिपादन करण्याचा संभव आहे की आकाशातल्या ग्रहांच्या प्रेरणांना प्रतिकार करण्यास तो असमर्थ होता.

भारतीय फलज्योतिषशास्त्रातील अत्यंत महत्वाच्या बाबी म्हणजे राशि, ग्रह आणि १२ भाव अथवा स्थाने ह्या आहेत. **राशींचा** विचार केल्यास असे दिसून येते की आकाशातील कांही विशिष्ट तारकापुंजांना मेष, वृषभ इत्यादि नांवे केवळ कल्पनेने दिली आहेत. निरनिराळ्या देशांतील लोकांनीं एकाच राशीला भिन्न भिन्न नांवे दिल्याचेही आढळून येते. तसेच राशींचे पुरुष आणि स्त्री, चर आणि स्थिर, ह्यांच्यासारखे विभागही केवळ दोन समान गट करण्याकरिता एक टाकून एक घेण्यासारख्या तत्त्वावर केलेले असल्याचे दिसून येते. त्याचप्रमाणे **ग्रहांच्या** बाबतींत त्याचे पुरुष, स्त्री आणि नपूंसक, क्रूर आणि सौम्य ह्यांच्या सारखे विभाग देखील कल्पनेच्या अथवा समसमान गट करण्याच्या तत्त्वावर केलेले असल्याचे दिसते. ग्रहांच्या उच्च आणि नीच स्थानांच्या बाबतींतही कांही. सयुक्तिक कारणे दिसून येत नाहींत. **बारा भावांची** नांवे देखील (तनु

सारखे काही भाव वगळल्यास) सर्वच ठिकाणी कांही नियमांवर आधारित असल्याचे आढळत नाही. ग्रहांची मैत्री आणि शत्रुत्व ह्यांच्या बाबतीतदेखील काही सुयंत्रितपणा आढळत नाहीं. ग्रहांच्या दृष्टि हेही फलज्योतिषशास्त्रामधील एक महत्वाचे तत्त्व आहे. परंतु आधुनिक खगोलशास्त्राच्या दृष्टीने निरनिराळे ग्रह एकमेकांपासून अत्यंत दूर अंतरावर आहेत. त्यांना एकमेकांकडे अथवा ताऱ्यांकडे ¼ अथवा ½ अशांसारख्या दृष्टीने पाहणे कसे शक्य होईल हे समजत नाही.

राशींवर अधिष्ठित असलेले फलज्योतिषशास्त्र भारतामध्ये बहुधा ख्रि. पू. च्या तीन शतकांत प्रस्थापित झाले असावे. वराहमिहिराच्या पूर्वी होऊन गेलेल्या ज्योतिष्यांनी आणि स्वतः वराहमिहिराने मेष, वृषभ प्रभृति राशिचक्राच्या काही विशिष्ट भागात असलेल्या पाहिल्या आणि त्यांनी चंद्र मेष प्रभृति राशीत असताना जन्मलेल्या व्यक्तींच्या शारीरिक आणि मानसिक वैशिष्ट्यांसंबंधी आणि व्यवसायांसंबंधी कांही नियम तयार केले (बृ. जा. अध्याय १७) आणि त्या प्रमाणेच सूर्य, मंगळ, प्रभृति ग्रह मेष प्रभृति राशींत असताना जन्मलेल्या व्यक्तींसंबंधीही कांही नियम तयार केले (बृ. जा. अ. १८). दोन हजार वर्षांपूर्वी राशिचक्राच्या ज्या भागामध्ये वृषभ राशि होती त्या भागांत आता राशिचक्राच्या परागतीमुळे सांप्रतकाळी त्या विशिष्ट राशीच्या जागी मेषादि राशि आल्या आहेत. तेव्हा दोन हजार वर्षापूर्वी त्या विशिष्ट राशींत जन्म झाला असताना फलज्योतिषशास्त्राच्या दृष्टीने होणारे परिणाम सध्या राशिचक्राचा तो भाग त्या विशिष्ट राशीने व्यापलेला नसताना सारखेच कसे असू शकतील?

भारतीय फलज्योतिषशास्त्रामधील अशाप्रकारच्या दोषांवरून विचारवंत लोक असा निष्कर्ष काढण्याला प्रवृत्त होतील की फलज्योतिषशास्त्रातील नियमांचा आपल्या अंगीकृत कार्याला योग्य काल ठरविण्याच्या कामी फारच थोडा उपयोग होण्यासारखा आहे. धर्मशास्त्रावरील प्राचीन ग्रंथांत फलज्योतिषशास्त्राच्या दृष्टीच्या ज्या तपशीलांचा पूर्ण अभाव दिसून येतो त्या तपशीलांची गेल्या २००० वर्षांत इतकी वाढ झाली की त्या योगाने धार्मिक दृष्ट्या आवश्यक असणाऱ्या मूलभूत गोष्टींकडे दुर्लक्ष झाले. सर्व मानवी घटना ग्रहांच्या आणि ताऱ्यांच्या योगाने घडून येत असतात असे मानण्याच्या योगाने दोन चुका होतात. एकतर मानवी कृत्यांवर असणारी देवाची सत्ता नाकबूल केली जाते आणि दुसरी चूक म्हणजे मनुष्याचे वर्तनस्वातंत्र्य काढून घेतले जाते. ग्रहस्थितीवरून दर्शित होणारे परिणाम जर ज्योतिषांना थांबविता अथवा चुकविता येणे शक्य नसेल तर त्यांच्या भविष्यज्ञानापासून काही फायदा होणार नाही; आणि जर निश्चित होणारे परिणाम थांबविता अथवा चुकविता येणे शक्य असेल तर त्या घटना ग्रह घडवून आणतात हा सिद्धांत प्रस्थापित करिता येणार नाही. अशा प्रकारची ही शृंगापत्ति आहे.

उपनयन आणि विवाह ह्यांच्यासारख्या धार्मिक गोष्टींत फलज्योतिषशास्त्रातील नियमांना किती मर्यादेपर्यंत महत्व द्यावे हा प्रश्न आहे. गृह्यसूत्रांच्या काळी आणि मनुस्मृतीच्या काळी (म्हणजे ख्रि. पू. अनेक शतके) उपनयन आणि विवाह ह्यांच्या बाबतीत फलज्योतिषशास्त्राच्या दृष्टीने आवश्यक अशा गोष्टी फार थोड्या आणि साध्या स्वरूपाच्या होत्या आणि त्यानंतर त्यांत अशा गोष्टींची क्रमाक्रमाने भर पडत गेली. इ.स.च्या ११ व्या शतकात झालेल्या राजमार्तड ह्याच्या सारख्या ग्रंथाने अशी शिफारस केली होती की ज्यांचा विवाह फार काळपर्यंत लांबला असेल अशा मुलींच्या बाबतीत अशा सर्व आवश्यक गोष्टींकडे दुर्लक्ष करावे. ह्याकरिता प्रस्तुत ग्रंथकाराचा असा सल्ला आहे की उपनयन आणि विवाह ह्यांच्या बाबतीत अशा त्रासदायक आणि निरर्थक नियमांतून मुक्त होण्याच्या दृष्टीने पहिली पायरी म्हणून गृह्यसूत्रांतील आणि मनुस्मृतीमधील सोप्या नियमांचा पुन्हा अंगीकार करावा.

फलज्योतिषशास्त्रात दोष असले तरी सर्वसाधारणपणे त्या शास्त्राचा त्याग करावा अथवा किती मर्यादेपर्यंत त्या शास्त्राचा स्वीकार करावा ह्यासंबंधी सल्ला देणे हे धर्मशास्त्राचा इतिहासकार ह्या नात्याने त्याचे कर्तव्य आहे असे प्रस्तुत ग्रंथकाराला वाटत नाही.

# प्रकरण १८

## पंचांग, शक, वर्ष आणि महिने इत्यादिकांच्या निरनिराळया गणना

(मू. ग्रं. खंड ५ पा. ६४१–६८५)

व्रतें आणि उत्सव त्यांच्या त्यांच्या योग्यकालीं करता यावेत आणि यज्ञ, उपनयन, विवाह ह्यांच्या सारख्या विधींना योग्य काल सांपडावा ह्याकरिता लोकांना पंचांगाची आवश्यकता असते. **पंचांग** हा धार्मिक उत्सवांची तसेच खगोलशास्त्रासंबंधी आणि फलज्योतिषशास्त्रासंबंधी घटनांची आगाऊ माहिती देणारा आणि व्यवहारातील निरनिराळ्या कामाकरिता वर्षे, महिने, दिवस ह्यांच्याविषयी माहिती देणारा व्यवस्थितपणे तयार केलेला संग्रह अथवा ग्रंथ असतो. भारतामध्ये ख्रिस्ती, पारशी प्रभृति निरनिराळ्या धर्मांच्या लोकांत प्रचलित असणारी सुमारे तीस पंचागें अस्तित्वांत असून एकट्या हिंदूमध्ये देखील अनेक प्रकारची पंचांगें प्रचलित आहेत. कांहीं पंचांगे सूर्यसिद्धान्त व आर्यसिद्धान्त ह्यांच्या आधारावर केलेली असतात आणि काही ग्रहलाघव ह्याच्यासारख्या तुलनेने अलिकडील काळांत झालेल्या निरनिराळ्या सिद्धान्तग्रंथांच्या आधारावर केलेली असतात. काही पंचांगांत वर्षारंभ चैत्र शुद्ध प्रतिपदेला असतो, काहीमध्ये कार्तिक शुद्ध प्रतिपदेला असतो आणि (काठेवाडमधील) हलर प्रांतासारख्या काही लहान प्रदेशांत वर्षारंभ आषाढ शुद्ध प्रतिपदेला होतो. गुजरात आणि बंगाल व्यतिरिक्त उत्तर भारतामध्ये विक्रमसंवताचा उपयोग करितात, महाराष्ट्र आणि दक्षिण भारत ह्यांत सामान्यतः शकवर्षाचा उपयोग करितात, परंतु कश्मिरमध्ये लौकिक कालगणनेचा उपयोग करितात. उत्तर भारत आणि तेलंगण ह्यांच्यासारख्या काही भागांत आणि काही समाजांत पूर्णिमान्त महिने असतात; बंगाल, महाराष्ट्र, दक्षिण भारत ह्यांच्या सारख्या काही भागांत अमान्त गणना प्रचारात आहे. ग्रहणांसारख्या प्रत्यक्ष दिसणाऱ्या घटनांचे भविष्य वस्तुस्थितीशीं जुळावे ह्याकरिता काही लोक अशी माहिती नॉटिकल अल्मनाक नांवाच्या पाश्चिमात्य पद्धतीच्या पंचांगातील माहितीच्या आधारावर तयार करितात. अशा पंचागांना दृक्प्रत्यय अशी संज्ञा देण्यात येते. दक्षिण भारतात फारच पंचांगें अस्तित्वांत आहेत. त्यांतील काही निरनिराळ्या पंथांच्या लोकांत प्रचारात आहेत. तेलगु लोक चांद्रमानाप्रमाणे चालतात. तामिल लोक सौरमानाप्रमाणे चालतात आणि त्यांचा वर्षारंभ मेषविषुव महिन्यापासून होतो. बंगालमधील लोक सौरमानाप्रमाणे चालतात परंतु धार्मिक समारंभ चांद्रमानाच्या तिथीना अनुसरून करितात आणि दर तीन वर्षानीं एक अधिक महिना घालून दोन्ही पद्धतींचा मेळ घालतात. श्रीरंगम् पंचांग वैष्णव लोक वापरतात, स्मार्त लोक श्री शंकराचार्यांच्या विद्यमाने प्रसिद्ध होणारे कंजनूर पंचांग वापरतात. मलबारमध्ये परहितपद्धतीचे पंचांग करण्यात येते.

वर उल्लेख केलेल्या तीन सिद्धान्तग्रंथांपैकी **सूर्यसिद्धान्त** त्याच्या अचूकपणामुळे सर्व भारतभर वापरला जातो; त्रावणकोर, मलबार आणि कर्नाटक प्रांतांत आणि तामिळ जिल्ह्यातील मध्वसांप्रदायातील लोक आर्यसिद्धान्ताचा आधार घेतात; गुजरात आणि राजस्थान ह्या प्रांतांत ब्रह्मसिद्धान्त प्रचलित आहे; तथापि आता ब्रह्मसिद्धान्त मागे पडून त्याच्या जागी सूर्यसिद्धान्ताचा अधिक उपयोग होऊ लागला आहे. सिद्धान्तग्रंथांत महायुग कालापासून गणिते केलेली असतात आणि ती गणिते करण्याला इतका मोठा परिश्रम करावा लागतो की त्यांच्या आधारावर पंचांग तयार करणे अशक्यप्राय असते. ह्याकरिता पंचांगें तयार करण्याकरिता सिद्धान्तग्रंथांच्या आधारावर केलेल्या मकरंद, ग्रह लाघवीय ह्यांच्यासारख्या **करण** ग्रंथांचा उपयोग करितात. भिन्न भिन्न सिद्धान्तांमध्ये दोन महत्त्वाचे मतभेदाचे मुद्दे असतात. ते म्हणजे– (१) वर्षाची लांबी (ह्या बाबतींत फक्त काही थोड्या विपलांइतकाच भेद आहे) आणि (२) एका कल्पामध्ये अथवा महायुगामध्ये अथवा युगामध्ये चंद्र आणि ग्रह ह्यांच्या परिवर्तनांची संख्या. ही परिस्थिती भारताबाहेरच्या

देशांतही आढळते. युरोपमधील वर्षगणना तीत अनेक सुधारणा झाल्या असूनही अजून अतिशय गैरसोईची आहे. त्या गणनेमध्ये महिन्यांचे दिवस २८ पासून ३१ पर्यंत असू शकतात, पाव वर्षात १८१ ते १८४ दिवस असू शकतात आणि ईस्टरसारखा त्यांचा सर्वात अग्रगण्य सण २२ मार्च ते २५ एप्रिल पर्यंतच्या कालातील भिन्न भिन्न ३५ तारखांना येऊ शकतो.

वर्षाची लांबी हा विषय सर्वस्वी खगोलशास्त्राचा आहे. म्हणून त्या प्रश्नाचा विचार धर्मशास्त्राच्या इतिहासामध्ये प्रायः टाळण्यात येईल. प्राचीन भारतीय खगोलशास्त्राची माहिती देणारे इंग्रजी भाषेत अनेक ग्रंथ आहेत. निवळ मराठी वाचकांच्या दृष्टीने शं. बा. दीक्षितकृत 'भारतीय ज्योतिषशास्त्र' व्यं. बा. केतकर कृत ज्योतिर्गणितम्, केतकी वैजयन्ती, ग्रहगणित, डॉ. के. ग. दप्तरीकृत 'भारतीय ज्योतिषशास्त्र निरीक्षण' इत्यादि ग्रंथ महत्वाचे आहेत. शिवाय भारत सरकारने इ. स. १९५५ मध्ये प्रसिद्ध केलेला पंचाग संशोधन समितीचा अहवाल हा ग्रंथही विस्तृत आणि उपयुक्त आहे.

सर्व देशांत **कालाचे मूलभूत विभाग** एकसारखेच असतात; ते म्हणजे दिवस, महिना, ऋतु, आणि वर्ष हे होत. निरनिराळ्या घटनांचा कालक्रम ठरविण्याकरिता आणि इतिहासाकरिता **वर्ष** हा अत्यंत आवश्यक असा कालविभाग असतो. मूलभूत कालविभाग एक सारखेच असले तरी महिन्यांतील आणि वर्षातील दिवसांची रचना, दिवसाचे पोटविभाग, दिवसाचा आरंभ, वर्षाची ऋतु आणि महिने ह्यांत विभागणी, प्रत्येक महिन्यातील आणि वर्षातील दिवसांची संख्या आणि निरनिराळे महिने ह्यांच्या बाबतीत वेगवेगळे प्रकार असतात. कालमापनाची मोठी साधने सूर्य आणि चंद्र ही असतात. पृथ्वीच्या स्वतःच्या आंसाभोवती होणाऱ्या फेऱ्यामुळे दिवस होतो. महिना हा विभाग मुख्यतः चंद्रावर अवलंबून असतो आणि वर्ष हे सूर्याच्या भासमान होणाऱ्या गतीमुळे होत असते. वास्तविक रीतीने वर्ष हे पृथ्वीच्या सुर्याभोवती होणाऱ्या प्रदक्षिणेमुळे उत्पन्न होते. दिवस आणि रात्र समसमान असणाऱ्या एका वासंतिक विषुवदिनापासून त्याच्या पुढच्या वासंतिक विषुवदिनापर्यंत जाण्याला सूर्याला लागणारा काळ ह्याला **सायनवर्ष** म्हणतात. एका निश्चित ताऱ्यापासून निघून त्याच ताऱ्यापर्यंत पुन्हा येण्याला सूर्याला लागणाऱ्या कालाला **नाक्षत्रवर्ष** म्हणतात. सायन वर्ष हे नाक्षत्रवर्षापेक्षा सुमारे २० मिनिटांनीं लहान असते. कारण वासंतिक विषुव बिंदू प्रतिवर्षी सुमारे ५० सेकंदाच्या गतीने पश्चिमेकडे सरकत असतो. आधुनिक काळच्या पंचांगात अथवा वर्षगणनेमध्ये कोणत्या तरी शकाला अनुसरून चालूवर्ष, महिना आणि महिन्यांतील दिवस ह्यांचा आणि सामान्यतः वारांचा उल्लेख केलेला असतो. शकगणना आणि वर्ष आणि महिना हयांचे सूक्ष्म काल ह्यांचे ज्ञान मानवजातीला तुलनेने बऱ्याच मागाहून झाले.

**नाक्षत्रमास** २९½ दिवसांपेक्षा थोडासा मोठा असतो. **सौरवर्ष** (सायनवर्ष) हे ३६५¼ दिवसांपेक्षा थोडेसे लहान असते. हे कालावधि अपूर्ण स्वरूपाचे असतात. परंतु सामान्य व्यवहाराकरिता आणि वर्षगणनेकरिता संपूर्ण दिवसांची गरज असते. ह्याशिवाय वर्ष आणि महिना ह्यांचे आरंभकाल योग्य रीतीने ठरविणे अवश्य असते आणि ते आरंभकाल ऋतुमानाशी जुळते असावे लागतात, आणि कोणती तरी शकगणना स्वीकारावी लागते धार्मिक आणि व्यावहारिक कामाकरिता उपयोग करावयाच्या पंचांगांत अथवा वर्षगणनेत ह्या गोष्टी आवश्यक असतात.

पंचांगांत असणारी गुंतागुंत मुख्यत्वेकरून नाक्षत्रमासाच्या आणि सौरवर्षाच्या अपूर्ण कालावधीमुळे उत्पन्न झालेली असते. मुसलमानांनी ही गुंतागुंत नाहींशी करण्याकरिता सौर वर्षाच्या अवधीकडे पूर्णपणे दुर्लक्ष्य करून चंद्र हाच एकमेव कालमापक मानला. त्यांचे वर्ष पूर्णपणे चांद्रमानाचे असते. त्यामुळे

मुसलमान लोकांचे वर्ष ३५४ दिवसांचे झाले. सुमारे ३३ वर्षांच्या अवधींत त्यांचे सर्व उत्सव आणि सण वर्षातील सर्वही महिन्यांत येऊन जातात. उलट पक्षी प्राचीन काळच्या इजिप्तमधीलं लोकांनीं चंद्राकडे पूर्णपणे दुर्लक्ष्य केले होते आणि त्यांचे वर्ष (प्रत्येकी ३० दिवस असलेले १२ महिने अधिक वार्षिक पांच दिवस मिळून) ३६५ दिवसांचे असे. त्यांच्यांत अधिक महिने अथवा लीप वर्षे नसत. प्राचीन काळच्या (भारतासहित) बहुतेक सर्व समाजांत चांद्र आणि सौर मिश्रित वर्षगणना वापरीत असत आणि अधिक महिना धरण्याची पद्धति स्वीकारून चांद्रमासांचा सौरवर्षांशी मेळ घालण्याचा प्रयत्न करीत असत.

ऋग्वेदात (१·२५·८) देखील अधिक महिन्याचा उल्लेख केला आहे परंतु तो कोणत्या पद्धतीने ठरविण्यात येत असे आणि चांद्रमहिन्याच्या रचनेत त्याचा कोठे समावेश करण्यात येत असे ह्याची आपणास माहिती नाही. वेदांगज्योतिषाप्रमाणे ५ वर्षात २ अधिक महिने येत असत ही गोष्ट आपणास माहित आहे. त्या काळच्या लोकांचे अनेक उत्सव पूर्णिमेला अथवा अमावास्येला करावयाचे असत आणि अशा पूर्णिमा आणि अमावास्या नक्की केव्हा येतील, तसेच पावसाळा आणि हिवाळा केव्हा येईल, धान्य पेरण्याकरिता जमिनी केव्हा तयार केल्या पाहिजेत आणि पेरणी केव्हा केली पाहिजे ह्या गोष्टी आगाऊ कळणे अवश्य असते.

वर्षगणनेकरिता **शकाचा** उपयोग करण्याचा प्रघात भारतात सुमारे २००० वर्षांपेक्षा फारसा अधिक प्राचीन नाही. भारतातील सिथियन राजांनी अफगाणिस्तान आणि वायव्य भारत ह्या देशांवर ख्रि. पू. १०० आणि इ. स. १०० ह्या कालखंडात राज्य केले होते. त्या राजांच्या कागदपत्रात **निरंतर चालणाऱ्या शकगणनेचा** प्रथम उपयोग करण्यात आला. बहुतेक प्राचीन देशात निरंतर चालणारे शक वापरण्यात येत नसून फक्त राजांच्या कारकीर्दीच्या वर्षांचा उपयोग करण्यात येत असे. भारतामध्ये देखील अशोकाने आपल्या आज्ञापत्रात कारकीर्दीच्या वर्षांचाच उपयोग केला आहे. (अशोककालीन शिलालेख खंड १ पा. १४७, १५१ इ.). कौटिल्यानेही राजवर्षांचाच उल्लेख केला आहे (अर्थशास्त्र भाग २-६ पा. ६०). हीच पद्धति कुषाण आणि सातवाहन घराण्यातील राजांच्या वेळीही चालू होती. (एपि. इं. खं. १० क्र २२, ३२ इ.) ख्रि. पू. २ ऱ्या शतकात होऊन गेल्याचे मानला जाणारा कलिंग देशाचा खारवेल राजा आपल्या कारकीर्दीच्या वर्षांचाच उपयोग करीत असे आणि कोणत्याही शकगणनेचा उपयोग करित नसे. (एपि. इं. खं. २० पा. ७१, ७९, ८० इ.) खारवेलाचा काल सामान्यतः ख्रि. पू. २ रे शतक समजण्यात येतो.

भारतात अनेक शतावधि वर्षे निरनिराळ्या प्रकारच्या शकगणनांचा उपयोग करण्यात आला असल्यामुळे कालानुक्रमाच्या आणि इतिहासाच्या बाबतीत फार घोटाळे उत्पन्न झाले आहेत. अल्बेरुणीने श्रीहर्ष, विक्रमादित्य, शक, वल्लभ आणि गुप्त ह्या पाच शकांचीच नावे दिली आहेत. (सा. चौ. खंड २ पा ५) प्रस्तुत ग्रंथात काही थोड्या महत्वाच्या शकांचेच त्रोटक विवेचन करण्यात येईल.

**कलियुगारंभ.** कलियुगाचा आरंभ केव्हा झाला आणि कलियुग हे कोणत्या घटनेचे स्मारक चिन्ह आहे ह्या प्रश्नांच्या बाबतीत भिन्न भिन्न मते अस्तित्वात होती. सांप्रत काळी कलियुग ख्रि. पू. ३१०२ ह्या वर्षी सुरू झाले असे मानतात आणि इ. स. च्या वर्षांत ३१०१ वर्षे मिळवून **गतकलिवर्ष** काढण्यात येते. कलियुगाच्या आणि कल्पाच्या आरंभी चैत्रशुद्ध प्रतिपदेला रविवार होता आणि त्या दिवशी सूर्योदयाच्या वेळी (सूर्य चंद्रासहित) सर्व ग्रह एकत्र होते असे मध्ययुगीन काळचे भारतीय खगोलशास्त्रज्ञ मानीत असत. (भास्कराचार्यकृत ग्रहगणित मानवाधिकार श्लो. १५) आधुनिक काळचे काही ग्रंथकार ही परिस्थिति काल्पनिक असल्याचे मानित असले तरी तशा प्रकारची श्रद्धा पूर्वीपासून चालत आली असण्याचा अधिक संभव आहे. प्रत्येक धार्मिक कृत्याकरिता करावयाच्या संकल्पामध्ये श्वेतवाराहकल्पापासून सुरुवात करून

वैवस्वत मन्वंतर, कलियुगाचा प्रथम चरण ह्या घटनांचा उल्लेख केला जातो आणि पुढे शक, संवत्सर, महिना, पक्ष, तिथि, नक्षत्र, योग आणि करण ह्यांचा उल्लेख करावा लागतो. शक, वर्ष आणि त्याचे पोटविभाग ह्यांचे अशा प्रकारचे महत्त्व आमच्या लोकांच्या धार्मिक आयुष्यक्रमांत असल्यामुळे प्रत्येक धर्मनिष्ठ हिंदु मनुष्याजवळ पंचाग असणे अत्यंत आवश्यक असते.

**विक्रमसंवताचा** आरंभ कसा झाला आणि त्याचा व्यवहारात उपयोग केव्हा झाला ह्या गोष्टी अनिश्चित आहेत. विक्रमसंवताचा आरंभ ख्रि. पू. ५७ ह्या वर्षी झाल्याचे मानण्यात येते. परंतु त्या वर्षाच्या सुमारास विक्रमादित्य नावाचा कोणी राजा होता किंवा नाही ह्या विषयी संशय प्रदर्शित करण्यात आले आहेत. गुजरातमध्ये वर्षारंभ कार्तिक शुद्ध प्रतिपदेला होतो म्हणून विक्रमसंवताचा आरंभ ख्रि पू. ५८ ह्या वर्षीच्या नोव्हेंबरमध्ये झाल्याचे मानतात. उत्तर भारतात वर्षारंभ चैत्र कृष्ण प्रतिपदेला होतो म्हणून तेथे विक्रमसंवताचा आरंभ ख्रि. पू. ५८ ह्या वर्षाच्या एप्रिल महिन्यात झाल्याचे मानतात. तुलनेने प्राचीन असलेल्या काही शिलालेखात **कृत वर्षाचा** उल्लेख आढळतो. (एपि. इं. खं. १३ पा. ४२।५२. इ. स. २३९) कृतवर्षगणना विक्रमसंवताच्या पूर्वी अस्तित्वांत होती ह्याबद्दल विद्वानांचे एकमत आहे. **कृत आणि मालव** ह्या दोन्ही गणना एकच असल्याचे मानले जाते आणि त्या दोन्ही गणनांचे उल्लेख असलेले काही शिलालेख (इंडि. ॲटिक्वरी खं ४२ पा. १६१।१६३ इ. स. ४०४) राजस्थान आणि माळवा ह्या प्रांतांत उपलब्ध झाले आहेत. असा संभव आहे की **कृत** हे त्या वर्षगणनेचे पूर्वीचे नाव असून मालव लोकांनी त्या गणनेचा स्वीकार केल्यानंतर त्याच गणनेला मालव गणाम्नात अथवा **मालवगणस्थिति** असे म्हणण्यात येऊ लागले. **कृत** वर्षगणना कृतयुगाच्या आरंभी सुरू झाली असे लोक मानीत असावे असे प्रस्तुत ग्रंथकाराला वाटत नाही. कृत या शब्दाचा अर्थ सिद्ध असा असून ती गणना काही विशिष्ट समाजाने ठरविली होती असे असण्याचा संभव आहे. विक्रमसंवताचा स्पष्ट उल्लेख इ. स. च्या ८ व्या अथवा. ९ व्या शतकांत केलेला आढळतो (इंडि. ॲटि खं. १२ पा. १५५ इ. स. ७३७). संस्कृत खगोलशास्त्रावरील ग्रंथांत विक्रमसंवताचा क्वचितच उल्लेख केलेला असून ती गणना शकवर्षाहून भिन्न आहे असे दर्शित करण्याकरिता त्या गणनेचा उल्लेख सामान्यतः **संवत** ह्या नांवाने करण्यात येतो.

चालुक्य घराण्यांतील सहाव्या विक्रमादित्य राजाने शकवर्षगणना बंद करून एक नवा **चालुक्य विक्रम संवत** सुरू केला होता आणि त्यासंवताचा प्रारंभ इ. स. १०७६।७७ मध्ये झाला होता. (मुंबई गॅझे. खंड १ भाग २ पा. ४४७, ४७७).

**शक काल.** इ. स. ५०० च्या सुमारास झालेल्या खगोलशास्त्रावरील बहुतेक सर्व संस्कृत ग्रंथांत शककालाचा उल्लेख केला आहे. ते नांव कसे पडले हे गूढ आहे. सर्वात जुन्या अशा ज्या शिलालेखांत शकवर्षगणनेचा स्पष्ट उल्लेख केला आहे त्यांपैकी एका लेखांत शक वर्ष शक राजाच्या राज्याभिषेकाचे वर्ष असल्याचे म्हटले आहे. (शक नृपति राज्याभिषेक संवत्सरेष्वतिक्रान्तेषु पञ्चसु शतेषु महाकार्तिक पौर्णमास्या इ.) (इंडि. ॲटि. खं. ३ पा. ३०५) बृ. सं. ह्या ग्रंथावरील उत्पलाच्या टीकेत (रचना इ. स. ९६६ च्या सुमारास) असे म्हटले आहे की शक कालाचा आरंभ जेव्हा विक्रमादित्याने शक राजाचा वध केला त्या वेळेपासून झाला. कोणी कोणी शक कालगणनेचा संबंध कुषाणवंशातील सम्राट कनिष्काशी जोडतात. मध्ययुगीन कालात आणि आधुनिक कालात शककालगणनेचा संबंध शालिवाहनाच्या नांवाशी जोडला आहे. परंतु **शालिवाहन शक** असा शब्दप्रयोग फक्त इ. स. च्या १३ व्या अथवा १४ व्या शतकातील शिलालेखांतच आढळतो. (पहिल्या बुक्कराजाचा शके १२७६ मधील ताम्रपट इ. स. १३५४), गाथा सप्तशती (५-६७) मध्ये सालाहन राजाचा उल्लेख केला आहे. (सालाहन हे शालिवाहन शब्दाचे प्राकृत भाषेंतील रूप

आहे.) (सातवाहन ह्या नावात बदल होऊन शालवाहन नाव झाले असण्याचा आणि त्याचेच पुढे शालिवाहन असे रूपांतर झाले असण्याचा संभव आहे.)

**सप्तर्षिकाल** अथवा **लौकिकवर्ष**. सांप्रतकालीदेखील ही वर्ष गणना काश्मीर मध्ये अस्तित्वात आहे. लौकिकवर्ष २४ हे गत शक वर्ष १०७० बरोबर असल्याचे राजतरंगिणीमध्ये (१·५२) सांगितले आहे. बृ. सं. मध्ये (१३·३।४) अशी एक परंपरागत आख्यायिका दिली आहे की सप्तर्षि तारकासमूह प्रत्येक नक्षत्रामध्ये १०० वर्षेपर्यंत असतो आणि युधिष्ठिराच्या वेळी तो तारकासमूह मघानक्षत्रात होता. ह्या १०० वर्षांच्या आवर्तनाचा काश्मीरमधील वर्षगणनेच्या आरंभाशी बहुधा संबंध असावा. (एपि. इं. खं. २० क्र. १४३१।१४४३ मध्ये लौकिक वर्षांचा उल्लेख असून क्र. १४४४।१४४५ मध्ये सप्तर्षिवर्षगणनेचा उल्लेख असलेले शिलालेख दिले आहेत).

**वर्धमान** आणि **बुद्धनिर्याण**, **गुप्त**, **चेदी**, **हर्ष**, **लक्ष्मणसेन** (बंगाल), **कोल्लम्** अथवा **परशुराम** (मलबार) ह्यांच्या सारख्या अनेक वर्षगणना एकेकाली लोकव्यवहारामध्ये अतिशय प्रचारांत होत्या. परंतु सांप्रत काळी त्या फारशा प्रचारात राहिलेल्या नाहीत. त्यामुळे त्याचे वर्णन प्रस्तुत ग्रंथात केले नाही.

नारदसंहिता (३·१।२) [बाह्मं दैवं मानुषं. च पित्र्यं सौरं च सावनम्।
चान्द्रमार्क्षं गुरोमनिमिति मानानि वै नव ॥
एषां तु नवमानां व्यवहारोऽत्र पञ्चभिः।
तेषां पृथक् पृथक् कार्य वक्ष्यते व्यवहारतः ॥] मध्ये ब्राह्य, दैव, मानुष, पित्र्य, सौर, सावन, चान्द्र, नाक्षत्र आणि बार्हस्पत्य ह्या नऊ प्रकारच्या कालगणनांचा उल्लेख केला आहे. वेदाङ्गज्योतिषात (श्लो. ३१) चार प्रकारच्या आणि हेमाद्रीने (काल पा. ९) चान्द्र, सौर आणि सावन ह्या तीन प्रकारच्या गणनांचे विवेचन केले आहे. हेमाद्रीने उल्लेख केलेल्या तीन वर्षगणनांचा धार्मिक आणि व्यावहारिक कार्यांत सर्वांत अधिक उपयोग करण्यात येतो आणि धर्मशास्त्रावरील ग्रंथांचा त्या तीन गणनांशी विशेष संबंध आहे.

**चांद्र महिना.** एका अमावास्येच्या अंतापासून दुसऱ्या अमावास्येपर्यंतच्या कालाला चांद्र महिना म्हणतात आणि अशा १२ महिन्यांचे एक **चांद्रवर्ष** होते. चंद्राची कक्षा पूर्णपणे वर्तुळाकृति नसल्यामुळे आणि इतर काही कारणांनी एका चांद्र महिन्याचा अवधि २९·२४६ ते २९·८१७ दिवसाइतका कमी अधिक असतो आणि त्याची सरासरी २९·५३०५९ दिवस इतकी असते.

**सौर महिना** हा सूर्याला राशिचक्रातील एका राशीपासून दुसऱ्या राशीपर्यंत जाण्याला लागणारा अवधि असतो आणि अशा १२ महिन्यांचे एक **सौरवर्ष** होते. सौर वर्षाचा पहिला दिवस मेष ह्या सौर महिन्याचा पहिला दिवस असतो.

**सावन महिन्या**मध्ये ३० दिवस असतात आणि अशा १२ महिन्यांचे एक **सावनवर्ष** होते. सावनवर्षगणनेमध्ये एका सूर्योदयापासून दुसऱ्या सुर्योदयापर्यंतचा काल हा **दिवस** समजला जातो.

**नाक्षत्रमहिना** हा चंद्राला २७ नक्षत्रांतून जाण्याला लागणारा काल असतो.

**बार्हस्पत्यवर्ष** हा गुरूला राशिचक्रातील एका राशीपासून दुसऱ्या राशीपर्यंत जाण्याला लागणारा (म्हणजे सुमारे ३६१ दिवस) काल असतो. आधुनिक खगोलशास्त्राप्रमाणे गुरूला सूर्याभोवती प्रदक्षिणा

करण्यास ११·८६ वर्षे लागतात. ह्या चार पाच गणनांचा जुन्या काळच्या ग्रंथांत उल्लेख केलेला नसतो आणि मागाहूनच्या काळात झालेल्या ग्रंथांत देखील त्यांचा पूर्णपणे उपयोग केल्याचे दिसून येत नाही.

बृ. सं (२·४) वरील उत्पलाच्या टीकेत कोणकोणत्या गणनेवरून कोणत्या कालाचे ज्ञान होते हे सांगितले आहे. त्यात म्हटले आहे की **सौरगणनेवरून** युग, वर्ष, विषुवत्, अयन, ऋतु, दिवस आणि रात्रि ह्यांच्या कालांत होणारी वाढ आणि घट ह्यांचे ज्ञान होते; **चांद्रगणनेवरून** तिथि, करण, अधिक मास अथवा क्षयमास, रात्री करावयाची कृत्यें ह्यांचे ज्ञान होते; **सावनगणनेवरून** यज्ञ, सोमाच्या आहुती देण्याची तीन सवनें, ग्रहांच्या गति, उपवास, जन्म आणि मृत्युनिमित्त येणारे आशौच, औषधयोजना, प्रायश्चित्ते आणि इतर धार्मिक विधींचे ज्ञान होते. ही माहिती ब्रह्मस्फुटसिद्धान्तामधील अवतरणांत दिली असून तशाच अर्थाचे श्लोक विष्णुधर्मोत्तर (१·७२-२६।२७) मध्ये आहेत.

**वर्षारंभ.** सांप्रत काळी भारतातील निरनिराळ्या भागांत वर्षारंभ चैत्र अथवा कार्तिक ह्या महिन्यांत होतो. परंतु प्राचीनकाळी वर्षारंभ निरनिराळ्या देशांत आणि निरनिराळ्या कारणांकरिता भिन्न भिन्न महिन्यांत होत असे. वेदकाळात महिने **पूर्णिमान्त** असून वर्षारंभ फाल्गुन पूर्णिमेनंतर होत असे आणि वसंत हा पहिला ऋतु असे. **अमान्तगणना** दक्षिणापथांत आणि **पूर्णिमान्त** गणना उत्तर भारतात (उत्तरापथांत) प्रचलित असल्याचे स्मृतिचंद्रिका (श्राद्ध पा ३७७) ह्या ग्रंथात म्हटले आहे. वेदाङ्ग ज्यो (१·५) मध्ये म्हटले आहे की ५ वर्षांच्या युगामधील पहिले वर्ष माघ शुक्लात (म्हणजे दक्षिणायनात) सुरू होते. महाभारतात निरनिराळ्या ठिकाणी चैत्र, मार्गशीर्ष ह्या महिन्यात वर्षारंभ होत असल्याचे उल्लेख केले आहेत. भगवद् गीतेमध्ये (१०-३५) 'मासानां मार्गशीर्षोऽहम्' असा उल्लेख केला आहे तथापि त्यावरून मार्गशीर्ष हा वर्षातील पहिला महिना होता असे ठरत नाही असे प्रस्तुत ग्रंथकाराचे नम्र मत आहे; कारण श्रीकृष्णाने स्वतःच्या ज्या विभूती सांगितल्या आहेत त्यांतील बहुतेक आपापल्या विशिष्ट वर्गातील सर्वात श्रेष्ठ आहेत. तथापि पांडवामधील अर्जुन हा त्यांच्यामधील पहिला नव्हता. अक्षर अथवा द्वंद्व ह्यांच्यासारख्या फक्त काही विभूति आपापल्या वर्गातील पहिल्या आहेत.

**बार्हस्पत्यवर्षचक्र.** हे वर्षचक्र ६० वर्षाचे असून त्यांत ५ वर्षांची १२ युगे असतात. (बृ. सं. ८·२३।२६ आणि विष्णुधर्मोत्तर १-९२-९) ह्या ६० वर्षांना निरनिराळी नावे असून त्यातील पहिले नांव 'प्रभव' हे आहे. ह्या प्रत्येक वर्षाच्या नावापुढे 'संवत्सर' हा शब्द जोडण्यात येतो. ह्या वर्षचक्राचा आरंभ माघशुक्ल पक्षामध्ये जेव्हा सूर्य आणि चंद्र धनिष्ठा नक्षत्रात गुरुसहित होते तेव्हा झाला असें विष्णुधर्मोत्तर पुराणात (१-८२-८) म्हटले आहे. सांप्रतकाळी महाराष्ट्रामध्ये प्रत्येक वर्षाच्या आरंभी बार्हस्पत्यवर्षांचे नांव बदलण्यात येते. उत्तर भारतात पहिल्या वर्षाचे नाव 'प्रभवा'च्याऐवजी 'विजय' असते. बार्हस्पत्य वर्षाची लांबी ३६१·९२६ दिवस असून ते नाक्षत्र वर्षापेक्षा ४-२३ दिवसांनी लहान असते. ह्या कारणाने ८५ नाक्षत्र वर्षात ८६ बार्हस्पत्य वर्षे होतात आणि म्हणून ८५ वर्षानंतर एका वर्षाचा **क्षय** केला जातो (म्हणजे एक वर्ष गाळण्यात येते). हा प्रघात फक्त उत्तरभारतातच आहे.

बार्हस्पत्यवर्षचक्र प्राचीन काळापासून चालत आले असले पाहिजे. काही पुराणात आणि वराहमिहिराने हे वर्षचक्र सुप्रतिष्ठित असल्याचा उल्लेख केला आहे. मलबार आणि त्रावणकोर ह्या प्रांतांत बार्हस्पत्य वर्षचक्र १२ वर्षाचे असते.

बार्हस्पत्य वर्षचक्रामधील ६० वर्षाच्या नावाच्या क्रमात काही थोडे भेद आहेत. ही नावे शिलालेखात

बऱ्याच जुन्या काळापासून आढळतात. अशा तऱ्हेचा सर्वात जुना उल्लेख चालुक्य घराण्यातील एका शिलालेखात. 'सिद्धार्थ' ह्या संवत्सराचा आहे (इंडि. ॲ. खंड १९ पा. १८) आणि दुसरा उल्लेख राष्ट्रकूट घराण्यातील शके ६९२ मधील एका शिलालेखात 'सौम्य' संवत्सराचा आहे (ए. पि. इं. खं. ६ पा. २०९).

संवत्सराच्या नावावरून त्या त्या वर्षावर भिन्न भिन्न परिणाम होतात असे मानण्यात येत असे. उदाहरणार्थ, जेव्हा प्रभव संवत्सराचा प्रारंभ होतो तेव्हा अनावृष्टि, वादळे प्रभृति आपत्ती उद्‌भवतात, कफ विकाराने उत्पन्न होणारे रोग होतात, परंतु तसे झाले तरी लोकांना पीडा होत नाही. असे बृ. सं. (८·२८।२९) मध्ये सांगितले आहे.

**अधिक आणि क्षय महिने.** भारतीय लोक फार प्राचीन कालापासून चांद्रसौर वर्षगणना पाळीत असत. तशीच पद्धति बाबिलोनिया, खाल्डिया इत्यादि प्राचीन देशांत होती आणि त्या सर्वांना **अधिक महिने** धरण्याची युक्ति अवलंबावी लागत असे. तथापि भारतीय लोक क्वचित् प्रसंगी **'क्षय'** महिनाही मानित असत. ही पद्धति इतर समाजात प्रचलित नव्हती. हा भेद सूर्य आणि चंद्र ह्यांच्या गति आणि स्थिति मोजण्याच्या भिन्न भिन्न पद्धतींमुळे उत्पन्न झाला होता.

सौर वर्ष चांद्रवर्षापेक्षा ११ तिथीहून थोडेसे मोठे असते. सुमारे ३२ सौर वर्षांच्या अवधीत ही वाढ एक चांद्र महिन्याइतकी होते. याजुष वेदाङ्ग ज्योतिष (श्लो. ३०) वरून असे दिसते की पाच वर्षांच्या एका युगात दोन अधिक महिने येतात त्यापैकी एक अधिक मास आषाढ हा असतो आणि तो २॥ वर्षांच्या शेवटी येतो आणि दुसरा अधिकमास पौष असून तो पाच वर्षांच्या युगाच्या अंती येतो. कौटिल्याने (अर्थशास्त्र २·२०) हाच नियम दिला आहे. पुराणात आणि इतर ग्रंथात किती कालावधीनंतर अधिक महिना येतो ह्याविषयी भिन्नभिन्न मते दिली आहेत. उदा. विष्णुधर्मो. (१·७२·२१।२३) मध्ये २ वर्षे ८ महिने १६ दिवस आणि ४ घटिका इतका काळ गेल्यानंतर एक महिना मिळवावा असे सांगितले आहे. पितामह सिद्धान्तामध्ये (पंचसिद्धांतिका १२·१) म्हटले आहे की ३० महिन्यानंतर एक अधिक महिना धरावा. काठक गृह्यात म्हटले आहे की पूर्वीच्या अधिक मासानंतर ३४ महिने झाल्यावर जेव्हा एखाद्या चांद्रमासात एकही संक्रांत नसेल अथवा दोन संक्राती असतील तेव्हा एक [अत एव काठकगृह्ये।
यस्मिन्मासे न संक्रान्तिः संक्रान्तिद्वयमेव वा।
मुलमासः स विज्ञेयो मासे त्रिंशत्तमे भवेत्॥
... इदं च सम्भवाभिप्रायं न तु नियतम्।
स्मृति कौ. पा. ५२१ (संस्कार दीधिति).] अधिक महिना मिळवावा. (स्मृति कौ. पा. ५२१) ह्यावचनांवरून चांद्रगणनेप्रमाणे किती दिवस झाल्यानंतर अधिक महिना येणे **शक्य आहे** एवढेच दर्शित केले जाते. ह्याहून अधिक निश्चित स्वरूपाचा नियम असा आहे की ज्या चांद्रमहिन्यात एकही संक्रात येत नाही त्याला **अधिक महिना** म्हणतात आणि त्या महिन्याला त्याच्यापुढील चांद्रमहिन्याचे नाव देण्यात येते आणि अधिक महिना आणि तो पुढील महिना ह्यांच्यामधील भेद दर्शित करण्याकरिता त्या महिन्याला **शुद्ध** अथवा **निज** अथवा **प्राकृत** अशी संज्ञा लावतात. तसेच जर एका सौर महिन्यात दोन अमावास्यांचा अंत झाला तर **अधिक** अथवा **मलमास** होतो. ज्या चांद्रमहिन्यात दोन सक्रांती येतात त्याला **दोन नांवे** प्राप्त होतात आणि त्यांच्यापैकी पहिले नाव कायम ठेवून दुसऱ्या नावाचा **लोप** करण्यात येतो (म्हणजे तो दुसऱ्या नावाचा महिना **क्षय** महिना मानला जातो). म्हणजेच जेव्हा एका महिन्यात दोन संक्रांति येतात तेव्हा क्षयमास प्राप्त होतो. (सिद्धान्त शिरोमणि, निर्णय सिंधु पा. ५)

अधिक आणि क्षय महिन्यांच्या बाबतीत आणखी एक दोन गोष्टी उल्लेखनीय आहेत. फाल्गुनांपासूनचे

७ महिने **फक्त अधिक** होऊ शकतात परंतु केव्हाही **क्षय महिने होऊ शकत नाहीत.** कार्तिक आणि मार्गशीर्ष हे दोन महिने **अधिक तसेच क्षय होऊ शकतात.** परंतु तसा प्रकार फारच क्वचित घडतो. माघ महिना अधिक होणे शक्य असते. परंतु तो आजपर्यंत केव्हाही अधिक अथवा क्षय झालेला नाही असे केतकर म्हणतात. परंतु शके १३९७ मध्ये तो क्षय महिना होता असे शुद्धिकौमुदी ह्या ग्रंथात (पा. २७२) सांगितले आहे. पौष महिना अधिक होण्याचा प्रायः मुळीच संभव नसतो, परंतु मार्गशीर्षापेक्षा पौष हा क्षयमास होण्याचा अधिक संभव असतो असे केतकरानी म्हटले आहे (पा. ४०). सामान्यतः क्षय महिन्याच्या पूर्वी एक आणि मागाहून (अगदी लागलीच नसला तरी) एक असे दोन अधिक महिने येतात म्हणून ज्यावर्षी क्षय महिना असतो त्या वर्षी देखील १३ च महिने असतात आणि वर्षातील दिवसांची संख्या ३९० पेक्षा थोडीशी कमी असते. क्षय महिना सामान्यतः १४१ वर्षानंतर आणि क्वचितकाळी १९ वर्षानंतर येतो.

अधिक महिन्याला अधिमास, मलमास, मलिम्लुच, संसर्प, अंहस्पति, अंहसस्पति, पुरुषोत्तममास अशी नावे आहेत. अति प्राचीन काळापासून अधिक महिना निषिद्ध मानला आहे. ऐ. ब्रा. (३-१) मध्ये म्हटले आहे की तेरावा महिना शुभकाल म्हणून अस्तित्वात नसतो म्हणजे तो शुभ कर्मांला अनुकूल काल नसतो. अंहस् ह्या शब्दाचा अर्थ ऋग्वेदामध्ये पातक असा आहे. मलमास म्हणजे मळासारखा मास. मलिम्लुच ह्या शब्दाचा अर्थ 'चोर' असा आहे. ही नावे त्या महिन्याची अपवित्रता दर्शित करतात. पुरुषोत्तम मास म्हणजे विष्णूचा महिना हे नाव बहुधा अधिक महिन्याला चिकटलेली निंदा कमी करण्याच्या हेतूने दिलेले असावे (पद्म ६·६४).

अधिक मासासंबंधी बरेच विवेचन पुराणांत आणि धर्मशास्त्रावरील ग्रंथांत केलेले असते आणि त्या महिन्यात कोणती कृत्ये वर्ज्य करावी ह्यांचे वर्णन केलेले असते. [अग्न्याधेयं प्रतिष्ठां च यज्ञदानव्रतानि च ।
वेदव्रतवृषोत्सर्गचूडाकरणमेखलाः ।
माङ्गल्यमभिषेकं च मलमासे विवर्जयेत् ॥
अग्निपुराण (१७५·२९।३०).] अग्न्याधेय, प्रतिष्ठा प्रभृति काही कृत्ये मलमासात करू नये (अग्निपुराण १७५·२९।३०). काही विशिष्ट कृत्ये फक्त अधिक महिन्यातच करावयाची असतात. उदाहरणार्थ. प्रति दिवशी अथवा निदान एकदातरी एका ब्राह्मणाला ३३ अपूपांचे दान द्यावे. तसेच एखादा मनुष्य अधिक महिन्यात मृत झाला असेल तर त्याचे श्राद्ध अधिक महिन्यातच करावयाचे असते. जेव्हा एका वर्षात क्षयमास येऊन दोन अधिक महिने आले असतील, तेव्हा त्यांच्यापैकी पहिल्या अधिक महिन्याला **संसर्प** असे म्हणतात आणि तो धर्मकृत्यांना (सामान्यतः) निषिद्ध नसून फक्त विवाह, उपनयन, नामकरण ह्यांच्यासारख्या काही विशिष्ट कृत्यांच्या बाबतीतच निषिद्ध असतो.

**नाक्षत्रमास.** हा फक्त ज्योतिषशास्त्राला माहीत असून त्याची धर्मशास्त्रात आवश्यकता लागत नाही. (कृत्यरत्नाकर पा. ८०)

**पंचांगे.** पंचांगे सामान्यतः प्रत्येक वर्षाकरिता तयार करण्यात येतात. त्यात त्या वर्षातील १२ महिन्यातील (अथवा अधिकमास असेल तेव्हा १३ महिन्यातील) प्रत्येकाच्या दोन पक्षांना (पंधरवड्यांना) स्वतंत्र पान दिलेले असते. भारतीय पंचांगातील **पाच महत्वाची अंगे** तिथि, वार, नक्षत्र, योग आणि करण ही असतात. पंचांगात राशींची माहिती दिली असेल तर **सहा अंगे** होतात आणि ग्रहांची स्थाने दिली असल्यास **सात अंगे** असतात. (मुहूर्तदर्शन १·४४)

**महिन्यांची नावे.** मधु, माधव, प्रभृति १२ सौर मासांची नावे तै. सं. (४·३·११·१) यात आली आहेत.

ब्राह्मण ग्रंथांत नक्षत्रावरून नावे दिलेल्या (चांद्र) महिन्यांचा उल्लेख आला आहे. पुष्कळदा नक्षत्रावरून तयार केलेला शब्द पौर्णमासी, पूर्णमास, अथवा अमावास्या ह्या शब्दाला जोडण्यात येतो आणि केव्हा केव्हा फाल्गुन, चैत्र ह्यांच्यासारखी महिन्यांची नावे ब्राह्मणग्रंथांत आढळतात. महिन्यांच्या नावांच्या बाबतीत **३ टप्पे** आहेत. पहिल्या टप्प्यात २७ नक्षत्रे वेगवेगळी ओळखण्यात आली आणि अति प्राचीन वेदसंहितांमध्ये त्यांना नावे देण्यात आली. दुसऱ्या टप्प्यामध्ये पौर्णिमा अथवा पूर्णचंद्र असलेल्या तिथींना (दिवसाना) त्या दिवशी असणाऱ्या नक्षत्रावरून नावे देण्यात आली. उदाहरणार्थ, एका पौर्णिमेला चित्रा नक्षत्रात चंद्र होता म्हणून त्या पौर्णिमेला **चैत्री पौर्णमास** असे नाव देण्यात आले. तिसऱ्या टप्प्यामध्ये ज्या महिन्यात चैत्री पोर्णिमासी असेल त्या महिन्याला चैत्र मास असे नाव देण्यात आले. पुष्कळ वेळा पौर्णिमेला चंद्र नेमका चित्रा अथवा श्रवण ह्यांच्यासारख्या विशिष्ट नक्षत्रात नसण्याचा संभव असतो. तथापि त्यामुळे त्या त्या महिन्यांच्या नावांमध्ये फरक न पडता त्यांना चैत्र, अथवा श्रावण ह्यांच्यासारखीच नांवे देण्यात येतात.

पुढे चैत्र, वैशाख इत्यादि चांद्र महिन्यांचा मधु, माधव इत्यादि सौर महिन्यांच्या नावांशी मेळ घालण्यात येऊ लागला आणि ती नावे एकमेकांची पर्यायवाची नावे बनली. हा प्रकार केव्हा घडला हे सांगता येत नसले तरी तो इ. स. च्या पुष्कळ पूर्वी झाला असला पाहिजे. कालिदासाने मेघदूतामध्ये प्रथम आषाढ ह्या महिन्याचा उल्लेख केला असून पुढे श्रावण महिन्याला नभस् म्हटले आहे.

प्राचीन ब्राह्मणग्रंथांच्या काळी महिने पूर्णिमान्त असत म्हणजे महिन्याच्या अखेरीला पूर्णिमा येत असे. हा प्रघात पुढेही इतिहासाच्या काळापर्यंत चालू होता असे शिलालेखांवरून दिसून येते. (एपि. इं. खं २१ पा ५६) इ. स. पूर्वीच्याही काही तुरळक शिलालेखांत महिन्यांच्या नावाचा उल्लेख केलेला आढळतो. (एपि. इं. खं २४ पा १।८) सर्वसाधारण प्रघात असा होता की ऋतूचा उल्लेख करून नंतर महिन्याचे नाव न देता त्या ऋतूमधील त्या महिन्याचा क्रमांक द्यावयाचा आणि नंतर दिवस सांगावयाचा. उदाहरणार्थ मथुरायेथील एका शिलालेखात सं. २२ गृ. २ दि २० अशी मिति दिली आहे. (एपि. इं. खं १९ पा ६५) ह्या बाबतीतही अनेक पर्याय आढळतात. दक्षिण भारतात महिने (मीन, मेष ह्यांच्या सारख्या) **राशींच्या नावाने** प्रख्यात असतात. ती पद्धति फार प्राचीन काळची असून इ. स. ९५९ च्या सुमाराच्या एका पाण्ड्य राजाच्या शिलालेखांत (एपि. इं. खं. २५ पा ३५) तशा नावांचा उल्लेख आला आहे.

**पक्षांच्या** बाबतीत जरी तो शब्द ब्राह्मण ग्रंथ, (ताण्ड्य ब्रा. ५·९·१४), उपनिषदे (छां. उप ४·१५·५) ह्यांच्यासारख्या प्राचीन ग्रंथात आढळतो तरी त्याचा उपयोग इ. स. पूर्वीच्या आणि इ. स. नंतरच्या अनेक शिलालेखात का केला नाही ह्याचे कारण समजत नाही. काही शिलालेखात फक्त ऋतु, पक्षाचा क्रमांक आणि दिवस (एपि. इं. खं २० पान १६) एवढेच दिलेले असते. काही मध्ये (गुप्तशिलालेख पा. १२१ व १२५) पक्ष न देता दिवस १ ते ३० ह्या अनुक्रमाने मोजलेले असतात. पक्षांच्या बाबतीत 'शु. दि.' (शुक्लदिन) 'ब. दि. (बहुलदिन) असे शब्द घातलेले असतात, **वद्य** ह्या शब्दांची व्युत्पत्ती सांगता येत नाही.

**वार.** दोन सूर्योदयांच्या दरम्यानचा अवधि हा कालविभागातील **सर्वात** महत्वाचा भाग समजतात. हा कालावधी सूर्यावरून काढलेला असल्यामुळे त्याला **सौर** दिवस अथवा **व्यावहारिक** दिवस अशी संज्ञा आहे. परंतु तिथी हा काल विभाग चंद्रावरून काढलेला असून तिथीचा आरंभ आणि अंत सौरदिवसांमध्ये निरनिराळ्या वेळी होतात. 'दिवस' या शब्दाला दोन अर्थ असतात : (१) सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंतचा काल आणि (२) सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचा काल. ऋग्वेदामध्ये (६·९·१) 'अहन्' हा शब्द दिवसाच्या काळोखाच्या आणि प्रकाशाच्या अशा दोन्ही भागांना लावला आहे. 'अहोरात्र' (म्हणजे दिवस

आणि रात्र) हा शब्दही एकदा ऋग्वेदामध्ये आला आहे.- प्रातः, संगव, मध्याह्न, अपराह्न आणि अस्तमय अथवा अस्तगमनं अथवा सायाह्न हे प्रकाशाच्या दिवसाचे **पांच** विभाग असतात. ह्या पांच विभागांचा शत. ब्रा. (२·३·२·९) मध्ये उल्लेख आला आहे. कौटिल्य (१·१९) ह्यात आणि दक्ष आणि कात्यायन ह्यांनी अहोरात्राचे **आठ** विभाग केले आहेत. दिवस आणि रात्रि ह्या प्रत्येकाची १५ मुहूर्तांमध्येही विभागणी करण्यात येते.

**दिवसाच्या प्रारंभा**विषयी प्राचीन काळी निरनिराळ्या देशांत आणि धर्मांत फार मतवैचित्र्य अस्तित्वात होते. भारतीय ग्रंथकारांनी दिवसाचा आरंभ सूर्योदयापासून होत असल्याचे मानले आहे (ब्राह्मस्फुटसिद्धांत ११·३३). तथापि त्यानाही दिनारंभाचे निरनिराळे प्रकार माहित होते. आर्यभटाने पंचसिद्धान्तिका (१५·२० आणि २३) ह्या ग्रंथात म्हटले आहे की लंकेत दिनारंभ सूर्योदयाबरोबर होतो आणि त्याच वेळी सिद्धपूर येथे सूर्यास्त असतो, यमकोटी येथे मध्याह्न आणि रोमक देशात मध्यरात्रि झालेली असते. ज्यू लोक व्यावहारिक दिवसाचा आरंभ संध्याकाळी मानतात, इजिप्त आणि बाबिलोनिया मधील प्राचीन लोक दिनारंभ सूर्योदयापासून मानीत, अथेन्स आणि सामान्यतः ग्रीस देशामध्ये ऐतिहासिक काळात दिनारंभ संध्याकाळी करीत असतं. आधुनिक काळी युरोपियन देशांत व्यावहारिक दिवसाचा आरंभ मध्यरात्री होतो.

**आठवडा.** सात दिवसांचा आठवडा ही मनुष्यकृत कृत्रिम व्यवस्था असून तिचा खगोलशास्त्राशी अथवा कोणत्याही आकाशस्थ घटनेशी संबंध नाही. ज्यू लोक, बाबिलोनमधील लोक आणि दक्षिण अमेरिकेतील इंक ह्यांच्यात **सात** दिवसाचा आठवडा प्रचलित होता, रोमनप्रजासत्ताकाच्या वेळी **आठ** दिवसांचा आठवडा असे, इजिप्तमधील लोकांत आणि अथेन्स येथील लोकांत **दहा** दिवसांचा आठवडा होता.

आठवड्यातील ७ दिवसांपैकी प्रत्येक दिवस कोणत्यातरी देशातील लोकांनी आणि धार्मिक समाजांनी **विश्रांतीचा** अथवा **पवित्र दिवस** मानला आहे. **सोमवार** हा ग्रीक लोकांचा विश्रांतीचा दिवस असतो, पर्शिया (इराण) मधील लोकांचा **मंगळवार**, ॲसिरिया देशातील लोकांचा **बुधवार**, इजिप्तमधील लोकांचा **गुरुवार**, मुसलमान लोकांचा **शुक्रवार**, ज्यू लोकांचा **शनिवार** आणि ख्रिस्ति लोकांचा **रविवार** हा पवित्र आणि विश्रांतीचा दिवस असतो.

**सात दिवसांच्या चक्राची** उत्पत्ती आणि उत्क्रांति कशी झाली ह्याविषयी भिन्न मते आहेत. इ. स. च्या ३ ऱ्या शतकांत झालेल्या डायन कॅसिअस ह्या रोमन ग्रंथकाराने असे लिहिले आहे की ग्रहांना **अनुसरून** होणाऱ्या आठवड्याची उत्पत्ती इजिप्तमध्ये झाली होती आणि ती घटना त्याच्या काळी नुकतीच झालेली असून त्यावेळी सर्वत्र प्रचारात होती. ग्रहांची नावे वारांना कशी देण्यात आली ह्याविषयी निरनिराळ्या उपपत्त्या अस्तित्वांत आहेत. त्यांच्यापैकी एक उपपत्ती अहोरात्राच्या २४ तासांच्या पायावर आधारलेली आहे. सांप्रतची वारांची नावे ग्रहानुसारी असल्याचे दिसते परंतु त्यातील ग्रहांचा क्रम आकाशातील ग्रहांच्या पृथ्वीपासूनच्या अंतरांना अनुसरून नाही. वारांमधील ग्रहांचा क्रम रवि, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र आणि शनि असा आहे परंतु पृथ्वीपासूनच्या त्यांच्या अंतरानुरूप त्यांचा क्रम शनि, गुरु, मंगळ, रवि, शुक्र, बुध आणि चंद्र असा होईल. याज्ञ : (१·२९५) मध्ये ग्रहांचा क्रम वारांतील क्रमासारखाच दिला आहे.

इजिप्तमध्ये ग्रहांना अनुसरून वारांची नावे कशी ठरविली ह्यासंबंधीची उपपत्ती अशी आहे :— इजिप्तमध्ये अहोरात्राचे २४ विभाग करीत असत आणि त्या प्रत्येक विभागाची देवता क्रमाक्रमाने एक एक ग्रह

असे. रविवार हा अनेक कारणांकरिता आठवड्यातील पहिला दिवस आहे आणि त्या कारणांपैकी सृष्टिरचनेला त्या दिवशी प्रारंभ झाला असल्याची समजूत हे एक आहे. शनि हा पृथ्वीपासून सर्वात दूरचा ग्रह आहे. त्याच्यापासून आरंभ केला तर ४ था ग्रह **रवि** येईल आणि म्हणून शनिवारानंतर रविवार येईल. रविवारी दिवसाच्या पहिल्या विभागाचा स्वामी रवि असतो आणि क्रमाने पुन्हा २२ व्या विभागाचा स्वामी रवि असतो, २३ व्याचा शुक्र २४ व्याचा बुध आणि २५ व्या (म्हणजेच दुसऱ्या दिवसाच्या पहिल्या) विभागाचा स्वामी चंद्र असतो म्हणून रविवारानंतर सोमवार येईल. ह्याप्रमाणे एका ग्रहापासून ४ था ग्रह मोजून वारांची नावे ठरविण्यात आली असतील तर तोच क्रम अहोरात्राचे २४ तासांच्या ऐवजी ६० भाग (घटिका) पाडले तरीही होऊ शकेल. मात्र तो क्रम वरील क्रमाच्या उलट असेल. चंद्रापासून आरंभ करून प्रत्येक घटिकेचा एक एक ग्रह स्वामी केला तर ५७ वी घटिका चंद्राची येईल, ५८ वी बुधाची, ५९ वी शुक्राची, ६० वी रवीची आणि त्याच्या पुढची (म्हणजे दुसऱ्या दिवसाची पहिली) घटिका मंगळाची येईल आणि म्हणून सोमवारानंतर मंगळवार येईल.

भारतात सध्या प्रचलित असलेले वार ह्याच देशात उत्पन्न झाले अथवा तै खाल्डिया, ग्रीस ह्यांच्यासारख्या बाहेरच्या देशापासून भारताने उसने घेतले आहेत ह्याविषयीही मतभेद आहे. ज्यात वाराचा उल्लेख केला आहे असा आजपर्यंत उपलब्ध झालेला सर्वांत जुना शिलालेख गुप्त संवत १६५ (इ. स. ४८४) ह्या वर्षांचा असून त्यात गुरुवाराचा (सुर गुंरोर्दिवसें) उल्लेख केला आहे. वारांची नावे आरंभी कोणत्यातरी परदेशापासून उसनी घेतली असल्याचे जरी वादाकरिता मान्य केले तरी गुप्त घराण्यासारख्या थोर सम्राटांनी भारतात काढलेल्या आपल्या जाहिरनाम्यात त्या पद्धतीचा उपयोग करण्याला निदान काही शतकांचा काल लोटला असला पाहिजे. पितामहाने मंगळवार शुभकारी नसल्याचे सांगितल्याचा उल्लेख बृ. सं. (१·४) मध्ये केलां आहे. अन्य पुराव्यावरून पितामहाने आपला ग्रंथ इ. स. ८० च्या सुमारास लिहिला असावा असे ठरते. ह्या पुराव्यावरून भारतामध्ये वारांची नावे निदान ख्रिस्ति सनाच्या प्रारंभाच्या काळाच्या इतक्या जुन्या काळी माहित होती असे ठरते आणि त्या ज्ञानाचा आरंभ कसा झाला हे निश्चितपणे सांगता येत नाही. वैखानसस्मार्तसूत्र (१०४), बौधायन धर्मसूत्र (२·५·२३), याज्ञ. स्मृति (१·२९५) इत्यादि ग्रंथांत ग्रहांची नावे वारांच्या अनुक्रमाने दिली आहेत. ह्या ग्रंथांचे रचनाकाळ काहीसे अनिश्चित असले तरी इतकी गोष्ट नाकारता येणार नाही की इ. स. च्या पहिल्या दोन शतकात ग्रहांना पूज्यता प्राप्त झाली होती, वारांना त्याची नावे देण्यात आली होती आणि त्यांचा क्रम निश्चित झाला होता. भारतात प्रचलित असलेली वारांची नावे शुद्ध संस्कृत भाषेतींल आहेत. ह्याच्या उलट राशींच्या नावाच्या बाबतीत **क्रिय** अथवां **लेय** ह्यांच्यासारख्या परदेशी शब्दांचा पुष्कळ वेळा उपयोग केलेला आढळतो.

बुधवार (वेडन्सडे अथवा वोडन देवाचा वार) आणि गुरुवार (थर्सडे अथवा थोर देवाचा वार) ह्यांची नावे नार्स भाषेतील असली तरी युरोप खंडात प्रचलित असलेली वारांची नावे मूलतः बाबिलोन देशांतील देवतांच्या नावावरूनच निघालेली आहेत. बुध, शुक्र, मंगळ, गुरु आणि शनि हे पाच ग्रह मनुष्यांच्या भवितव्यतेचे नियंत्रण करीत असतात असे बाबिलोनमधील प्राचीन काळचे लोक मानीत असत आणि त्या लोकांच्या प्रमुख पांच देवतांचा ह्या पांच ग्रहांशी निकटसंबंध असल्याचे मानले जात असे. बाबिलोन देशांत प्रचलित असलेल्या देवतांचीं नांवे इतर देशांत प्रसृत होताना त्यांना रोमन भाषेंतील रूपें प्राप्त झाली. हे पांच ग्रह आणि रवि व चंद्र ह्या सात तेजोगोलकांचा एक समूह मानला जाऊ लागला. ह्या देवतांची पूजा करण्याची रूढि पुढे इतर देशात पसरली. एखाद्या दिवशी ज्या देवाची पूजा करण्यात येईल त्या दिवसाला त्या देवाचे नांव देण्यात येऊ लागले. भारत आणि बाबिलोन ह्या दोन देशांत फार प्राचीन काळापासून व्यापाराच्या आणि इतर बाबतींत अति निकट संबध होता आणि ज्याप्रमाणे बाबिलोन देशातील हद्दीवरचे

दगड आणि इतर स्मारके पाहून राशींची नांवे भारतीयांना सुचली असावीं त्याप्रमाणेच बाबिलोन मधील देवतांची देवालयें आणि कांहीं विशिष्ट दिवशीं त्यांची पूजा केली जात असलेली पाहून कोणातरी भारतीयाला ग्रहानुसारी वारांची कल्पना सुचली असावी असा तर्क करणे शक्य आहे. प्राचीन भारतात सूर्याची देवालयें अस्तित्वात होती आणि सांप्रतकाळी देखील कांही ठिकाणी शनि आणि राहु ह्यांची देवालये आहेत. ह्याप्रमाणें बाबिलोन देशांतील प्रघातावरून सात वारांचा आठवडा मानण्याची पद्धति भारतीयांना सुचली असावी असे म्हणता येण्यासारखे असले तरी वारांची नावे आणि त्यांचा क्रम काढण्याची पद्धति ह्या गोष्टी मूळ भारतीयांनी शोधून काढल्या नव्हत्या असे सिद्ध करण्याला — बाबिलोन आणि सिरिया देशांतील वारांच्या नांवाशीं आणि क्रमाशी भारतीय वारांची नांवे आणि क्रम समान आहेत ह्याशिवाय आणि वाद करणाऱ्याच्या पूर्वग्रहाशिवाय प्रायः कोणताही सयुक्तिक पुरावा अस्तित्वात नाही. भारतीयांच्या घटिकांवरून गणित केल्यास युरोपमधील २४ तासावरून केलेल्या गणितासारखाच वारांचा क्रम निघतो हे वर सांगितलेच आहे. आठवड्यातील वारांच्या नांवात ग्रहांचा जो क्रम आहे त्याच क्रमाने ग्रहांची गणना करण्याची हिंदूंची पद्धति होती आणि हिंदु लोक त्याच क्रमाने ग्रहांचा निर्देश त्यांच्या खगोल शास्त्रावरील ग्रंथांत करीत असत आणि जरी दुसरा एखादा क्रम अथवा पद्धति अधिक बरोबर असली तरी त्या क्रमाचा अथवा पद्धतीचा अंगीकार करण्याला ते तयार नसत असे अल्बेरुणीने म्हटले आहे. (साचौकृत भाषांतर खंड १ प्रकरण १९ पा. २१४।२१५).

# प्रकरण १९

## कल्प, मन्वंतर, महायुग, युग – योग आणि करण, हिंदुवर्षगणना

(मू .ग्रं. पा. ५।६८६–७१८)

मागील प्रकरणामध्ये पाच वर्षांच्या युगापासून त्याच्यापेक्षा लहान अशा वारापर्यंतच्या कालावधींचे विवेचन केले. प्रस्तुत प्रकरणात युग, महायुग, मन्वंतर कल्प ह्या मोठ्या कालावधींचे विवेचन करावयाचे आहे.

**कल्प.** ह्या शब्दाचे मूळ ऋ. (१०–१९०–३) [सूर्याचन्द्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत्।
दिवं च पृथिवीं चान्तरिक्षमथो स्वः॥
ऋ. (१०·१९०·३).] ह्या ऋचेत आढळते. ज्या प्राचीन लेखांचा निश्चित काळ सांगता येतो आणि ज्यात कल्प हा शब्द आहे असा सर्वांत जुना लेख म्हणजे अशोकाची गिरनार आणि कुलसी येथील आज्ञापत्रे हा आहे. ह्यावरून कल्पाच्या विशालत्वाबद्दलच्या कल्पना भारतात ख्रि. पू. ३ ऱ्या शतकापूर्वी बरीच वर्षे प्रसृत झाल्या होत्या असे सिद्ध होते. 'महापरिनिब्बानसूत्र' ह्या ग्रंथात (३·५३) बुद्धाला उद्देशून 'तू कल्पभर जिवन्त राहा' असे शब्द आले आहेत. त्यावरून कल्पाची कल्पना बुद्ध धर्माने स्वीकारली होती हे स्पष्ट होते.

**युग.** फार प्राचीन काळी केव्हा तरी एकदा सर्व बाबतीत अतिशय पूर्णत्वात असलेला समाज (**सुवर्णयुग**) अस्तित्वात होता आणि पुढे लोकांची नीतिमत्ता, आरोग्य, आयुर्मर्यादा कमी कमी होऊ लागल्या आणि पुन्हा काही काळ गेल्यानंतर असेच सुवर्णयुग येणार आहे अशा तऱ्हेच्या कल्पना सर्व समाजांत अस्तित्वात आहेत. ह्यासंबंधी विवेचन मागे खंड ३ मध्ये करण्यात आले आहे. युग ह्या शब्दाचे निरनिराळे अर्थ आहेत. त्यांपैकी पांच वर्षांचा कालावधि आणि सहस्रावधि वर्षांचा दीर्घ कालावधि असे दोन अर्थ आहेत. महाभारत, मनुस्मृति, आणि पुराणे ह्यांत युग, मन्वंतर आणि कल्प ह्यांच्याबद्दलची वर्णने आली आहेत. चार युगांची कृत, त्रेता, द्वापर आणि कलि ही नावे आरंभी द्यूतातील फाशांवर पडणाऱ्या दानांची होती आणि ख्रि. पू. ४ थ्या शतकापासून त्या शब्दांनी मानवी कालावधींचा बोध होऊ लागला असण्याचा संभव आहे. तथापि कल्प, मन्वंतरे आणि युगे ह्यांच्या कल्पनांची उत्पत्ती कशी झाली ह्या प्रश्नाचा समाधानकारक अशा ऐतिहासिक स्वरूपाचा खुलासा प्राचीन ग्रंथांच्या आधारावर करिता येत नाही. निरनिराळ्या पुराणात सांगितल्याप्रमाणे चार युगांची रचना फक्त भारतवर्षापुरतीच आहे. महाभारतादि ग्रंथात केलेली वर्णने सामान्यतः एकाच स्वरूपाची असली तरी तपशीलाच्या बाबतीत त्यात बरेच मतवैचित्र्य आढळते. मनुस्मृतीत दिलेले वर्णन सर्वात प्राचीन वर्णनापैकी एक आहे. त्यात स्वायंभुव, स्वारोचिष, उत्तम, तामस, रैवत, चाक्षुष, आणि वैवस्बत ह्या सात युगांची नावे दिलीं आहेन. मानवी १ वर्ष = देवांचे एक अहोरात्र ह्या प्रमाणात कृतयुगाची लांबी ४००० देवांची अथवा दिव्य वर्षे, त्रेता युगाची ३००० दिव्य वर्षे, द्वापर युगाची २००० दिव्य वर्षे आणि कलियुगाची लांबी १००० दिव्य वर्षे असते. ह्या चार युगांचे **संधिकाळ** आणि **संध्यांशकाळ** मिळून **अनुक्रमें** ८००, ६००, ४०० आणि २०० दिव्य वर्षे असतात आणि अशा रीतीने चार युगांची मिळून बेरीज १२,००० दिव्य वर्षे म्हणजे ४३,२०,००० मानवीवर्षे इतकी होते. ह्या कालावधीला **देवांचे युग** अशी संज्ञा आहे आणि अशा चार युगांचे १००० फेरे मिळून **ब्रह्मदेवाचा एक दिवस** असतो आणि तितक्याच लांबीची **ब्रह्मदेवाची** [सहस्रयुगपर्यन्तमहर्यद् ब्रह्मणो विदुः।
रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहोरात्रविदो जनाः ।:
शांति. (२३·३१) आणि गीता (८·१७)] **रात्र** असते. (शांति २३·३१) ७१ देवांच्या युगांचे एक **मन्वंतर** होते

आणि अशी मन्वंतरे तसेच सृष्टीचे प्रारंभ आणि अन्त असंख्य असतात (मनु १—८०). मनुस्मृतीतील ह्या सर्व विस्तृत वर्णनात कल्प हा शब्द एकदाही आलेला नाही. तथापि विष्णुपुराण (६·३·११।१२) ह्यांच्या सारख्या इतर ग्रंथांत असे सांगितले आहे की १४ मन्वंतरांचा एक **कल्प** होतो आणि तो **ब्रह्मदेवाचा दिवस** असतो.

युगामध्ये असणाऱ्या वर्षांची ही प्रचंड संख्या केव्हा आणि कशी सुचली हे काहीसे गूढ आहे. शत. ब्रा. च्या रचनाकालाइतक्या प्राचीन काळी लोकांना प्रचंड संख्यांची माहिती होती असे दिसते, कारण त्यांत (१०·४·२·२२।२३ ते २५) म्हटले आहे की एका वर्षामध्ये १०८०० मुहूर्त असतात. (३० मुहूर्त = एक अहोरात्र, आणि ३६० अहोरात्र = १ वर्ष); प्रजापतीने ऋग्वेदाची रचना केली त्यामध्ये १२००० बृहती (प्रत्येकी ३२ अक्षरे), १०८०० पंक्ति (प्रत्येकी ४० अक्षरे) आहेत म्हणजे ऋग्वेदामध्ये ४,३२,००० अक्षरे होतात. प्रजापतीने रचिलेल्या तीन वेदांमिळून १०८००×८०=८,६४,००० इतकी अक्षरे आहेत; प्रजापतीने प्रत्येक मुहूर्तामध्ये ८० अक्षरांची रचना केली आणि यज्ञसंबंधी वर्षामध्ये १०८०० मुहूर्त असल्यामुळे एकूण अक्षरांची संख्या १०८००×८०=८,६४,००० अक्षरे झाली. ह्या संख्या युगातील वर्षाच्या संख्याशी जुळतात म्हणून त्या अक्षरांच्या संख्यांवरून युगातील वर्षांची संख्या सुचली असावी असा काही विद्वानांनी तर्क केला आहे. प्राचीन ग्रीक लोकांचेही १०८०० मानवी वर्षांइतके एक **मोठे वर्ष** असे. दुसऱ्या एका प्राचीन ग्रीक शास्त्रज्ञाच्या मताप्रमाणे ४,३२,००० वर्षांचा खगोलशास्त्रदृष्ट्या एक मोठा कालखंड असतो. त्या ग्रीक शास्त्रज्ञांच्या पेक्षा शत. ब्रा. ग्रंथाचा काळ प्राचीन असल्याकारणाने कोणी एकाने दुसऱ्याचे अनुकरण केले असल्यास ग्रीक लोकांनी भारतीयांचे अनुकरण केले असले पाहिजे.

ब्रह्मदेवाचा एक दिवस एक कल्पाइतका असतो हे वर सांगितले आहे म्हणजे तो ४३,२०,०००×१०००=४३२,०००,०००,० मानवी वर्षांइतका होतो आणि तितकीच त्याची रात्र असल्यामुळे वरील संख्येला २ नी गुणिले पाहिजे आणि एका वर्षाचे ३६० दिवस आणि अशी १०० वर्षे इतके **ब्रह्मदेवाचे आयुष्य** धरून त्या संख्येला ३६०×१०० ह्यांनी गुणिले म्हणजे ब्रह्मदेवाची शंभर वर्षे = ३,११०४०००००००००० मानवी वर्षांइतकी होतात. अल्बेरुणीने ब्रह्मदेवाच्या आयुष्याच्या ह्या प्रचंड संख्येचा उल्लेख केला आहे (साचौ, खंड १ पा. ३३२).

ब्रह्मदेवाच्या आयुष्यातील ५० वर्षे आतापर्यंत होऊन गेलीं असून त्याच्या आयुष्याचा **उत्तरार्ध** सांप्रत चालू आहे आणि सध्या **वराहकल्प** आणि **वैवस्वत** मत्वंतर चालू आहेत. ह्यापूर्वी स्वायंभुव, स्वारोचिष, उत्तम, तामस, रैवत आणि चाक्षुष हे ६ मनु होऊन गेले. ब्रह्मदेवाचे संपूर्ण आयुष्य **पुरुषाच्या** (**विष्णूच्या**) एक **दिवसा** इतके असून **पुरुषाची रात्र** ही तेवढीच असते. प्रत्येक मन्वंतरामध्ये सप्तर्षि, मनुपुत्र, देव, राजे, स्मृति, इंद्र आणि धर्मरक्षणकर्त्ते भिन्न भिन्न असतात. (ब्र. पू. ५·३९, विष्णु पुराण ३·१।२) **प्रलय** चार प्रकारचे असतात. **नित्य** (जन्मलेल्या प्राण्यांचा मृत्यु), **नैमित्तिक** (ब्रह्मदेवाचा एक दिवस पुरा झाल्यावर होणारा विश्वाचा नाश), **प्राकृतिक** (विश्वांतील सर्व पदार्थांचा प्रकृतीमध्ये होणारा लय) आणि **आत्यंतिक** म्हणजे **मोक्ष** (सत्य स्वरूपाचे ज्ञान होऊन आत्मा परमात्म्यामध्ये मिळून जाणे). नैमित्तिक आणि प्राकृतिक प्रलयांची भयप्रद वर्णनें निरनिराळ्या पुराणांत दिली आहेत. (कूर्म पुराण खंड २ अ. ४५·११।५९)

युगें, मन्वंतरे, आणि कल्प ह्यांच्या प्रचंड वर्षसंख्या आणि प्रलयांची भयप्रदवर्णने ह्या सर्व गोष्टी अवास्तव आणि केवळ काल्पनिक असाव्यात असे वाटते. तथापि त्या सर्वांच्या बुडाशीं विश्व अनादि आहे, ते वेळोवेळी उत्पन्न होते. त्याचा विकास होतो, नंतर त्याचा हळूहळू ऱ्हास होतो आणि ते नष्ट होते, आणि विश्वव्यापी अशा रात्रीनंतर ते पुन्हा पूर्णत्वाने प्रकट होते ही कल्पना आहे. शिवाय, त्यात सत्तत्वाच्या

शोधाची जिज्ञासा असून निरनिराळ्या ध्येयांच्या प्राप्तीकरिता करावयाच्या प्रयत्नांचाही समावेश होतो. सर्व मानव समाज एका विशिष्ट ध्येयाकडे जाऊ लागतो, उद्योग चालू ठेवतो आणि कांही थोडी यशः- प्राप्ति झाल्यावर तें ध्येय आणि त्या ध्येयाकडे पोचविणारे असे वाटत असलेले मार्ग टाकून देतो आणि कोणत्यातरी भविष्यकाळी आपणास सर्वांगपूर्ण समाज निर्माण करणे शक्य होईल ह्या आशेने युगानुयुगें दुसऱ्या एखाद्या ध्येयाच्या मागे जाऊ लागतो ह्या कल्पनांचाही युगादिकांच्या वर्णनात समावेश होतो. निरनिराळ्या काळात निरनिराळ्या मनःप्रवृत्ति [तपः परं कृतयुगे त्रेतायां ज्ञानमुच्यते।
द्वापरे यज्ञमेवाहुर्दानमेकं कलौ युगे॥
मनु. (१·८६).] असतात (मनु १-८६) आणि मागे होऊन गेलेल्या काळांतील लोकांची कृत्यें आणि ध्येयें ह्यांचे मूल्यमापन सांप्रत काळच्या लोकांच्या कृत्यांच्या आणि ध्येयांच्या बाबतीत योजावयाच्या निकषांनी करू नये असाही बोध ह्या वर्णनांवरून होतो. चारं युगे हे सर्वस्वी तुटक असे कालविभाग नसून ज्याला व्यवहारात कलियुग म्हणतात त्या कालातदेखील राजकर्ता अथवा शासनसंस्था आपल्या वर्तनाने अथवा कृत्याने कृतयुगातील परिस्थिति निर्माण करू शकतो (मनु ११-३०१)

युगादिकांच्या वर्णनांतील तपशीलाच्या बाबतीत कांही भेद आहेत. प्रत्येक युगाची लांबी समान असते असे आर्यभटाचे मत आहे. (ब्र. स्फु. सि.१-९) तसेच मनूची कालमर्यादा ७२ युगें असल्याचेही त्याने म्हटले आहे. (दशगीतिका श्लो. ३)

**अंक.** कल्पांच्या आणि युगांच्या वर उल्लेख केलेल्या प्रचंड संख्यांच्या अनुषंगाने अंकांचे प्राचीनत्व आणि अंक लिहिण्याच्या पद्धति ह्यांच्याबद्दल थोडेसे विवेचन केल्यास उचित होईल. ऋग्वेदामध्ये एक पासून दहा पर्यंतच्या अंकांचा उल्लेख पुष्कळ वेळा आला आहे. सहस्र आणि अयुत हे शब्दही ऋ. (४·२६·७) सारख्या ऋचांत आले आहेत. तै. सं. (४·४·११·३।४) ह्यांत विटांची संख्या सांगताना एक, एकशत, सहस्र, अयुतपासून परार्धापर्यंतच्या संख्यांचा उल्लेख केला आहे. वाज. सं. (१७·२) ह्यांतही परार्धापर्यंतच्या संख्या सांगितल्या असून त्यांत परार्धांचा क्रम १३ वा आहे. ह्यावरून असे दिसून येते की खगोलशास्त्रात ज्या मोठाल्या संख्या दिल्या आहेत त्या संख्यांची नावे निदान ख्रि. पू. १००० वर्षांपूर्वी निश्चित करण्यात आली होती. सभापर्व (६५·३।४) ह्यांत अयुतापासून परार्धापर्यंतच्या संख्यांचा उल्लेख केला आहे. आर्यभटाने (आर्यभटीय गणित पा. २) एकपासून अर्बुद (१० कोटी) आणि वृंद (१०० कोटी) पर्यंतच्या १० स्थानांचाच फक्त उल्लेख केला आहे. वायुपुराण (१०१·९३।१०२) ह्यांत एकपासून परार्धापर्यंतच्या १८ स्थानांचा (काहीशा विस्कळितपणाने) उल्लेख केला आहे. विष्णुपुराण [स्थानात्स्थानं दशगुणमेकस्माद् गण्यते द्विज।
ततोष्टादशमे भागे परार्धमभिधीयते॥
परार्धद्विगुणं यत्तु प्राकृतः स लयो द्विज।
तदाऽव्यक्तेऽखिलं व्यक्तं स्वहेतौ लयमेति वै॥
विष्णुपुराण (६·३·४।५).] (६·३·४।५) ह्यांत असे सांगितले आहे की परार्ध हे १८ वे (एका आवृत्तीत १२ वे असा पाठ आहे) स्थान असून त्यांतील प्रत्येक स्थान पूर्वीच्या स्थानाच्या १० पट असते. ह्या १८ स्थानांचा अनेक शतके भारतात प्रचलित असलेला क्रम पुढीलप्रमाणे आहे :— एक, दहा, शत, सहस्र, अयुत, लक्ष, प्रयुत, कोटी, अर्बुद, अब्ज अथवा पद्म, खर्व, निखर्व, महापद्म, शंकु, जलधि अथवा समुद्र, अन्त्य, मध्य आणि परार्ध. ह्या नावांपैकी काही नावांच्या बद्दल निरनिराळ्या ग्रंथांत भिन्नभिन्न नावे दिली आहेत.

वेदसंहितांमध्ये आलेल्या उल्लेखांवरून **दशमानपद्धति सहस्रावधि** वर्षांपूर्वीपासून अस्तित्वात असल्याचे सिद्ध होते. तथापि एका स्थानाचे मूल्य त्याच्या आधीच्या स्थानापेक्षा दहापटीने अधिक अथवा उणे असल्याची अथवा अंकाचे मूल्य त्याच्या स्थानानुसार ठरविण्याची पद्धति वेदांच्या काळी अस्तित्वात

होती किंवा नाही ह्या प्रश्नाचे निश्चित उत्तर देणे जरासे अवघड आहे. सांप्रतकाळी युरोप खंडात आणि सर्व आधुनिक देशांत प्रचलित असलेली अंकाचे मूल्य त्याच्या स्थानानुसार ठरविण्याची पद्धति मूळची भारतीय असून तिचे अनुकरण अरब लोकांनी केले आणि त्यांच्या मार्फत त्या पद्धतीचा प्रसार इ. स. च्या १२ व्या शतकाच्या सुमारास युरोपखंडात झाला हे सर्वसाधारणपणे मान्य करण्यात येते. दशमान स्थान मूल्यपद्धति हा मनुष्याने लावलेला एक अत्यंत बुद्धिमत्तेचा शोध असल्याचे समजतात. ज्या दहा चिन्हांच्या साहाय्याने अगणित संख्या मांडता येतात त्यांतील ० (शून्य) हे पहिले चिन्ह आहे. सर्वश्रेष्ठ अशा ग्रीक विद्वानांना देखील शून्याचा शोध लागला नव्हता. इजिप्तमध्ये दशमान पद्धतीचे अंक होते परंतु त्यांच्यात शून्य हे चिन्ह नव्हते आणि त्यामुळे त्यांच्या अंकलेखनात **स्थानमूल्य** पद्धतिही नव्हती. बाबिलोनमधील प्राचीन लोकांच्या अंकलेखनात शून्याचे विवक्षित चिन्ह नव्हते आणि त्यांच्या खगोलशास्त्रावरील प्राचीन अथवा अलिकडील ग्रंथांत देखील अंकाच्या शेवटी शून्याचे चिन्ह असलेले उदाहरण आढळत नाही. भारतात शून्याचे चिन्ह अथवा शून्यवाचक शब्द नक्की केव्हा प्रथम उपयोगात आला हे सांगता आले नाही तरी ती गोष्ट इ. स. च्या प्रारंभापूर्वी अनेक शतके घडून आली असली पाहिजे. पिंगलाचे छंदःशास्त्र (८·२८—३१) ह्यांत शून्याचा उपयोग केला आहे. आप. ध. सू. मध्ये [षडङ्गो वेदः । छन्दः कल्पो व्याकरणं ज्योतिषं निरुक्तं शीक्षा छन्दोविचितिरिति। आप. ध. सू. (२·४·८·१०।११).] (२·४·८·१०।११) छंदोविचिति असा ज्या वेदांगाचा उल्लेख केला आहे तो ग्रंथ पिंगलाचाच असण्याचा संभव आहे. (इ. स. ४०० पूर्वी होऊन गेलेल्या) शबरस्वामीने पिंगलांच्या ग्रंथाला पाणिनीच्या सूत्राच्या बरोबरीच्या योग्यतेचा मानला आहे.

अंक लिहिण्याच्या अनेक पद्धति होत्या आणि स्थानमूल्यपद्धति ही त्यांपैकी एक होती. अंकलेखनाची दुसरी पद्धति संपूर्ण संख्यावाचक शब्दांचा उपयोग करणे ही आहे. खगोलशास्त्रात प्रचंड संख्यांचा उपयोग करावयाचा असतो आणि त्या काळी ग्रंथ फक्त हातानेच लिहिले जात असत आणि त्यांच्या प्रती करून घेण्यात येत असत. त्यामुळे संपूर्ण संख्यावाचक शब्दांचा उपयोग करण्याची पद्धति अतिशय विश्वसनीय होती, कारण त्यापद्धतीत शून्ये अथवा इतर अंक गाळून जाण्याचा फारसा संभव नसे. शिवाय अनेक ग्रंथ पद्यात्मक असत त्यामुळे एखादा शब्द गाळला गेला तर ती चूक सहज कळून येण्याचा संभव असे. ही पद्धति केव्हा प्रचलित झाली हे सांगणे अवघड असले तरी ती फार प्राचीन आहे हे निश्चित. तै. ब्रा. (१·५·११·१) मध्ये कृत हा शब्द 'चार' ह्या अर्थाने वापरला आहे. इ. स ६ व्या शतकात होऊन गेलेल्या वराहमिहिराने संख्यावाचक शब्दांचा उपयोग केला आहे. परंतु तो स्थानमूल्यपद्धतीने केला आहे. ह्यापद्धतीत एकाच संख्येचा बोध करण्याकरिता वाटेल तितक्या समानार्थी शब्दांचा उपयोग करिता येतो. उदाहरणार्थ : **शून्या**करिता शून्य, ख, अंबर, गगन, अभ्र, बिंदू इ. शब्द, दहाकरिता दशन् पंक्ति, दिशा, अवतार, रावण शिरे इ. काही विशिष्ट संख्या दर्शित करण्याकरिता दशांश अपूर्णांक पद्धतीत देखील ह्या पद्धतीचा. उपयोग वराहमिहिराने आपल्या पंचसिद्धान्तिका ह्या ग्रंथात केला ओहे. ह्या पद्धतीत संख्यावाचक शब्दसमूहातील पहिल्या शब्दाला एकंचे स्थान द्यावयाचे असून त्याच्या नंतरच्या डावीकडील शब्दाला दहंचे स्थान द्यावयाचे असते. 'अंकानां वामतो गतिः' ह्या नियमाला अनुसरून 'सप्तविंश-वेद-संख्या' ह्याचा अर्थ ४२७ होतो.

अक्षरांच्या योगाने संख्या दाखविण्याच्या दुसऱ्या एका पद्धतीचा आर्यभटाने 'दशगीतिकापाद' ह्या ग्रंथात (श्लो. ३) उल्लेख केला आहे. त्यापद्धतीमध्ये 'क' पासून 'म' पर्यंतच्या अक्षरांचे मूल्य १ ते २५ मानले असून 'य, र, ल, व, श, ष, स, ह' ह्या अक्षरांची मूल्ये अनुक्रमे ३०, ४०, ५०, ६०, ७०, ८०, ९०, १०० अशी मानली आहेत आणि अशीच अधिक अवघड मूल्ये निरनिराळ्या अक्षरांनी व्यक्त केली जातात.

आतापर्यंतच्या प्रकरणांत पंचांगातील तिथि, वार आणि नक्षत्र ह्या अंगांबद्दल विवेचन केले. आता पंचागांतील उरलेल्या **योग** आणि **करण** ह्या ४ थ्या आणि ५ व्या अंगांचे विवेचन करण्यांत येईल.

**योग.** ह्याच्याशी अनुरूप अशी कोणतीही खगोलामधील घटना असत नाही. योग दोन प्रकारचे असतात : (१) **नित्य** म्हणजे पुनःपुनः येणारे आणि (२) **विशिष्ट** म्हणजे सर्वस्वी फलज्योतिषशास्त्राला अनुसरून होणारे.

**नित्ययोग.** सूर्य आणि चंद्र ह्यांच्या अक्षांशांच्या बेरजेवरून योग ठरवितात अथवा सूर्य आणि चंद्र ह्या दोघांना मिळून १३ अंश २० कला इतके अंतरिक्षामधील अंतर जाण्याला जो वेळ लागतो त्याला **योग** म्हणतात. जेव्हा ती बेरीज १३ अंश २० कला इतकी होते तेव्हा 'विष्कंभ' नांवाचा पहिला योग समाप्त होतो; जेव्हा ती बेरीज २६ अंश ४० कला इतकी होते तेव्हा 'प्रीति' नावाचा दुसरा योग समाप्त होतो. ह्याप्रमाणे एकूण २७ योग असल्याचे रत्नमाला (४·१ ते 3) ह्या ग्रंथात सांगितले आहे. ह्या २७ योगांची नांवे विष्कंभ, प्रीति, आयुष्मत्, सौभाग्य, शोभन, अतिगंड, सुकर्मन्, धृति, शूल, गंड, वृद्धि, ध्रुव, व्याघात, हर्षण, वज्र, सिद्धि, व्यतिपात, वरीयस्, परिघ, शिव, सिद्ध, साध्य, शुभ, शुक्ल, ब्रह्मन्, ऐंद्र, वैधृति अशीं असून त्यांच्या नावाना अनुरूप ते शुभ अथवा अशुभ फले देतात. ह्या योगांपैकी व्यतिपात आणि वैधृति हे योग सर्व शुभ कार्याकरिता सर्वस्वी **वर्ज्य** असतात, परिघ, वज्र प्रभृति ७ योगांचे काही भाग अशुभ असतात. योगांची पद्धति प्राचीन काळापासून चालत आली आहे असे मान्य करावे लागते. व्यतिपात ह्या योगाचा उल्लेख याज्ञ. (१·२१८) मध्ये तसेच हर्षचरित (उच्छ्वास ४) यात केला आहे. एका वर्षात सामान्यतः १३ व्यतिपात येतात आणि ९६ श्राद्धांत ह्या १३ व्यतिपातांवर करावयाच्या १३ श्राद्धांचा समावेश केला आहे.

**विशिष्टयोग.** नित्य योगांशी संबंध नसणारे कपिलाषष्ठी, अर्धोदय, अमृतसिद्धि, मृत्युयोग ह्यांच्या सारखे काही योग असून ते काही विशिष्ट वार, नक्षत्रे, तिथि, राशि एकत्र आल्यास घडत असतात. उदाहरणार्थ, रविवारी हस्तनक्षत्र, सोमवारी मृगशीर्ष, मंगळवारी अश्विनी, बुधवारी अनुराधा, गुरुवारी पुष्य, शुक्रवारी रेवती आणि शनिवारी रोहिणी एकत्र आल्यास अमृतसिद्धि योग घडतो [हस्तो रवौ शशधरे च मृगोत्तमाङ्गं
भौमेऽश्विनी बुधदिने च तथानुराधा ।
तिष्यो गुरौ भृगुसुतेपि च पौष्णधिष्ण्यं
रोहिण्यथार्कतनयेऽमृतसिद्धियोगाः ॥ रत्नमाला (८·८).] (रत्नमाला ८-८). व्यतिथात योगाचे नित्य आणि विशिष्ट असे दोन प्रकार असतात. विशिष्ट प्रकारचा व्यतिपातयोग विशिष्ट नक्षत्र, तिथि, वार एकत्र आल्यास आणि विशिष्ट ग्रह विशिष्ट राशींत असल्यास घडतो आणि अशा योगावर केलेल्या दानाचे फार महत्व असते. सूर्यसिद्धान्त (११·१।२) मध्ये व्यतिपात आणि वैधृति हे विशिष्ट योग केव्हा घडतात ह्याचा खुलासा केला आहे.

**करण.** पंचांगामधील पांचवे अंग **करण** असते आणि त्याची लांबी अर्ध्या तिथि इतकी असते. अशा रींतीने एका तिथीला दोन आणि एका चांद्रमासामध्ये ६० करणे असतात. करणांचे **चर** आणि **स्थिर** असे दोन प्रकार असतात. करण हा शब्द 'कृ' (करणे) ह्या धातूपासून झाला असून त्याला ते नांव देण्याचे कारण त्याच्या योगाने तिथीचे दोन विभाग करण्यात येतात हे होय. बहुतेक करणांची नांवे चमत्कारिक असून त्यांची उपपत्ती सांगता येत नाही. एकूण करणे ११ असून त्यांतील बव, बालव, कौलव, तैतिल, गर, वणिज आणि विष्टि ही सात करणे **चर** असून शकुनि, चतुष्पद, नाग आणि किंस्तुघ्न ही **चार स्थिर** करणे असतात. काही ग्रंथांत चतुष्पद आणि नाग ह्या दोन करणांची अदलाबदल केलेली असते. एका तिथीची दोन भागामध्ये केलेली ही विभागणी एका राशीच्या दोन होऱ्यामध्ये केलेल्या विभागणीसारखी दिसते (बृ. जा.

१-९). कदाचित एका विभागणीवरून दुसरी सुचली असण्याचा संभव आहे. त्यांपैकी तिथीची विभागणी प्रथम झाली असावी असे प्रस्तुत ग्रंथकाराचे मत आहे. स्थिर करणे एका महिन्यांत फक्त एकवार येतात. कृष्ण चतुर्दशीच्या उत्तरार्धात शकुनि करण येते, अमावास्येच्या पूर्वार्धात चतुष्पद आणि उत्तरार्धात नाग ही करणे येतात आणि पुढील महिन्याच्या शुक्ल प्रतिपदेच्या पूर्वार्धात किंस्तुघ्न हे करण येते. शुक्ल प्रतिपदेच्या उत्तरार्धात बव करण येते आणि त्याच्या नंतर क्रमाने बाकीची चर करणे येतात आणि चर करणांची संख्या ७ असल्यामुळे शुक्ल प्रतिपदेच्या उत्तरार्धापासून कृष्ण चतुर्दशीच्या पूर्वार्धापर्यंत त्यांच्या ८ आवृत्या होतात. पंचांगामध्ये वास्तविकपणे प्रत्येक तिथीला दोन करणे दाखविली पाहिजेत, परंतु ज्या करणाचा अन्तकाळ सूर्योदयापासून ३० घटिका अथवा त्याहून कमी असतो तेच करण पंचांगामध्ये तिथीच्या पुढे दिलेले असते. तिथीच्या उत्तरार्धात येणाऱ्या करणाचा अंतकाळ तिथीच्या अंताबरोबर होतो म्हणून त्या अन्तकाळाची गणना करण्याची आवश्यकता नसते.

करणांचा उपयोग फक्त फलज्योतिषशास्त्रातच असतो. त्यांची नावे इ. स. ४०० च्या पूर्वी अनेक शतके दिली गेली असली पाहिजेत. नारदपुराणात (१·५४·१२६।१२७) दोन्ही प्रकारच्या करणांचा उल्लेख केला असून त्या त्या करणावर कोणती कृत्ये करावी आणि कोणती करू नये ह्याबद्दलचे नियम बृ. सं. (९९·३-५) मध्ये दिले आहेत. उदाहरणार्थ, सर्व शुभ (धार्मिक) विधि, सर्व आरोग्यदायक कृत्ये **बव** करणावर करावी; **बालव** करणावर धार्मिक आणि ब्राह्मणांना हितकारक अशी कृत्ये करावी इ. करणांच्या बाबतीत विशेष लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे चर करणांपैकी सातवे करण **विष्टि** हे धर्मशास्त्रावरील मध्ययुगीन काळात झालेल्या ग्रंथकारांनी फार भयदायक मानले आहे. राजमार्तंड ह्या ग्रंथात सांगितले आहे की विष्टिकरण सापाच्या आकाराचे असून त्याची शेपटी ३ घटिका इतकी असते आणि त्या करणाच्या शेपटीखेरीज बाकीची सर्व अंगे सज्जनांनी वर्ज्य करावी. (शुद्धि कौ. पा २०७) विष्टि करणाला **भद्रा** अथवा **कल्याणी** असे सौम्य नाव आहे परंतु वास्तविक ते करण अभद्रा (अशुभ) असते. करणांची रचनाच सर्वस्वी काल्पनिक आहे. तथापि त्यांच्यापैकी एकाचे असे भयंकर चित्र रंगविणे आणि त्याला सर्पासारखे म्हणणे ही गोष्ट फलज्योतिषाच्या दृष्टीने केलेल्या कल्पनांची पराकाष्ठा आहे.

**हिंदु वर्षगणना**— पंचांगामध्ये समाविष्ट होणाऱ्या निरनिराळ्या अंगांचे विवेचन केल्यानंतर हिंदु वर्षगणनेसंबंधी थोडेसे तरी विवेचन करणे अवश्य आहे. ह्या खंडप्राय भारत देशात अनेक पंचांगे प्रचारात असल्यामुळे आणि त्यांतील कोणतीही दोन पंचांगे परस्परांशी सर्वस्वी जुळत नसल्यामुळे ह्या बाबतीत अराजकासारखी स्थिति झाली आहे. अनेक सुशिक्षित भारतीयांची अशी मागणी आहे की ग्रहणासारख्या प्रत्यक्ष दृष्टीने दिसणाऱ्या घटनांची भविष्ये पंचांगात सूक्ष्मपणे दिली जावी आणि आकाशस्थ तेजोगोलकांच्या गती मोजण्याच्या आमच्या प्राचीन काळच्या पद्धतीमध्ये बदल करून त्या गती आधुनिक काळच्या प्रत्यक्ष वेधावर आधारलेल्या गणिताशी जुळतील अशा कराव्या.

भारतात सांप्रत काली प्रचलित असलेली पंचांगे मुख्यत्वेकरून सूर्यसिद्धात, ब्रह्मसिद्धान्त आणि आर्यसिद्धान्त ह्या तीन परंपरांना अनुसरून तयार करण्यात येतात. ह्या परंपरांमधील विरोधाचे दोन मुख्य मुद्दे वर्षाची लांबी आणि सूर्य, चंद्र आणि ग्रह ह्यांच्या एका महायुगासारख्या विशिष्ट कालावधीमध्ये होणाऱ्या प्रदक्षिणांची संख्या हे आहेत. हा सर्वस्वी खगोलशास्त्राचा विषय आहे त्यामुळे त्याचे विवेचन प्रस्तुत ग्रंथात करण्यांत येणार नाही. थोडक्यांत सांगावयाचे झाल्यास ह्या निरनिराळ्या परंपरांमधील भेदांचा परिणाम असा झाला आहे की श्री मकर संक्रांत सूर्यसिद्धान्तानुसार पंचांगांत सामान्यतः १४ जानेवारीला येते ती अधिक सूक्ष्म आधुनिक गणिताप्रमाणे २१ डिसेंबरला आली पाहिजे. म्हणजे आमची मकर संक्रांति योग्य

कालानंतर २३ दिवसांनी साजरी करण्यांत येते आणि अशीच परिस्थिति वासंतिक विषुवदिन, हिवाळ्यांतील विषुवदिन, उत्तरायण आणि इतर प्रसंगाच्या बाबतींत होत असते. शके ४४४ च्या सुमारास वासंतिक विषुवदिन अश्विनी नक्षत्रांत झाला असल्याचे मानण्यांत येते. परंतु आता तो विषुवबिंदु मागे पडून उत्तराभाद्रपदा ह्या तारका पुंजाजवळ आला आहे. त्यामुळे आता अश्विनीच्या ऐवजी उत्तराभाद्रपदा हे पहिले नक्षत्र मानले पाहिजे. कै. केरो लक्ष्मण छत्रे, कै. लो. बा. गं. टिळक ह्यांच्यासारख्या आधुनिक काळच्या सूक्ष्म गणिताची माहिती असणाऱ्या विद्वान लोकांनी ह्या बाबतींत सुधारणा करण्याचे अनेक प्रयत्न केले परंतु त्यांनी तयार केलेल्या पंचांगांना फारच थोडा आश्रय मिळतो आणि लोक अद्यापिही जुन्या सिद्धान्तांना अनुसरून तयार केलेल्या पंचांगांप्रमाणेच वागतात. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर सरकारने नोव्हेंबर १९५२ मध्ये. डॉ. मेघनाद साहा ह्यांच्या अध्यक्षतेखाली ह्याबाबतींत संशोधन करून सर्व भारताकरिता अचूक आणि एकसारखे पंचांग तयार करण्यासंबंधी योजना सुचविण्याकरिता एक समिती नेमली होती आणि ह्या समितीने एक अतिविस्तृत आणि बहुमोल असा अहवाल नोव्हेंबर १९५५ मध्ये सादर केला आहे. भारत सरकारने सदरहू समितीच्या प्रमुख शिफारसी मान्य केल्या असून असे ठरविले आहे की एकमुखी राष्ट्रीय पंचांग काही विशिष्ट सरकारीकार्यात २२ मार्च १९५७ म्हणजे शक गणनेप्रमाणे शके १८७९ च्या सौर चैत्र महिन्याच्या पहिल्या तारखेपासून ग्रेगरीने युरोपखंडांत प्रचलित केलेल्या वर्षगणनेच्या बरोबरीने अमलांत आणावे. सर्वसाधारण जनतेचा गैरसमज होऊ नये आणि लोकांना नव्या सौर वर्षगणनेचा उपयोग करण्याला मदत व्हावी ह्याकरिता काही काही सरकारी कामांत ग्रेगरी वर्षगणना आणि नवीन भारतीय सौर वर्षगणना ह्या दोहोंचा उपयोग करण्याचे सरकारने ठरविले आहे. उदाहरणार्थ सरकारचे गॅझेट छापताना तसेच भारतीय आकाशवाणीवर दैनिक बातम्या सांगताना दोन्ही प्रकारचे दिनांक प्रारंभी दिलें जातील. तथापि, धार्मिक उत्सव आणि सण ह्यानिमित्त सरकारी सुट्या शक्यतोवर जुन्या वर्षगणनेप्रमाणे जाहीर करण्याचा प्रघात सरकार सोडून देणार नाही.

ही नवी वर्षगणना सौर वर्षानुसार असून तींत **सर्वसाधारण वर्ष** ३६५ दिवसांचे असेल आणि **लीप** वर्ष ३६६ दिवसाचे असेल. महिने चैत्र प्रभृति असून वर्षाचा पहिला महिना चैत्र असेल. **वर्षारंभ** वासंतिक विषुवदिनाच्या पुढील दिवसापासून म्हणजे सर्वसाधारण वर्षांत २२ मार्चला आणि लीप वर्षात २१ मार्चला होईल. चैत्रमहिन्यात सर्वसाधारण वर्षात ३० दिवस असतील आणि लीप वर्षात ३१ दिवस असतील. वैशाखापासून भाद्रपदापर्यंतचे ५ महिने ३१ दिवसाचे असतील आणि आश्विनापासून फाल्गुनापर्यंतचे ६ महिने ३० दिवसांचे असतील. **वर्षगणना** शकानुसार असून शकवर्ष १८७६ हे इ. स. १९५४।५५ बरोबर असेल.

**लीपवर्ष**. शकामध्ये ७८ मिळवून आलेली संख्या ४ ने भाग जाण्यासारखी असेल तर ते वर्ष लीपवर्ष धरावे. परंतु जर ती संख्या १०० ची पट असेल तर तिला ४०० ने भाग जात असेल तरच ते वर्ष लीप वर्ष धरावे.

**धार्मिक कृत्यां**करिता मोजावयाचे **चांद्रमास अमान्त** असतील आणि जर एखाद्या सौर महिन्यात दोन अमावास्या आल्या तर त्यापैकी पहिल्याने आलेल्या अमावास्येपासून सुरू होणारा चांद्र महिना **अधिकमास** असेल आणि दुसऱ्या अमावास्येपासून सुरू होणारा महिना **निज** अथवा **शुद्ध** मास असेल.

ह्या व्यवस्थेमुळे विषुवसंक्रांति, उत्तरायण संक्रांति आणि दक्षिणायन संक्रांति ह्याच्यासारखी सूर्यावरून ठरणारी धार्मिक व्रते खगोलशास्त्र दृष्ट्या योग्य अशा ऋतूंना अनुसरून होऊ शकतील. परंतु चांद्रवर्षाला अनुसरून असणारी व्रते सांप्रतच्या रूढीप्रमाणे पाळली जातील आणि पं. सं. शो. समितीने

सुचविलेल्या वर्षाच्या लांबीतील दुरुस्तीच्या योगाने त्या व्रतांमध्ये आणि ऋतूंमध्ये ह्यानंतर अधिक फरक पडत जाणार नाही. अजूनही वर्षारंभ भिन्न भिन्न वारी येत राहील आणि प्रत्येक महिन्याच्या दिवसांची संख्या भिन्न भिन्न राहील.

सुप्रसिद्ध खगोल शास्त्रज्ञ आणि संस्कृत पंडित असलेल्या ह्या समितीने केलेल्या शिफारसींना हिंदुजनतेचा सार्वत्रिक आणि मनःपूर्वक पाठिंबा मिळेल आणि धार्मिक विधींच्या पालनाच्या बाबतीत आपल्या देशात प्रस्तुत काळी असलेला गोंधळ आणि बेबंदशाही शक्य तितक्या लवकर नष्ट होईल अशीच कोणीही आशा करील. तथापि सध्या प्रचलित असलेल्या वर्षगणनांत ह्या नवीन वर्षगणनेची भर पडेल की काय अशी भीति वाटते.

# खंड पाचवा

## भाग २

## विभाग ३ : शांति.

(एखाद्या देवतेच्या क्रोधाचा उपशम करण्याकरिता, संकट अथवा दुदैवी घटना टाळण्याकरिता करावयाचे विधि).

## प्रकरण २०

### शांतीचा वैदिक अर्थ आणि कार्यक्रम.

(मू. ग्रं. पा. ५।७१९-७४७)

शांति हा शब्द 'शम्' धातूपासून बनलेला आहे. शम् धातु ४ थ्या आणि ९ व्या गणांतील असून त्याचे अर्थ थांबवणे, संतुष्ट करणे आणि क्वचित प्रसंगी वध करणे असे निरनिराळे आहेत. शांति हा प्रत्यक्ष शब्द ऋग्वेदामध्ये आढळत नाही परंतु तो अथर्ववेदामध्ये आणि वाज. सं. मध्ये आला आहे.. शम् धातूपासून बनलेली निरनिराळी रूपे आणि धातुसाधित नामे आणि शम् हे अव्यय हे शब्द ऋग्वेदामध्ये देखील शेकडो वेळा आढळतात. शम् हा शब्द पुष्कळ वेळा योः ह्या शब्दाशी जोडून 'शंयोः' ह्याच्यासारख्या स्वरूपात ऋग्वेदामध्ये [शं नो देवीरभिष्टय आपो भवन्तु पीतये। शं योरभि स्रवन्तु नः ॥ ऋ. (१०·९·४).] पुष्कळ वेळा योजिलेला असून त्याचे अर्थ सौख्य अथवा आरोग्य असे असतात. (ऋ. १—९३—७, १—१०६·५, १०·९·४ इ.).

अथर्व वेदात शांति हा शब्द ।(१९—९ ते १९—११) ह्यांच्यासारख्या सूक्तांत आला आहे. तै. सं. (६·१·७·७।८), (३·४·१०·३) इत्यादि सूक्तांत 'शमयति' आणि 'शांति' हे शब्द अनेक वेळा आले आहेत. वाज. सं. चा ३६ वा अध्याय प्रवर्ग्य विधीच्या आरंभी आणि अंती शांति ह्या अर्थी योजला जातो असे कात्या. श्रौ. सू. (२६·४१) मध्ये सांगितले आहे. एखाद्या यज्ञामध्ये पशूचा वध करण्यापूर्वी अध्रि गु प्रैष ह्या नांवाचे सूक्त (आश्व. श्रौ. ३·३) होत्याने पठण करावयाचे असते. त्या सूक्तामध्ये 'शमितारः' असा शब्द आला असून त्याचा अर्थ यज्ञामध्ये '(पशूचा) वध करणारा' असा आहे. त्या ठिकाणी 'शम्' धातूचा अर्थ निश्चितपणे 'वध करणे' हा आहे. परंतु त्या धातूचा दुय्यम अर्थ 'यज्ञात वध केलेल्या पशूचे भाग अर्पण करून देवतांना संतुष्ट करणे' असाही असणे संभवनीय आहे.

तै. ब्रा. (१·१·३·११) मध्ये वर्णन केलेल्या आख्यायिकेमध्ये शमीवृक्ष अथवा शमी वृक्षाची खांदी ह्यांचा देवतांच्या भयंकर क्रोधयुक्त वृत्ति नष्ट करणे अथवा त्यांचा उपशय करणे ह्या कृत्यांशी निकट संबंध जोडला आहे. शमीच्या खांदीच्या संतुष्ट करण्याच्या गुणाचा उल्लेख शत. ब्रा. (९·२·३·३ ३६।३७) मध्ये केला आहे.

ब्राह्मण ग्रंथांत दिलेले शांति करण्याचे उपाय पुष्कळ वेळा एखादी वैदिक ऋचा पठण करण्यासारखे साधे उपाय असतात. उदाहरणार्थ, तै. ब्रा. (१·१·८·२) ह्यात श्रौत अग्नीची स्थापना करते वेळी तीन

साममंत्र म्हणण्यास सांगितले आहेत. शां. ब्रा. (३·३) मध्ये असे म्हटले आहे की सामिधेनी ऋचांचा जप केल्याने अग्नि उपकारक आणि शुभदायक होतो. पाणीदेखील दुष्परिणाम नाहींसे करण्याचे अथवा त्यांचे शमन करण्याचे एक साधन असते असे ऐत. ब्रा. (३२·४) मध्ये तसेच शांखा. ब्रा. (३·६) मध्ये म्हटले आहे. तै. आरण्यक (४·४२), (४·२६।३५) आणि बौ. श्रौ. सू. (९—१८) ह्यांत शांतीचे अनेक मंत्र दिले आहेत. ह्यावरून असे दिसून येते की प्राचीन वैदिक ग्रंथांत शांति हा शब्द अनिष्ट स्थिति अथवा दुष्परिणाम ह्यांच्यापासून मुक्तता, पाण्यासारखी अथवा वैदिक मंत्र अथवा प्रार्थना पठण करण्यासारखी देवतांचा संतोष उत्पन्न करण्याची अथवा दुष्परिणाम निवारण करण्याची साधने आणि संतोष उत्पन्न करण्याचा विधि अशा भिन्नभिन्न अर्थाने, योजिलेला असतो. यज्ञाच्या बाबतीत देवतांना संतुष्ट करण्याकरिता करावयाच्या शांतिव्यतिरिक्त दुःस्वप्ने, विशिष्ट पक्षांचे आवाज ऐकणे ह्यांच्यासारख्या अशुभ समजल्या जाणाऱ्या घटनांचे दुष्परिणाम टाळण्याकरिता कांही उपाय योजण्यांत येत असत. आप. गृ. सू. (८·२३-९) मध्ये उल्कापात, भूतसंचार, घर जळणे, धरणीकंप ह्यांच्यासारख्या अनेक **अपूर्व** दृश्यांचे उल्लेख करून त्या सर्वांच्या करिता एकाच प्रकारची शांति करावयास सांगितले आहे. अशाच प्रकारचे नियम जै. गृ. (२·७) मध्येही आढळतात. सामविधान ब्रा. (१·८·७।८, २·२·२ इ.) मध्ये निरनिराळ्या घटना झाल्यावर करावयाची निरनिराळी **प्रायश्चित्ते** सांगितली आहेत आणि वस्तुतः ती प्रायश्चित्ते शांतीच आहेत.

सर्व प्रकारच्या अशुभ चिन्हांकरिता आणि अशुभ शकुनांकरिता करावयाच्या शांतीचीं अत्यंत विस्तृत वर्णने वेदानंतर झालेल्या गृह्यसूत्रें, कौशिक सूत्र, अथर्ववेद परिशिष्ट ह्यांच्यासारख्या ग्रंथांत, निरनिराळ्या पुराणांत, बृहत्संहिता, कृत्य कल्पतरु, अद्भुत सागर ह्यांच्या सारख्या ग्रंथांत, केली आहेत. ह्या ग्रंथांत दिलेल्या शांतिविधींमध्ये अयुत होम, कोटि होम, पुष्यस्नान, ग्रहणस्नान, संक्रांतिस्नान, ग्रहशांति, मातृशांति, लिंगशांति, विनायक शांति, निरनिराळ्या उत्पातांकरिता शांति, गायत्री होम, रुद्रजपविधि, अभिचारिक (जादूचे) कर्म इत्यादि अनेक प्रकारच्या उपायांचा समावेश होतो. परंतु अशा शांतीपैकी बऱ्याच शांति बऱ्याच पूर्वीपासून प्रायः प्रचारांतून नाहींशा झाल्या आहेत. ह्याकरिता प्रस्तुतच्या सारांशाच्या ग्रंथात त्यांचा समावेश केला नाही आणि त्यांपैकी फक्त कांही थोड्या सांप्रत काळी प्रचारांत असलेल्या अथवा निरनिराळया दृष्टीने उद्बोधक आणि मनोरंजक असण्याऱ्या शांतीचीच त्रोटक वर्णने देण्यांत येतील.

शांतींच्या बाबतीत **अद्भूत**, **उत्पात** आणि **निमित्त** ह्या शब्दांना कांही विशिष्ट अर्थ असतात. अद्भुत हा शब्द प्राचीन असून तो ऋग्वेदामध्ये अनेक वेळा आला आहे आणि तो सामान्यतः 'आश्चर्यकारक' ह्या अर्थाने एखाद्या देवाला लावलेला असतो. तथापि भविष्यकाली होणारा, अरिष्टसूचक असेही भिन्नभिन्न अर्थ संदर्भानुसार त्या शब्दाचे असतात. निरुक्तामध्ये 'अद्भुत' ह्या शब्दाला 'अभूत' (जे घडले नाही ते) हा प्रतिशब्द सांगितला आहे. गृह्यसूत्रात योजलेला शब्द बहुधा 'अद्भुत' हा असतो आणि शांतीला 'अद् भुतशांति' असे म्हटलेले असते. अद्भुत ह्या शब्दाचा अर्थ अतिशय व्यापक असून त्यात धरणीकंप, ग्रहणे, धूमकेतु उल्कापतन ह्यांच्यासारख्या गंभीर स्वरूपाच्या घटनांचा समावेश होतो असे नसून एखाद्या गाईला रक्तासारखे लाल दूध येणे, एका गाईने दुसऱ्या गाईचे स्तन चोखणे ह्यांच्यासारख्या तुलनेने गौण स्वरूपाच्या परंतु अनुपेक्षित अथवा अपूर्व घटनांचाही समावेश होतो. सामवेदाच्या अद्भुत ब्राह्मणाच्या आधारावर केलेल्या आथर्वण परिशिष्टाला अद्भुतशांति अशी संज्ञा असून त्यात अद्भुताचे इंद्र, वरुण, यम प्रभृति सात देवांशी संबंध असणारे सात गट पाडले आहेत आणि त्या प्रत्येक गटात येणाऱ्या घटनांची नावे दिली आहेत. तसेच अशा अद्भुतांच्या बाबतीत करावयाच्या अथर्वशीर्षाचा जप, ब्राह्मणांकडून 'स्वस्ति' म्हणवून घेणे, ब्राह्मणांचा सत्कार, ब्राह्मणभोजन ह्यांच्यासारख्या शांति सांगितल्या आहेत.

**उत्पात.** हा शब्द श्रौत अथवा गृह्यसूत्रांत क्वचितच आढळतो. परंतु पुराणांत आणि मध्ययुगीन कालात झालेल्या संस्कृत ग्रंथांमध्ये अद्भुत शब्दापेक्षा उत्पात हा शब्द अधिक वेळा आला आहे आणि केव्हा केव्हा अद्भुत आणि उत्पात हे शब्द समानार्थाने योजिलेले आहेत. तथापि सर्वसाधारणपणे उत्पात ह्या शब्दाने सर्वाना भयसूचित करणाऱ्या घटनांचाच बोध होतो. अमरकोशात अजन्य, उत्पात आणि उपसर्ग हे समानार्थी शब्द असल्याचे मानले आहे. उत्पात म्हणजे 'नैसर्गिक क्रमाच्या विरुद्ध' अशी व्याख्या गर्ग, वराहमिहिर आणि अथर्वपरिशिष्ट (६४) ह्यांत दिली आहे.

**निमित्त.** उत्पात हा सामान्यतः अशुभसूचित करणारा असतो परंतु निमित्त शुभ अथवा अशुभसूचक असू शकते. निमित्त हा शब्द पुष्कळदा एखाद्या मनुष्याच्या एखाद्या अवयवाला होणाऱ्या स्पंदनापुरताच मर्यादित असतो. तथापि 'निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव' (गीता १·३१) ह्यांच्यासारख्या क्वचित् प्रसंगी त्या शब्दाचा अधिक व्यापक अर्थानेही उपयोग केलेला आढळतो. रामायण (अयोध्या ४·१७।१९), महाभारत (भीष्म २·१६।१७), अथर्व परिशिष्ट (६४·१०·९।१०), मनु (६·५०) ह्यांत उत्पात आणि निमित्त ह्यांचा पृथक् पृथक् उल्लेख केला आहे.

निमित्तांची आणि उत्पातांची उदाहरणे रामायण आणि महाभारत ह्यात विपुल आढळतात. त्या ग्रंथांत वर्णन केलेले शकुन आणि निमित्त सामान्यतः काही विशिष्ट महत्वाच्या प्रसंगी घडून आल्याचे सांगितलेले आहे. उदाहरणार्थ, राजा दशरथाने रामाला युवराज करण्याचे ठरविले तेव्हा, पांडव वनवासांत जाण्यास निघाले तेव्हा अथवा अर्जुनाने जयद्रथाच्या वधाची प्रतिज्ञा केली तेव्हा इ. गर्ग, (अद्भुतसागर पा. ५) पराशर, बृ. सं. (४५-२) प्रभृतींनी उत्पातांचे दिव्य, भौम, अंतरिक्ष असे तीन वर्ग केले आहेत. आकाशांतील ग्रहांपासून उत्पन्न झालेले ग्रहण, धूमकेतु ह्याच्यासारख्या उत्पातांचा **दैव** अथवा **दिव्य** उत्पातांत समावेश होतो. पृथ्वीवर दिसणारे धरणीकंप, जलाशयांच्या विपरीत अवस्था ह्यांच्यासारख्या उत्पातांचा **भौम** उत्पातांत समावेश होतो. आकाशांत अथवा अंतरिक्षांत उद्भवणाऱ्या वादळे, उत्कापात, सूर्यचंद्राभोवती खळे, इंद्रधनुष्य, रक्तासारखा पाऊस पडणे ह्यांच्यासारख्या उत्पातांचा **अंतरिक्ष** उत्पातांत समावेश होतो. बृहत्संहितेमध्ये म्हटले आहे की **भौम** उत्पातांचे दुष्परिणाम शांतीच्या योगाने नाहींसे होतात; **अंतरिक्ष** उत्पातांचे दुष्परिणाम शांतीच्या योगाने सौम्य होतात; परंतु काश्यपासारख्या कांही आचार्यांच्या मताप्रमाणे **दिव्य** उत्पातांचे निवारण शांतीच्या योगाने मुळीच होत नाही. तथापि वराहमिहिराचे स्वतःचे मत असे असावे असे दिसते की **दिव्य** उत्पातांचे दुष्परिणाम सुद्धा विपुल सुवर्ण, अन्न आणि भूमि ह्यांच्या दानाने, अथवा रुद्राला दुधाने अभिषेक केल्याने, कोटि होम करून दूर करिता येतात.

मत्स्यपुराण (अ. २२८) मध्ये मुख्यत्वे निरनिराळ्या देवांची नांवे असलेल्या वैष्णवी, रौद्री, ब्राह्मी, वायवी, वारुणी अशा १८ शांति सांगितल्या आहेत आणि त्या कोणकोणत्या प्रसंगी कराव्या हेही सांगितले आहे. उदाहरणार्थ, मरण येण्याचा संभव असणाऱ्या अपघाताची भीति असेल तेव्हा याम्या (यमाप्रीत्यर्थ) शांति करावी, जेव्हा संपत्ती नष्ट झाली असेल तेव्हा कौबेरी (कुबेराप्रीत्यर्थ) शांति करावी.

अग्निपुराण (२६३·७।८) मध्ये ह्या १८ शांतींचा उल्लेख करून असे म्हटले आहे की त्यांच्यापैकी अमृता, अभया आणि सौम्या ह्या शांति सर्वांत उत्तम असतात.

बृ. सं. (४५·८२।९५) मध्ये कांही विशिष्ट घटनांची यादी दिली असून असे म्हटले आहे की त्या घटना काही विशिष्ट ऋतूंत घडून आल्यास अशुभसूचक असत नाहीत. मत्स्यपुराणांत (२२९·१४।२५) तेच

श्लोक थोड्याशा भेदाने दिले आहेत. उदाहरणार्थ, चैत्र आणि वैशाख महिन्यांत विजा, उल्का, धरणीकंप, मेघगर्जनायुक्त वादळे, सूर्य चंद्रांना खळे पडणे इ. घटना शुभसूचक असतात आणि त्यांच्याकरिता शांति कराव्या लागत नाहीत.

# प्रकरण २१

## पृथक् पृथक् शांति

(मू. ग्रं. पा. ५·७४८-८१४)

वेदकाळानंतरच्या निरनिराळ्या शांतींपैकी काही प्रमुख शांतींचे विवेचन प्रस्तुत प्रकरणामध्ये करावयाचे आहे. पहिली शांति **विनायक शांति** अथवा **गणपतिपूजा** ही आहे. उपनयन आणि विवाह ह्यांच्यासारख्या सर्व संस्कारांच्या प्रारंभी ही शांति करण्यात येते आणि तिचा हेतु त्या संस्काराचे फल निर्विघ्नपणे प्राप्त व्हावे अथवा दुश्चिन्हांच्या वाईट परिणामांचे निवारण व्हावे अथवा एखाद्या सपिंडाच्या मृत्यूमुळे उत्पन्न झालेल्या दुष्परिणामात सौम्यता यावी हा असतो. जेव्हा ही शांति स्वतंत्रपणे करावयाची असेल तेव्हा शुद्ध पक्षातील चतुर्थीच्या दिवशी, गुरुवारी आणि पुष्यप्रभृति एखाद्या शुभ नक्षत्रावर करावी. परंतु जेव्हा ती एखाद्या संस्काराच्या प्रारंभी करावयाची असेल तेव्हा त्या मूळ संस्काराच्या विधीत सोईच्या वेळी ही शांति करण्यास प्रत्यवाय नसतो. मानवगृह्य आणि बैजवाप गृह्य ह्यांच्या रचनाकालाइतक्या प्राचीन काळी विनायक चार असल्याचे आणि ते दुष्ट ग्रह असल्याचे मानीत असत. त्यानंतर याज्ञ. स्मृतीच्या काळी (१·२७१-२९४) विनायक केवळ विघ्नकर्ता नसून **विघ्नहर्ता** असल्याचे मानण्यात येऊ लागले आणि त्यानंतरच्या काळात सर्व विधींमध्ये पहिल्याने गणेशपूजन केलेच पाहिजे असा नियम सांगण्यात आला (गोभिलगृ. १·१३). याज्ञ. [एवं विनायकं पूज्य ग्रहांश्चैव विधानतः।
कर्मणां फलमाप्नोति श्रियं चाप्नोत्यनुत्तमाम्॥

याज्ञ. (१·२९३)] (१·२९३) मध्ये असे सांगितले आहे की विनायकाच्या पूजेप्रमाणेच **ग्रहांचीही पूजा** केल्याने मनुष्याला त्याच्या अंगीकृत कार्यात यश येते आणि उत्तम ऐश्वर्य प्राप्त होते. असाच नियम विष्णुधर्मोत्तर (२·१०५·२-२४), ब्रह्माण्ड (४·४४·६५-७०) यांत सांगितला आहे. भविष्योत्तर (अ. १४४) मध्ये **गणनाथ शांति** नावाची एक शांति. दिली असून ती याज्ञ. स्मृ. मध्ये वर्णन केलेल्या विनायकशांतीशी जुळती आहे.

**ग्रहांची शांति.** याज्ञ. (१·२९४-३०८), वैखानस स्मार्त (४·१३-१४), बौधा, गृह्यशेषसूत्र, मत्स्य पुराण (९३·१-१०५) प्रभृति ग्रंथांत आणि मध्ययुगीन काळातील निबंध ग्रंथांत **नवग्रहांच्या-शांतीचा** विधी सांगितला. आहे. हे नवग्रह म्हणजे सूर्य, चंद्र, मंगळ प्रभृति वारांच्या अनुक्रमाने सात ग्रह आणि राहु आणि केतु हे होत. मध्ययुगीन काळातील सर्व निबंध ग्रंथांत जे शांतिहोम वर्णन केले आहेत त्यांचा **आदर्श** नवग्रहहोम असतो. ऐश्वर्याची प्राप्ती, आपत्ती निवारण, दीर्घायुष्याची प्राप्ती, शत्रूच्या विरुद्ध अभिचार (जादू) इत्यादि हेतु असणाऱ्यांनी ग्रहयज्ञ करावा असे याज्ञ. (१·२९४) मध्ये सांगितले आहे. **नवग्रहमख** तीन प्रकारचा असल्याचे मत्स्य (९३·५।६) मध्ये म्हटले आहे. ते प्रकार म्हणजे **अयुतहोम** (ह्यात दहा सहस्त्र आहुति असतात), **लक्षहोम** आणि **कोटीहोम** हे होत. नवग्रहयज्ञाचे याज्ञ. स्मृतीमध्ये केलेले वर्णन बहुधा सर्वात जुने आहे. नवग्रहांच्या प्रतिमा निरनिराळ्या धातूंच्या कराव्या अथवा त्यांची चित्रे कापडाच्या तुकड्यावर निरनिराळ्या रंगांच्या पुडीने अथवा चंदनासारसख्या सुगंधी द्रव्याने काढावी. अशा चित्रांत सूर्याचे चित्र मध्यभागी असावे आणि बाकीच्या ग्रहांच्या प्रतिमा अथवा चित्रे आठ दिशांना ठेवावी. प्रत्येक ग्रहाला अनुरूप अशा रंगाची वस्त्रे, फुले, सुगंधी द्रव्ये इत्यादि अर्पण करावीत आणि आहुतीही द्याव्या. सर्व ग्रहांच्या बाबतीत गुग्गुल हा धूप असतो आणि शिजविलेल्या भाताच्या आहुती त्या त्या ग्रहांना अनुरूप मंत्र म्हणून नवग्रहांना अर्पण कराव्या. भिन्नभिन्न वृक्षांच्या समिधा अथवा शमी, दूर्वा, कुश अग्नीत अर्पण करावे. अशा समिधांची संस्था प्रत्येकी १०८ अथवा २८ असावी (याज्ञ १·३०१।३०२). ब्राह्मणांना खाऊ घालावयाचे

अन्नही ग्रहानुसार भिन्न भिन्न प्रकारचे असते. ब्राह्मणांना द्यावयाची दक्षिणा देखील ग्रहानुसार भिन्न असते. एखाद्या विशिष्ट काळी जो ग्रह एखाद्या व्यक्तीच्या अनिष्टस्थानी असेल त्या ग्रहाची विशेष पूजा करावी. राजाचा उत्कर्ष आणि अपकर्ष ग्रहांवर अवलंबून असतो. (याज्ञ १·३०८). आहुती, दक्षिणा आणि दान ह्यांच्या बाबतीत अयुतहोमाच्या दहापट लक्षहोम असतो. आणि लक्ष होमाच्या शतपट कोटीहोम असतो. (मस्त्य ९३·९२). परंतु आवाहनादि इतर कार्यक्रम सर्वामध्ये सारखाच असतो. ह्या [अन्नहीनो दहेद्राष्ट्रं मन्त्रहीनस्तु ऋत्विजः।
यष्टारं दक्षिणाहीनं नास्ति यज्ञसमो रिपुः॥
न वाप्यल्पधनः कुर्याल्लक्षहोमं नरः क्वचित्।
यस्मात्पीडाकरो नित्यं यज्ञे भवति विग्रहः॥
मत्स्य. (९३·१११।११२)] यज्ञामध्ये योग्य अन्नदान केले नाही अथवा योग्य दक्षिणा दिली नाही तर यज्ञकर्त्याला तसेच देशाला पीडा होते. ह्याकरिता एखाद्या द्रव्यहीन मनुष्याने लक्ष होम करण्यास प्रवृत्त होऊ नये असा इशारा मत्स्य पुराण (९३·११२) मध्ये दिला आहे.

**याज्ञ**. स्मृतीमध्ये दिलेले ग्रहयज्ञाचे विधान त्रोटक असून तो एक साधा विधी आहे. परंतु भविष्योत्तर पुराणासारख्या आणि मध्ययुगीन आणि आधुनिक काळात झालेल्या काही ग्रंथांत अनेक तपशील घातल्याकारणाने तो विधी विस्तृत स्वरूपाचा झाला आहे. उदाहरणार्थ प्रत्येक ग्रहाला **गोत्र** असून तो कोणत्या तरी **विशिष्ट देशात जन्मला** असल्याचे मानले आहे आणि असा नियम सांगितला आहे की जर गोत्र आणि जन्मदेश ह्यांचा उच्चार न करिता एखाद्या ग्रहाची पूजा केली तर ती पूजा त्या ग्रहाला अपमानकारक वाटेल (रघुनंदन कृत संस्कारतत्त्व पा. ९४६). ह्या ग्रहयज्ञांची फले आणि त्या संबंधीच्या कथा विष्णुधर्मो. (२·३६·३।४), अग्नि (१४९।१२), स्कंद (अवतरण शांतिमयूख पा. १२) इ. ग्रंथांत दिल्या आहेत. प्रस्तुत ग्रंथकाराच्या बाळपणात निरनिराळ्या ग्रहांप्रीत्यर्थ द्यावयाच्या दानांसंबंधीचे नियम पुष्कळ लोक पाळीत असत आणि अद्यापि देखील ते नियम काही प्रमाणावर पाळले जातात.

ज्यावेळी **शनि**ग्रह एखाद्याच्या जन्मराशीपासून १२, १ आणि २ ह्या स्थानांत असेल तेव्हा त्याच्या प्रीत्यर्थ दुसरी एक शांति करावयाची असते. हा अवधि सामान्यतः साडेसात वर्षांचा असतो आणि त्याला संस्कृतमध्ये '**सार्थसप्तवार्षिक**' पीडा आणि मराठीमध्ये '**साडेसाती**' असे म्हणतात. ह्या शांतीचा कार्यक्रम एक वर्षंपर्यत प्रत्येक शनिवारी करावा अथवा 'कोणस्थः [कोणस्थः पिङ्गलो बभ्रुः कृष्णो रौद्रोन्तको यमः।
सौरिः शनैश्चरो मन्दः पिप्पलादेन संस्तुतः॥
मदनरत्न (शान्तिकपौष्टिक पृ. ८ अ).] पिंगलो०' इत्यादि शनीची दहा नावे असलेल्या मंत्राचा प्रतिदिवशी जप करावा आणि प्रातःकाळी शनिस्तोत्र पठण करावे. असे केल्याने जी पीडा ७॥ वर्षेपर्यत शनि करितो तिचे निवारण होते.

**शांतींची संख्या अगणित आहे.** शास्त्रात निरनिराळ्या कारणांकरिता शांति करावयास सांगितले आहे. जेव्हा एखादी व्यक्ती (पुरुष अथवा स्त्री) ६० वर्षे पूर्ण करते तेव्हा ती व्यक्ती लवकरच मृत्यु पावण्याची शक्यता असते अथवा त्या व्यक्तीचा पिता, पत्नी अथवा पुत्र मरण पावण्याची अथवा त्या व्यक्तीला निरनिराळे रोग होण्याची शक्यता असते. हा धोका टाळण्याकरिता एक शांति करावयास सांगितले आहे (आणि अशी शांति सांप्रतकाळी देखील पुष्कळदा करण्यात येते). त्या शांतीला **षष्ट्यब्दपूर्ती** (साठवर्षांची पूर्णता) अथवा उग्ररथ शांति असे नाव आहे आणि तिचा हेतु त्या व्यक्तीला दीर्घायुष्य प्राप्त व्हावे, ती व्यक्ती सर्व संकटांतून मुक्त व्हावी आणि तिची सर्वतोपरी भरभराट व्हावी हा असतो. ही उग्ररथ शांति फार प्राचीन काळापासून प्रचलित असून तिचे सर्वात जुन्या काळचे वर्णन बौधा. **गृह्यशेष** सूत्र (५·८) मध्ये आढळते. त्या शांतीमधील मुख्य बाबी पुढीलप्रमाणे असतात. ती शांति त्या व्यक्तीच्या जन्ममासात अथवा जन्म नक्षत्रावर करावी. एका

कलशावर एक मृत्यूची सुवर्णाची प्रतिमा ठेवावी आणि तिची पूजा करावी. शिजविलेल्या भाताच्या आहुती निरनिराळे मंत्र म्हणून अग्नीला अर्पण कराव्या. नंतर त्या कलशातील पाणी त्या व्यक्तीच्या आणि तिच्या कुटुंबातील मंडळींच्या अंगावर प्रोक्षण करावे. पुरोहिताचा सत्कार करावा, ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी आणि भोजन घालावे. मागाहूनच्या काळात झालेल्या ग्रंथांनी वरील विधीमध्ये अनेक तपशीलांची भर घातली आहे. अशा तपशिलामध्ये मार्कंडेयाच्या प्रतिमेचे पूजन, मृत्युंजयाप्रीत्यर्थ होम, अश्वत्थामा, बलि प्रभृति परिवार देवतांच्या प्रीत्यर्थ पृथक् पृथक् हवन, ब्राह्मणांना दशदाने देणे, **शंभर मण सुवर्ण** दान देणे, नीराजन करून घेणे, १०० अथवा १००० ब्राह्मणांना भोजन घालणे इत्यादिकांचा समावेश होतो.

ह्या शांतीला उग्ररथ शांति का म्हणतात हे सांगणे कठीण आहे. अशाच प्रकारची दुसरी एक शांति **७० वर्ष** पूर्ण झाल्यावर अथवा **७७ व्या वर्षातील ७ व्या महिन्यातील** ७ व्या रात्री करावयाची असून तिला **भैमरथी** [सप्तसप्ततिवर्षाणां सप्तमे मासि सप्तमी।
रात्रिर्भीमरथी नाम नराणामतिदुस्तरा ॥
तामतीत्य नरो योऽसौ दिनानि यानि जीवति।
क्रतुभिस्तानि तुल्यानि सुवर्णशतदक्षिणैः.........
(इंति वैद्यकम्) शब्दकल्पद्रुम.] **शांति** म्हणतात. (शब्द कल्पद्रुम). बौधा. गृह्य शेषसूत्र (१·२४) मध्ये १०० **वर्षे** पूर्ण झालेल्या अथवा १००० **अमावास्या** पाहिलेल्या व्यक्तीने करावयाची एक शांति सांगितली आहे.

**शांति करण्याला योग्य काल** कोणता हे निश्चित ठरविणे शक्य नाही, कारण कांही शांति एखाद्या कारणाने होणारे दुष्परिणाम टाळण्याकरिता करावयाच्या असतात आणि अशा शांति ती ती कारणें घडून येतील तेव्हा केल्या पाहिजेत आणि शुभकाळ प्राप्त होईपर्यंत वाट पाहत बसणे योग्य नसते. अशा शांति दक्षिणायनांत अथवा अधिक मासांत देखील करण्यास प्रत्यवाय नसतो. अशा प्रकारची **घाई नसेल** तेव्हा एखाद्या शुभ वारी, शुभ तिथीला आणि (तीन उत्तरा, रोहिणी, श्रवण ह्यांच्यासारख्या) कांही विशिष्ट नक्षत्रांवर शांति करावी. कांही विशिष्ट कृत्यांच्या बाबतींत कांही विशिष्टकाळ सांगितले आहेत. उदाहरणार्थ, लक्षहोम शुभग्रह आणि बारा असल्याचे पाहून करावा (मत्स्य ९३·८६), कोटि होमाचा आरंभ चैत्र अथवा कार्तिक महिन्यांत करावा (मत्स्य २३९·२०।२१).

अनेक प्रकारच्या **अद्‌भुतांच्या** आणि **उत्पातांच्या** बाबतीत **महाशांति** नांवाची एक शांति करावयास सांगितले आहे. ह्या शांतीमध्ये ५ ब्राह्मण लागतात, ५ कलश मांडावयाचें असतात आणि अग्नीची स्थापना करून त्यावर **पायस** शिजवून त्याच्या आणि तुपाच्या अनेक आहुती द्यावयाच्या असतात. नंतर यजमानाच्या अंगावर त्या ५ कलशांतील पाणी निरनिराळे मंत्र उच्चारून शिंपडतात. सर्व दिशांना दिग्बलि अर्पण करतात. नंतर स्नान करून पुण्याहवाचन करितात. यजमानाच्या सामर्थ्याप्रमाणे भूमि, सुवर्ण, शय्या इत्यादि दाने द्यावी, दरिद्री आणि अपंग लोकांना आणि वेदवेत्त्या ब्राह्मणांना भोजन घालावे. ह्या शांतीच्या योगाने दीर्घायुष्य, शत्रूवर जय ह्याची प्राप्ती होऊन कठीण कार्ये देखील यशस्वी होतात.

मुख्यत्वेकरून **अद्‌भुत** अथवा **क्वचित प्रसंगी घडून येण्याऱ्या नैसर्गिक घटनांच्या** संबंधी अद्‌भुतसागर ह्या विस्तीर्ण ग्रंथांत विवेचन केले आहे. अशा घटनांमध्ये पहिला क्रम **धरणीकंपाचा** आहे. धरणीकंप कसा घडून येतो ह्याच्या विषयी निरनिराळ्या ग्रंथकारांनी निरनिराळ्या उपपत्त्या सांगितल्या आहेत. (बृ. सं. ३२·१।२) कोणी म्हटले आहे कीं सागराच्या पोटात राहणाऱ्या अजस्र प्राण्यांच्या योगाने धरणीकंप होतो (काश्यप); कोणी म्हणतो कीं दिशांच्या अंतीं राहाणारे दिग्गज दमून मस्तक हालवितात त्यामुळे धरणीकंप होतो (गर्ग); दुसऱ्या कोणी असे म्हटले आहे की धरणीकंप हा अदृष्टाच्या योगाने (म्हणजे

पृथ्वीवरील मनुष्यांच्या पातकांच्या योगाने) घडून येतो (वृद्धगर्ग). बिहार प्रांतात इ. स. १९३४ मध्ये झालेला भयंकर धरणीकंप हिंदुसमाजात अस्तित्वात असलेल्या अस्पृश्यत्त्वाच्या दुष्ट चालीची शिक्षा म्हणून घडून आला असे महात्मा गांधीनी मानले होते. अशाच तऱ्हेच्या निरनिराळ्या उपपत्त्या ग्रहणे, धूमकेतु, उल्कापात ह्यांच्यासारख्या क्वचित प्रसंगी घडणाच्या नैसर्गिक घटनांच्याबद्दलही भिन्न भिन्न ग्रंथकारांनी दिल्या आहेत आणि त्यांच्या प्रीत्यर्थं निरनिराळ्या शांतिही सांगितल्या आहेत. उदाहरणार्थ, ग्रहणे राहूच्यामुळे होतात असे मानितात आणि असे ग्रहण ज्या राशीत होते ती राशि अथवा ते नक्षत्र एखाद्या व्यक्तीच्या **जन्मस्थाना**पासून कितव्या स्थानात असेल त्याप्रमाणे त्या व्यक्तीला शुभ अथवा अशुभ फले प्राप्त होतात असे भविष्य वर्तविण्यात येते आणि त्या दुष्परिणामाचे निरसन होण्याकरिता उपाय सांगितलेले असतात. उदाहरणार्थ अत्रीने म्हटले आहे की सूर्याचे अथवा चंद्राचे ग्रहण एखाद्या मनुष्याच्या जन्मनक्षत्रावर येते तेव्हा त्या मनुष्याला रोग, प्रवास आणि मृत्यु प्राप्त होईल असे सूचित केले जाते आणि अशा मनुष्याने दाने दिली आणि तो ग्रहणाचा दिवस देवाच्या पूजेत आणि जपात घालविला तर त्याच्या वर येणारे संकट टाळले जाते. (कालविवेक पा. ५४३). ह्या करिता अनेक शांति शास्त्रांत सांगितल्या आहेत.

**उल्कापाताच्या** बाबतीत अशी एक कल्पना होती की अशा उल्का म्हणजे स्वर्गात पुण्याचा उपभोग घेतल्यानंतर स्वर्गातून मृत्युलोकात जन्म घेण्याकरिता पडणारे पुण्यवान प्राणी असतात. उल्कापतनाकरिता **अमृता** नावाची महाशांति करावी असे अद्‌भुतसागर ह्या ग्रंथांत (पा. ३४२।४४) म्हटले आहे.

काही नैसर्गिक घटना काही **काही विशिष्ट काली** घडून आल्या तरच त्यांना **उत्पात** मानतात परंतु त्याच घटना अन्य काळी घडल्यास त्यांना उत्पात मानीत नाहीत. उदाहरणार्थ, वराहमिहिराने (बृ. सं. ४५–८४।८५ आणि ९५) म्हटले आहे की उल्कापतन, धरणीकंप, चंद्रसूर्याभोवती तेजोवलय, गाई आणि पशु ह्याच्यात कामप्रवृत्ती ह्यांच्यासारख्या घटना मधु आणि माधव (म्हणजे चैत्र आणि वैशाख) महिन्यामध्ये शुभदायक असतात.

ज्या दुसऱ्या एका अतिशय चमत्कारिक दुश्चिन्हाचा महाभारत, मत्स्यप्रभृति ग्रंथांत उल्लेख केला आहे ते म्हणजे **देवतांच्या प्रतिमा कंप पावणे**, नाचू लागणे, हसू लागणे आणि रडणे हे होय. देवालयात घडून येणाऱ्या अशा घटनांना आथर्वणपरिशिष्ट ७२ मध्ये **दिव्य** अशी संज्ञा दिली असून त्या पुढे येणारा पावसाचा अभाव, शस्त्रापासून उत्पन्न होणारे भय, दुर्भिक्ष, रोगांची साथ आणि राजाचा आणि त्याच्या प्रधानाचा (अथवा नातलगांचा) नाश ह्या गोष्टी सूचित करतात असे म्हटले आहे आणि (४·७ मध्ये) त्याकरिता एक शांति करावयास सांगितले आहे. त्या शांतिमध्ये १०८ कपिला गाईच्या दुधामध्ये **पायस** शिजवून त्याच्या आहुती रौद्रगण संज्ञा असणाऱ्या रुद्राला अर्पण करावयाच्या असतात आणि ब्राह्मणांना शिजलेल्या भाताचे भोजन घालून पायस करण्याकरिता ज्या गाईचे दूध घेतले असेल त्या कपिला गाईचे दान द्यावयाचे असते, अथवा राजाने ब्राह्मणांच्या संतोषाकरिता काही मर्यादित काळाकरिता **राज्याचे दान** करावे असेहि सांगितले आहे.

मनुष्याच्या **जन्मकाळी करावयाच्या काही शांति** असतात. उदाहरणार्थ, एखाद्या बालकाचा जन्म मूळ, आश्लेषा, ज्येष्ठा ह्या नक्षत्रांवर अथवा त्यांच्या विशिष्ट भागात, गंडान्त योगावर, कृष्ण चतुर्दशीला अथवा अमावास्येला, व्यतिपात योगावर, ग्रहणात झाला तर त्याकरिता शांति करावी लागते. तसेच जुळी अपत्ये अथवा क्रमाने तीन पुत्रांनंतर कन्या अथवा क्रमाने तीन कन्यांनंतर पुत्र झाला तरीही शांति करावी

लागते. अशा तऱ्हेच्या बालकापासून पुढे अनिष्ट गोष्टी सूचित केल्या जातात. ह्या शांतीमध्ये **गोमुखप्रसव** नावाची एक शांति असते. स्त्रिया, गाई, घोड्या, गर्दभी इत्यादिकांच्या प्रसूतीच्या योगाने सूचित होणाऱ्या फलांचे सविस्तर वर्णन कौशिक सूत्र (कंडिका ११०।१११); बृ. सं. (४५·५१।५४), अद्‌भुतसागर (पा. ५५९।५६९) इत्यादि ग्रंथांत केले आहे. बृ. सं (४५·५२) मध्ये म्हटले आहे की जेव्हा एखादी स्त्री अद्‌भुत प्रकारच्या अपत्याला जन्म देते अथवा त्या अपत्याचा जन्म योग्य कालाच्या बऱ्याच आधी अथवा बऱ्याचनंतर झालेला असतो तेव्हा त्या अपत्यापासून देशाचा अथवा कुटुंबाचा नाश सूचित होतो. गर्गाने म्हटले आहे की ज्या स्त्रिया जुळ्या अथवा भयंकर अपत्यांना जन्म देतात त्यांना स्वतःच्या सुखाची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें अन्य स्थानी (अथवा अन्य देशात) न्याव्या, त्या मनुष्याने ब्राह्मणांना इच्छा असलेल्या वस्तूची दाने देऊन संतुष्ट करावे आणि एक शांतिविधि करवावा. चतुष्पाद प्राण्यांच्या बाबतीत अशा जनावरांना त्यांच्या कळपातून बाहेर काढावे आणि इतर देशात त्यांचा त्याग करावा. असे न केल्यास तें नगर. त्या जनावराचा स्वामी आणि तो कळप ह्यांचा नाश होईल.

भावी घटनांची माहिती समजण्याकरिता वर उल्लेख केलेल्यासारख्या साधनांप्रमाणे **स्वप्नांचाही** उपयोग करून घेण्यात येत असे. वैदिक वाङ्‌मयामध्ये तसेच निरनिराळ्या पुराणादि ग्रंथांत स्वप्नांचा सुदैवाशी आणि दुर्दैवाशी संबंध जोडलेला असतो, शुभाशुभ स्वप्नांची वर्णने केलेली असतात आणि त्यांच्याकरिता करावयाच्या शांतिसंबंधीही काही ग्रंथात वर्णन केलेले असते. नमुन्याकरिता अद्‌भुतसागर ह्या ग्रंथामध्ये (पा. ५०२।५०३) उद्‌धृत केलेल्या मत्स्य पुराणातील (२४२·२।१४) अवतरणात अशुभ स्वप्नांची काही उदाहरणे दिली आहेत. त्यामध्ये स्वतःच्या शरीरातून (नाभीखेरीज इतर जागी) गवत आणि वनस्पती उगवलेल्या पाहणे, मस्तकाचे मुंडन, स्वतःला नग्न स्थितीत पाहणे, तेलामध्ये स्नान करणे, पुष्पयुक्त वृक्षावर चढणे, शेण अथवा चिखल मिश्रित पाण्याने अथवा उघड्या जमिनीवर पडलेल्या पाण्याने स्नान करणे, चितेवर चढणे, स्वतःच्या मातेच्या गर्भाशयामध्ये प्रवेश करणे इत्यादिकांचा समावेश केला आहे. स्वप्नामध्ये एखाद्या हत्तीसारख्या वाहनांत आरूढ झाल्याचे पाहणे ही **शुभसूचक** गोष्ट असल्याचे वेदान्तसूत्र (३·२·४) वरील श्रीशंकराचार्यांच्या भाष्यामध्ये म्हटले आहे. तसेच मत्स्य (२४२·२१।३५) मध्येही अनेक शुभ स्वप्नांची यादी दिली असून त्यात स्वतःच्या नाभीमधून वृक्ष आणि गवत उगवणे, शुभ्र वर्णाची फुले आणि अतिशय शुभ्र वस्त्रे परिधान करणे, रक्ताचे दर्शन अथवा स्नान, प्रकाशयुक्त आकाशाचे दर्शन, देवता, गुरु आणि ब्राह्मण ह्यांच्याकडून वरदान मिळणे, राजचिन्हांची प्राप्ती होणे, सुंदर स्त्रियांची प्राप्ती होणे आणि त्यांना आलिंगन देणे, स्वतःचे अंग विष्ठेने माखणे, इत्यादिकांचा समावेश केला आहे. आणि असे म्हटले आहे की अशा प्रकारची शुभसूचक स्वप्ने पाहिल्यानंतर पाहणाऱ्याला अनायासाने शाश्वत संपत्तीची प्राप्ती होते आणि एखाद्या रोगाची पीडा असलेला मनुष्य त्या रोगापासून मुक्त होतो.

मत्स्य (२४२·१५।२०) मध्ये असा नियम सांगितला आहे की रात्रीच्या पहिल्या प्रहरात पाहिलेल्या स्वप्नाचे फल एका वर्षांत मिळते, दुसऱ्या प्रहरात पाहिलेल्या स्वप्नाचे फल सहा महिन्यात मिळते, तिसऱ्या प्रहरातील स्वप्नाचे फल तीन महिन्यानंतर मिळते आणि चौथ्या प्रहरात पाहिलेल्या स्वप्नाचे फल एक महिन्यात मिळते. जर एखाद्याने शुभकारक आणि अशुभकारक अशी दोन्ही प्रकारची स्वप्ने पाहिली तर फक्त सर्वांत शेवटी पाहिलेल्या स्वप्नाचेच फल प्राप्त होईल. ह्याकरिता जर एखाद्या मनुष्याने एखादे शुभसूचक स्वप्न पाहिले तर त्याने त्यानंतर झोपू नये. एखादे दुःस्वप्न पाहिले असल्यास ते दुसऱ्याला सांगावे तसेच त्यानंतर झोपावे म्हणजे दुःस्वप्नाचा अनिष्ट परिणाम दूर होतो. गजेंद्रमोक्षाची कथा श्रवण करणे हाही एक दुःस्वप्नाचा अनिष्ट परिणाम टाळण्याचा उपाय असल्याचे सांगितले आहे. स्वप्ने ही केवळ भावी परिणामांची **सूचना देणारी असून स्वप्नांच्या** योगाने असे परिणाम घडून येत नसतात असे ज्योतिस्तत्व ह्या ग्रंथात (पा.

७३०) म्हटले आहे.

सर्व प्राचीन देशांचा आणि त्यांतील लोकांचा स्वप्नांवर विश्वास असे आणि स्वप्नांचा अर्थ लावून भावी घटनांची माहिती मिळविण्याची त्यांना जिज्ञासा असे. बाबीलोम आणि ॲसिरिया देशांमध्ये राजदरबारात खाल्डिया देशातील ज्योतिषांना आणि स्वप्नाचे अर्थ सांगणाऱ्यांना अतिशय मान असे. **स्वप्ने कशी पडतात** ह्या संबंधीही निरनिराळ्या देशांतील ग्रंथकारांनी निरनिराळ्या **उपपत्या** सांगितल्या आहेत. ग्रीक तत्त्ववेत्ता प्लेटो ह्याने म्हटले आहे की स्वप्ने ही सामान्यतः महत्त्वाची शारीरिक आणि मानसिक अवस्थांची चिन्हे असतात परंतु काही स्वप्ने अन्य कारणांनीही उत्पन्न झालेली असतात. 'ताबिर' (अथवा स्वप्नमीमांसेचे मुसलमानी शास्त्र) ह्या विषयावरील ग्रंथामध्ये असे सांगितले आहे की स्वप्न पाहणाऱ्याने आणि स्वप्नांचा अर्थ सांगणाऱ्याने काही नियम पाळावयाचे असतात तसेच स्वप्नांचा अर्थ लावण्याची काही तत्त्वे असतात. उदाहरणार्थ, स्वप्नांचे परिणाम त्यांत पाहिलेल्या दृश्यांच्या विपरीत प्रकारचे होतात आणि ते (परिणाम) स्वप्न पाहिलेल्या व्यक्तीचा धर्म, देश आणि स्वप्न पडले त्यावेळी तो पूर्ण उपोषित होता अथवा पोटभर जेवलेला होता (ह्यासारखी) शारीरिक अवस्था ह्यांच्यावर अवलंबून असतात. ह्या नियमात आणि तत्त्वात आणि आपल्या प्राचीन ग्रंथांत सांगितलेल्या नियमात आणि तत्त्वात आश्चर्य वाटण्यासारखे साम्य दिसून येते. श्री. एन्. ब्लंड ह्यानी त्या नियतकालिकात (रा. ए. सो. नियत का. खंड १६ पा ११८—१७१) लिहिलेल्या लेखांत (पा. १४१) ससानिया वंशाचा (अथवा देशाचा) राजा नुशिर वान (इ. स. ५३१—५७९) ह्याने पाहिलेल्या एका स्वप्नांचे वर्णन केले आहे. त्या वर्णनात त्या राजाचा मंत्री बझुरमिहर ह्याने त्या स्वप्नाचा अर्थ सांगितला असे म्हटले आहे. त्या मंत्र्याच्या नावाचा उच्चार वराहमिहिर ह्या नावाशी लक्षात येण्याइतका जुळता आहे आणि असा तर्क केल्यास तो फारसा विलक्षण ठरणार नाही की भारतामधील प्राचीन काळचा बहुधा सर्वात प्रसिद्ध असणारा ज्योतिषी आणि खगोलशास्त्रज्ञ वराहमिहिर ह्याला नुशिर वान राजाने आश्रय दिला असावा आणि तो त्या राजाच्या दरबारात मोठ्या हुद्यावर काम करीत असावा. ह्या तर्काला कालानुक्रमही अतिशय अनुकूल आहे. कारण वराहमिहिराने आपल्या ग्रंथात अहर्गण शोधून काढताना शके ४२७ (इ. स. ५०५) हे वर्ष आरंभस्थान धरले आहे.

आधुनिक काळातील बरेच सुशिक्षित लोक स्वप्नांना काहीही मूल्य नसल्याचे मानतात. परंतु उलटपक्षी, दुसरे काही लोक स्वप्ने जवळ जवळ अचूकपणे भावी घटना सूचित करितात असे मानतात. तिसऱ्या प्रकारचे काही लोक असूनं ते स्वप्नांचा अर्थ सांगणाऱ्यांचे कोटिक्रम ऐकण्यास तयार असतात आणि स्वप्नांना महत्व मानणे निरर्थक आहे असे मत प्रतिपादन करणाऱ्या लोकांचेही कोटिक्रम ऐकण्यास तयार असतात. दोन्ही बाजूंचे कोटिक्रम ऐकून स्वतःचा निर्णय ठरविण्याची जर कोणाला इच्छा असेल तर त्याला, उपयोगी पडण्यासारखे इंग्रजीभाषेत अनेक ग्रंथ आहेत. उदाहरणार्थ, फ्राऊडकृत 'स्वप्नांचा अर्थ'; तसेच डब्ल्यूः एच्. साबिन, कृत 'नित्य व्यवहारांत दिसणारे दुसरे दृश्य' हे अत्यंत महत्त्वाचे ग्रंथ आहेत. साबिनने असे प्रतिपादन केले आहे की काल हा अखंड असतो आणि त्याचे वर्तमान, भूत आणि भविष्य हे भेद केवळ बोलण्याच्या सोईकरिता पाडलेले असतात; ज्याला **भावी घटना** असे आपण म्हणतो ती अगोदरच होऊन गेलेली असते परंतु ती कोणत्या स्वरूपात होऊन गेलेली असते हे कळलेले नसते.

दुसऱ्या काही मनोरंजक स्वरूपाच्या शांति असतात. जेव्हा एखाद्या मनुष्याचा **प्रपौत्र** (पणतु) जन्माला येतो तेव्हा आणि त्या **प्रपौत्राचे मुख** तो मनुष्य पाहतो त्यावेळी एक शांति करावी लागते. ह्या विधीमध्ये वरुणाच्या प्रतिमेची स्थापना एका कलशावर करून तिची पूजा करावयाची असते. नंतर त्या कलशामधील उदक त्या मनुष्याच्या अंगावर शिंपडण्यांत येते. नंतर गंगेची पूजा करावी आणि एका

काशाच्या पात्रांत पातळ तूप घालून त्या तुपांत त्या मनुष्याने आपले स्वतःचे मुख पाहावे आणि नंतर एका सुवर्णाच्या पात्रांत ठेवलेल्या दिव्याच्या प्रकाशामध्ये आपल्या प्रपौत्राचे मुख पाहावे. नंतर सुवर्णाची शंभर फुले करून त्या फुलांनी त्या प्रपौत्राच्या अंगावर पाण्याचे थेंब उडवावे. नंतर विष्णूच्या प्रतिमेचे पूजन करून तिला पायस अर्पण करावे. ज्या तुपात आपले मुख पाहिले असेल ते तूप ब्राह्मणांना दान द्यावे.

जी आजमितीला देखील पुष्कळवेळा करण्यात येते अशी '**उदकशांति**'ही शांति आहे. ही शांति अनेक अशुभ घटनांचे परिणाम टाळण्याकरिता करण्यात येते. तसेच आरोग्यप्राप्ती, रोगांचे निवारण, अनिष्टस्थानी असलेल्या ग्रहांपासून उत्पन्न होणाऱ्या पीडांचा परिहार, कुटुंबात झालेल्या बालकाच्या जन्मामुळे अथवा एखाद्या व्यक्तीच्या मृत्यूमुळे उत्पन्न झालेल्या आशौचाचा दोष दूर करणे, सुखी जीवन प्राप्त होणे ह्यांच्यासारखे विशिष्ट लाभ मिळावे ह्याकरिता करण्यात येते. आधुनिक काळांत हा एक अति विस्तृत विधि झाला असून त्यात बरेच वेदमंत्र म्हणण्यात येतात आणि त्या सर्व विधीला सुमारे तीन तास लागतात. ह्या विधीला समसंख्य ब्राह्मण लागतात. पळसाच्या पानाने तयार केलेले एक पात्र एका वेदीवर ठेवून त्यावर अक्षता, फुले, दूर्वा इत्यादिकांचे आच्छादन घालतात. त्याच्या सभोवती सर्व दिशांना ब्राह्मण बसतात. नंतर अनेक मंत्र म्हणण्यात येतात आणि त्या कलशातील पाणी पुरोहित यजमानाला उभे करून त्याच्या अंगावर प्रोक्षण करतो. तसेच ते पाणी कुटुंबांतील सर्व मंडळी, सेवक, हत्ती, घोडे इत्यादिकांवर शिंपडण्यात येते. अशाप्रकारचा हा विधि एक, तीन, पांच अथवा सात दिवसपर्यंत करण्यात येतो. असे केल्याने मृत्यूचे निवारण होते असे बौधायनाने म्हटले आहे. (बौ. गृ. सू. १·१४)

एखाद्या व्यक्तीचे **जन्मनक्षत्र** एखाद्या **दुष्ट ग्रहाने** अथवा अनिष्ट भावाने **पीडित झाले असेल** तेव्हा एक शांति करावयाची असते. (पराशर अद्‌भुतसागर पा २७१) एखाद्या व्यक्तीला **ज्वरापासून पीडा** होत असेल तर ज्या तिथीला ज्वराला आरंभ झाला असेल त्या तिथीला अनुसरून कांही शांति करावयाच्या असतात : (मदनरत्न पृ. ११) अशा शांतीमध्ये त्या त्या तिथीच्या देवतेची पूजा करावयाची असते. एखादा मनुष्य मृत झाला असे लोकांना वाटून त्यांनी त्याचा देह दहन करण्याकरिता **स्मशानात नेल्यावर** तो **पुन्हा जिवंत झाला** तर करावयाची एक शांति धर्मसिंधुमध्ये सांगितली आहे. एखादी **गाय भाद्रपद महिन्यात, म्हैस पौष महिन्यात, घोडी दिवसा** प्रसूत झाली तर करावयाची एक शांति कांही ग्रंथांत सांगितली आहे. प्रस्तुत ग्रंथकाराच्या बालपणी अशा प्रकारच्या आणि विशेषतः म्हशीच्या बाबतीतील शांति केल्या जात असत. अशी शांति ४, ९, १२ अथवा १४ ह्या तिथीला करावी असे अद्‌भुत सागर ह्या ग्रंथात (पा. ५६८) सांगितले आहे.

आधुनिक काळी एखाद्या नवीन बांधलेल्या घरात प्रवेश करावयाच्या दिवशी **वास्तुशांति अथवा वास्तुशमनशांति** नांवाची एक शांति करण्यात येते. ह्या शांतीचे वर्णन मागे खंड २ मध्ये करण्यात आले आहे. बौधायन गृह्यशेष सूत्रात (१·१८) ह्या विधीला **गृहशांति** असे म्हटले असून ज्याला आपल्या घरात उत्कर्ष नांदावा असे वाटत असेल त्याने तो विधि प्रत्येक महिन्यांत, प्रत्येक ऋतूमध्ये अथवा प्रत्येक वर्षी शुक्ल पक्षांत एखाद्या शुभ नक्षत्रावर करावा असे सांगितले आहे. आश्व, गृह्यांत केलेल्या ह्या विधीच्या वर्णनात पुढील प्रमुख कृत्यांचा समावेश होतो. तांदुळ आणि यव मिश्रित उदकामध्ये सुवर्ण टाकावे आणि ते उदक घरावर शिंपडावे आणि त्या उदकाची अखंड धार धरीत घराच्या सभोवती तीन प्रदक्षिणा घालाव्या. घरामध्ये भात शिजवावा आणि त्या भाताच्या आहुती अग्नीमध्ये अर्पण कराव्या. तसेच त्या भाताने ब्राह्मणांना भोजन घालावे आणि 'हे घर शुभदायक आहे' (शिवं वास्तु) असे त्यांच्याकडून म्हणवून घ्यावे. मागूनच्या काळात झालेल्या ग्रंथांत वास्तुशांति हा एक अत्यंत विस्तृत विधि सांगितला आहे.

**शुभ आणि अशुभ दृश्ये.** एखादा राजा स्वारीवर निघाला असताना त्याच्या पुढे कोणती दृश्ये शुभ आणि कोणती अशुभ सूचक असतात ह्याविषयी अनेक ग्रंथांत विवेचन केलेले आढळते. उदाहरणार्थ, मत्स्य (२४३·२।१२) मध्ये म्हटले आहे की अयोग्य प्रकारची औषधे, बाहेरून कृष्णवर्णाची धान्ये, कापूस, गवत, वाळलेले शेण ह्यांच्या सारखी **अशुभ सूचक** दृश्ये पहिल्यावेळी पाहिल्यास राजाने केशवाची पूजा करून त्याची स्तुती करावी. जर तसेच दृश्य दुसऱ्याने पाहिले तर त्याने आपल्या राजवाड्यामंध्ये प्रवेश करावा. मस्त्य (२४३·१५।२५) मध्ये **शुभसूचक** दृश्यांची यादी दिली असून त्यांत पांढरी फुले, उदकाने भरलेले कलश, पाण्यात राहणारे पक्षी, मांस आणि मत्स्य, ज्वालायुक्त अग्नि, वारांगना, ताजे शेण, सुवर्ण, चांदी, सर्व प्रकारची रत्ने इत्यादिकांचा समावेश केला आहे आणि त्यानंतर त्या विषयाचा समारोप करताना 'स्वतःच्या **मनाची शांति हे भावी यशाचे सर्वांत श्रेष्ठ चिन्ह आहे**' असे उदात्त विचार प्रदर्शित केले आहेत.

**पालीने** केलेल्या आवाजावरून, तिच्या हालचालीवरून आणि ती एखाद्या व्यक्तीच्या निरनिराळ्या अवयवांवर पडण्यावरून सूचित होणारी फले वसन्तराज शाकुन (अ. १७), अद्भुतसागर (पा. ६६६ ते ६६८), ज्योतिस्तत्त्व (पा. ७०६।७०७), शांतिकमलाकर (पृ. १९८), धर्मसिंधु (पा. ३४७।३४८) प्रभृति ग्रंथांमध्ये वर्णन केली आहेत आणि शुभफलांची वृद्धि आणि अनिष्ट परिणामांचे निवारण करण्याकरिता शांति करावयास सांगितल्या आहेत.

**नक्षत्रस्नान.** अश्विनीपासून रेवतीपर्यंतच्या निरनिराळ्या नक्षत्रांवर संकल्पपूर्वक स्नान केले असता आणि त्या त्या नक्षत्रांची आणि त्यांच्या देवतांची पूजा केली असता निरनिराळे लाभ होतात असे **योगयात्रा** (अ. ७ श्लो. १।१२) आणि हेमाद्रि (व्रतखंड भाग २ पा ८९४।८९७) यांत सांगितले आहे. आथर्वण परिशिष्ट १ (ह्याला नक्षत्रकल्प असे नाव आहे) मध्ये ह्या स्नानासबंधी सविस्तर माहिती दिली आहे. आथर्वण परिशिष्ट ५ आणि बृ. सं. (४७·१।८७) प्रभृति काही इतर ग्रंथांत **पुष्यस्नान** अथवा **पुष्याभिषेक** नावाच्या एका शांतीचा उल्लेख केला आहे. बहुतेक ग्रंथांत ही शांति फक्त राजानेच करावी असे सांगितले आहे. बृ. सं. मध्ये असे म्हटले आहे की ही शांति प्रत्येक पुष्य नक्षत्रावर करावी, तथापि ज्या पुष्य नक्षत्रावर पौर्णिमा असेल त्या दिवशी केलेली शांति सर्वांत श्रेष्ठ असते. बृ. सं. मध्ये ह्या विधीची फारच प्रशंसा केली असून तिचा सविस्तर कार्यक्रम वर्णन केला आहे आणि शेवटी म्हटले आहे की ज्या राजाला सम्राट पदाची लालसा असेल अथवा पुत्र प्राप्तीची तीव्र इच्छा असेल अशा राजाने अथवा ज्या राजाचा पहिल्यानेच राज्याभिषेक होत असेल त्याने हा पुष्यस्नानाचा विधि करावा. हा स्नानाचा विधि राजाच्या हत्तींच्या आणि घोड्यांच्या बाबतीत केल्यास ते रोगमुक्त होतात. (श्लो. ८७)

नक्षत्रस्नान हे सर्व लोकांकरितां सांगितले आहे असे दिसते. उदाहरणार्थ आथर्वणपरिशिष्ट १ (नक्षत्रकल्प) ह्यात सांगितले आहे की वैश्याने सर्व धान्यांची बीजे धारण करून **रोहिणीनक्षत्रावर** स्नान करावे, तसेच एखाद्या ब्राह्मणाने साळीचे आणि मोहरीचे दाणे आणि सहस्त्रवीर्या, अनंती, मदयंती आणि प्रियंगु ह्या वनस्पती धारण करून तीन वेळा पुष्यस्नान केले तर त्याला एखाद्या राजासारखी कीर्ति प्राप्त होते. ग्रहांचे अनिष्ट परिणाम दूर करण्याकरिता राजानें करावयाच्या लक्ष होमाच्या विधीमध्ये पुष्यस्नान हे एक अंग असते. (मत्स्य अ. २६७). पुष्य नक्षत्राची देवता बृहस्पती असते म्हणून विष्णुधर्मोत्तर (खं. २ अ. १०३·१।१०) मध्ये पुष्य स्नानाला **बार्हस्पत्यस्नान** असे नाव दिले आहे. पुष्य नक्षत्रावर करावयाचा एक **पुष्यव्रत** नावाचा विधि आप. ध. सू. मध्ये दिला आहे. आप. ध. सू. (२·८·२०·३।९) मध्ये ह्या व्रतात पालन करावयाचे काही निषेध सांगितले आहेत.

**स्पंदन अथवा स्फुरण.** फार प्राचीन काळापासून निरनिराळ्या अवयवांना आणि विशेषतः बाहू आणि नेत्र ह्यांना होणारे स्पंदन भारतामध्ये भावी शुभ अथवा अशुभ घटनांचे लक्षण मानण्यात आले आहे. अशा रीतीने सूचित होणाऱ्या फलांसंबंधी बृ- यो. यात्रा (प्रक. १३·१।१०), मत्स्य (२४१·१।१४) आणि वसंतराज (अ. ६-४·१।१४) ह्या ग्रंथांत वर्णन केले आहे. शरीराच्या टाळूपासून पायापर्यंतच्या निरनिराळ्या अवयवांच्या स्पंदनाची फळे निरनिराळी असतात. पुरुषांच्या [अङ्गदक्षिणभागे तु शस्तं प्रस्फुरणं भवेत् ।
अप्रशस्तं तथा वामे पृष्ठस्य हृदयस्य च ॥
......विपर्ययेण विहितः सर्वः स्त्रीणां फलागमः ।
मत्स्य (२४१·२ आणि १२)] शरीराच्या डाव्या बाजूला झालेले स्पंदन अशुभसूचक असते आणि उजव्या बाजूला झालेले स्पंदन शुभसूचक असते. डोळ्याच्या समीपचा भाग स्पंद पावला तर धनलाभ होतो. पायाच्या तळव्यावर स्पंदन झाल्यास प्रवास होऊन त्यात धनलाभ होईल. दंडावर स्पंदन झाल्यास मित्रांची भेट होईल. अशा प्रकारच्या स्पंदनांचा उल्लेख शाकुंतल (अं. १-११ आणि ७·१३ तसेच ५·११ नंतरचे वाक्य) ह्यांत केला आहे.

हत्तीच्या दातांची (सुळ्यांची) रचना सुळे कापले असता त्या भागावर दिसणाऱ्या खुणा, हत्तीची हालचाल इत्यादिवरून सूचित होणाऱ्या शुभ अशुभ गोष्टींचे सविस्तर वर्णन बृ. सं. (९३·१।१४), बृ. यो. या (२१·१।२१) ह्यांत केले आहे. बौधायन गुह्य शेषसूत्र (१·२०) मध्ये **हत्तीच्या रोगाचे** निवारण करण्याकरिता करावयाची एक **गजशांति** सांगितली आहे. अग्नि (२९१) मध्ये एक निराळ्या प्रकारची **गजशांति** सांगितली आहे. अशाच शांति विष्णुधर्मो.(२·५०·१।९३) आणि हेमाद्रि (व्रत भाग २ पा १०३५।५१) ह्या ग्रंथांतही सांगितल्या आहेत.

बृ. सं. (९२-१।१४) मध्ये **घोड्यांच्या हालचालीव**रून कोणत्या भावी शुभाशुभ घटना सूचित होतात ह्याबद्दल विवेचन केले आहे. परंतु त्या बाबतीत कोणत्याही प्रकारची शांति करावयास सांगितले नाही. अग्नि (२९०·१।८), विष्णु धर्मोत्तर (२·४७·१।४२), बौधा. गृ शेषसूत्र (१·१९), हेमाद्रि (व्रत भाग २ पा १०३१-३६) ह्यांत घोड्यांना येणारी सर्व संकटे निवारण करण्याकरिता आणि त्यांचे रोग बरे करण्याकरिता एक शांति करावयास सांगितले आहे.

**शकुनांशी** संबंध असणाऱ्याही काही शांति असतात. ऋग्वेदामध्ये **शकुन, शकुनि, शकुन्ति** ह्या शब्दांचा अर्थ 'पक्षी' असा आहे (ऋ. ४·२६-६, २·४२·१, २·४२·३ इ.). **कपोता**सारखा पक्षी देखील ऋग्वेदामध्ये भावी अनिष्ट घटना आणि संकटे सूचित करीत असल्याचे मानण्यात येत असे म्हणून क्रमाक्रमाने शकुन ह्या शब्दाचा अर्थ पक्षांच्या शब्दांवरून, त्यांच्या हालचालीवरून, त्यांच्या स्थानांवरून सूचित होणाऱ्या भावी घटनांची आगाऊ सूचना असा होऊ लागला आणि पुढे (पक्षांशी संबंध नसणाऱ्या देखील) कोणत्याही भावी घटनांची आगाऊ सूचना असा होऊ लागला. शकुन ह्या विषयावर फार विस्तृत संस्कृत वाङ्मय उपलब्ध आहे. उदाहरणार्थ, मत्स्य (२३७, २४१, २४३), अग्नि (अ. २३०।२३२), विष्णुधर्मो. (२·१६३।१६४), पद्म (४·१००·६५।१२६ इत्यादी. अशा ग्रंथात वसंतराज शाकुन हा सर्वांत अधिक व्यापक स्वरूपाचा ग्रंथ असून त्यात १५२५ श्लोक आहेत. त्यात असे म्हटले आहे की ज्या चिन्हांवरून शुभ अथवा अशुभ भावी घटनांची निश्चित माहिती मिळू शकते त्यांना 'शकुन' असे म्हणतात. मनुष्ये प्रवासास जात असोत अथवा घरी राहत असोत त्यांच्या पूर्वजन्मात केलेल्या कृत्यांची फले त्यांना निश्चितपणे मिळतील ही गोष्ट शकुन सूचित करीत असतात. तथापि, पूर्वजन्मातील कृत्यांची फले फक्त काही विशिष्ट काळी आणि विशिष्ट स्थानी मिळत असतात आणि सर्प, अग्नि, विष इत्यादि (अनर्थकारी) गोष्टींप्रमाणेच अशी पूर्वजन्मार्जित फळे टाळता येतात. दैव हे केवळ पूर्वजन्मात केलेले कर्म असल्यामुळे ते देखील मानवी

प्रयत्नावर अवलंबून असते. वसंतराज ग्रंथामधील अर्ध्याहून अधिक भाग (७८१ श्लोक) श्यामा, कावळा आणि पिंगळा ह्या तीन पक्ष्यांच्या ओरडण्यासंबंधी विवेचनाला दिला आहे, ३१२ श्लोक कुत्रा आणि भालू ह्यांच्या भुंकण्याचे आणि त्यांच्या हालचालीचे विवेचन करण्यात खर्ची घातले आहेत. त्या ग्रंथात म्हटले आहे की एखाद्या घरावर रात्रीच्या वेळी एखाद्या घुबडाने घुत्कार केला तर त्यावरून त्या घराच्या मालकाच्या पुत्राचा मृत्यू सूंचित होतो (८·४०). आधुनिक काळी देखील भारतात लोकांचा असाच समज आहे. भावी घटनांचे सूचक असे जे आवाज असतात त्यात कावळ्याच्या ओरडण्याला प्रमुख स्थान आहे. तसेच कुत्र्याचे भुंकणे हे सर्व शकुनांचे सार असल्याचेही त्या ग्रंथात म्हटले आहे.

काही विशिष्ट पशु आणि पक्षी भविष्य सूचित करण्याच्या बाबतीत काही विशिष्ट ऋतूमध्ये निरुपयोगी असतात असे बृ. यो. या. (२३·२२।२४) मध्ये म्हटले आहे. उदा. रोहितहरण, घोडा, बकरा, गाढव वगैरे पशु हिवाळ्यात निरुपयोगी असतात; डुकर, कुत्रा, लांडगा ह्यांच्यासारखे पशु भाद्रपद महिन्यात निरुपयोगी असतात; हत्ती आणि चातक पक्षी श्रावणामध्ये निरुपयोगी असतात; कमल (अथवा शंख), बैल आणि क्रौंचासारखे पक्षी शरद ऋतूमध्ये निरुपयोगी असतात इत्यादी. वसंतराजाने म्हटले आहे की शकुनाच्या बाबतीत पोदकी पक्षी, कुत्रा, कावळा, पिंगळा पक्षी आणि भालू (कोल्ही) हे पांच प्राणी सर्वात चांगले असतात.

वसंतराज (पा. ७८।८०), **मानसोल्लास** (पा. ११२।११३) ह्या ग्रंथांनी भविष्यकाळच्या घटनांची माहिती करून देणारे **उपश्रुती**' नावाचे एक चमत्कारिक साधन वर्णन केले आहे. सर्व लोक निजलेले असताना तीन विवाहित स्त्रियांनी आपल्याबरोबर एक कुमारिका घेऊन गणेशाची पूजा करावी आणि तांदूळ भरून एक माप बरोबर घेऊन एखाद्या धोब्याच्या घरी जावे आणि ते तांदूळ त्या घरापुढे टाकावे आणि घरातून स्वेच्छेने निघणारे आवाज एकाग्र चित्ताने ऐकावे आणि त्या शब्दांच्या अर्थाचा विचार करून त्यावरून आपल्या कार्यासंबंधी अनुमान काढावे. असे अनुमान खोटे ठरणार नाही. असाच प्रकार एखाद्या चांडालाच्या घराजवळही करावा.

उपश्रुतीसारखाच एक विशिष्ट प्रकार पद्म (पाताल खंड अ. १००·६५।१६६) मध्ये वर्णन केला आहे. पाच वर्षाहून अधिक आणि दहा वर्षाहून कमी वयाच्या एका कुमारिकेची अथवा ऋतुदर्शन न झालेल्या मुलीची गंधपुष्पादिकांनी पूजा करून तिला पुढील शब्द उच्चारावयास सांगावे. 'सत्य बोल, प्रिय बोल, हे भगवति सरस्वती तुला नमस्कार असो.' त्या मुलीजवळ दूर्वांची तीन जुळी द्यावी आणि ती जुळी एखाद्या (पुराणाच्या) ग्रंथात दोन पानांच्या मध्ये ठेवण्यास तिला सांगावे. त्या दोन पानांमध्ये असणारा श्लोक योजिलेल्या कार्याची सिद्धिदर्शक असेल. ख्रिस्ती लोकांत बायबलसारखा ग्रंथ उघडून अथवा त्या ग्रंथात टांचणी टोचून जे पान येईल तेथील मजकुरावरून अंगीकृत कार्याच्या यशापयशाचे भविष्य पाहतात. पद्मपुराणात म्हटले आहे की हा प्रकार **रोज रोज करू नये** तर क्वचित प्रसंगी करावा. शकुनाच्या बाबतीत स्कंदपुराण उत्तम असते. तसेच महाभारतातील आदिपर्वाचा अथवा सर्वही पर्वांचा शकुनांच्या कार्याकरिता उपयोग करण्यास प्रत्यवाय नाही (पद्म-पाताल श्लोक १६३।१६४).

अशाचसारखी संत तुलसीदासकृत रामाज्ञा (अथवा रामशकुनावलि) आणि रामशलाका ह्या दोन ग्रंथावरून पाहण्याची पद्धति असल्याचे ग्रीयरसनने वर्णन केले आहे (इंडि. अँटिक्वेरी खं. २२ पा.२०४).

चरकसंहितेसारख्या शास्त्रीय विषयावरील ग्रंथांमध्ये सुद्धा रोग्याची चिकित्सा करिताना शकुनांचा

विचार करावा असे सांगितले आहे आणि त्या संबंधी काही नियम सांगितले आहेत. उदाहरणार्थ, वैद्य अग्नीमध्ये आहुती देत असताना अथवा पितरांना तर्पण करीत असताना जर रोग्याकडील निरोप घेऊन एखादा मनुष्य वैद्यांकडे आला तर त्या रोग्याचा मृत्यु निकट आला असल्याचे सूचित होते. एखादा इसम वैद्याला रोग्याची परिस्थिति वर्णन करीत असताना जर एखादा अशुभसूचक शकुन पाहिला अथवा एखादे प्रेत पाहिले तर वैद्याने तो रोगी पाहण्याकरिता जाऊ नये. तथापि त्या ग्रंथात पुढे असेही म्हटले आहे की वैद्याने जरी एखादा अशुभसूचक शकुन पाहिला असला तरी तो त्याने प्रकट बोलून दाखवू नये कारण त्यामुळे रोग्याच्या अथवा दुसऱ्या एखाद्या मनुष्याच्या मनाला धक्का बसेल अथवा त्याला खेद होईल. (चरक सं. इंद्रियस्थान अ. १२).

ऋग्वेदामधील १·८९·१।१०, १·८९·६।१०, ७·३५·१।११ ह्यांच्यासारखी काही सूक्ते **शांतिसूक्ते** आहेत. त्यांच्यापैकी बहुतेक सूक्ते पूर्णपणे अथवा अंशतः अथर्ववेद, तै. सं. आणि इतर वेदसंहितांमध्ये आली आहेत.

'नमस्ते रुद्रमन्यव'ह्या शब्दांनी आरंभ होणाऱ्या तै. सं. (४·५) मधील ११ अनुवाकांना '**रुद्राध्याय**' अथवा '**रुद्र**' अशी संज्ञा आहे. ते अनुवाक ११ वेळा, १२१ वेळा, १३३१ वेळा, १४६४१ वेळा पठण करणे ह्या कृत्यांना अनुक्रमे एकादशिनी, लघुरुद्र, महारुद्र, आणि अतिरुद्र अशा संज्ञा आहेत. एकादशिनी आणि लघुरुद्र हे प्रकार आजकालही महाराष्ट्रात फार प्रचारात आहेत.

**'त्र्यंबकं यजामहे'**(ऋ. ७·५९·१२, तै. सं. १·८·६·२, वाज.सं. ३·६०) ह्या मंत्राला **मृत्युंजय** अशी संज्ञा आहे. अकाली मृत्यूच्या निवारणार्थ ह्या मंत्राचा जप करावयास सांगितले आहे. (बौ. गृ. शेषसूंत्र ३·११).

शांतीच्या बाबतीत आधुनिक काळी काय करावे हे प्रस्तुत ग्रंथकाराने सांगावयाची आवश्यकता नाही. काही थोड्या शांति सोडल्यास बाकीच्या **बहुतेक शांति हल्ली केल्या जात नाहीत**. ज्या थोडया शांति **हल्ली करण्यात येतात त्या देखील** आधुनिक काळाचा ओघ पाहिल्यास **भविष्यकाळात लौकरच** पूर्णपणे **प्रचारातून निघून जाण्याचा** संभव आहे.

# विभाग ४ : पुराणे आणि धर्मशास्त्र

## प्रकरण २२

### पुराणवाङ्मयाचा उगम आणि त्याची वाढ

(मू. ग्रं. पा. ५।८१५-८८६).

प्रस्तुत ग्रंथाच्या खंड १ मध्ये पुराणांसंबंधी त्रोटक माहिती दिली आहे. त्यात असे म्हटले आहे की प्रस्तुत काळी उपलब्ध असलेल्या पुराणांपैकी काही पुराणे इ. स. च्या ६ व्या शतकाच्या बऱ्याच पूर्वी झालेली आहेत. तसेच तेथे असेही सांगितले आहे की सध्या उपलब्ध असलेल्या पुराणांपैकी काहीना मुख्य अथवा महापुराणे म्हणत असत आणि त्यांची संख्या १८ असल्याचे समजले जात असे आणि त्यांपैकी मत्स्य, विष्णु, वायु आणि भविष्य ह्यांच्यासारख्या काही पुराणांत धर्मशास्त्रासंबंधी बरीच माहिती दिलेली आहे. काही पुराणांनी उपपुराण ही संज्ञा असलेल्या लहान ग्रंथांची माहिती दिली आहे.

प्रस्तुत प्रकरणामध्ये इ. स. च्या पहिल्या थोड्या शतकांच्या कालावधीमध्ये पुराणांचा समाजावर परिणाम होऊन भारतीय लोकांच्या कल्पनात, ध्येयात आणि आचारात कशी परिवर्तने होत गेली ह्यांचा थोडक्यात आढावा घेण्याचे योजिले आहे. तथापि त्या विवेचनाला आरंभ करण्यापूर्वी काही प्राथमिक स्वरूपांच्या बाबींचा विचार करणे आवश्यक आहे.

पुराणांच्या रचनेसंबंधीच्या ज्या कालाचा वर उल्लेख केला आहे त्या काळाच्याही पुष्कळ पूर्वी पुराणवाङ्मयाचा निर्देश केलेला आढळतो. उदाहरणार्थ, अथर्व वेदामध्ये (११·७·२४ आणि १५·६·१०।११) पुराणांचा एकवचनी उल्लेख केला आहे आणि ऋग्वेद, सामवेद प्रभृती ग्रंथांबरोबरच पुराण ग्रंथाचीही यज्ञावशिष्ट अन्नापासून उत्पत्ती झाली असल्याचे म्हटले आहे. शत. ब्रा. (१३·४·३·१२।१३) मध्ये पारिप्लवाच्या ९ व्या दिवशी कथन करावयाच्या ग्रंथांमध्ये पुराणांचा समावेश केला असून त्याला वेद असे म्हटले आहे. अशाच अर्थाचे उल्लेख शांख्या. श्रौत (१६·२·२७) आणि आश्वला. श्रौत (१०·७) यांत केले आहेत. तै. आरण्यक (२·१०) मध्ये इतिहास आणि पुराण ह्यांचा बहुवचनी उल्लेख केला आहे. ह्यावरून मागाहून झालेल्या वैदिक ग्रंथांच्या रचनाकाळी पुराण अशी संज्ञा असलेले काही (निदान तीन अथ्वा अधिक ग्रंथ अस्तित्वात होते, त्यांचे अध्ययन केले जात असे आणि अश्वमेधासारख्या श्रष्ठ यज्ञामध्ये गुंतलेले लोक त्यांचे पठन करीत असत अशी कल्पना केल्यास ते गैरवाजवी होणार नाही. 'इतिहास पुराण' असा सामांसिक शब्द शत. ब्रा. (११·५·६·८) मध्ये योजला आहे आणि उपनिषदांमध्ये इतिहासपुराणांना पाचवा वेद म्हटले आहे. ह्यावरून असा निष्कर्ष निघतो की इतिहास आणि पुराण हे दोन प्रकारचे ग्रंथ असून ते अनेक बाबतीत एकमेकांसारखे होते. आप. ध. सू. (१·६·१९·१३ व २·९·२३·३।६) मध्ये दोन ठिकाणी एक पुराणामधील दोन दोन श्लोक उद्धृत केले आहेत, एके ठिकाणी 'भविष्यत् पुराणामधील मतांचा अनुवाद केला आहे आणि एके ठिकाणी कोणत्या तरी एका पुराणामधील वाक्यांचा अथवा श्लोकांचा सारांश सांगितला आहे. ह्या-सर्वांवरून असे दिसून येते की आपस्तम्बाच्या समोर 'भविष्यत्' नावाचे एक पुराण होते आणि त्या ग्रंथामध्ये गृहस्थाश्रम, ब्रह्मचर्याश्रम इत्यादिकांसंबधी नियम सांगितलेले होते. 'पुराण' म्हणजे प्राचीन आणि 'भविष्यत्' म्हणजे पुढे होणारे असे अर्थ असल्यामुळे 'भविष्यत्पुराण' हा शब्दप्रयोग विसंगत दिसतो. तथापि असे असण्याचा संभव आहे की आपस्तम्बाच्या काळाच्या पुष्कळ पूर्वीपासन 'पुराण' ह्या शब्दाचा अर्थ 'प्राचीन कथा इत्यादिकांचे वर्णन करणारा ग्रंथ' असा होऊ लागला असावा आणि अशा

प्रकारचे अनेक ग्रंथ रचले गेले असून त्यांत प्रचलित गोष्टींचाही समावेश होऊ लागला असावा आणि अशा प्रचलित गोष्टींचे वर्णन भविष्यवाणीच्या स्वरूपात केले जात असावे आणि अशा रीतीने 'भविष्यत्पुराण ह्या नांवाची उत्पत्ती झाली असावी. आपस्तम्बाने जसा भविष्यत्पुराणाचा उल्लेख केला आहे तसा 'पुराण' ह्या नावाचाही उल्लेख केला आहे. ह्यावरून असे अनुमान निघते की आपस्तम्बाच्या काली (ख्रि. पू. ५०० च्या पूर्वी) अनेक पुराणे अस्तित्वात होती आणि त्यांच्या पैकी एकाला 'भविष्यत्पुराण' असे नाव होते आणि त्या काळी ज्ञात असलेल्या पुराणात सृष्टीची उत्पत्ती (सर्ग), प्रलयानंतरची पुनरुत्पत्ती (प्रतिसर्ग) आणि स्मृति ग्रंथात असणारे विषय ह्यांचा समावेश होत असे. ह्या अनुमानाला दुसऱ्याही काही गोष्टींवरून पुष्टी मिळते. उदाहरणार्थ, गौतम ध. सू. (११·१९) मध्ये बहुश्रुत ब्राह्मणाचे लक्षण सांगताना त्याला वेदादि ग्रंथांप्रमाणे इतिहास आणि पुराण ह्यांचे ज्ञान असणे हे एक लक्षण सांगितले आहे. तसेच राजाने राज्याचा कारभार करिताना आणि न्याय करिताना वेदादी ग्रंथांप्रमाणेच पुराणांच्या आधाराने चालावे असे सांगितले आहे. कौटिल्याने (अर्थशास्त्र) ३ ध्मये म्हटले आहे की इतिहासवेददेखील वेदच असतात. ह्यावरून कौटिल्याच्याकाळी देखील इतिहास हा तीन वेदांसारखा एक विवक्षित ग्रंथ मानला जात होता असे दिसून येते. अर्थशास्त्रामध्ये (१०५ पा १०) 'इतिहास' ह्या शब्दाची व्याख्या करिताना त्यात पुराण, इतिवृत्त, आख्यायिका, उदाहरण, धर्मशास्त्र आणि अर्थशास्त्र ह्यांचा समावेश केला आहे. ह्यावरून असे दिसते की कौटिल्याच्या मनात इतिहास ह्या शब्दाने सध्या उपलब्ध असलेल्या महाभारत ग्रंथासारखा जवळ जवळ असलेला महाभारत हा ग्रंथच असावा. तुलनेने प्राचीन काळात झालेल्या दक्षस्मृतीमध्ये (२·६९) असा नियम दिला आहे की सर्व द्विजातीय गृहस्थांनी इतिहास आणि पुराण ह्यांचे प्रतिदिनी दिवसाच्या सहाव्या आणि सातव्या विभागांत वाचन करावे. श्राद्धविधीमध्ये ब्राह्मणांनी पठन करावयाच्या ग्रंथात वेदांबरोबरच मनूने (३·२३२) इतिहास आणि पुराण ह्यांचा समावेश केला आहे. याज्ञ. स्मृतीमध्ये (१·३) विद्यांच्या आणि धर्माच्या आधारस्थानांमध्ये वेद आणि वेदांगे ह्यांच्याबरोबरच पुराणांचा समावेश केला आहे. याज्ञ. स्मृ. मध्येच दुसऱ्या एका ठिकाणी (१·१०१) केलेल्या उल्लेखावरून असे दिसते की इतिहास आणि पुराण ह्यांची जोडी असे आणि हे दोन्ही ग्रंथ वैदिक ग्रंथांहून भिन्न होते. आणि त्या दोन्ही ग्रंथांना त्या स्मृतीच्या काळी (इ. स. ३ ऱ्या शतकापूर्वी) धर्माच्या बाबतीत पावित्र्याची आणि अधिकृतपणाची योग्यता प्राप्त झाली होती. पाणिनीच्या (४·२·५९।६०) ह्या सूत्रावरील महाभाष्यात उल्लेख केलेल्या वार्तिकात असा नियम सांगितला आहे की इतिहास आणि पुराण ह्या शब्दांच्या बाबतीत त्या ग्रंथांचे अध्ययन करणारा अथवा त्यांचे ज्ञान संपादन करणारा अशा अर्थाने ठक् (इक्) असा प्रत्यय लावून ऐतिहासिक, पौराणिक असे शब्द बनतात. महाभारतात निरनिराळ्या पर्वात कोठे एकवचनी, कोठे बहुवचनी पुराणांचे उल्लेख आले असून स्वर्गारोहण

[महत्वाद्भारवत्त्वाच्च महाभारतमुच्यते।
..... अष्टादश पुराणानि धर्मशास्त्राणि सर्वशः।
वेदाः साङ्गास्तथैकत्र भारतं चैकतः स्थितम्॥
स्वर्गारोहणपर्व (५·४५।४६).] (५·४६।४७) यात पुराणे १८ असल्याचे सांगितले आहे. काही ठिकाणी (वन १८७·५७; १०१-१५·१६) मत्स्यपुराण आणि वायूने सांगितलेले पुराण ह्यांचे उल्लेख केले आहेत. इतके सर्व उल्लेख प्रक्षिप्त आहेत असे मानणे शक्य नाही. फार तर काही थोडे उल्लेख प्रक्षिप्त असण्याचा संभव असेल. पुराणातील कथा महाभारतात समाविष्ट करण्यापूर्वी उपलब्ध पुराणांपैकी एकही पुराण अस्तित्वात नव्हते असे म्हणण्याला क्वचितच पुरावा आढळेल.

बाण (इ. स. च्या ७ व्या शतकाचा पूर्वार्ध) ह्याच्यासारखे जुन्या काळचे संस्कृत ग्रंथकार आणि शबरस्वामी (इ. स. २००।४०० च्या पूर्वी), कुमारिल (इ. स. चे ७ वे शतक), श्रीशंकराचार्य (इ. स. ६५०।८०० ह्यांच्या दरम्यान) आणि विश्वरूप (इ. स. ८००-८५०) ह्यांच्यासारखे टीकाकार ह्यांच्या ग्रंथांवरून त्यांच्या काळी पुराणे अस्तित्वात होती आणि त्यांतील विषय सध्या उपलब्ध असलेल्या पुराणांच्या सारखे

होते ह्या गोष्टी निर्विवाद सिद्ध होतात. युग पुराण ह्या नावाचा एक दुर्मिळ ग्रंथ असून तो गार्गीसंहितेचा एक भाग आहे आणि तो सांप्रत उपलब्ध असलेल्या 'पुराण' संज्ञा असलेल्या ग्रंथांपैकी सर्वात प्राचीनांमधील एक आहे. त्या ग्रंथामध्ये महत्त्वाची ऐतिहासिक माहिती दिली आहे. त्या ग्रंथातील (प्रो. मनकड आवृत्ती) ११।२८, २९।४५ आणि ४६।७४ हा ओळीत अनुक्रमाने कृत, त्रेता आणि द्वापार युगांची लक्षणे वर्णन केली असून (प्रो. जयस्वाल आवृत्ती) १।११५ ह्या ओळीत कलियुगाची लक्षणे तसेच त्या ग्रंथाच्या रचनाकाळाच्या पूर्वीच्या काही थोडया शतकातील राजकीय, सामाजिक आणि सांपत्तिक इतिहास ह्यांचे वर्णन केले आहे. युगपुराणात वर्णन केलेली कलियुगाची विशिष्ट लक्षणे वनपर्व (१८८·३०।६४) मध्ये दिलेल्या वर्णनाशी अतिशय जुळती आहेत आणि एक श्लोकार्ध तर दोन्ही ग्रंथात एकच आहे. त्या ग्रंथामध्ये शकांपर्यंतचीच माहिती दिली असून आंध्र, आभीर आणि गुप्त ह्या राजवंशांचे वर्णन केलेले नाही. ह्यावरून त्या पुराणाचा रचनाकाल सांप्रत ज्ञात असलेल्या सर्व पुराणांच्या पूर्वीचा असला पाहिजे.

**मत्स्य** (५३·३।११), वायु (१·६०।६१) ह्यांच्यासारख्या पुराणांतील अनेक श्लोकांत असे म्हटले आहे की आरंभी फक्त एकच पुराण होते आणि त्या पुराणात शंभर कोटि श्लोक होते, त्यांचा सारांश द्वापरयुगात व्यासाने ४ लक्ष श्लोकात सांगितली. हे सर्व वर्णन काल्पनिक असण्याचा संभव आहे. सांप्रत अस्तित्वात असलेली पुराणे त्यांच्यापूर्वी अस्तित्वात असलेल्या पुराणांपासूनच तयार केलेली असावीत परंतु पूर्वीच्या पुराणांविषयी आपणास आता फारच थोडी माहिती उपलब्ध आहे ही गोष्ट मान्य करणे भाग आहे.

पुराणांची संख्या १८ असल्याची परंपरा अस्तित्वात असून त्या पुराणांची नावेही अनेक पुराणात दिली आहेत. त्या १८ नावांच्या बाबतीत थोडासा मतभेद असून पुराणांच्या विस्ताराच्या (श्लोकसंख्येच्या) बाबतीतही बराच मतभेद अस्तित्वात आहे. काही ग्रंथांत वायूच्या ऐवजी शिवपुराण घातले आहे. काही विद्वानांच्या मते वायुपुराण हेच १८ पुराणात समाविष्ट करण्याच्या योग्यतेचे असून शिवपुराण तसे नाही. प्रस्तुत ग्रंथकारालाही ते मत ग्राह्य वाटते. निरनिराळ्या पुराणांत आलेल्या १८ पुराणांसंबंधीच्या उल्लेखांवरून ही गोष्ट उघड होते की १८ प्रमुख पुराणांची यादी इ. स. १००० च्या बऱ्याच पूर्वी तयार झाली होती आणि ती त्या कालाच्या पुष्कळ वर्षे आधी विष्णुपुराणात समाविष्ट करण्यात आली होती. अल्बेरुणीने १८ प्रमुख पुराणांची नावे दिली असून त्याला ती नावे विष्णुपुराणावरून वाचून दाखविली असल्याचे त्याने लिहिले आहे. (साचौकृत भाषांतर खं. १ पा. १३१) अल्बेरुणीनें दिलेल्या त्या यादीत प्रमुख पुराणांबरोबरच काही **उपपुराणां**चाही समावेश केला आहे. ह्यावरून असा निष्कर्ष निघतो की आदि, नरसिंह, आदित्य ह्यांच्यासारखी काही उपपुराणे इ. स. १००० च्या पूर्वी निदान काही थोड्या वर्षांच्या कालात रचिली गेली होती.

१८ महापुराणांची नावे आणि त्या प्रत्येकातील श्लोकसंख्या ह्यासंबंधी निरनिराळ्या पुराणांत दिलेली माहिती एकसारखी नाही. तथापि बहुतेक पुराणांनी दिलेल्या श्लोकसंख्यानुसार १८ पुराणांतील मिळून एकूण श्लोकसंख्या ४,००,८६०० भरते. ही संख्या वर उल्लेख केलेल्या ४ लक्ष ह्या संख्येशी बरीच जुळती आहें.

वायुपुराणाचा अपवाद सोडल्यास १८ मुख्य पुराणांच्या नावांच्या बाबतीत सर्व पुराणांचे बहुतेक एकमत आहे. ती १८ पुराणांची नावे आणि त्या प्रत्येकातील मत्स्य प्रभृति काही पुराणांनी दिलेली श्लोकसंख्या पुढीलप्रमाणे आहे :

१. ब्रह्म (१० हजार,) २. पद्म (५५ हजार), ३. विष्णु (२३ ह.), ४. वायु (२४ ह.), ५. भागवत (१८ ह.), ६. नारदीय (२५ ह.), ७. मार्कंडेय (९ ह.), ८. अग्नि (१६ ह.), ९ भविष्य (१४,५००), १०. ब्रह्मवैवर्त (१८ ह.), ११. लिंग (११ ह.), १२. वराह (२४ ह.), १३. स्कंद (८१,१००), १४. वामन (१० ह.), १५ कूर्म (१८ ह.), १६ मत्स्य (१४ ह.) १७. गरुड (१८ ह.), आणि १८ ब्रह्मांड (१२,२००).

पुराणांच्या बाबतीत आणखी घोटाळे उत्पन्न होण्याचे कारण काही काही पुराणात अनेक **उपपुराणांची** नावे दिली आहेत आणि काही पुराणांनी अशी नावे गाळली आहेत. मत्स्य पुराणात (५३,५९।६२) फक्त ४ च उपपुराणांची नावे दिली आहेत. ह्यावरून मत्स्य पुराणातील तो भाग रचला जाण्याच्या वेळी चारापेक्षा अधिक उपपुराणे अस्तित्वात नसावी अथवा त्यांना उपपुराणे म्हणून मान्यता मिळाली नसावी. बरीचशी उपपुराणे अलिकडील काळात झालेली आहेत. बाकींच्या पैकी नरसिंह, विष्णुधर्मोत्तर, देवी ह्यांच्यासारखी काही थोडी इ. स. च्या ७ व्या अथवा ८ व्या शतका इतकी जुनी असणे शक्य आहे. ज्या काळी १८ महापुराणांना सांप्रतचे स्वरूप प्राप्त झाले त्याकाळीं देखील उपपुराणांची संख्या लहान होती. अशा पुराणांना महापुराणांचे संक्षेप ह्यापेक्षा अधिक योग्यता दिली जात नसे. स्कंद, वामन, ब्रह्मांड, नारदीय ह्याच्यासारख्या काही उपपुराणांना महापुराणांचीच नावे दिली आहेत. सर्व पुराणे मिळून होणाऱ्या ४ लक्षांच्या श्लोकसंख्येत उपपुराणांतील श्लोकसंख्यांचा अंतर्भाव होत नाही. शाक्त, सौर, पंचरात्र ह्यांच्यासारख्या निरनिराळ्या पंथांच्या अनुयायांनी आपआपल्या पंथांच्या कल्पनांचा प्रसार करण्याकरिता अधिकृत समजल्या जाणाऱ्या पुराणात अध्याय घुसडून दिले आणि काहीनी तर नवे आणि स्वतंत्र ग्रंथ लिहून त्यांना पुराण अशी संज्ञा दिली असावी.

धर्मशास्त्रांवरील आरंभीच्या काळांतील टीकाकारांनी आणि निबंधग्रंथकारांनी सुप्रसिद्ध असलेल्या उपपुराणांचा फारच थोड्या वेळा उल्लेख केला आहे.

१८ पुराणांचा निर्देश १०-१२ महापुराणात केला असून त्यांच्यापैकी कांहींमध्ये महापुराणातील विषयांचे वर्णन केले आहे. ह्या गोष्टीवरून स्वाभाविकपणे असे अनुमान निघते की सर्वही १८ पुराणांना पूर्णता प्राप्त झाल्यानंतर हे उल्लेख त्या पुराणात घुसडून दिले असावेत. सर्वही महापुराणे एकाच वेळी एकाच ग्रंथकाराने अथवा समकालीन अनेक ग्रंथकारांनी लिहिली असे गृहीत धरणे शक्य नाही. शिवाय पुराणांच्या संहितांच्या बाबतीत संशोधन होणे अवश्य आहे. सांप्रतकाळच्या पुराणांच्या छापील प्रतींच्या आधारावर अथवा पुराणांच्या काही हस्तलिखितांच्या आधारावर काढलेली बरीच अनुमाने चुकीची ठरण्याचा संभव असतो. एखाद्या श्लोकाचा अथवा एखाद्या भागाचा उपयोग ऐतिहासिक स्वरूपाचे अथवा तुलनात्मक निष्कर्ष काढण्याकरिता करावयाचा असेल तर त्या श्लोकांचे अथवा भागाचे संशोधन करण्याचा काळजीपूर्वक प्रयत्न केला पाहिजे. पुराणात आणि उपपुराणात आलेल्या अनेक आख्यायिका आणि आचार ह्यांच्या वर्णनांवरून भारतातील प्राचीन आणि मध्ययुगीन काळातील समाजाची स्थिति कशी होती, त्यांच्या समजुती कशा होत्या ह्या-संबंधी निर्णय करण्यापूर्वी फार काळजी घेणे अवश्यं असते; कारण त्या वर्णनात विशिष्ट उपासनामार्गांना आणि विशिष्ट पंथाच्या तत्वांना आधार देण्याकरिता फेरबदल केलेले असतात आणि ती वर्णने फुगवलेली असतात. त्यामुळे ती वर्णने त्या काळच्या समाजाची वास्तविक स्थितिदर्शक आणि विश्वासार्ह असल्याचे मानणे त्या ग्रंथांच्या संशोधनाच्या अभावी धोक्याचे असते. प्रस्तुत ग्रंथकाराचे मत असे आहे की विष्णुधर्मोत्तराखेरीज दुसरे कोणतेही उपपुराण इ. स. च्या ८ व्या अथवा ९ व्या शतकापूर्वी झालेले आहे असे सिद्ध करणारा काहीही पुरावा उपलब्ध नाही. पुराणांच्या बाबतीत देखील १८ पुराणांची संख्या आणि त्यातील विषय ह्यांच्यासारखे बरेच मोठे भाग त्यात मागाहून घुसडून दिलेले आहेत. परंतु

त्यात (म्हणजे पुराणात) प्राचीन भाग बराच आहे आणि ८ व्या आणि ९ व्या शतकातील इतकेच नव्हे तर त्यांच्याही पूर्वीच्या ग्रंथकारांनी त्यांच्यामधील अवतरणे उद्धृत केली असल्याकारणाने बहुतेक उपपुराणांपेक्षा ती पुराणे कितीतरी अधिक विश्वासार्ह आहेत.

अमरकोशामध्ये (शब्दादि वर्ग ४।५) 'इतिहास' ह्या शब्दाची व्याख्या 'भूतकाळी होऊन गेलेले' अशी दिली आहे आणि 'पुराण' ह्या शब्दाची व्याख्या ज्यामध्य 'पाच लक्षणे अथवा विशिष्ट धर्म आहेत असा ग्रंथ' अशी दिली आहे. ही पाच लक्षणे म्हणजे **सर्ग** (उत्पत्ती), **प्रतिसर्ग** (पुनरुत्पत्ती), **वंश** (देवादिकांचे वंश), **मन्वंतर** (त्या नावाचे विस्तीर्ण कालखंड),**वंशानुचरित** (इतर वंशातील लोकांची कृत्ये आणि इतिहास) ही होत. (वायु. ४·१०।११) [सर्गञ्च प्रतिसर्गश्च वंशो मन्वन्तराणि च।
वंश्यानुचरितं चैव पुराणं पञ्चलक्षणम॥
वायु (४·१०।११), वराह (२·४) ,कूर्म (१ १ १२).] पुराणांची दुसरीही काही लक्षणे काही ग्रंथांत सांगितली, आहेत. उदाहरणार्थ, भागवतपुराणात (१२·७·८।१०) म्हटले आहे की पुराणामध्ये सर्ग, विसर्ग, वृत्ति, रक्षा, अवतार, वंश, वंश्यानुचारी, संस्था, हेतु, अपाश्रय असे दहा विषय असतात. मत्स्य पुराणात सांगितले आहे की सर्व पुराणांत मनुष्यांचे **चार पुरुषार्थ**, धर्माविरुद्ध आचारामुळे उत्पन्न होणारे **परिणाम**, सात्विक, राजस आणि तामस असे पुराणांचे वर्ग, उत्पत्ती आणि प्रलय, वंश, मन्वंतर, वंशानुचारी, विश्वविस्तार, दान, श्राद्ध, वर्ण आणि आश्रम, इष्ट आणि पूर्त, देवतांच्या प्रतिमांची स्थापना आणि इतर सर्व विषयांसंबंधी नियम हे विषय असतात. (मत्स्य २·२२।२४).

सर्व पुराणांपेक्षा उपलब्ध विष्णुपुराण हे एकच काय ते **पंचलक्षण** ह्या व्याख्येला जवळजवळ पात्र ठरते. तथापि, त्या पुराणात देखील अनेक इतर विषयांचा समावेश केला आहे. उपलब्ध १८ पुराणात व्रत, श्राद्ध, तीर्थ, दान ह्या चार विषयांवर कमीत कमी एक लक्ष श्लोक असावेत असा अंदाज आहे. अनेक पुरांणात निरनिराळ्या विषयांवर एकमेकांसारखे अध्याय आहेत. उदाहरणार्थ, मत्स्य आणि पद्य, वायु आणि ब्रह्मांड ह्या जोड्यांत पुष्कळ बाबतीत आणि तपशीलात एकमेकांसारखे असलेले मोठमोठे भाग आहेत. असा संभव वाटतो की सांप्रतची पुराणे याज्ञ. स्मृ. च्या पूर्वी अस्तित्वात असलेल्या प्राचीन पुराणांशी अंशतः साम्य असणारी असून त्यांत क्रमाक्रमाने बरीच भर पडत गेलेली आहे. अशा प्राचीन पुराणांची संख्या १८ च असेल असे नाही. पुराणांची संख्या १८ असण्याचे कारण बहुधा ती संख्या महाभारतामध्ये निरनिराळया बाबतीत महत्वाची आहे. उदाहरणार्थ, भारतीय युद्ध १८ दिवस लढण्यात आले, युद्धात भाग घेणारी सेना १८ अक्षौहिणी होती, महाभारताची पर्वे १८ आहेत, गीतेचेही अध्याय १८ आहेत इत्यादी.

पुराणांचे **वर्गीकरण** निरनिराळ्या प्रकारांनी करिता येईल : (१) अग्नि, गरुड, आणि नारदीय ह्यांच्यासारखी **विश्वकोशाच्या** स्वरूपाची पुराणे, (२) पद्म, स्कंद ह्यांच्यासारखी मुख्यत्वे **तीर्थांचे वर्णन** करणारी पुराणे, (३) लिंग, वामन ह्यांच्यासारखी **विशिष्ट पंथांची** पुराणे, (४) वायु, भविष्य ह्यांच्यासारखी **ऐतिहासिक** स्वरूपाची पुराणे.

सांप्रत उपलब्ध असलेल्या पुराणांत वायु, ब्रह्मांड, मस्त्य आणि विष्णु ही बहुधा सर्वात प्राचीन काळची असावीत, परंतु त्यांतही वेळोवेळी बरेच भाग मागाहून घालण्यात आले आहेत.

वायु, विष्णु, ब्रह्मांड, भागवत, गरुड, भविष्य, मत्स्य ह्या सात पुराणात भारतीय युद्धापर्यंतची आणि त्या युद्धापासून आंध्रांचा पराभव आणि. गुप्तवंशाची स्थापना येथपर्यंतची प्राचीन राजवंशांच्या

वंशावळ्यांसारखी ऐतिहासिक माहिती दिली आहे. तथापि त्यातही गुप्तवंशाच्या राजांची नावे एकानेही दिली नाहीत. गुप्तवंशाच्या राजांच्या कारकीर्दीना इ. स. ३२० च्या सुमारास प्रारंभ झाला असे बहुतेक विद्वानांचे मत आहे. ह्यावरून असा निष्कर्ष निघतो की त्या पुराणांत झालेली सुधारणा गुप्त घराण्याच्या पूर्वी झालेली असावी.

पुराणांशी संबंध असलेले इंग्रजी भाषेतील आणि इतर भारतीय भाषांतील बरेच वाङ्मय अस्तित्वात आहे आणि त्यावरून पुराणासंबंधी असलेल्या वादांची माहिती मिळू शकते. अशा वाङ्मयात प्रदर्शित केलेल्या मतांपैकी काही थोड्या मतांसंबंधी थोडक्यात विवेचन प्रस्तुत ग्रंथात करणे शक्य आहे.

पुराणांच्या संबंधी यूजिन, बर्नाफ, एच. एच. विल्सन, पर्गिटर, किर्फेल, याकोबी, जयस्वाल, डॉ. अ. स. आळतेकर, प्रो. हाजरा, प्रो. रामचंद्र दीक्षितार, रूबेन, डॉ. डी. आर. पाटील, इत्यादि ग्रंथकारांचे अनेक ग्रंथ, भाषांतरे आणि लेख अस्तित्वात आहेत.

डॉ. अळतेकर ह्यांनी बनारस हिंदु विश्वविद्यालयाच्या नियतकालिकात (खंड ४ पा. १८३।२२३) छापलेल्या लेखात असे प्रतिपादन केले आहे की पुराणांत भारतीय युद्धापूर्वीच्या ज्या अनेक राजवंशाचे उल्लेख केले आहेत ते राजवंश मौर्य आणि आंध्र राजवंशांइतकेच ऐतिहासिक आणि सत्य आहेत आणि वैदिक वाङ्मयात देखील ज्या राजांची वर्णने आली आहेत त्या राजांचाच उल्लेख पुराणांत दिलेल्या वंशावळ्यांमध्ये केलेला असतो.

पर्गिटर प्रभृति अनेक पाश्चिमात्य आणि पौर्वात्य ग्रंथकारांनी आणि लेखकांनी पुराणांत दिलेल्या राजांच्या वंशावळ्यांच्या आधारावर भारतीय युद्धाचा काल ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. ह्या विषयाचे विवेचन मागे खंड ३ मध्ये केले असल्यामुळे त्याबद्दल फारसे काही सांगण्यासारखे नाही. काही लेखकांनी पुराणातील राजांचे उल्लेख विश्वा**साई** नाहीत असे प्रतिपादन केले आहे. ते त्यांचे मत वादाकरिता जरी मान्य केले तरीदेखील त्या उल्लेखांवरून इतके तरी ठरते की ख्रि. पू. ३०० च्या पूर्वी सहस्त्रावधि वर्षे राज्य केलेल्या राजांच्या वंशावळ्या आपल्याजवळ आहेत असे पुराणांच्या रचनाकाळचे भारतीय लोक म्हणत असत.

किर्फेल ह्या ग्रंथकाराने 'पुराणं **पत्र्च**लक्षणम्' ह्या विषयावर एक महत्त्वाचा ग्रंथ जर्मन भाषेत लिहिला आहे. किर्फेलने काढलेले प्रमुख निष्कर्ष असे आहेत : अग्नि आणि गरुड पुराणांच्या संक्षिप्त आवृत्त्या तसेच विष्णुपुराणातील गद्यभाग वगळल्यास पुराणसंहितांचे **तीन संपूर्ण गट** पडतात. ब्रह्म आणि हरिवंश हा **एक गट**, **ब्रह्मां**ड आणि वायु ह्यांचा **दुसरा गट** आणि मत्स्यपुराण हा **तिसरा गट**. ह्यांच्या व्यतिरिक्त इतर सर्व पुराणांत फक्त ह्या तीन गटातील पुराणांतील लहान अथवा मोठे भाग समाविष्ट केले आहेत. ह्या तीन गटांपैकी ब्रह्मांड आणि वायु ह्या दोन पुराणांचा प्रारंभी एकाच पुराणात समावेश झालेला असला पाहिजे. कारण, त्यातील सर्वात मोठे भाग एकमेकांशी जुळते आहेत. वायु आणि ब्रह्मांड ह्या पुराणांत मागाहून समाविष्ट केलेले भाग एका स्वतंत्र अशा संहितेमधून घेतलेले आहेत. विष्णु पुराणाला जरी पंचलक्षण ही व्याख्या तंतोतंत लागू पडत असली तरी ते पुराण वायु अथवा ब्रह्मांड ह्यांच्या मागून झालेले आहे. पुराणांचे १८ भाग आणि त्यांचे **सात्विक**, राजस आणि तामस असे वर्ग ह्या गोष्टी मूळच्या नसून त्या पुराणांच्या निश्चित स्वरूपाच्या अंतिम सहितांनाचं लागू पडतात. प्रस्तुत ग्रंथकाराला किर्फेलचे बहुतेक सर्व निष्कर्ष मान्य करण्याला हरकत वाटत नाही. तथापि, सर्वांत प्राचीन असलेल्या पुराणग्रंथांत सर्ग, विसर्ग, इत्यादी पाच विषयांचे विवेचन हे अवश्य लक्षण असते हे किर्फेलचे मत प्रस्तुत ग्रंथकाराला मान्य नाही.

पर्गिटर प्रभृति पाश्चात्य ग्रंथकारांप्रमाणेच प्रा. आर. सी. हाजरा, प्रा. रामचंद्र दीक्षितार् ह्यांच्यासारख्या भारतीय विद्वानांनी देखील पुराणांच्या विषयावर बरेच परिश्रम केले आहेत. **प्रा. हाजरा** ह्यांचा पुराणांच्या आणि **उपपुराणांच्या** विषयाचे विवेचन केलेला ग्रंथ अगदी अलिकडचा आणि सर्वात अधिक विस्तृत असा आहे आणि उपपुराणांच्या बाबतीत त्यांनी अत्यंत परिश्रम केले आहेत. विशेषतः उपपुराणांच्या रचनाकाळासंबंधीची त्यांची मते त्या विषयावरील अंतिम निर्णयासारखी मानली जाण्याचा संभव आहे आणि त्यांनी केलेले निराधार तर्कदेखील चांगल्या रीतीने सिद्ध झालेले सिद्धान्त असल्याचे समजले जाण्याचा संभव आहे. प्रा. हाजरा ह्यांचा उद्योग, चिकाटी आणि उत्साह कौतुकास्पद आहेत. तथापि, सध्या उपलब्ध असलेल्या पुराव्याच्या आधारावर उपलब्ध पुराणांचे आणि उपपुराणांचे जे रचनाकाल ठरविणे शक्य आहे त्यांच्यापेक्षा ते रचनाकाळ अधिक प्राचीन आहेत असे मानण्याकडे त्यांची प्रवृती असल्याचे पाहून खेद वाटतो. पुराणांच्या अभ्यासात ते इतके तल्लीन झाले तल्लीन झाले आहेत की ज्या ठिकाणी पुराणांचा काहीही संबंध नाही अशा ठिकाणी देखील त्यांना पुराणांचा संबंध असावा असे वाटते. तसेच साध्या शब्दात देखील त्यांना फार मोठा आशय आहे असे वाटते आणि त्यावरून काढलेल्या अनुमानांच्या बाबतीत ते असावे तितके सावध असत नाहीत. प्रा. हाजरा ह्यांनी ठरविलेले उपपुराणांचे रचनाकाळ आणि ते ठरविण्यासाठी योजिलेल्या पद्धती आणि विचारसरणी ह्याही प्रस्तुत ग्रंथकाराला सर्वस्वी अमान्य आहेत. प्रस्तुत ग्रंथकाराला प्रा. हाजरा ह्यांच्याबद्दल आदर वाटत असून सुद्धा हे कटु कर्तव्य करणे त्याला भाग पडले आहे. प्रस्तुत सारांशात्मक ग्रंथात ह्यापेक्षा अधिक विवेचन करणे शक्य होणार नाही.

प्रा. रामचंद्र दीक्षितार ह्यांच्या लेखातही प्रा. हाजरा ह्यांच्या लेखात दिसून येणारे दोष काही प्रमाणात आढळतात. उदाहरणार्थ, इंडियन हिस्टरी कॉंग्रेसच्या १३ व्या अधिवेशनाच्या इतिवृत्तात (पा. ४६।६० वर) प्रसिद्ध केलेल्या त्यांच्या विष्णु पुराणासंबंधीच्या लेखात त्यांनी 'मुख्यत्वे' **उपलब्ध** विष्णुपुराणासंबंधी विवेचन केले आहे आणि त्यात व्रते, उपवास आणि तीर्थे हे विषय नाहीत ह्यावरून त्यांनी असा निश्चित निष्कर्ष काढला आहे की उपलब्ध विष्णु पुराण ख्रि. पू. ६ व्या अथवा ७ व्या शतकात रचिले गेले. हा काळ आधुनिक काळचा अथवा कोणीही चिकित्सक विद्वान क्वचितच मान्य करील. काही विशिष्ट विषयांचा समावेश त्या पुराणात केला नाही ह्याच्या आधारावर त्या पुराणाच्या संभवनीय रचनाकाळाविषयी निष्कर्ष काढण्याऐवजी त्या पुराणात कोणते विषय आले आहेत ह्याचा विचार त्यांनी केला असता तर बरे झाले असते.

पुराणांसंबंधी बंगालचा राजा **बल्लालसेन** ह्याने आपल्या 'दानसागर' ह्या ग्रंथाच्या प्रस्तावनेमध्ये काही विधाने केली आहेत. बल्लाल सेनाच्या उद्‌गारात जशी धैर्यपूर्वक चिकित्सक बुद्धि दिसून येते तशी चिकित्सक बुद्धि आपल्या देशातील मध्ययुगीन काळात होऊन गेलेल्या फारच थोडया संस्कृत लेखकात दिसून येते. त्याने म्हटले आहे की भागवत, ब्रह्मांड आणि नारदीय ह्या पुराणांत दानाविषयी विवेचन केलेले नसल्यामुळे त्याने त्या पुराणांचा उपयोग केला नाही. तसेच लिंग पुराण जरी विस्तृत असले तरी त्यातील विवेचन तत्त्वतः मत्स्य पुराणातील विवेचनासारखे आहे असे त्याने म्हटले आहे. भविष्य पुराणातील काही विधानांचा त्याने स्वीकार केसा असला तरी दुसऱ्या काही विधानांत बौद्ध प्रभृति पाषंड संप्रदायांतील तत्त्वांचे प्राबल्य असल्याचा दोष त्याने दाखविला आहे. देवी पुराणात मोह उत्पन्न करणाऱ्या कृत्यांचे वर्णन आले असून त्यात पाषंडमताच्या शास्त्रांना मान्यता दिल्याचा दोष असल्यामुळे त्याने त्या पुराणाचा उपयोग केला नाही.

पुराणांच्या संबंधी मुख्य मुख्य बाबतींत प्रस्तुत ग्रंथकाराची मते थोडक्यात पुढीलप्रमाणे आहेत :

अथर्ववेद, शत. ब्रा. आणि प्राचीन उपनिषदे ह्या ग्रंथात ज्या पुराणांचा निर्देश केला आहे त्या पुराणांसंबंधी आपणाला जवळजवळ काहीच माहिती उपलब्ध नाही. तथापि, इतकी गोष्ट निर्विवाद आहे की वेदांच्या रचनाकाळी देखील त्या पुराणांना वेदांच्या बरोबरीचे अधिकृत स्थान प्राप्त झालेले होते आणि त्या पुराणांचा इतिहासाशी अति निकटचा संबंध होता. **पुराणग्रंथांच्या विकासातील** ती **पहिली पायरी** होती. तै. आरण्यकात आणि आप. ध. सू. मध्ये पुराणांचा उल्लेख असून आप. ध. सू. मध्ये भविष्यत् पुराणाचा निर्देश केला आहे. त्यावरून असा निष्कर्ष निघतो की कमीत कमी ख्रि. पू. ५ व्या अथवा ४ थ्या शतकाच्या सुमारास भविष्यत्पुराण आणि दुसरी काही पुराणे अस्तित्वात होती. पुराणवाङ्मयाच्या विकासातील **ही दुसरी पायरी** होती. ह्या अवस्थेमधील पुराणांतील विषयांचा थोडातरी सुगावा आपणाला लागतो. महाभारतात उद्धृत केलेल्या श्लोक, गाथा, अनुवंश अशा संज्ञा असलेल्या शेकडो श्लोकांपैकी काहींचा संबंध पुराणांशी आहे. पुराणज्ञांनी गायिल्या असलेल्या ह्या गाथा आणि श्लोक आपस्तंबाला माहीत असलेल्या एक अथवा अनेक पुराणांतून घेतल्या असणे अगदी शक्य आहे. स्मृतिस्वरूपाचा भाग असलेली काही पुराणे याज्ञ. स्मृतीच्या रचनाकाळापूर्वी म्हणजे इ. स. च्या २ ऱ्या अथवा ३ ऱ्या शतकाच्या बऱ्याच पूर्वी अस्तित्वात असली पाहिजेत कारण याज्ञ स्मृ. (१·३) मध्ये पुराणांना धर्माचे एक आधारस्थान मानले आहे पुराणांच्या विकासाची ही **तिसरी पायरी** होय. मत्स्यपुराणात गुप्त वंशाचा उल्लेख केलेला नाही आणि वायु व ब्रह्मांड ह्या पुराणांत गुप्त वंशाचा उल्लेख केला असला तरी त्या वंशातील एकाही राजाचे नाव सांगितलेले नाही. ह्यावरून असे ठरते की मत्स्यपुराणाची पुनर्रचना इ. स. च्या ३ ऱ्या शतकाच्या मध्याच्या (अथवा अखेरच्या) सुमारास करण्यात आली होती, कारण त्यात आंध्र वंशाचा उल्लेख केला आहे. तसेच वायु आणि ब्रह्मांड पुराणांच्या सांप्रत उपलब्ध असलेल्या संहिता देखील पुराणांच्या विकासातील तिसऱ्या पायरीतील असल्याचे म्हणता येईल. बहुतेक महापुराणांची मूळ रचना अथवा त्यांची समाप्ति इ. स. च्या ५ व्या अथवा ६ व्या शतकांपासून ९ व्या शतकाच्या दरम्यानच्या काळात झाली. ही पुराणग्रंथांच्या विकासातील **चवथी पायरी** होय. **उपपुराणांची रचना** इ. स. च्या ७ व्या अथवा ८ व्या शतकाच्या सुमारास होऊ लागली आणि त्यांची संख्या इ. स. च्या १३ व्या शतकाच्या सुमारापर्यंत अथवा त्यांच्यानंतर देखील वाढत राहिली. पुराणग्रंथांच्या विकासातील ही **अखेरची पायरी** होय.

अशा रीतीने **पुराणांचा प्रभाव** हिंदु समाजावर ख्रि. पू. काही थोडी शतके पडण्यास सुरुवात झाली आणि त्या प्रभावाचा पूर्ण पगडा इ. स. च्या १७ व्या अथवा १८ व्या शतकांपर्यंत चालू राहिला आणि काही प्रमाणात तो अद्यापि देखील चालत आहे असे मानण्याला पुरेसा पुरावा उपलब्ध आहे. ९ व्या शतकानंतरच्या काळात कोणतेही नवे महापुराण उत्पन्न झाले नाही. परंतु कित्येक पुराणात नवा मजकूर घुसडून देण्यात आला आणि तसे करताना खऱ्या खोट्याची चाड बाळगण्यात आली नाही. ह्या प्रवृत्तीचे सर्वात अनिष्ट उदाहरण म्हणजे भविष्य पुराणाचा तिसरा खंड हे होय. त्या खंडामध्ये **आदाम आणि ईव्ह**, पृथ्वीराज आणि जयचंद, **तैमूर**, अकबर, चैतन्य, भट्टोजी, **नादीरशहा** ह्यांच्या आणि अशाच कथा आल्या आहेत.

सध्या उपलब्ध असलेल्या पुराणांनी गुप्तवंशाच्या राजांच्या आणि त्यांच्या मागून झालेल्या राजांच्या कथा का वर्णन केल्या नाहीत ह्या प्रश्नाला समाधानकारक उत्तर देणे शक्य नाही. कदाचित असे असू शकेल की मत्स्यासारख्या काही पुराणांच्या मूळच्या संहिता गुप्तवंश अधिकारात येण्याच्या पूर्वी रचिल्या गेल्या असतील आणि वायु, ब्रह्मांड ह्यांच्यासारखी पुराणे गुप्त वंशाची सत्ता बाल्यावस्थेमध्ये असताना झाली

असतील. दुसरे कारण असेही असू शकेल की उपलब्ध पुराणे इ. स. च्या ५ व्या आणि त्याच्यानंतरच्या शतकांत रचिली गेली असतील आणि त्या काळात हूण, तोरमाण, मिहिरकुल ह्यांच्यासारख्या परकीय लोकांच्या स्वाऱ्यांच्या योगाने उत्तर भारतात फार अस्वस्थता नांदत होती, अनेक पंथ आणि मतभेद उत्पन्न झाले होते, बुद्धधर्म प्रबल झाला होता आणि सामान्य जनतेला बुद्ध धर्मापासून परावृत्त करण्याकरिता त्यांच्यात नव्या विचारांची स्थापना करणे आणि त्या विचारांची प्राचीन परंपरेशी एकरूपता घडवूनं आणणे हे कार्य बुद्धिमान आणि निष्ठावान वैदिक धर्मानुयायांना पहिल्याने करावयाचे होते. ह्याकरिता समाजातील बुद्धिवादी वर्गात अहिंसा, सत्य, भक्ती ह्यांच्यासारखे सद्गुण आणि व्रते, तीर्थयात्रा, श्राद्ध, दाने ह्यांना त्या पुराणांची रचना करणाऱ्यांनी महत्त्व दिले असावे आणि त्यामुळे परकीयांना हाकलून देण्यास असमर्थ असलेल्या त्या काळच्या दुर्बल आणि लहान लहान राजांची वर्णने करण्याकडे त्यांची प्रवृत्ती झाली नसावी. बहुधा असे झाले असावे की कनिष्क आणि हूण ह्यांच्यासारख्या परकीय राजवंशांनी समाजात हलक्या दर्जाला पोचलेल्या सूतांना उत्तेजन दिले नसावे आणि त्या लोकांना उदरनिर्वाहाकरिता पुरेसा धंदा बुद्धधर्माने मिळवून दिला असावा, म्हणजे ते सूत बुद्धधर्मीय झाले असावे आणि म्हणून त्यांनी ऐतिहासिक परंपरा आणि वंशावळ्या लिहून ठेवल्या नसाव्या.

पुराणांशी संबंध असणाऱ्या व्यास आणि सूत ह्यांच्याविषयी काही आख्यायिका प्रचलित आहेत. पुराणांत असे सांगितले आहे की **व्यास हा** पराशराचा पुत्र असून त्याचा जन्म यमुना नदीमधील एका द्वीपात (बेटात) झाला असल्यामुळे त्याला **व्दैपायन** आणि त्याच्या अंगाचा वर्ण काळा असल्यामुळे त्याला **कृष्ण** असेही म्हणत असत. त्याची माता सत्यवती असून त्याचा पुत्र शुक होता. त्याला **व्यास** म्हणण्याचे कारण त्याने एका वेदाची चार विभागात रचना केली. 'अस्'—फेकणे ह्या चतुर्थ गणाच्या धातुला 'वि' हा उपसर्ग लागून 'व्यास' हा शब्द झाला आहे. त्याने आपल्या पैल, वैशंपायन, जैमिनी आणि सुमन्तु ह्या चार शिष्यांना अनुक्रमे, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद हे चार वेद शिकविले. त्याचा पाचवा शिष्य रोमहर्षण सूत होता आणि त्याने नैमिषारण्यामध्ये शौनकप्रभृति ऋषींना महाभारत कथन केले. अशी समजूत होती की जेव्हा जेव्हा धर्म आणि वेद ह्यांचा ऱ्हास होई तेव्हा तेव्हा लोकांच्या हिताकरिता व्यासाचे जन्म होत असत. (ब्रह्म. १५८-३४). अशा **व्यासांची संख्या** निरनिराळ्या पुराणांनी निरनिराळी दिली आहे. उदाहरणार्थ—कूर्म (१·५२·१।९) मध्ये २७ नावे दिली असून वायु (२३·११५।२१९) प्रभृति काही पुराणांनी चालू वैवस्वत मन्वंतरातील २८ द्वापरयुगांत होऊन गेलेल्या २८ व्यासांची नावे सांगितली आहेत. काही पुराणांनी त्याला विष्णूचा, काहींनी ब्रह्मदेवाचा आणि काहींनी शंकराचा अवतार मानला आहे. पुराणांच्या अर्थामध्ये प्रवीण असणाऱ्या त्या व्यासाने आख्याने, उपाख्याने, गाथा ह्यांच्या आणि कल्पांच्या शुद्ध माहितीच्या आधारावर एक पुराणसंहिता तयार केली असेही पुराणात सांगितले आहे. असे दिसून येते की इतिहासपुराण ह्यांना पाचवा वेद अशी संज्ञा असली तरी ज्याप्रमाणे चार वेदांच्या सहितांचे संरक्षण ब्राह्मणांनी अप्रतिम काळजीने केले त्याप्रमाणे ह्या पाचव्या वेदाच्या संहितांचे संरक्षण त्यांनी केले नाही आणि त्या संहितांमध्ये वेळोवेळी नवीन भर घालून त्यांच्या संहितांची वाढ होऊ देण्यात आली.

व्यासासंबंधी पर्गिटर प्रभृति काही पाश्चात्य ग्रंथकारांनी टीका केली आहे. व्यासाने वेदांची पुनर्रचना केली असल्याच्या आख्यायिकेसंबंधी पर्गिटरने म्हटले आहे की व्यासासंबंधी परिपूर्ण माहिती महाभारत आणि पुराणे ह्यात दिलेली असता वेदांची पुनर्रचना करणाऱ्या व्यासाचा प्रत्यक्ष वैदिक वाङ्मयात उल्लेख आलेला नाही. पर्गिटरच्या मते ह्या घटनेच्या मागे ब्राह्मणांचा एक कट आहे, कारण तशी माहिती दिल्यास वेद अनादि आहेत हा ब्राह्मणांनी प्रस्थापित केलेला सिद्धांत खोडून टाकल्यासारखे होईल. प्रस्तुत ग्रंथकाराच्या मते ह्या आरोपात तथ्य नाही. महाभारत आणि पुराणे ह्यांच्यावरून असा बोध होतो की प्रारंभी

एक वेद असून त्याची विभागणी चार गटात करण्यात आली. ऋग्वेदाची विभागणी एकदा मंडळे आणि सूक्ते ह्यांत करून दुसऱ्यांदा अष्टके, अध्याय आणि वर्ग अशा विभागांत करण्यात आली आहे. तै. सं. आणि अथर्ववेद ह्यांची विभागणी कांडांत केली आहे. ऋग्वेदाच्या प्रत्येक सूक्ताचा अथवा ऋचेचा एक ऋषि असतो आणि तो ऋषि त्या सूक्ताचा अथवा ऋचेचा कर्ता नसून फक्त द्रष्टा (पाहणारा) असतो. प्राचीन काळापासून असा एक कडक नियम अस्तित्वात होता की एखाद्या मंत्राचा ऋषि, छंद, देवता आणि विनियोग जाणल्याशिवाय कोणीही तो मंत्र शिकवू नये, अथवा एखाद्या यज्ञामध्ये त्याचा उपयोग करू नये आणि असा उपयोग केल्यास त्याच्यावर घोर आपत्ती ओढवतील असे मानण्यात येत असे. अशा मंत्रांची अथवा सूक्तांची निरनिराळ्या कारणांकरिता भिन्न भिन्न प्रकारची मांडणी करण्याने त्या मंत्रांच्या अथवा सूक्तांच्या सनातनत्वाला काही बाध येत नाही आणि त्यामुळे ह्या कारणाकरिता व्यासाचे नाव दाबून ठेवण्याची आवश्यकता नव्हती.

व्यासाचे नाव वैदिक वाङ्मयात दिले नसल्याची दुसरीही काही कारणे असू शकतील. **एक अत्यंत संभवनीय कारण** असे आहे की व्यास हा विष्णूचा अवतार असल्यामुळे त्याने वेदाची चार मुख्य गटांत केलेली विभागणी परमेश्वराने स्फूर्ती दिल्यावरून केली असण्याचा समज आहे. वेद सनातन आहेत ह्या सिद्धांताला बाध न येता व्यासाचे महत्त्व वर्णन करण्याचा सर्वात सोपा मार्ग म्हणजे ज्या व्यासाने महाभारत रचिले आणि पुराणांची विभागणी १८ ग्रंथांत केली त्याच व्यासाने वेदांचे विभाग केले आणि त्यांची मांडणी केली असे विधान करणे हा होता आणि हा सर्व गौरव ख्रि. पूर्वीच्या आणि ख्रि. नंतरच्या काही शतकांत घडून आला असेल तर ज्या व्यक्तीने वेदांची पुनर्रचना अथवा मांडणी केली त्या व्यक्तीचा उल्लेख प्राचीन वैदिक वाङ्मयात कसा येऊ शकेल? प्राचीन वैदिक वाङ्मयाची रचना बुद्धाच्या पूर्वी काही शतके (म्हणजे ख्रि. पू. ६ व्या शतकापूर्वी) होऊन गेली होती ह्याबद्दल बहुतेक विद्वानांमध्ये एकवाक्यता आहे. वेदांची मंडळांत अथवा अष्टकांत अथवा कांडांत केलेली मांडणी सनातन असल्याचे कोणीच म्हणत नाही, फक्त **वेदांमधील सूक्ते आणि मंत्र एवढेच सनातन** असल्याचे मानण्यात येते. ऋग्वेदाचा पदपाठ देखील सनातन स्वरूपाचा नसून तो शाकल्याने रचिला आहे असे मानतात आणि निरुक्ता (६·२८) मध्ये शाकल्याचे दोषही दाखविले आहेत. **ह्या उपपत्तीने सर्व शंकाचा निरास होतो.**

**पुराणाची रचना कोणी केली** आणि त्यांचा प्रसार कोणी केला ह्याबद्दल सर्व पुराणांत एकमत नाही. वायु, (६१·५५। ६१) मध्ये म्हटले आहे की सूताचे सुनीतिप्रभृती सहा शिष्य होते, त्यांच्यापैकी तिघांनी तीन नव्या पुराणसंहिता रचिल्या आणि सूताने रचिलेली पूर्वीची संहिता ही चौथी होती, ह्या सर्व संहितांची विभागणी कांडांमध्ये केली होती आणि त्यांच्यामधील आशय एकसारखाच होता. परंतु निरनिराळ्या सहितांमध्ये भेद होते. ह्या संहितांपैकी एक वगळून बाकीच्या सर्व संहितांमध्ये प्रत्येकी चार हजार श्लोक होते. ह्या चार संहितांना (ब्रह्मांड २·३५·६६ मध्ये) **मूलभूतसंहिसा** आणि (वायु-६१·५८ मध्ये) **पूर्वसंहिता** म्हटले आहे. विष्णु, अग्नि ह्या पुराणांनीही अशाच अर्थाचे वर्णन केले आहे परंतु भागवत (१२·७·४।७)यात काहीसे वेगळे वर्णन आहे.

महाभारतात आणि पुराणांत ज्याचा उल्लेख आला आहे त्या **सूताच्या** बाबतीतही काही प्रमाणात गूढ आहे. त्याला **रोमहर्षण** असे नाव पडण्याचे कारण काही पुराणात [लोमानि हर्षयांचक्रे श्रोतृणां यत्सुभाषितैः। कर्मणा प्रथितस्तेन लोकेस्मिँल्लोमहर्षणः॥
वायु (१·१६).] असे दिले आहे की सूताने आपल्या वक्तृत्वपूर्ण भाषणाने श्रोत्यांचे रोम अथवा लोम (अंगावरील केस) उभे केले म्हणून त्याला रोमहर्षण अथवा लोमहर्षण असे नाव मिळाले. स्कंद पुराणात

(प्रभासखंड १·६) म्हटले आहे की ज्यावेळी वैशंपायंनाने सूताला पुराणे पढविली त्यावेळी त्याच्या स्वतःच्या अंगावरील केस उभे राहिले होते म्हणून त्याला रोमहर्षण असे नाव पडले.

'सूत' ह्या शब्दाचा एक अर्थ 'सारथी' असून दुसरा अर्थ 'ब्राह्मण स्त्रीला क्षत्रिय पुरुषापासून झालेली प्रतिलोम मिश्र जातीची व्यक्ति' असा आहे. सूत शब्दाशी निकट संबंध असलेल्या **मागध** ह्या शब्दाचा अर्थ 'वैश्य पुरुषापासून क्षत्रिय स्त्रीला झालेल्या प्रतिलोम मिश्र जातीतील व्यक्ति' असा आहे (मनु १०-७१). कौटिल्याने म्हटले आहे की पुराणांत उल्लेख केलेले सूत आणि मागध निराळ्या प्रकारचे होते कारण पुराणांतील सूत सामान्य ब्राह्मण आणि क्षत्रिय ह्यांच्यापेक्षा श्रेष्ठ होता. म्हणजे पुराणातील सूत आणि मागध प्रतिलोम जातीचे नसून दोघेही ब्राह्मण आणि क्षत्रिय ह्यांचा पेक्षा अधिक योग्यतेचे होते. वायु (१·२६|३३) ह्यांत म्हटले आहे की ब्रह्मदेवाच्या यज्ञामध्ये ज्या दिवशी सोमवल्लीचा रस काढण्यात आला त्या दिवशी विष्णूचा अंशावतार रूपाने सूत उत्पन्न झाला आणि मागधही तशाच रूपाने उत्पन्न झाला. (क्षत्रिय जातीचे प्रतीक असणाऱ्या) इंद्राला द्यावयाची आहुती (ब्राह्मणजातीचे प्रतीक असणाऱ्या) बृहस्पतीला द्यावयाच्या आहुतीशी मिश्रित झाली आणि ती मिश्र आहुती देवांना अर्पण केल्याबरोबर सूताचा जन्म झाला. ह्या कथेवरून आणि पुढील काळात सूत जातीची कर्तव्ये मूळच्या सूतासारखीच असल्यामुळे सूत जात हे ब्राह्मण (स्त्री) आणि क्षत्रिय (पुरुष) ह्यांच्या मिश्र जोडप्यापासून उत्पन्न झालेले अपत्य आहे असे म्हणू लागले. अशीच दुसरी एक कथा वायु (६२·१४७) मध्ये जोडण्यांत आली की मूळच्या सूताने आणि मागधाने वेनपुत्र पृथुराजाचे स्तोत्र (स्तुती) गाइल्यावरून त्या राजाने संतुष्ट होऊन सूताला अनूप देश आणि मागधाला मगध देश बक्षिस दिले आणि त्या काळापासून सूत आणि मागध हे राजांचे स्तुतिपाठ गातात आणि राजांना आशीर्वाद देऊन जागे करितात. अशाच कथा दुसऱ्याही काही पुराणांत वर्णन केल्या आहेत.

सांप्रतकाळी उपलब्ध असलेल्या वायु आदि पुराणांच्या कर्त्यांच्या.काळी सूतांना वेदांचा अधिकार नसे आणि त्यांचे काम देव, ऋषि आणि राजे ह्यांच्या इतिहासात दिलेल्या वंशावळ्यांची माहिती टिपून ठेवणे हे असे. ह्यामुळे शौनकासारख्या मोठमोठ्या ऋषींनी अशा प्रतिलोम जातीच्या सूतापासून पुराणांचे अध्ययन केले असे वर्णन करणे ही गोष्ट त्या पुराणांच्या कर्त्यांना अपमानास्पद वाटली आणि म्हणून त्या सूताच्या योग्यतेची उपपत्ती लावण्याकरिता सूताच्या जन्मासंबंधी वर उल्लेख केलेली कथा निर्माण करण्यात आली. ही घटना कौटिल्याच्या पूर्वी काही शतके झाली असली पाहिजे. ह्यावरून असे दिसते की प्राचीन काळी एका सूत जातीच्या व्यक्तीपासून कथा आणि आख्याने ऐकण्यात ब्राह्मणांना कोणताही प्रत्यवाय वाटत नसे आणि त्यामुळे आपल्या योग्यतेला कमीपणा येतो असे वाटत नसे, परंतु सांप्रत उपलब्ध असलेल्या पुराणांच्या रचनाकाळी त्या परिस्थितीत बदल झाला होता.

**उपपुराणे**. उपपुराणांच्या रचनाकालासंबंधी प्रा. हाजरा ह्यांनी केलेल्या परिश्रमाविषयी मागे उल्लेख केला आहे. प्रा. हाजरा ह्यांनी साब, विष्णुधर्मोत्तर, विष्णुधर्म आणि नरसिंह ह्या उपपुराणांचे रचनाकाल इ. स. २०० ते ८०० ह्यांच्या दरम्यानचे असल्याचे प्रतिपादन केले आहे. मागे सांगितल्याप्रमाणे हे निष्कर्ष प्रस्तुत ग्रंथकाराला मान्य नाहीत. बरीचशी उपपुराणे अलिकडील काळात झालेली आहेत. त्यांच्यापैकी नरसिंह, विष्णुधर्मोत्तर, देवी ह्यांच्यासारखी काही थोडी उपपुराणेच फक्त इ. स. च्या ७ व्या अथवा ८ व्या शतकांइतकी जुनी असल्याचे म्हणणे कदाचित शक्य होईल.

अल्बेरुणीने विष्णु, वायु आणि आदित्य ह्या उपपुराणांचा निर्देश केला आहे. ह्यावरून त्याने दिलेल्या नावांची पुराणे किमानपक्षी इ. स. १००० पूर्वी काही काल तरी अस्तित्वात असली पाहिजेत.

काही श्लोक मत्स्य, विष्णुधर्मोत्तर आणि वराहमिहिरकृत बृहत्संहिता ह्या तीन ग्रंथांत समान आहेत. वराहमिहिराने ते श्लोक ऋषिपुत्रकृत असल्याचे म्हटले आहे. त्याला दुसऱ्या कोणाच्या ग्रंथातील श्लोक घ्यावयाची जरूरी पडली असती तर त्याने स्वतःच्याच विषयातील पूर्वी होऊन गेलेल्या ग्रंथकाराच्या ग्रंथाचा उपयोग केला असता आणि तो एखाद्या उपपुराणाकडे वळला नसता. प्रस्तुत ग्रंथकाराच्या मते वराहमिहिराने इ. स. च्या ६ व्या शतकाच्या पूर्वार्धात ज्यावेळी आपले ग्रंथ लिहिले त्यावेळी विष्णुधर्मोत्तर हे उपपुराण अस्तित्वात नव्हते अथवा निदान त्याला अधिकृत ग्रंथाचा दर्जा प्राप्त झाला नव्हता.

उपपुराणे ही १८ महापुराणांचे उपभेद असल्याचे मत्स्यपुराणात म्हटले आहे. १८ महापुराणांचे अध्ययन करून ऋषींनी त्यांचे जे संक्षेप काढले तींच ही उपपुराणे होत असे कूर्म पुराणात सांगितले आहे.

# प्रकरण २३

## पृथक् पृथक् पुराणांसंबंधी आणि उपपुराणांसंबंधी संक्षिप्त टांचणे

(मू. ग्रं. पा. ५।८८७-९१२)

**अग्निपुराण**. प्रा. हाजरा ह्यांच्या मते आनंदाश्रमाने छापलेले अग्निपुराण हे अस्सल नसून त्याची रचना मागाहूनच्या काळात झाली आहे आणि मूळचे आग्नेय अथवा वह्नि पुराण अद्यापि छापले गेले नाही. दानसागर ह्या ग्रंथात देखील (पा. ७ श्लो. ६३) दुसऱ्या एका अग्निपुराणाचा उल्लेख केला आहे. बहुतेक इतर पुराणांप्रमाणेच छापील आग्नेय पुराणात स्वतःचा गौरव केला असून ते पुराण वेद आणि सर्व विद्या यांनी परिपूर्ण असे महापुराण असल्याचे म्हटले आहे.

**आदिपुराण** (उपपुराण). प्रा. हाजरा ह्यांनी ह्या पुराणाच्या निरनिराळ्या काळात झालेल्या दोन आवृत्त्या असल्याचे मानले आहे आणि वेंकट० छाप० ने छापलेले (१९ अध्याय असलेले) आदिपुराण हे त्या दोहोंपैकी मागाहूनची आवृत्ती असून तिच्या पूर्वीच्या आवृत्तीची एकही हस्तलिखित प्रत अद्यापि उपलब्ध झालेली नाही असे म्हटले आहे. अल्बेरूणीने दिलेल्या पुराणांच्या यादीमध्ये काही उपपुराणांचाही समावेश केलेला आहे. त्या यादीत आदिपुराणांचा निर्देश केला आहे. हाजरा ह्यांच्या मते ह्या पुराणाचा रचनाकाळ इ. स. १२०३—१५२५ ह्यांच्या दरम्यानचा असावा. आदि आणि आद्य ही दोन्ही नावे एकाच ग्रंथाची आहेत. निबंधग्रंथांनी आदि आणि आदित्य ह्या दोन नावाचा घोटाळा केला आहे.

**आदित्यपुराण** हे एक उपपुराण असल्याचे मत्स्य (५३·६२) मध्ये आणि अल्बेरुणीने म्हटले आहे. कल्पतरु, स्मृति चं., अपरार्क दानसागर ह्यांनी आदि आणि आदित्य ह्या दोन्ही पुराणातील अनेक अवतरणे प्रवृत्त केली आहेत.

**एकाम्र** (ओरिसा प्रांतातील एक ग्रंथ). प्रा. हाजरा ह्यांनी ह्या पुराणाचा रचनाकाल इ. स. चे १० वे अथवा ११ वे शतक असल्याचे ठरविले आहे.

**कालिका** हे एक उपपुराण असून त्यात ९३ अ. आहेत आणि ते वें. छा. ने छापले आहे. ह्या ग्रंथाच्या रचनाकालाविषयी निरनिराळ्या विद्वानांमध्ये मतभेद आहे. प्रा. हाजरा ह्यांनी ह्या पुराणाच्याही दोन आवृत्या असल्याचे मानले आहे आणि उपलब्ध आवृत्ती १० व्या अथवा ११ व्या शतकातील असल्याचे ठरविले आहे. कल्पतरू, अपरार्क, स्मृति चं., दानसागर ह्यांनी ह्या पुराणातील अवतरणे उद्धृत केली आहेत. वें. छा. च्या आवृत्तीत (अ. ९१ आणि ९२) विष्णुधर्मोत्तराचा निर्देश केला आहे. ह्यावरून उपलब्ध कालिका पुराण इं. स. १००० च्या पूर्वी रचिले असल्याचे धरावे लागेल.

**कल्किपुराण**. ह्या पुराणाच्या ३ आवृत्त्या असून त्या सर्वही कलकत्ता येथील आहेत. प्रा. हाजरा म्हणतात की 'हे पुराण मागाहूनच्या काळात झालेले असून ह्या पुराणातील अवतरणे कोणत्याही ग्रंथकाराने उद्धृत केलेली नाहीत. आणि त्याचा रचनाकाळ इ. स. च्या १८ व्या शतकानंतरचा मानता येत नाही.

**कूर्म**. हे पुराण वें. छा. ने छापले असून त्याचे पूर्वार्ध (अ. ५३) आणि उत्तरार्ध (अ. ४६) असे दोन भाग आहेत. प्रा. हाजरा ह्यांच्या मते कूर्मपुराण हा प्रथम पंचरात्र संप्रदायाचा ग्रंथ होता परंतु नंतर त्यात

बदल करून तो पाशुपत सांप्रदायाचा करण्यात आला. कूर्म (१·१·२१।२२)मध्ये ह्या पुराणाच्या ब्राह्मी, भागवती, सौरी आणि वैष्णवी अशा चार संहिता असल्याचे सांगितले असून तो प्रत्यक्ष ग्रंथ ब्राह्मी संहिता असल्याचे आणि त्यात ६००० श्लोक असल्याचे म्हटले आहे. नारदीय पुराण (१·१०६·१।२२) मध्ये इतर तीन संहितांचा सारांश दिला आहे. पद्म पुराण (पाताल १०२·४१।४२) यात कूर्म पुराणाचा स्पष्ठ निर्देश करून त्यातील एक श्लोक उद्धृत केला आहे. स्मृति चं. कल्पतरु, अपरार्क ह्यांनी कूर्म पुराणातील श्लोक उद्धृत केले आहेत.

**गणेश पुराण**. ह्याचे विवेचन प्रा. हाजरा ह्यांनी (गंगा. रि. इ. खं. ९ पा. ७९।९९ वर) केले आहे.

**गरुड पुराण.** उपलब्ध गरुड पुराणात (अ. १०७ मध्ये) पराशरस्मृतीचा सारांश दिला आहे. ह्या पुराणाचा रचनाकाल इ. स. ९५० नंतरचा आणि इ. स. च्या ६ व्या शतकाच्या पूर्वीचा मानता येणार नाही.

**देवीपुराण (उपपुराण).** प्रा. हाजरा ह्यांनी ह्या पुराणाचा रचनाकाल इ. स. च्या ७ व्या शतकाचा उत्तरार्ध असल्याचे ठरविले आहे. दानसागर ह्या ग्रंथाने ह्या पुराणाचा उल्लेख केला असून त्यातील अवतरणे उद्धृत न करण्याची कारणे दिली आहेत. भुजबलनिबंध, कल्फ्तरु, अपरार्क ह्यांनी ह्या पुराणातील अनेक अवतरणे उद्धृत केली आहेत.

**देवी भागवत**. हे पुराण वें. छा. ने छापले असून त्यात १२ स्कंद आहेत. हे पुराण देवी भागवताच्या मागाहून झाले असल्याचे सिद्ध करण्याचा प्रा. हाजरा ह्यांनी प्रयत्न केला आहे.

**नंदिपुराण** (उपपुराण). प्रा. रंगास्वामी आयंगार ह्यांच्या मते मूळचे पुराण बहुधा नष्ट झाले असावे. ह्या पुराणातील विस्तृत अवतरणे कल्पतरु, अपरार्क, लक्ष्मीधर, दानसागर ह्यांनी उद्धृत केली आहेत आणि मत्स्यपुराणात स्पष्टपणे निर्देश केलेल्या चार उपपुराणापैकी हे एक आहे. अल्बेरुणीने 'नंदपुराण' म्हणून ज्याचा उल्लेख केला आहे ते हेच पुराण असावे असे दिसते. हे अगदी. प्राचीन उपपुराणांपैकी एक असावे आणि त्याची रचना इ. स. च्या ८ व्या अथवा ९ व्या शतकात झाली असावी.

**नरसिंह अथवा नृसिंह पुराण** (उपपुराण). कल्पतरु, अपरार्क, स्मृतिचं, ह्यांनी ह्या पुराणातील अवतरणे उद्धृत केली आहेत. कल्पतरू आणि अपरार्क ह्या दोघांच्याजवळ उपलब्ध पुराणापेक्षा बरीच विस्तृत आवृत्ती होती असे दिसते. उपलब्ध पुराणाचा रचनाकाल इ. स. च्या ९ व्या शतकाच्या सुमाराचा असावा.

**नारदपुराण**. वें. छा. ने छापलेल्या नारदीय पुराणाचे दोन भाग असून पहिल्या भागात १२५ अध्याय असून दुसऱ्या भागात ८२ अ. आहेत. आणि सर्व मिळून ५५१३ श्लोक आहेत. कलकत्ता एशि. सोसायटी आणि बंगवासी छा. ह्यांनी ३८ अध्याय आणि सुमारे ३६०० श्लोक असलेले **बृहन्नारदीय पुराण** प्रसिद्ध केले आहे. प्रा. हाजरा ह्यांनी असे प्रतिपादन केले आहे की मत्स्य आणि अग्नि पुराणांत ज्या नारदीय पुराणाचा उल्लेख केला आहे ते उपलब्ध नारदीय पुराणाहून भिन्न होते आणि उपलब्ध नारदीय पुराणात बृहन्नारदीय पुराणातील मजकूर घेतला आहे. स्मृति चं , अपरार्क ह्यांनी ह्या पुराणातील अवतरण उद्धृत केली आहेत. ह्या पुराणात (१·९·४०) किरातार्जुनीय काव्यामधील 'सहसा विदधीत न क्रियाम्०'. (२·३०) ह्या, श्लोकाशी जुळता श्लोक आला आहे. तसेच बौद्ध लोक पाखंडी आणि वेदांची निंदा करणारे असतात म्हणून एखाद्या

ब्राह्मणाने त्यांच्या देवालयात प्रवेश केल्यास त्याला लागणारे पातक शेकडो प्रायश्चित्ते घेऊनही नाहीसे होत नाही असे सांगितले आहे. त्या पुराणाच्या पहिल्या भागात (३७·४) वैष्णवागमाचा आणि (५३·९) मध्ये पंचरात्राचा उल्लेख केला आहे. ह्यावरून असा निष्कर्ष निघतो की उपलब्ध नारदीय पुराण इ. स. ७००-१००० ह्या कालात झाले असावे.

**पद्मपुराण** हे पुराण महाभारताच्या आधारावर रचिले असल्याचे डॉ. बेलवलकर ह्यांनी प्रतिपादन केले आहे. प्रा. हाजरा ह्यांच्या मते पद्मपुराणाची एक उत्तरभारतीय (५ कांडे असलेली) आणि एक दक्षिण भारतीय (६ कांडे असलेली) अशा दोन पाठावृत्त्या असून वें. छा. आणि आनंदाश्रम ह्यांनी दक्षिण भारतीय पाठच छापला आहे. मत्स्य आणि पद्म ह्या दोन पुराणात शेकडो श्लोक एकसारखे आहेत. काही ग्रंथकारांनी पद्मामधून उद्धृत केलेले श्लोक दुसऱ्या काही ग्रंथकारांनी मत्स्यामधून उद्धृत केले आहेत. ह्याचा विचार करिता प्रस्तुत. ग्रंथकाराला असे वाटते की ह्या दोन पुराणात सारखे असणारे श्लोक मूळचे मत्स्यपुराणातील असून ते पद्माने त्या पुराणातून घेतले असावे अणि अशी उसनवारी इ. स. १००० च्या पूर्वी झाली असावी. कल्पतरु, अपरार्क, स्मृति चं. ह्यांनी ह्या पुराणातील अनेक अवतरणे उद्धृत केली आहेत. आनंदाश्रमाने छापलेल्या पद्माच्या आवृत्तीत ४८,४५२ श्लोक आणि ६२८ अध्याय आहेत.

**ब्रह्मपुराण.** आनंदाश्रमाने छापलेला ग्रंथ अलिकडील काळात रचिला असावा असे दिसते. प्रा. हाजरा ह्यांनी म्हटले आहे की, जीमूतवाहन, अपरार्क, बल्लाल सेन प्रभृतींनी उद्धृत केलेली ब्रह्म पुराणातील अवतरणे ह्या छापील ग्रंथात आढळत नाहीत आणि ह्या पुराणांत महाभारत, विष्णु, वायु, आणि मार्कंडेय ह्या पुराणांतील अध्याय उसने घेतले आहेत. दानसागरामध्ये ब्रह्मपुराणाच्या दोन आवृत्यांचा उल्लेख केला असून त्यांपैकी एका आवृत्तीचा त्या ग्रंथात उपयोग केला नसल्याचे म्हटले आहे. बल्लाल सेनाने अग्राह्य ठरविलेली आवृत्तीच प्रस्तुत उपलब्ध असलेले ब्रह्मपुराण असावे आणि कल्पतरु आणि बल्लाल सेन ह्यांच्यासमोर त्याच नावाचे प्राचीन पुराण असावे असेही संभवनीय आहे. वाचस्पतीने (इ. स. च्या १५ व्या शतकाचा उत्तरार्ध) कल्पतरू ह्या ग्रंथात ब्रह्म पुराणातील अनेक अवतरणे उद्धृत केली आहेत. ह्यावरून ब्रह्मपुराणाचा पहिला भाग इ. स. च्या १३ व्या शतकानंतरचा ठरविता येत नाही ह्या ग्रंथाची रचना दंडकारण्याच्या ज्या भागातून गोदावरी नदी वाहते त्या प्रदेशात झाली असावी, कारण त्या पुराणात तो प्रदेश सर्वात अधिक पवित्र असल्याचे वर्णन केले आहे. गौतमीच्या तीरावरील जनस्थान ही जनक वंशातील राजांची यज्ञभूमी असल्यामुळे त्या प्रदेशाला जनस्थान हे नाव पडले असे त्या पुराणात म्हटले आहे. छापील ब्रह्म पुराणात २४५ अध्याय आणि १३७८३ श्लोक आहेत.

**ब्रह्मवैवर्त**. हा एक प्रचंड ग्रंथ असून तो आनंदाश्रमाने चार खंडात छापला आहे. स्मृति चं., हेमाद्रि प्रभृति ग्रंथकारांनी उद्धृत केलेले अनेक श्लोक उपलब्ध ग्रंथात आढळत[१] नाहीत.

**ब्रह्माण्ड** (वें. छा.). ह्याचे चार पाद आहेत. ह्या पुराणाची रचना बहुधा गोदावरी नदीच्या उगमाकडील प्रदेशात झाली असावी, कारण त्यात तो प्रदेश सर्वात अधिक मनोरम असल्याचे आणि तेथे रामाने स्थापन केलेली गोवर्धन नावाची नगरी असल्याचे म्हटले आहे. ब्रह्माण्ड पुराण हे १८ पुराणांपैकी अत्यंत प्राचीन पुराणांपैकी एक आहे. हे मत्स्याइतके प्राचीन ठरविता येत नाही परंतु त्यात केलेल्या संगीत शास्त्रावरील प्राचीन आचार्यांच्या उल्लेखावरून त्या पुराणाची रचना इ. स. च्या ४ थ्या आणि ६ व्या शतकांच्या दरम्यानच्या काळात झाली असावी असे म्हणता येईल.

**बृहद्धर्मपुराण** (उपपुराण.) हे पुराण इ. स. च्या १३ व्या अथवा १४ व्या शतकात बंगाल प्रांतात झालेले आहे.

**भविष्यपुराण**. ह्या पुराणाची चार पर्वे आहेत. त्यांच्यापैकी **ब्रह्मपर्वच** काय ते प्राचीन काळचे असल्याचे म्हणता येईल. **प्रतिसर्ग** पर्व हे अर्वाचीन काळी रचिलेले असून त्यात आदाम आणि इव्ह, दिल्ली येथील म्लेच्छ, नानक, चैतन्य, भट्टोजी इत्यादिकांच्या कथा आल्या आहेत. अपरार्क, कल्पतरु, मिताक्षरा ह्यांनी भविष्योत्तर पुराणातील अवतरणे उद्धृत केली आहेत. ह्यावरून भविष्योत्तर पुराण इ. स. १००० च्या नंतर झाले असे म्हणता येत नाही. ह्या पुराणात आर (मंगळ) आणि कोण (शनि) ह्या परकीय शब्दांचा उल्लेख केला आहे. ह्या सर्वावरून हे उपलब्ध पुराण इ. स. च्या ६ व्या अथवा ७ व्या शतकांच्या सुमाराच्या पूर्वीचे असल्याचे मानता येत नाही. वायुपुराणात (९९·२६७) उल्लेख केलेले भविष्यपुराण हे उपलब्ध भविष्य नसून आप. ध. सू. (१·६·१९·१३) मध्ये उल्लेख केलेले भविष्य होय.

**भागवत पुराण**. मिताक्षरा, अपरार्क, कल्पतरु ह्यांच्यासारख्या पूर्वीच्या काळात झालेल्या निबंधग्रंथांपैकी एकाही ग्रंथात ह्या पुराणातील अवतरणे उद्धृत केलेली नाहीत. ह्या ग्रंथाचा रचनाकाळ अत्यंत वादग्रस्त आणि इ. स. च्या ५ व्या शतकापासून १० व्या शतकापर्यंतचा निरनिराळ्या प्रकारचा मानला जातो. देवी. भागवत हे ह्या पुराणानंतरचे आहे अथवा मागाहूनचे आहे ह्याबद्दलही मतवैचित्र्य आहे. पद्म पुराणामध्ये (खं.६ अध्याय १८९-१९४) ५१८ श्लोक असलेले एक भागवतपुराणमाहात्म्य आहे. प्रस्तुत ग्रंथकाराच्या मते उपलब्ध पुराण अलिकडील काळातील असून ते इ. स. च्या ९ व्या शतकापूर्वी झालेले असल्याचे सिद्ध करणारा विश्वसनीय पुरावा पुढे आलेला नाही.

**मत्स्यपुराण**. ह्या पुराणाचे २९१ अध्याय असून त्यात १४०६२ श्लोक आहेत. हे पुराण प्राचीन पुराणांपैकी एक असून त्यात स्मृतिविषयांवरील अध्याय सर्व पुराणांपेक्षा अधिक आहेत. मिताक्षरा, कल्पतरू, अपरार्क, दानसागर, स्मृति चं. इत्यादि ग्रंथांमध्ये ह्या पुराणातील विपुल अवतरणे उद्धृत केली आहेत. ह्या अवतरणांवरून इ. स. १००० च्या पुष्कळ पूर्वी मस्त्य पुराणाची अंतर्रचना आणि त्याचे स्वरूप जवळजवळ उपलब्ध पुराणाच्यासारखे होते असे निःसंदेहपणे म्हणता येईल.

प्रस्तुत ग्रंथकाराच्या मते मत्स्य हे १८ पुराणातील सर्वात प्राचीन असून ते सर्वात अधिक संरक्षण केलेले आहे. त्याचा रचनाकाळ इ. स. २००-४०० ह्यांच्या मध्यंतरचा धरता येईल. कदाचित काही तुरळक श्लोक त्यानंतरच्या काळात घुसडून दिले असण्याचा संभव आहे.

**मार्कण्डेय पुराण**. ह्याच्या दोन आवृत्त्या आहेत. प्रस्तुत ग्रंथकाराने मुख्यत्वेकरून वें. छा. च्या आवृत्तीचा अवतरणांकरिता उपयोग केला आहे. वें. छा. आवृत्तीमध्ये १३४ अध्याय आहेत आणि बी. जे. आवृत्तीमध्ये १३७ अध्याय आहेत. ह्या पुराणाच्या एका भागाला (वें. छा. आवृत्ती अ. ७८-९०) **देवीमाहात्म्य अथवा सप्तशती** असे म्हणतात आणि तो भाग अर्वाचीन संस्कृत पंडितांच्या मताने प्रक्षिप्त आहे. तथापि तो इ. स. च्या १० व्या शतकाच्या पूर्वी घुसडून दिला असला पाहिजे. कारण त्याची सर्वात प्राचीन हस्तलिखित प्रत इ. स. ९९८ मधील आहे आणि तो भाग बहुधा इ. स. ६०० च्या पूर्वी घालण्यात आला असावा.

कल्पतरु, अपरार्क, स्मृति चं. इत्यादि ग्रंथांत ह्या पुराणातील अवतरणे उद्धृत केली आहेत आणि मनुस्मृति, महाभारत ह्यांतील अनेक श्लोक मार्कण्डेय पुराणात उद्धृत केले आहेत. एकंदरीने विचार करता

मार्कण्डेय हे प्रथम झालेल्या पुराणांपैकी एक असून त्याचा रचनाकाळ इ. स. च्या ४ थ्या आणि ८ व्या शतकांच्या मध्यंतरचा मानता येईल.

**लिंगपुराण.** (वें. छा.). ह्यात ११००० श्लोक असल्याचे अध्याय (२·५) मध्ये सांगितले आहे. कल्पतरु, अपरार्क, स्मृति चं., दानसागर ह्यांनी ह्या पुराणातील विपुल अवतरणे उद्धृत केली आहेत. दानसागराने ६००० श्लोक असलेल्या दुसऱ्या एका लिंगपुराणाचा उल्लेख केला आहे परंतु त्या पुराणाच्या दानसागरामध्ये उपयोग केलेला नाही.

**वराहपुराण**. ह्या पुराणात (बिब्लिओथिका इंडिका आवृत्ती) २१७ अध्याय आणि ९६५४ श्लोक असून काही अध्याय गद्यात आणि काही थोडे अध्याय गद्यपद्यमिश्रित आहेत. हे वैष्णव पुराणांपैकी एक असून ते विष्णूने वराह अवतारात पृथ्वीला सांगितले असल्याचे मानले आहे. कल्पतरूने त्यातील अवतरणे उद्धृत केली आहेत.

वराहपुराणाचा रचनाकाळ सांगणे अवघड आहे. ते पुराण आरंभी झालेल्या पुराणांपैकी नसले तरी इ. स. च्या १० व्या शतकाच्या पूर्वीचे आहे.

**वामनपुराण**. मत्स्य, वायु इत्यादि पुराणांच्या मानाने हे एक लहानसे पुराण आहे. वें. छा. आवृत्तीमध्ये त्यात ५४५१ श्लोक आहेत आणि काही अध्यायात गद्यभाग आहे. कल्पतरु, स्मुति चं. ह्यात ह्या पुराणातील अवतरणे उद्धृत केली आहेत. ह्या सर्वांवरून वामन पुराणाचा रचनाकाल इ. स. ६००-९०० ह्यांच्या दरम्यानचा धरावा लागेल.

**वायुपुराण**. (आनंदाश्रम आवृत्ती). ह्या पुराणात ११२ अध्याय आणि १०,९९१ श्लोक आहेत. त्याचे चार पाद केले आहेत. ह्यात आलेले गयामाहात्म्यासंबंधीचे अध्याय मागाहून समाविष्ट केले असावेत असे काही विद्वानांचे मत आहे. ह्या पुराणात मागाहून घातलेला काही भाग असला तरी ते सर्वात प्राचीन आणि अत्यंत अधिकृत अशा पुराणांपैकी एक आहे. कल्पतरु, स्मृति चं., अपरार्क ह्यांनी ह्या पुराणातील अवतरणे उद्धृत केली आहेत. या अर्थी ह्या पुराणात गुप्त वंशातील राजांचा उल्लेख केला आहे आणि त्या पुराणाचा बाणाने कादम्बरी आणि हर्षचरित ह्या ग्रंथांत उल्लेख केला आहे त्याअर्थी त्याचा रचनाकाळ इ. स. ३५०-५५० ह्यांच्या दरम्यानचा असल्याचे मानले पाहिजे.

**विष्णुपुराण** (वें. छा. आणि गोपाळ नारायण आवृत्त्या). प्रस्तुत उपलब्ध ग्रंथात ६ अंश, १२६ अध्याय आणि सुमारे ६००० श्लोक आहेत. बरेच अध्याय पूर्णपणे गद्यात आहेत. हे पुराण पंचलक्षण व्याख्येशी इतर पुराणांपेक्षा अधिक जुळते आहे. कल्पतरु, स्मृतिचं., काव्यप्रकाश, अपरार्क ह्यांनी ह्या पुराणातील अवतरणे उद्धृत केली आहेत.

ह्याचा रचनाकाळ ठरविणे अवघड काम आहे. ते सर्वात प्राचीन पुराणांपैकी एक आहे आणि त्याची संहिता मागाहून फारशी वाढविली गेलेली नाही. ह्या पुराणाची संहिता निदान १००० वर्षे तरी जशीच्या तशी राहिली आहे असे निबंधग्रंथांतील अवतरणांवरून दिसून येते. ह्या ग्रंथात (३·१४·५) राशींचा उल्लेख केला असून होरा आणि लग्न हे शब्द आले आहेत. उपलब्ध विष्णु पुराण इ. स. ३००-५०० ह्यांच्या दरम्यान रचिले गेले असे धरल्यास ते फारसे चुकीचे होणार नाही.

**विष्णुधर्मपुराण**. ह्याच्याबद्दलचे विवेचन मागील प्रकरणात केले आहे.

**विष्णुधर्मोत्तरपुराण** (उपपुराण). हा एक प्रचंड ग्रंथ आहे. त्यातील काही थोडी अवतरणे अपरार्क, स्मृतिचंद्रिका, दानसागर ह्यांनी उद्धृत केली आहेत. हे पुराण इ. स. ६०० च्या पूर्वीचे असणे शक्य नाही आणि जरी त्यातील काही भाग मागाहून घालण्यात आले असण्याचा संभव आहे तथापि त्याचा रचनाकाळ इ. स. च्या १० व्या शतकाच्या नंतरचा धरता येत नाही. विष्णुधर्म आणि विष्णुधर्मोत्तर हे दोन्ही ग्रंथ अल्बेरुणीच्या पंडिताच्या मते अधिकृत धर्मग्रंथांच्या स्वरूपाचे होते.

**साम्बपुराण** (उपपुराण). वें. छा. आवृत्ती. ह्या पुराणातील अवतरणे कल्पतरु, अपरार्क, स्मृति चं. ह्यांच्यासारख्या जुन्या ग्रंथांनी फारच क्वचित उद्धृत केली आहेत. ह्याच्या रचनाकाळाविषयी एवढच निश्चितपणे म्हणता येईल की साम्ब नावाच्या एका पुराणाचा अल्बेरुणीने इ. स. १०३० मध्ये उल्लेख केला होता. (साचौचा ग्रंथ पा. १३०).

**शिवपुराण**. काही पुरांणांनी ह्याला महापुराण मानिले आहे. ह्या पुराणाचा निश्चित असलेला जुना उल्लेख अल्बेरुणीच्या ग्रंथातील आहे. कल्पतरु, अपरार्क स्मृति चे. ह्यांनी ह्या पुराणातील अवतरणे उद्धृत केली नाहीत. ह्या पुराणाच्या सात संहिता असून त्यांत सुमारे २३००० श्लोक आहेत. ह्यातील अवतरणे दानसागर ह्या ग्रंथात अनेक ठिकाणी उद्धृत केली आहेत. शिवपुराण हे मागाहूनच्या काळात झालेले एक उपपुराण आहे असे डॉ. पुसाळकर ह्यांनी प्रतिपादन केले आहे. रुद्र संहिता भागात पार्वतीच्या कथेत ह्या पुराणातील वर्णन आणि कुमारसंभव काव्यातील वर्णन ह्यांत अतिशय साम्य आढळते. (शिवपुराण, रुद्र सं. पार्वती खंड ८-१७ = कुमार सं. १·२६ इ).

**शिवधर्मपुराण**. याज्ञ. १·१९३ वरील टीकेत अपरार्काने ह्या पुराणातील एक श्लोक उद्धृत केला आहे आणि त्या श्लोकात याज्ञ. मधील श्लोकाचा अनुवाद केला आहे.

**सौरपुराण**. (उपपुराण). ह्या पुराणाविषयी विवेचन प्रा. हाजरा ह्यांनी निरनिराळ्या लेखांत आणि त्यांच्या पुराणविषयावरील ग्रंथात (खंड १ पा. ३४८) केले आहे.

**स्कंदपुराण**. हे फार विस्तृत पुराण असून त्याचे दोन प्रकार आहेत. एका प्रकारात ७ खंडे असून दुसऱ्या प्रकारात ६ संहिता आहेत. ह्या पुराणातील श्लोकसंख्या ८१,०००, १००,०००, ८६,००० अशी निरनिराळ्या प्रकारची सांगितली आहे. हे पुराण स्कंदाच्या नावाचे असले तरी त्यात स्कंदाचा प्रमुख संबंध नाही. ह्या पुराणातील प्रचंड श्लोकसंख्येच्या मानाने त्यातील फारच थोडी अवतरणे धर्मशास्त्रावरील ग्रंथांत उद्धृत केली आहेत. अशा प्रचंड ग्रंथात प्रक्षिप्त भाग सुलभतेने घुसडून देता आले असतील. ह्यामुळे ह्याचा रचनाकाळ निश्चितपणे ठरविणे कठिण आहे. ते इ. स. च्या ७ व्या शतकाच्या पूर्वी आणि ९ व्या शतकानंतर झालेले नाही असे उपलब्ध पुराव्यावरून ठरविल्यास फारसे चुकीचे होणार नाही.

# प्रकरण २४

## पुराणांचा धर्मशास्त्रावर झालेला परिणाम

(मू. ग्रं. पा. ५/९१३-१००२).

वाङ्मय आणि समाज ह्यांचे परस्परांवर परिणाम होत असतात हे सर्वांना माहित आहे. ख्रिस्ती शकाच्या पूर्वीच्या आणि आरंभीच्या काही शतकांतील भारतीय समाज बुद्ध, जैन प्रभृति वैदिक धर्मापासून फुटून निघालेल्या धर्मांच्या आणि पंथांच्या वाढत्या सामर्थ्याने विस्कळित झालेला होता आणि ग्रीक, शक, हूण ह्यांच्यासारख्या परकीय लोकांच्या हल्ल्यांनी त्रासून गेला होता. ह्या कारणाने वैदिक धर्माशी एकनिष्ठ असणाऱ्या लोकांच्या पुढे वैदिक धर्माचे पुनरुज्जीवन कसे करावे हा मोठा प्रश्न उपस्थित झाला होता आणि अशा वेळी नव्या विचारांचा आणि रुढींचा समावेश केलेले आणि प्राचीन वेदस्मृतिप्रणीत धर्माचे पुनरुज्जीवन करणारे ग्रंथ लिहिण्याची स्फूर्ती त्यांना झाली. अशा रीतीने पुराणग्रंथांची निर्मिती झाली आणि त्या ग्रंथांना जेव्हा समाजात मान्यता आणि वजन प्राप्त झाले तेव्हा वैदिक धर्मानुयायी लोकांची प्रवृत्ती त्या ग्रंथांना अनुसरून वागण्याकडे झाली आणि आपले रीतिरिवाज आणि धार्मिक विधि शक्य तितके पुराणांत सांगितलेल्या नियमांना अनुसरून करण्याकडे त्यांची प्रवृत्ती होऊ लागली. हे समाजाच्या पुनर्घटनेचे कार्य पुराणांनी कसे केले ह्याचा विचार ह्या प्रकरणात करावयाचा आहे.

आजच्या हिंदु लोकांच्या धार्मिक कृत्यांचा हेतु वेद, स्मृति आणि पुराणे ह्यांनी सांगितलेली फले प्राप्त करून घेणे हा असतो. ही गोष्ट प्रत्येक विधीच्या आरंभी करण्यात येणाऱ्या 'श्रुति स्मृति पुराणोक्त फलप्राप्त्यर्थं' ह्या संकल्पावरून दिसून येते. त्या वेळच्या समाजधुरीणांना दोन प्रकारचे कार्य करावयाचे होते. त्यांना एकीकडे बुद्ध, जैन आणि तत्सम विचारप्रणालींच्या धर्मांचे सामर्थ्य आणि महत्व कमी करून निरनिराळ्या वेदबाह्य तत्त्वप्रणालींचे समाजावर पडलेले वजन नष्ट करावयाचे होते आणि त्याच्याच बरोबर बुद्ध धर्मामधील आकर्षक असणाऱ्या गोष्टींपासून बहुजनसमाजाला परावृत्त करून बुद्ध धर्माने सांगितलेले सामाजिक आणि पारलौकिक लाभ पुनर्घटित हिदु धर्मापासूनही प्राप्त होऊ शकतील अशी लोकांची खात्री पटवून द्यावयाची होती.

सरतेशेवटी बुद्ध धर्माचा ऱ्हास होऊन तो स्वतःच्या मातृभूमीतून नाहीसा झाला त्या परिणामात पुराणांचा बराच मोठा वाटा होता. कारण त्यांनी अहिंसेसारख्या बुद्ध धर्माच्या काही तत्त्वांना महत्त्व दिले आणि ती आत्मसात केली, बुद्धाला विष्णूचा अवतार म्हणून मान्यता दिली, शाकाहाराचा एक श्रेष्ठ प्रकारची तपश्चर्या म्हणून अंगीकार केला आणि मनु, याज्ञ. ह्यांच्यासारख्या स्मृतींना अनुसरून मठ आणि संन्यास धर्माचा उपयोग केला. पुराणांनी ह्या कार्याला प्रारंभ पुढीलप्रमाणे केला : वेदांचा योग्य अर्थ समजून घेण्याकरिता इतिहास आणि पुराणे ह्यांचे ज्ञान आवश्यक असल्याचे पुराणांनी प्रतिपादन केले; उदाहरणार्थ, वायु [यो विद्याच्चतुरो वेदान्साङ्गोपनिषदो द्विजः।
न चेत्पुराणं संविद्यान्नैव स स्याद्विचक्षणः॥
वायु (१·२००).] मध्ये असे आवर्जून सांगितले आहे की चार वेद, वेदांगे आणि उपनिषदे जाणणाऱ्या ब्राह्मणाला जर पुराणांचे ज्ञान नसेल तर तो विचक्षण म्हणजे शाहणा होणार नाही; विश्वाची उत्पत्ती आणि संहार कसा होतो ह्या विषयीच्या उपनिषदातील कल्पनांच्या आधारावर वायु (४·१७), ब्रह्म (१·३), कूर्म (१·२) प्रभृति पुराणांनी पंचमहातत्त्वांची उत्पत्ती कशी होते आणि त्यांचा विनाश कसा होतो ह्या गोष्टी विस्तारपूर्वक वर्णन केल्या.

वेदांना पुष्टि देणारे ग्रंथ ह्यापेक्षाही पुराणांना अधिक महत्त्व असल्याची प्रौढी काही पुराणांनी मिरविली आहे. उदा. कूर्म (२·४६·१२९) मध्ये म्हटले आहे की सर्व पुराणे आणि इतिहास (महाभारत) हे ग्रंथ तराजूच्या एका पारड्यात घातले आणि सर्व श्रेष्ठ वेद दुसऱ्या पारड्यात घातले तर पुराणे असलेले पारडे वेदांपेक्षा अधिक वजनाचे भरेल. महाभारतामध्येही (आदि १·२७१।२७३) अशी प्रौढी वर्णन केली आहे. सामान्यतः पुराणे कोणत्या तरी देवाने सांगितली असल्याचे त्यांत वर्णन केलेले असते. उदा., ब्रह्मपुराण ब्रह्मदेवाने सांगितले असल्याचे (ब्रह्म १·३०) मध्ये, वायुपुराण वायूने सांगितल्याचे (वायु.१·१९६) मध्ये वर्णन केले आहे. काही पुराणे विष्णूच्या मत्स्यादि अवतारांनी सांगितल्याचे त्या त्या पुराणात वर्णन केले आहे. पुराणांच्या श्रवणाने सर्व पातकांचा नाश होतो आणि अग्निष्टोमासारख्या श्रौत यज्ञांच्या फलांची प्राप्ती होते अशीही वर्णने ब्रह्म (२५४·३४), अग्नि (३८४·१३।३०) ह्यांच्या सारख्या पुराणांत केली आहेत. काही उपनिषदांनी वेदांच्या आणि यज्ञांच्या बाबतीत जी भावना प्रदर्शित केली आहे त्याच भावनेचा पुराणांनी पुरस्कार केला आहे. उदा., कठउपनिषद (१·२·४) मध्ये नारद आणि सनत्कुमार ह्यांचा संवाद वर्णन केला असून त्यात चार वेद आणि दुसऱ्या अनेक विद्या ह्या फक्त नाममात्र विद्या असून सर्वश्रेष्ठ ब्रह्माचे ज्ञान हे खरे ज्ञात होय असे प्रतिपादन केले आहे. बृहदा. उप.. (१·४·१०) मध्ये एखादी देवता आपल्याहून भिन्न असल्याचे मानून तिची पूजा करणारांची निंदा केली आहे. उपनिषदांतील (छां. ३·१७·४; प्रश्न उप. १·१५ प्रभृति) अनेक वचनांत तप, औदार्य, आर्जव, अहिंसा आणि सत्य हे गुण यज्ञांच्या योग्यतेचे अथवा त्यांच्याहून अधिक योग्यतेचे असल्याचे म्हटले आहे.

अशा प्रकारची आपण वेदांपेक्षा अधिक योग्यतेची असल्याची प्रौढी जरी पुराणांनी काही ठिकाणी मिरविली असली तरी सामान्यतः पुराणांनी वेदांना आधारभूत मानले असून बऱ्याच विधींमध्ये वेदांतील मंत्रांचा उपयोग करावयास सांगितले आहे. उदा, मत्स्य (अ. ९३), अग्नि (४१·६।८), नारदीयपुराण (२·७३·८३।९०). पुराणांनी निरनिराळ्या कार्यांकरिता वैदिक मंत्रांप्रमाणेच अनेक **पौराणिक मंत्रांचाही** उपयोग करावयास सांगितले आहे. वैदिक मंत्रांच्या बरोबरीने पौराणिक मंत्रांचा उपयोग ब्राह्मणांच्याही धार्मिक विधींत इ. स. च्या आरंभाच्या सुमारास अथवा आरंभीच्या काही थोड्या शतकात करण्यात येऊ लागला असे दिसते. श्राद्धविधी संबंधींच्या याज्ञ (१·२२९) ह्या श्लोकावरील टीकेत मिताक्षरेने (रचनाकाल इ. स. ११०० च्या सुमारास) स्मृतीत सांगितलेल्या वैदिक मंत्रांबरोबरच एका स्मार्त मंत्राचाही उपयोग करावा असे सांगितले आहे आणि तो मंत्र [आगच्छन्तु महाभागा विश्वेदेवा महाबलाः।
ये यत्र विहिताः श्राद्धे सावधाना भवन्तु ते ॥
गरुड पुराण (१·२१८·७).] (आगच्छन्तु महाभागा०) स्कंद आणि गरुड पुराणातील (१·२१८·७) आहे. अशाच दुसऱ्याही काही पुराणोक्त मंत्रांचा उपयोग निरनिराळ्या विधींमध्ये वैदिक मंत्रांच्या बरोबरीने करावयास पुराणांनी सांगितले आहे. काही विधींमध्ये **उपनिषदांतील** मंत्रांचा आणि वाक्यांचा थोड्याशा फरकाने उपयोग करण्यास पुराणांनी सांगितले आहे. उदा, कूर्म (२·९·१२) मध्ये तै. उप. २·४ मधील 'यतो वाचो निवर्तन्ते०' ह्या वाक्याचा समावेश केला आहे. विष्णु (६·५·६५) ह्या श्लोकात मुंडक उप (४·१·४) मधील काही शब्द आले आहेत. अशा रीतीने पुराणांत अनेक वैदिक आणि उपनिषदांतील वाक्ये समाविष्ट केली असल्यामुळे काही गमतीचे प्रश्न उपस्थित होतात. उदा. स्त्रिया, नाममात्र ब्राह्मण, आणि शूद्र ह्यांना वेदांचे अध्ययन करण्याचा अधिकार नव्हता, आणि म्हणून त्यांच्या हिताकरिता व्यासांनी महाभारत हा ग्रंथ लिहिला असे भागवत (१·४·२५) मध्ये सांगितले आहे. ह्यावरून असा एक निष्कर्ष निघतो की द्विजांना वेदांपासून जे फल (म्हणजे आत्मज्ञान आणि मोक्ष) प्राप्त होते तेच फल स्त्रियादिकांना भारताच्या श्रवणापासून प्राप्त होऊ शकेल.

इ. स. च्या ५ व्या शतकात आणि त्या शतकाच्या नंतरच्या काळात ब्राह्मणांना समाजातील बहुसंख्य असणाऱ्या शूद्रांना संतुष्ट करण्याची इच्छा झाली आणि त्यांनी स्त्रीशूद्रांना अशी सवलत दिली की त्यांना द्विजांप्रमाणेच निरनिराळे संस्कार आणि देवतांची पूजा करिता येईल. फक्त त्यांच्या विधींमध्ये वैदिक मंत्रांच्या ऐवजी पुराणांतील मंत्र असतील (पद्म ४·११०·२८६—२९३). त्यांना प्राणायाम करण्याचा अधिकार नव्हता तरी त्यांनी देवतेचे ध्यान करावे आणि 'ओम्' च्या ऐवजी 'शिव' हा शब्द उच्चारावा. (पद्म ४·११०·३१६).

पुढे क्रमाक्रमाने काही काहीं बाबतींत वैदिक ग्रंथांत सांगितलेले विधी मागे पडून त्यांच्याजागी पुराणोक्त विधि प्रचारात आले. देवपूजा करिताना नृसिंह आणि इतर पुराणांत सांगितलेल्या पद्धतीप्रमाणे चालावे असे अपरार्कानें (पा.१४) म्हटले आहे. पद्मपुराणात (४·९४६६ प्रभृति) धनशर्मा नावाच्या एका मनुष्याची कथा वर्णन केली असून त्यात म्हटले आहे की एखाद्याने पुष्कळ शास्त्रांचे आणि अनेक वेदांचे अध्ययन केले असले, परंतु जर त्याने पुराणांचे अध्ययन केले नसले तर त्या मनुष्याला विद्वत्ता प्राप्त होत नाही.

अशा रीतीने पुराणांचे महत्त्व क्रमाक्रमाने वाढत गेले. प्रथम प्रथम पुराणांनी सांगितलेला धर्म वेदांनी सांगितलेल्या धर्मापेक्षा कमी प्रतीचा समजला जात असे. पुढे धर्म हा वैदिक, तांत्रिक आणि मिश्र असा तीन प्रकारचा असल्याचे पुराणे म्हणूं लागली आणि त्यांपैकी कोणत्याही पद्धतीने आपल्या इच्छेप्रमाणे विष्णूची पूजा करण्यास प्रत्यवाय नसल्याचे भागवत (११·२७·७) आणि पद्म (४·९०·३।४) मध्ये सांगितले आहे.

भविष्यपुराणात (ब्रह्मपर्व १·४३।४७) असे म्हटले आहे की १८ पुराणे, रामायण आणि महाभारत हे ग्रंथ चारही वर्णांकरिता आणि विशेषतः शूद्रांकरिता असणारी धर्मशास्त्रे आहेत. ह्यावरून असे स्पष्ट होते की पुराणे, रामायण आणि महाभारत ह्या ग्रंथांत पुरातन परंपरा आणि विचार ह्यांचा समावेश केला असून सामान्य लोकांच्या शिक्षणाची आणि ज्ञानप्राप्तीची साधने ह्या दृष्टीने त्या ग्रंथांची रचना करण्यात आली असल्याचे समजले जात असे. शूद्रांना वैदिक मंत्र वाचण्याचा अथवा ऐकण्याचा अधिकार नसला तरी त्यांना वैदिक मंत्र समाविष्ट केलेली पुराणे वाचता येतात किंवा नाही असा प्रश्न उपस्थित झाला आणि त्याबद्दल निरनिराळी मते अस्तित्वात आली. काही ग्रंथकारांनी म्हटले आहे की शूद्रादिकांनी पुराणे स्वतः वाचू नयेत परंतु एखाद्या बाह्मणाने वाचलेली पुराणे शूद्राने श्रवण करण्यास प्रत्यवाय नाही. (नृसिंह पुराण ५८·१३) बुद्धाचा उपदेश शूद्रासहित सर्व लोकांकरिता असल्याकारणाने इ. स. च्या पूर्वीच्या काही शतकांच्या काळात शूद्रांची प्रवृत्ती बुद्धाच्या उपदेशाकडे स्वाभाविकपणे झाली असावी आणि बुद्धधर्मीय म्हणविणाऱ्यामध्ये सर्वात अधिक संस्था शूद्रांची असावी. ज्या विद्वान ब्राह्मणांना बहुजनसमाजाला बुद्धधर्माच्या शिकवणीपासून परावृत्त करावयाची इच्छा होती त्यांनी सहस्त्रावधि नवे पौराणिक मंत्र तयार केले आणि त्यांचा उपयोग श्राद्ध, व्रते ह्यांच्यासारख्या सर्व धार्मिक विधींमध्ये केला. ह्या कारणाने जुने निबंधग्रंथकार शूद्रांना पौराणिक मंत्र म्हणू देण्यास तयार झाले होते. नारदीय पुराणात (२·२४·१५।२४) असे म्हटले आहे की जे काही वेदांमध्ये दिसून येत नाही ते सर्व स्मृतीत आढळते; जे वेद आणि स्मृति ह्या दोहोंत दिसून येत नाही ते पुराणात सांगितलेले असते; वेद, स्मृति आणि पुराणे ह्यांनी जे सांगितलेले असते ते वेदच असते; जो मनुष्य पुराणांकडे अन्य दृष्टीने पाहील तो खालच्या दर्जाच्या प्राण्यांच्या जन्माला जाईल.

लोकांच्या धार्मिक विधींमध्ये, रूढींमध्ये आणि उद्दिष्टांत पुराणांनी अनेक उल्लेखनीय बदल घडवून

आणले. अल्प श्रमाने अतिशय मोठे फल कसे प्राप्त करून घेता येईल हे सांगणे हाच पुराणांचा सर्वात अधिक महत्त्वाचा हेतु असतो आणि हेच पुराणांचे वैशिष्ट्य असते. विष्णु पुराणात (६·२) असे वर्णन केले आहे की प्रत्येकाने तो ज्या समाजात जन्मला असेल त्या समाजातील आपले कर्तव्य अथवा आपण स्वतः अंगिकारलेले कर्तव्य केलेच पाहिजे आणि ह्याप्रमाणे आचरण केले तर त्याला मग तो ब्राह्मण असो अथवा शूद्र असो तीच उच्च परम गती प्राप्त होते. हेच तत्त्व भगवद्गीतेमध्ये (१८·४५।४६) सांगितले आहे. वेद आणि उपनिषदे ह्यांच्यासारख्या प्राचीन ग्रंथांत, वेदान्त-सूत्रांत स्त्रिया आणि शूद्र ह्यांना उच्च आध्यात्मिक स्थिती आणि मोक्ष कसे प्राप्त होऊ शकतील ह्याबद्दल फारच क्वचित विचार केलेला आहे. भगवद्गीतेने आणि पुराणांनी भारतीय समाजातील लहान थोर सर्व दर्जाच्या लोकांच्या मनोवृत्तीत बदल घडवून आणला आणि सर्वांना असे आश्वासन दिले की जे कोणी आपले कर्तव्य एक सामाजिक कर्तव्य अशा बुद्धीने करितात, ऐहिक फलाची आकांक्षा बाळगीत नाहीत, ज्या व्यवसायात ते गुंतले असतील त्या व्यवसायातील आपली सर्व कर्मे देवाला अर्पण करितात त्या सर्वांना एकाच प्रकारची आध्यात्मिक स्थिती अथवा उच्च लोक प्राप्त होतील. अशा रीतीने पारलौकिक सौख्य प्राप्त होण्याचे सोपे मार्ग पुराणांनी सर्व लोकांना दाखवून दिले हे स्पष्टपणे दिसून येते.

बौधा. ध. सू. (२·४·३०), मनु (३·२६) आणि वसिष्ठ (११·२८) ह्यांनी निक्षून सांगितले आहे की श्राद्धामध्ये अधिक संख्येने ब्राह्मण बोलावू नयेत कारण त्यामुळे आमंत्रितांचा योग्य सत्कार, योग्य स्थळ आणि काळ, शुद्धता आणि योग्य ब्राह्मण मिळणे हे पाच लाभ नष्ट [सत्क्रियां देशकालौ च शौचं ब्राह्मणसम्पदः।
पञ्चैतान् विस्तरो हन्ति तस्मान्नहत विस्तरम् ॥
मनु. (३·२६).] होतात. अनुशासनपर्व (९०·२) मध्ये असे सांगितले आहे की देवांप्रीत्यर्थ करावयाच्या विधींमध्ये ब्राह्मणांची विद्या, कुलशील ह्यांची परीक्षा करिताना फार खोलात जाऊ नये, परंतु पितरांप्रीत्यर्थ करावयाच्या विधींमध्ये ह्या गोष्टींची सूक्ष्म परीक्षा करणे योग्य आहे. पुराणांनी ह्या दोन्ही सूचनांच्या विरुद्ध उपदेश केला आहे. श्राद्धामध्ये आणि एकादशीचे व्रत करण्याच्या बाबतीत भरपूर खर्च करावा आणि कंजूषपणा (वित्तशाठ्य) करू नये असे पुराणांनी वारंवार सांगितले आहे. पद्म (१·९·१८१) मध्ये म्हटले आहे की श्राद्धामध्ये कंजूषपणा न केल्यास पितरांना संतोष होतो. ब्रह्म [वित्तशाठ्येन यो धर्म करोति स तु पातकी।
ब्रह्मपुराण (१२३·१७४) ] मध्ये म्हटले आहे की जो मनुष्य कंजूष पणाने एखादे धार्मिक कृत्य करितो तो पातकी होय. गया येथील ब्राह्मणांच्या शीलाच्या चिकित्सेबद्दल वायुपुराण (८२·२७) मध्ये आणि मथुरा येथील ब्राह्याणांच्या बाबतीत वराहपुराण (१६५·५५ आणि ५७) मध्ये अशी शिफारस केली आहे की त्यांच्या शीलाची परीक्षा करू नये. पद्म (५·२९·२१२) मध्येही असेच सांगितले आहे. वायु, वराह आणि पद्ममधील हे सर्व श्लोक मागाहून घुसडून दिले असणेही असंभवनीय नाही. ज्यावेळी बुद्धधर्माची चलती होती त्यावेळी बुद्धधर्मीय भिक्षूंच्या अनेक जमावांना लोक जेवण देत असत. इ. स. च्या १२ व्या अथवा १३ व्या शतकाच्या सुमारास जेव्हा बुद्ध धर्माला उतरती कळा लागली आणि तो भारतातून नष्ट झाला तेव्हा पूर्वी बुद्धधर्भीय भिक्षूंना ज्याप्रमाणे जेवण देत असत त्याप्रमाणे गरीब ब्राह्मणांना भोजन घालण्यात मोठे पुण्य आहे असे लोकांना वाटू लागले आणि ह्या सर्वसाधारण लोकमताला मान देऊन त्याचा अनुवाद पुराणांनी केला असण्याचाही संभव आहे. कारण जर सर्वसाधारण लोकांचा त्या मतावर विश्वास नसता तर पुराणे लिहिणाऱ्या तथाकथित लबाड ब्राह्मणांनी कितीही अधिक श्लोक पुराणांत घुसडून दिले असते तरी त्यांचा काहीही परिणाम झाला नसता. पाश्चात्य आणि भारतीय असे दोन्ही प्रकारचे लेखक १९ व्या अथवा २० व्या शतकातील विचारसरणीच्या आधारावर एक हजार वर्षांच्या पूर्वी अथवा त्यापेक्षाही पूर्वी होऊन गेलेल्या पुराणांच्या रचनाकारांवर अतिशय कडक आणि बेसुमार टीका करीत असतात. परंतु अशा लेखकांनी इ. स. च्या १० व्या शतकाच्या सुमारापासून १५ व्या शतकापर्यंतच्या कालातील युरोपमधील ख्रिस्ती धर्मातील

धर्मगुरूंची आणि धर्मोपदेशकांची मते, त्यांनी केलेले धर्मच्छल आणि त्या धर्मातील मठवासीयांची परिस्थिती ह्यांच्याबरोबर भारतातील त्याच काळातील ब्राह्मणांच्या परिस्थितीची तुलना केली तर त्यांना युरोप खंडातील परिस्थिती भारतातील परिस्थितीपेक्षा कितीतरी अधिक भयंकर असल्याचे आढळून येईल.

सर्वसाधारण परिस्थिती वर सांगितल्याप्रमाणे असल्यामुळे दाने (विशेषतः अन्नदान), तीर्थयात्रा, पुण्यकारक जलात केलेले स्नान, व्रते, अहिंसा, भक्ति, ईश्वराच्या नावाचा जप, श्राद्धे इत्यादि गोष्टींची पुराणांनी अतिशय प्रशंसा केली. तसेच तीर्थयात्रा आणि तीर्थात केलेले स्नान ह्या कृत्याची वेदांनी सांगितलेल्या मोठ्या खर्चाच्या आणि श्रम लागणाऱ्या यज्ञांशी तुलना करण्याचा उपक्रम पुराणांनी केला. वनपर्व (अ. ८२) मध्ये ह्या दोन प्रकारच्या कृत्यांमधील विरोध वर्णन केला असून असे म्हटले आहे की पुण्यक्षेत्रांची यात्राकेल्याने जे फल प्राप्त होते तसे फल विपुल दक्षिणा देऊन केलेल्या अग्निष्टोमासारख्या यज्ञापासून मिळत नाही. ह्याच प्रमुख कारणास्तव अनुशासन पर्वात आणि पुराणात उपवासांची आणि व्रतांची प्रशंसा केली आहे आणि उपोषणांची योग्यता यज्ञांच्या बरोबरीची अथवा यज्ञांपेक्षाही अधिक असल्याचे [श्रेष्ठं विष्णुव्रतं विप्र तत्तुल्या न शतं मखाः।
कृत्वा क्रतुं व्रजेत्स्वर्गं वैकुण्ठं कार्तिकव्रती॥
पद्म (३·२१·२९).] सांगितले आहे. (अनु. १०७·५।६, पद्य. ३·२१·२९).

प्रथमतः **दाना**विषयी विचार करू. ऋग्वेदाच्या काळापासून दानासंबंधी फार प्रशंसापूर्ण वर्णने करण्यात आली आहेत. दानासंबंधी विवेचन मागे खंड २ मध्ये करण्यात आले आहे. प्रस्तुत ठिकाणी अन्नदान आणि ब्राह्मणांना द्यावयाचे दान ह्या दोनच मुद्यांविषयी थोडेसे विवेचन करण्यात येईल.

**अन्नदान**. जो मनुष्य देवांना आणि आपल्या मित्रांना अन्न न देता त्याचा उपयोग केवळ स्वतःचेच पोट भरण्याकरिता करितो तो केवळ पातकी असतो असे ऋग्वेद (१०·११७·६) मध्ये म्हटले आहे. मनु (३·११८), विष्णु ध. सू. (६७·४३) आणि भगवद्‌गीता यांतही अशाच प्रकारची भावना व्यक्त केली आहे. गृहस्थाश्रमी पुरुषाने नित्य करावयाच्या पंचमहायज्ञांच्या बुडाशी सर्व विश्वावर दया करावी आणि उपकार करावा ही उदात्त तत्त्वे आहेत आणि मनुष्यामनुष्यांमध्ये भेद उत्पन्न करणारे सामाजिक उच्चनीच भाव अस्तित्वात असले तरीही सर्व जग एकाच श्रेष्ठ तेजाने व्यापलेले असते आणि त्यामुळे सर्व जगत् एकमेकांचे नातलग बनते ही निरंतर मनात वागवावयाची भावना ह्या गोष्टी आहेत. जरी गेल्या काही वर्षांत अन्नाचे दुर्भिक्ष, महागाई आणि सरकारातून अन्नाचे नियमित वाटप ह्यांच्यामुळे ह्या भावनांना बराच धक्का बसला आहे तरी ती भावना जवळजवळ चालू काळापर्यंत चालत आली आहे.

**ब्राह्मणांना दान** देण्याचे महत्त्व धर्मशास्त्रात वर्णन केले आहे. प्रथम ही गोष्ट लक्षात ठेवणे अवश्य आहे की सर्वच ब्राह्मण पूर्वीच्या काळी देखील पुरोहितपणा करीत नसत आणि आधुनिक काळीदेखील सर्वच ब्राह्मण पुरोहित नसतात. भारतातील सर्वच देवालयातील आणि देवस्थानातील पुजारी ब्राह्मण नाहीत. देवालयातील पुजारी हा प्रकार बऱ्याच अलिकडील काळात उत्पन्न झालेला आहे आणि प्राचीन काळी असा व्यवसाय करणाऱ्या ब्राह्मणांना कमी दर्जाचे मानले जात असे आणि आधुनिक काळातही अशा पूजाऱ्यांबद्दल तशीच भावना अस्तित्वात आहे. देवालयातील मूर्तीची पूजा मोलाने करणाऱ्या ब्राह्मणाला श्राद्धामध्ये आमंत्रण करू नये असे मनु (३·१५२) मध्ये दर्शित केले आहे. दारिद्र्य, साधी राहणी आणि उच्च विचारसरणी,वाङ्मय आणि संस्कृति ह्यांचा लाभ पुढील पिढीला करून देणे, धनार्जनासंबंधी खटपट न करणे, वेद आणि शास्त्रे ह्यांच्या अध्ययनात एकनिष्ठपणे राहणे ह्या गोष्टीच फार प्राचीन काळापासून ब्राह्मणांच्या पुढे आदर्श म्हणून ठेवण्यात आल्या आहेत. ब्राह्मण धर्मकृत्यातील दान स्वीकारण्यास पात्र

असला तरी त्याने अशा दानांचा स्वीकार करू नये असे याज्ञ. (१·२१३) मध्ये सांगितले आहे. अशा उच्च भावना ब्राह्मणांत कायम राहाव्या ह्या कारणाकरिताच राजाने विद्वान ब्राह्मणांना गाई, सुवर्ण आणि भूमी ह्यांचे दान द्यावे आणि त्यांना घरे, कन्या आणि विवाहोपयोगी सामग्री दान द्यावी असा नियम याज्ञ. (१·३३३) मध्ये सांगितला आहे आणि अशा प्रकारची दाने राजेलोक देत असत असे शिलालेखांवरून आढळून येते. आजकाल प्राचीन भारतातील उच्च संस्कृति आणि विद्येची परंपरा ह्यांच्या महत्त्वासंबंधी लोक बोलत असतात. परंतु त्या वैदिक आणि संस्कृत भाषेतील विशाल वाङ्मयाची सहस्त्रावधि वर्षेपर्यत जोपासना, वाढ आणि प्रसार मुख्यत्वेकरून प्राचीन आदर्शाला चिकटून राहिलेल्या काही ब्राह्मणांनीच केला. ब्राह्याणांना केवळ आपले कर्तव्य म्हणून वेदांचे आणि वेदांगभूत शास्त्रांचे अध्ययन करावे लागे, त्यांचा अर्थ समजून घ्यावा लागे, आधी कोणताही मोबदला न मागता वेद आणि शास्त्रे दुसऱ्यांना शिकवावी लागत, स्वतः दुसऱ्यांना दाने द्यावी लागत. त्यांचा द्रव्यप्राप्तीचा महत्त्वाचा मार्ग यज्ञकर्मामध्ये आणि धार्मिक विधींमध्ये पौरोहित्य करणे आणि दान स्वीकारणे हाच असे. त्यांचे द्रव्यप्राप्तीचे मार्ग कमीअधिक होणारे आणि अनिश्चित असे असत. युरोपातील ख्रिस्ती धर्मोपदेशकांप्रमाणे भारतामध्ये ब्राह्मणांची धर्मसंघटना अस्तित्वात नव्हती. ह्या कारणाने ब्राह्मणांना आपल्या उदरनिर्वाहाकरिता राजाकडे अथवा एखाद्या धनिक मनुष्याकडे याचना करावी लागे. गौत. ध. सू. ९·६३ मध्ये 'योगक्षेमार्थमीश्वरमधिगच्छेत्' असा नियम सांगितला आहे. प्राचीन काळी देखील प्रत्येक ब्राह्मण दान स्वीकारण्यास सत्पात्र नसे. याज्ञ (१·२००) [न विद्यया केवलया तपसा वापि पात्रता ।
यत्र वृत्तमिमे चोभे तद्धि पात्रं प्रकीर्तितम् ॥
याज्ञ. (१·२००).] मध्ये पात्र ब्राह्मणाची एक छोटीशी परंतु चपखल अशी व्याख्या पुढीलप्रमाणे दिली आहे : "केवळ विद्येने अथवा केवळ तपश्चर्येने पात्रता उत्पन्न होत नाही; ज्याच्या ठिकाणी हे दोन गुण आणि सदाचरण असतात तो दान स्वीकारण्याला पात्र आहे असे म्हटले जाते."

जेव्हा बुद्धधर्म लोकप्रिय झाला आणि त्याला राजाश्रय मिळाला तेव्हा ब्राह्मणांना अनेक गोष्टी कराव्या लागल्या, त्यांना ब्राह्मणांची संख्या मोठ्या प्रमाणावर कायम ठेवावी लागली, वेदाध्ययनात तत्पर राहणाऱ्या ब्राह्मणांच्या चरितार्थाची तजवीज करावी लागली, आणि प्रचलित बुद्ध धर्मातील शक्य तितक्या मतांचा समावेश आपल्या स्वतःच्या ग्रंथांत करून त्या धर्माशी तडजोड करावी लागली. वेदाध्ययनाला लागणारी स्मरणशक्ती, बुद्धि आणि दीर्घकाळपर्यंत करावा लागणारा प्रयत्न ह्या गोष्टी प्रत्येक ब्राह्मणात असणे शक्य नसल्यामुळे शेकडो ब्राह्मण पोसले गेले तरच काही थोडे पात्र ब्राह्मण त्यांच्यामध्ये उत्पन्न होण्याची शक्यता असते. ह्या करिता ब्राह्मणांची संख्या वाढविणे अवश्य होते आणि अशा ब्राह्मणांनी आपली शक्ती आणि काळ ह्यांचा स्वतःच्या उदरनिर्वाहाकरिता काम करून अपव्यय करू नये म्हणून त्यांना पोसणे अवश्य होते. मुख्यत्वेकरून ह्याच कारणास्तव ब्राह्मणांना दाने देण्याविषयी काही पुराणांनी सतत आणि आग्रहपूर्वक विनवण्या केल्या आहेत.

ज्या काळात बहुतेक पुराणांची रचना करण्यात आली त्या काळी ब्राह्मणांना अनेक मोठमोठ्या अडचणींनी आणि विरोधी शक्तींनी घेरले होते. ख्रि. पू. ३ ऱ्या शतकापासून इ. स. च्या ७ व्या शतकापर्यंतच्या काळात बुद्ध धर्माला अशोक, कनिष्क आणि हर्ष ह्यांच्यासाख्या थोर राजांच्या अमलाखाली राजाश्रय मिळाला होता. बुद्ध धर्म हा वास्तविकपणे जातींच्या विरुद्ध नसून तो यज्ञयागांची पद्धति, मोक्षप्राप्तीचा मार्ग दाखविण्याचा वेदांचा अधिकार ह्या गोष्टींच्या विरुद्ध होता. बुद्ध हा हिंदु धर्मातील मोठा सुधारक होता. त्याने नैतिक वर्तन, अहिंसा, सत्य इत्यादि गुणांना अधिक महत्व दिले. हे गुण हिंदु धर्मामध्ये पूर्वीच समाविष्ट केलेले असून ते हिंदुधर्माचे भागच झाले होते आणि आजमितीला देखील ते तसेच मानले जातात. ज्याने जगाचा त्याग केला असेल त्याने सुखाकरिता प्रयत्न आणि निरर्थक तपश्चर्या ही दोन टोके टाकली पाहिजेत

आणि हाच त्याने शोधून काढलेला ज्ञान आणि निर्वाण प्राप्तीचा मार्ग होता. बुद्धाने आणि त्याच्या शिष्यांनी सर्वांना शिकविलेली ही तत्वे आकर्षक होती आणि त्यातही शूद्रांना ती विशेषेकरून आकर्षक होती. कारण त्यांना वैदिक धर्मामध्ये वेदाचे अध्ययन करिता येत नसे इतकेच नव्हे तर त्यांच्या दृष्टीसमोर देखील कोणाला वेदाध्ययन करिता येत नसे आणि त्यांना तीन उच्च वर्णांची सेवा करावी लागे. अशी स्थिती असली तरीदेखील संपूर्ण भारत बुद्धधर्मानुयायी झाला नव्हता. परंतु राजाश्रयामुळे आणि बुद्ध धर्मातील आकर्षक गोष्टींमुळे मोठा समाज प्राचीन धर्माचा त्याग करील असा धोका उत्पन्न झाला होता.

बुद्धाने आणि बुद्धाच्या निर्वाणानंतरच्या पहिल्या एकदोन शतकांत बुद्धाच्या शिष्यांनी ज्या बुद्धधर्माचा प्रसार केला तो मूळचा बुद्ध धर्म जगातील दुःखापासून मुक्तता मिळविण्याची इच्छा करणाऱ्या व्यक्तींनी पाळावयाचे कडक नीतिनियम ह्या स्वरूपाचा होता. पुढे असे वाटू लागले की आपल्या स्वतःच्या मोक्षाची चिंता करणे आणि त्याकरिता प्रयत्न करणे ही गोष्ट काहीशी स्वार्थी स्वरूपाची आहे आणि ज्याअर्थी बुद्धाने आपल्या आयुष्यभर लोकांना मुक्तीच्या मार्गाला नेण्याकरिता खटपट केली त्या अर्थी बुद्धाच्या अनुयायांनी देखील आपल्या संगतीतील लोकांच्या दुर्देवी स्थितीबद्दल करुणा येऊन त्यांची त्या परिस्थितीतून मुक्तता करण्याकरिता खटपट केली पाहिजे आणि त्याकरिता आपल्या स्वतःच्या निर्वाणाची पर्वा न करिता आणि .संसाराची भीति न बाळगिता पुनः पुनः जन्म घेण्यासही तयार असले पाहिजे. अशा प्रकारच्या वागण्याच्या जीवनक्रमाला '**महायान**' (मोठे वाहन अथवा मोठा मार्ग) असे नाव मिळाले आणि केवळ स्वतःच्या निर्वाणाकरिता करण्याच्या जीवनक्रमाला **'हीनयान'** (लहान वाहन अथवा खालच्या दर्जाचा मार्ग) असे नाव पडले. बुद्ध धर्माने अर्धे आशिया खंड व्यापले ते केवळ त्या धर्माने निर्वाणाची प्राप्ती होते ह्या आश्वासनाच्या आधारावर नसून त्या धर्मातील दयाळूपणा, परोपकार बुद्धि, चांगुलपणा, सौजन्य इत्यादि उदात्त तत्त्वांमुळेच होय. महायान आणि हीनयान ह्या दोन्ही पंथातील उपदेश आपआपल्या परीने आकर्षक आहेत.

बुद्ध धर्मानुयायांनी पुढील पाच गोष्टी (**पंचशील**) अवश्य पाळल्या पाहिजेत असे बुद्ध धर्माने सांगितले आहे : कोणत्याही जीवाला इजा न करणे (अहिंसा) आणि जीवाचा नाश न करणे, चोरी न करणे (अस्तेय), स्त्री- पुरुष संबंधामध्ये दुराचरण न करणे (अव्यभिचार), खोटे न बोलणे (सत्य), मादक पेय न पिणे (सुरापान निषेध), ही पंचशीले उपनिषदांवरून घेतली होती ही गोष्ट उघड आहे. छां. [तदेष श्लोकः।स्तेनो हिरण्यस्य सुरां पिबंश्च गुरोस्तल्पमावसन्ब्रह्महा चैते पतन्ति चत्वारः पञ्चमश्चाचरंस्तैरिति।
छां. उप. (५·१०·९).] उप (५·१०·९) मध्ये पुढील अर्थाचा एक प्राचीन श्लोक उद्धृत केला आहे. "सुवर्णाची चोरी करणारा, मद्यप्राशन करणारा, गुरुपत्नीशी व्यभिचार करणारा, ब्रह्महत्या करणारा हे चार पतन पावतात आणि ह्या चारांबरोंबर सहवास करणारा पाचवा हाही पतन पावतो." अशा रीतीने अहिंसा, अस्तेय प्रभृती गोष्टींना प्राचीन अशा उपनिषदात देखील पूर्वीच महत्त्व दिले होते. सर्व संपत्तीचा त्याग करून संन्याशाने उदरनिर्वाहाकरिता भिक्षा मागणे ही गोष्ट बृहदारण्यक (३·५·१), जाबाल, (५), प्रभृति उपनिषदांनी स्पष्टपणे सांगितली होती. बुद्ध धर्मातील भिक्षूंकरिता जे कडक नैतिक वर्तन सांगितले होते त्याबद्दलचे नियम हिंदु धर्मातील संन्याशांकीरता सांगितलेल्या नियमांसारखेच होते आणि त्यातील सर्व तपशील धर्मसूत्रातून आणि धर्मशास्त्रामधून घेतलेला होता.

**अहिंसा**. उपनिषदे, धर्मसूत्रे, महाभारत आणि पुराणे ह्यांनी अहिंसेला फार महत्त्व दिले आहे. उदा. छां. उप. (३·१७·४), बृह. उप. (५·२), गौत. ध. सू. (८·२४।२५), महाभारत (आदि ११·१३।१४), वामन (१४·१।२) पद्य (१·३१·२६।२८) इ. इत्यादी.

चमत्काराची गोष्ट अशी आहे की सिंहलद्वीप, चीन, जपान प्रभृति बुद्ध धर्मानुयायी म्हणविणाऱ्या अनेक देशांतील लोक मत्स्य आणि मांस भक्षण करण्याला कोणतीही हरकत घेत नसत. परंतु पुराणांनी आग्रहपूर्वक केलेला उपदेश मानणारे भारतामधील लक्षावधी लोक (केवळ ब्राह्मणच नव्हे तर वैष्णव सांप्रदायातील वैश्य आणि शूद्र देखील) बुद्धधर्म भारतातून नाहीसा झाल्यानंतरही शेकडो वर्षे कडक रीतीने **शाकाहारी** आहेत.

तथापि ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे की काही पुराणांना अहिंसेचा अतिरेक केलेला आवडत नाही. उदा. ब्रह्माण्ड आणि वायू ह्या दोन्ही पुराणांनी असे सांगितले आहे की जर एखाद्या मनुष्यांच्या मृत्यूमुळे अनेक लोक सुखात जिवंत राहू शकत असतील तर अशा (क्रूर अथवा आततायी) मनुष्याची हत्या करण्याने लघु अथवा कोणतेही पातक लागत नाही. (ब्रह्माण्ड [यस्मिंस्तु निहते भद्रे जीवन्ते बहवः सुखम्।
तस्मिन् हते नास्ति शुभे पातकं चोपपातकम् ॥
ब्रह्माण्डपुराण (२·३६·१८८).]. वायु ६९·१६२).

**पूर्त.** लोकोपयोगी कृत्ये करणे, परोपकार, समाजसेवा, गरीब आणि आपद्ग्रस्त लोकांना साहाय्य करणे ह्यांच्यासारख्या कृत्यांना **पूर्तधर्म** अशी संज्ञा असून पुराणांनी अशा पूर्तधर्माचें अत्यंत महत्त्व वर्णन केले आहे. इष्टापूर्त हा शब्द ऋ. (१०·१४·८) मध्ये एकदा आला आहे. आणि इष्ट हा शब्द ऋ. (१·१६२·१५) इत्यादी आणि पूर्त हा शब्द ऋ.(६·१६·१८) इत्यादी ठिकाणी आला आहे. तसेच छां. उप. (५·१०·३), प्रश्न (१·९), मुंडक. (१·२·१०) इत्यादि उपनिषदांतही इष्टापूर्त हा शब्द आला आहे. मनु (४·२२७) मध्ये अशी शिफारस केली आहे की प्रत्येकाने इष्ट आणि पूर्त स्वरूपाची दाने आपल्या सामर्थ्यानुरूप पात्र ब्राह्मण दिसल्यावर द्यावी. मार्कण्डेय (१६·१२३।२४), पद्म (६·२४३·१०।१४) प्रभृति पुराणांनी तसेच अनुशा. (अ. ५८) ह्यात इष्टापूर्त धर्माची प्रशंसा केली आहे. वराहपुराणात (१७२·३३) आणि यम (६८) प्रभृति काही स्तृतीत ह्यांच्याही पुढे जाऊन असे सांगितले आहे की इष्ट कृत्यांनी (म्हणजे यज्ञांनी) मनुष्याला केवळ स्वर्गाची प्राप्ति होते, परंतु पूर्त कृत्यांच्या योगाने त्याला मोक्षाची प्राप्ती होते. इष्ट म्हणजे यज्ञ आणि पूर्त म्हणजे विहिरी तलाव बांधण्यासारखी कृत्ये करणे अशा व्याख्या अमरकोशात [त्रिष्वथ क्रतुर्मेष्टं पूर्व खातादिकर्मणि ।
अमरकोश] दिल्या आहेत.

केव्हा केव्हा पुराणांत समाजसेवा आणि आर्तपरित्राण (म्हणजे दुःख-पीडितांचे दुःख आणि संकट निवारण करणे) हाच सर्वश्रेष्ठ धर्म असल्याचे सांगितले आहे. अशा वेळी पुराणांनी आधुनिक विचार प्रदर्शित केल्यासारखे वाटते. मार्कण्डेय (१५·५७ आणि ६२) मध्ये एक राजा म्हणतो की आर्तांचे दुःख निवारण करण्यामुळे जे सुख प्राप्त होते तसे सुख लोकांना स्वर्गात अथवा ब्रह्मलोकात देखील प्राप्त होत नाही. भागवत [यावद् भ्रियेत जठरं तावत्स्वत्वं हि देहिनाम् ।
अधिकं योऽभिमन्येत स स्तेनो दण्डमर्हति ॥
भागवत (७·१४·८.)] मध्ये आधुनिक समाजवादी लोकांच्याही पुढची पायरी असलेले असे विधान केले आहे की जेवढ्याने स्वतःचे पोट भरेल तेवढ्यावरच मनुष्याची सत्ता असते. त्यापेक्षा अधिक वस्तूंवर माझी सत्ता आहे असे म्हणणारा मनुष्य **चोर** असून तो कायद्याने शासन करण्यास पात्र असतो.

**भक्ति**. पुराणांनी भक्तीचे अतिशय महत्त्व वर्णन केले आहे. ऋग्वेदा मध्येही भक्तीच्या काही सिद्धांतांचा मागोवा लागतो. ऋ. ३·४३·४; १०·४२·११ ह्यांत इंद्राला सखा म्हणजे मित्र म्हटले आहे. ऋ. १·१०४·९ मध्ये इंद्र पित्यासारखा असल्याचे म्हटलें आहे. एका भक्ताजवळ सोमवल्ली कुटण्याची साधने

नव्हती म्हणून त्याने आपल्या दातांनी सोमवल्ली चावून रस काढला आणि इंद्राने तो प्राशन केला अशी कथा वर्णन केली आहे. त्या कथेवरून रामायणात वर्णन केलेल्या आपल्या दातांनी चावून पाहून रामाला बोरे अर्पण करणाऱ्या शबरीच्या (भिल्लिणीच्या) कथेची आठवण येते. भक्ति हा शब्द उपनिषदांत आलेला नाही. तथापि केवळ देवाची कृपाच भक्ताचे संरक्षण करू शकते हे भक्तिपंथाचे तत्त्व कठ (२·२२) आणि मुंडक (३·२·३) ह्या उपनिषदांत सापडते. ज्याची देवाच्या ठिकाणी सर्वात अधिक भक्ति असते आणि जशी देवाच्या ठिकाणी तशीच गुरूच्या ठिकाणी असते त्या महात्म्याला (येथे) सांगितलेल्या गोष्टी कळू लागतात [यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ।
तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः॥
श्वेताश्व. उप. (६·२३).] (श्वेता. उप. ६·२३).

तथापि भक्तिपंथाची मूळ उगमस्थाने शांतिपर्वातील (अ. ३२२।३३९ सं.आ.) **नारायणीय प्रकरण** आणि भगवद्गीता ही आहेत. शांतिपर्व (३३५ २४।२५) मध्ये **सात्वत** आणि **पांचरात्र** ह्या दोहोंचा उल्लेख करून ते दोन्ही पंथ एकच असल्याचे म्हटले आहे. तसेच पांचरात्र शास्त्राची उत्पत्ती मरीचि, अत्रि प्रभृति सात ऋषींपासून झाल्याचे सांगून ते शास्त्र जगतात अधिकृत होईल असे नारायणाने त्या ऋषींना सांगितले होते असे वर्णन केले आहे. शांति (३४८·८) मध्ये भगवंतांनी अर्जुनाला सांगितलेल्या गीतेचा स्पष्ट उल्लेख केला, असून (३४९·६४) मध्ये असे म्हटले आहे की सांख्य, योग, पांचरात्र, वेद आणि पाशुपत ही पांच शास्त्रे असून त्यांची मते भिन्न भिन्न प्रकारची आहेत आणि त्यांचे प्रवक्ते कपिल (सांख्य), हिरण्यगर्भ (योग), अपांतरतमस् (वेद), शिव (पाशुपत), आणि स्वतः भगवान् (पांचरात्र) हे आहेत. पांचरात्र शास्त्राला वेदांचा आधार आहे असे रामानुज पंथाच्या सारखे काही ग्रंथकार म्हणतात तर अपरार्क (पा.१३) आणि परिभाषाप्रकाश (पा. २३) हे ग्रंथ पांचरात्रशास्त्र 'अंशतः' वैदिक असल्याचे सांगतात.

वेदान्तसूत्रामध्ये भागवत अथवा पांचरात्र पद्धतीसंबंधी चार सूत्रे आहेत. त्यांच्या अर्थाविषयी थोर आचार्यांची एकवाक्यता नाही. शंकराचार्यांच्या मते ह्या चारही सूत्रांत भागवत धर्माच्या काही तत्वांचे खंडन केले आहे आणि रामानुजाचार्यांच्या मते ह्या चारांपैकी फक्त २ सूत्रांत भागवतधर्माचे खंडन केले आहे. भगवान वासुदेव हेच सर्व श्रेष्ठ सत्य आहे, तो वासुदेव संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध अशा चार मूर्ती धारण करतो, त्याची पूजा म्हणजे वासुदेवाचे एकाग्र मनाने ध्यान करणे ही भागवतधर्माची तत्त्वे आक्षेप घेण्यासारखी नाहीत, परंतु संकर्षण हा वैयक्तिक आत्मा वासुदेवापासून उत्पन्न होतो, प्रद्युम्न (मन) हा संकर्षणापासून उत्पन्न होतो आणि अनिरुद्ध (अहंकार) हा प्रद्युम्नापासून उत्पन्न होतो ही जी दुसरी तत्त्वे आहेत ती आक्षेपार्ह आहेत असे शंकराचार्यांनी म्हटले आहे. वेदान्तसूत्रावरील (२·२·४५) शंकराचार्यांच्या भाष्यावरून असे दिसते की त्यांच्या काळी असे मानले जात असे की भागवत अथवा पांचरात्र शास्त्राचा प्रवर्तक शांडिल्य होता आणि शांडिल्याला चारही वेदांपासून श्रेष्ठ प्रकारचे सुख (श्रेय) प्राप्त न झाल्यामुळे त्याने हे शास्त्र निर्माण केले. महाभारतात पांचरात्राशी नारदाचा संबंध जोडला आहे. शांतिपर्व (३३६·१००।१०१ सं. आ.) मध्ये असे म्हटले आहे की चार वेदांशी आणि सांख्य आणि योग ह्यांच्याशी संबंध असलेले आणि पांचरात्र अशी संज्ञा असलेले श्रेष्ठ उपनिषद् (गुह्यतत्त्व) प्रथमतः नारायणाच्या मुखातून उच्चारले गेले आणि तेच पुन्हा एकदा नारदाकडून सांगितले गेले.

भक्तिपंथाचे दुसरे मोठे आधार म्हणजे भगवद्गीता, भागवतपुराण आणि विष्णुपुराण हे होत. पैकी भगवद्गीतेचा स्पष्ट निर्देश नारायणीय प्रकरणात (शांति. ३३६·८) केला आहे. गीतेमध्ये भक्ति आणि भक्त हे शब्द अनेकवेळा आले आहेत. नारायणभक्तिसूत्रे, नारदपांचरात्र, शांडिल्यभक्तिसूत्र आणि दुसऱ्या अनेक पांचरात्रसंहिता हे ग्रंथ गीतेच्या मागाहून झालेले आहेत. अग्नि (३९·१।५) मध्ये पांचरात्र शास्त्रावरील २५

ग्रंथांची नावे दिली आहेत. भक्तिपंथासंबंधी फार विस्तृत वाङ्मय उपलब्ध आहे.

शांडिल्याने भक्तीची व्याख्या 'सा परानुरक्तिरीश्वरे' अशी केली आहे. ह्या सूत्राच्या अर्थाविषयी मतवैचित्र्य आहे. शांडिल्यसूत्रावरील भाष्यकार स्वप्नेश्वर ह्याला 'देवाच्या ठिकाणी दृढभावनेचे प्रेम हाच भक्तीचा सर्वश्रेष्ठ प्रकार असतो' हा अर्थ मान्य आहे आणि 'भक्ति ही देवाच्या ठिकाणी दृढ असणारी प्रीती असते' हा अर्थ नारदभक्तिसूत्र, टिळक प्रभृतींना मान्य आहे. विष्णुपुराणात 'भक्ति' ह्या शब्दाच्या ऐवजी 'अनुराग' हा शब्द योजला आहे. (विष्णु ४·४·१०३).

**प्रपत्ती** (आत्मनिवेदन) ही भक्तीहून वेगळी असल्याचे रामानुजप्रभृति इतर वैष्णवसांप्रदायांच्या ग्रंथांत सांगितले आहे. गीता (२·७) मध्ये अर्जुनानं स्वतःला 'प्रपन्न' असे म्हटले आहे. आणि गीतेच्या शेवटी केलेल्या 'तुझे मन माझ्या ठिकाणी स्थिर कर, माझा भक्त हो, माझ्याप्रीत्यर्थ यज्ञ कर, मला नमस्कार कर, तू निश्चयाने माझ्याकडे येऊन पोचशील इ.' (१८·६५।६६) उपदेशामध्ये जे सांगितले आहे त्यालाच मागाहूनच्या काळात झालेल्या ग्रंथांनी 'प्रपत्ती' असे नाव दिले आहे.

गीता आणि महाभारतातील नारायणीय प्रकरण ह्यांत एक फार मोठा भेद आहे. जरी गीतेमध्ये परमात्म्याला **वासुदेव** म्हटले आहे तरी नारायणीयातील चार व्यूहांचा सिद्धान्त गीतेमध्ये मुळीच दिला नाही. इतकेच नव्हे तर संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध ही नावे देखील गीतेमध्ये आली नाहीत. प्रस्तुत ग्रंथकाराच्या मते गीता हा ग्रंथ नारायणीय प्रकरणापेक्षा प्राचान काळचा आहे. कारण गीतेमध्ये भक्तीच्या सर्वसाधारण तत्त्वांचे प्रतिपादन केले आहे परंतु नारायणीयामध्ये आलेला पांचरात्र हा अनेक भक्तिपंथांपैकी केवळ एक पंथ आहे. शिवाय, नारायणीय प्रकरणात असे दर्शित केले आहे की गीता त्यापूर्वीच प्रकट झालेली असून श्वेतद्वीपाहून नारदाने आणलेले ज्ञान हरिगीतेसारखे आहे. (अ. ३४६·१०।११, ३४८·५३।५४). मध्ययुगीन काळात झालेल्या धर्मशास्त्रावरील बहुतेक ग्रंथकारांचे पांचरात्राविषयीचे सर्वसाधारण मत असे आहे की पांचरात्र आणि पाशुपत ही शास्त्रे ज्या बाबतीत वेदविरुद्ध नसतील त्याबाबतीत केवळ अधिकृत समजावी. (कृत्यरत्नाकर पा. ३७ वरील पारिजात मधील अवतरण). काही पुराणांनी वासुदेव हा शब्द वसुदेवाचा पुत्र ह्या नात्याने वसुदेवापासून झालेला आहे असे न सांगता वस् धातूपासून झाला असल्याचे सांगितले आहे. विष्णुपुराण (६·५·८०) मध्ये म्हटले आहे की, 'सर्व जीव परमात्म्याचे ठिकाणी वास करतात. आणि वासुदेव सर्व जीवांचा आत्मा ह्या रूपाने वास करितो, म्हणून त्या परमात्म्याला वासुदेव असे म्हणतात.' गीता (९·२९) मध्येही ही कल्पना आली आहे. "मी सर्व भूतांना सम असतो. कोणीही मला अप्रिय अथवा कोणीही प्रिय नसतो, परंतु जे माझी उपासना निष्ठापूर्वक करितात ते माझ्या ठिकाणी वास करितात आणि मीदेखील त्यांच्या मध्ये वास करितो."

'भागवत' हा शब्द 'भगवत्' ह्या शब्दावरून झालेला आहे. ऐश्वर्य, [ऐश्वर्यस्य समग्रस्य वीर्यस्य यशसः श्रियः।
ज्ञानवैराग्ययोश्चैव षण्णां भग इतीरणा ॥
एवमेष महाञ्छब्दो मैत्रेय भगवानिति ।
परमब्रह्मभूतस्य वासुदेवस्य नान्यगः ॥
विष्णुपुराण (६·५·७४ आणि ७६)] वीर्य, यश, श्री, ज्ञान, वैराग्य ह्या सहा गुणांच्या समुच्चयाला 'भग' अशी संज्ञा असून भगवान हा शब्द परब्रह्मस्वरूप असणाऱ्या वासुदेवाला लागतो, दुसऱ्या कोणाला लागत नाही. जो मनुष्य भगवन्ताची उपासना करितो तो **भागवत** असे विष्णुपुराण (६·५·७४ आणि ७६) यांत सांगितले आहे. भगवान् हा शब्द फार प्राचीन अशा ख्रि. पू. काळच्या शिलालेखांतही आढळतो. क्वचित ठिकाणी तो शब्द शिवाला देखील लावलेला आढळतो. श्वेताश्वतर (३·११) मध्ये शंकराला भगवान म्हटले आहे आणि

काही पुराणांत आणि शिलालेखांत 'महाभागवत', 'परम भागवत' हे शब्द आले आहेत. पद्म (६·२८०·२७) मध्ये महाभागवताची अशी व्याख्या दिली आहे की तप्तमुद्रादि पाच संस्कार झालेला, नवविधा भक्ति जाणणारा, जीव, ईश्वर, उपाय इत्यादि पाच तत्त्वे जाणणारा अशा ब्राह्मणाला 'महाभागवत' म्हणांवे.

प्राचीन काळच्या ग्रंथांत कर्ममार्ग, भक्तिमार्ग आणि ज्ञानमार्ग अशा तीन मार्गांचा (पंथांचा) उल्लेख केलेला असतो. ह्या ठिकाणी भक्ति आणि ज्ञान ह्या दोन पंथांविषयी थोडेसे विवेचन करणे अवश्य आहे. हे दोन पंथ मोक्ष ह्या एकाच ध्येयाकडे जात असल्याचे मानण्यात येते. तथापि ते ध्येय प्राप्त करून घेण्याच्या त्या दोन पंथांच्या पद्धतींमध्ये भेद आहे. ज्ञानपंथामध्ये (अथवा अव्यक्तोपासनेमध्ये) ब्रह्म म्हणजेच परमात्मा आणि निर्वाण असे पुस्तकी ज्ञान झाल्यानेच केवळ मोक्षप्राप्ती होत नाही तर गीता (२·७२) मध्ये वर्णन केलेली **ब्राह्मी स्थिती** (ब्रह्माशी ऐक्यतेची स्थिति) यावी लागते आणि ही ब्राह्मी स्थिति फार परिश्रमाने आणि दीर्घ अभ्यासानेच केवळ प्राप्त होते. ज्ञानमार्गामध्ये मनुष्य जे जे कर्म करील ते ते ब्रह्मार्पण करावे लागते. भक्तिमार्गामध्ये भक्त फक्त देवाच्या इच्छेला आपणास वाहून घेतो आणि तो जे जे कर्म करितो ते ते वासुदेवासारख्या (सगुण आणि व्यक्त) उपास्यदेवतेला अर्पण करितो. गीतेमध्ये (१२·२।७) म्हटल्याप्रमाणे दोघेही भक्त भगवंतालाच प्राप्त होतात; तथापि अव्यक्त ब्रह्माच्या उपासकाला कष्ट अधिक पडतात आणि देवाला सर्व कर्मे अर्पण करणाऱ्या सगुण उपासकाचा देव त्वरित उद्धार करतो. भक्तिमार्गाविषयी गीता (९·२) मध्ये असे म्हटले आहे की 'भक्तिमार्गाने प्राप्त होणारे ज्ञान, सर्व विद्यांमध्ये श्रेष्ठ **(राजविद्या)**, सर्व गुह्यामध्ये श्रेष्ठ **(राजगुह्य)** आणि सुखकारक असते. ते प्रत्यक्ष बोध होण्यासारखे, धर्माला अनुसरून, अव्यय आणि आचरण्यास सोपे असे आहे आणि अशा रीतीने गीतेच्या मताप्रमाणे **भक्तिमार्ग** हा **ज्ञानमार्गापेक्षा अधिक सुलभ आहे.**

भागवत (७·५·२३।२४) मध्ये भक्ति नवविधा (म्हणजे नऊ प्रकारची) असल्याचे सांगितले आहे. ते नऊ प्रकार म्हणजे श्रवण, कीर्तन, विष्णुस्मरण, पादसेवन, पूजन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन (देवाला आपला आत्मा अर्पण करणे) ह्या होत. नारदभक्तिसूत्रामध्ये (८३) भक्ति ११ प्रकारची असल्याचे सांगितले आहे. ह्या सर्व प्रकारच्या भक्ति एकाच वेळी करावयाच्या नसतात. एखादा भक्त ह्या नवांपैकी कोणतीही एक प्रकारची भक्ती करून तिच्या योगाने खरा भक्त होऊ शकतो आणि देवाचा प्रसाद प्राप्त करून घेऊ शकतो आणि मोक्ष मिळवू शकतो. (शांडि.सूत्र.७३) गीता (७·१६।१७) मध्ये भक्त चार प्रकारचे (आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी आणि ज्ञानी) असल्याचे सांगून पुढे म्हटले आहे की जो नेहमी निष्कामबुद्धीने आणि अनन्य भावाने भवित करितो तो ज्ञानी भक्तश्रेष्ठ असतो. विष्णुपुराण (२·६·३९) मध्ये म्हटले आहे की कृष्णाचे नाम उच्चारणे हे कृत्य सर्व प्रायश्चित्तांपेक्षा अधिक श्रेयस्कर असते. ज्याच्यापासून सर्व भूतमात्रांची उत्पत्ती झाली आणि ज्या परमात्म्याने हे सर्व जगत व्यापले आहे त्या परमात्म्याची उपासना, फलाची अपेक्षा न करिता, आवश्यक कर्तव्याचे आचरण करून केल्यास मनुष्याला सिद्धि प्राप्त होते (गीता १८·४६). गीतेच्या ह्या मुख्य सिद्धांताला **'निष्कामकर्म'** असे म्हणतात आणि तो सिद्धान्त पुराणांनी मान्य केला आहे. उदा. विष्णु (२·३·२५), अग्नि (अ. ३८१), पद्म (अ. १७१।१८८), कूर्म (१·३·२१), मार्कण्डेय (९२·१५), भागवत (११·३·४६) इ.

ईशावास्य (१६), तैत्ति. उप. (३·४), बृह. उप (२·४·१४) ह्यांच्यासारख्या उपनिषदांत प्रतिपादन केलेला अद्वैतसिद्धांत हा ज्ञानी लोकांकरिता आहे. उपनिषदांनी सामान्य लोकांकरिता ईश्वरासंबंधी अथवा मनुष्याच्या अंतिम ध्येयासंबंधी अथवा ईश्वराच्या प्राप्तीच्या मार्गासंबंधी फारच थोडे सांगितले आहे आणि त्यांनी सामान्य मनुष्यांच्या समस्यांचा प ऱ्हार केलेला नाही. गीतेने सामान्य मनुष्यांचा प्रश्न हातात घेतला

आणि अगदी खालच्या पातळीवरील मनुष्याला असे दाखवून दिले की त्याला जीवनात आशेचे स्थान आहे; जर अशा मनुष्याने आपल्या वर्णाला आणि आश्रमाला अनुरूप असणारी सर्व नित्याची कर्तव्ये देवाला अर्पण केली तर एकमेव सत्य असणारा परमेश्वर त्या मनुष्याच्या जीवनात प्रविष्ट होईल. मनुष्याने जर परमेश्वरावर प्रेमपूर्वक निष्ठा ठेवली आणि तो परमेश्वराला सर्वस्वी शरण गेला तर प्रत्येकाला मोक्ष प्राप्त होईल.गीता (९·३०।३२) मध्ये अशी घोषणा केली आहे की "अत्यंत दुर्वर्तनी मनुष्य देखील जर अनन्य भक्तीने माझी उपासना करील तर तो साधुच समजावा, कारण त्याच्या बुद्धीचा निश्चय चांगला झालेला असतो तो लवकरच धर्मात्मा होतो आणि शाश्वत शांतीला पोचतो. हे अर्जुना! माझा भक्त कधीही अधोगतीला जात नाही हे तू पक्के समज, कारण हे पार्था! माझा आश्रय करून स्त्रिया, वैश्य, शूद्र अथवा नीच कुलात जन्मलेले लोकदेखील परमश्रेष्ठ गतीला जातात." शांडिल्यभक्तिसूत्रा (७८) मध्यही अशाच प्रकारचे प्रतिपादन केले आहे. पुराणांनीही गीतेसारखेच सांगितले आहे आणि काही पुराणांनी तर गीतेपेक्षाही अधिक स्पष्टपणे आणि आग्रहपूर्वक सांगितले आहे. उदा. पद्म (१·५·१०), (४·१०·६६), भागवत (२·४·१८) इत्यादीमध्ये गीतेच्या सारखीच विधाने केली आहेत. ह्या प्रकारची विधाने केवळ वायफळ स्वरूपाची नसून ती फार मोठ्या प्रमाणात आचरण्यात येत असत. मध्ययुगीन काळात देखील भारतामध्ये मीराबाई आणि आंडाल (दक्षिणभारत) ह्यांच्या सारख्या स्त्रीसंत, नंद, चोखामेळा (महाराष्ट्र), रायदास (रामानंदाचा एक चमार जातीचा शिष्य), अजामीळासारखा पातकी ह्यांना संत म्हणून मान दिला जात असे. कबीर (मुसलमान कोष्टी) आणि तुकाराम ह्यांना बहुधा फारसे पुस्तकी शिक्षण मिळालेले नव्हते, परतु त्यांनी रचलेली भक्तिपर पदे पुराणप्रिय सनातनी. ब्राह्मणांसहित सर्व हिंदु म्हणत असतात.

इ. स. च्या ११ व्या शतकापासून पुढे वायव्य दिशेकडून भारतावर झालेल्या मुसलमानांच्या स्वाऱ्यांनी आणि त्यांनी केलेल्या आक्रमणाने हिंदूंना मोठे आव्हान मिळाले आणि त्या परिस्थितीला अनेक उपायांनी प्रतिकार करण्यात आला. अशा उपायांतील **पहिला उपाय** म्हणजे स्मृतिग्रंथांवर विस्तृत अशा **निबंधग्रंथांची रचना** हा होय आणि अशा निबंधग्रंथांपैकी आज उपलब्ध असणारा सर्वात जुना ग्रंथ उत्तर भारतात झालेला लक्ष्मीधर कृत 'कृत्यकल्पतरू' (रचना इ. स. १११०-११३० च्या सुमारास) हा एक असून हेमाद्रिकृत ग्रंथ (इ. स. च्या १३ व्या शतकाचा ३ रा चरण) हा दक्षिण भारतातील ग्रंथ आहे.

**दुसरा आणि अत्यंत महत्त्वाचा उपाय** धार्मिक स्वरूपाचा होता. इ. सनाच्या १३ व्या शतकापासून १७ व्या शतकापर्यंत धर्माचे अभूतपूर्व प्रमाणावर पुनरुज्जीवन झाले आणि त्यात भारतातील सर्व भागात ज्ञानेश्वर, नामदेव, रामानंद, कबीर, चैतन्य, दादू (राजस्थान), नानक, वल्लभाचार्य, एकनाथ, तुकाराम ह्यांच्यासारखे (आणि दुसरे कमी प्रख्यात असलेले) अनेक संत आणि योगी उत्पन्न झाले. त्या सर्वांची मूलभूत सिद्धांताच्या बाबतीत एकवाक्यता होती. ते सिद्धान्त म्हणजे ईश्वराचे एकत्व, आत्मशुद्धीची आवश्यकता, जातीसंबंधी अभिमानाचा आणि उपासनेच्या तपशीलाचा निषेध, मोक्षाकरिता देवाला शरण जाणे इत्यादी.

**तिसरा उपाय** म्हणजे विजयनगर (इ. स. १३३०·१५६५), शिवाजी आणि पेशवे ह्यांच्या सत्तेखाली असलेले मराठी राज्य आणि पंजाबमधील शिखांचे राज्य ह्यांच्यासारख्या राज्यांची. स्थापना.

वर उल्लेख केलेल्या भक्तीच्या तत्त्वांचा हिंदु समाजातील सर्व थरांतील लोकांवर फार परिणाम झाला आणि त्या तत्त्वांचा पुरस्कार पुराणांनी केल्यामुळे हिंदु लोकांना बुद्ध धर्मापासून परावृत्त करण्याच्या कामी त्यांची फार मदत झाली. इतकेच नव्हे तर बुद्ध धर्मातील महायान पंथाने भक्तीच्या सिद्धांताचा

स्वीकार केला आणि मिलिंद प्रश्न आणि सद्धर्म पुंडरीक ह्यांच्यासारख्या ग्रंथात गीतेशी तंतोतंत जुळणारी वाक्ये आली आहेत. गीतेमध्ये अन्य धर्माविषयीचे सहिष्णुपणाचे आणि अशा धर्मांशी जुळते घेण्याचे आश्चर्यकारक धोरण आढळते. उदा. गीता (९·२३) मध्ये म्हटले आहे की 'जे श्रद्धापूर्वक अन्य देवतांची उपासना करितात तेदेखील पर्यायाने माझीच उपासना करितात' भागवत (१०·४०·८।१०), शांतिपर्व (३४१·३६) ह्यांतही अशाच स्वरूपाचे प्रतिपादन केले आहे. ह्या तत्वाचे बीज ऋ [एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निंयमं मातरिश्वानमाहुः ॥
ऋ (१·१६४·४६).] (१·१६४·४६) मधील 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति' ह्या ऋचेत आढळते.

भक्तिमार्गाचा प्रसार करण्याच्या उत्साहाच्या भरात पुराणांनी केव्हा केव्हा अतिशयोक्तीचाही अतिरेक केला. उदा. वामन (९४·६३) आणि पद्म (६·२४५·८५) ह्यांनी असे म्हटले आहे की "पृथ्वीवरील सर्व तीर्थे आणि पुण्यक्षेत्रे ह्यांचे दर्शन घेण्याने जे पुण्य प्राप्त होईल ते पुण्य विष्णूच्या नामांचा जप केल्याने मनुष्याला प्राप्त होईल." पद्म पुराणात (६·१९१·१२ प्रभृति) असे वर्णन केले आहे की 'सहस्त्रावधि अश्वमेध यज्ञ आणि शतावधि वाजपेय यज्ञ हे शुकाने कथन केलेल्या भागवत पुराणाच्या सोळाव्या अंशाइतकेही होण्याच्या योग्यतेचे नसतात. जो मनुष्य भागवतातील अर्धा अथवा पाव श्लोक नित्य पठण करितो त्याला राजसूय आणि अश्वमेध यज्ञाचे पुण्य प्राप्त होते. [एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः ॥
ऋ. (१·१६४·४६).]

अशाच तऱ्हेचा अतिरेक भागवत (६·१·२०) प्रभृति पुराणांत वर्णन केलेल्या अजामिळाच्या कथेमध्ये केला आहे. त्या कथेत म्हटले आहे की अजामिळाने आंपल्या ब्राह्मणजातीच्या पत्नीचा त्याग करून एक शूद्र दासी रखेली ठेविली होती व त्याचे आचरण नीतिभ्रष्ट होते. अशा प्रकारचा तो अजामिळ ८० व्या वर्षी आसन्नमरण झाला असताना त्याने त्या दासीपासून झालेल्या नारायण नावाच्या लहान असणाऱ्या पुत्राला प्रेमाने हाक मारली आणि त्या नावाच्या उच्चारामुळे तो सर्व पातकांपासून मुक्त झाला आणि त्याला दुर्लभ असे स्थान प्राप्त झाले.

अशा प्रकारच्या कथांवरून सर्वसामान्य लोकांच्या मनात असा विश्वास उत्पन्न झाला की मृत्युसमयी आलेल्या विचाराला अनुरूप असा नवा जन्मप्राप्त होतो. (अन्ते मतिः सा गतिः). अंतकाळच्या विचाराच्या महत्त्वासंबंधी अशाच प्रकारचे प्रतिपादन छां. उप. (३·१४·१), बृह. उप. (४·४·५) मिलिंद प्रश्न ह्यांत केले आहे. अंतःकरणपूर्वक उच्चारलेले देवाचे एक नाव, पश्चात्ताप होऊन भवितपूर्वक केलेले एक कृत्य, ह्यांच्या योगाने आणि परमेश्वराला अनन्य भावाने शरण जाण्याने आयुष्यभर केलेल्या अपराधांच्या आणि पातकांच्या फलाचा नाश होण्याचा संभव असतो हेच अजामिळाच्या कथेचे तात्पर्य आहे. परंतु त्यामुळे अतिशय गैरसमज होऊन अशा कल्पना होण्याचा धोका आहे की एखाद्या मनुष्याने आपल्या मृत्युसमयी देवांचे स्मरण केले आणि देवाचे नाव उच्चारले तर त्याने आपल्या आयुष्यात शक्य तितकी पातके केली असली तरी तो त्या पातकांपासून मुक्त होईल. गीता (८·५।७) मध्ये हा मुद्दा यथार्थ स्वरूपात मांडला आहे. त्यात म्हटले आहे की 'जो मनुष्य मरणसमयी माझेच स्मरण करीत हा देह सोडतो, तो माझ्या स्वरूपास प्राप्त होतो, ह्यात संशय नाही. कारण तो त्या स्वरूपाच्या चिंतनात नित्य मग्न होता. म्हणून तू **सर्वकाळी** माझे स्मरण कर आणि युद्ध कर. मन आणि बुद्धि माझ्या चरणी तू अर्पण केलीस म्हणजे तू निःसंशय मलाच येऊन मिळशील." गीतेतील ह्या वचनावरून असे सूचित केले जाते की एखादा मनुष्य जर सर्व आयुष्यभर आपली कर्मे करीत असताना देखील देवाच्या नावाचे स्मरण करीत असेल आणि त्याला कर्मफलाची आसक्ती नसेल तरच त्याला मृत्युसमयी देवाच्या नावाचे स्मरण होईल आणि जो मनुष्य आपल्या सर्व आयुष्यभर दुष्ट वर्तन करणारा आणि मोठा पातकी असेल त्याला अंतकाळी देवाच्या नावाचे स्मरण होणे असंभवनीय अथवा जवळ जवळ अशक्य

असते. हीच कल्पना गीता (८·१०।१३) ह्या श्लोकात तसेच (१७·३, यो यच्छ्रद्धः स एव· सः) ह्या श्लोकात जोरदारपणाने मांडली आहे.

देव एक आहे आणि त्याची उपासना कोणत्याही देवतेच्या स्वरूपात केली तरी त्या परमात्म्याला पोचते असा सिद्धान्त असूनदेखील वैष्णव आणि शैव परस्परांशी झगडत असतात आणि परस्परांची निंदा करीत असतात. काही पुराणांनी असे सांगण्यास सुरुवात केली की बौद्ध आणि जैन हे असुर आणि देवांचे शत्रू असून त्यांना देवाने बुद्धिपुरःसर मोहमार्गाला लावले. उदा. मत्स्य (२४·४३।४९) मध्ये म्हटले आहे की इंद्राच्या विनंतीवरून बृहस्पतीने जिन धर्माचा एक वेदविरुद्ध ग्रंथ रचिला आणि त्या ग्रंथाच्या योगाने रजीच्या पुत्रांना मोह पाडला आणि मग इंद्राने त्यांचा वध केला. अग्नि (१६·१।४) मध्ये असे सूचित केले आहे की बौद्धांना विष्णूने मोह पाडला. जैन आणि बौद्ध ह्यांची निंदा करून झाल्यावर काही पुराणांनी इतके म्हणण्यासही कमी केले नाही की जो ब्राह्मण वैष्णव नसेल तो पाखंडी असतो. (पद्म. ६·२६२·२७) पद्मपुराणात पुढे असे म्हटले आहे की स्वतः विष्णूनेच बुद्धाचे रूप धारण करून एका मिथ्या शास्त्राचा प्रसार केला. त्याच पुराणात असे वर्णन केले आहे की पाशुपतशास्त्र, कणादाचे वैशेषिक शास्त्र, गौतमाचे न्यायशास्त्र, कपिलाचे सांख्यशास्त्र, बृहस्पतीकृत चार्वाकशास्त्र ही सर्व मिथ्या शास्त्रे तामस आहेत. तसेच शंकराचार्यांचा मायावाद हे मिथ्याशास्त्र असून ते प्रच्छन्न (गुप्तपणे) बौद्धमत आहे. जैमिनीचे पूर्वमीमांसा हे शास्त्रदेखील निरीश्वरवादी असल्यामुळे निषिद्ध आहे. (पद्म. ६·२७३·६७।७१ व ७५।७६) पंथाभिमान आणि हटवाद इतक्या थरापर्यंत गेला की ब्रह्माण्डपुराणात (३·३६·१८।२०) अगस्ति आणि राम ह्यांच्या संवादात अगस्तीने म्हटले आहे की कृष्णाची १०८ नावे इतकी प्रभावी आहेत की विष्णूच्या १००८ नावांच्या तीन आवृत्त्या केल्याने प्राप्त होणारे पुण्य कृष्णाच्या (म्हणजे विष्णूच्याच अवताराच्या) १०८ नावांपैकी एक नाव एक वेळा म्हटल्याने मिळेल.

भागवत (१·१·४८।५०) आणि पद्म (६·१८९·५४।५६) ह्या दोन्ही पुराणांत असे सांगितले आहे की भक्तिपंथाचा उद्भव द्राविड देशात झाला, त्याची वाढ कर्णाटकात झाली, तो पंथ महाराष्ट्रात फक्त थोड्या ठिकाणी आढळतो आणि त्या पंथाला गुर्जर देशात जीर्णता आली, कलियुगात त्या पंथाचे पाषांडी लोकांनी तुकडे केले आणि तो क्षीण अवस्थेत दीर्घकाळपर्यंत राहिला, परंतु तो वृंदावनात जाऊन पोचल्यावर त्याला पुन्हा नवी टवटवी येऊन त्याने सुंदर रूप धारण केले. भागवत (११ वा स्कंद) यातही अशाच तऱ्हेचे विधान पुनः एकदा केले असून असे म्हटले आहे की कलियुगात द्राविड देशात ताम्रपर्णी, कृतमाला, कावेरी आणि पश्चिमवाहिनी महानदी ह्या नद्या वाहतात त्या देशात नारायण-परायण लोक मोठ्या प्रमाणात उत्पन्न होतील. जे लोक त्या नद्यांचे पाणी प्राशन करितात ते सामान्यतः वासुदेवभक्त असतात. (भागवत ११·५·३८।४०).

मोठमोठ्या नैतिक आणि आध्यात्मिक आन्दोलनांना कालांतराने अत्यंत दुर्बलावस्था प्राप्त होऊ लागते. तशी अवस्था भागवत पंथाची झाली असावी असे दिसते. अत्रिस्मृतीमध्ये (श्लो. ३८४) भागवत पंथाचा उपरोधिक शब्दात निर्देश केला आहे. त्यात म्हटले आहे की वेदविहीन असे लोक (व्याकरण, वेदान्त इत्यादि) शास्त्रांचे अध्ययन करितात, इतरांना पुराणे वाचून दाखवितात आणि ज्यांना तेदेखील साधन नाही ते **भागवतपंथी** होतात. ह्याचा भावार्थ असा दिसतो की भागवत पंथाचे लोक आळशी असून ते वेदाचे अथवा शास्त्रांचे अध्ययन करीत नाहीत, त्यांना चरितार्थ चालविण्याकरिता इतरांना पुराणे देखील वाचून दाखविता येत नाहीत आणि ते आपण विष्णूचे अथवा कृष्णाचे भक्त असल्याचे ढोंग करितात (म्हणजे 'बोवा' बनतात) आणि त्यांनी देवाच्या प्रीत्यर्थ सर्व संगांचा त्याग केला आहे असे मोहाने समजणाऱ्या इतर

लोकांनी दिलेल्या अन्नादिकावर उदरनिर्वाह करून पुष्ट होतात.

भक्तिपंथात उत्पन्न झालेली दुसरी एक विशिष्ट घटना म्हणजे चैतन्य आणि वल्लभाचार्य ह्यांनी स्थापन केलेला **'मधुराभक्ति'** ह्या नावाचा कृष्ण आणि राधा ह्यांच्या उपासनेशी संबंध असलेला वैष्णव सांप्रदाय ही होय. वल्लभाचार्यांनी स्थापन केलेल्या भक्तिपंथामध्ये गुरूला अत्यंत महत्त्व देण्यात येते; हा गुरु वल्लभाचार्यांच्या वंशातील असून त्याला जवळजवळ देवासारखा मान देण्यात येतो. रामायणात आणि लोकात ज्याला आदर्श पुरुष मानण्यात येते त्या रामाच्या भक्तीचा एक चमत्कारिक परिणाम होऊन स्थापन झालेल्या एका गूढ सांप्रदायातील भक्तांना आपण रामाची पत्नी असल्याचे अथवा सीतेच्या सख्या असल्याचे मानावे लागते. वल्लभाचार्यांच्या सांप्रदायातील अनुयायांना गुरूला कृष्ण आणि स्वतःला राधिका मानावे लागते.

**मंत्र.** वेदातील मंत्रांप्रमाणेच पुराणांतील मंत्रांना फार महत्त्व देण्यात येते. त्याच्या अनुषंगाने मंत्रांविषयी आणि विशेषतः वैदिक मंत्रांविषयी थोडेसे विवेचन करणे अप्रस्तुत होणार नाही. 'मंत्र' हा शब्द ऋग्वेदामध्ये बऱ्याच वेळा आला आहे. काही ठिकाणी (ऋ. १०-९५-१ आणि १०-१९१·३) त्या शब्दाचा अर्थ 'वाटाघाट, एकत्र विचार करणे' असा असावा असे दिसते. काही ठिकाणी मंत्र ह्या शब्दाच्या ऐवजी स्तोम अथवा ब्रह्म, गिर्, धीति, मनीषा, वचस्, सूक्त अशासारख्या शब्दांचा उपयोग केलेला असतो.

वैदिक मंत्रांचा अर्थ आणि त्यांचा उद्देश ह्यांच्याविषयी बरेच मतवैचित्र्य अस्तित्वात आहे. पूर्वमीमांसा शास्त्राच्या मताप्रमाणे संपूर्ण वेद हा यज्ञाकरिता असतो. वेदाचे **मंत्र** आणि **ब्राह्मण** असे दोन विभाग असतात. **विधी** (कार्याला प्रेरणा देणारी वाक्ये) हा वेदामधील अत्यंत महत्त्वाचा भाग असतो. वेदवचनांपैकी बरीचशी वचने केवळ अर्थवादाची असतात म्हणजे त्यांत विधींची प्रशंसा केलेली असते अथवा त्यांचा खुलासा लाक्षणिक रीतीने करावा लागतो अथवा त्यात पूर्वीच अस्तित्वात असलेल्याच गोष्टींची पुनरावृत्ती केलेली असते अथवा त्यात आख्यायिका सांगितलेल्या असतात अथवा एखाद्या यज्ञात करावयाच्या क्रियांची यजमानाला अथवा पुरोहिताला आठवण करून देण्याचे कार्य करणे एवढाच उद्देश असतो.

यास्काचार्याच्या बऱ्याच पूर्वी (ख्रि. पू. अनेक शतके) वेदांचा अर्थ लावण्याच्या ऐतिहासिक, प्राचीन याज्ञिक, परिव्राजक ह्यांच्यासारख्या अनेक परंपरा अस्तित्वात होत्या. निरुक्तामध्ये ह्या भिन्न भिन्न परंपरांव्यतिरिक्त आग्रायण, औदुंबरायण, कौत्स, गार्ग्य, गालव प्रभृति व्युत्पत्तिशास्त्रकारांचा उल्लेख केला आहे. काही मंत्रांचे दोन अर्थ दिले आहेत, काहींचे दोहोपेक्षा अधिक अर्थही दिले आहेत. ऋ. (१·१६४·३९) ह्या ऋचेचा (ऋचो अक्षरे परमे व्योमन्) सायणाचार्यांनी चार प्रकारचा अर्थ लावला आहे. ऋ. (१·१६४·४५ चत्वारिवाक् परिमिता पदानि) ह्या ऋचेचा अर्थ सायणाचार्यांनी भिन्न भिन्न ६ प्रकारचा दिला आहे. ऋ. (४·५८·३), चत्वारिशृंगा० ही ऋचा कूटासारखी असून तिचे अर्थ फार प्राचीन काळापासून भिन्न भिन्न प्रकारचे करण्यात आले आहेत. काही. अर्थ **'अधिदैवत'** असतात, काही अर्थ **'अध्यात्म'** आणि काही **'अधियज्ञ'** असतात.

श्री. अरविंद घोष ह्यांनी ऋग्वेदातील मंत्रांविषयी एक नवीन उपपत्ती प्रवृत्त केली आहे. त्यांच्या मते वेदांचा एक खरा आणि गूढ अथवा गुप्त प्रकारचा अर्थ नेहमी अस्तित्वात असतो. ऋग्वेदामधील शब्द गुप्त अर्थाचे असतात आणि ते शुद्ध अंतःकरण असणाऱ्या आणि ज्ञानाने जागृत झालेल्या लोकाकरिता उच्चारलेले असतात; वेदातील कित्येक संपूर्ण सूक्तांचा सकृद्दर्शनी गूढ अर्थ असतो आणि त्यात ऋषींनी गुप्तता

राखण्यासाठी संस्कृत भाषेतील द्व्यर्थी शब्दांचा उपयोग केलेला असतो. प्रस्तुत ग्रंथकाराला ही उपपत्ती मान्य नाही आणि हा श्री. अरविंद ह्यांचा केवळ तर्क आहे. ऋग्वेदातील अत्यंत उदात्त विचार हा आहे की इंद्र, मित्र, वरुण, अग्नि, यम, मातरिश्वन् ह्या निरनिराळ्या देवतांच्या मागे एकच आत्मा (अथवा चैतन्य) आहे, आरंभी केवळ एकच तत्त्व होते आणि दिवस, रात्र, मृत्यु आणि अमृतत्त्व ह्यांच्यापैकी काहीही अस्तित्वात नव्हते. त्या एकाच तत्त्वाने हे सर्व आकार धारण केले होते. ह्या मूलभूत सत्यासंबंधी कोणतीही गुप्तता पाळण्यात आली नव्हती आणि ते सत्य ज्याला थोडेसे संस्कृतचे ज्ञान आहे अशा आजकालच्या सामान्य मनुष्याला देखील समजू शकतील अशा मंत्रांतून घोषित केले होते. अलिकडील काही शतकांतील आपल्या लोकांना काही मंत्रांचा अर्थ कळत नाही एवढ्यावरून प्राचीन काळच्या ऋषींनी काही तरी युक्त्यांचे अवलंबन करून बद्धिपुरस्पर दोन अर्थाच्या मंत्रांची रचना केली असे ठरत नाही. काही काही ठिकाणी त्या ऋषींनी (स्पष्ट आणि लाक्षणिक अशा) दोन अर्थांच्या ऋचा रचण्याचा काव्यशास्त्राचा खेळ केला असण्याचा संभव आहे. आम्हाला त्या ऋषींच्या मनातील अर्थ समजला नाही तर तो त्या ऋषींचा दोष नसून आपला स्वतःचाच दोष समजला पाहिजे आणि आपल्या कल्पनेने उत्पन्न केलेली अथवा आपल्या अज्ञानामुळे उत्पन्न झालेली क्लृप्ती त्या प्राचीन ऋषींना चिकटविता कामा नये. (निरुक्त १·१६) श्री. अरविंद आणि त्यांचे शिष्य श्री कपालीशास्त्री ह्यांनी आपल्या ग्रंथांत अनेक निराधार विधाने केली आहेत. त्यांचा समाचार प्रस्तुत सारांशग्रंथात घेणे शक्य नाही. तत्त्वज्ञान आणि तर्क ह्यांचे विवेचन केलेली अनेक सूक्ते ऋग्वेदामध्ये आहेत आणि अशा सूक्तांमध्ये गुप्तता राखण्याचा उद्देश मुळीच नाही. श्री. अरविंद ह्यांनी म्हटल्याप्रमाणे जर वैदिक ऋषींना केवळ सत्य, प्रकाश आणि जाणीव एवढ्यांचाच विचार करावयाचा असता तर त्याकरिता दहा हजार ऋचांची आवश्यकता नव्हती. श्री. अरविंद ह्यांनी मीमांसकांवर अशी टीका केली आहे की त्यांनी संपूर्ण वेद यज्ञाप्रीत्यर्थ आहे असे सरसकट विधान केले आणि त्यात त्यांनी अतिशयोक्ती केली. परतु तसे करण्याला मीमांसकांना सबळ आधार होते. ऋग्वेदाच्या रचनाकाळासारख्या अत्यंत प्राचीन काळी अत्यंत भानगडीचे अतिरात्र, त्रिकद्रुक ह्यांच्यासारखे यज्ञ करण्याचा प्रघात होता. परंतु मीमांसकांनी जर आपल्या सिद्धांतामध्ये थोडीशी अधिक अतिशयोक्ती केली असली तर श्री. अरविंद ह्यांनी आपल्या प्रतिपादनांत अतिशय अल्प आधारावर मीमांसकांपेक्षाही अधिक अतिशयोक्ती केली आहे.

तांत्रिक ग्रंथातील अक्षरे पुष्कळ वेळा अर्थहीन असतात. ऋग्वेदातील अक्षरांची तशी स्थिति नसून ऋग्वेदातील मंत्रांना अर्थ असतो. जै. (१·२·४१) ह्या सूत्रावरील भाष्यामध्ये शबरस्वामींनी म्हटले आहे की ज्यावेळी एखाद्या मंत्रांचा अर्थ लागत नसेल त्यावेळी इतर वेदवचनांच्या अर्थाचा विचार करून आणि निरुक्ताला आणि व्याकरणाला अनुसरून त्या शब्दांच्या धात्वर्थावरून काही तरी अर्थ लावावा लागतो.

**अवतार**. पुराणांत ज्या महत्त्वाच्या विषयांचा विस्तारपूर्वक विचार केलेला असतो त्यांपैकी अवतार हा एक आहे. अवताराच्या कल्पनेला पुराणांनी दिलेल्या महत्त्वामुळे धार्मिक पूजेच्या स्वरूपावर, व्रतांवर आणि उत्सवांवर बराच परिणाम झाला आहे. ह्या विषयाचे काही विवेचन मागे खंड २ मध्ये केले आहे. ह्या विषयावरील आणखी काही मुद्दे पुढे दिले आहेत. अवतार हा शब्द 'तृ' धातूला 'अव' उपसर्ग लागून बनलेला असून त्याचा अर्थ 'खाली उतरणे' असा होतो आणि तो शब्द देवांना लावण्यात येतो. जेव्हा देव मनुष्याचे अथवा एखाद्या प्राण्याचेही रूप धारण करतो आणि ज्या कार्याकरिता तसे रूप धारण केले असेल ते कार्य पुरे होईपर्यंत त्या रूपात राहतो तेव्हा देवाने तो अवतार घेतला असे म्हणतात. ख्रिस्ती धर्मात देखील देव असे अवतार धारण करितो अशी कल्पना आहे. परंतु त्या धर्मातील अवतार फक्त एकच वेळी आणि एका वशिष्ट प्रकाराने घडावयाचा असतो. परंतु गीता (४·५।८) आणि पुराणे ह्यात वर्णन केलेल्या हिंदुधर्मातील अवतारांच्या कल्पनेप्रमाणे देवाचे अनेक अवतार आतापर्यंत झाले आहेत आणि भविष्यकाळातही अनेक

अवतार व्हावयाचे आहेत. ज्या ज्या वेळी जगातील व्यवस्थेमध्ये गोंधळ उत्पन्न होतो, त्या त्या वेळी परमेश्वर पृथ्वीवर अवतार घेऊन येतो आणि जगाची व्यवस्था ठाकठीक करितो ही कल्पना सामान्य मनुष्याला फार समाधान प्राप्त करून देणारी आहे आणि असा विश्वास केवळ हिंदु आणि बुद्धधर्मी लोकातच प्रचलित नसून इतर अनेक लोकात (संपन्न आणि सुशिक्षित पाश्चिमात्य देशात) देखील तो अस्तित्वात आहे. तथापि शंकराचार्य, नानक, शिवाजी अथवा महात्मा गांधी ह्यांच्यासारखे थोर लोक, साधु अथवा धर्मसंस्थापक हे अवतार धारण करून पुनःपुनः जन्म घेतात असे बहुतेक हिंदु लोक मानीत नाहीत. बुद्ध धर्मातील महायान पंथाचे लोक असे मानतात की बुद्धाला बुद्धत्व प्राप्त होंण्यापूर्वी बोधिसत्त्व नावाचे अनेक अवतार धारण करावे लागले होते. आधुनिक काळातदेखील अनेक लोक देवाचे अवतार म्हणून वागतात अथवा त्यांचे चाहते अथवा अनुयायी त्यांना तसे वावरावयाला लावतात. भारतीयांची अवतारासंबंधीची कल्पना युग आणि मन्वतर ह्यांच्या कल्पनेशी जोडले आहे. जेव्हा जगात भयंकर अस्वस्थता निर्माण होते त्यावेळी अशा संकटातून लोकांची मुक्तता देवाच्या कृपेने होईल असे लोक मानतात आणि त्यांची अशी समजूत पुष्कळ वेळा साधार असते. कारण एखाद्या उदात्त ध्येयाने प्रेरित होऊन आणि एखाद्या विशिष्ट काळी आणि विशिष्ट स्थळी उपयुक्त होण्यासारखी उत्कृष्ट योजना घेऊन दैवी सामर्थ्याचे पुरुष मधून मधून उत्पन्न होत असतात.

देवाने निरनिराळे अवतार धारण केले ह्या गोष्टीलां पुराणातील आधार गीता (४·७।८) हा आहे. त्या श्लोकात श्रीकृष्णाने स्वतः म्हटले आहे की "ज्या ज्या वेळी धर्माचा ऱ्हास होतो आणि अधर्म माजतो, त्या त्या वेळी मी स्वतःला उत्पन्न करतो. साधूंचे संरक्षण करण्याकरिता, दुष्टांचा नाश करण्याकरिता आणि धर्माची संस्थापना करण्याकरिता मी युगायुगामध्ये प्रकट होतो." हीच कल्पना महाभारतात वन (२७२·७१),आश्वमेधिक (५४·१३) ह्यांच्या सारख्या दुसऱ्या ठिकाणीही आढळते. विष्णूचे मत्स्य, कूर्म, वराह प्रभृति दहा अवतार असल्याचे मध्ययुगीन कालात समजत असत आणि आधुनिक काळीही समजण्यात येते. वराह (४·२) प्रभृति श्लोकात ह्या दहा अवतारांची नावे दिली आहेत. भगवद्गीतेमध्ये ह्या दहा अवतारांपैकी कृष्ण आणि राम ह्यांच्याखेरीज दुसऱ्या कोणत्याही अवतारांचा नामनिर्देश केलेला नाही. अवतारांची संख्या आणि त्यांची नावे महाभारतात आणि इतर पुराणांत सर्वत्र एकसारखी नाहीत. शांतिपर्व (३३९·७७।१०२) मध्ये केवळ सहा अवतारांचे वर्णन केले आहे. हरिवंश (१·४१·११) मध्ये सहस्त्रावधि अवतार होऊन गेले असल्याचे आणि पुढेही सहस्त्रावधि अवतार होणार असल्याचे सांगितले आहे. भागवत (१·३·१।२५) मध्ये २४ अवतारांचा उल्लेख केला आहे. मत्स्य (९९·१४) आणि पद्म (५·१३·१८२।१८६) यांत बारा अवतारांची आणि भागवत (११·४·१७।२२) मध्ये १६ अवतारांची यादी दिली आहे. अहिर्बुध्न्य संहिता (५·५०।५७) मध्ये वासुदेवाच्या ३९ अवतारांची नावे दिली आहेत. विष्णूप्रमाणेच शिवाचेही अनेक अवतार झाल्याचे पुराणांनी वर्णन केले आहे. वायु (अध्या. २३) मध्ये महेश्वराच्या २८ अवतारांचा उल्लेख केला आहे. त्यांच्यापैकी शेवटचा अवतार नकुली (लकुली) हा आहे. पतंजलीच्या महाभाष्यात वामन आणि कृष्ण ह्या अवतारांची माहिती आली आहे. इ. स. १०६६ मध्ये रचलेल्या क्षेमेंद्रकृत दशावतारचरित ह्या काव्यात आणि (बंगालच्या लक्ष्मणसेन राजाच्या दरबारातील) जयदेवकविकृत गीतगोविंद ह्या काव्यात सुपरिचित दहा अवतारांचा उल्लेख केला झाहे. इ. स. च्या १२ व्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेलेल्या अपरार्काने मत्स्य पुराणातील दहा अवतारांसंबंधीचे अवतरण उद्धृत केले आहे. ह्या सर्वांवरून असा निष्कर्ष निघतो की विष्णूचे सर्व दहा अवतार सर्व भारतभर निदान इ. स. च्या १० व्या शतकाच्या सुमारास सर्वमान्य झाले होते. अवतारांची एकूण संख्या, त्यांची नावे आणि त्यांचा कालानुक्रम ह्यांच्याविषयी अनेक प्रकारची मते अस्तित्वात होती. सुपरिचित दहा अवतारांपैकी प्रत्येकाची वर्णने अनेक पुराणात आली आहेत. पुराणात दान, श्राद्ध, तीर्थे आणि व्रते ह्या सर्व विषयांवर सहस्त्रावधि श्लोक आले आहेत आणि असे श्लोक धर्मशास्त्रावरील ग्रंथांमध्ये सविस्तरपणे उद्धृत केले आहेत.

सामान्य व्यवहारातील भाषेत ज्यांना धर्मशास्त्रासंबंधीचे विषय म्हटले जाते त्यांचा तसेच सर्ग, प्रतिसर्ग, इत्यादी पुराण लक्षणांचा ज्यांत समावेश होतो अशा विषयांचा मात्र पुराणात विचार केला असतो असे समजू नये. काही पुराणात राजांची कर्तव्ये, मंत्री, पुरोहित इत्यादि राजकीय विषयांचीही सविस्तर वर्णने केली आहेत. सांप्रत उपलब्ध असलेल्या निबंधग्रंथांपैकी सर्वात जुना असणाऱ्या कृत्यकल्पतरु ह्या ग्रंथात राजधर्मखंडामध्ये मत्स्यपुराणातील अनेक अवतरणे उद्धृत केली आहेत. त्याच ग्रंथात बह्माण्ड पुराण आणि विष्णुधर्मोत्तर पुराण यातील अवतरणे उद्धृत केली आहेत. मत्स्य, अग्नि आणि विष्णुधर्मोत्तर ह्या तीन पुराणांतच राजधर्म आणि त्याचे आनुषंगिक विषय ह्यांच्या संबंधी अनेक हजार श्लोक आहेत. मध्ययुगीन काळात झालेल्या बहुतेक ग्रंथकारांना कौटिल्यकृत अर्थशास्त्र हा ग्रंथ उपलब्ध झाला नसावा आणि म्हणून त्यांनी राजधर्माचे विवेचन करिताना पुराणांचा आधार घेतला असावा असे दिसते. तथापि, मत्स्य पुराणासारख्या प्राचीन पुराणांनी कौटिल्याच्या ग्रंथाचा उपयोग केला असावा असे दिसते. न्यायदान आणि वारसासंबंधीचे नियम ह्यांच्या बाबतीत देखील काही पुराणांचा निबंधग्रंथांच्या लेखकांवर परिणाम झाला होता. कृत्यकल्पतरु, राजनीतिप्रकाश, व्यवहारमयूख प्रभृति ग्रंथांत साक्षीदार, दिव्ये, निरनिराळ्या प्रकारचे पुत्र, दत्तक इत्यादि विषयावरील कालिका पुराणातील श्लोक उद्धृत केले आहेत. परंतु व्यवहारमयूखकर्त्याने असे गमतीचे विधान केले आहे की पुराणांमध्ये स्मृतींच्या विरुद्ध असणारे आचार पुष्कळ वेळा आढळून येतात.

# विभाग ५ वा

# प्रकरण २५

## बुद्धधर्म भारतातुन नाहीसा होण्याची कारणे

(मू. ग्रं. पा. ५।१००३-१०३०).

बुद्धधर्माचे, त्याच्या जन्मस्थान असणाऱ्या भारतामधून जे उच्चाटन झाले ते एकाएकी घडून आल्यासारखे वाटले. कोणत्याही एका कारणाने अथवा काही थोड्या कारणांनी ही घटना घडली असे सांगणे शक्य नाही. अंतर्गत आणि बाह्य अशा दोनही प्रकारच्या अनेक कारणांचा समुच्चय ही घटना घडवून आणण्याच्या कामात बऱ्याच दीर्घकालपर्यंत कार्यान्वित झाला असला पाहिजे. ह्या बाबतीत निरनिराळ्या ग्रंथकारांनी जी कारणे दिली आहेत त्यांची थोडक्यात चर्चा करण्याचा प्रयत्न येथे करण्यात येणार आहे. ह्या कारणांपैकी काही काही कारणे कमी अधिक प्रमाणात तर्काच्या स्वरूपाची आहेत हे मान्य केले पाहिजे. प्रथमतः असे सांगणे अवश्य आहे की बुद्ध हा त्याकाळी भारतात प्रचलित असलेल्या हिंदु धर्मात सुधारणा सुचविणारा केवळ सुधारक होता. आपण एखादा नवा धर्मस्थापन करीत आहो असे त्याला वाटले नाही अथवा त्याने तसे म्हटलेले नाही. बुद्धाने आपल्या हिंदुधर्माचा आणि त्या धर्मातील रूढींचा आणि समजुतींचा त्याग केलेला नव्हता. त्याने आपल्या व्याख्यानात वेदांचा आणि ऋषींचा आदरपूर्वक उल्लेख केला आहे. योगसाधनेचे आणि ध्यानाचे महत्व त्याने मान्य केले होते. त्याच्या काली प्रचलित असलेल्या कर्म, पुनर्जन्म आणि विश्वोत्पत्ति ह्यांच्या संबंधीच्या कल्पनांसारख्या अनेक कल्पना आणि समजुती त्याने आपल्या उपदेशात समाविष्ट केल्या होत्या. त्याच्या उपदेशातील एक महत्वाचा भाग उपनिषदांतील कालात प्रचलित असलेल्या तत्त्वांचा बनविलेला होता. बुद्धाच्या जन्माच्या वेळी लोकांमध्ये विचारांचे आणि आचरणाचे मुख्य दोन प्रवाह अस्तित्वात होते : एक प्रवाह म्हणजे यज्ञयागादि कृत्यांनी देवाची कृपा संपादन करणे असा होता आणि दुसरा प्रवाह म्हणजे नीतीच्या योगाने मनावर आणि आत्मसंयमाने शरीरावर स्वामित्व मिळवून पारमार्थिक ध्येय साध्य करणे. उपनिषदांनी वेद आणि वेदांनी सांगितलेले यज्ञ ह्यांना कमी दर्जाचे मानले आणि आध्यात्मिक ज्ञान संपादन करण्याला यज्ञापेक्षा अधिक महत्त्व दिले. (बृह, उप. ४·४·२१, छां. उप. ७·१।४, मुंडक उप. १·१·४।५ इ.) ही उपनिषदे बुद्धाच्या पूर्वीची असल्याचे मानले जाते. ह्या उपनिषदातील ब्रह्माचे श्रेष्ठत्व ह्या मध्यवर्ती कल्पनेला बुद्धाने विरोध केला नव्हता. बुद्धाने स्वतः असे म्हटले आहे की ज्याच्या योगाने दारिद्र्याचा आणि दुःखांचा नाश होईल असा त्याने शोधून काढलेला मार्ग नवां नसून प्राचीन काळच्या सत्य ज्ञानसंपन्न लोकांनी अनुसरलेलाच मार्ग आहे. त्याच मार्गाने तो गेला आणि त्या मार्गाने जात असताना त्याला वृद्धत्व आणि मृत्यु ह्यांच्याविषयी संपूर्ण ज्ञान झाले. आपण कोणतीही अलौकिक व्यक्ति असल्याचे बुद्ध सांगत नसे तर ज्ञानी लोकांच्या परंपरेपैकी आपण एक असल्याचे तो म्हणत असे.

दुसरी एक लक्षात ठेवण्यासारखी महत्त्वाची गोष्ट म्हणजे कोणत्याही एकाकाळी सर्व भारत अथवा भारताचा मोठा भाग देखील, संपूर्णपणे बुद्धधर्मी झाला असल्याचे दिसून येत नाही. सर्व भारताचा विचार केल्यास भारतामध्ये कोणताही कालखंड घेतला तरी बुद्धधर्मी नसलेले लक्षावधि लोक अस्तित्वात होते. अशोक, कनिष्क, हर्ष ह्यांच्यासारख्या सम्राटांचा आश्रय बुद्धधर्माला मिळाला होता त्यावेळी देखील बुद्धधर्म मुख्यत्वेकरून मठ आणि विद्यालये ह्यांच्या पुरताच मर्यादित होता आणि इतर धर्माविषयी फार सहिष्णुता अस्तित्वात होती. श्री. कुमारस्वामी ह्यांनी (हिंदुधर्म आणि बुद्धधर्म, पा ४५२) आपल्या ग्रंथात म्हटले आहे की बुद्धधर्माचा आणि ब्राह्मणधर्माचा जो जो सखोल अभ्यास करावा तो तो त्या दोहोंमध्ये भेद काय आहे

अथवा कोणत्या बाबतीत बुद्धधर्म खरोखर सुधारणावादी आहे हे कळणे अधिकाधिक कठीण होत जाते आणि त्यांच्या ह्या विधानात सत्याचा बराच अंश आहे. बुद्ध आणि त्याचे अनुयायी ह्यांनी वास्तविकपणे ब्राह्मण—धर्माच्या काही व्यावहारिक बाबींवर हल्ला केला होता.

सामान्यतः असे मानण्यात येते की बुद्ध आणि हिंदु धर्म ह्यात त्याकाळी अस्तित्वात असलेल्या धर्मविषयक आणि तत्त्वज्ञानविषयक सांप्रदायात वादाच्या मुख्य बाबी जातिभेद आणि जात्यभिमान, वेदांचे अनिर्बंध प्रामाण्य आणि यज्ञांचे महत्त्व ह्या होत्या. बुद्धाने सदाचरण आणि ज्ञान ह्या गोष्टी सर्वश्रेष्ठ असल्याचे प्रतिपादन केले; त्याने देवाचे अस्तित्व अमान्य केले नाही, परंतु त्यासंबंधी काहीतरी निश्चित मानण्याची आवश्यकता नाही असे सांगितले; त्याचप्रमाणे जग हे शाश्वत आहे अथवा नाशवंत आहे ह्याच्यासारख्या प्रश्नांवरही त्याने आपली निश्चित मते सांगितली नाहीत, कारण अशा प्रश्नांचा विचार करण्याने वैराग्य, निष्कामता, समाधान, शांति, प्रकाश, निर्वाण ह्यांच्या प्राप्तीला साहाय्य होत नाही. त्याच्या मते मनुष्याची दुःखातून आणि कष्टातून, मुक्तता करणे आणि निर्वाण प्राप्त करणे ह्या गोष्टी महत्त्वाच्या आहेत. तथापि, निर्वाण म्हणजे कोणती स्थिती ह्यांचा स्पष्ट आणि निश्चित शब्दात खुलासा करणे बुद्धाला महत्त्वाचे वाटले नाही. बुद्धधर्मातील मूळचा (म्हणजे हीनयान पंथातील) सिद्धांत असा होता की जर बुद्धाने दाखवून दिलेल्या मार्गाने मानवजात जाईल तर ज्ञानप्राप्ति आणि निर्वाण ह्यांची प्राप्ती चालू जन्मात देखील होऊ शकेल.

बुद्धधर्माचा भारतातून संपूर्णपणे लोप होण्याला काही विद्वानांनी धर्मच्छल हे प्रमुख कारणांपैकी एक असल्याचे प्रतिपादन केले आहे आणि त्या विधानाला आधार म्हणून काही ऐतिहासिक उदाहरणे दिली आहेत. शुंग घराण्यातील पुष्पमित्र राजा, कश्मीरचा मिहिरकुल राजा, इत्यादि राजांनी बुद्धधर्मीय भिक्षूंची हत्या केली, मठांचा विध्वंस केला, बोधिवृक्षाचा नाश केला, बुद्धाच्या मूर्तीच्या जागी महेश्वराची स्थापना केली अशा प्रकारची विधाने त्यांनी केली आहेत. ऱ्हीस डेव्हिडस्सारख्या विद्वानांनी ह्या विधानांची काळजीपूर्वक चिकित्सा केली आहे आणि असे म्हटले आहे की पाली भाषेतील पिटकांमध्ये (बुद्धधर्मीय ग्रंथांमध्ये) धर्मच्छळाबद्दल काहीही उल्लेख नाहीत, पाली ग्रंथांचा कल नेहमी ब्राह्मणांविषयी सहानुभूतीचा असतो, ह्या धर्मच्छलाचा काहीही तपशील दिलेला नाही आणि छल झालेल्या व्यक्तींची नावेही क्वचितच दिलेली असतात. ऱ्हीस डेव्हीडसने पुढे असे म्हटले आहे की धर्मच्छलाच्या ह्या गोष्टींवर त्याचा विश्वास बसत नाही. दोन्ही धर्मांचे अनुयायी एक हजार वर्षेपर्यंत शांततेने एकत्र राहिले ह्या गोष्टीला त्याने फार महत्त्व दिले आहे आणि म्हटले आहे की युरोपमध्ये सुधारणावादी ख्रिस्ती धर्मीयांचा पुरातनमतवादी ख्रिस्ती धर्मसंस्थेने ज्या तऱ्हेचा छल केला त्याच्यासारखा धर्मच्छल भारताने केव्हाही केला नाही. डॉ. आर. सी. मित्र ह्यांच्यासारख्या ग्रंथकारांनी देखील असेच निष्कर्ष काढले आहेत. बार्थ (Barth) ह्या ग्रंथकाराने म्हटले आहे की अत्यंत विश्वसनीय लेख, नाणी आणि शिलालेख ह्यांच्यावरून असे सिद्ध होते की भारतीय राजसत्तेने अतुलनीय सहिष्णुपणा दाखविला होता आणि बुद्ध धर्मातील जोम नाहीसा झाल्यामुळे तो नष्ट झाला आणि त्याच्या नाशाची कारणे त्या धर्मातील अंतर्गत दोषांमध्ये शोधिली पाहिजेत.

भारतीयांच्या सहिष्णुतेची अनेक उदाहरणे देता येतील. याज्ञवल्क्यासारख्या स्मृतिकाराने असा नियम सांगितला आहे की जेव्हा एखादा भारतीय राजा दुसरे राज्य जिंकील त्या वेळी त्याने त्या जित देशातील चालीरीति, लोकव्यवहार आणि कुलाचार ह्यांचे पालन केले पाहिजे आणि त्यांना संरक्षण दिले पाहिजे. अशोकानेही अशाच प्रकारची आज्ञा दिली आहे आणि अशा प्रकारची सहिष्णुता अशोकाच्या पूर्वी शेकडो वर्षांपासून इ. स. १२०० च्या सुमारास मुसलमानांनी भारतावर आक्रमण करीपर्यंतच्या दीर्घ

कालखंडात काही तुरळक अपवाद वगळल्यास — सतत चालत होती. शिलालेख, ताम्रपट इत्यादिकांवरून असे दिसून येते की अनेक जैन आणि बुद्धधर्मी राजांनीं ब्राह्मणांना दाने आणि गावे दिली होती आणि त्याच्या उलट अनेक सनातनी हिंदु राजांनी बुद्धधर्मी भिक्षूंना आणि बुद्धाच्या मूर्तीच्या पूजेकरिता जमिनी आणि गावे दिली होती. अशा अनेक उदाहरणांवरून असे दिसते की भारतामधील सर्व भागात उत्तरेकडे, तसेच दक्षिणेकडे, राजांचा आणि अधिकाऱ्यांचा साधारण नियम धर्मसहिष्णुता बाळगणे आणि सर्व धर्मांचे संरक्षण करणे हा होता. जर क्वचित कोठे धर्मच्छल झाला असला तर तो व्यक्तिशः एखाद्या राजाने अथवा त्याच्या अधिकाऱ्याने अथवा अशाच कोणी केलेला असे. अशोकासारख्या बुद्धधर्मी राजांनी देखील अहिंसेच्या बाबतीत अतिरेक केला होता आणि मांस भक्षणाची बंदी केली होती. मुसलमानी आक्रमक भारतावर निर्घृण हल्ले करीत होते त्यावेळी देखील हिंदुधर्मीय राजांनी आणि लोकांनी. इतर धर्मीयांसंबंधी सहिष्णुता बुद्धी वागविली असल्याचीही ऐतिहासिक उदाहरणे अस्तित्वात आहेत. कोणाएका महंमद युफीने असे वर्णन केले आहे की खंबायत येथील काही हिंदूंनी काही पारशी लोकांच्या चिथावणीवरून एका मशीदीचा नाश केला आणि काही मुसलमानांचा वध केला. त्यातून निसटलेल्या एका मुसलमानाने सिद्धराजाकडे अर्ज केल्यावरून राजाने वेश पालटून त्या प्रकरणाची चौकशी केली आणि गुन्हेगारांना शासन केले आणि मशीद पुन्हा बांधण्याकरिता मुसलमानांना एक लक्ष बलोत्रा दिले. तसेच सोमनाथपट्टन ह्या पवित्र क्षेत्रात होरमुझ येथील एका गलबतवाल्याने जमिनीचा एक तुकडा मिळविला आणि त्यावर एक मशीद, एक घर आणि काही दुकाने बांधली. तेथील राजाने ह्या खरेदीला मान्यता दिली आणि असे ठरविले की त्या दुकानाच्या उत्पन्नाचा विनियोग सोमनाथ येथील शिया पंथाच्या मुसलमान लोकांनी करावयाच्या काही विशिष्ट समारंभाकरिता करावा आणि त्यात काही शिल्लक राहिल्यास ती मुसलमानांच्या मक्का आणि मदिना ह्या पवित्र शहरांच्या स्वाधीन करावी (इं. ॲन्टि. खंड ११ पा. २४१). ह्याच्या उलट, समजा एखाद्या हिंदूने ख्रिस्ती अथवा मुसलमानी देशात एखादे देवालय बांधण्याचे धाडस केले असते तर त्याची काय अवस्था झाली असती ह्याची वाचकांनी कल्पना करावी. भारतात झालेले बहुतेक मुसलमानी राजे हिंदुधर्माविषयी कसे असहिष्णु होते आणि त्यांनी हिंदूचा धर्मच्छल कसा केला ह्याचे सविस्तर वर्णन करण्याची आवश्यकता नाही. त्याप्रमाणेच पोर्तुगीजांच्या अंमलाखाली गोव्यातील हिंदूंचा फार छल करण्यात आला, हिंदूंची देवालये पाडून नष्ट केली गेली, हिंदु संस्कृतीची सर्व चिन्हे नष्ट करण्यात आली, देशी भाषेतील ज्या ग्रंथात मूर्तीपूजेला अनुकूल असे नियम असल्याचा संशय वाटला ते ग्रंथ जाळून टाकण्यात आले, जे लोक ख्रिस्ती झाले नाहीत त्यांना मारून टाकण्याची देखील पोर्तुगीजांची इच्छा होती. ‘इन्क्विझिशन’ ही धार्मिक चौकशी करण्याची संस्था तेथे इ. स. १५६० मध्ये स्थापन करण्यात आली होती आणि ती संस्था अडीच ते तीन शतके अस्तित्वात होती.

बुद्धाने आपल्या राज्यवैभवाचा, तरुण पत्नीचा,पुत्राचा आणि घरादाराचा त्याग केला आणि तो मानवी जातीची दुःखापासून आणि आपत्तीपासून सुटका होण्याचा मार्ग शोधून काढण्याकरिता भटकणारा संन्यासी झाला, अनेक वर्षे त्याने देहाने हालअपेष्टा भोगल्या, चिंतनाकरिता एकांतवास पत्करला, माराबरोबर झगडा करून त्याने शेवटी यश संपादन केले, लोकांच्या मुक्तीचा मार्ग सापडला आहे असा त्याला विश्वास वाटला आणि नंतर त्याने एका नगरातून दुसऱ्या नगरात, एका गावातून दुसऱ्या गावात आपणाला सापडलेल्या मार्गाचा उपदेश करण्याकरिता सुमारे ४५ वर्षे सतत भ्रमण केले, निरुपद्रवी आणि मुक्या जनावरांची यज्ञात होणारी हत्या बंद करण्याकरिता त्याने मोठी चळवळ केली आणि दीर्घ आयुष्य घालवून शेवटी शांतपणे आणि समाधानी अवस्थेत त्याला मृत्यू आला. अशा प्रकारच्या बुद्धाच्या चरित्रातील उदात्त आणि भव्य चित्रपटाचा लोकांच्या मनावर अपरिहार्य परिणाम झाला. त्याने चेतविलेली ही ज्योत त्याच्या कार्यदक्ष आणि योग्य अशा शिष्यांच्या परंपरेने इ. स. च्या ६ व्या शतकापर्यंत तेजस्वीपणाने पेटत

ठेविली आणि त्यावेळी ती उत्कर्षाच्या शिखरावर चढली. त्या काळाच्या सुमारास तिच्याविरुद्ध प्रतिक्रियेलाही आरंभ झाला होता. बुद्ध धर्माच्या जुन्या मतात महत्त्वाचे फेरबदल झाले होते आणि त्याच्या ध्येयातही बदल झाले होते. देवाला स्पष्ट मान्यता न देणारा असा बुद्धाचा धर्म होता. त्यात पूर्णपणे देवाचे अस्तित्व मानणारे अनेक पंथ उत्पन्न झाले आणि बुद्धाला देवासारखा मानून त्याची पूजा होऊ लागली. त्या पंथावर वज्रयान तान्त्रिक पंथाची चमत्कारिक तत्वे आणि आचार यांचा पूर्ण पगडा पडला, परस्परविरोधी तत्त्वांची खिचडी झाली आणि मतभेदांनी आणि अंतर्गत फाटाफुटींनी त्या धर्माच्या चिंधड्या झाल्या. बुद्धाच्या मृत्यूनंतर संघाची पहिली सभा राजगृह येथे भरली, त्यानंतर सुमारे १०० वर्षांनी दुसरी सभा वैशाली येथे भरली आणि तिसरी सभा अशोकाच्या कारकीर्दीत पाटलीपुत्र येथे भरली. त्या सभांमध्ये तत्वांसंबंधी वादविवादाला आरंभ झाला. सर्वमान्य धर्मवचनांचा पाठ (संगीति) ठरविण्याकरिता एकूण चार सभा भरल्या असाव्या असे दिसते. ह्या वादविवादांनी आणि त्यानंतर उद्‌भवलेल्या मतभेदांनी बुद्धधर्माला फार मोठ्या प्रमाणावर खिळखिळा केला. बुद्धधर्माच्या **अवनतीची** आणि भारतातून त्याचे **उच्चाटन होण्याची** जी प्रमुख कारणे ओकोनरने दिली आहेत त्यातील **हे पहिले कारण आहे.**

इ. स. च्या ७ व्या शतकाच्या अखेरीच्या सुमारास भारताचे विभाग पडून त्यात अनेक लहान लहान आणि परस्परांशी भांडणारी स्वतंत्र राज्ये निर्माण झाली होतीं. अशोक, कनिष्क, हर्ष ह्यांच्यासारख्या पूर्वीच्या सामर्थ्यवान आणि निष्ठावान राजांची आणि सम्राटांची कृपा आणि आश्रय बुद्ध धर्माला मिळविता आला नाही. इ. स. च्या ७ व्या शतकाच्या अंतापासून बंगालमधील पाल घराण्यातील राजांच्या व्यतिरिक्त इतरत्र मोठ्या प्रमाणावर **राजांचा आश्रय बंद झाल्यामुळे बुद्ध धर्माला उतरती कळा लागली.**

बुद्धधर्मातील तत्त्वज्ञानाचा आणि त्या धर्माचा अत्यंत जोराचा प्रसार करणारे अनेक **थोर अधिकारसंपन्न प्रचारक भारतातून बाहेर इतर देशात गेले.**

गौतमबुद्धाने जे **उच्च नैतिक आदर्श** लोकांच्या मनावर बिंबवले होते, **त्यांचे पालन करणे** त्याच्या अनेक अनुयायांना आणि विशेषतः त्याचे वैयक्तिक उदाहरण अस्तित्वातून नाहीसे झाल्याने फार **त्रासदायक वाटू लागले** असले पाहिजे. बुद्धधर्मीय **भिक्षूंचे** आणि **भिक्षुणींचे मठ** काळाच्या ओघात **आळशीपणाची** आणि **अनैतिक वर्तनाची** आणि तान्त्रिक पंथाच्या **हिणकस आचारांची स्थाने** बनली. **योगसाधनेत मैथुनाचा समावेश** झाला होता.

गौतम (९·४७), मनु (४·१७६), याज्ञ (१·१५६) ह्यांच्या सारख्या स्मृतींनी वेदांना आणि विद्वान ब्राह्मणांना आदर दाखविण्याबद्दल आग्रहपूर्वक सांगितले असले तरी त्याबरोबरच बुद्ध आणि बुद्ध धर्मातील प्राचीन ग्रंथांप्रमाणेच त्या स्मृतींनी चारी वर्णांच्या लोकांकरिता अहिंसा, सत्य, दान, इंद्रियनिग्रह, विषयभोगाच्या बाबतीत शुद्धता इत्यादि गुणांचेही महत्त्व आवर्जून सांगितले आहे.

ब्राह्मणांची दृढ धर्मश्रद्धा, आणि त्यांनी वेद आणि उपनिषद् ह्यांतील तत्त्वज्ञान आणि (गीता ६·१५।१७ मध्ये वर्णन केलेल्या) मध्यम प्रतीचा योगमार्ग ह्यांचा धर्मामध्ये सुसूत्रपणे केलेला समन्वय, श्रद्धा आणि भक्ति ह्यांच्या योगाने सर्वांना मुक्ति प्राप्त होते हा गीतेने प्रतिपादन केलेला सिद्धांत ह्यांचा लोकांच्या मनावर अनिवार्य असा परिणाम झाला.

**बुद्ध धर्माला प्रतिकार करण्या**करिता आणि **हिंदुधर्म लोकप्रिय करण्या**करिता इ. स. च्या

आरंभीच्या आणि नंतरच्या काही शतकात **ब्राह्मणांना** आणि इतर पुढाऱ्यांना आपल्या **धर्माच्या स्वरूपात** आणि आचारामध्ये **सुधारणा कराव्या लागल्या** आणि दूरगामी स्वरूपाचे **फेरफार करावे लागले**. इंद्र आणि वरुण ह्यांच्यासारखे वेदात वर्णन केलेले **प्राचीन देव मागे पडले; यज्ञांचा** बहुतेक **त्याग** करावा लागला; देवी, गणेश ह्यांच्यासारख्या देवतांना प्रामुख्य द्यावे लागले; श्राद्धामध्ये देखील **पुराणातील मंत्रांचा उपयोग** करण्यात येऊ लागला; **अहिंसा, दान, तीर्थयात्रा व्रते ह्यांना यज्ञांपेक्षा अधिक महत्त्व** देण्यात आले. **ह्या फेरफारांच्या योगाने बुद्ध धर्माचे सामर्थ्य बरेच कमी झाले**. पुराणातील कथा लोकांना बुद्धधर्मातील जातक कथांपेक्षा अधिक आवडू लागल्या. इ. स. च्या ७ व्या शतकाच्या सुमारापासून हिंदु लोक **बुद्धाला विष्णूचा अवतार** मानू लागले आणि १० व्या शतकाच्या सुमारास बहुतेक सर्व हिंदूंनी ती गोष्ट भारतभर मान्य केली.

इ. स. १२०० च्या सुमारास आणि त्यानंतर मुसलमानांच्या धर्मवेडाने आणि त्यांनी केलेल्या नालंदा आणि विक्रमशीलासारख्या सुप्रसिद्ध बुद्धधर्मीय विश्वविद्यालयांच्या नाशाने आणि बुद्ध भिक्षूंच्या हत्येमुळे बुद्धधर्मावर सर्वात मोठा आघात झाला. भिक्षूंच्या नायनाटानंतर गृहस्थाश्रमी बुद्धधर्मीय लोक गोंधळून गेले आणि त्यांच्यापैकी काहींना मुसलमानी धर्मात घेण्यात आले आणि काही हिंदु लोकात मिसळले. स्त्रियांना बुद्धधर्माच्या संघात घेण्याला बुद्धाचा विरोध होता आणि आनंद ह्या आवडत्या शिष्याच्या दीर्घकाळच्या आग्रहावरून बुद्धाने आपला विरोध मागे घेतला तेव्हा तो धर्म १००० वर्षाऐवजी केवळ ५०० वर्षेच टिकेल असे भविष्य वर्तविले होते असे 'चुल्लवग्ग' ह्या बौद्ध धर्मग्रंथात सांगितले आहे. (पौ. ध. ग्रं. खं. २० पा. ३२५). बुद्ध धर्माच्या मोठ्या मठात भिक्षूंचे आणि भिक्षुणींचे प्रचंड मेळावे असत आणि त्यात काही काही वेळा सामान्य सभ्यतेचे आणि नीतिविषयीचे नियम पाळले जात नसत. भिक्षुणी आपआपसात भांडत, मारामारी करीत असत अशीही वर्णने त्या ग्रंथात आढळतात.

बहुतेक ग्रंथकारांचे अनुकरण करून प्रस्तुत ग्रंथकाराने **बुद्धधर्माच्या नाशाची** ही वरील **मुख्य कारणे** असल्याचे सांगितले आहे. भारतातील बुद्ध धर्माच्या नाशाला वरील कारणे फार मोठ्या प्रमाणावर साह्य झाली ही गोष्ट कबूल करून देखील प्रस्तुत ग्रंथकाराला असे वाटते की **बुद्ध धर्माच्या ऱ्हासाचे मुख्य कारण निराळेच होते**. भारतातील बऱ्याच मोठ्या जनसमुदायाला असे वाटू लागले होते की 'हे जग दुःखाचे स्थान आहे, सर्व कामनांचा त्याग करून संन्यास घ्यावा' अशा प्रकारचा बुद्धधर्माचा उपदेश अनुसरणे सामान्य लोकांना अशक्य आहे आणि हिंदु धर्मात सांगितलेली प्रत्येक आश्रमांची विशिष्ट कर्तव्ये आणि अधिकार ह्यांचे पालन आणि विशेषतः गृहस्थाश्रमाला महत्त्व दिलेली चार आश्रमांची व्यवस्था ह्यांचे व्यवस्थित पालन करून संसार करून मनुष्याला सर्वश्रेष्ठ पुरुषार्थ प्राप्त करून घेणे शक्य आहे. सर्व कामनांचा त्याग करण्याला महत्त्व देण्याच्या योगाने समाजाच्या स्थैर्याला आणि अस्तित्वालाच धोका उत्पन्न होतो आणि क्रमाक्रमाने शारीरिक आणि मानसिक शक्तींचा ऱ्हास होतो, आळशीपणा आणि हीन नीति ह्यांची उत्पत्ती होते आणि प्रत्यक्ष वंशाचा नाश होतो. गृहस्थाश्रमाचे महत्त्व मनु (३·७७।७८),वसिष्ठ ध. सू. (८·१४।१७), विष्णु ध. सू. (५९·२९) प्रभृति अनेक स्मृतींनी मान्य केले होते आणि महाभारत (शांति २७०-६।११), रामायण (अयो. १०६·२) ह्यांत आणि पुराणांत तसेच मत प्रदर्शित केले आहे. केवळ धर्मशास्त्रांनीच नव्हे तर कालिदासासारख्या महाकवीने रघुवंश [अपि प्रसन्नेन महर्षिणा त्वं सम्यग्विनीयानुमता गृहाय।
कालो ह्ययं संक्रमितुं द्वितीयं सर्वोपकारक्षममाश्रमं ते॥
रघुवंश (५·१०).] (५·१०), शाकुंतल [अध्याक्रान्ता वसतिरमुनाप्याश्रमे सर्वभोग्ये।
शाकुन्तल (१).] (१) ह्यांच्यासारख्या ग्रंथांत देखील गृहस्थाश्रमाचे थोर महत्त्व वर्णन केले आहे.

जेव्हा बुद्धधर्मीय लोकांनी बुद्धाची देव म्हणून पूजा करण्यास सुरुवात केली, स्वार्थी इच्छांचा त्याग

करून आणि अष्टविध मार्गाने जाऊन शांति आणि निर्वाण प्राप्त करून घेणे हे आपल्या धर्माचे आरंभीचे मूलभूत तत्त्व टाकून दिले, भक्तिपंथाच्या तत्त्वांचा स्वीकार केला आणि अनेक युगांत सत्कर्मे करून क्रमाक्रमाने बोधिसत्त्वाची प्राप्ती करून घेणे हे आपले ध्येय ठरविले, त्यावेळी बुद्धधर्मात आणि लौकिक हिंदु धर्मात असलेला भेद अत्यंत कमी झाला आणि शेवटी शेवटी तो भेदही नाहीसा झाला. बुद्धधर्म जो भारतातून लुप्त झाला तो **त्या धर्मातील मूलभूत सिद्धांतांमध्ये झालेल्या ह्या फेरफारांमुळे** आणि हिंदुधर्मात शुद्ध स्वरूपाचा **संन्यास**, अनेक देवांची पूजा, थोर आध्यात्मिक दर्जा प्राप्त करून घेण्याचे साधन म्हणून **कर्ममार्ग इत्यादी गोष्टींचा ब्राह्मणांनी समावेश करून त्या धर्माला फार व्यापक स्वरूप दिल्यामुळे झाला.** हिंदु धर्माला अंतिम विजय मिळाला ह्यावरून त्या धर्माचे सामर्थ्य आणि व्यापकता दिसून येते आणि ह्याच्या उलट बुद्धधर्माचा एकांगीपणा दिसून येतो. हे विश्व शाश्वत आहे किंवा नाही, आत्मा आणि देह एकच आहेत. अथवा आत्मा देहाहून भिन्न आहे, मृत्यूनंतर तथागत अस्तित्वात राहतो किंवा नाही ह्यांच्यासारख्या जिज्ञासू लोकांना महत्त्वाच्या वाटणाऱ्या **अनेक आध्यात्मिक अथवा तार्किक विषयांच्या बाबतीत बुद्ध धर्माने स्वीकारलेले मौन** हेही त्या धर्माच्या नाशाचे एक महत्त्वाचे कारण होते.

पुराणांनी आणि धर्मशास्त्रांनी अहिंसेला इतके महत्त्व दिले की भारतामधील केवळ ब्राह्मणच नव्हे तर वैश्य आणि शूद्र ह्यांच्यातील देखील लक्षावधि लोक निर्भेळ शाकाहारी बनले आणि अद्यापि देखील तसेच आहेत. ह्याच्या उलट जगातील **कोणत्याही देशातील बुद्धधर्मीय लोक निर्भेळ शाकाहारी नाहीत.** जे आदर्शभूत नैतिक गुण बुद्ध धर्मातील सामान्य लोकांच्याही अंगात असावे असे वाटत असे तेच गुण आता सर्व देशातील बहुतेक बुद्धधर्मीय लोकांना कष्टसाध्य स्वरूपाचे वाटत आहेत. बुद्धाने यज्ञयागांच्या विरुद्ध जोराची चळवळ केली आणि अशोकासारख्या बुद्धधर्मी सम्राटांनी त्याकरिता कडक उपाय योजिले तरीदेखील वेदप्रणीत यज्ञ (आणि पशुयज्ञदेखील) भारतातील राजे आणि सामान्य लोक इ. स. च्या पूर्वीच्या आणि नंतरच्या काही शतकात करीतच होते असे अनेक शिलालेखांवरून आणि दानपत्रांवरून दिसून येते.

आजकाल बुद्धाची आणि त्याच्या तत्त्वांची अतिरिक्त महती वर्णन करण्याचा आणि बुद्धाच्या मूळच्या तत्त्वांची प्रचलित हिंदु समाजातील आचाराशी आणि दोषांशी गैरवाजवी तुलना करून **हिंदुधर्माची नालस्ती करण्याचा विचित्र परिपाठ** पडून गेला आहे. प्रस्तुत ग्रंथकाराला ह्या प्रवृत्तीबद्दल तीव्र नापसंती व्यक्त करावयाची आहे. बुद्ध झालेल्या **गौतमाच्या तत्त्वज्ञानापेक्षा उपनिषदांत सांगितलेले तत्त्वज्ञान अधिक उदात्त स्वरूपाचे आहे** आणि गौतमाने आपले तत्त्वज्ञान केवळ उपनिषदातील तत्त्वज्ञानाच्या पायावरच बनविले आहे. ज्याप्रमाणे कालांतराने हिंदुधर्माचा ऱ्हास झाला आणि त्यात अनिष्ट प्रवृत्ती उत्पन्न झाल्या, तीच अवस्था मागाहूनच्या काळातील बुद्धधर्माची देखील झाली आणि त्यात वज्रयानासारख्या किळसवाण्या आचारांनी धांगडधिंगा घातला. स्वामी विवेकानंदांनी ह्याविषयी फार कडक (परंतु गैरवाजवी नसणारी) भाषा वापरली आहे आणि म्हटले आहे की धर्माच्या नावाखाली अत्यंत किळसवाणें विधि आणि पशुतुल्य आचार आणि कोणी आजपर्यंत लिहिले नसतील असे किळसवाणे आणि बीभत्स ग्रंथ ह्या सगळ्यांची उत्पत्ती अवनत झालेल्या बुद्ध धर्मापासून झाली. (विवेकानंदांचे समग्र ग्रंथ, खंड ३ पा. २४८-२६५).

# विभाग ६ वा

## प्रकरण २६

### तंत्रतत्त्वज्ञान आणि धर्मशास्त्र
(मू. ग्रं. पा. ५।१०३१-१११९).

मागे खंड २ मध्ये दुर्गेच्या पूजेसंबंधी उल्लेख केला आहे. दुर्गेची पूजा **शक्ति** (विश्वात असणारे सामर्थ्य) ह्या स्वरूपात केली जाते आणि अशी पूजा करणाऱ्यांना **शाक्त** म्हणतात आणि त्या उपासनेला **शाक्त सांप्रदाय** म्हणतात. **ह्या शाक्त** सांप्रदायाचा सर्व भारतावर मोठा प्रभाव पडलेला आहे. **शाक्त आणि तंत्रे** ह्यांनी पुराणांवर मोठा परिणाम केला होता आणि स्वतंत्र रीतीने आणि पुराणांच्या द्वारा त्यांनी मध्ययुगीन काळात हिंदुधर्मातील धार्मिक विधींवर आणि आचारांवर काही परिणाम घडविला होता. ह्याकरिता प्रस्तुत ग्रंथामध्ये त्याच्यासंबंधी थोडक्यात विवेचन करण्याची आवश्यकता आहे. तंत्र हे विशिष्ट प्रकारचे ग्रंथ आहेत.

**तंत्रासंबंधी** प्रकाशित आणि अप्रकाशित असे फार मोठे वाङ्मय अस्तित्वात आहे. बुद्धधर्मीय, हिंदुधर्मीय आणि जैनधर्मीय अशी निरनिराळी **तंत्रे** आहेत. काही तंत्रात तत्त्वज्ञानात्मक अथवा आध्यात्मिक बाजू असते. परंतु त्या बाजूचा विचार काही थोड्या युरोपियन आणि भारतीय ग्रंथकारांखेरीज कोणीही फारसा केलेला नाही. सर्वसामान्य लोक तंत्रांमध्ये शक्तीची (काली देवीची) मुद्रा, मंत्र, मंडले**, पाच प्रकारांची** महापूजा, दक्षिणमार्ग आणि वाममार्ग, अतिमानुष सामर्थ्याच्या प्राप्तीसाठी करावयाच्या जारणमारणादि क्रिया ह्या गोष्टींचा समावेश होतो असे मानतात.

'तंत्र' शब्दाचे अर्थ अमरकोशात 'मुख्य गोष्ट, अथवा मुख्य भाग, सिद्धांत, हातमाग अथवा लवाजमा' असे दिले आहेत. तथापि त्यात तंत्र म्हणजे काही विशिष्ट प्रकारचें ग्रंथ असा अर्थ दिलेला नाही. ह्यावरून असा तर्क काढता येतो की ज्या विशिष्ट प्रकारांना तंत्र म्हणतात त्या प्रकारासंबंधीचे ग्रंथ अमरकोशाच्या रचनाकाळी रचिले गेले नसावे अथवा विशेष प्रसिद्ध झाले नसावे.

प्रस्तुत प्रकरणामध्ये **शाक्तपंथ आणि तंत्र ह्यांचा उगम कसा झाला** हे थोडक्यात सांगून हिंदूंच्या विविध विधानांमध्ये पुराणांच्या द्वारा **तंत्रांचा ज्या मार्गांनी प्रत्यक्ष** अथवा अप्रत्यक्ष रीतीने **शिरकाव** झाला त्यांपैकी **काही मार्गांचा निर्देश करण्याचा** प्रयत्न करण्यात येईल.

ऋग्वेदामध्ये (१०·७१·९) **तं**त्र हा शब्द आला असून त्याचा अर्थ 'हातमाग' असा असावा असे दिसते. अथर्ववेद (१०·७·४२) मध्ये 'तंत्र' शब्द आला असून त्याचा अर्थ ऋग्वेदामधील अर्थासारखा जवळजवळ आहे. पाणिनि (५·२·७०) मध्येही तंत्र शब्द हातमाग ह्या अर्थानेच घेतला आहे. आप. श्रौ. सू. (५·१५·१) मध्ये तंत्र हा शब्द 'अनेक अंगे असणारे विधान' ह्या अर्थाने आला आहे. शां. श्रौ. (१·१६·६) मध्ये तंत्र हा शब्द 'जे कृत्य एकवार केले असता दुसऱ्या अनेक कामाकरिता उपयोगी पडते असे कृत्य' ह्या अर्थाने योजिला आहे, याज्ञ. (१·२२८) मध्ये तो शब्द शां. श्रौ. सू. मधील अर्थानेच योजिला आहे. कौटिल्याने अर्थशास्त्र ह्या ग्रंथातील १५ व्या अधिकरणाला 'तंत्रयुक्ति' असा मथळा दिला आहे आणि त्याचा अर्थ 'एखाद्या शास्त्राच्या स्पष्टीकरणासंबंधी मुख्य सिद्धांत अथवा तत्त्वे' असा आहे. बृहस्पति प्रभृति स्मृतीत आणि भागवत (१·३·८) यात 'तंत्र' हा शब्द 'सिद्धान्त' अथवा 'शास्त्र' ह्या अर्थाने योजिला आहे. जैमि. (११·४·१) ह्या

सूत्रावरील शाबरभाष्यात तंत्र ह्या शब्दाचा अर्थ शां. श्रौ. सारखा दिला आहे. वेदान्तसूत्रावरील शांकरभाष्यात श्रीशंकराचार्यांनी अनेक ठिकाणी सांख्य सांप्रदायाला 'सांख्य तंत्र' असे म्हटले आहे आणि पूर्वमीमांसेला 'प्रथम तंत्र' असे म्हटले आहे. कालिका पुराण (८७·१३०) मध्ये उशनस् आणि बृहस्पती ह्यांच्या राजनीतिविषयक ग्रंथांना 'तंत्रे' अशी संज्ञा दिली आहे आणि (९२·२) मध्ये विष्णुधर्मोत्तरपुराणाला 'तंत्र' म्हटले आहे. **ह्या सर्व ठिकाणी** तंत्र ह्या शब्दाला **मध्ययुगीन काळात जो विशिष्ट अर्थ प्राप्त झाला तो अर्थ नाही.**

तंत्र हा शब्द ज्या अर्थाने तथाकथित 'तंत्र वाङ्मयात वापरण्यात येतो त्याचा **उपयोग पहिल्याने केव्हा होऊ लागला** हे निश्चित ठरविणे अवघड काम आहे. त्याचप्रमाणे तंत्रामधील **तत्त्वे** आणि **आचार कोणत्या लोकांनी** अंमलात आणले आणि ती घटना **कोणत्या ठिकाणी** घडली हे ठरविणे देखील शक्य नाही. काही विद्वानांच्या मते तंत्रासंबंधी तत्त्वे आणि आचार हे **भारताच्या बाहेरून भारतामध्ये** आणले असावेत. **कुलाचाराच्या** अथवा **वामाचारांच्या काही** थोड्या गूढ स्वरूपाच्या **क्रिया** मूळच्या परदेशातील अथवा परक्या **लोकांपासून घेतलेल्या** असण्याचा संभव आहे. तथापि ती गोष्ट सिद्ध करण्यासारखा पुरावा नाही. रुद्रयामंल [मदिरासाधनं कर्तु जगाम कुलमण्डले ।
मद्यं मांसं तथा मत्स्यं मुद्रा मैथुनमेव च ॥
पुनः पुनः साधयित्वा पूर्णयोगी बभूव सः ॥
रुद्रयामल, १७ वे पटल श्लो. १६०।१६१.] ह्या ग्रंथात (१७ वे पटल श्लो. ४) असे म्हटले आहे की 'सर्व देव, कामविद्या आणि महाविद्या अथर्ववेदात वास करतात.' त्याच ग्रंथात गूढ स्वरूपाच्या कुंडलिनीचे वर्णन करून योगाच्या क्रिया, सहा चक्रे, कामाख्य प्रभृति कालिकापीठे ह्यांचे उल्लेख केले आहेत. तसेच महाविद्येने वसिष्ठाला दर्शन देऊन त्याला चीन देशात आणि बुद्धाकडे जाण्यास सांगितले असे म्हटले आहे आणि पूर्णयोगी होण्याकरिता करावयाच्या साधनांमध्ये **पाच मकारांचा** उपयोग करावयास सांगितले आहे. ह्यावरून असे दिसते कीं रुद्रयामल ग्रंथ रचिला गेला त्यावेळी भारतामध्ये **तांत्रिक पीठे** अस्तित्वात होती आणि **तांत्रिक आचार चीन** आणि **तिबेटमध्ये** उत्पन्न झाले होते आणि ते आचार **बुद्धाने लोकांना शिकविले** असे समजले जात असे. ही बुद्धाच्या उदात्त शिकवणीची बेअब्रू असून अत्यंत निंद्य विपर्यास आहे.

अथर्ववेदात जादूचे मंत्र विपुल असून काही गूढ अर्थाचे शब्द अथवा अक्षरे ऋग्वेदामध्ये देखील योजलेली आहेत. उदा. ऋ. (७·९९·७, ७·१००·७) प्रभृति ऋचात 'वषट्' हा शब्द आला असून ऋ. (७·५५·५।८) मध्ये निद्रा उत्पन्न करणारा मंत्र आला आहे. ऋ. (१०·१४५) हे संपूर्ण सूक्त सपत्नीविरुद्ध योजावयाचे आहे. ऋग्वेदामध्ये जादुगारांचा अनेक वेळा उल्लेख केला असून अशा जादुगारांना अदेव, अनृतदेव, शिश्नदेव अशी विशेषणे लावली आहेत; असे अनेक **जादुगार अनार्य** असत. काही सूक्तात **'यातुधान'**(Black Magic) (कृष्ण जादूगार) आणि 'राक्षस' हे शब्द आले आहेत. **'यातु'** हा शब्द म्हणजेच मराठी भाषेतील **'जादू'** हा शब्द होय. ऋ. (१०·८७·५ आणि १४) ह्यांच्यासारख्या काही सूक्तात यातुधानांचा, राक्षसांचा, मूर देवांचा. नाश करण्याबद्दल देवांची प्रार्थना केली आहे.

अथर्ववेद (३·२५, ६·१३०, २·३०, ५·३६) ह्यांच्यासारखे अनेक जादूचे मंत्र आहेत. आप. श्रौ. सू. मध्ये सोमवल्लीचा अभिचाराकरिता (दुष्ट हेतूने) उपयोग करावयाच्या कामात 'फट्' ह्या ध्वनीचा उपयोग केला आहे. तंत्र ग्रंथांत देवीची पूजा करिताना 'फट्' ह्या ध्वनीचा पुष्कळ वेळा उपयोग केलेला असतो. असे असले तरी **अथर्ववेदाचा आणि तंत्रांचा प्रत्यक्ष संबंध** जोडणारा एखादा **धागा** अथवा सांधा **सापडत नाही**. शांतरक्षित (इ. स. ७०५-७६२) ह्याने केलेल्या तत्त्वसंग्रहामध्ये **जादूटोण्याशी** खुद्द **बुद्धाचा संबंध** जोडला आहे. तथापि पूर्वी होऊन गेलेल्या एखाद्या व्यक्तीविषयी त्याच्यानंतर हजार वर्षांपेक्षाही अधिक काळाने

झालेल्या कोणाही लेखकाने केलेल्या विधानावर पूर्ण विश्वास ठेवणे शक्य नाही. तथापि, बुद्धाच्या स्वतःच्या शिष्यांनी जादूची सिद्धि प्राप्त करून घेतल्याविषयीच्या कथा पाली भाषेतील धर्मग्रंथात आहेत (महावग्ग ६·३४·१ इ.). तथापि, ह्याही बाबतीत बुद्ध् अथवा त्याचे आरंभीचे शिष्य ह्यांचा मंत्र, मुद्रा, मंडळ ह्यांच्याशी काही संबंध असल्याचे सिद्ध करण्यासारखा पुरावा त्रिपीटक अथवा दुसऱ्या एखाद्या प्राचीन बुद्धधर्मातील ग्रंथात काहीही नाही. 'साधनमाला' ह्या ग्रंथात आलेल्या काही शब्दांच्या आधारावर बुद्धाने काही मंत्र स्वतः प्रसृत केले असावे असे काही विद्वान म्हणतात. परंतु ज्याप्रमाणे हिंदु धर्मातील बहुतेक तंत्रग्रंथ शिव आणि पार्वती ह्यांच्या संवादाच्या स्वरूपाचे आहेत त्याप्रमाणेच बुद्धाच्या मागाहूनच्या काळात झालेल्या बुद्धधर्मीय लेखकांनी आपण बुद्धाचे शब्द उद्धृत करीत आहो असे साहजिकपणे म्हटले असण्याचा संभव आहे.

बुद्धधर्मातील तंत्रे हिंदुधर्मातील तंत्रांच्या पूर्वी झाली अथवा त्यांच्या नंतर त्या तंत्रांच्या अनुकरणाने झाली ह्या प्रश्नाचा निर्णय करणे कठीण आहे. कदाचित दोन्ही तंत्रे जवळजवळ एकाच वेळी उत्पन्न झाली असण्याचा संभव आहे.

काही विद्वानांनी असे प्रतिपादन केले आहे की बुद्धधर्मीय लोकांनी प्रथमतः आपल्या धर्मात तंत्रांचा समावेश केला आणि हिंदुधर्मीयांनी नंतरच्या काळात बुद्धधर्मीयांकडून तंत्रांची उसमवारी केली. प्राचीन काळचे हिंदु लोक हे जादुगिरीच्या शास्त्रात अग्रेसर होते असे म्हणणे खात्रीने त्यांना सन्माननीय नसले तरी विद्वानांना मानाचा अथवा अपमानाचा विचार बाजूला ठेवून सत्याचा शोध करावा लागतो. प्रस्तुत ग्रंथकाराच्या मते वरील विधानाच्या उलट परिस्थिति होती, म्हणजे हिंदुधर्मीयांकडून बुद्ध आणि जैन धर्मीयांनी तंत्रांचे ज्ञान संपादन केले. संस्कृतमधील शेकडो ग्रंथांचे तिबेटी आणि चिनी भाषेत भाषांतर करण्यात आले होते. भारत आणि तिबेट ह्यांच्या दरम्यानचा ज्ञानाच्या देवघेवीचा सर्व व्यवहार एकाच दिशेने म्हणजे भारताकडून तिबेटकडे चालला होता. इ. स. ६७ पासून ७८९ पर्यंतच्या काळात भारत आणि काश्मीरमधून अनेक विद्वान चीनमध्ये गेले होते आणि अशा विद्वानांपैकी बऱ्याच लोकांचा निश्चित ठावठिकाणा लागू शकतो. ह्याच्या उलट चिनी अथवा तिबेटी भाषेतील ग्रंथांचे संस्कृतमध्ये भाषांतर झाल्याचा पुरावा प्रायः काहीही मिळत नाही. सुप्रसिद्ध अशा तीन चिनी प्रवाशांनी बुद्धधर्मीय तंत्रांचे भारतामध्ये अध्ययन करण्यात येत असल्याचा केव्हाही उल्लेख केलेला नाही. इ. स. च्या ७ व्या शतकाच्या बऱ्याच पूर्वी भारतात तांत्रिक आणि शाक्त उपासना प्रचारात होत्या ह्याविषयीचा पुरावा सापडतो. परंतु इ. स. ६५० पूर्वी झालेल्या बुद्ध धर्मीय तंत्राच्या अस्तित्वाचा पुरावा क्वचितच आढळतो. अशा रीतीने अनुमान आणि कालानुक्रम ही दोनही प्रमाणे हिंदु धर्माने बुद्ध धर्मीय तिबेटी अथवा चिनी भाषेतील तांत्रिक ग्रंथांचे अनुकरण केले ह्या विधानाच्या विरुद्ध आहेत. इतकेच नव्हे तर तिबेटमधील लिपी इ. स. च्या ७ व्या शतकात भारतातील लिपीच्या आधारावर बनविण्यात आली असल्याचे आणि अनेक तंत्रसंबंधी ग्रंथांची भाषांतरे करण्यात आली असल्याचे उल्लेख आढळतात. बाणभट्टाच्या ग्रंथांवरूनही असे दिसून येते की इ. स. ६०० च्या बऱ्याच पूर्वी भारतामध्ये मद्यमांस अर्पण करून चंडिकेची पूजा करण्याची पद्धती प्रचलित होती, तांत्रिक सिद्धीमुळे श्रीपर्वत हे स्थान प्रख्यात होते, शिवसंहिता हा ग्रंथ अस्तित्वात होता आणि अनेक तांत्रिक आचार प्रचारात होते. ह्या सर्वांचा विचार केल्यास **शाक्त अथवा तांत्रिक सिद्धांत भारतामधून चीन आणि तिबेटमध्ये नेण्यात आले असल्याचा अधिक संभव आहे आणि ह्याच्या उलट स्थिती** नसावी. डॉ. अ. स. आळतेकर ह्यांनी 'तिबेटमधील संस्कृत वाङ्मय' ह्या लेखात असे वर्णन केले आहे की बुद्ध धर्माचा तिबेटमध्ये प्रवेश इ. स. च्या ७ व्या शतकाच्या उत्तरार्धात झाला; इ. स. ७५० च्या सुमारास ओरिसामधील पद्मसंभव आणि काश्मीरमधील वैरोचन हे प्रथम तिबेटात गेले आणि सुमारे ४५०० ग्रंथांची तिबेटी भाषेत भाषांतरे करण्यात आली.

बुद्ध धर्मातील तंत्रे बाह्यतः हिंदु धर्मातील तंत्रांसारखीच बऱ्याच प्रमाणात असतात. तथापि त्यांच्यामधील अंतर्गत विषय, तत्त्वज्ञानातील सिद्धांत आणि धार्मिक मते ह्या गोष्टीत फारच थोडे साम्य असते. बुद्धधर्म हिंदूंच्या देवांना मानीत नसल्याकारणाने बुद्धधर्मातील तंत्रात **शक्ति** अथवा **शाक्त पंथ** ह्यांचा उल्लेख केलेला नसतो. तथापि **हिंदुधर्मातील तंत्रात** ज्याप्रमाणे **शिव** हा **मुख्यपुरुष आणि देवी ही मुख्य स्त्री** असते त्याप्रमाणेच **बुद्धधर्मातील तंत्रात प्रज्ञा (स्त्री) आणि उपाय (पुरुष)** ही दोन प्रमुख पात्रे असतात. दोन्ही प्रकारच्या तंत्रांमधील अंतर्गत विषय अंतिम ध्येयाच्या बाबतीत, योगादि साधनांच्या बाबतीत, गुरू, मंत्र, मंडल इत्यादि विधिविधानांच्या बाबतीत अतिशय सारखेच आहेत. बुद्धधर्मीय तांत्रिक संप्रदायातील अत्यंत महत्त्वाचे आणि प्राचीन असणारे 'प्रज्ञोपाय-विनिश्चय सिद्धि' आणि 'ज्ञानसिद्धि' हे ग्रंथ इ. स. च्या ८ व्या शतकाच्या पूर्वीचे नाहीत आणि त्या काळी शाक्तपंथ आणि तांत्रिक सांप्रदाय भारतात फार पूर्वीपासून सुप्रतिष्ठित झाले होते.

**'शाक्त'** ह्या शब्दाचा अर्थ शक्तीचा उपासक अथवा पूजक असा आहे. इ. स. च्या ८ व्या शतकाच्या बऱ्याच पूर्वी **शाक्तपंथ** भारतातील बहुतेक सर्व भागात आणि विशेषतः बंगाल आणि आसाम ह्या प्रांतात प्रचलित झाला होता. शक्तीची पूजा त्रिपुरा, लोहिता, षडशिका, कामेश्वरी ह्यांच्यासारख्या निरनिराळ्या नावांनी आणि सामान्यतः देवी ह्या नावाने करण्यात येते. देवीमाहात्म्य हा शाक्त सांप्रदायाच्या प्रमुख ग्रंथांपैकी एक आहे. **शाक्त सांप्रदायाची विशिष्ट लक्षणे** म्हणजे देव अथवा देवी ही एकच असून ती **माता** आहे आणि विनाशक आहे अशी भावना करणे आणि तिच्या पूजेचा एक विशिष्ट प्रकार असून त्याला केव्हा केव्हा किळसवाणे स्वरूप येते. देवीचे माहात्म्य काही पुराणांनी देखील वर्णन केले आहे. उदा. वामन (१८·१९), देवी भागवत (३·२७), मत्स्य (१३·२४।५४) इ. कूर्म पुराणात [यानि शास्त्राणि दृश्यन्ते लोकेऽस्मिन्विविधानि तु।
श्रुतिस्मृतिविरुद्धानि निष्ठा तेषां हि तामसी ॥
कापालं भैरव चैव यामलं वाममार्हतम्।
एवंविधानि चान्यानि मोहनार्थानि तानि तु ॥
कूर्म (१·१२·२६१।२६२).] (१·१२·२६१।२७२) म्हटले आहे की कापाल, भैरव, यामल ह्यांच्यासारखी वेदस्मृतीशी विरुद्ध असणारी शास्त्रे देवीने जगाला मोह उत्पन्न करण्याकरिता प्रकट केली आहेत आणि ती अज्ञानावर आधारलेली आहेत. ब्रह्मपुराण (१८१-४८।५२) मध्ये म्हटले आहे की मद्यमांस प्रभृति पदार्थ अर्पण करून देवीची पूजा केल्यास ती संतुष्ट होते आणि मनुष्यांच्या इच्छा पुऱ्या करते. भद्रकाली हे देवीचे नाव तुलनेने प्राचीन काळचे असून त्याचा उल्लेख शां. गृह्य, मनुस्मृति ह्यात केला आहे

**तंत्र** आणि **शाक्त** ह्या सांप्रदायांच्या ग्रंथांत पुष्कळ साम्य असते. त्यांच्यातील **मुख्य भेद** म्हणजे शाक्त सांप्रदायात देवीला सर्वश्रेष्ठ मानून तिची पूजा करण्यात येते आणि तंत्रामध्ये (ह्यात बुद्ध आणि जैन धर्मी तंत्रांचा समावेश होतो) देवी अथवा शक्तीची पूजा सांगितलेली असतेच असे नाही आणि ती वेदान्त, सांख्य मताची अथवा निरीश्वरवादीही असतात.

खुद्द ऋग्वेदामध्ये देखील वेदप्रणीत धर्मातील श्रेष्ठ देवांच्या शक्तींचा उल्लेख केला आहे परंतु अशी शक्ती त्या त्या देवांची असून स्वतंत्र सृष्टि उत्पन्न करणारे तत्त्व असत नाही. काही ठिकाणी (उदा. ऋ. १०·१२५) वाणीच्या सामर्थ्याचे वर्णन केले आहे. ऋ. (१·२२·१२, ५·४६·८ इ) मंत्रांत इंद्राणी, अग्नायी, वरुणानी प्रभृति देवपत्न्यांचाही उल्लेख केला आहे परंतु ह्या देवतांचा आणि मागाहूनच्या काळात कल्पिलेल्या देवीचा अथवा शक्तीचा कोणताही सरळ संबंध जोडता येणे. शक्य नाही. दुर्गेला उद्देशून म्हटलेली देवीची दोन मोठी स्तोत्रे महाभारतात (विराट अ. ६ आणि भीष्म अ. २३) आली आहेत परंतु ती स्तोत्रे पुणे येथील

संशोधित आवृत्तीमध्ये **प्रक्षिप्त** म्हणून गाळली आहेत. बृहत् हारीतस्मृतीमध्ये (११·१४३) असा नियम सांगितला आहे की गृहस्थाश्रमी व्यक्तीने शैव, बौद्ध, स्कांद, आणि शाक्त पंथांच्या स्थानात प्रवेश करू नये, विष्णु [सुरामांसोपहारैश्च भक्ष्यभौज्यैश्च पूजिता।
नृणामशेषकामांस्त्वं प्रसन्ना संप्रदास्यसि॥

विष्णुपुराण (५·१·८६).] पुराण (६·७·६०; ५·१·८६) ह्या अगदी पूर्वीच्या काळातील एका पुराणात दुर्गेची आर्या, वेदगर्भा, अंबिका, भद्रा, भद्रकाली ह्यांच्या सारखी नावे दिली असून दुर्गेला मद्यमांस अर्पण करून तिची पूजा करण्याचा उल्लेख केला आहें. बाणभट्टाच्या कादंबरी ह्या ग्रंथात उज्ञयिनीपासून काही अंतरावर असलेल्या एका चंडिकेच्या देवालयाचे सविस्तर वर्णन केले आहे आणि त्या देवालयात जादुगिरी, **तंत्र** आणि मंत्र लिहिलेले ताडपत्राचे लहान लहान ग्रंथ असल्याचे सांगितले आहे. इ. स. च्या ७ व्या शतकात होऊन गेलेल्या बाणाच्या ग्रंथातील वर्णनावरून त्या काळाच्या पुष्कळ पूर्वीपासून मांस अर्पण करून चंडीची पूजा कशी चालत असे आणि मंत्र, सिद्धि, मंडले इत्यादि शाक्त अथवा तांत्रिक पंथातील सर्व प्रकार भारतातील लहान थोर, संपन्न व दरिद्री सर्व लोकांच्या मनात कसे बद्धमूल होऊन बसले होते हे दिसून येते. अनेक संस्कृत आणि प्राकृत ग्रंथांतील वर्णनांवरून असे दिसून येते की भागाहूनच्या काळात **तांत्रिक आचारापासून** अतिशय **नीतिभ्रष्टता उत्पन्न** झाली आणि धर्माच्या नावाखाली **किळसवाणे गोंधळ होऊ लागले**.

तंत्राविषयीचे वाङ्मय विस्तृत होते. हिंदु आणि बुद्ध धर्मीय अशा दोन्ही प्रकारच्या लेखकांनी अनेक तंत्रग्रंथ रचिले आणि अनेक प्रकारच्या विषयांचा तंत्रग्रंथात समावेश करण्यात येऊ लागला. तंत्रग्रंथांचा प्रसार तिबेट, मंगोलिया चीन, जपान आणि आग्नेय आशिया ह्या देशांत करण्यात आला. अनेक संस्कृत तंत्रग्रंथांच्या मूळ प्रती उपलब्ध नाहीत परंतु त्यांच्यापैकी काहींची तिबेटी भाषेतील भाषांतरे उपलब्ध आहेत. असे म्हणतात की जर योग्य प्रकारचा शोध केला तर तंत्रावरील ३०० ग्रंथ उपलब्ध होऊ शकतील.

**तंत्र** ह्या शब्दाची सर्वसाधारण व्याख्या सांगणे अवघड आहे. तो शब्द तन् = पसरणे आणि त्रै = संरक्षण करणे ह्या धातूंपासून बनला असल्याचे सामान्यतः सांगण्यात येते. तंत्र हे 'तत्त्व आणि मंत्र' ह्यांचा समावेश करून अनेक गोष्टींचा प्रसार करिते आणि संरक्षण करिते.' बहुतेक तंत्रग्रंथात '**पाच मकार**' ह्यांचा समावेश केलेला असतो. पुष्कळ वेळा त्यात धर्म, तत्त्वज्ञान, परंपरागत आलेली धर्ममते, विधिविधाने, ज्योतिषशास्त्र, खगोलशास्त्र वैद्यक, शकुन ह्या सर्वांचा समावेश केलेला असतो. अनेक बाबतीत तंत्रे पुराणांसारखी असतात. बुद्धधर्मीयांनी त्या धर्मातील अनेक व्यक्तींना देवांची योग्यता दिली आणि काही काळानंतर हिंदूच्या गणेश, सरस्वती ह्यांच्यासारख्या देवांचाही आपल्या ग्रंथात समावेश केला.

तुलनेने अलिकडच्या काळात झालेल्या ग्रंथांत **तंत्रांचे तीन गट** पाडले आहेत – ते म्हणजे **विष्णुक्रांत, रथक्रांत,** आणि **अश्वक्रांत**. ह्या प्रत्येक गटात ६४ तंत्रांचा समावेश केला आहे. तथापि ही संख्या कल्पित असल्यासारखी दिसते आणि काही ग्रंथात एकाच तंत्राचा दोन गटात समावेश केला आहे. पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर आणि ऊर्ध्व असे **पाच आम्नाय** (मोक्षाचे मार्ग) असल्याचे कुलार्णव तंत्र (३·६।७) यात सांगितले आहे. त्याप्रमाणेच **तांत्रिक उपासकांचे** शैव, शाक्त आणि वैष्णव असे **तीन वर्ग** पाडले आहेत. स्रोतस्, पीठ आणि आम्नाय असे **तांत्रिक वाङ्मयाचे तीन प्रकार** आहेत. कोणाकोणाच्या मते आद्य शंकराचार्यांनी केलेल्या 'सौंदर्यलहरी' ह्या ग्रंथात (श्लो. ३१) ६४ तंत्रांचा उल्लेख केला असून ती तंत्रे शंकरांनी जगाला मोह पाडण्याकरिता घोषित केली असल्याचे म्हटले आहे. हिंदु आणि बुद्धधर्मीय अनेक तंत्रे प्रकाशित झाली आहेत आणि त्यांच्यावरून अनेक तंत्रांचे स्वरूप कसे असले पाहिजे ह्याची बरीच

चांगली कल्पना येऊ शकते. प्रसिद्ध झालेल्या **हिंदु तंत्रांत** कुलार्णव पारानंदसूत्र, प्रपंचसार, महानिर्वाणतंत्र, वामकेश्वरतंत्र, शक्तिसंगमतंत्र, शारदातिलक इत्यादिकांचा समावेश होतो. प्रकाशित **बुद्धधर्मीय तंत्रांत** आर्यमंजुश्रीमूलकल्प, गुह्यसमाज तंत्र, प्रज्ञोपायविनिश्चयसिद्धि, ज्ञानसिद्धि, साधनमाला इत्यादिकांचा समावेश होतो. **बुद्धधर्मीय तंत्राचा उद्देश** योगमार्गाने **बुद्धत्व प्राप्त करून घेण्याचा** –जवळचा मार्ग दाखविण्याचा असतो आणि त्यात योगाच्या आचरणाच्या बाबतीत आणि सिद्धि संज्ञा असलेली अद्‌भुत सामर्थ्ये संपादन करण्याच्या हेतूने शक्तींचा उपयोग केलेला असतो. धर्मशास्त्राच्या इतिहासात बुद्धधर्मीय तंत्रांबद्दल फारसे विवेचन करण्याची आवश्यकता नाही. त्यांचे विवेचन फक्त तुलनेकरिता करावयाचे असून **मुख्य भर हिंदु तंत्रावरच** द्यावा लागेल.

**हिंदुधर्मातील तंत्रग्रंथांमध्ये** मुख्यत्वे शिव आणि देवी, अथवा शिव आणि स्कंद, अथवा शिव आणि भैरव ह्यांच्यामधील संवाद दिलेले असतात. ती तंत्रे वेद, आगम, स्मृति आणि पुराणे ह्यांच्यावर आधारलेली असून त्यांत **मोक्ष हे अंतिम साध्य** असून त्याच्या प्राप्तीचा अधिक **सोपा** आणि **त्वरित फल देणारा मार्ग** सांगितला आहे असे दाखविण्याचा प्रयत्न केलेला असतो आणि पुष्कळ ठिकाणी वेदवचने उद्‌धृत केलेली असतात. उदाहरणार्थ **कुलार्णव** (२·१०) ह्या ग्रंथात कुलधर्म अथवा कुलाचार हे वेद आणि आगम ह्यांचे सार असल्याचे तसेच **कौलशास्त्रे** वेदांप्रमाणेच प्रमाण असल्याचे शिवाने देवीला सांगितल्याचे वर्णन केले आहे. **गुह्यसमाज** ह्या ग्रंथात (१८ वे पटल पा. १५३) म्हटले आहे की कुल शब्दाने ५, ३ अथवा १०१ तत्त्वांचा बोध होतो आणि गुह्य ह्याचा अर्थ त्रिकुल असा आहे. **महानिर्वाण** ह्या तंत्रग्रंथात (७ ९७-९८, १०९।११०) असे सांगितले आहे की मद्य, मांस, मत्स्य, मुद्रा आणि मैथुन ही पाच तत्त्वे शंकरांनी घोषित केली असून ती **वीरांचे स्थान** प्राप्त करून घेण्याची पाच साधने आहेत. जीव, प्रकृति, दिशा, पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश इत्यादि तत्त्वांना **कुल** अशी संज्ञा असून ज्या आचरणाच्या योगाने ह्यांच्यात भेद न करिता ही सर्वही 'ब्रह्म' आहेत असे कळून येते त्या आचरणाला **कुलाचार** म्हणतात आणि त्या कुलाचारापासून धर्मादि चार पुरुषार्थ प्राप्त होतात. हे कुलाचार आचरल्याशिवाय शक्तिदेवी कोणालाही सिद्धि देत नाही. ह्याकरिता प्रत्येकाने कुलाचाररत झाले पाहिजे. **पारांनंद सूत्रांत** सांगितले आहे की परमात्मा एक आहे. **त्याच्या प्राप्तीचे** दक्षिण, वाम आणि उत्तर असे **तीन मार्ग** आहेत आणि ते एकापेक्षा एक असे उत्तरोत्तर अधिक चांगले आहेत. वेद, स्मृति आणि पुराणे ह्यांनी सांगितलेला तो **दक्षिण मार्ग,** वेद आणि आगम ह्यांनी सांगितलेला तो **वाममार्ग** आणि वेदवाक्य आणि गुरु ह्यांनी सांगितलेला तो **उत्तरमार्ग**. हे लक्षात ठेवण्यासारखे आहे की, **वामाचार** ही संज्ञा पुराणमतवाद्यांनी दिलेली नसून खुद्द तंत्रग्रंथांनीच दिली आहे. पारानंदसूत्रात (१२ ते १६) गुरूचे आणि दीक्षेचे महत्त्व वर्णन करून उपदेश देण्यासंबंधी नियम सांगितले आहेत. गुरूने सांगितलेले ज्ञान आणि पाच मकारांनी युक्त शक्तिपूजा ह्या गोष्टी गुप्त राखल्याच पाहिजेत असे म्हटले असून त्या गोष्टी प्रकट झाल्या तर नरकप्राप्ती होते असा इशारा बहुतेक तंत्रग्रंथात दिला आहे. (परशुराम कल्पसूत्र १·१२) त्या ग्रंथात असेही म्हटले आहे की ज्याला ऐहिक सुख, स्वर्ग अथवा मोक्ष ह्यांची इच्छा असेल त्या भक्ताला **भक्ती हा एकच मार्ग** आहे. जीवनमुक्ति ह्याचा अर्थ 'उपास्य देवतेचे दर्शन' असा असून जीवन्मुक्त त्याच्या कर्मांनी बांधला जात नाही. हा सिद्धान्त उपनिषदांनी सांगितलेल्या '**ब्रह्मविद्**' संबंधीच्या सिद्धांताशी अतिशय जुळता आहे. ह्या सर्व तत्त्वज्ञानाबरोबरच पारानंदसूत्राने असेही स्पष्टपणे सांगितले आहे की देवाची आणि गुरूची पूजा केल्यानंतर देवाचे स्मरण करीत असताना कोणी **मद्य प्राशन केले** अथवा **वेश्येबरोबर मैथुन केले तर त्याला पातक लागत नाही.**

हिंदुधर्मातील तंत्रग्रंथात **तत्त्वज्ञानात्मक** आणि **लौकिक** अशा दोन बाजू असतात. लौकिक बाजूमध्ये प्रत्यक्ष आचरण करावयाचे आणि कमी अधिक प्रमाणावर **जादुविषयक** मार्ग सांगितलेले असतात. त्या

मार्गात मंत्र, मुद्रा, मंडले, न्यास, चक्रे आणि यंत्रे ह्यांचा श्रेष्ठ शक्तीशी तादात्म्य होण्याकरिता आणि उपासकांना अद्‌भुत सामर्थ्य प्राप्त व्हावे म्हणून साधने म्हणून उपयोग करतात. महानिर्वाणतंत्र ह्या ग्रंथात पाच मकारांचा उपासनेची साधने म्हणून उल्लेख केला असला आणि ते तंत्र नीट जाणल्यावर वेद, पुराणे आणि शास्त्रे ह्यांचा काही उपयोग नाही असे म्हटले असले तरीही (४ ३४-४७ मध्ये) अशी एक उदात्त कल्पना व्यक्त केली आहे की "परमेश्वर एक आहे आणि त्याचे वर्णन सत्, चित् आणि आनंद असे केले जाते, तो गुणातीत असून त्याचे ज्ञान वेदान्त ग्रंथांवरून होऊ शकते, 'ओम् सच्चिदेकं ब्रह्म'हा सर्वोत्तम मंत्र असून त्या मंत्राचा दृढ आश्रय केल्याने मनुष्य ब्रह्म होतो, **जे ब्रह्माची उपासना करितात त्यांना इतर दुसऱ्या साधनांची आवश्यकता नसते** तथापि त्याच ग्रंथात पुढे असे म्हटले आहे की कलियुगामध्ये **कुलाचाराचा आश्रय केल्याशिवाय सिद्धी प्राप्त करणे शक्य नाही;** कुलाचाराच्या योगाने ब्रह्माचे ज्ञान होते आणि ज्याला ब्रह्माचे ज्ञान झाले आहे तो मनुष्य जीवनमुक्त असतो.

**महानिर्वाणतंत्र** (रचना इ. स. चे १८ वे शतक) हा ग्रंथ शाक्त सांप्रदायाबद्दल बरीच कुचेष्टा आणि निंदा होऊ लागल्यानंतर रचिला गेला असल्याकारणाने तो काहीसा **नेमस्त स्वरूपाचा** आहे. त्यात म्हटले आहे की, 'कुलीन घराण्यातील स्त्रियांनी मद्याचा नुसता वास घ्यावा आणि ते प्राशन करू नये; गृहस्थाश्रमी साधकांनी फक्त पाच फुलपात्रात राहील इतकेच मद्य प्राशन करावे कारण **अतिरिक्त मद्यप्राशन केल्याने** कुलीन घराण्यातील पुरुषांची **सिद्धि नष्ट होते**.मैथूनाच्या बाबतीत ज्या स्त्रीला शक्ति म्हणून एखाद्या पुरुषाने ठरविली असेल तिच्याशीच मैथुन करावे आणि जर त्याची पत्नी जिवंत असेल तर त्याने दुसऱ्या स्त्रीला दुष्ट हेतूने स्पर्श करिता कामा नये. तांत्रिक आचारांबरोबरच महनिर्वाणतंत्रात (प्रकरण ८ मध्ये) वर्णाश्रमांची कर्तव्ये, राजांची कर्तव्ये ह्यांचेही वर्णन केले असून सर्व वर्णांनी आपआपल्या वर्णांच्या मर्यादेत विवाह करावे, समान वर्णाच्या लोकांबरोबर भोजन करावे असे नियमही सांगितले आहेत, परंतु ह्या नियमांना भैरवीचक्र, आणि तत्त्वचक्र ह्यांचा अपवाद सांगून असे म्हटले आहे. की त्या विधींच्या बाबतीत सर्व वर्णांचे लोक उत्तम ब्राह्मणांसारखे असल्यामुळे जेवणाऱ्याच्या जातीचा आणि उच्छिष्टाचा प्रश्न उद्भवत नाही **तत्त्वचक्राच्या** विधीमध्ये मद्यप्रभृति तत्वे गोळा करून देवीपुढे ठेवून अर्पण करावयाची असतात आणि नंतर सर्व साधकांनी त्यांचा उपभोग घ्यावयाचा असतो ह्या बाबतीत त्या ग्रंथाने असे सांगितले आहे की ब्रह्मज्ञान झालेल्या साधकाखेरीज अन्य कोणालाही तत्त्वचक्राचा विधि करण्याचा अधिकार नसतो. महानिर्वाण तंत्रात निरनिराळ्या संस्कारांची वर्णने केली असून त्यात धर्मसूत्रांमध्ये आणि स्मृतीत सांगितलेले वेदोक्तमंत्र दिले आहे. ह्या वर्णनात एक विशेष लक्षात ठेवण्यासारख्या प्रकार म्हणजे **शैव विवाह** हा होय. हा विवाह **दोन प्रकारांनी** करावयाचा असतो. एक प्रकार म्हणजे चक्राच्या नियमाप्रमाणे करावयाचा असून दुसऱ्या प्रकारचा विवाह जन्मभर चालू राहण्याकरिता करावयाचा असतो. अशा विवाहात वर्णाचा अथवा वयाचा प्रश्न उपस्थित होत नाही आणि जर एखाद्या पुरुषाला ब्राह्मविवाहाच्या पत्नीपासून झालेली आणि शैवविवाहापासून झालेली अशी दोन्ही प्रकारची अपत्ये असली तर ब्राह्मविवाहाच्या पत्नीपासून झालेल्या अपत्यांना वारसा हक्क मिळतो आणि शैव विवाहाच्या पत्नीपासून झालेल्या अपत्यांना फक्त अन्नवस्त्र मिळण्याचा अधिकार असतो.

**शारदातिलक** हा ग्रंथ इ. स. च्या ११ व्या शतकाच्या सुमारास झालेला आहे. त्या ग्रंथात तत्त्वज्ञानाबरोबरच निरनिराळ्या देवतांचे मंत्र, त्यांची रचना, उपयोग, फले, वगैरेचे वर्णन केले आहे. आसन, मंडप, कुंड, मंडल, पीठे, दीक्षा इत्यादी गोष्टींचेही वर्णन त्यात केले आहे. एक उल्लेख करण्यासारखी गोष्ट म्हणजे त्या ग्रंथात फक्त मुद्रा आणि मंत्र ह्यांचेच विवेचन केले असून इतर मकारांचा फारसा उल्लेख केला नाही. मध्ययुगीन काळात झालेल्या धर्मशास्त्रावरील रघुनंदन, कमलाकर, नीलकंठ

प्रभृति ग्रंथकारांनी शारदातिलक हा ग्रंथ अधिकृत मानला असून त्यातील अवतरणे भरपूर उद्धृत केली आहेत.

अनेक तंत्रग्रंथांत पाच मकार हे देवीच्या पूजेची साधने असल्याचे आणि त्यांच्यायोगे मनुष्याला आश्चर्यकारक सामर्थ्ये आणि मोक्ष प्राप्त करून घेता येतात असे म्हटले आहे.कुलार्णवतंत्र [यैरेव पतनं द्रव्यैः सिद्धिस्तैरेव चोदिता।
श्रीकौलदर्शने चापि भैरवेण महात्मना ॥
कुलार्णवतत्त्व (५·४८).] ह्या ग्रंथात (५ ४८) म्हटले आहे की ज्यांच्या योगाने (सामान्यतः) मनुष्याला पातक लागते त्याच गोष्टींचा स्वीकार केल्याने कौल सांप्रदायामध्ये सिद्धि प्राप्त होते. हे कृत्य होमिओपाथीप्रमाणे विषाने विषाचा नाश करण्यासारखे आहे.

परंतु ह्या पाच मकारांमुळे मुक्ति प्राप्त होते हे सांगण्यात आपण विस्तवाशी खेळत आहो ही गोष्ट तंत्र ग्रंथांना अज्ञात नव्हती असे दिसते. कुलार्णव तंत्रामध्येच (२·११७।११९ आणि १२२) असे म्हटले आहे की जर केवळ मद्य प्राशन केल्याने मनुष्याला सिद्धि प्राप्त होऊ शकली असती तर सर्वही दुर्दैवी दारुड्यांना सिद्धि मिळण्याचा संभव आहे; जर केवळ मांस भक्षण केल्याने पवित्र पुरुषार्थाची प्राप्ती होऊ शकती तर जगातील सर्व मांस भक्षण करणारे पुण्यपुरुष झाले असते; जर (शक्ति नाव दिलेल्या) एखाद्या स्त्रीबरोबर मैथुन केल्याने मोक्ष मिळू शकता तर जगातील सर्व पुरुषांना मुक्ति मिळाली असती, कौल मार्गाचे अनुकरण करणे ही गोष्ट तरवारीच्या धारेवर चालत जाण्यापेक्षा, वाघाच्या गळ्याला मिठी मारण्यापेक्षा, आपल्या हातात सर्प धारण करण्यापेक्षा खरोखर अधिक अवघड आहे.

हिंदु धर्मातील तंत्रात आणि बुद्ध धर्मातील तंत्रात फार मोठी चुरस असावी असे दिसते. **शक्तिसंगम तंत्र** हा अत्यंत लोकप्रिय आणि अत्यंत विस्तृत असा तंत्र ग्रंथ आहे. त्यात असे म्हटले आहे की बौद्ध आणि इतर पाखंडी मताच्या पंथांचा नाश करण्याकरिता, निरनिराळ्या पंथांमध्ये मिसळलेला भ्रम उत्पन्न करणारा भाग काढून टाकण्याकरिता, ब्राह्मण्याच्या संरक्षणाकरिता आणि मंत्रशास्त्राला पूर्ण सिद्धि मिळवून देण्याकरिता देवी प्रकट होते.

ह्या ठिकाणी **बुद्धधर्मीय तंत्रे** आणि विशेषतः **वज्रयान तंत्र ह्यांच्याविषयी थोडेसे विवेचन** करणे सर्वस्वी अप्रस्तुत होणार नाही. पंचशीलासंबंधी आणि बुद्ध, धर्म, आणि संघ ह्यांना शरण जाण्यासंबंधी आणि भिक्षूंना शरण जाण्यासंबंधी दश शीलाचे **कडक नियम सर्व बुद्धधर्मीयांना** मग ते हीनयान पंथाचे असोत अथवा महायान पंथाचे असोत — पालन करावे लागतात. अंतिम ध्येय जे **निर्वाण** ते (महायान पंथाच्या मताप्रमाणे) अतिदीर्घ कालानंतर अथवा अनेक जन्मानंतर प्राप्त होऊ शकते. मांस, मत्स्य, मद्य आणि स्त्रिया ह्या सर्व चैनीच्या बाबी निषिद्ध असल्याचे सांगितले असल्याकारणाने **सर्वसाधारण जन समाज** आणि बहुधा **भिक्षुही** अशा कडक नियमांच्या जीवनाला आणि अंतिम ध्येयाकरिता दीर्घकाळ वाट बघण्याला **कंटाळून गेले होते**. **गुह्यसमाजासारख्या** (वज्रयान पंथाच्या) बुद्ध धर्मीय तंत्रामध्ये **निर्वाणाचा सोपा मार्ग** दाखविला आणि त्या मार्गाने निर्वाणाचीच नव्हे तर बोधिसत्वाची प्राप्ती अल्पकाळात आणि **एका जन्मात देखील होऊ शकेल**. असे सांगितले आणि असेही म्हटले की [बुद्धाश्च बोधिसत्त्वाश्च मन्त्रचर्याप्रचारिणः।
प्राप्ता धर्मासनं श्रेष्ठ सर्व कामोपसेवनैः ॥
गुह्यसमाज, पटल ७, पान २७.] **बोधिसत्व आणि बुद्ध ह्यांनी** देखील **सर्व सुखसोयींचा उपभोग घेऊनच धर्माचे स्थान प्राप्त करून घेतले.** (गुह्य ७ वे पटल पा. २७)

**वज्र** हा शब्दाचा अर्थ 'हिरा' अथवा इंद्राचे वज्र असा दोन्ही प्रकारचा होऊ शकतो आणि गुह्य समाजतंत्रात तो मुख्यतः पहिल्या अर्थाने आणि काही अंशाने दुसऱ्या अर्थाने योजिला असावा असे दिसते. त्या तंत्रामध्ये काया, वाक्, चित ह्यांना 'त्रिवज्र' म्हटले असून शून्यासारख्या दुसऱ्याही काही गोष्टींना वज्र ही संज्ञा लावली आहे. शाक्तांच्या गूढ भाषेत वज्र ह्याचा अर्थ पुरुषाचे जननेंद्रिय असाही होतो. गुह्यसमाज तंत्रात (६ वे पटल पा. २६) हत्तीचे मांस, घोड्याचे मांस, कुत्र्याचे मांस, इतकेच नव्हे तर मनुष्याचे **मांस भक्षण करण्याला परवानगी दिली आहे. वज्रयान** हा एक प्रकारचा नवीन गोष्टी करणारा **बंडखोर पंथ** होता. त्या पंथात सर्व जीवांची हत्या करणे, असत्य भाषण करणे, स्त्रीसंभोग (ह्यात माता, भगिनी आणि कन्या ह्यांच्याशीही संभोग करण्याचा समावेश होतो) आणि कोणीही न दिलेली दुसऱ्याची संपत्ती बळकावण्याला परवानगी दिली. अशा ह्या पंथाला **वज्रमार्ग** म्हणतात आणि त्यात सांगितलेले सिद्धांत हे सर्व बुद्धाचे सिद्धांत आहेत असे सांगितले जाते. **प्रज्ञोपाय** ह्या वज्रयान पंथाच्या तंत्रग्रंथात (१·२०) वज्रयान पद्धतीला अनुसरल्यास कोणती स्थिती प्राप्त होते ह्याचे वर्णन केले आहे आणि (५·२२।२३ मध्ये) असे म्हटले आहे की ज्यांना मुक्तीची इच्छा असेल त्यांनी ज्ञानाची पूर्णता सर्व मार्गांनी प्राप्त करून घेतली पाहिजे. ही **प्रज्ञेची स्थिती** स्त्रीच्या रूपाने सर्वत्र अस्तित्वात असते. ही सर्व बुद्धमय प्रज्ञा स्वतःच्या अंतरात्म्यानेच अनुभवावयाची असते. प्रज्ञा हा शब्द स्त्रीलिंगी असल्यामुळे वज्रयान पंथाच्या काही ग्रंथकारांनी प्रज्ञा आणि स्त्री ह्यांची एकरूपता मानली आणि शृंगारिक कल्पनांचे तत्त्वज्ञानातील कल्पनांशी ओढून ताणून साम्य दाखवून **स्त्रियांसंबंधीच्या ह्या सांप्रदायाची उत्पत्ती झाली आहे.**

**वज्रयान पंथातील मूलभूत विचारसरणी** पुढीलप्रमाणे आहे. पूर्णत्वाचे ज्ञान होणे हा सर्व मानवी अमुभवांपैकी अत्यंत सुखकारक अनुभव असतो. जर पुरुषाला स्त्रीत्वाचा काहीही अनुभव नसेल तर त्याचा अनुभव पूर्ण न होता अर्धवट होईल. पुरुषाला स्त्रीत्वाचा अनुभव त्याच्या कुटुंबातील सर्व स्त्रियांच्या द्वारा होऊ शकेल आणि हा अनुभव पुष्कळ वेळा अतिनिकट नात्याच्या स्त्रियांशी संभोग करण्यासारख्या स्वरूपाचा असतो. पुरुषत्व आणि स्त्रीत्व ह्या दोन परस्परविरोधी परंतु एकमेकांशी निकट संबंध असणाऱ्या भावना प्रदर्शित करण्याचा सर्वोत्कृष्ट मार्ग त्या दोहोमधील सहकार हा असतो. स्त्री ही पुरुषाच्या दृष्टीने एक मूर्त पदार्थ आणि देवता असते.

ही सर्व मते जरी घटकाभर मान्य केली तरी स्त्रीची भावना, तिचा दृष्टिकोन आणि तिचे महत्त्व ह्या गोष्टींचे ज्ञान माता, पत्नी, कन्या ह्या दृष्टीने अथवा एक सामान्य स्त्री ह्या दृष्टीने करून घ्यावे एवढाच उपदेश करून भागले असते, परंतु त्याऐवजी बुद्धधर्मीय तांत्रिकांनी ध्येय साधण्याचा लवकर फलप्रद होणारा मार्ग म्हणून निकट नात्याच्या स्त्रियांबरोबर समागम अवश्य असल्याच्या घोषणा वारंवार आणि उच्च स्वराने का केल्या आहेत हे कळत नाही.

**गुह्यसमाज तंत्र** ह्या ग्रंथात योगाभ्यासाने **बोधिसत्त्वाची स्थिती** आणि **सिद्धी प्राप्त करून घेण्याचा** एक **थोडा वेळ लागणारा** आणि **जवळचा मार्ग** सांगितला आहे. त्यात म्हटले आहे की सिद्धि दोन प्रकारच्या असतात. सामान्य (अदृश्य होण्यासारख्या) आणि **उत्तम** (बोधिसत्वाची प्राप्ती करून घेण्यासारख्या). नंतर **सामान्य** सिद्धि प्राप्त करून घेण्याचे चार मार्ग (वज्रचतुष्क) सांगितले असून उत्तम प्रकारच्या सिद्धी योगाच्या प्रत्याहारादि सहा अंगांच्या योगाने होणाऱ्या ज्ञानरूपी अमृताने प्राप्त होते (दुसऱ्या कशाही रीतीने प्राप्त होत नाहीत) असे सांगितले आहे. गुह्य समाजतंत्राने बोधिसत्त्वाची योग्यता शीघ्र काळात प्राप्त होण्याकरिता योगाभ्यासाचा स्वीकार केला परंतु त्याने योग्याला मांसभक्षण आणि मैथुन ह्यांची परवानगी दिली. ह्याच्यामागची कल्पना अशी असावी असे वाटते की जोपर्यंत एखादा योगी बोधिसत्वाची योग्यता प्राप्त करून

घेण्याकरिता प्रयत्न करीत असेल तोपर्यंत तो कसे आचरण करितो ह्याविषयी बेफिकीर असावे आणि त्याने सर्वही सामाजिक रूढींकडे आणि नियमांकडे दुर्लक्ष करावे. वज्रयान पंथाने सुरू केलेली आणखी एक **नवी गोष्ट** म्हणजे मुक्ति प्राप्त होण्याकरिता योगमार्गाने **शक्तीची उपासना** ही होय. जर मानसिक शक्ती आणि आश्चर्यकारक सिद्धी प्राप्त करून घ्यावयाच्या असतील तर ते ध्येय प्राप्त करून घेण्याकरिता योगाभ्यास करणाऱ्याच्या **संगतीला स्त्रिया** असणे आवश्यक आहे. मागे उल्लेख केल्याप्रमाणे बुद्ध धर्माच्या संघामध्ये स्त्रियांचा समावेश करण्यास जेव्हा बुद्धाने अनुमती दिली तेव्हा त्याने तसे केल्यास बुद्धधर्म फक्त ५०० वर्षेच टिकेल असे भविष्य वर्तविले होते. बुद्धाचे परिनिर्वाण ख्रि. पू. ४८३ ते ४७७ च्या सुमारास झाले असे मानले तर त्या वेळेपासून ५०० वर्षे मोजल्यास इ. स. च्या पहिल्या शतकाचा काळ येतो आणि त्यानंतरच्या एक दोन शतकांनी बुद्धाची बहुतेक शिकवण महायान आणि वज्रयान पंथांच्या मतांनी जवळजवळ पूर्णपणे बुडवून टाकल्यासारखी झाल्यामुळे ते **बुद्धाचे भविष्य अक्षरशः खरे ठरले**. बुद्धाचे 'धर्मचक्र प्रवर्तन' त्याच्या वज्रयान पंथाच्या तथाकथित अनुयायांनी 'अधर्मचक्र प्रवर्तन' केले ही एक चमत्कारिक दैवदुर्विलासाची गोष्ट आहे. नेमस्त स्वरूपाची मते असणाऱ्या **शारदा-तिलक** ह्या तंत्रात देखील क्रूर स्वरूपाच्या स्तंभन, मारण, उच्चाटण ह्यांच्या सारख्या सहा कृत्यांचा तपशील दिला आहे. श्रीशंकराचार्य ह्यांच्या नावावर प्रसिद्ध असलेल्या 'प्रपंचसार' ह्या ग्रंथात (२३-५) ही सहा क्रूर कृत्ये साधण्याकरिता उपयोग करावयाच्या 'त्रैलोक्यमोहन' नावाच्या जादूच्या मंत्राचे वर्णन केले आहे.

वेदान्ताची पद्धति समजण्याकरिता उच्च प्रकारची बुद्धिमत्ता आणि नीतिमत्ता अंगी असावी लागते आणि ती पद्धति काही थोड्याच हुशार आणि बुद्धिमान व्यक्तींनाच कळू शकते. परंतु तंत्र ग्रंथांचा असा दावा होता की त्यांनी शोधून काढलेल्या मार्गाने सामान्य बुद्धिमत्तेच्या लोकांना देखील अध्यात्मशास्त्रातील अनुभव येऊ शकतील आणि मानसिक शक्तीचा विकास होऊन मुक्तीची प्राप्ती थोड्या वेळात होऊ शकेल.

तांत्रिक सांप्रदायातील पाच मकाराविषयीच्या शिकवणीने समाजातील सर्व वर्गात आणि विशेषतः खालच्या दर्जाच्या वर्गात आरोग्याला अहितकारक आणि हीन अशी परिस्थिती निर्माण झाली असली पाहिजे.इ. स. च्या ७ व्या शतकापासून १२ व्या शतकापर्यंतच्या काळात हिंदु आणि बुद्ध ह्या दोन्ही धर्मातील तांत्रिक ग्रंथ आणि तांत्रिक सांप्रदाय उत्कर्षाच्या शिखराला पोचले होते. त्या काळात भोंदू गुरु मद्यपान, मांसभक्षण आणि सर्व प्रकारच्या स्त्रियांशी मुक्त आचरण ह्यांच्यासारख्या सोप्या साधनांनी सुखाची आणि मुक्तीची प्राप्ती होऊ शकेल अशी रम्य चित्रे रंगवून लोकांना फसवीत सर्वत्र हिंडू लागले असले पाहिजेत. त्या काळात झालेले भारतीय ग्रंथ अशा प्रकारच्या तांत्रिक पूजापद्धतीच्या निषेधांनी आणि उपहासांनी भरलेले आहेत. राजशेखर कृत **कर्पूरमंजरी** नावाचे प्राकृत भाषेतील नाटक (रचना इ. स. ९०० च्या सुमारास), **यशस्तिलकचंपू** (रचना इ. स. ९५९), क्षेमेंद्रकृत **दशावतारचरित** (रचना इ. स. चे ११ वे शतक) इत्यादि ग्रंथांत अशा तांत्रिक भोंदू गुरूंची आणि त्यांच्या अनुयायांची उपहासपूर्ण वर्णने केली आहेत. बंगाल आणि आसाम हे प्रांत शाक्त सांप्रदायाचे बालेकिल्ले होते आणि वर्तमान काळीही तेथे कालीपूजा प्रचारात आहे. तथापि देवी पुराण हा अनधिकृत ग्रंथ समजून आपल्या दानसागर ह्या ग्रंथात त्या पुराणाचा आधार न घेण्याचे ठरविणारा बल्लालसेन हाही बंगालचाच एक श्रेष्ठ राजा होता.

अशी **एक कल्पना** मनात येते की मनुष्यमात्रांच्या आणि पदार्थांच्या भवितव्याचे नियंत्रण करणाऱ्या आणि सत्कृत्ये करीत असताना देखील मनुष्यांना केव्हा केव्हा दुःसह संकट सहन करावयास लावणाऱ्या भयप्रद स्वरूपाच्या देवाला अथवा परमात्म्याला तांत्रिक अथवा शाक्त सांप्रदायाच्या संस्थापकांनी परंपरागत नीतिनियमांना आणि कुलाचारांना झुगारून देऊन आपले अधिकात अधिक वाईट करण्याचे आव्हान दिले

असण्याचा आणि योगसाधनांच्या जोरावर उच्च प्रकारचे मानसिक सामर्थ्य आणि सुख मिळविण्याची आकांक्षा बाळगिली असण्याचा संभव आहे. त्या संस्थापकांची **दुसरीही** अशी **एक भावना** असण्याचा संभव आहे : सामान्य जनसमाज बुद्धधर्माकडे आकर्षित होत होता; हिंदुधर्मीय तंत्रपंथाच्या संस्थापकांना सामान्य जनसमाज हिंदुधर्मात राहावा असे वाटत होते; सामान्य लोक मद्य प्राशन करीत आणि मांसभक्षण करीत, तेव्हा त्यांना असे सांगण्यात आले की जर तुम्ही तांत्रिक गुरु आणि तांत्रिक आचार ह्यांचा स्वीकार केला तर तुम्ही मद्यमांसाचा उपभोग घेत राहिला तरी तुम्हाला उच्चतर आध्यात्मिक योग्यता मिळू शकेल. ह्या पंथाची विचारसरणी अशी होती की, शक्ति ही सर्वश्रेष्ठ असून ती सर्वांकरिता असते आणि मनुष्य हा देवीचा अथवा शिवाचा अंश असतो. त्यामुळे **भोगाचा** (सुखोपभोगाचा) **त्याग करण्याची आवश्यकता नसून त्या उपभोगाला** उदात्त **स्वरूप दिले म्हणजे पुरे.** तांत्रिकांनी त्यागाच्या आणि संन्यासमार्गाच्या जागी **सुखोपभोगयुक्त योग** सांगितला. वामपंथातील स्वैराचरण करीत असताना साधक आपल्या आत्म्यामधील **अहंकाराचा नाश** करीत असतो असे मानले जाते अथवा तसे प्रतिपादन करण्यात येते.

महानिर्वाण तंत्रात आणि दुसऱ्या काही थोड्या तंत्रग्रंथांत स्त्रीपुरुषसंबंधातील नीतिबाह्यतेला आणि गोंधळाला आळा घालण्याचा प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ, परशुरामकल्पसूत्रावरील टीकाकार रामेश्वर ह्याने म्हटले आहे की ज्याने आपल्या इंद्रियांचे नियमन केले नसेल त्याला कौलमार्गाचा अधिकार नसतो. (पा. १५३). तंत्र सांप्रदायाचे आधुनिक काळचे पुरस्कर्ते आवर्जून सांगतात की गुह्यसमाजग्रंथात सांगितलेला उपदेश आणि वज्रयान पंथानुयायांनी व्यवहारात कसे वागावे ह्याचे नियम हे ज्यांना थोडीफार योगसिद्धि प्राप्त झालेली असते अशा योग्यांकरिताच केवळ सांगितलेले आहेत. परंतु ह्या कोटिक्रमाला उघड उत्तर असे आहे की एखाद्या विशिष्ट व्यक्तीला कमीतकमी योगसिद्धि प्राप्त झालेली आहे किंवा नाही हे त्याच्या स्वतःच्या शिवाय दुसरा कोण ठरविणार आणि वर उल्लेख केलेले सर्व नियम योग्यांकरिताच असतात असे मान्य केले तरी त्या पंथाच्या योग्याने नीतिबाह्य संभोग समजले जाणारे प्रकार करण्यास प्रत्यवाय नाही असे उच्च स्वरात आणि उघड भाषेत सांगण्याची काय जरूरी होती?

प्राचीन आणि मध्ययुगीन काळात झालेल्या तंत्रग्रंथांची तरफदारी करणाऱ्या सर्वांना उत्तर देण्याचे हे स्थळ नाही. तथापि टीका न करिता जर त्यांना सोडून दिले तर गैरसमज उत्पन्न होण्याचा संभव आहे ह्याकरिता काही थोड्यांचा थोडक्यात परामर्ष घेणे अवश्य आहे.

सर जॉन वुडराफ म्हणतात की मांस, मत्स्य आणि मद्य ह्यांचा उपयोग वैदिक काळात सर्वत्र होत होता आणि महाभारत ह्या ग्रंथात आणि कालिका, मार्कंडेय आणि कूर्म ह्यांच्यासारख्या काही पुराणांत मांस मद्यादिकांविषयी काही उल्लेख आले आहेत. ह्या विधानाच्या योगाने एका आरोपाला उत्तर देण्याएवजी एक नवाच आरोप करण्यासारखे होते आणि ते गैरसमज उत्पन्न करणारे आहे. वेदांच्या काळात लोकांना मद्याची माहिती असू शकेल आणि मद्यप्राशन देखील करण्यात येत असेल. परंतु महत्त्वाची बाब अशी आहे की **सोम** आणि **सुरा** ह्यांच्यामध्ये भेद केलेला आहे. सोम देवांना अर्पण केला जात असे परंतु सुरा कोणत्याही देवतेला धार्मिक आहुती ह्या स्वरूपात अर्पण केली जात असल्याचा कोठेही स्पष्ट उल्लेख केलेला नाही. इतकेच नव्हे तर ऋ. (७·८६·६) मध्ये सुरा ही क्रोध आणि जुगार ह्यांच्याप्रमाणे पाप करण्याला प्रवृत्त करणारी असल्याचे म्हटले आहे. ह्या बाबतीत सौत्रामणी इष्टीचा उल्लेख करण्यात येतो. परंतु ती इष्टि राजसूय यज्ञाच्या शेवटी अथवा अग्निचयनाच्या शेवटी अशा फार तुरळक प्रसंगी करण्यात येत असे. जेव्हा अतिरिक्त सोम प्राशन केलेल्या एखाद्या ऋत्विजाला ओकारी येई तेव्हा ती इष्टि करण्यात येई. परंतु महत्त्वाची वस्तुस्थिती अशी असे की सौत्रामणीमध्ये हवन केलेल्या सुरेतील बाकी उरलेली सुरा पिण्याकरिता एखाद्या ब्राह्मणाला द्रव्य

देऊन आणावी लागे आणि असा कोणी ब्राह्मण मिळाला नाही तर ती उरलेली सुरा एखाद्या वारुळावर ओतण्यात येई. सौत्रामणी यज्ञात देखील ऋत्विज सुरा प्राशन करीत नसत इतकेच नव्हे तर काठक संहितेच्या काली सुरा पिण्याकरिता द्रव्य देऊनही एखादा ब्राह्मण मिळणे कठीण झाले होते. म्हणून सौत्रामणी यज्ञात सुरा अर्पण करण्याच्या कृत्यात आणि तंत्र ग्रंथात सांगितल्याप्रमाणे देवीला मद्य अर्पण करण्याच्या उपदेशात कोणत्याही प्रकारचे साम्य नाही.

अथर्ववेदामध्ये जादुगिरीचे विधि सांगितले आहेत असाही एक मुद्दा पुढे मांडण्यात येतो परंतु त्यात फारसा जोर नाही. अथर्व वेदाच्या मानाने तंत्र-ग्रंथांच्या काळी समाज बराच प्रगत झाला होता आणि **अभिचार** (श्येनयागासारखे जादूचे विधि करणे) आणि मूलकर्म (वशीकरण करणे) ही कृत्ये मनु (११·६३) मध्ये **उपपातके** मानली होती. महाभारत काळी लोक मद्य प्राशन करीत असत परंतु ते तंत्रग्रंथांत सांगितल्याप्रमाणे एखाद्या **धार्मिक विधीचे अंग म्हणून मद्य पीत नसत. मार्कंडेय** प्रभृति पुराणांची रचना हिंदु समाजावर तांत्रिक विधींचा जोराचा पगडा पडल्यानंतर झाली आणि त्या ग्रंथांत मागाहून काही भाग समाविष्ट करण्यात आले असे निदान प्रस्तुत ग्रंथकाराचे तरी मत आहे. महाव्रत विधीमध्ये मैथुन करावे लागत असे असाही मुद्दा मांडण्यात येतो. परंतु तंत्र ग्रंथात अद्भुत शक्ती आणि उच्च आध्यात्मिक योग्यता प्राप्त करून घेण्याचे एक साधन म्हणून मैथुनाचा उपयोग **स्वतः साधकाने** करावयास सांगितलेले असते. परंतु महाव्रतामध्ये यज्ञाशी संबंध नसणाऱ्या त्रयस्थांनी मैथुन करावयाचे असते आणि ते **केवळ प्रतीकात्मक कृत्य** असते.

अद्भुतसामर्थ्यप्राप्तीकरता आणि मुक्ती प्राप्त करून घेण्योकरिता करावयाच्या **ह्या पाच मकारांच्या** साधनांच्या योगाने लोकांना धक्का बसल्यामुळे आणि त्यामुळे तंत्रांचा दुर्लौकिक झाल्यामुळे **शक्तिसंगम तंत्रा**सारख्या मागाहूनच्या काळात (इ. स. १५५५-१६०७) झालेल्या ग्रंथात ह्या **पाच मकारांचा प्रतीकात्मक अर्थ** लावण्यात येऊ लागला. उदाहरणार्थ, **मुद्रा** ह्या शब्दाचे गूळ आणि सुंठ ह्यांचे मिश्रण, लसूण आणि चिंच ह्यांचे मिश्रण इत्यादी अनेक अर्थ सांगण्यात आले; कुंडलिनी जागृत केल्यावर शक्तीचा जो आनंददायक अनुभव (रस) येतो त्यापासून **मद्य** तयार होते असे सांगितले. तंत्राचे **समर्थन** करणाऱ्या एका लेखकाने असे धाडसी विधान केले आहे की ह्या पाच मकारांचा अर्थ **दुष्ट लोकांनी** बुद्धिपुरस्सर **उलट प्रकारचा** लावला आहे; मेंदूच्या पोकळीत आत्मा राहत असतो तेथून स्रवणारा अमृतासारखा प्रवाह म्हणजे **मद्य**, प्राणवायूचे निरोधन म्हणजे **मत्स्य**, मौनाचा निश्चय म्हणजे **मांस**, सृष्टीची उत्पत्ती आणि नाश ह्या कृत्यांचे चिंतन म्हणजे **मैथुन** असे त्या शब्दांचे **खरे अर्थ** आहेत.

तांत्रिक लोक आपल्या आचारांना **मोठमोठी** आणि **उदात्त अर्थांची नावे** देत असतात. उदाहरणार्थ, पाच मकारांना **पंचतत्वे, कुलद्रव्ये** अथवा **कुलतत्त्वे** अशा संज्ञा देण्यात येतात; ज्या स्त्रीबरोबर मैथुन करावयाचे असते तिला **शक्ति**, **प्रकृति** अथवा **लता** असे म्हणण्यात येते; मद्याला **तीर्थवारि** अथवा **कारण** असे म्हंणतात. काही तंत्रग्रंथांत असे सांगितले आहे की तामस, राजस आणि सात्त्विक प्रकृतीच्या लोकांच्या बाबतीत पाच तत्त्वाचे भिन्न भिन्न प्रकारचे अर्थ असतात. मद्य हा शब्दाचा अर्थ वास्तविक मद्याप्रमाणेच मद्याचे **प्रतीक** असणारे नारळातील पाणी अथवा दुसरा एखादा द्रव पदार्थ असाही होतो. विजया अथवा भांग हा पदार्थ ही कोणाकोणाच्या बाबतीत मद्य असतो. साधकाने स्वतःला आणि आपल्या कृत्यांना शिवार्पण करण्याच्या क्रियेला **मांस** म्हणतात. **मैथुन** ह्या कृत्यात शरीरातील मूलाधार चक्रात वास करणाऱ्या कुंडलिनी शक्तीचा मेंदूमधील सहस्रारचक्रात वास करणाऱ्या श्रेष्ठ **शिवा**बरोबर संगम असतो आणि **मद्य** हा सहस्रारचक्रातून गळणाऱ्या मधुरसाचा प्रवाह असतो. महानिर्वाणतंत्रात (८·१७० आणि १७३) असे सांगितले

आहे की मद्याच्या जागी 'मधुरा-त्रय' घ्यावे आणि मैथुनाच्या जागी देवीच्या पायांचे ध्यान आणि इष्टमंत्राचा जप ह्यांच्या अंगीकार करावा. जर एखाद्या मनुष्याने विजया- (भांग) घेऊन ध्यान केले तर त्याला ध्यानमंत्रात वर्णन केल्याप्रमाणे स्वरूपात देवी दिसते असे धाडशी विधान कौलावलिनिर्णय (३·१११) मध्ये केले आहे.

लोकांना अप्रिय वाटणाऱ्या तांत्रिक आचारांचे समर्थन करणारे लोक पाच मकारांचा खुलासा कमीअधिक प्रमाणात कुलार्णव तंत्राच्या धर्तीवर अत्यंत उदात्त अर्थाच्या शब्दात करितात. परंतु तो समाधानकारक वाटत नाही. तंत्र सांप्रदायांच्या कुलार्णव, पारानंदसूत्र आणि इतर अनेक ग्रंथांत मद्य, मांस मैथुन आणि मत्स्य हे शब्द प्रायः सर्व ठिकाणी व्यावहारिक अर्थानेच वापरलेले आहेत. पारानंदसूत्रात (पा.८०-८१) साधकाने करावयाच्या मैथुनासंबंधी इतके **बीभत्स** तपशील वर्णन केले आहेत की ते तपशील येथे सांगणे शक्य नाही. **देवीच्या सामान्य** पूजेमध्ये १६ उपचारांचा समावेश असल्याकारणाने ती **बरीच विस्तृत होती.** मग तिच्यामध्ये '**अनिवार्य अंग**' ह्या स्वरूपात मद्य, मांस आणि मैथुन ह्यांचा समावेश करण्याची काय **गरज** होती? कुलार्णव प्रभृति तंत्रग्रंथ वेदांची प्रशंसा करितात, वेदमंत्रांचा उपयोग करतात आणि उपनिषदांतील आणि गीतेतील वचने उद्धृत करितातः अशा रीतीने तंत्रग्रंथ तोंडाने वेदांचा गौरव करीत असले तरी पाच मकारांचा अव्याहत उपदेश केल्यामुळे समाजावर उद्भवणाऱ्या कितीतरी घोर स्वरूपाच्या नैतिक अपकारां- कडे ते ग्रंथ पूर्णपणे दुर्लक्ष करितात आणि श्रेष्ठ आणि सन्मान्य समजला जाणारा मनुष्य जे वर्तन करितो अथवा जे कृत्य अधिकृत मानतो त्या वर्तनाचे अथवा कृत्याचे इतर लोक अनुकरण करितात ह्या गीता (३·२१) मध्ये सांगितलेल्या परिणामकारक उपदेशाकडे ते मुळी लक्ष देत नाहीत. **कौलरहस्य** [निधाय धारां वदने सुधायाः श्रीचक्रमभ्यर्च्य कुलक्रमेण।
आस्वाद्य मद्यं पिशितं मृगाक्षीमालिङ्ग्य मोक्षं सुधियो लभन्ते ॥
आस्वादयन्तः पिशितस्य खण्डमाकण्ठपूर्णं च सुधां पिबन्तः।
मृगेक्षणासङ्गतमाचरन्तो भुक्तिं च मुक्तिं च वयं व्रजामः ॥
कौलरहस्य, श्लोक ४ आणि ७.] ग्रंथातील ४ आणि ७ ह्या श्लोकावरून सामान्य लोक पाच मकारांच्या सांप्रदायाचे स्वरूप कसे असल्याचे समजत असत हे वाचकांना कळून येईल. त्या श्लोकात म्हटले आहे की "तोंडात सुधेच्या धारा धारण करून, कुलसांप्रदायाप्रमाणे **श्रीचक्राची** पूजा करून, मद्याचा आणि मांसाचा आस्वाद घेऊन, मृगनयनांना आलिंगन देऊन, चांगली बुद्धि असणारे लोक मोक्ष मिळवितात. अशा रीतीने वागून आपण **भुक्ति** (उपभोग) आणि **मुक्ति** ह्या दोन्ही गोष्टी मिळवू."

तांत्रिकांच्या एका अतिशय चमत्कारिक स्वरूपाच्या आचाराचा येथे थोडक्यात उल्लेख करू. हा आचार म्हणजे सर्व साध्याभोळ्या लोकांच्या दृष्टीने अत्यंत किळसवाणा असणारा '**चक्रपूजा**' संज्ञा असणांरा विधी होय. जातीचा विचार न करिता अथवा रक्ताच्या संबंधाचा विचार न करिता सारख्याच संख्येचे पुरुष आणि स्त्रिया गुप्तपणे रात्री एकत्र जमतात आणि वर्तुलाकार बसतात (कौलावलिनिर्णय ८·७६). देवीच्या जागेवर एक यंत्र (आकृती काढलेला कागद) ठेवलेला असतो. त्या चक्राचा एक पुढारी असतो. ह्यासंबंधी नियम असे होते की ज्यांना **वीराची योग्यता** प्राप्त झाली आहे अशाच व्यक्तींना फक्त ह्या चक्रात प्रवेश द्यावा आणि पशूंना (म्हणजे ज्यांचे पाशवी विकार नियंत्रित झालेले नाहीत अशा सामान्य पुरुषांना) वगळावे. अशा तऱ्हेचे गुण चक्राच्या पुढाऱ्याच्या स्वतःच्या अंगात असतील आणि तो तशाच प्रकारच्या व्यक्तींची निवड करील ह्याची हमी काय? तेथे जमलेल्या स्त्रिया आपल्या अंगातील चोळ्या एका पात्रात टाकतात आणि तेथे जमलेल्या पुरुषातील प्रत्येकजण त्या पात्रात ठेवलेल्या चोळ्यांपैकी एक चोळी यदृच्छया उचलून घेऊन त्याप्रमाणें त्या रात्रीपुरती आपली स्त्री सहचरी मिळवितो. ह्या श्रीचक्राच्या विधीच्या योगाने तांत्रिकांना फार निंदा आणि अप्रियता प्राप्त झाली असली पाहिजे. ह्याकरिता, कुलार्णवामध्ये असे सांगितले आहे की

“चक्रपूजा गुप्त असावी; श्रीचक्रात जे काही चांगले अथवा वाईट घडेल ते केव्हाही (समाजात) उच्चारू नये; ही ईश्वराची आज्ञा आहे”. १८ व्या शतकात झालेल्या आणि सुधारणावादी असलेल्या महार्णवतंत्रात असे सांगितले आहे की “कलियुगात (जेव्हा लोक दुर्बल असतात आणि पापमय कलीचा प्रभाव अतिशय प्रबल असतो तेव्हा) **पांचव्या तत्त्वाच्या** (म्हणजे मैथुनाच्या) बाबतीत स्वतःची पत्नी हीच फक्त शक्ति असावी कारण तसे केल्याने कोणताही दोष उद्भवणार नाही.” प्रस्तुत ग्रंथकाराच्या बालपणात त्या काळी अशा वार्ता प्रसृत झाल्या होत्या की महाराष्ट्रातील काही शहरांत चक्रपूजा करण्यात येत असे, काही मोठ्या पंडितांना देखील असे वाटत असे की त्यांची विद्वत्ता त्यांना देवीच्या प्रसादाने प्राप्त झालेली होती आणि ते पंडित इतर बाबतीत अत्यंत पुराणमतवादी असले तरी वर्षातून एक वेळ देवीच्या पूजेत एक पळीभर मद्य देवीचा प्रसाद म्हणून प्राशन करीत. नाशिक येथील पंडित अच्युतराय मोडक ह्या गृहस्थाने इ. स. १८१५ मध्ये ‘अवैदिक-धिक्कृति’ (वेदबाह्य आचारांचा निषेध) नावाचा एक ग्रंथ रचिला होता आणि त्यात पाच मकारांच्या सांप्रदायांचा खरपूस समाचार घेतला होता.

स्वाभाविकपणे ज्या सामान्य लोकांना शक्ति, नाद, बिंदु प्रभृतींचे गूढ स्वरूपाचे ज्ञान ग्रहण करिता आले नाही अथवा समजू शकले नाही त्यांनी तंत्रग्रंथांत सांगितल्याप्रमाणे शक्तीची पाच मकारांनी आणि मंत्र, बीज, चक्र ह्यांनी युक्त पूजा करिण्याचा सोपा मार्ग अधाशीपणाने स्वीकारला आणि कालांतराने गुरु, शाक्त आणि तांत्रिक म्हणविणारे काही लोक वर वर्णन केलेल्या प्रकारच्या हीन दर्जाला पोचले.

काही आधुनिक ग्रंथकारांनी सर्वच तांत्रिक वाङ्मय जादुगिरीचे आणि अश्लील असल्याचे म्हटले आहे आणि अशा रीतीने त्या वाड्मयावर काहीसा अन्याय केला आहे. जे आपल्याला समजत नाही ते सर्व खोटे, असमंजस अथवा अस्तित्वात नसलेले आहे असे प्रतिपादन करणाऱ्यांपैकी प्रस्तुत ग्रंथकार नाही. तो हे मान्य करावयास तयार आहे की तांत्रिकांपैकी काही थोड्या महात्म्यांचे आणि काही तंत्रग्रंथांचे ध्येय आणि हेतु योगाभ्यासाने आध्यात्मिक शक्ति संपादन करून देवी अथवा शक्ती, शिव, विष्णु, मोक्ष, ह्यांच्यासारखी नावे ज्याला दिली जातात त्या श्रेष्ठ तत्त्वाचे ज्ञान प्राप्त करून घेण्याचे आणि मोक्षाची प्राप्ती करून घेण्याचे होते. प्रस्तुत ग्रंथकाराला हेही माहीत आहे की तंत्रग्रंथांपैकी अनेक ग्रंथ वैदिक परंपरेवर आधारलेले असल्याचे म्हणवितात आणि तंत्रग्रंथात वर्णन केलेल्या जादूच्या विधींसारखे विधि बऱ्याच कमी प्रमाणावर का होईना ऋग्वेद, सामविधान ब्राह्मण प्रभृति वेदग्रंथात आहेत ही गोष्टही प्रस्तुत ग्रंथकाराला माहीत आहे. प्रस्तुत ग्रंथकाराने जरी अनेक तंत्रग्रंथांचा आणि पतंजलीकृत योगसूत्रांचा आणि त्यावरील भाष्यांचा आणि टीकांचा काळजीपूर्वक अभ्यास केला असला तरी त्याला **गूढ स्वरूपाचा अनुभव आलेला नाही.** तथापि धर्मसंस्थापकांना, साधूंना, कवींना आणि इतरांना गूढ दृश्ये दिसली नसतील आणि गूढ अनुभव आले नसतील असे म्हणावयास प्रस्तुत ग्रंथकार तयार नाही.

तंत्रग्रंथांत स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचे स्थान दिलें; त्यांना अधिक उच्च योग्यता दिली आणि त्यांनी वैष्णव, शैव प्रभृति परस्परांशी वैर करणाऱ्या सर्व पंथांना देवी हे पूजेचे स्थान देऊन समान भूमिकेवर आणण्याचा प्रयत्न केला. ह्या सर्व गोष्टी मान्य करण्यास प्रत्यवाय नाही. तथापि त्यांना ह्या कामात फारसे यश प्राप्त झाले नाही ही गोष्ट स्पष्ट दिसून येते. कारण वैष्णव आणि शैव सांप्रदाय अद्यापि देखील परस्परांशी भांडत आहेत, आणि खुद्द तांत्रिक ग्रंथांचे देखील शैव, शाक्त, वैष्णव, सौर आणि गाणपत्य असे पाच भेद झाले आहेत आणि कादिमत, हादिमत इत्यादि नावाच्या तांत्रिकांमध्ये परस्परविरोधी सिद्धांत आणि मते अस्तित्वात आहेत.

तांत्रिक नसणाऱ्यांना जो अनिर्बंध स्वैराचार वाटतो असे वर्तन काही तंत्रग्रंथांनी लोकांच्या मनावर खरोखरच बिंबवले आहे. कौलावली निर्णय ह्या ग्रंथात (४·१५ प्रभृति) म्हटले आहे की 'शाक्तांना **पाचव्या तत्त्वाहून** अधिक सुख आणि मोक्ष देणारे दुसरे साधन नाही.' केवळ पाचव्या तत्त्वाच्या योगाने साधक सिद्ध होतो. अशा प्रकारच्या उपदेशामुळे समाजात अनाचार आणि नीतिबाह्य वर्तन उत्पन्न झाले असे मध्ययुगीन काळातील काही ग्रंथांतील टीकेवरून दिसून येते. सर्व गोष्टींचा विचार करून प्रस्तुत ग्रंथकाराला असे म्हणणे भाग पडत आहे की मध्ययुगीन कालातील आणि अलिकडील काळातील ग्रंथकारांनी केलेला तांत्रिक आचारांचा आणि तंत्रग्रंथांचा जोराचा निषेध पुष्कळ अंशी योग्य असाच होता. अमानुष सामर्थ्य, श्रेष्ठ आध्यात्मिक योग्यता आणि उच्च प्रकारचे गूढ अनुभव मिळालेला जरी एखादा मनुष्य तंत्र संप्रदायात असला तरी त्याच्याबरोबरच श्रद्धावान आणि अज्ञानी लोकांना आणि विशेषतः स्त्रियांना फसविणारे असे **शेकडो ढोंगी लब्धप्रतिष्ठीत आणि स्वैरवर्तनी लोक त्या सांप्रदायात असले पाहिजेत.**

देवी, मार्कंडेय, कालिका ह्यांच्यासारख्या काही थोड्या पुराणांत देवीच्या पूजेमध्ये निषिद्ध समजलेल्या मकारांपैकी काही (मद्य, मांस, मत्स्य) प्रकारांचा उपयोग करावयास सांगितले आहे. इ. स. च्या ६ व्या अथवा ७ व्या शतकापासून शाक्त आणि तांत्रिक पंथाच्या मंत्र, कवच, मुद्रा, न्यास इत्यादि विशिष्ट बाह्यचिन्हांचा पुराणांनी आपल्यामध्ये समावेश करण्यास प्रारंभ केला. भागवत आणि अग्नि (३७२·३४) ह्या पुराणांनी देवांची पूजा वैदिकी, तांत्रिकी आणि मिश्र अशी तीन प्रकारची असल्याचे सांगितले आहे. आणि तांत्रिकी पूजा शूद्राकरिता असल्याचे म्हटले आहे.

पुराणांनी आणि काही स्मृतींनी सर्व हेतूंच्या सिद्धीकरिता अत्यंत उपयुक्त असे पाच, सहा, आठ अथवा त्याहून अधिक अक्षरे असलेले **मंत्र** सांगितले आहेत. **मंत्र** ह्या शब्दाचा मूळचा अर्थ ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद ह्यांतील आणि वेदवेत्ते ज्यांचा मंत्र म्हणून उपयोग करितात असा भाग असा होता. वेदातील कल्पना अशी होती की **मंत्रामध्ये फार सामर्थ्य असते** आणि इच्छित हेतूच्या प्राप्तीकरिता तो चांगल्या रीतीने उच्चारला पाहिजे; दोषयुक्त मंत्र इच्छित अर्थ व्यक्त न करिता शब्दांच्या रूपाने वज्र बनून यजमानाचा नाश करितो. ऋग्वेदा- (१·१०२·१।५ प्रभृती) मध्ये असे म्हटले आहे की मंत्र आणि स्तोत्रे आपल्या प्रभावाने देवांची मने वळवून त्यांना यज्ञप्रसंगी आणतात आणि ते मंत्र आणि स्तोत्रे म्हणणाऱ्यांना संरक्षण,शूरपुत्र, गोधन, संपत्ती, जय आणि सर्व प्रकारच्या वस्तु देववितात.

**मंत्र हा तंत्रशास्त्राचा अगदी गाभा आहे** आणि त्यात मंत्रांना इतके महत्त्व दिले आहे की त्या शास्त्राला पुष्कळ वेळा **मंत्रशास्त्र** असे म्हणतात. तांत्रिक ग्रंथांत मंत्रांविषयी निरनिराळ्या उपपत्त्या दिल्या आहेत. शारदातिलक (१·५५-५७) मध्ये सांगितले आहे की सर्व मंत्र देवीची रूपे असतात. अक्षरे आणि वर्ण हे दोन्ही बोलण्यात व्यक्त होणारी आणि लिहिण्यात येणारी कुंडलिनीच असतात. मुळाक्षरांतील वर्ण हे सजीव चेतनायुक्त शक्ति असतात. सर्व मंत्र मुळाक्षरातील वर्णांपासून बनविलेले असतात. महानिर्वाणतंत्र (५·१८।१९) मध्ये म्हटले आहे की ऱ्हीं, श्रीं, कीं ह्यांच्यासारखे **बीजमंत्र** देवतेचे स्वरूप व्यक्त करितात. अशा बीजमंत्रांना भाषा म्हणणे शक्य नाही कारण त्यांच्या योगाने सामान्य मनुष्यांना काही अर्थबोध होत नाही. ते मंत्र दीक्षा देतेवेळी अधिकृत गुरूंनी साधकाला दिलेल्या देवता असतात. देवता, मंत्र आणि गुरु ह्या साधनेमधील महत्त्वाच्या गोष्टी असतात. केवळ ग्रंथात वाचून जर ते बीजमंत्र पाठ केले तर त्यांच्यापासून फलप्राप्ति होत नाही.

तांत्रिक ग्रंथात त्या सांप्रदायाचे स्वतःचे मंत्र असतात आणि त्यांत वैदिक मंत्रांचाही उपयोग केलेला

असतो. 'जातवेदसे सुनवाम०' (ऋ. १·९१·१) हा मंत्र मूळचा अग्नीला उद्देशून असून मागाहूनच्या काळातील ग्रंथांत तो दुर्गेच्या प्रार्थनेकरिता योजिला आहे. 'त्र्यंबकं यजामहे०' (ऋ. ७·५९·१२) हा मंत्र रुद्राला उद्देशून म्हटलेला आहे परंतु तांत्रिक ग्रंथांनी त्या मंत्राला 'मृत्युंजय' अथवा 'मुतसंजीवनी' मंत्र असे म्हटले असून त्याचा उपयोग चित्तशुद्धीकरिता करावयास महानिर्वाण (८·२४३) मध्ये सांगितले आहे. त्याचप्रमाणे गायत्री मंत्राचा (ऋ. ३·६२·१०) तांत्रिकांनी उपयोग केला आहे. गुरूचे महत्त्व वर्णन करताना रुद्रयामलतंत्रात [गुरुः पिता गुरुर्माता गुरुर्देवो गुरुर्गतिः ।
शिवे रुष्टे गुरुस्त्राता गुरौ रुष्टे न कश्चन ॥
रुद्रयामल (२·६५).] (२·६५) असे म्हटले आहे की "जर शिव रागावला तर गुरु (शिष्याचे) संरक्षण करू शकतो; परंतु जर गुरु रागावला तर शिष्याचे संरक्षण कोणीही करू शकत नाही."

मंत्र हा शब्द **मन्** (विचार करणे) हा धातु आणि **त्रै** (रक्षण करणे) अथवा **त्रा** हा शब्द मिळून झाला असल्याची व्युत्पत्ती सांगण्यात येते. 'मंत्र साधकाचे सर्व भयापासून रक्षण करतो, त्याच्या योगाने अमित तेजयुक्त आणि एकतत्त्व असणाऱ्या देवाचे मनन करण्याकडे साधकाला प्रवृत्त करितो म्हणून त्याला मंत्र म्हणतात' असे कुलार्णव तंत्र (१७·५४) मध्ये सांगितले असून अशाच उपपत्त्या इतर तांत्रिक ग्रंथांत दिलेल्या आहेत.

तांत्रिक ग्रंथांत मंत्रांचे पुरुष, स्त्री आणि नपुंसक असे वर्ग केलेले असतात. अशीच वर्गवारी अ प्रभृति वर्णांचीही केलेली असते. संपूर्ण फळप्राप्तीकरिता काही मंत्रांचा उच्चार सहस्रावधि अथवा लक्षावधि वेळा करावयाचा असतो.

मंत्रांच्या सामर्थ्याच्या बाबतीत बुद्धधर्मीय तंत्रग्रंथ हिंदुधर्मीय तंत्रांच्या मागे राहिलेले नाहीत. साधनमाला ह्या ग्रंथात (पा. ५७५) म्हटले आहे की 'योग्य विधानांचा उपयोग केला तर **मंत्रांनी साधता येणार नाही असे काहाही नाही.**' काही विशिष्ट मंत्रांच्या योगाने **बोधिसत्त्वाची योग्यता** प्राप्त होते मग इतर सिद्धींबद्दल बोलावयालाच नको. (पा. २७०)

तांत्रिक पद्धतीच्या मंत्रांच्या ठिकाणी सामर्थ्य असते ही कल्पना बऱ्याच पुराणांनीदेखील व्यक्त केली आहे. गरुडपुराणात (खं. १ अ. ७ व १०) ऱ्हाँ, क्षौं, ऱ्हिं, ऱ्हुं, श्रीं, ऱ्हीं, ह्यांच्यासारखे अनेक एकाक्षरी अर्थरहित मंत्र दिले आहेत. भविष्यपुराणात (ब्रह्मपर्व २९·९।१५) 'गं स्वाहा' हा गणपती पूजेचा मूलमंत्र दिला आहे. अग्निपुराणात (अ. १३३-१३५) तांत्रिक प्रकारचे अनेक मंत्र दिले आहेत. मागाहूनच्या काळात झालेल्या धर्मशास्त्रावरील निबंधग्रंथांत शारदातिलक (२३·७१।७६) ह्यात सांगितलेला प्राणप्रतिष्ठा मंत्र स्वीकारला आहे.

वैदिक मंत्रांत आणि तांत्रिक मंत्रांत असा भेद असतो की वैदिक मंत्र अर्थपूर्ण असतो (जै. १·२·३२). परंतु तंत्रांनी ह्या बाबतीत इतकी मजल मारली आहे की ज्या मंत्राला अर्थ नाही अथवा ज्याच्यामध्ये मंत्रांची अक्षरे उलट क्रमाने दिली आहेत अशा मंत्रांचा देखील जप करावयास तंत्रग्रंथांनी सांगितलेले असते. उदा. कालीविलास तंत्र (२२·२१) मध्ये म्हटले आहे कीं 'ओं दुर्गे' ह्या मंत्राच्या तीन अक्षरांचा उलट क्रमाने म्हणजे 'र्गे दु ओं' असा जप केल्यास सर्व कामनांची प्राप्ती होते. असे जादू मंत्र प्राचीन काळच्या अनेक देशांत प्रचलित होते.

वैदिक त्याचप्रमाणे तांत्रिक मंत्रांच्या जपाला 'पुरश्चरण' अशी संज्ञा आहे. पुरश्चरणाचे संक्षिप्त आणि सविस्तर असे अनेक प्रकार तांत्रिक ग्रंथांत सांगितले आहेत आणि त्यात देवीची पूजा, जप, हवन, ब्रह्मनिष्ठ व्यक्तींना भोजन इत्यादिकांचा समावेश होतो. कुलार्णवतंत्रात (१७·८७) म्हटले आहे की ह्या विधीला पुरश्चरण म्हणण्याचे कारण पाच प्रकारचे उपचार अर्पण केल्याच्या योगाने इष्ट देवता साधकाला वर देण्याकरिता जणू काय हालते अथवा चालते. राघवभट्टाने (शारदातिलक १६·५६ वरील टीकेत) म्हटले आहे की जर साधकाने देवतास्वरूपी **गुरूला संतुष्ट केले तर त्याला पुरश्चरणाशिवाय देखील मंत्रसिद्धि प्राप्त होते**. पुरश्चरणाच्या बाबतीत आणखीही तपशील अग्निपुराण, कुलार्णव प्रभृति ग्रंथांत दिले आहेत. पुरश्चरण **कोणत्या ठिकाणी** करावे, साधकाने **कोणते अन्न** स्वीकारावे आणि **कसे आचरण** ठेवावे ह्यासंबंधीही नियम असतात. साधकाला केव्हा आणि कशी **फलप्राप्ती** होऊ लागते ह्याबद्दलही वर्णने निरनिराळ्या ग्रंथांत दिली आहेत. **जयाख्यसंहिता** (१९ वे पटल श्लोक १३।३३) मध्ये म्हटले आहे की पुरश्चरण करण्यास प्रारंभ केल्यापासून **तीन वर्षेपर्यंत** निरनिराळे **अडथळे** आणि **संकटे उपस्थित होतात**. परंतु जर साधकाचे मन आणि आचरण विचलित झाले नाही तर ४ **थ्या वर्षापासून** सर्वस्व अर्पण केलेले **शिष्य** त्या **साधकाची सेवा करू लागतात**, ७ व्या वर्षापासून गर्वयुक्त राजेदेखील त्याच्याकडे वर मागण्याकरिता येतात, ९ व्या वर्षानंतर त्याला आनंदयुक्त स्वने, मधुर संगीत आणि सुवास ह्यांच्या सारख्या गोष्टी अनुभवाला येतात, ही त्याला मंत्राची सिद्धी प्राप्त झाल्याची चिन्हे असतात. परंतु अशी चिन्हे साधकाने आपल्या गुरूशिवाय दुसऱ्या कोणाजवळ प्रकट करू नये आणि जर तसे केले तर सर्व सिद्धि साधकापासून दूर पळून जातात.

मंत्रांपासून प्राप्त करून घ्यावयाच्या साध्यांमध्ये मोक्षाखालोखाल अद्भुत अथवा अतिमानुष **शक्तीची** प्राप्ती हे साध्य असते. अशा शक्तींना **अष्टमहासिद्धि** अशी संज्ञा असून ज्या व्यक्तीला ह्या अणिमा, लघिमा आदि आठ **सिद्धि** प्राप्त झालेल्या असतात तो जीवन्मुक्त असून त्याला **योगी** अथवा **सिद्ध** अशी संज्ञा असते.
[अणिमा महिमा च तथा गरिमा लघिमेशिता वशित्वं च।
प्राप्तिः प्राकाम्यं चेत्यष्टैश्वर्याणि योगयुक्तस्य ॥
अष्टैश्वर्यसमेतो जीवन्मुक्तः प्रवक्ष्यते योगी।
प्रपञ्चसार (१९ ६२।६३).] (प्रपञ्चसार १९ ६२।६३).

योगसूत्रात (४·१) सिद्धि **पाच** प्रकारच्या असल्याचे सांगितले आहे. **जन्मा**पासून प्राप्त होणाऱ्या, **औषधी**पासून प्राप्त होणाऱ्या, मंत्रांपासून प्राप्त होणाऱ्या, तपापासून प्राप्त होणाऱ्या आणि **समाधीच्या** योगाने प्राप्त होणाऱ्या, अशा पाच प्रकारच्या ह्या सिद्धि असतात. काही सिद्धि समाधीच्या मार्गात येणारे अडथळे असतात असेही योगसूत्रात (३·३७) सांगितले आहे. प्रपंचसार (५), शारदातिलक (२३·१२१।१४५), ह्यांच्यासारख्या तंत्रग्रंथांत शत्रूच्या विरुद्ध करावयाच्या **सहा क्रूर** सिद्धींविषयी बरेच विवेचन केले आहे. अशा तऱ्हेच्या जादूगिरीच्या विधींची वर्णने मत्स्य पुराणासारख्या अगदी पूर्वी झालेल्या पुराणातही (अध्याय ९३) आली आहेत. मत्स्यपुराणाने हे जादूचे विधि ब्राह्मणग्रंथांत आणि श्रौतसूत्रात उल्लेख केलेल्या **श्येनयागाच्या** आधारावर बनविले असण्याचाही संभव आहे. अग्नि पुराणात (अ. १३८) आणि पांचरात्र सांप्रदायाच्या अहिर्बुध्न्यसंहिता ह्या ग्रंथात मंत्रांविषयी भरपूर विवेचन आले आहे. (अध्याय ५१, ५२ आणि ५९).

बुद्धधर्मीय तंत्रग्रंथांत देखील प्रेमाच्या बाबतीत यशप्राप्तीपासून मोक्षप्राप्तीपर्यंतच्या निरनिराळ्या गोष्टींच्या प्राप्तीचा मार्ग दाखविण्याचा प्रयत्न केलेला असतो आणि ह्या सर्व गोष्टी मुखत्वेकरून मंत्रांच्या योगानेच मिळू शकतात असे सांगितलेले असते. वज्रयान पंथातील बुद्धधर्मीय तंत्रकारांनी ८४ सिद्धि असल्याचे सांगितले आहे. बुद्धधर्मीयांनी देखील **आठ सिद्धींचा** उल्लेख केला आहे परंतु त्या सिद्धि योगसूत्रात दिलेल्या सिद्धींहून काहीशा वेगळ्या प्रकारच्या आहेत. साधनमाला ह्या ग्रंथात क्रमांक १७२ पा.

३५० ह्यांची नावे खड्ग, अंजन, पादलेप, अंतर्धान, रसरसायन, खेचर, भूचर, पातालसिद्धि अशी दिली आहेत. त्यांनाही असे वाटत असे की मंत्रांच्या योगाने हिंदूंचे काही देव आपले सेवक बनविता येतील. रोग बरे करण्याची आणि सर्पाचे विष दूर करण्याची बुद्ध भिक्षूंना आवड असे. त्यांना असेही वाटे की मंत्रांच्या साहाय्याने त्यांना **सर्वज्ञत्व** आणि **बुद्धत्व** मिळेल.

तांत्रिक मंत्र एखाद्या गुरुपासून **दीक्षा** घेऊन नंतर मिळवावा लागे. दीक्षांची कल्पना तांत्रिकांनी नवीन शोधून काढलेली नव्हती. अतिशय प्राचीन अशा वेदकाळापासून **उपनयन** अस्तित्वात आहे आणि तो संस्कार म्हणजे मुलाचा आध्यात्मिक दृष्टीने **दुसरा जन्म** समजला जात असे. त्याप्रमाणेच यज्ञकर्त्याला यज्ञ करण्याच्या पूर्वी एक **शुद्धिविधि** करावा लागे. परंतु हे दोन्ही विधि तांत्रिक ग्रंथांत सांगितलेल्या दीक्षाविधीसारखे मोठ्या प्रमाणावर नसत. यज्ञातील दीक्षेचे वर्णन मागे खंड २ मध्ये केले आहे. ऐ. ब्रा. (१·३) मध्ये वैदिक यज्ञातील दीक्षेचे महत्त्वाचे भाग वर्णन केले आहेत. शत. ब्रा. मध्ये अशी दीक्षा यज्ञकर्त्याचा पुनर्जन्म झाल्याचे प्रतीक असल्याची कल्पना व्यक्त केली आहे.

**प्रपंचसार** (अ. ५ आणि ६), **कुलार्णव** (१४·३९), **शारदातिलक** (४ थे पटल) इत्यादि अनेक तंत्रग्रंथांत आणि लिंगपुराण (२·२१) यात दीक्षेचे विस्तृत वर्णन केले आहे. बहुतेक सर्व ग्रंथांनी '**दीक्षा**' हा शब्द 'दा' 'देणे' आणि 'क्षी' (नाश करणे) ह्या धातूंपासून **निरनिराळ्या** प्रकारांनी बनला असल्याचे सांगितले आहे. शारदातिलकात (४·२) म्हटले आहे की "दीक्षा दिव्य ज्ञान देते, आणि पातकांचा नाश करते म्हणून तंत्र जाणणारे आचार्य तिला दीक्षा नाव देतात."

**दीक्षा ग्रहण करण्याला योग्य काळ** कोणता ह्याबद्दलही नियम तंत्रग्रंथांत सांगितले आहेत. **शक्तिसंगमतंत्र** (ताराखंड १७ ३६।३८) यात असे म्हटले आहे की **सूर्याचे** अथवा **चंद्राचे ग्रहण** विशेषतः **चंद्रग्रहण** हा एखाद्या गुरूपासून मंत्र ग्रहण करण्याकरिता दीक्षा घेण्याला सर्वात चांगला काळ असतो आणि जेव्हा दीक्षा एखाद्या ग्रहणात घेतली जाते तेव्हा तिथि, नक्षत्र, महिना, योग,. करण ह्यांचा विचार करण्याची आवश्यकता नसते. तथापि ह्या. बाबतीत सर्व ग्रंथीची एकवाक्यता नाही. उदाहरणार्थ, निर्णयसिंधूमध्ये उद्धुत केलेल्या योगिनी तंत्रामधील अवतरणात चंद्रग्रहणाच्या वेळी दीक्षा घेण्याला निषेध केला आहे.

मागाहूनच्या काळात झालेल्या धर्मसिंधु, दीक्षातत्त्व प्रभृति धर्मशास्त्रावरील ग्रंथांनी मंत्राकरिता घ्यावयाच्या दीक्षेच्या बाबतीत तंत्रग्रंथांचा आधार घेतला आहे.

महानिर्वाण (१०·२०१।२०२) मध्ये असे म्हटले आहे की जेव्हा शिष्य शाक्त, शैव, वैष्णव, सौर अथवा गाणपत्य पंथाचा असेल तेव्हा दीक्षा देणारा गुरुही त्याच पंथाचा असावा परंतु **कौल पंथाचा गुरु सर्वांच्या बाबतीत चांगला असतो.** केवळ मद्य प्राशन केल्याने कोणी कौल होत नाही तर **त्याला अभिषेक झालेला** असेल तरच तो कौल होतो. (महानिर्वाण १०·११२) त्या ग्रंथात दिलेला **अभिषेकाचा विधि** ख्रिस्ती धर्मातील **बाप्तिस्मा विधीसारखा** असतो. पूर्व दिवशी गणेश पूजन, आठ शक्ति, लोकपाल आणि त्यांची शस्त्रे ह्यांचे पूजन होते. **अभिषेकाच्या दिवशी** नवशिष्य स्नान करतो आणि सर्व पातकांच्या निवृत्तीकरिता सुवर्णादि दाने देऊन गुरूपाशी येतो आणि त्याला अभिषेक करण्याची विनंती करतो. एका वेदीवर सर्वतोभद्र मंडल काढून त्यावर एक कलश ठेवण्यात येऊन तो शुद्ध जलाने अथवा मद्याने भरण्यात येतो. **पाच तत्वे** शुद्ध करण्यात येतात. गुरूने शिष्याच्या अंगावर काही विशिष्ट मंत्र म्हणून पाणी शिंपडले म्हणजे **मुख्य भाग** पुरा होतो. नंतर शिष्याला गुरु एक नवे नाव देतो आणि त्या नावाचे शेवटी 'आनंदनाथ' हे पद असते. नंतर शिष्य गुरूचा

आणि उपस्थित इतर कौलांचा सत्कार करितो. हा विधि एका रात्रीत करण्यात येतो अथवा तो ९, ७, ५, ३ रात्रींपर्यंत चालू राहतो. अहिर्बुध्न संहिता (अ. ३९) मध्ये **महाभिषेकाचा** एक विधि वर्णन केला आहे. त्याच्या योगाने सर्व प्रकारचे रोग बरे होतात, सर्व शत्रूंचा नाश होतो आणि मनातील इच्छा पुऱ्या होतात असे म्हटले आहे.

क्रियावती, वर्णमयी, कलावती आणि वेधमयी असे **दीक्षेचे चार प्रकार** होते आणि वास्तुयाग, मंडप, कुंडे आणि स्थंडिले ह्यांच्या रचनेसंबंधी विस्तृत नियम होते.

# प्रकरण २७

## न्यास, मुद्रा, यंत्र, चक्र, मंडल इत्यादि

(मू. ग्रं. पा. ५।११२०-११५१)

**न्यास**. हा तांत्रिक विधीत आणि पूजेत असणारा एक महत्त्वाचा प्रकार असतो. त्याचा अर्थ "एक अथवा अनेक देवतांनी अथवा मंत्रांनी शरीराच्या विशिष्ट भागावर बसून शरीर पवित्र करावे आणि पूजा करण्याला अथवा ध्यान करण्याला ते सत्पात्र करावे अशी त्यांची प्रार्थना करणे" असा असतो. अनेक तंत्रग्रंथांत धर्मशास्त्रावरील ग्रंथांत, आणि पुराणांत निरनिराळ्या प्रकारच्या न्यासांचा उल्लेख केला असून काही ग्रंथांनी त्यांच्या व्याख्याही सांगितल्या आहेत. न्यासाचे हंसन्यास, प्रणवन्यास, मातृकान्यास, मंत्रन्यास, करन्यास, अंगन्यास, पीठन्यास ह्यांच्यासारखे अनेक प्रकार असतात. उदाहरणार्थ, 'ओं, आं, विष्णवे नमः', 'ओं, आं, ब्रह्मणे नमः' अशा प्रकारचा न्यास करणे ह्याला **प्रणवन्यास** म्हणतात. 'ओं हृदयाय नमः, ओं शिरसे स्वाहा, ओं शिखायै वषट्, ओं कवचाय हुं, ओं नेत्रत्रयाय वौषट्, ओं अस्त्राय फट्' ह्या प्रकारच्या शरीराच्या निरनिराळ्या भागावर करावयाच्या न्यासाला **अंगन्यास** म्हणतात. गायत्रीमंत्राच्या (ऋ. ३·६२·१०) २४ अक्षरांचे शरीराच्या निरनिराळ्या भागांवर करावयाचे २४ अंगन्यास स्मृतिमुक्ताफल (आह्निक पा. ३२९—३३१) मध्ये दिले आहेत, पुरुषसूक्ताच्या (ऋ. १०·९०) सोळा ऋचांचा विष्णूच्या पूजेमध्ये निरनिराळ्या अवयवांवर न्यास करण्याकरिता उपयोग करण्यात येतो. महार्णव तंत्रात (१·१७६।१७८) मूळाक्षरांतील प्रत्येक अक्षराचा कपाळापासून पायापर्यंत निरनिराळ्या अवयवांवर करावयाचा न्यास दिला आहे. स्मृतिचंद्रिका आणि योगयाज्ञवल्क्य यांतही विष्णूच्या नावाचे निरनिराळ्या अवयवांवर करावयाचे न्यास दिले आहेत.

वरील अवतरणांवरून असे दिसून येईल की न्यास हा प्रकार पुराणमतवादी लोकांनी धार्मिक विधीत वापरण्यासाठी तांत्रिक ग्रंथांवरून घेतला आणि ही घटना योगयाज्ञवल्क्य, स्मृतिचंद्रिका ह्या ग्रंथांच्या रचनाकालापूर्वी अनेक शतके झाली. न्यास हा शब्द 'अस्' (टाकणे) ह्या धातूला 'नि' प्रत्यय लावून झालेला असून त्याचा अक्षरशः अर्थ '. (कशाच्या तरी) आत अथवा वर ठेवणे अथवा टाकणे' असा आहे. कुलार्णव [न्यायोपाजितवित्तानामङ्ेगषु विनिवेशनात्।
सर्वरक्षाकराद् देवि न्यास इत्यभिधीयते ॥
कुलार्णव (१७ ५६).] (१७·५६) मध्ये असे म्हटले आहे की "न्यायाने मिळविलेले धन एखाद्या व्यक्तीजवळ न्यास (ठेव) म्हणून ठेवले म्हणजे ज्याप्रमाणे सर्व प्रकारचे संरक्षण प्राप्त होते, त्याप्रमाणे बोटांच्या अग्रांनी निरनिराळ्या अवयवांना स्पर्श करण्याच्या विधीने पूजा करणाऱ्याला वाईट लोकांमध्ये निर्भयपणाने वागता येते आणि तो देवासारखा होतो."

न्यासासंबंधी काही थोडेसे विवेचन मागे खंड २ मध्ये करण्यात आले आहे.

**मुद्रा**. हा तांत्रिक विधानांपैकी आणखी एक प्रकार आहे. मुद्रा ह्या शब्दाला अनेक अर्थ आहेत आणि त्यांच्यापैकी काही अर्थांचा तांत्रिक आचरणाशी संबंध आहे. त्या शब्दाचा एक अर्थ 'योगाभ्यासामधील ज्या स्थितीत सर्व शरीराचा उपयोग होत असतो अशी **स्थिति**' असा आहे. दुसरा अर्थ 'धार्मिक पूजेमध्ये बोटे आणि हात एकमेकात गुंतवून निरनिराळ्या **प्रतीकांचा** अथवा **गूढ** अर्थाचा **आविर्भाव** करणे' असा होतो. त्या शब्दाचा 'तांत्रिक योगी ज्या स्त्रीशी संबंध ठेवतो **ती स्त्री**' असाही एक अर्थ होतो. कुलार्णव (१७ ५७) मध्ये

मुद्रा हा शब्द 'मुद्' म्हणजे आनंद अथवा सुख आणि 'द्रु' धातूचे प्रयोजक रूप 'द्रावय' ह्या दोहोंपासून बनला असल्याचे सांगून पुढे असे म्हटले आहे की पूजेमध्ये दाखविलेल्या बोटांच्या आणि हातांच्या निरनिराळ्या आकारांना मुद्रा म्हणण्याचे कारण ते आकार देवांना आनंद देतात आणि त्यांची मने पूजकाविषयी दयेने पूर्ण करितात हे होय.

ह्याशिवाय दुसऱ्याही काही प्रकारच्या उपपत्त्या कोणी कोणी सुचविल्या आहेत. मुद्रांच्या योगाने देवता अनुकूल होते आणि तिचे मन पूजेच्या ठिकाणी उपस्थित राहण्याकडे वळविले जाते असे राघवभट्टाने म्हटले आहे. मुद्रांच्या योगाने विषाने बेशुद्ध झालेल्या मनुष्याला परत शुद्धीवर आणता येते अशी समजूत असल्याचा कादंबरी ह्या ग्रंथात (रचना इ. स. चे ७ वे शतक) उल्लेख केला आहे. मुद्रेविरहित केलेले जप, प्राणायाम, देवपूजा, योग, ध्यान आणि आसने हे विधि निष्फल होतात असे वर्षक्रियाकौमुदी (पा.१५६) ह्या ग्रंथात उद्धृत केलेल्या एका श्लोकात म्हटले आहे.

मुद्रांची **संख्या** आणि **नावे** निरनिराळ्या तांत्रिक ग्रंथांत भिन्न भिन्न दिली आहे. उदाहरणार्थ, शारदातिलक (९ मुद्रा), विष्णुसंहिता (३० मुद्रा) जयाख्यसंहिता (५८), ज्ञानार्णव (१९) इ०.

शारदातिलक ह्या ग्रंथात दिलेल्या ९ मुद्रांची नावे आवाहनी, स्थापनी, सन्निधापन, संनिरोधनी, संमुखीकरणी, सवलीकृति, अवगुंठन, धेनुमुद्रा आणि महामुद्रा अशी आहेत.

योगावरील काही ग्रंथांत निरनिराळ्या मुद्रांची वर्णने केली आहेत. उदा. हठयोगप्रदीपिका (१०), घेरंडसंहिता (२५), शिवसंहिता (१०). हठयोगाभ्यासातील **खेचरीमुद्रा** ही एक महत्त्वाची मुद्रा असते. हठयोगप्रदीपिका (३ ८२।९६) मध्ये **वज्रेलि** मुद्रेचे वर्णन केले आहे आणि त्या मुद्रेच्या योगाने योग्याने स्त्रीसंग केला तरी त्याच्या आयुष्याची वृद्धि होते असे म्हटले आहे.

कालिका, ब्रह्म, नारदीय प्रभृति काही पुराणांत मुद्रांसंबंधी विवेचन केले आहे. कालिका पुराणात (७०·३२) १०८ मुद्रा असल्याचे सांगितले आहे. विष्णुधर्मोत्तर पुराण (अ. ३३) यात १०० हून अधिक सामान्यमुद्रांचे वर्णन केले आहे. भरताच्या नाट्यशास्त्रात (अ. ४, ८ व ९) निरनिराळ्या हाव-भावांची म्हणजे अवयवांच्या हालचालींची वर्णने दिली आहेत. हिंदु आणि बुद्धधर्मीय तांत्रिक ग्रंथांत ज्या मुद्रांची वर्णने आली आहेत त्या मुद्रा प्राचीन कालच्या नृत्यात व नाटकात उत्पन्न झालेल्या मुद्रांच्या आधारावरच तयार केल्या असण्याचा संभव वाटतो. आर्यमंजुश्रीमूलकल्प ह्या बुद्ध धर्माच्या महायान पंथाच्या प्राचीन ग्रंथात १०८ मुद्रांचा उल्लेख केला आहे. जैनांमध्येही मुद्रा होत्या. मुद्राविचार ह्या जैनग्रंथात ७३ मुद्रांचे वर्णन केले आहे. 'मुद्राविधि' ह्या दुसऱ्या एका ग्रंथात ११४ मुद्रांची यादी दिली आहे. चिदंबरम् येथील मंदिराच्या गोपुरावर आणि जावा बेटातील शिवमंदिरात अनेक मुद्राचित्रे आढळतात.

१३ व्या शतकानंतर झालेल्या हेमाद्रि, स्मृतिचंद्रिका, पूजाप्रकाश, आह्निक- प्रकाश इत्यादि मध्ययुगीन कालच्या धर्मशास्त्रावरील ग्रंथांत मुद्रांसंबंधी विवेचन आढळते. मुद्रांचा उपयोग **सर्वत्र केला जात नसे** आणि धर्मसिंधु आणि संस्कार-रत्नमाला ह्या ग्रंथांत उद्धृत केलेल्या अवतरणांवरून असे स्पष्टपणे दिसून येते की **निदान महाराष्ट्रात तरी न्यास आणि मुद्रा अवैदिक मानण्यात येत असत.**

**मंडल.** हा तांत्रिक पूजेमधील दुसरा एक प्रकार असून तो मध्ययुगीन काळातील आणि अर्वाचीन

काळातील कर्मठ हिंदूंच्या आचारामधील एक प्रमुख प्रकार आहे. तथापि मंडलाची कल्पना संस्कृत ग्रंथकारांनी तांत्रिक लोकांपासून उचलली असे म्हणता येत नाही. मंडल हा शब्द गोल अथवा वर्तुल ह्या अर्थाने योजण्यात येत असे. तै. सं. (५·३·९·२) शत. ब्रा. (४·१·१·२५) ह्यात वर्तुलाकृति विटांचा उल्लेख केला आहे. त्यानंतरच्या काळात मंडल ह्या शब्दाचा अर्थ वेदीवर अथवा तशाच ठिकाणी काढलेली कोणतीही आकृति (सामान्यतः वर्तुलाकृति) असा होऊ लागला. आपस्तंब आणि कात्यायन ह्यांच्या शुल्बसूत्रात चौकोनी मंडळाचा (चतुरस्रं मंडलं) उल्लेख केला आहे. मत्स्यपुराणात केशराने अथवा रक्तचंदनाच्या गंधाने अथवा निरनिराळ्या रंगांनी काढलेल्या १२ अथवा ८ पाकळ्या असलेल्या कमळाच्या आकृतीचा उल्लेख केला आहे. (मत्स्य ७२·३०) हर्षचरित (रचना इ. स. चे ७ वे शतक) ह्या ग्रंथात अनेक रंगांत काढलेल्या एका मोठ्या मंडलाचा उल्लेख केला आहे. अग्निपुराणात (अ. ३२०) सर्वतो-भद्र प्रभृति ८ मंडलांचा उल्लेख केला आहे. शारदातिलक (३·१०६-१३०) मध्ये सर्वतोभद्र मंडल कसे तयार करावे हे सांगितले असून ते सर्व पूजांना चालते असे म्हटले आहे. हे मंडल काढण्याकरिता हळदीच्या चूर्णाचा पिवळा रंग, तांदुळाच्या पीठाचा पांढरा रंग, कुसुंबाच्या चूर्णाचा लाल रंग, अर्धवट जळलेल्या डाळीवर दूध ओतून नंतर त्याच्या केलेल्या चूर्णाचा काळा रंग, बिल्वपत्राच्या चूर्णाचा हिरवा रंग असे पाच रंग घ्यावे असा नियम सांगितला आहे. रंगीत चूर्णांनी काढलेल्या मंडळांचे उल्लेख ज्ञानार्णव तंत्र (२४·८।१०) आणि महार्णव तंत्र (१०·१३७।१३८) यांत केला आहे.

**मंडलविधीमध्ये** मंडल, मंत्र, पूजा आणि मुद्रा ही चार विशिष्ट लक्षणे असतात. बुद्धधर्मीय तंत्रग्रंथांत देखील मंडलांना बरेच महत्त्व दिले आहे. इ. स. च्या ११ अंथवा १२ व्या शतकाच्या सुमारास झालेल्या अभयंकर गुप्ताच्या 'निष्पन्न योगावली' ह्या ग्रंथात २६ मंडलांची वर्णने दिली आहेत. ऋग्वेद ब्रह्मकर्मसमुच्चय ह्या निर्णयसागर छापखान्यात छापलेल्या ग्रंथामध्ये आरंभी सर्वतोभद्र प्रभृति अनेक मंडलांची चित्रे दिली असून त्यांच्यापैकी काही निरनिराळ्या रंगात छापली आहेत. सर्वतोभद्र ह्या मंडलाचा काव्यातही उल्लेख आला असून किरातार्जुनीय ह्या काव्यात (१५·२५) एक 'सर्वतोभद्र' चित्रबंधाचे उदाहरण दिले आहे.

**यंत्र**. हा तांत्रिक पूजेमधील आणखी एक विशेष प्रकार असतो आणि त्याला केव्हा केव्हा '**चक्र**' असेही म्हणतात. हा प्रकार काही पुराणांत आणि आधुनिक काळातील पुराणमताच्या आचारात आढळतो. 'यंत्र' ही एक आकृति असून ती धातूवर, दगडावर, कागदावर अथवा दुसऱ्या एखाद्या वस्तूवर खोदलेली, रेखाटलेली अथवा रंगवलेली असते. यंत्र हे मंडलासारखेच दिसते परंतु त्या दोहोत असा भेद असतो की मंडलाचा उपयोग कोणत्याही देवतेच्या पूजेमध्ये करिता येतो परंतु यंत्र हे एखाद्या विशिष्ट देवतेच्या पूजेकरिता तयार केलेले असते अथवा एखाद्या विशिष्ट हेतूने तयार केलेले असते. कु [यन्त्रं मन्त्रमयं प्रोक्तं देवता मन्त्ररूपिणी ।
यन्त्रे सा पूजिता देवी सहसैव प्रसीदती ॥
कामक्रोधादिदोषोत्थसर्वदुःखनियन्त्रणात् ।
यन्त्रमित्याहुरेतस्मिन् देवः प्रीणाति पूजितः ॥
कुलार्णव (६·८५।८६).] लार्णवतंत्रात (६ ८५।८६) म्हटले आहे की यंत्र हे मंत्रमय असते अथवा यंत्र रूपाने दिसणारी ती देवता असते. यंत्रावर पूजिलेली देवता तात्काल प्रसन्न होते. कामक्रोधादि दोषांपासून उत्पन्न होणारे दुःख यंत्र नियंत्रित करते म्हणून त्याला यंत्र म्हणतात.

यंत्र हा शब्द 'यंतृ' ह्या धातूपासून झाला असून यंत्र हे पूजा करणाऱ्याचे यमापासून आणि पिशाच्यांपासून आणि इतर संकटांपासून नेहमी संरक्षण करिते म्हणून त्याला यंत्र म्हणतात असे कुलार्णवतंत्रात सांगितले आहे. ह्या वरून असे स्पष्ट होते की कामक्रोधादिकांमुळे होणाऱ्या मनाच्या

चंचलतेला आळा घालण्याला साह्य करणारे यंत्र हे एक साधन असल्याचे समजले जात असे. तसेच ज्या देवतेची पूजा करावयाची असेल तिचे प्रतीक असलेल्या एका आकृतीवर पूजकाचे मन एकाग्र होण्यालाही यंत्राने साह्य होते असे समजले जात असे.

त्रिपुरातापनी उपनिषद् (२·३), प्रपंचसारतंत्र (पटल २१ व ३४), शारदातिलक (७·५३-६३), अहिर्बुध्न्य संहिता (अ. २३।२६), कौलावलीनिर्णय (अ. १०), इत्यादि अनेक ग्रंथांत यंत्रांची वर्णने केलेली आहेत. पद्मपुराण (पातालखंड ७९·१) यात असा नियम सांगितला आहे की हरीची (विष्णूची) पूजा शालिग्रामशिलेवर अथवा एखाद्या रत्नावर अथवा यंत्रावर, मंडलावर अथवा प्रतिमेवर करण्यास प्रत्यवाय नाही आणि ती एखाद्या देवालयातच केली पाहिजे असे नाही. सर्वात अधिक प्रसिद्ध असणाऱ्या **श्रीचक्रामध्ये** नऊ त्रिकोण असतात. त्यातील पाच त्रिकोणांची टोके खालच्या बाजूला असून ते त्रिकोण शक्तीचा बोध करितात. शिवाचा बोध करणाऱ्या चार त्रिकोणांची टोके वरच्या बाजूला असतात. खालच्या बाजूला टोके असणाऱ्या त्रिकोणामधील सर्वात लहान त्रिकोणामध्ये **बिंदु** असतो. श्रीत्रिपुरसुंदरी श्रीचक्रामध्ये बसलेली असते असे काही तंत्रग्रंथांत सांगितलेले असते. तुलनेने सौम्य स्वरूपाच्या असणाऱ्या शारदातिलक ह्या ग्रंथातदेखील दुष्ट हेतूकरिता यंत्रे काढण्यासंबंधी नियम दिले आहेत. उदाहरणार्थ ७·५८-५९ मध्ये आपल्या शत्रूच्या नाशाकरिता स्मशानातून आणलेल्या वस्त्रावर काढावयाच्या **आग्नेय** नावाच्या यंत्राचे वर्णन केले आहे.

ह्या संबंधात विशेष उल्लेख करण्यासारखी एक गोष्ट म्हणजे इ. स. च्या १४ व्या शतकात झालेल्या अत्यंत विद्वान असणाऱ्या सायण आणि माधव ह्या बंधूंनी केलेल्या सर्वदर्शनसंग्रह ह्या ग्रंथात नास्तिकवादी आणि वेदबाह्य मतांचे देखील विवेचन केले आहे. परंतु त्या ग्रंथात तंत्रांविषयी एकही शब्द लिहिला नाही. त्या ग्रंथकारांच्या काळात तांत्रिक सिद्धांत आणि आचार ह्यांचा बराच दुर्लौकिक झाला होता म्हणून बहुधा त्या ग्रंथकारांनी तांत्रिक सिद्धांताविषयी मौन धारण केले असले पाहिजे. त्यांना तांत्रिक ग्रंथांची माहिती नसेल असे मानणे अशक्य आहे.

# विभाग ७

## प्रकरण २८

### मीमांसा आणि धर्मशास्त्र

(मू. ग्रं. पा. ५।११५२-१२०१)

(टीप : प्रकरण २८, २९ आणि ३० ह्यांत योजिलेल्या विशिष्ट संक्षिप्त रूपांचे अर्थ पुढीलप्रमाणे आहेत :

पूमीसू अथवा पू. मी. सू. - जैमिनीकृत पूर्वमीमांसा सूत्र;

वेसू अथवा वे. सू. - बादरायणकृत वेदान्तसूत्र अथवा ब्रह्मसूत्र.)

याज्ञ. [पुराणन्यायमीमांसाधर्मशास्त्राङ्गमिश्रिताः।
वेदाः स्थानानि विद्यानां धर्मस्य च चतुर्दशाः ॥
याज्ञ. (१·३)] (१·३) मध्ये वेद, वेदाङ्गे, धर्मशास्त्र प्रभृति विद्येची आणि धर्माची जी १४ आधारस्थाने सांगितली आहेत त्यांत 'मीमांसा' ह्या शास्त्रांचा समावेश केला आहे. ह्याकरिता **मीमांसाशास्त्राचा धर्मशास्त्राशी जो संबंध** येतो त्याविषयी थोडक्यात विचार करणे आणि त्या शास्त्रातील **काही महत्त्वाच्या ग्रंथांचा उल्लेख करून त्यांच्या रचनेचे अदमासाचे काल** सांगणे ह्या गोष्टी करणे अवश्य आहे.

'मीमांसा' हा शब्द अति प्राचीन काळचा आहे. तै. सं. (७·५·७·१) मध्ये 'मीमांसन्ते' हे क्रियापदाचे रूप "चर्चा करितात अथवा एखाद्या संशयित मुद्याबद्दल संशोधन करून त्यावर निर्णय घेतात" ह्या अर्थाने योजिले आहे. त्याच ग्रंथात (६·२·६·४।५) ह्या वाक्यात तेच रूप आणि 'मीमांसेरन् हे रूप त्याच अर्थाने योजिले आहे. अथर्ववेद (९·१·३) यांत 'मीमांसमानाः' (चर्चा करणारे) हा शब्द आला आहे. शांखा. ब्राह्मण, शत. ब्रा. इत्यादि दुसऱ्याही वैदिक ग्रंथांत त्या अर्थाचे शब्द आले आहेत. छां. उप. (५·११·१) मध्ये असे वर्णन केले आहे की 'वेदांमध्ये अतिनिपुण असणारे औपमन्यद इत्यादि नावे असलेले पाच विद्वान एकत्र जमले आणि त्यांनी आत्म्याचे स्वरूप काय आहे आणि ब्रह्म काय आहे ह्या प्रश्नाची चर्चा (मीमांसा) केली. तै. उप. (२·८) मध्ये मीमांसा हा शब्द उच्च तत्त्वज्ञानाच्या विषयाचा विचार ह्या अर्थाने योजिला आहे.

मीमांसा हा शब्द मान् ह्या शब्दाला सन् हे उपपद लागून बनलेल्या ७ धातूंपैकी मीमांसते ह्या रूपापासून झाला आहे आणि त्याचा अर्थ 'शोध करून अंतिम निर्णय करणे' असा होतो असे पाणिनि (३·१·५।६) ह्या सूत्रावरील काशिकावृत्तीमध्ये सांगितले आहे आणि त्या ठिकाणी काशिकाकर्त्याच्या मनात 'अथातो धर्मजिज्ञासा' आणि अथातो ब्रह्मजिज्ञासा' ही सूत्रे बहुधा असावीत.

वरील चर्चेवरून असे सिद्ध होईल की उपनिषदांच्या पुष्कळ पूर्वीपासून 'मीमांसा' ह्या शब्दाचा अर्थ 'एखाद्या विषयाचा विचार करणे आणि त्याचा निर्णय करणे' असा होऊ लागला होता.

गौतम, आपस्तंब प्रभृतींच्या काही धर्मसूत्रांत मीमांसाशास्त्रातील विशेष संज्ञांचा आणि सिद्धांतांचा उपयोग केलेला आढळतो. उदाहरणार्थ, गौतम (१·२) मध्ये 'जेव्हा समान **अधिकार** असणारी दोन शास्त्रवचने असतील तेव्हाच **'विकल्प'** (म्हणजे पर्याय) करू द्यावा' असे म्हटले आहे. आप. ध. सू. (१·१·४·८) मध्ये म्हटले आहे की 'वेदामधील **प्रत्यक्षवचनाला** (सांप्रत नष्ट झालेल्या एखाद्या वचनाचा आधार असलेल्या) **आनुमानिक** आचारापेक्षा अधिक महत्त्व असते. आप. ध. सू. आणि जैमिनीचे पू. मी. सूत्र ह्यांत साम्य असणारी अनेक उदाहरणे आहेत. ह्यावरून असे दिसून येते की आपस्तंबाच्या वेळी मीमांसासिद्धांतांची फार प्रगती झाली होती. आपस्तंबाने 'न्यायवित्समय' (मीमांसेतील न्यायशास्त्र जाणणाऱ्यांचा सिद्धांत), 'न्यायविदः' (न्यायशास्त्र जाणणारे) हे शब्द वापरले आहेत. त्यावरून तो मीमांसाशास्त्रावरील कोणत्या तरी ग्रंथाचा अथवा मीमांसासूत्राची रचना केलेल्या एखाद्या ग्रंथकाराचा निर्देश करीत असावा असा निष्कर्ष निघतो.

कात्यायनाच्या श्रौतसूत्रासारख्या काही श्रौतसूत्रांत वेदवचनांचा अर्थ लावण्यासंबंधी नियम दिले आहेत आणि ते नियम जैमिनीच्या सूत्राशी जुळते आहेत आणि काही काही ठिकाणी तर त्याच शब्दात सांगितले आहेत. उदा. कात्या. (१·१·९।१०) जै.(६·१·४४) इत्यादि. कात्यायनाची पाणिनीच्या सूत्रावरील वार्तिके आणि पतंजलीचे महाभाष्य ह्यांच्यावरून असे दिसते की मीमांसाशास्त्रावरील पारिभाषिक संज्ञा आणि सिद्धांत ह्यांचा विकास त्या ग्रंथांच्या पुष्कळ पूर्वी झालेला होता. उदा. मीमांसाशास्त्रातील पारिभाषिक संज्ञा 'प्रसज्यप्रतिषेध' 'शास्त्रातिदेश', 'नियम', 'विधि', 'प्रकरण' ह्या कात्यायनाच्या वार्तिकात योजल्या आहेत. पतंजलीचे महाभाष्य हे पूर्वमीमांसेतील न्यायांनी पूर्णपणे भरलेले आहे. पाणिनि (२·२·२९) वरील महाभाष्यात 'मीमांसक' हा शब्द आला आहे. मीमांसा शास्त्राचे ज्या विषयात स्वतःचे सिद्धांत आहेत अशा महत्त्वाच्या विषयांची भरपूर चर्चा वार्तिकात आणि पतंजलीच्या महाभाष्यात केलेली आहे. पाणि. (४·१·९२ सामान्य चोदनास्तु विशेषेषु) ह्या सूत्रावरील वार्तिक ३ वरील महाभाष्यात पतंजलीने दिलेली उदाहरणे सर्वस्वी मीमांसाशास्त्रातील आहेत.

मध्ययुगीन काळातील मागाहून झालेले ग्रंथकार मीमांसाशास्त्र हे वेदांच्या खालोखाल सर्वात महत्वाचे विद्यास्थान असल्याचे मानीत असत. कारण त्याच्या योगाने अनेक वेदवचनांच्या अर्थासंबंधीचे अज्ञान, शंका आणि चुकीची मते ह्यांचे निरसन होते आणि सर्व विद्यास्थानांना त्यांच्या वास्तविक अर्थाच्या निर्णयाच्या कामात मीमांसा शास्त्राचे साहाय्य घ्यावे लागते.

वेदान्तसूत्रावरील रामानुजांच्या भाष्यात आणि प्रपंचहृदयासारख्या काही ग्रंथांत असे सांगितले आहे की मीमांसाशास्त्र हा २० अध्याय असलेला एक ग्रंथ असून त्या समग्र ग्रंथावर बोधायनाचे कृतकोटी नावाचे भाष्य होते. ह्या २० अध्यायांमध्ये पुढील अध्यायांचा समावेश होतो :— जैमिनीच्या नावावर प्रसिद्ध असलेले १२ अध्याय, संकर्षकांड संज्ञा असलेले ४ अध्याय आणि वेदान्तसूत्राचे ४ अध्याय. ह्या पहिल्या १२ अध्यायांना पुष्कळ वेळा पूर्वमीमांसा म्हणतात आणि तो एक विस्तृत ग्रंथ असून त्यात ९१५ अथवा निरनिराळ्या ग्रंथकारांच्या मते सुमारे १००० अधिकरणे आणि सुमारे २७०० सूत्रे आहेत आणि त्यात वेदामधील कठीण शब्दांचा अर्थ लावण्यासंबंधी महत्त्वाचे नियम सांगितले आहेत. याज्ञ (१·३) मध्ये उल्लेख केलेल्या 'मीमांसा' ह्या शब्दाने बहुधा जैमिनीच्या १२ अध्यायांच्या ग्रंथाचा निर्देश केला असावा. माधवाचार्यांसारखे कित्येक ग्रंथकार **पूर्व** आणि **उत्तर** मीमांसा अशा दोन मीमांसांचा उल्लेख करितात आणि त्यापैकी पूर्वमीमांसेत जैमिनीच्या नावावर प्रसिद्ध असलेल्या १२ अध्यायांचा आणि उत्तरमीमांसेत वेदान्तसूत्रांच्या चार अध्यायांचा समावेश करितात. शंकराचार्यांनी वेदान्तसूत्र (३·३·५३) वरील आपल्या

भाष्यात पूर्वमीमांसासूत्राच्या पहिल्या पादाबद्दल 'शास्त्रप्रमुख एव प्रथमे पादे' असे म्हटले आहे. आणि त्यावरून पूमीसू आणि वेसू ह्या दोहोंमिळून एक संपूर्ण शास्त्र बनते असे ध्वनित केले आहे.

उपलब्ध पूमीसू. चा आणि उपलब्ध वेसू. चा (अथवा **ब्रह्मसूत्राचा**) कर्ता कोण आणि त्या दोन ग्रंथांचा परस्पर संबंध काय ह्याविषयी अवघड आणि वादग्रस्त प्रश्न अस्तित्वात आहेत आणि त्या सर्व प्रश्नांचा विचार प्रस्तुत सारांश ग्रंथात करणे शक्य नाही. ह्या दोन ग्रंथांच्या बाबतीत विशेष लक्षात ठेवण्यासारखी पहिली गोष्ट अशी की जरी वेसू. ची संख्या पूमीसू संख्येच्या सुमारे १/५ असली तरी वेसू. मध्ये वैय्यक्तिक ग्रंथकारांसंबंधी उल्लेख पूमीसू. पेक्षा अधिक आहेत (वेसू. ३२ व पूमीसू. २७) आणि त्या ग्रंथांत परस्परांचे उल्लेख फारच थोड्या वेळा केले आहेत (वेसू. मध्ये जैमिनीचे ११ वेळा आणि बादरायणाचे ९ वेळा आणि पुमीसू. मध्ये जैमिनी आणि बादरायण ह्यांचे प्रत्येकी ५ वेळा उल्लेख केले आहेत). प्रश्न असा आहे की जैमिनी आणि बादरायण हे समकालीन होते किंवा काय आणि तसे नसल्यास त्यांचे परस्पर संबंध काय होते? ते समकालीन नव्हते ह्या मुद्यावर विद्वानात सामान्यतः एकवाक्यता आहे. जैमिनी हा पाराशर्य व्यासाचा शिष्य होता अशी एक प्राचीन आख्यायिका सामविधान ब्राह्मणामध्ये सांगितली आहे. निरनिराळ्या पुराणांत असे वर्णन केले आहे की **व्यासपाराशर्य** अथवा **कृष्णद्वैपायन** ह्याने वेदाचे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद असे चार भाग केले आणि अनुक्रमे आपले शिष्य पैल, वैशंपायन, जैमिनी आणि सुमंतु ह्यांना शिकविले. आश्व. गृह्मसूत्रात (३·४·४) तर्पणामध्ये 'सुमतु-जैमिनि-वैशंपायन-पैल-सूत्र-भाष्य-भारत-महाभारत-धर्माचार्याः तुप्यन्तु' असे सूत्र आले आहे. ह्यावरून असे उघड होते की इसवी सनाच्या अनेक शतके पूर्वी जैमिनी हे एक सन्मान्य नाव होते आणि त्याचा सामवेदाशी संबंध होता.

व्यास, जैमिनि, बादरायण, पूमीसू. आणि वेसू. ह्यांच्या संबंधींच्या निरनिराळ्या प्रश्नांवर सविस्तर चर्चा करणे प्रस्तुत सारांशग्रंथात शक्य होणार नाही. तेव्हा त्या प्रश्नावरील प्राथमिक स्वरूपाचे निर्णयच फक्त थोडक्यात खाली दिले आहेत.

(१) महाभारतात आणि काही पुराणात जैमिनि हा व्यासांचा शिष्य असल्याचे सांगितले आहे. परंतु ती गोष्ट जैमिनीला सामवेद देण्याच्या बाबतीतच सांगितली आहे आणि म्हणून ती गोष्ट त्या विषयापुरतीच मर्यादित ठेवली पाहिजे आणि इतर विषयांच्या बाबतीत लावता कामा नये. जैमिनीला सामवेद शिकविण्यासंबंधीची आख्यायिका खरी असण्याचा संभव आहे आणि ती असत्य असल्याचे दाखविणारा काहीही पुरावा उपलब्ध नाही. ती आख्यायिका मध्ययुगीन काळात मागाहून झालेल्या वल्लभाचार्यांसारख्या काही ग्रंथकारांनी इतिहासाचे आणि कालनिर्णयाचे यथार्थ ज्ञान नसल्यामुळे पूमीसू. आणि वेसू. ह्या दोन ग्रंथांच्या कर्त्यांना लावली आहे. पूमीसू. हा ग्रंथ वेसू. ह्या ग्रंथाच्या पूर्वी झालेला आहे आणि उपलब्ध पूमीसू. चा कर्ता उपलब्ध वेसू. च्या कर्त्याचा शिष्य असणे शक्य नाही. जैमिनी आणि बादरायण ही गोत्रनामे असून वैयक्तिक नावे नाहीत.

(२) पाणिनीच्या ग्रंथावरून असे दिसून येते की पाणिनीच्या काळी पाराशर्याने केलेले आणि कर्मन्दाने केलेले अशी दोन भिक्षुसूत्रे अस्तित्वात होती. काशकृत्स्नाने केलेल्या एका मीमांसा ग्रंथाचा पतंजलीने उल्लेख केला आहे. त्यावरून इसवी सनाच्या पूर्वी अनेक शतके भिक्षूंसंबंधीचे आणि मीमांसा विषयावरील सूत्रग्रंथ रचण्यात आले होते ह्यात संशय नाही.

(३) उपलब्ध वेसू. मध्ये उल्लेख केलेल्या जैमिनीच्या मतांचा विचार केल्यास जैमिनीने वेदान्तविषयावरदेखील एक ग्रंथ रचला होता. हा जैमिनी बादरायणाचा शिष्य होता हे दाखविण्याला काहीही आधार नाही. तेव्हा जैमिनी नावाचे दोन ग्रंथकार होते असे मानणे भाग पडते. त्यांपैकी एकाने पूर्वमीमांसा आणि वेदान्त ह्या दोन्ही विषयांचे विवेचन केले होते आणि दुसरा जैमिनी उपलब्ध पूमीसू. चा कर्ता असल्याचे समजले जात असे. हा दुसरा जैमिनी उपलब्ध पूमीसू. च्या कर्त्याहून वेगळा होता.

(४) पूमीसू. मध्ये बादरायणाच्या मताचे आणि वेसू मध्ये बादरायणाच्या मताचे जे उल्लेख केले आहेत त्यांवरून असा निष्कर्ष निघतो की बादरायणाने पूर्वमीमांसा आणि वेदान्त ह्या दोन्ही विषयांवर एक ग्रंथ रचला असला पाहिजे. तो ग्रंथ आज उपलब्ध नाही. हा बादरायण शंकराचार्यांनी आणि इतरांनी मानलेल्या उपलब्ध वेसू. च्या कर्त्याहून वेगळा होता. अशा रीतीने बादरायण नावाचे दोन ग्रंथकार होते.

(५) शंकराचार्य आणि इतर जुने भाष्यकार ह्यांच्या मताप्रमाणे उपलब्ध वेसू. चा कर्ताही बादरायण हाच होता. परंतु इ. स. च्या ९ व्या शतकाच्या सुमारापासून पुढील काळात त्या बादरायणाचा आणि वेदव्यासाचा घोटाळा करण्यात येऊ लागला.

(६) पूमीसू. आणि वेसू. ह्या दोन ग्रंथांपुरताच विचार केल्यास, दोन जैमिनि आणि दोन बादरायण अस्तित्वात होते. (इंडि. अँटि. खंड ५० पा. १७२ वर प्रो. शास्त्री यांनी प्रतिपादन केल्याप्रमाणे तीन जैमिनि अस्तित्वात नव्हते.)

पूर्वमीमांसा सिद्धांत आणि त्या शास्त्राची कार्यपद्धती ह्यांचा धर्मशास्त्रावरील ग्रंथांवर काय परिणाम झाला एवढ्याच गोष्टीचा प्रस्तुत विभागात विचार करावयाचा आहे. तथापि जैमिनीच्या पूमीसू. पासून पुढे झालेल्या पूर्वमीमांसा ग्रंथांनी स्मृतींचे आणि धर्मशास्त्राचे देखील आधारं घेतले आहेत ह्या गोष्टीचा उल्लेख करणे अवश्य आहे. ह्याबद्दल काही थोडी उदाहरणे देऊ. पूमीसू. (१·३) मध्ये स्मृतींच्या अधिकारकक्षांचे विवेचन केले आहे. पूमीसू. ६·७·६ ह्यात 'धर्मशास्त्र' ह्या शब्दाचा उल्लेख केला आहे. पूमीसू. (१२·४·४३) मध्ये आपल्या स्वतःच्या सिद्धान्ताला स्मृतींचे आधार दिले आहेत. पूमीसू. (६·१·१०) वरील शाबरभाष्यात आप. ध. सू. (२·६·१३·११) हे सूत्र उद्धृत केले आहे.

आता प्रत्यक्ष पूमीसू. कडे वळले पाहिजे. प्रत्येक शास्त्राच्या बाबतीत चार आवश्यक **अंगे** असतात. अशा अंगांना **अनुबंध** अशी संज्ञा असून ती पुढील प्रमाणे आहेत. विषय, प्रयोजन, संबंध आणि अधिकारिन्.

पूर्व मी.सू. च्या अगदी पहिल्याच सूत्रात त्या शास्त्राचा **विषय** आणि **प्रयोजन** ही अंगे सांगितली आहेत. त्या सूत्रात म्हटले आहे की, ह्यानंतर धर्माच्या ज्ञानाबद्दलचा विचार करू या. "ह्या शास्त्राचे **प्रयोजन** आणि ते शास्त्र ह्यांचा **संबंध** साध्याच्या साधनाबरोबरच्या संबंधासारखा आहे म्हणजे हे शास्त्र धर्माचे ज्ञान प्राप्त करून घेण्याचे साधन आहे." पूमीसू. (२·१·१) वरील शास्त्रदीपिका टीकेत म्हटले आहे की **ह्या शास्त्राचा योग्य विषय धर्म आहे** आणि वेदाचा अर्थ हा नाही.' (तस्माद् धर्म इत्येव शास्त्रविषयो न वेदार्थ इति). ज्याने वेद अथवा वेदाचा एखादा **भाग ह्यांचे** अध्ययन गुरूपाशी केले आहे तो ह्या शास्त्राचा **अधिकारिन्** आहे आणि त्याविषयी सविस्तर विवेचन पूमीसू. च्या ६ व्या अध्यायात केले आहे. वेदाचा अर्थ जाणण्याचे काम अंगावर घेण्यापूर्वी वेदाच्या केवढ्या भागाचे अध्ययन केले पाहिजे हे मीमांसाशास्त्रात सांगितलेले नाही. त्या प्रश्नाचा उलगडा स्मृतींनी केला आहे.

सर्वही दर्शनांमध्ये पूर्वमीमांसा शास्त्र अत्यंत विस्तृत आहे. ह्या शास्त्रात सुमारे २७०० **सूत्रे** आणि ९०० हून अधिक **अधिकरणे** (ह्यांना **न्याय** अथवा **निर्णय** असे म्हणतात) आहेत. अधिकरणात विषय, शंका, पूर्वपक्ष, पूर्वपक्षाचे खंडन आणि निर्णय अशी पाच अंगे असतात. [विषयो विषयश्चैव पूर्वपक्षस्तथोत्तरम् । निर्णयश्चेति पञ्चाङ्गं शास्त्रेऽधिकरणं स्मृतम् ॥

तिथितत्त्व (पा.९२ वरील अवतरणे)]. पूमीसू. च्या पहिल्या सूत्रामध्ये पुढे असे सांगितले आहे की एखाद्या व्यक्तीने **वेदाचे अध्ययन केल्यानंतर आणि तसे केले आहे म्हणून** त्याने धर्म कशाला म्हणतात ह्या प्रश्नाचा विचार करावा. ह्याकरिता दुसऱ्या सूत्रात **धर्माची व्याख्या** दिली आहे. 'धर्म हे असे कृत्य असते की जे मनुष्याच्या अत्यंत हिताला पोषक असते आणि जे प्रेरणा करणाऱ्या अथवा आज्ञा करणाऱ्या (वेदांच्या) वचनांनी सांगितलेले असते (चोदनालक्षणार्थः श्रेयस्करः). **चोदना** ह्या शब्दाचे शबरस्वामींनी असे स्पष्टीकरण केले आहे की 'ज्या वाक्याने एखाद्या मनुष्याला एखादे कृत्य करण्याचा आग्रह केला जातो अथवा एखादे कृत्य करण्याला प्रवृत्त केले जाते असे वाक्य'. म्हणून धर्माच्या बाबतीत ज्ञान मिळविण्याचे साधन (प्रमाण) चोदनाकारक वेदवचने असून अशा प्रवृत्तिकारक वेदवचनात जे नियम सांगितलेले असतात तो **धर्म** (म्हणजे धर्माचे स्वरूप) होय. कुमारिल भट्टांनी म्हटले आहे की 'जेव्हा धर्माच्या ययार्थ ज्ञानाची चर्चा करण्यात येते तेव्हा वेद हे अशा ज्ञानाचे साधन असते आणि त्या कामातील कार्यपद्धतीविषयी संपूर्ण माहिती मीमांसा पुरविते'. जैमिनीने पुढे प्रमाणाविषयी विवेचन करून म्हटले आहे की धर्माचे ज्ञान मिळविण्याला **शब्दा** व्यतिरिक्त (म्हणजे वेदाव्यतिरिक्त) अन्य कोणतेही साधन नाही. धर्म **प्रत्यक्ष** नाही म्हणजे धर्म म्हणजे काय हे कोणाला प्रत्यक्ष पाहता येत नाही. म्हणून धर्माची व्याख्या करिता येत नाही.

कुमारिलभट्टांनी ज्ञानाची साधने (**प्रमाणे**) प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, अर्थापत्ति (अटकळ) आणि अभाव अशी **सहा** असल्याचे सांगितले आहे.

**पूमीसू. मधील १२ अध्यायातील विषय** अनुक्रमे पुढीलप्रमाणे आहेत :-

**अध्याय १ : प्रमाण** (ज्ञानाची साधने); **अध्याय २ : भेद** (ज्यांच्या आधारावर धार्मिक विधि परस्परांपासून वेगळे करिता येतात आणि धार्मिक विधींमध्ये मुख्य आणि आनुषंगिक असे प्रकार करिता येतात अशी सहा कारणे).**अध्याय ३ : शेष** (ह्या शब्दाचा अर्थ जे दुसऱ्यावर अवलंबून असते अथवा शेषिन् संज्ञा असणाऱ्याने जे पाहिलेले असते अथवा जे दुसऱ्याला सहाय्य करिते ते), शेषाचा उपयोग कशा प्रकाराने करितात आणि श्रुति, लिंग, वाक्य, प्रकरण, स्थान आणि समाख्या ह्यांचे तुलनेने महत्त्व; **अध्याय ४ : प्रयुक्ति** (जे आवश्यक असते आणि जे यज्ञकर्त्याच्या सदसद्विवेकबुद्धीला अनुलक्षून म्हटलेले असते ते) म्हणजेच **क्रत्वर्थ** कोणते आणि **पुरुषार्थ** कोणते ह्याचे विवेचन; **अध्याय ५ : क्रम** (श्रुति इत्यादिकांना अनुसरून विशिष्ट कृत्यांचा अनुक्रम ठरविण्याची तत्त्वे); **अध्याय ६ : अधिकार** (याग करण्याला पात्र व्यक्ति); **अध्याय ७ : सामान्यातिदेश** (आदर्श स्वरूपाच्या यज्ञामधील भाग फेरफार केलेल्या यज्ञामध्ये समाविष्ट करणे); **अध्याय ८ : विशेषातिदेश** (विवक्षित विधीमध्ये अधिक गोष्टींचा समावेश करणे); **अध्याय ९ : ऊह** (वैदिक वाक्यांच्या आणि संस्कारांच्या शब्दांमध्ये फेरफार); **अध्याय १० : बाध** (आदर्श स्वरूपाच्या यज्ञातील काही भाग गाळणे); **अध्याय ११ : तंत्र** (एकच गोष्ट अनेक कृत्यांकरिता अथवा व्यक्तींकरिता उपयुक्त अथवा पुरेशी असणे); **अध्याय १२ : प्रसंग** (उपयोगाचा विस्तार).

पूमीसू. च्या **पहिल्याा अध्यायाचा सारांश** शबरस्वामींनी पुढीलप्रमाणे दिला आहे :

प्रमाणे, विधि, अर्थवाद, मंत्र आणि स्मृति ह्यांच्या निर्णयासंबंधी तत्त्वे; गणविधि आणि नामधेय ह्यांची चिकित्सा; संदिग्ध गोष्टींचा निर्णय वाक्यातील उरलेल्या भागाच्या साहाय्याने अथवा सामर्थ्याला (म्हणजे करावयास सांगितलेल्या कृत्यांकरिता पदार्थांच्या उपयुक्ततेला) अनुसरून करणे. मीमांसा-शास्त्रासंबंधीच्या प्रस्तुत विभागात पूमीसू. मधील बाकीच्या अध्यायांचा सारांश देण्याची आवश्यकता नाही.

मूळ पूमीसू. बराच विस्तृत ग्रंथ आहे आणि त्याच्यावर अनेक **टीका** झाल्या असून त्या टीकांवर अनेक टीका झाल्या आहेत. उपलब्ध टीकांतील **शबर स्वामींचे भाष्य** ही सर्वात जुनी टीका आहे. इ. स. च्या १० व्या आणि त्यानंतरच्या शतकांतील लेखकांनी लिहिलेले पूमीसू. वरील अनेक भाष्ये उपलब्ध आहेत. शाबरभाष्यावर अनेक टीका झाल्या असल्याचे कुमारिल भट्टाच्या श्लोकवार्तिकावरून कळून येते. कुमारिलाच्या पूर्वी झालेल्या टीकांपैकी एकही टीका सध्या उपलब्ध नाही. कुमारिल भट्टाने शाबरभाष्यावर **श्लोकवार्तिक** (सुमारे ४००० श्लोक), प्रचंड तंत्रवार्षिक आणि शाबर भाष्यावर टुप टीका (स्फुट टीपा, सुसूत्र टीका नव्हे) एवढे ग्रंथ लिहिले. ह्याशिवाय 'मध्यम टीका' आणि **'बृहन् टीका'** नावाचे आणखीही दोन ग्रंथ त्याने लिहिले असल्याचे मानले जाते. **श्लोकवार्तिक**, तंत्रवार्तिक आणि टुप्टीका ह्यांच्यावरही अनेक विद्वानांनी लिहिलेल्या अनेक टीका अस्तित्वात आहेत. शाबर भाष्यावर प्रभाकराने **बृहती** नावाची एक टीका लिहिली आहे. कुमारिल आणि प्रभाकर ह्यांच्या मतांमध्ये काही भेद आहेत. इ. स. १७५० च्या सुमारास रचलेला रामानुजाचार्य नावाच्या एका ग्रंथकाराचा **तंत्ररहस्य** हा प्रभाकर सांप्रदायातील प्रख्यात असा अखेरचा ग्रंथ आहे. (दुसरी आवृत्ती, गायकवाड ओरि. ग्रं. मध्ये १९५६ मध्ये प्रकाशित).

**मंडनमिश्राने** पूर्वमीमांसेवर अनेक ग्रंथ लिहिले होते.तो इ. स. ६९० ते ७१० ह्या कालाच्या सुमारास होऊन गेला. एके काली प्रभाकर हा फार मान्यतेला पोचला असावा. त्याच्या सांप्रदायाचे शिक्षण देणारे एक विद्यालय स्थापन करण्यात आल्याचा इ. स. १०९८ मधील गदग येथील एका शिलालेखात उल्लेख आहे (एपि. इंडि. खं. १५ पा. ३४८). पुढे क्रमाक्रमाने प्रभाकराचा सांप्रदाय मागे पडला आणि कित्येक शतकेपर्यंत कुमारिलाचा भाट्टसांप्रदाय अतिशय भरभराटीत आहे. प्रस्तुत ग्रंथकाराच्या मताप्रमाणे प्रभाकर हा कुमारिलाच्या नंतर झाला. त्याने प्रतिपादन केलेली मते कोणापासून घेतलेली होती अथवा ती त्याची स्वतःचीच होती हे सांगता येत नसले तरी ती स्वतःची असावीत हे अधिक संभवनीय दिसते.

पूमीसू. मध्ये आलेल्या विषयांवर अथवा काही अंगांवर कुमारिलाच्या वेळेपासून अनेक टीका लिहिल्या गेल्या आहेत. अशा ग्रंथकारांच्या व्यक्तिमत्वाविषयीच्या काही थोड्या प्रश्नांवरील प्रस्तुत ग्रंथकाराची मते थोडक्यात पुढे दिली आहेत :-

(१) **प्रभाकर** हा कुमारिलभट्टाचा प्रत्यक्ष शिष्य होता किंवा काय हे सिद्ध करण्याला तशा परंपरेव्यतिरिक्त काही निश्चित पुरावा उपलब्ध नाही. तथापि प्रभाकर कुमारिलाच्या मागून झाला होता ह्यात संशय नाही.

(२) **शालिकनाथ** हा प्रभाकराचा प्रत्यक्ष शिष्य होता.

(३) **मंडन** हा कुमारिलाच्या मागाहून झालेला अथवा त्याच्यापेक्षा वयाने कनिष्ठ होता. परंतु तो कुमारिलाचा शिष्य होता असे म्हणण्याला महत्त्वाचा आधार नाही.

(४) **मंडन** आणि **उंबेक** एक नाही. **मंडन** आणि **विश्वरूप** एक नाही.

(५) **विश्वरूप** आणि **सुरेश्वर** एक होते. विश्वरूपाने संन्यासग्रहण केल्यावर त्याने सुरेश्वर हे नाव धारण केले. तो शंकराचार्यांचा शिष्य होता.

(६) **उंवेक** आणि **भवभूति** एकच असण्याचा संभव आहे परंतु पुरेसा पुरावा नाही. उंबेक हा कुमारिलाचा शिष्य होता.

वरील उत्तरांवरून पूर्वमीमांसाशास्त्रावरील लेखकांचा अतिशय संभवनीय **कालानुक्रम** पुढीलप्रमाणे ठरतो : कुमारिल, प्रभाकर, उंबेक, शालिकनाथ. हे लेखक इ. स. ६५० आणि इ. स. ७५० ह्या अवधीत होऊन गेले. ह्यांच्यामधील कुमारिल सर्वात जुना असून प्रभाकर आणि मंडन हे समकालीन होते **अथवा** मंडन प्रभाकराहून वयाने लहान होता.

पूर्वमीमांसाशास्त्रासंबंधीच्या महत्त्वाच्या ग्रंथांची आणि ग्रंथकारांची कालानुक्रमवार यादी काही थोड्या टीपांसह खाली दिली आहे. ह्या यादीतील बहुतेक काळ अदमासाचे आहेत :

**जैमिनिकृत पूर्वमीमांसासूत्र**. ख्रि. पू. ४०० ते ख्रि. पू. २००

**उपवर्ष.** पूमीसू. २·३·१६ वरील वार्तिकात कुमारिलभट्टाने ह्याला वृत्तिकार मानला असला आणि त्याची मते उद्धृत केली असली तरी शबरस्वामीच्या भाष्यात इतर ठिकाणी उल्लेख केलेला वृत्तिकार उपवर्षाहून वेगळा असण्याचा संभव आहे. **उपवर्षाचा काळ** ख्रि. पू. १०० ते इ. स. १०० दरम्यान.

**भवदास**. हा शबरस्वामीच्या पूर्वी होऊन गेल्याचे श्लोकवार्तिकात (प्रतिज्ञासूत्र श्लो. ६३) म्हटले आहे. इ. स. १००-२०० दरम्यान. **भर्तृमित्र**. इ. स. २००-६०० दरम्यान. **शबरस्वामी**.इ. स. २००-४०० दरम्यान.

**कुमारिलभट्ट**. इ. स. ६५०-७०० सुमारास.

**प्रभाकर** शाबरभाष्यावरील ‘बृहती’ टीकेचा कर्ता, इ. स. ६७५-७२५ सुमारास.

**मंडन**. विधिविवेक, भावनाविवेक, विभ्रमविवेक आणि मीमांसानुक्रमणिका ह्या ग्रंथांचा कर्ता. इ. स. ६८०-७२० दरम्यान.

**उंबेक** भवभूती आणि हा एकच मानण्यात येते. कुमारिलकृत श्लोकवार्तिक आणि मंडनकृत भावनाविवेक ह्यांच्यावरील टीकांचा कर्ता. इ. स. ७००-७५० दरम्यान.

**शालिकनाथ.** प्रभाकरकृत ‘बृहती’ टीकेवर ऋजुविमल नावाची टीका आणि प्रभाकरपंचिका नावाचा एक स्वतंत्र ग्रंथ ह्यांचा कर्ता. इ. स. ७१०-७७०.

**सुरेश्वर (संन्यास घेण्यापूर्वी विश्वरूप)**, इ. स. ८००-८४० दरम्यान.

**वाचस्पतिमिश्र.** मंडनकृत विधिविवेकावर न्यायकणिका टीका आणि शांकरभाष्यावर भामती टीका ह्यांचा कर्ता. इ.स.८२०-९०० दरम्यान.

**पार्थसारथिमिश्र.** शास्त्रदीपिका, न्यायरत्नाकर (श्लोकवार्तिकावर टीका), तंत्ररत्न (टुप् टीकेवर टीका) आणि न्यायरत्नमाला ह्या ग्रंथांचा कर्ता. इ. स. ९००-११००.

**मुरारिमिश्र.** ह्याने मीमांसाशास्त्रावर तिसरा सांप्रदाय स्थापन केल्याचे मानले जाते. (मुरारेस्तृतीयः पथाः), **त्रिपादनीतिनयन** आणि **अंगत्वनिरुक्ति** ह्या दोन ग्रंथांचा कर्ता. इ. स. ११५०-१२२० दरम्यान.

**अप्पय्यदीक्षित**. विधिरसायन ह्या ग्रंथाचा कर्ता. ह्याने निरनिराळ्या शास्त्रांवर १००-१०८ ग्रंथ लिहिले असल्याचे मानतात.

इ. स. १५२० ते १५९३ दरम्यान (अथवा १५५४-१६२६ दरम्यान)

**आपदेव** (अनंतदेवाचा पुत्र). मीमांसान्यायप्रकाश ग्रंथ.

इ. स. १६१०-१६८० दरम्यान.

**खंडदेव**. भाट्टकौस्तुभ, भाट्टदीपिका आणि भाट्टरहस्य ह्या ग्रंथांचा कर्ता.

इ. स. १६००-१६६५ सुमारास.

**गागाभट्ट अथवा विश्वेश्वरभट्ट.** भाट्टचिंतामणि ह्या ग्रंथांचा कर्ता.

इ. स. १६२०-१६९० दरम्यान.

**रामानुजाचार्य**. प्रभाकर सांप्रदायाचा ‘तंत्ररहस्य’ आणि ‘नायकरत्न’ ह्या ग्रंथांचा कर्ता

इ. स. १५००-१५७५ सुमारास.

**स्वामी केवलानंद सरस्वती**. मीमांसाकोश पूर्वमीमांसेवरील विश्वकोशाच्या स्वरूपाचा आणि अत्यंत विद्वत्तापूर्ण ग्रंथ. (वाई येथील प्राज्ञपाठशाला मंडलाने प्रकाशित) पूज्य स्वामी नुकतेच (१९५५) ब्रह्मीभूत झाले.

**म. म. गंगानाथ झा**. ह्यांनी ह्या विषयावर लहान लहान अनेक लेख लिहिले आहेत आणि शाबर भाष्याचे भाषांतर, तंत्रवार्तिक आणि श्लोकवार्तिक हे ग्रंथ संपादन कले आहेत.

खाली उल्लेख केलेले **ग्रंथ** आणि **निबंध** उपयुक्त आहेत :

**मॅक्समुल्लरकृत** 'भारतीय तत्त्वज्ञानातील सहा संप्रदाय' लेख.

**म. म. गंगानाथ झा कृत** 'पूर्वमीमांसेमधील प्रभाकर सांप्रदाय' लेख.

**ए. बी. कीथ** ह्यांचा 'कर्ममीमांसा' निबंध.

प्रस्तुत ग्रंथकाराचा 'पूर्वमीमांसापद्धतीचे त्रोटक वर्णन' ह्या विषयावरील लेख (भांडार. ओ. रि. इं. पुणे नियतकालिक खं. ६ पा. १-४०, १९२५).

**डॉ. एस्. राधाकुष्णन्** 'भारतीय तत्त्वज्ञान खंड २ पा. ३७४-४२९ (सन १९४).

**डॉ. डी. व्ही. गर्गे.** 'शाबरभाष्यातील अवतरणे' (पुणे १९५२)

**प्रो. जी. व्ही. देवस्थळी**. 'मीमांसा-प्राचीन भारताचे वाक्यशास्त्र (१९५९).

**श्री. नटराज ऐय्यर कृत.** 'मीमांसान्यायतत्त्वशास्त्र (झा रिसर्च इन्स्टिट्यूट, अलाहाबाद प्रकाशित)

# प्रकरण २९

## पूर्वमीमांसाशास्त्रातील काही महत्त्वाचे सिद्धांत

(मू. ग्रं. पा. ५।१२०२-१२८२)

प्रस्तुत प्रकरणामध्ये पूर्वमीमांसाशास्त्रातील काही विशिष्ट प्रकारचे आणि महत्त्वाचे सिद्धांत संदर्भासह देऊन त्यांच्यापैकी काहीं संबंधी खुलासे द्यावयाचे आहेत.

(१) **वेद नित्य, स्वतंत्र, अपौरुषेय** (कोणीही दैवी अथवा मानवी ग्रंथकाराने न रचिलेले) **आणि अचूक आहेत**. [पूमीसू. १·१·२७।३२ आणि पूमीसू. १·१·५ वरील शाबरभाष्य (पा. ५३) आणि श्लोकवार्तिक, वाक्याधिकरण, श्लोक ३६६-३६८]. ह्यासंबंधीचा कोटिक्रम थोडक्यात पुढीलप्रमाणे आहे :- वेदाचे अध्ययन पूर्वीच्या काळी आणि सांप्रतकाली देखील गुरुपासून शिष्य अशा पद्धतीने करण्यात येते; ज्या व्यक्तीने वेद पहिल्याने रचिला आणि ज्या व्यक्तीने वेदाचे पहिल्याने अध्ययन केले अशा व्यक्तीविषयी काही पुरावा उपलब्ध नाही. प्रजापतीने वेद निर्माण केला अशी वचने स्मृतींत आणि पुराणांत आहेत, परंतु ती वचने अर्थवाद (प्रशंसापर) आहेत, आणि त्यांचा हेतु वेदाचे प्रामाण्य दर्शित करणे एवढाच असतो. शब्द आणि अर्थ ह्यांचा संबंध जसा नित्य असतो आणि कोणी घडवून आणलेला नसतो, त्याप्रमाणेच वेद हा नित्य आहे. मनु (१·२१) मध्ये म्हटले आहे की ब्रह्मदेवाने वेदांच्या शब्दांपासून सर्वांची नावे आणि त्यांची उचित कर्तव्ये ह्यांची उत्पत्ती केली. ह्यावरून असे सूचित केले जाते की मनूच्या मताप्रमाणे वेद स्वयंसिद्ध आहे. वेदाचा कर्ता कोणी नसून ब्रह्मदेवाला वेदाचे स्मरण होते आणि मनूला देखील निरनिराळ्या कल्पांमध्ये धर्माचे स्मरण होते असेही स्मृतींमध्ये म्हटलेले असते. पराशरस्मृति (१·२१).

ह्या सिद्धांतावर असा आक्षेप घेण्यात येतो की तै. सं. (७·१·१०·२), (७·२·२·१) ह्यांच्यासारख्या वेदवचनांत व्यक्तींची नावे आली आहेत आणि ज्या अर्थी त्या व्यक्ती मर्त्य आहेत, त्या अर्थी त्या व्यक्ति जन्मण्यापूर्वी वेद अस्तित्वात नसला पाहिजे आणि म्हणून वेद नित्य नाही. ह्या आक्षेपाला पूमीसू. (१·१·३१) मध्ये असे उत्तर दिले आहे की अशा प्रकारच्या वचनांचा अर्थ वेगळ्या रीतीने करावयाचा असतो. उदाहरणार्थ, त्या वचनात आलेल्या 'प्रावाहणि' ह्या शब्दाचा अर्थ 'वायु' असा आहे.

जैमिनि आणि यास्क ह्यांच्या अनेक शतके पूर्वी **'ऐतिहासिक'** नावाचा वेदांचा अर्थ लांवण्याचा सांप्रदायं होता. उदाहरणार्थ, ऋ (१०-१०) ह्या सूक्तामध्ये यम आणि यमी ह्याचा संवाद वर्णन केला आहे. वेद नित्य आहे असे प्रतिपादन करणारे लोक त्या सूक्तातील 'यम' ह्या शब्दाचा अर्थ 'आदित्य' आणि 'यमी' ह्या शब्दाचा अर्थ 'रात्र' असा करितात. ऋ. (१०·१०८) हे सूक्त सरमा (इंद्राची कुत्री) आणि पणिः ह्यांच्यामधील संवादाचे आहे. निरुक्त (११·२५) मध्ये ह्यासंबंधी एक आख्यान असल्याचे म्हटले आहे. अशा प्रकारच्या सर्व आख्यायिका एखाद्या नैसर्गिक चमत्कारावर रूपक केलेल्या असतात असा नैरुक्तांचा आग्रह असतो आणि उलट पक्षी अशा सर्व आख्यायिकांना इतिहासाचा आधार असतो असा ऐतिहासिकांचा आग्रह असतो. ऐतिहासिक सांप्रदायाचे व्युत्पत्तिकार वेद नित्य आहे हा सिद्धांत मान्य करीत नाहीत असे जरी निरुक्तामध्ये स्पष्टपणे म्हटले नसले तरी ऐतिहासिकांनी दिलेल्या खुलाशावरून त्यांना वरील सिद्धान्त मान्य नव्हता असे ध्वनित होते.

(२) **शब्द आणि अर्थ ह्यांचा संबंध नित्य आहे**. हाच सिद्धान्त पूमीसू. (१·१·५) वरील शाबर भाष्यात पुढील वाक्यात दिला आहे : "ज्याने शब्द आणि अर्थ ह्यांचा संबंध घडवून आणला अशी कोणतीही व्यक्ति पुढे उभी करिता येत नाही म्हणून त्यांचा संबंध नित्य आहे." मीमांसकांच्या मते शब्द, अर्थ आणि त्या दोहोंचा संबंध हे सर्व नित्य असतात. (पूमीसू. १·३·३०-३५)

(३) **आत्मा**. पूमीसू. मध्ये आत्म्याचे अस्तित्व स्पष्टपणे मान्य केलेले नाही. पूमीसू. मध्ये आत्म्याविषयी काही विवेचन नसल्याकारणानेच बहुधा पूर्वमीमांसा अनीश्वरवादाला अनुकूल असल्याचे कोणीकोणी म्हटले असावे. मध्ये आत्म्याच्या अस्तित्वाविषयी स्पष्टपणे विवेचन नसले तरी पूमीसू. ला आत्म्याचे अस्तित्व मान्य असलेच पाहिजे अशी अप्रत्यक्ष चिन्हे त्यात आहेत असे कुमारिलाने म्हटले आहे. अनेक धार्मिक विधींचे फल स्वर्ग हे आहे असे प्रतिपादन केलेल्या वेदवचनांचा पूमीसू. मध्ये उल्लेख केला असून असे गुहीत धरले आहे की ते फल कर्त्याला मिळते. उदा. पूमीसू. (३·७·१८।२०) ह्या सूत्रात 'अग्निहोत्रं जुहुयात् स्वर्गकामः' ह्याच्यासारख्या वेदवचनाचे विवेचन केले आहे. मीमांसा वास्तविकपणे नास्तिक मताला अनुकूल नसून देखील तिला **लोकायत** (नास्तिक) म्हटले आहे अशी तक्रार कुमारिल भट्टांनी 'श्लोक- वार्तिकात' केली आहे आणि मीमांसाशास्त्र आत्मा आणि परलोक ह्यांच्याबाबतीत आस्तिक्याच्याच मार्गाचे अनुकरण करीत असते असे त्यांनी प्रतिपादन केले आहे. श्लोकवार्तिक (आत्मवाद श्लोक १४८) ह्यांत म्हटले आहे की 'नास्तिकवादाचा निषेध करण्याची इच्छा असणाऱ्या भाष्यकाराने (शबरस्वामीने) पूमीसू. (१·१·५) वरील भाष्यात आत्म्याचे अस्तित्व युक्तिवादाने सिद्ध केले आहे.'

(४) **देव आणि यज्ञातील देवता**. यज्ञाच्या अग्नीमध्ये जिला उद्देशून आहुती अर्पण करण्यात येते त्या देवता शब्दाने कशाचा बोध होतो ह्या प्रश्नाचा विचार केला असता अनेक आश्चर्यकारक निष्कर्ष निघतात. पूमीसू. (८·१·३२।३४) मध्ये जैमिनीने अशी भूमिका स्वीकारली आहे की एखाद्या यज्ञामध्ये **हवि** (आहुति) हा मुख्य भाग असून **देवता** हा गौण भाग असतो आणि जर हवि आणि देवता ह्यांच्यामध्ये विरोध असेल तर त्या प्रश्नाचा निर्णय हवीला प्राधान्य देऊन करावा. मीमांसेच्या मताप्रमाणे कर्माचे फक्त यज्ञच देतो, देवता देत नाही. तै. सं. (२·२·१·१.) मध्ये म्हटले आहे 'ज्याला संततीची इच्छा असेल त्याने इंद्र आणि अग्नि ह्यांना पुरोडाश अर्पण करावा आणि असे केल्याने इंद्र त्याला संतती देतो.' ह्या वेदवचनातीच 'इंद्र संतती देतो' हे शब्द मीमांसेच्या मताने सर्वस्वी अर्थवाद (प्रशंसात्मक) आहेत. पूमीसू. (९·१·६।१०) ह्यांच्यावरील भाष्यात शबरस्वामीने असे विधान केले आहे की जरी ऋ. (१०·४७·१, ३·३०·५) ह्यांच्यासारख्या अनेक वचनांवरून वैदिक देवतांना शरीरे होती आणि त्यांना खातापिता येई असे गृहीत धरल्यासारखे दिसत असले तरी ती सर्व वचने अर्थवाद आहेत. शबरस्वामीने म्हटले आहे की एखाद्या देवतेच्या यज्ञाशी जो संबंध जोडलेला असतो तो त्या देवतेच्या **स्वरूपाशी** नसून आहुती अर्पण करण्याकरिता योजलेल्या **शब्दांशी** असतो. **म्हणजे** देवता हा शब्दांचा विषय असतो. यज्ञात एखाद्या देवतेची जी पूजा केली जाते तो केवळ लाक्षणिक अर्थानेच होय. ह्यावरून असा निष्कर्ष निघतो की मीमांसाशास्त्राला **वेद हा देवाचा शब्द असल्याचे** अथवा **धार्मिक विधीचे मिळणारे फल देवाच्या कृपेने प्राप्त होते ही मते मान्य नव्हती.** 'स्वर्गकामो यजेत' (स्वर्गाची इच्छा असणाऱ्याने यज्ञ करावा) असे जेव्हा सांगितलेले असते त्यावेळी तीन प्रश्न उद्भवतात : **पहिला प्रश्न** 'काय घडवून आणावयाचे आहे? हा असून त्याचे उत्तर 'स्वर्ग' हे आहे; **दुसरा प्रश्न** 'कोणत्या साधनाने? हा असून त्याचे उत्तर 'यज्ञाने' हे आहे. **तिसरा प्रश्न** 'कोणत्या प्रकाराने? हा असून त्याचे उत्तर 'यजेत' ह्या शब्दाला अनुलक्षून अग्नीची स्थापना करण्यासारख्या विधीनी' असे आहे. ह्यावरून असे सिद्ध होते की स्वर्ग **हे फलयज्ञाच्या द्वारा प्राप्त होते आणि देवतेकडून होत नाही**.

मागाहूनच्या काळात झालेल्या वेंकटदेशिक (इ. स १२६९-१३६९) ह्यांच्यासारख्या ग्रंथकारांना यज्ञामधील देवतांसंबंधीच्या ह्या सर्व कल्पना आकलन करिता आल्या नाहीत आणि त्यांनी कुमारिल आणि प्रभाकर ह्या दोघांच्या सांप्रदायावर आक्षेप घेऊन यज्ञाचे फल देणारा ईश्वर आहे असे मत प्रतिपादन केले.

(५) **वास्तविकपणे संपूर्ण विश्वाची उत्पत्ती होत नाही अथवा प्रलय होत नाही**. मीमांसेच्या मताप्रमाणे विश्वाची घटकद्रव्ये उत्पन्न होत असतील आणि नाश पावत असतील. परंतु संपूर्ण विश्वाला आदि नाही आणि अंत नाही. श्लोकवार्तिकात (५·११२ ते ११७) म्हटले आहे की हे विश्वादिक सर्व विश्वकर्त्याच्या पूर्वी अस्तित्वात होते आणि असा विश्वकर्ता वेदांच्या पूर्वी अस्तित्वात होता ही गोष्ट (अनुमानाने) सिद्ध करिता येते. विश्वाच्या उत्पत्तीच्या आणि प्रलयाच्या वर्णनांचा हेतु केवळ देवाच्या सामर्थ्याचे आणि मानवी प्रयत्नांच्या फोलपणाचे प्रदर्शन करून वेदाने घालून दिलेली कर्तव्ये करण्याला लोकांना उद्युक्त करणे हा आहे. ह्यावरून असे दिसून येईल की मीमांसाशास्त्रातील सृष्टीच्या उत्पत्तीची आणि प्रलयाची कल्पना महाभारत आणि गीता ह्यातील (अहं सर्वस्व प्रभवो मत्तः सर्व प्रवर्तते' - गीता १०-८ ह्यासारख्या) कल्पनेहून निराळ्या प्रकारची आहे.

(६) **अपूर्वासंबंधी सिद्धांत**. अपूर्व म्हणजे आश्चर्यकारक अथवा गुढ शक्ती. वेदामध्ये असा नियम सांगितला आहे की ज्याला स्वर्गाची इच्छा असेल त्याने यज्ञ करावा. तथापि स्वर्ग हे फल अतिदीर्घ कालानंतर प्राप्त होते आणि यज्ञ हा अल्पकाळपर्यंतच अस्तित्वात असतो. अशा रीतीने यज्ञ (कार्य) आणि स्वर्ग (फल अथवा हेतु) ह्यांच्यामध्ये प्रत्यक्ष संबंध असत नाही. वेदामध्ये सांगितलेल्या नियमावरून मनुष्याने यज्ञ करण्याकरिता घेतलेल्या क्रियांचा आणि फलांचा काही तरी संबंध असल्याचे गृहीत धरिले पाहिजे. यज्ञामधील (मुख्य आणि गौण) कृत्ये करण्यापूर्वी मनुष्याला स्वर्ग मिळण्याची पात्रता नसते ही गोष्ट सर्वांनी मान्य केली पाहिजे. वेदाने यज्ञ आणि स्वर्ग ह्यांचा संबंध जोडला असल्याने आपण असे अनुमान केले पाहिजे की यज्ञ जरी अल्प काळात नाहीसा होत असला तरी यज्ञापासून काहीतरी गूढ शक्ती उत्पन्न होत असली पाहिजे आणि अशी शक्ती स्वर्गरूपी फल घडवून आणण्याचे कारण असली पाहिजे आणि अशी शक्ती एकतर यज्ञ करणाऱ्याच्या आत्म्यात वसत असली पाहिजे अथवा (नाश झालेल्या यज्ञापासून उत्पन्न झालेला) अदृश्य परिणाम असली पाहिजे. ह्या तर्काला 'श्रुतार्थापत्ति' असे म्हणतात. मनुष्याच्या ठिकाणी वसत असलेली अथवा यज्ञाच्या योगाने उत्पन्न झालेली ही शक्ती प्रत्यक्ष प्रमाणान अथवा ज्ञानप्राप्तीच्या दुसऱ्या कोणत्याही साधनाने सिद्ध करिता येत नाही तर ती केवळ 'श्रुतार्थापत्ती' नेच सिद्ध करिता येते. अशी अदृश्य शक्ति यज्ञ करण्यापूर्वी अस्तित्वात नव्हती आणि यज्ञ केल्यानंतर ती एखादी नवी वस्तु ह्या स्वरूपाने उत्पन्न होते म्हणून केवळ व्युत्पत्तीशास्त्राच्या दृष्टीने तिला '**अपूर्व' म्हणतात.**

(७) **स्वतःप्रामाण्य.** पूमी. शास्त्रामध्ये **सहा प्रमाणे** सांगितली आहेत. (प्रभाकराच्या मताने **पांच** प्रमाणे असतात.) ही सर्वही प्रमाणे वास्तविकपणे **स्वयंसिद्ध** असतात आणि त्यांची **सत्यता** सिद्ध करण्याकरिता बाह्य पुराव्याची आवश्यकता नसते, असे पूमी. शास्त्रात मानले आहे. परंतु एखाद्या प्रमाणाचा **खोटेपणा** (परतः) बाह्य पुराव्याच्या आधाराने सिद्ध होतो. प्रभाकराने असे प्रतिपादन केले आहे की प्रत्येक अनुभव हा खरा असतो आणि कोणताही अनुभव चुकीचा अथवा भ्रामक असल्याचे म्हणता येत नाही.

(८) **स्वर्ग.** जैमिमि, शबरस्वामी, कुमारिलभट्ट ह्यांच्या स्वर्गासंबंधीच्या कल्पना वेद आणि पुराणे ह्यांनी वर्णन केलेल्या स्वर्गाविषयीच्या कल्पनांपेक्षा वेगळ्या प्रकारच्या आहेत. स्वर्गातील सुखाची वैदिक वाङ्मयात, भारतरामायणात आणि पुराणांत आलेली वर्णने मागे खंड ४ मध्ये सांगितली आहेत. पूमीसू.

(६·१·१) वरील शाबरभाष्यात स्वर्गासंबंधीच्या सर्वसामान्य लोकांच्या दोन मतांचा उल्लेख केला आहे. त्यातील एक मत असे आहे कीं तलम रेशमी वस्त्रे, चंदन, सोळा वर्षाच्या वयाच्या तरुणी ह्यांच्या सारख्या ज्या ज्या गोष्टींनी मनुष्याला सुख प्राप्त होते त्यांना '**स्वर्ग**' अशी संज्ञा देण्यात येते. दुसरे मत असे आहे की स्वर्ग हे असे एक स्थान आहे की जेथे उष्णता नाही अथवा थंडी नाही, क्षुधा नाही अथवा तहान नाही, असंतोष नाही अथवा थकवा नाही.

शबरस्वामी आणि कुमारिलभट्ट ह्यांनी म्हटले आहे की स्वर्गासंबंधीची लोकव्यवहारातील मते चुकीची आहेत. महाभारत आणि पुराणे मनुष्यांनी रचिलेली असल्यामुळे त्यांच्या मताचा विचार करण्याची आवश्यकता नाही आणि वेदातील वर्णने केवळ प्रशंसा करण्याकरिता केलेले **अर्थवाद** आहेत. सुख हाच स्वर्ग आणि सर्व लोक सुखाचीच इच्छा करितात. ज्या सुखात दुःख मिश्रित नसते, ज्या सुखात दुःखाचा प्रादुर्भाव लागलीच होत नाही, जे सुख इच्छिल्याबरोबर प्राप्त होते त्याला **स्वर्** (म्हणजे स्वर्ग) हा शब्द लावण्यात येतो.

स्वर्गाचा उपभोग अन्य जन्मातच घ्यावा लागतो ह्या विधानाचे समर्थन करिताना टुप् टीकेत म्हटले आहे की **स्वर्ग ह्याचा अर्थ अप्रतिम सुख** असा आहे आणि ते सुख केलेल्या क्रियेच्या प्रमाणात प्राप्त होते. मनुष्याला ह्या जन्मात काही तरी सुख प्राप्त होतच असते. प्रत्येक सुख हे ज्योतिष्टोम **यज्ञाचे** फल नसते आणि प्रत्येक मनुष्य ज्योतिष्टोम यज्ञ करीत नाही. ह्यावरून सुख हे नैसर्गिक ठरते. तथापि अप्रतिम सुख म्हणजे काय ह्याचा खुलासा करिता येत नसल्यामुळे तशा सुखाच्या उपभोगाकरिता अन्य शरीराच्या अस्तित्वाची कल्पना करावी लागते. ते अन्य शरीर मनुष्याला मेल्याशिवाय मिळू शकत नसल्यामुळे स्वर्गाचा उपभोग अन्य जन्मात घ्यावा लागतो.

(९) **मोक्ष.** पूमीसू. शबरस्वामी आणि प्रभाकर ह्यांच्यापैकी एकानेही 'मोक्ष' ह्या विषयाचे विवेचन केलेले नाही. कुमारिलभट्ट आणि प्रकरणपंचिका ह्यांनी असे सांगितले आहे की **मोक्ष ह्याचा अर्थ पुन्हा देह धारण करावयास न लागणे**. ज्या जन्मात एखाद्या मनुष्याला मोक्ष प्राप्त व्हावा अशी इच्छा असेल त्या जन्मी त्याने पूर्वजन्मातील कृत्यांची फले भोगिली म्हणजे त्या फलांचा क्षय होतो. हे मत शंकराचार्यांनी वेसू (४·३·१४) ह्यावरील भाष्यात प्रतिपादन केलेल्या मताहून भिन्न आहे. शंकराचार्यांनी असे प्रतिपादन केले आहे की मोक्षप्राप्तीचा आत्मज्ञान आणि आत्मानुभव ह्यांहून अन्य मार्ग नाही. बृहद्योगी याज्ञवल्क्य (९·२९, ३४) ह्यांच्यासारख्या काही स्मृतींनी [ज्ञानं प्रधानं न तु कर्महीनं कर्म प्रधानं न तु बुद्धिहीनम् ।
तस्माद् द्वयोरेव भवेत सिद्धिर्न ह्येकपक्षो विहगः प्रयाति ॥
परिज्ञानाद्भवेन्मुक्तिरेतदालस्य लक्षणम् ।
कायक्लेशभयाच्चैव कर्म नेच्छन्त्यपण्डिताः ॥
बृहद्योगियाज्ञ. (९·२९·३४).] केवळ आत्मज्ञानाने मोक्ष प्राप्त होईल ह्या कल्पनेचा उपहास केला आहे. त्यांच्या मते '**ज्ञान आणि कर्म ह्या दोन्ही मिळून** मोक्ष मिळतो; केवळ ज्ञानाने मोक्ष मिळतो असे म्हणणे हे आळसाचे लक्षण आहे. शरीराला कष्ट पडतील ह्या भीतीने अज्ञ लोक कर्म करण्याची इच्छा करीत नाहीत.

पूमी. शास्त्रावरील आरंभीच्या आणि प्रमुख अशा ग्रंथकारांची मते काहीशी चमत्कारिक आणि आश्चर्यकारक आहेत. वेदाच्या नित्यत्वाविषयीचे आणि स्वतःप्रामाण्याविषयीचे त्यांचे कोटिक्रम भ्रामक आहेत आणि भारतातील इतर प्राचीन सांप्रदायांनी देखील त्या कोटिक्रमांना मान्यता दिलेली नाही.

प्रभाकर आणि कुमारिलभट्ट ह्या दोघांच्या मतप्रणालीमध्ये मनुष्यांना वर देणारा अथवा मनुष्याच्या

भवितव्याचा स्वामी अथवा मनुष्यांनी केलेल्या प्रार्थनांनी संतुष्ट होणारा अशा स्वरूपाच्या **देवाला स्थान नाही**. ते उघडपणे देवाचे अस्तित्व अमान्य करीत नाहीत, परंतु त्यांनी **देवाला** अथवा वेदामध्ये उल्लेख केलेल्या देवतांना **दुय्यम स्थान दिले आहे** अथवा वास्तविक काहीच **स्थान न** दिल्यासारखे केले आहे. त्यांनी **यज्ञाला देवत्व** दिले आहे आणि त्यांची यज्ञासंबंधी मते व्यापारी अथवा देवघेवीच्या स्वरूपाची आहेत. मनुष्यांनी काही ठराविक कृत्ये करावीत, दाने द्यावीत, यज्ञात आहुती द्याव्या, काही नीतीचे नियम पाळावेत आणि (मांस भक्षण न करणे ह्यासारखे) इतर काही आचरणांचे नियम पाळावेत म्हणजे त्यांना **देवाच्या मध्यस्तीशिवाय फले प्राप्त होतील.** त्यांच्या मतप्रणालीमध्ये **धार्मिक भावनांना** जवळजवळ काहीच **महत्त्व दिलेले नाही**. सर्वज्ञ देव नाही, सृष्टि निर्माण करणारा देव नाही, आणि सृष्टीची उत्पत्ती झाल्याचेही ते मानीत नाहीत. पूमी. मध्ये **मनुष्याच्या अधिकारांना** आणि आयुष्यातील **कर्तव्यांना महत्त्व दिले आहे** ही गोष्ट निर्विवाद आहे. इतर सांप्रदायांनी (दर्शनांनी) ह्या विश्वातून कायमचे मुक्त होण्याच्या आणि मृत्यूनंतर मनुष्याला प्राप्त होणाऱ्या अवस्थेबद्दलच्या प्रश्नांना अधिक महत्त्व दिले आहे.

तथापि पूमीसू., शबरस्वामी आणि कुमारिलभट्ट ह्यांनी वेदातील वचनांच्या स्पष्टीकरणाला महत्त्वाचे साहाय्य केले आहे. शबरस्वामी आणि कुमारिलभट्ट ह्यांच्या जीवात्मा आणि मोक्ष ह्यांच्या विषयीच्या मतांच्या योगाने पूमी. शास्त्राला **थोडासा** तत्त्वज्ञानाचा दर्जा प्राप्त झाला आहे.

**वेद नित्य आहे** आणि **त्याला स्वतःप्रामाण्य आहे** ह्या सिद्धांतांवरून काही **अनिष्ट प्रवृत्ती निर्माण झाल्या आहेत.** कोणीही नवीन सिद्धांत प्रतिपादन करणारा मनुष्य आपल्या मताला वेदाचा आधार आहे असे सिद्ध करण्याचा फार प्रयत्न करतो. शंकराचार्यांनी वेसू. (१·१·५ आणि २·२·१) वरील भाष्यात असे स्पष्टपणे म्हटले आहे की सांख्यसांप्रदाय वेदामधील वचनांचा अर्थ त्यांच्या मताला जुळता असा करितात. शाक्त सांप्रदायाच्या पुरस्कर्त्यांनी ऋ. (५·४७·४) सारख्या ऋचांचा अर्थ शाक्त सिद्धांताला अनुसरून असल्याचे दाखविले आहे आणि भावनोपनिषद ह्या ग्रंथासारखे उपनिषद अशी गौरवपूर्ण संज्ञा असलेले ग्रंथ त्या सांप्रदायाच्या ग्रंथकारांनी निर्माण केले. विज्ञानवादी बौद्धांनी बृहदा. उप. (४·५·१३) हे वचन त्यांच्या मताला आधार म्हणून पुढे केले होते असे शबरस्वामीनी पूमीसू. (१·१·५) वरील भाष्यात म्हटले आहे. मध्वाचार्य ह्यांनी 'महाभारत तात्पर्य निर्णय' ह्या ग्रंथात (अध्या. ३२ श्लो. १७६।१८१) आपण वायूचा तिसरा अवतार असल्याचे विधान करून त्याला आधार म्हणून ऋ. (१·१४१।१।३) ह्या ऋचांचा दिला आहे. त्या ऋचांमध्ये 'मध्वः' आणि मातरिश्वा' (म्हणजे वायुदेव) हे शब्द आले आहेत.

वेद नित्य आणि स्वयंसिद्ध आहेत हे सिद्ध केल्यानंतर मीमांसकांनी आपल्या चातुर्याला आणि वादविवाद करण्याच्या आणि तर्क करण्याच्या सामर्थ्याला स्वैर संचार करू दिला. त्यांची एक **स्वतंत्र अशी तर्कपद्धती** असून ती केवळ वेदवचनांचा खुलासा करण्यात लावली जात नसून स्मृतींच्या आणि धर्मशास्त्रावरील मध्ययुगीन काळात झालेल्या ग्रंथांच्या स्पष्टीकरणाच्या कामी देखील लावण्यात येते. कोलब्रुकने म्हटले आहे की **मीमांसेविषयीच्या विवेचनात आणि कायद्याच्या प्रश्नाविषयीच्या विवेचनात एक प्रकारचे साम्य दिसून येते. प्रत्येक** विवाद्य बाबीची चिकित्सा करण्यात येते आणि तिचा निर्णय करण्यात येतो आणि अशा रीतीने केलेल्या निर्णयांच्या आधारावर सर्वसाधारण सिद्धांत काढण्यात येतात. अशा सिद्धांतांची सुसंगत रचना केली तर कायद्यासंबंधी तत्वज्ञान तयार होईल आणि खरे म्हणजे मीमांसेने तसेच करण्याचा प्रयत्न केला आहे (स्फुट निबंध, खंड, १ पा ३१६।३१७).

वेदवाङ्मयामधून उपलब्ध होणाऱ्या माहितीचे पहिल्याने **मंत्र** आणि **ब्राह्मण** असे दोन भाग पडतात.

ज्यांना विद्वान लोक **मंत्र** मानतात ते **मंत्र**. पूमीसू. (२·१·३१।३२) मध्ये असा नियम सांगितला आहे की ज्यामध्ये केवळ विधान केलेले असते (आणि ज्यात एखादी आज्ञा अथवा प्रेरणा केलेली नसते) तो मंत्र. मंत्र ओळखण्याचे साधन **लक्षण** हेच असते असे शबरस्वामीने म्हटले आहे. तथापि अशा लक्षणांची यादी करिता येत नाही. **मंत्रांचे** ऋक्, सामन् आणि यजुस् असे **तीन गट करण्यात येतात**.मंत्रांना लागणारा '**निगद**' असा दुसरा एक शब्द असून जे मंत्र काही विशिष्ट क्रिया करण्यास सांगण्याकरिता दुसऱ्या व्यक्तीला उद्देशून 'इध्माबर्हिरुपसादय' ह्यांच्यासारखे मोठ्याने उच्चारले जातात त्यांना निगद म्हणतात.

पूमीसू. (२·१·३३) मध्ये म्हटले आहे की वेदाचे जे भाग मंत्र नसतात अथवा ज्या भागांना मंत्र म्हणता येत नाही अशा सर्व भागांमिळून **'ब्राम्हण'** बनतात. कोणत्या वेदवचनांना 'ब्राह्मणवचने' म्हणावे हे विद्यार्थ्यांना ठरविता यावे याकरिता वृत्तिकाराने ब्राह्मणवचनांत आढळून येणारी काही लक्षणे सांगितली आहेत परंतु ती सर्व लक्षणे केवळ उदाहरणादाखल असल्याचे म्हटले आहे आणि अशी लक्षणे केव्हा केव्हा मंत्रांमध्येही आढळतात.

प्रत्येक वेदाला जोडलेले ब्राह्मणग्रंथ असतात. उदाहरणार्थ ऐतरेय आणि कौषीतकि ब्राह्मण ऋग्वेदाला जोडले आहेत, तैत्तिरीय ब्राह्मण कृष्ण यजुर्वेदाला जोडला आहे, शतपथ ब्राह्मण शुक्ल यजुर्वेदाला जोडलेला आहे, ताण्डय ब्राह्मण सामवेदाला जोडलेला आहे आणि गोपथ ब्राह्मण अथर्ववेदाला जोडलेला आहे. यज्ञ, विधि आणि ऋत्विज् ह्यांच्या संबंधी माहितीचा मुख्य आधार ब्राह्मणग्रंथ असतो.

**ब्राह्मणग्रंथांत आलेल्या विषयांचे दोन मोठे विभाग** करिता येतील. ते म्हणजे **विधी** आणि **अर्थवाद. वेदाचा कोणताही भाग** – अगदी लहान असाही भाग **निरुपयोगी** अथवा **अर्थहीन** नसतो असे मीमांसक आग्रहपूर्वक प्रतिपादन करतात.

उपलब्ध वेदवाङ्मय अति विस्तृत असून त्यातील विषय विविध प्रकारचे आहेत. **वेद स्वयंसिद्ध असून कोणाही मनुष्याने अथवा देवाने रचिलेले नाहीत** ही गोष्ट मान्य केली म्हणजे त्यातील **प्रत्येक वाक्य बिनचूक असलेले अधिकृत वचन** ठरते. धर्माचे ज्ञान करून घेण्याचे वेद हे एकच साधन असल्याकारणाने जे जे वेदामध्ये सांगितले आहे ते ते अधिकृत आणि बंधनकारक असल्याचे मान्य करणे मीमांसकांना भाग पडते. अनेक वेदवचने उघड उघड परस्परविरोधी आणि पुष्कळ वेळा सर्वसाधारण अनुभवाच्याही विरुद्ध आहेत. ह्यामुळे अनेक अडचणी उद्भवतात आणि त्याकरिता मीमांसकांना नानाप्रकारचे युक्तिवाद लढवावे लागतात. वेदामध्ये व्यक्तिसंबंधी कथा आणि आख्यायिका दिल्या आहेत. तै. सं. (७·१·१०·२।३) मध्ये बबर प्रावाहणीची अशी कथा दिली आहे की त्याला प्रभावी वक्ता होण्याची इच्छा होती म्हणून त्याने पंचरात्र नावाचा यज्ञ केला आणि त्या योगाने त्याची इच्छा पुरी झाली. ह्यावरून असे ठरेल की वेद ह्या बबराच्या मागाहूनच्या काळात निर्माण झाला आणि मग वेद नित्य आहे ही त्यांची ब्रीदे नष्ट होतील. ह्या करिता शबरस्वामी म्हणतात की, ह्या ठिकाणी कधीही न घडलेली कथा प्रशंसेकरिता सांगितली आहे. ह्या युक्तिवादाने कोंडीतून मुक्तता होऊ शकेल परंतु तो युक्तिवाद वेदाला भूषणावह ठरत नाही. कारण त्यामुळे एका आज्ञार्थी वचनाच्या प्रशंसेकरिता वेदाने अस्तित्वात नसलेली एक कथा तयार केली असे मान्य केले जाते. शिवाय शबरस्वामीच्या टीकेवरून लोकांना जर ती कथा असत्य असल्याचे कळून आले तर लोक तो विधि करण्याचा खटाटोप करणार नाहीत. शाबरभाष्यातील वरील कोटिक्रमाला उत्तर देताना तन्त्रवार्तिकात असे मान्य केले आहे की वेदाच्या सर्व विभागांचा धर्मासंबंधी यथार्थ ज्ञान करून देण्याच्या कामाशी प्रत्यक्ष संबंध नसतो. ह्या दृष्टीने शबरस्वामीने वेदाचे **विधि, अर्थवाद** आणि **मंत्र** असे तीन विभाग केले आहेत. ह्या

तीन विभागांत नामधेय आणि प्रतिषेध ह्या दोहोंची भर घालून **पाच विभागही** करण्यात येतात.

वेदवचनात आलेल्या **विधींचा समुच्चय हा वेदाचा मुख्य भाग असतो.** पूमीसू. (४·३·३) वरील शाबरभाष्यात विधि ओळखण्याची काही लक्षणे दिली आहेत. निरनिराळ्या दृष्टींनी विधींचे अनेक प्रकारचे गट पडतात. अशा एका प्रकारच्या गटामध्ये उत्पत्तिविधि, विनियोगविधि, प्रयोगविधि, अधिकारविधि ह्यांचा समावेश होतो. दुसऱ्या एका प्रकारच्या गटवारीप्रमाणे विधींचे अपूर्वविधि, नियमविधि आणि परिसंख्याविधि असे तीन विभाग करिता येतात.

धर्मशास्त्रावरील ग्रंथकार **नियम** (मर्यादित स्वरूपाची आज्ञा) आणि **परिसंख्या** (जेथे दोन पर्याय असल्याची शक्यता असेल तेथे त्यांपैकी एक गाळलेला असतो अशी आज्ञा) ह्यांच्या सिद्धांतांचा वारंवार उपयोग करितात. मेधातिथि, मिताक्षरा, हरदत्त ह्यांच्यासारख्या टीकाकारांनी ह्या सिद्धांताविषयी विस्तृत विवेचन केले आहे. काही ठिकाणी एकाच विधीला कोणी टीकाकाराने नियमविधि म्हटले आहे तर दुसऱ्या कोणी परिसंख्याविधि म्हटले आहे. (मनु. ३·४५ वरील मेधातिथीची टीका, याज्ञ. १·७९ व ८१ वरील मिताक्षरा, गौतम ५·२ वरील हरदत्ताची टीका पहा). नियमविधीचेही आणखी पोट-विभाग केले आहेत.

विधींचे **क्रत्वर्थ** (एखाद्या संस्काराकरिता) आणि **पुरुषार्थ** (मनुष्याकरिता) असेही भाग पाडतात. सुख प्राप्त करून घेण्याच्या इच्छेने जे कृत्य एखादा मनुष्य करितो ते **पुरुषार्थ** आणि जे कृत्य पुरुषार्थ प्राप्त करून घेण्यास साहाय्य करिते आणि ज्याच्यापासून ते कृत्य करणाऱ्याला प्रत्यक्ष काही फल मिळत नाही ते **क्रत्वर्थ.** ह्या भेदाचे महत्त्व असे आहे की जे कृत्य क्रत्वर्थ असते ते न केल्याने मुख्य कृत्यच सदोष होते आणि पुरुषार्थ असणारे कृत्य न केल्यास विधि करणारा दोषाला अथवा पातकाला पात्र होतो परंतु ते मुख्य कृत्य अथवा विधि सदोष होत नाही.

क्रत्वर्थ आणि पुरुषार्थ ह्यांच्यामधील ह्या भेदाचा उपयोग पुष्कळ वेळा धर्मशास्त्रातील विषयांच्या बाबतीत करण्यात येतो. सामान्यतः असे म्हणता येईल की ज्या निर्बंधाचे परिणाम अथवा फले अदृष्ट, आध्यात्मिक अथवा पारलौकिक असतात ते निर्बंध क्रत्वर्थ असतात आणि ज्यांचे परिणाम अथवा फले दृश्य असतात ते निर्बंध पुरुषार्थ असतात.

विधि हे वेदाच्या अंतर्भागासारखे असतात आणि भावनांसंबंधीचा सिद्धांत हा विधीच्या अंतर्भागासारखा असतो. ह्याकरिता **भावनासंबंधीचा सिद्धांत मीमांसेतील अत्यंत महत्त्वाच्या सिद्धांतांपैकी एक आहे.** भावना ह्या शब्दाचा अक्षरशः अर्थ कार्यकर्त्याच्या ज्या विशिष्ट कृत्याने फलप्राप्तीला साहाय्य केले जाते असे कृत्य. भावना **शाब्दी** आणि **आर्थी** अशा दोन प्रकारची असते. सामान्य व्यवहारामध्ये जेव्हा कोणी मनुष्य 'हे कृत्य तुझ्याकडून केले जावें' अथवा हें त्वां करावें' असे दुसऱ्याला उद्देशून म्हणतो तेव्हा काहीतरी कृत्य करण्याविषयीची प्रेरणा त्या व्यक्तीकडून येत असते. परंतु मीमांसाशास्त्राप्रमाणे वेद हा एखादा मानवी अथवा दैवी ग्रंथकार नाही. म्हणून वेदाने सांगितलेल्या विधीमध्ये अशी प्रेरणा वेदवचनतील शब्दाच्या आज्ञार्थी अथवा विध्यर्थी रूपावरून मिळते. ह्याकरिता अशा भावनेला **शाब्दी** (शब्दावर आधारलेली) असे म्हणतात. ती भावना **शब्दनिष्ठ** (म्हणजे वेदाच्या शब्दामध्ये केंद्रित झालेली) असते आणि **पुरुषनिष्ठ** (एखाद्या व्यक्तीमध्ये केंद्रित झालेली) नसते. शाब्दीभावनेपासून **'आर्थी'** भावना उत्पन्न होते. ह्या सर्व विवेचनावरून **'अपूर्वाची कल्पना'** उत्पन्न होते. फारच थोड्या काळपर्यंत चालू राहणाऱ्या **याग** आणि मनुष्याच्या मृत्यूनंतर मिळावयाचे त्या यागाचे फल जे **स्वर्ग ह्यांना जोडणारा सांधा** म्हणजेच यागाच्या

योगाने उत्पन्न झालेली आणि स्वर्गाची प्राप्ती घडवून आणणारी अशी **शक्ति** हा असतो त्यालाच **अपूर्व** म्हणतात.

**अर्थवाद** हा वेदवचनांचा मोठा विभाग आहे. त्याचा विचार पूमीसू. च्या पहिल्या अध्यायाच्या दुसऱ्या, पादामध्ये केला आहे.

पूमीसू (१·१·२) मध्ये असे सांगितले आहे की 'धार्मिक कृत्यांसंबंधी आज्ञा करणे हा वेदाचा उद्देश आहे' तथापि 'परलोकात कोणी वास करतो किंवा नाही हे कोणाला माहित' (तै. सं. ६·१·१·१.) ह्याच्यासारखी अनेक वाक्ये वेदामध्ये आहेत की ज्यांनी धार्मिक कृत्याच्या बाबतीत कोणताही कार्यभाग साधत नाही. तेव्हा ती वाक्ये निरुपयोगी आहेत अशी कोणाला शंका येईल. त्याला मीमांसकांचे उत्तर असे आहे की ही वाक्ये आणि दुसरी आज्ञार्थक अथवा कार्याला प्रेरणा करणारी वाक्ये ह्यांचा व्याकरणदृष्ट्या परस्परांशी संबंध असून त्या दोहोमिळून वेद बनलेला आहे आणि अशा वाक्यांच्या योगाने प्रेरणार्थक वाक्यांची प्रशंसा (अथवा स्तुती) करण्याचे कार्य घडत असते. पूमीसू. (१·२·७) वरील शाबरभाष्यात पुढील अवतरण दिले आहे. "ऐश्वर्याची इच्छा असणाऱ्याने वायूप्रीत्यर्थ एका पांढऱ्या प्राण्याची आहुती द्यावी. वायु ही खरोखर अत्यंत चपल देवता आहे; वायूला अर्पण केलेल्या भागाबरोबर यज्ञ करणारा धावत धावत वायुजवळ जातो, तो (वायु) यज्ञ करणाऱ्याला ऐश्वर्याकडे घेऊन जातो." ह्या वाक्यातील पहिला भाग 'ऐश्वर्याची इच्छा... आहुती द्यावी' हा स्पष्टपणे **विधी** आहे. वायु चपल आहे ही गोष्ट लोकांना माहीत आहे म्हणून तिचा उल्लेख ह्या वाक्याच्या ज्या दुसऱ्या भागात पुनरुच्चार केला आहे तो भाग **अर्थवाद** आहे. अर्थवादाचे **गुणयाद**, **अनुवाद** आणि **भूतार्थवाद** असे **तीन प्रकार** असतात.

दुसऱ्या काही ग्रंथकारांनी अर्थवादाचे आणखी काही प्रकार सांगितले आहेत. कृष्णयज्वन् कृत 'मीमांसापरिभाषा' ह्या ग्रंथात **निंदा, स्तुति, परकृती आणि पुराकल्य** असे **अर्थवादाचे चार प्रकार** सांगितले आहेत. मीमांसाबालप्रकाश (पा. ५०।५८) ह्या ग्रंथात **अर्थवादाचे ३८ प्रकार** सांगितले आहेत.

स्मृतीमध्ये आणि पुराणांमध्येही पुष्कळ अर्थवाद असतात.

प्रत्येक वेदवाक्य विधीच्या स्वरूपाचे नसते. अशी अनेक वेदवचने आहेत की ज्यात एखाद्या विधींची **प्रशंसा** केलेली असते, निषिद्ध सांगितलेल्या कृत्यांची **निंदा** केलेली असते, अथवा ज्यात पूर्वी सांगितलेल्या विधीचे **उदाहरण** दिलेले असते अथवा धर्माने करावयास सांगितलेल्या एखाद्या कृत्याचे सहज समजेल **असे कारण** दिलेले असते. अशी वाक्ये **निरुपयोगी** अथवा **निरर्थक समजावयाची नसतात तर विधीपर वाक्यांचा आशय पूर्ण करण्याकरिता** अशी वाक्ये विधिवाक्यांबरोंबर घ्यावयाची असतात.

ह्या अर्थवादाच्या सिद्धांताच्या योगाने वेदामधील मोठमोठे भाग अनावश्यक मानले जाण्याचे टळते. एखाद्या वचनात केलेली **निंदा** केवळ **निंदा** करण्याकरिता केलेली नसून ज्याची निंदा केली असते त्याच्या **विरुद्ध अर्थाचा नियम सांगण्याकरिता** असते.

**वेदवचनांचा तिसरा प्रकार मंत्र** हा असतो. काही मंत्रात एखादा नियम देखील सांगितलेला असतो. परंतु सामान्यतः विधिवाक्यांनी (आज्ञावाचक वचनांनी.) जी कृत्ये करावयास सांगितलेली असतात त्यांच्यासंबंधी मंत्रांमध्ये एखादे स्पष्टीकरण अथवा विधान केलेले असते आणि त्या कृत्यांचे स्मरण करून

दिलेले असते. (पूमीसू. २·१·३१ वरील टीकेत) तंत्रवार्तिकात असे म्हटले आहे की 'ज्या मंत्रांनी शास्त्रात सांगितलेल्या कृत्यांचे स्मरण करून दिलेले असते अशा मंत्रांसहित केलेली धार्मिक कृत्ये अभ्युदयकारक (स्वर्गदायक) होतात असे निश्चित समजले जाते.' अशा रीतीने पूमी. शास्त्राने यज्ञाच्या बाबतीत मंत्रांना दुय्यम प्रतीचे स्थान दिले आहे. ज्यात बहुतेक सर्व विधि समाविष्ट झाले आहेत अशा ब्राह्मणग्रंथांना मीमांसाशास्त्राने अत्यंत महत्त्वाचे स्थान दिले आहे.

धर्माशी संबंध असलेला **वेदवचनांचा चौथा प्रकार नामधेय** (यज्ञाची विशेष नामे) हा आहे. 'पशूची इच्छा असणाऱ्याने **चित्राने यज्ञ** करावा. (तै. सं २·४·६·१) ह्या वेदवचनात उल्लेख केलेल्या 'चित्रा' ह्या शब्दाचा अर्थ निरनिराळ्या रंगाचे स्त्रीलिंगी पशु' असा आहे. ह्या वचनात याग करावा हा विधि त्याच्या फलासह सांगितला आहे. ह्याकरिता नामधेय हा भागदेखील पुरुषार्थ असून तो वेदाच्या इतर भागांसारखाच अधिकृत असतो. **'उद्‌भिदाने** यज्ञ करावा' ताण्ड्य ब्रा. (१९·७·२।३) ह्या वचनातील 'उद्भिद' ह्या शब्दाने त्या नावाचा यज्ञ करावा हे कळून येते. 'यज्ञ करावा' असा नियम सांगण्याचा उद्देश नसल्याकारणाने यज्ञाचा प्रकार सांगण्याची आवश्यकता असते. ह्या न्यायाला **'उद्भिद न्याय'** असे म्हणतात आणि धर्मशास्त्रावरील ग्रंथकार तो न्याय **उपनयनाला** लावतात. उपनयनाचा अक्षरशः अर्थ '(बटूला आचार्याच्या) **समीप आणणे'** असा आहे. परंतु त्या शब्दाचा यौगिक अर्थ 'ज्या संस्काराच्या योगाने बटूला आचार्यादिकांच्या समीप नेण्यात येते तो संस्कार असा 'उद्भिद न्यायाने' होतो.

वेदवचनांचा पाचवा (आणि शेवटला) भाग **'प्रतिषेध'** (निषेध) हा आहे. ज्या कृत्यांचे परिणाम अनिष्ट स्वरूपाचे असतात अशा कृत्यांपासून परावृत्त व्हावयास लावून निषेध मनुष्याचे हित साधतात. विधीचा हेतु एखादे कृत्य करावयास प्रोत्साहन देणे हा असतो आणि तो हेतु साध्य व्हावा ह्याकरिता यज्ञासारखे जे कृत्य करण्याला विधीने प्रोत्साहन दिलेले असते ते कृत्य इष्ट फल प्राप्त करून घेण्याचे **साधन** आहे असे सुचवून विधि मनुष्याला ते कृत्य करण्यास प्रोत्साहन देतो. त्याप्रमाणे 'मिथ्या भाषण करू नये' (तै. सं. २·५·५·६) ह्याच्यासारख्या निषेधवचनांचा योगाने त्या कृत्यापासून परावृत्त करण्याच्या कृत्याचा बोध होतो आणि हे परावृत्त करण्याचे कार्य साध्य व्हावे ह्याकरिता त्या कृत्याच्या योगाने अनिष्ट परिणाम घडून येतील असे निषेधवचनांनी सूचित केले जाते आणि अशा रीतीने मनुष्याला त्या कृत्यापासून परावृत्त करण्यात येते. निषेधापासून प्राप्त होणारे फल 'अनर्थनिवृत्ति' हे असते.

निषेधार्थक वचनात योजिल्या जाणाऱ्या 'न' ह्या अक्षरासंबंधी मीमांसाशास्त्रात बरीच चर्चा केली आहे. ज्या ठिकाणी नास्तिकवाचक प्रत्यय दुसऱ्या एखाद्या शब्दाला (म्हणजे क्रियापदाच्या धातूला अथवा नामासारख्या दुसऱ्या शब्दाला) लावलेला असतो तेव्हा त्याला **'पर्युदास'** म्हणतात आणि जेथे नास्तिवाचक प्रत्यय क्रियापदाच्या रूपाला लावलेला असतो तेव्हा त्याला **'प्रतिषेध'** म्हणतात.

धर्मशास्त्रावरील ग्रंथांत '**न**' ह्या अक्षराने एखादा **पर्युदास** (अपवाद) सांगितला असल्याचे मानतात. जेव्हा 'न' हे अव्यय एखाद्या वाक्यात घातलेले असते तेव्हा ते **निषेधदर्शक** अथवा **पर्युदास** अथवा **अर्थवाद** असते. जेथे एखादी गोष्ट प्रथम करावयास सांगितलेली असून मागाहून तिचा निषेध केलेला असतो तेथेच खरा **प्रतिषेध** होतो. सारख्याच अधिकाराच्या दोन वेदवचनांमध्ये जेथे विरोध असेल तेथे त्यांची एकवाक्यता करणे अशक्य असल्यामुळे त्या दोन्ही ठिकाणी **विकल्प** (पर्याय) करण्यास मोकळीक दिल्याशिवाय गत्यंतर नसते. तथापि, विकल्पामध्ये आठ दोष संभवतात म्हणून विकल्प टाळण्याचा प्रयत्न केला पाहिजे आणि शक्यतोवर **पर्युदास** अथवा **अर्थवाद** स्वीकारला पाहिजे, कारण पर्याय स्वीकारला म्हणजे एका ठिकाणी

अधिकृत असलेले वचन इतर ठिकाणी अनधिकृत असल्याचे मानावे लागते. ज्या ठिकाणी अन्य मार्ग नसेल त्याशिवाय इतर ठिकाणी विकल्प स्वीकारू नये असे शबरस्वामीने आणि तंत्रवार्तिकांत सांगितले आहे.

आणखी एका शब्दाचा खुलासा करण्याची आवश्यकता आहे. तो शब्द म्हणजे **नित्यानुवाद** हा होय. हा शब्द आप.ध.सू. (२·६·१४·१३) मध्ये आला आहे आणि तो पूमीसू. (२·४·२६, ४·१·५ इत्यादि) अनेक ठिकाणी योजला आहे. शबरस्वामीने म्हटले आहे की ज्या ठिकाणी जी गोष्ट घडून येण्याची शक्यता नाही अशा गोष्टीचा एखाद्या वेदवचनात निषेध केल्यासारखे दिसते त्या ठिकाणी **नित्यानुवाद** होतो. उदाहरणार्थ, वेदी उघड्या जमिनीवर बांधू नये, **आकाशात बांधू नये** अथवा स्वर्गात बांधू नये (तै. सं. ५·२·७·१) ह्या वेदवचनांत नित्यानुवाद आहे. टुप् टीकेत तीच गोष्ट निराळ्या रीतीने सांगितली आहे. 'जेथे सांगितलेला प्रतिषेध अर्थवादासारखा असतो तेथे **नित्यानुवाद** असतो.'

**'आरादुपकारक'** आणि **'सन्निपत्योपकारक'** ह्या आणखी दोन शब्दांसंबंधी खुलासा करणे आवश्यक आहे. यागामध्ये जी अनेक कृत्ये करावयाची असतात त्यांपैकी काही **मुख्य** असून काही **आनुषंगिक** असतात. आनुषंगिक कृत्यांत काही क्रियेच्या स्वरूपाची असतात आणि त्यांचे **'आरादुपकारक'** आणि **'संन्निपत्योपकारक'** असे दोन भाग असतात. उदाहरणार्थ, पौर्णमासी विधीमध्ये प्रयाज, आघार, आज्यभाग ह्यांच्यासारखी आनुषंगिक कृत्ये **आरादुपकारक** असतात आणि तांदूळ कुटणे, प्रोक्षण, इत्यादि गोष्टी **सन्निपत्योपकारक** असतात. आरादुपकारक कृत्यांचा वस्तूंशी संबंध नसून ती मुख्य विधीची प्रत्यक्ष अंगे असतात. सन्निपत्योकारक कृत्ये **संस्कारक** असतात म्हणजे त्या कृत्यांनी पदार्थावर कांही संस्कार केले जातात अथवा ते पदार्थ कामाला उपयुक्त केले जातात.

पूमीसू. च्या पहिल्या अध्यायाच्या तिसऱ्या पादामध्ये **स्मृति, सदाचार, वेदांगे इत्यादींच्या प्रामाण्यासंबंधी** विवेचन केले आहे. असे दिसून येते की जैमिनीने आपली सूत्रे रचिली त्या पूर्वी स्मृतींना महत्व प्राप्त झाले होते आणि शिष्टांचा प्रघात[वेदो धर्ममूलं तद्विदां च स्मृतिशीले । गौ. (१·२)] हे धर्माचे एक मूल मानण्यात येऊ लागले होते. ह्याकरिता स्मृति आणि सदाचार ह्यांना धर्माच्या बाबतीत प्रामाण्य आहे किंवा नाही आणि असल्यास किती मर्यादेपर्यंत प्रामाण्य आहे ह्या गोष्टींचा जैमिनीला विचार करावा लागला.

पूमीसू (६·७-६) मध्ये धर्मशास्त्राचा उल्लेख केला आहे. ह्यावरून जैमिनीला धर्मशास्त्राची माहिती होती असे दिसते. तै. उप. (१-११) मध्ये वेदाध्ययन पूर्ण केलेल्या शिष्याला केलेल्या उपदेशात असे म्हटले आहे की ज्यावेळी शास्त्रांत सांगितलेल्या एखाद्या विधीच्या बाबतीत अथवा कोणत्या प्रकारचे वर्तन करावे ह्या संबंधी शंका येईल त्यावेळी आपल्या देशातील विचारपूर्वक वागणाऱ्या, कर्तव्यनिष्ठ इत्यादि प्रकारच्या ब्राह्मणांच्या आचरणाचे अनुकरण करावे. ह्याचा अर्थ **'सदाचार'** हे धर्माचे एक मूल समजून त्याचे अनुकरण करावे असा होतो. पूमीसू. (६·८·२३) ह्यासारख्या सूत्रांत 'स्मृति' हा शब्द एखादा ग्रंथ ह्या अर्थाने योजिला आहे. शबरस्वामी ह्याने स्मृति ह्या शब्दाचा उल्लेख केला असून 'स्मरति' आणि 'स्मरन्ति' हे शब्द अनेक वेळा योजिले आहेत. पूमीसू. (१०-१-३६) वरील भाष्यात असे म्हटले आहे की 'शिष्ट लोकांच्या आचारावरून स्मृतीचे अनुमान केले जाते आणि स्मृतिवचनावरून श्रुतिवचनाचे अनुमान केले जाते' ज्या स्मृतिवचनांना वेदामध्ये आधार सापडणे शक्य होत नाही अशा वचनांच्या बाबतीत कुमारिल भट्टांनी असे सुचविले आहे की अशा वचनांना आधार असलेली वेदवचने **नष्ट झालेल्या** वेदशाखात असतील अथवा अशी वेदवचने वेदाच्या भिन्नभिन्न देशात असणाऱ्या शाखात अस्तित्वात असतील त्यामुळे ती दाखविता येत नाहीत.

अनेक वेदवचने नष्ट झाली आहेत अथवा सांप्रत काळी उपलब्ध नाहीत हे मत आप. ध. सू. (१-४-१२-१०) ह्या सूत्राच्या पूर्वी देखील प्रचलित होते. त्या सूत्रांत म्हटले आहे की "काही धार्मिक विधींसंबंधींचे शब्द नष्ट झाले असून त्यांच्या विषयीचे अनुमान त्या विधींच्या प्रयोगांवरून (अथवा स्मृतीत सांगितलेल्या कार्यक्रमांच्या आधारावर) करावे लागते."

मीमांसकांच्या स्मृतिप्रामाण्याविषयीच्या काही थोड्या महत्त्वाच्या निष्कर्षाचा येथे उल्लेख करू. पूमीसू. (१-३-४) वरील शाबरभाष्यात असा एक महत्वाचा सिद्धात सांगितला आहे की ज्या ठिकाणी एखाद्या क्रियेचा दृष्ट हेतु सापडू शकत नसेल त्या ठिकाणी त्या क्रियेचा हेतु एखादे अदृष्ट वेदवचन आहे अथवा एखादा अलौकिक हेतु आहे असे गृहीत धरू नये. ह्याच संबंधात शास्त्रदीपिका ह्या ग्रंथात असे म्हटले आहे की स्मृतीमधील जे नियम वेदाने सांगितलेल्या नियमाच्या विरुद्ध असतील आणि स्मृतीमधील ज्या नियमांचा हेतु उघडपणे ऐहिक स्वरूपाचा असल्याचे सिद्ध करिता येत असेल ते स्मृतीमधील नियम प्रमाणभूत आणि बंधनकारक नसतात. कुमारिल भट्टाने असे प्रतिपादन केले आहे की सर्वही स्मृतिवचने ती ज्या ज्या हेतूंनी सांगितलेली असतील त्या त्या हेतूंपुरती अधिकृत असतात. स्मृतीमधील ज्या भागांचा धर्माशीं आणि मोक्षाशी संबंध असतो त्या भागांना वेदाचा आधार असतो. स्मृतीमधील ज्या भागांचा संपत्ती (अर्थ) आणि ऐहिक सुखे (काम) ह्यांच्याशी संबंध असतो त्या भागांना लौकिक रूढींचा आधार असतो. इतिहास (महाभारत) आणि पुराणे ह्यांना पुष्कळ वेळी स्मृति म्हणण्यात येते आणि त्यांच्यामधील नीतिपर वचनांच्या बाबतीत वर सांगितलेला नियम लागतो. इतिहास आणि पुराणे ह्यातील आख्यायिका आणि कथा ह्या अर्थवाद समजाव्या. व्याकरण, छंद, निरुक्त प्रभृति वेदांगाचा हेतु **क्रत्वर्थ** असतो आणि **पुरुषार्थ** असतो. मीमांसा आणि न्याय ही शास्त्रे विद्वानांच्या अखंड परंपरेने ठरविलेल्या पद्धतीच्या आधारावर आणि लौकिक अनुभवावरून प्रत्यक्ष आणि अनुमान ह्या साधनांनी काढलेल्या सिद्धांतावर बनविण्यांत आली आहेत. कुमारिल भट्टांनी आपल्या विवेचनाचा समारोप असा केला आहे की ज्या स्मृतींचा अथवा स्मृतींतील वचनांचा अपेक्षित परिणाम अथवा फल ह्या जन्मामध्ये उपभोगिता येत नसून तो परिणाम अथवा फल दूर काळाने (म्हणजे मृत्यूनंतर) प्राप्त होणारे असते त्या ठिकाणी अशा स्मृति अथवा स्मृतींचे भाग वेदाच्या आधारावर असल्याचे अनुमान काढण्यास प्रत्यवाय नाही. परंतु ज्या कृत्यांचे परिणाम (विंचवाचे विष उतरण्याकरिता म्हणावयाच्या मंत्राच्या परिणामासारखे) प्रत्यक्ष दिसणे शक्य आहे अशा बाबींचे विवेचन करणारी शास्त्रे त्यांच्या दृश्य फलांच्या योगानेच मात्र प्रमाणभूत समजावीत.

पूमीसू. (१, ३·५।६) ह्यात अशी शंका घेतली आहे की बुद्ध आणि इतर पाखंडी (सनातन धर्माविरुद्ध) मतांच्या संस्थापकांनी केलेल्या उपदेशात वेदांनी देखील सांगितल्या (मठ स्थापना करणे, उद्याने तयार करणे, वैराग्य, अहिंसा ह्यांच्या.) सारख्या काही गोष्टी असतात आणि त्याकरिता अशा पाखंडी मताच्या ग्रंथांपैकी अशा विशिष्ट गोष्टी सांगणारा भाग प्रमाणभूत मानावा. ह्यावर कुमारिल भट्टांनी असे उत्तर दिले आहे की धर्माच्या बाबतीत वैदिक शिष्टांनी जे १४ ग्रंथ (चार वेद, सहा वेदांगे, पुराणे, व्याय, मीमांसा आणि धर्मशास्त्र) अथवा (वरील ग्रंथात ४ उपवेद मिळवून होणारे) १८ ग्रंथ प्रमाणभूत मानले आहेत त्यात बौद्धादि पंथांच्या ग्रंथांचा समावेश केलेला नाही म्हणून ते ग्रंथ प्रमाणभूत मानता येत नाहीत. ह्याला कुमारिलभट्टांनी एक परिणामकारक उदाहरण दिले आहे. ते म्हणतात की दूध हे स्वाभाविकपणे शुद्ध आणि उपयुक्त असते परंतु तेच कुत्र्याच्या चामडीच्या पिशवीत ओतले म्हणजे निरुपयोगी आणि त्याज्य होते.

**सदाचाराच्या प्रामाण्या**विषयी कुमारिल भट्टाची विचारसरणी थोडक्यात पुढीलप्रमाणे आहे : "जे

लोक वेदप्रणीत धर्मकृत्ये आणि कर्तव्ये करितात तेच फक्त **शिष्ट** समजावे. अशा शिष्टांच्या चाली आणि प्रघात ते **सदाचार.** अशा सदाचारांपैकी जे आचार स्पष्ट अशा वेदवचनांच्या विरुद्ध नसतील आणि ते धर्म आहेत अशा विश्वासाने शिष्ट त्यांचे आचरण करीत असतील आणि ज्या आचारांचा उद्देश अथवा हेतु (सुखोपभोग, धनसंपादन ह्यांच्यासारखा) दृश्य स्वरूपाचा सांगता येत नाही तेवढेच आचार **प्रमाणभूत** असतात. शिष्टांच्या काही थोड्या कृत्यांना धर्म समजले जाते, एवढ्यावरून ते करीत असलेल्या सर्व क्रिया धर्म समजाव्या असे होत नाही." कुमारिल भट्टांनी उद्धृत केलेल्या एका श्लोकात [येनास्य पितरो याता येन याताः पितामहाः।
तेन यायात्सतां मार्गं तेन गच्छन्नरिष्यते ॥
**मनु**. (४·१७८).] असे सांगितले आहे की आपले वाडवडिल ज्या मार्गाने चालत होते तो मार्ग **जर चांगला असेल** आणि त्यापासून **अहित होण्यासारखे नसेल** तर मनुष्याने त्या मार्गाचे अनुकरण करावे.

श्रुति (वेद), स्मृति आणि सदाचार (शिष्टांचा आचार) ह्यांच्या सापेक्ष महत्त्वासंबंधी अतिशय गुंतागुतीचे प्रश्न उपस्थित होतात. याज्ञ (१·७) मध्ये श्रुति, स्मृति, सदाचार प्रभृति ५ धर्ममूले सांगितली असून मिताक्षरेने अशा एक सर्वसाधारण नियम सांगितला आहे की ह्या पांचांमध्ये विरोध आल्यास मागाहून निर्देश केलेल्या धर्ममूलाच्या पेक्षा त्याच्या अगोदर निर्देश केलेले धर्ममूल अधिक बलवान समजावे. मनु (१-२) मध्ये म्हटले आहे की धर्माच्या बाबतीत श्रुति हा सर्वांत श्रेष्ट आधार असतो. म्हणून श्रुति आणि स्मृति ह्यांत विरोध आल्यास श्रुति प्रमाणभूत धरावी. परंतु जेथे दोन स्मृतीमध्ये विरोध असेल तेथे **विकल्प** समजावा. गौतम (१-५) मध्येही असेच सांगितले आहे (तुल्यबलविरोधे विकल्पः). तथापि, मागाहूनच्या काळातील स्मृतिकार आणि, निबंधकार ह्यांनी स्मृति-स्मृतिमधील विरोधाच्या बाबतींत विकल्प सांगण्याच्या ऐवजी अशा परस्पर विरोधातून बाहेर पडण्याचे अनेक मार्ग शोधून काढले. त्यांतला एक मार्ग [वेदार्थोपनिषद्
धृत्वात् प्रामाण्यं तु मनुस्मृतौ।
मन्वर्थविपरीता या स्मृतिः सा न प्रशस्यते ॥
बृहस्पति (अपरार्क पा. ६२८).] असा होता की वेदाचा खरा अर्थ मनुस्मृतिमध्ये दिसून येत असल्यामुळे **मनुस्मृतीला अधिक महत्त्व** द्यावे. याज्ञ (२·२१) मध्ये असा नियम सांगितला आहे की दोन स्मृतीमध्ये विरोध असेल तेव्हा **वृद्धांच्या आचारावर आधारलेल्या तर्काला** अधिक महत्व द्यावे. निरनिराळ्या युगांत निरनिराळ्या स्मृतींना महत्व द्यावे अशीही एक युक्ति सुचविण्यात आली. परंतु त्यामुळेही सर्व अडचणींचा परिहार होऊ शकत नाही. स्मृतिस्मृतिमध्ये विरोध आल्यास **बहुमताला प्रामाण्य** मानावे असे गोभिल स्मृतींत म्हटले आहे. स्मृतींची रचना इ. स. पूर्व ५०० पासून इ. स. ९००।१००० पर्यंतच्या सुमारे १५०० वर्षाहून अधिक काळपर्यंत होत होती. त्या अवधींत बुद्ध धर्माची स्थापना आणि त्याचा भारतांत लय ह्यांच्यासारख्या अनेक घटना समाजामध्ये घडून आल्यामुळे लोकांच्या कल्पना, धार्मिक समजुती, उपासना आणि रूढि ह्यांच्यामध्ये फेरबदल झाले आणि अशा फेरबदलांचे प्रतिबिंब स्मृतींमध्ये दिसून आले. त्यामुळे स्वाभाविकपणेच स्मृतिस्मृतींमध्ये विरोध उत्पन्न झाले. सरते शेवटी इ. स. च्या १० व्या आणि त्याच्या नंतरच्या शतकातील विद्वान लोकांनी असा उपाय शोधून काढला असे दिसून येते की काही काही रूढि आणि आचार कलियुगात अपायकारक आहेत **(कलिवर्ज्य)** असे ठरवावे. कलिवर्ज्यासंबंधी विवेचन मागे खंड ३ मध्ये केले आहे.

पूमी. शास्त्राच्या मताप्रमाणे **वेद नित्य आणि स्वयंसिद्ध** असून **त्याच्या प्रामाण्यावर** केव्हाही **निर्बंध नसतात.** अशी स्थिति असल्याकारणाने वेदाने ज्या गोष्टी कराव्या असे सांगितले अथवा ज्या गोष्टी करण्याला संमती दिली त्या गोष्टी कलियुगाच्या आरंभी निषिद्ध ठरविण्याचा ऋषींना कसा अधिकार पोचतो हे समजत नाही. ऋषींनी काही गोष्टी कलिवर्ज्य ठरविल्याची कथा लोकांच्या विचारात आणि आचारात झालेल्या फेरबदलांना धर्मामध्ये समाविष्ट करण्याकरिता बनावट रचिली असावी असे दिसते. बदललेल्या

परिस्थितीमुळे वेदाची अथवा जुन्या स्मृतींची वचने अमान्य करणे भाग आहे असे जर धर्मशास्त्रावरील ग्रंथकारांनी म्हटले असते तर ते त्यांचे सांगणे प्रामाणिकपणाचे आणि सरळपणाचे झाले असते. आणि असे सांगण्यात विलक्षण अथवा क्रांतिकारक असे कांहींही नाही. मनु [परित्यजेदर्थकामौ यौ स्यातां धर्मवर्जितौ।
धर्मं चाप्यसुखोदर्कं लोकविक्रुष्टमेव च॥ मनु (४·१७६).] (४·१७६) आणि याज्ञ (१·१५६) ह्या दोघांनीही असा नियम सांगितला आहे की (एकेकाळी) धर्म मानलेली एखादी गोष्ट जर लोकांना निंद्य वाटू लागली अथवा तिचा परिणाम दुःखात होण्यासारखा असून तिच्यामुळे स्वर्गप्राप्ती होणार नसली तर अशी गोष्ट करू नये आणि तिचा त्याग करावा. आधुनिक काळी धार्मिक अथवा सामाजिक रूढीत कोणी कांही फेरबदल अथवा सुधारणा सुचविली तर आपणास सनातनी म्हणविणारे पंडित तो फेरबदल अथवा ती सुधारणा शास्त्राच्या विरुद्ध आहे अशी सबब पुढे करून असे प्रतिपादन करितात की त्या संबंधीची चिकित्सा मीमांसेच्या नियमांना अनुसरून केली पाहिजे, सर्व स्मृतिवचनांचा आणि इतर अधिकृत वचनांचा समन्वय करण्याच्या हेतूने त्यांचा अर्थ केला पाहिजे आणि ऐतिहासिक सिद्धांतांवरून कोणतीच निर्णय करिता येत नसल्यामुळे त्या सिद्धांताचा स्वीकार करिता कामा नये. वेदांच्या कालापासून आजपर्यंत धार्मिक कल्पनांमध्ये, उपासनांमध्ये आणि आचारांमध्ये फार मोठे बदल घडून आले आहेत. निरनिराळ्या काळात झालेल्या स्मृतींनी इतक्या भिन्न भिन्न मतांचा पुरस्कार केला आहे की महाभारतासारख्या प्राचीनकाळी देखील व्यासाला [तर्कोऽप्रतिष्ठः श्रुतयो विभिन्ना नैको मुनिर्यस्य मतं प्रमाणम्।
धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां महाजनो येन गतः स पन्थाः॥
वनपर्व (३१३·११७).] असे म्हणणे भाग पडले की "तर्क हा अस्थिर असतो, वेदांचा परस्परांशी विरोध आहे, ज्याचे मत (सर्वांनी) मान्य केले आहे असा एकही ऋषि नाहीं, धर्माच्या बाबतीत सत्य गुहेत अडकून पडले आहे (म्हणजे ते स्पष्टपणे दिसून येत नाही) आणि ह्याकरिता बहुजन ज्या मार्गाने जातो तोच मार्ग (अवलंबावयाचा) आहे." (वनपर्व ३१३·११७) आमच्या धार्मिक आणि सामाजिक कल्पनांच्या दीर्घ इतिहासात **निश्चित** अशी कोणती **गोष्ट** असेल तर **फेरबदल ही आहे**. निरनिराळ्या काळात झालेल्या स्मृतींवर आणि धार्मिक ग्रंथांवर त्या त्या काळच्या परिस्थितीचा फार मोठा परिणाम झालेला आहे. आणि त्यांतील अनेक मतांचा समन्वय करून त्यापासून सुसंगत अशी आचारसंहिता बनविता येत नाही. तेव्हा **अशा स्मृति सर्व हिंदूंवर सर्वकाळपर्यंत बंधनकारक आहेत असे मानणे शक्य नाही.** मनुयाज्ञवल्क्य ह्यांच्यासारख्या स्मृतींनी आणि मिताक्षरा, कल्पतरू ह्यांच्यासारख्या मध्ययुगीन काळांतील धर्मशास्त्रावरील ग्रंथांनी देखील त्या त्या वेळच्या लोकांनी अनुसरलेल्या मार्गांना संमति दिली आहे. अर्थातच रूढीमध्ये आणि तत्त्वांमध्ये करावयाचा फेरफार केवळ कांही तरी बदल असावा एवढ्याच करिता अथवा कोणातरी एखाद्या पुढाऱ्याच्या लहरीनुसार केला जाऊ नये. कोणत्याही विचारपूर्वक करावयाच्या **फेरबदलाच्या बाबतीत निर्णायक गोष्टी सामान्य लोकांची मतें आणि त्यांच्या गरजा** ह्याच असल्या पाहिजेत. मात्र **अशा फेरबदलाच्या योगाने** ज्या मूलभूत सिद्धांतांच्या आधारावर समाज हजारो वर्षे चालत आला त्या **मूलभूत सिद्धांतांना बाध येता कामा नये.**

यज्ञविधि आणि तदनुषंगिक गोष्टी ह्यांच्याशी संबंध येणाऱ्या वेदवचनांचा अर्थ लावणे एवढेच मीमांसाशास्त्रातील नियमांचे कार्य होते आणि समाजांतील ज्या रूढींचा यज्ञाशीं अथवा धार्मिक विधींशी संबंध नसतो अशा रूढींच्या बाबतीत मीमांसानियमात फारसे काही सांगितलेले नसते. वेदवचनांच्या बाबतीत लागणारेच नियम स्मृतींच्या बाबतीत लावावे असे मीमांसासूत्रात कोठेही सांगितलेले नाही. उलटपक्षी स्मृतींच्या आणि रूढींच्या बाबतीत पूमीसू. अत्यंत चिकित्सेखोर आहे (पूमीसू १·३·३।४ व ७ पहा). स्मृतींची संख्या पुष्कळ मोठी आहे आणि त्या पुष्कळ वेळा परस्परांशी इतक्या विरुद्ध असतात की श्रेष्ठ ग्रंथकारांना देखील परस्पर विरोधी स्मृतिवचनांची एकवाक्यता करण्याचे काम निराशेने सोडून देण्याची पाळी येते

आणि काही विशिष्ट स्मृतिवचने पूर्वीच्या कल्पाला अथवा पूर्वीच्या युगाला (म्हणजे सहस्त्रावधि अथवा लक्षावधि वर्षांपूर्वीच्या समाजाला) अनुलक्षून असल्याचे म्हणावे लागते. पूमीसू. मधील एका सुप्रसिद्ध सिद्धांताचे नाव **'सर्वशाखाप्रत्यय न्याय'** अथवा **'शाखांतराधिकरण न्याय'** असे आहे (पूमीसू. २·४·८।३३). जैमिनि आणि शबरस्वामी ह्यांनी असे सिद्ध केले आहे की **वेदाच्या सर्व शाखा आणि ब्राह्मण ग्रंथ ह्या सर्वांमिळून एक ग्रंथ बनतो.** हाच सिद्धान्त फार प्राचीन काळापासून स्मृतींनादेखील लावण्यात येतो म्हणजे **सर्व स्मृति मिळून एक शास्त्र व मते असे मानण्यात येते**. ह्या सिद्धान्तासंबंधी विश्वरूप, मेधातिथि प्रभृति टीकाकारांनी असा नियम सांगितला आहे की ज्या ठिकाणी स्मृति–स्मृतीमध्ये विरोध असेल त्याठिकाणी विकल्प समजावा परंतु इतर **ठिकाणी निरनिराळ्या स्मृतीतील एखाद्या विधीसंबंधीचे तपशील एकत्र करावे**. केव्हा केव्हा सर्व स्मृति एकरूप आहेत असे मानण्याची आवश्यकता असली तरी सर्व स्मृती मिळून एक शास्त्र बनते अशी कल्पना केल्याचा असा परिणाम झाला की **अनेक साधे विधि देखील** निरनिराळ्या स्मृतीतील तपशील एकत्र केल्याच्या योगाने कालान्तराने **विस्तृत** आणि **गुंतागुंतीचे आणि करणाऱ्याला त्रासदायक बनले.**

**वेदाङ्गे. शिक्षा** (ध्वनिशास्त्र) ह्या वेदांगाबद्दल कुमारिल भट्टांनी म्हटले आहे की स्वराच्या उच्चाराकरिता कोणत्या अवयवांचा उपयोग केला जातो ह्या संबंधी ह्या ग्रंथात दिलेले वर्णन आणि वेदाच्या उच्चारासंबंधी (स्वरांसंबंधी) त्यात दिलेले नियम ह्यांचा उपयोग मंत्रांचे योग्य प्रकारचे पठण करण्याच्या कामी होतो. **कल्प** (म्हणजे श्रौतयज्ञामधील विधान) आणि **कल्पसूत्रे** ह्यांत शबर स्वामीने भेद दाखविला असून आठ कल्पसूत्रांची नावे दिली आहेत. **व्याकरणा**बद्दल कुमारिल भट्ट म्हणतात की व्याकरणाचा योग्य विषय म्हणजे कोणते शब्द शुद्ध आहेत आणि कोणते अशुद्ध आहेत हे ठरविणे हा असतो. यास्काचा **निरुक्त** हा ग्रंथ वेदाच्या अंगामध्ये समाविष्ट होतो. जैमिनीने निरुक्तामधील अनेक निर्णय मान्य केले आहेत. पूमीसू. (१-२-४) आणि (१-३-३०) ह्यात असे प्रतिपादन केले आहे की **मंत्र अर्थयुक्त असतात** आणि वेदामध्ये आलेले शब्द आणि लौकिक व्यवहारातील संस्कृत भाषेतील शब्द सारखे असतात. अशा शब्दांनी व्यक्त केल्या जाणाऱ्या गोष्टी (वेदातील स्वराच्या योगाने काही अर्थभेद होत नसेल तर) सारख्या असतात**. वेदाचीं** सर्वही **सहा अंगे** आणि धर्मशास्त्रे **ह्यांचा स्मृतीमध्ये समावेश होतो** असे एक सर्वसाधारण विधान कुमारिलभट्टांनी केले आहे (पूमीसू. १-३-२७ वरील तंत्रवार्तिक पा. २८५).

जैमिनि **स्मृतींना फारसे महत्व देत नसावा** असे दिसते; कारण पूमीसू. च्या सुमारे १००० अधिकरणांपैकी जेमतेम १०।१२ अधिकरणांचाच कोणत्या ना कोणत्या प्रकाराने निव्वळ स्मृतींशी संबंध आला आहे. (पूमीसू १-३-१।२,१·३·३।४, १·३·११।१४ इ.). तथापि ह्या सूत्रावरील भाष्यात शबरस्वामीने स्मतींचा उल्लेख केला आहे. जैमिनीने पूमीसू (१·३·२) मध्ये असा सिद्धांत प्रतिपादन केला आहे की जर एखाद्या स्मृतीचा वेदाशी विरोध नसेल तर ती स्मृति वेदाच्या एखाद्या वचनावर आधारलेली असल्याचे अनुमान करावे. स्मृतीला वेदाचा आधार असतो ही गोष्ट स्मृतींनी देखील सांगितली आहे. (गौत. ११·१९,मनु २·७)

**स्मृति आणि शिष्टांचे आचार ह्यांच्यामध्ये विरोध.** ह्याबद्दल कुमारिल भट्टानी असे प्रतिपादन केले आहे की 'सज्ञनांचा आचार जर वेद आणि स्मृति ह्यांच्या विरुद्ध नसेल तर असा आचार प्रमाणभूत असल्याचे समजता येईल. परंतु जर वेद, स्मृति आणि शिष्टांचा आचार ह्यात **विरोध असेल तर अशा आचाराचे प्रामाण्य नाहीसे होते. स्मृति शिष्टाचारापेक्षा अधिक प्रमाणभूत असते.** कारण **स्मृति प्रत्यक्ष वेदावर आधारलेली** असते. परंतु शिष्टाचाराला कोणत्या तरी स्मृतीचा आधार असेल असे अनुमान काढावे लागते.

स्मृति वेदवेत्त्या लोकांनी रचिलेल्या असतात आणि **शिष्टाचाराचे मूळ मोघम आणि अनिश्चित असते.**

ह्या नियमाला धर्मशास्त्रावरील वसिष्ठ (१·५), मिताक्षरा (याज्ञ.१·७), कुल्लूक (मनु २·१०) ह्यांच्यासारख्या ग्रंथांनी आणि ग्रंथकारांनी मान्यता दिली असली तरी **स्मृतींच्या विरुद्ध असणारे** (मामे बहिणीबरोबर विवाह करण्यासारखे) **आचार प्राचीनकाळापासून अस्तित्वात** असल्याचे आढळते. कुमारिल भट्टाच्या मताप्रमाणे थोर लोकांनी केलेली देखील सर्व कृत्ये, जर ती लोभासारख्या क्षुद्र हेतूने केली असल्याचे दाखवून देणे शक्य असेल तर **सदाचार** म्हणता येणार नाहीत. आणि त्यांना **धर्म** असे समजणे योग्य होणार नाही. थोर लोकांनी देखील धर्माचे अतिक्रमण आणि उन्मत्तपणे अविचाराने वागणे हे दोष केले होते. परंतु त्यांनी श्रेष्ठ तप केले असल्यामुळे त्यांना अशा दोषांपासून पातक लागले नाही. परंतु मागाहूनच्या काळातील लोकांनी त्यांचे अनुकरण केल्यास ते नरकात पडतील असे गौतम (१·३।४), आप. ध. सू. (२·६·१३·७।९), पुराण (१० पूर्वार्ध अ. ३३·३०) ह्यात म्हटले आहे. कुमारिल भट्टांनी देखील अशा अतिक्रमणाची १२ उदाहरणे देऊन त्यांची उपपत्ती लावून त्यांचा दोष कमी करण्याचा प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ, विश्वामित्राने चांडाल झालेल्या त्रिशंकुराजाच्या यज्ञात पुरोहिताचे कर्म केले ह्याच्याबाबतीत त्याच्या थोर तपाचा आधार सांगितला आहे. तर अर्जुनाने कृष्णाची भगिनी सुभद्रा हिच्या बरोबर म्हणजे मामे बहिणीबरोबर विवाह केला ही गोष्ट समुळी नाकबूल केली आहे.

पूमीसू. (१·३·१५।३३) ह्याना **'होलाकाधिकरण'** म्हणतात आणि धर्मशास्त्रावरील ग्रंथकारांनी ह्या अधिकरणाचा पुष्कळवेळा उल्लेख केला आहे. असे सांगितले आहे की पूर्वेकडील लोकांनी **होलाका** (होळी) विधि करावा, दक्षिणेकडील लोकांनी **आह्निनैबुक** करावे, उत्तरेकडील लोकांनी **उद्‌वृषभ यज्ञ** करावा. निश्चित सिद्धांत असा आहे की अशा प्रकारचे विधि सर्वांकरिता असतात (आणि केवळ पूर्वेकडील, दक्षिणेकडील लोकांकरिता नसतात). जर ते विधि पूर्व अथवा दक्षिण ह्यांच्या सारख्या एखाद्या विशिष्ट देशातील लोकांना करण्यास योग्य असतील तर ते सर्वांना करण्यास योग्य नसण्याला काही कारण नाही. याज्ञ (१·५३) वरील टीकेत विश्वरूपाने पूमीसू. (१·३·१६) हे उद्धृत करून असे म्हटले आहे की 'जर एखादा विधि काही लोकांना करावयास सांगितलेला असेल तर तो विधि **'सर्वधर्म (सर्वांना लागू पडणारा) समजावा.'**

**होलाकाधिकरणाचा नक्की अर्थ** काय असावा ह्याविषयी धर्मशास्त्रावरील मध्ययुगीन काळच्या ग्रंथकारांत मतवैचित्र्य आहे. दायभागाने म्हटले आहे की पूर्वेकडील देशात चालत असलेल्या होलाका विधीच्या रूढींवरून अनुमान करावयाची श्रुति केवळ 'होलाका विधि आचरावा' अशा सामान्य स्वरूपाची असावी. ह्याच्या उलट शूलपाणी कृत 'प्रायश्चित्तविवेक' ह्या ग्रंथावरील टीकेत गोविंदानंदाने म्हटले आहे की 'होलाकाधिकरणा' वरून एवढाच निष्कर्ष निघतो की ह्या रूढीवरून अनुमान करावयाची श्रुति **'ज्या देशात जो प्रघात असेल तो प्रघात त्या देशातील लोकांनी पाळावा'** अशा स्वरूपाची असावी.

# प्रकरण ३०

## धर्मशास्त्राच्या बाबतीत लावण्यात आलेले मीमांसेमधील अर्थ करण्यासंबंधीचे सिद्धांत आणि नियम

(मू. ग्रं. पा. ५।१२८३—१३३०)

वेदवचनांचा अर्थ करण्याची पूमी. ने आपली स्वतःची अशी पद्धति बनविली असून काही निश्चित सिद्धांत काढले आहेत. त्यांच्यापैकी काही सिद्धांत आणि नियम ह्या प्रकरणात दिले असून धर्मशास्त्रावरील ग्रंथकारांनी अशा सिद्धांतांचा आणि नियमांचा त्यांना आलेल्या शंकांचे निराकरण करण्याकरिता कसा उपयोग केला आहे ह्याची काही थोडी उदाहरणेही दिली आहेत.

मीमांसेमधील सिद्धांतांचे आणि नियमांचे अनेक गट पडतात. काही नियमांचा संबंध फक्त श्रौत (वेदप्रणीत) यज्ञांमधील तपशीलांशीच असतो. अशा प्रकारच्या नियमांतील सर्वांत महत्वाचा नियम असा आहे की वेदवचनांपैकीं ज्यांना यथार्थत्वाने **विधि** (नियम) म्हणता येते तेवढ्या वचनांनाच प्रामाण्य आणि अधिकृतपणा असतो. ज्या वेदवचनांना **अर्थवाद** असे म्हणतात त्यांच्यापैकी जी वचने इतर विधिवचनांच्या बरोबरीने एखाद्या वाक्यात आली असली तर त्या संपूर्ण वाक्याचा सुसंगत अर्थ लावण्याच्या कामी त्यांचा जेवढा उपयोग होत असेल तेवढ्या पुरतेच त्यांना प्रामाण्य असते. (पू. मी. सू. १·२·७)

मीमांसाशास्त्राचा एखाद्या राजाने अथवा सर्वाधिकारसंपन्न विधिमंडळाने केलेल्या कायद्यांशी काही संबंध नसतो. त्या शास्त्राचा **उद्देश** धर्माचे यथार्थ ज्ञान सांगणे हा आहे. आणि हे ज्ञान मिळविण्याचे **साधन** स्वतः वेद आहे आणि श्रौत यज्ञांतील कार्यक्रम **(इतिकर्तव्यता)**, त्या यज्ञातील गौण आणि प्रमुख क्रिया ह्यांच्या संबंधी व्यवस्था लावणे हे त्या शास्त्राचे **प्रयोजन** आहे. कायद्याचा अर्थ लावण्यासंबंधीचे नियम आणि मीमांसेमधील अर्थ लावण्यासंबंधीचे नियम ह्यात फार अंतर असते. पहिली गोष्ट अशी आहे की कायदे हे **मनुष्यनिर्मित** असतात आणि त्यात **कायदे करणाऱ्याची** इच्छा व्यक्त होते, त्यांचा हेतु मुख्यत्वेकरून **ऐहिक व्यवहाराशी** असतो, त्यांच्यामध्ये **दुरुस्ती करणे शक्य** असते इतकेच नव्हे तर ते **रद्द देखील करिता** येतात आणि त्यांचा अर्थ ते **करणाऱ्याच्या उद्देशाला** अनुसरून करावयाचा असतो. परंतु मीमांसेचा संबंध **नित्य** आणि **स्वतः सिद्ध** मानलेल्या वेदांशी असतो, वेदांमध्ये धार्मिक बाबींचा विचार केलेला असतो, वेद दुरुस्त अथवा रद्द करिता येत नाहीत आणि त्यांचा अर्थ वेदाच्या शब्दामधील उद्देशांना अनुसरून करावयाचा असतो.

पूमी. मधील अर्थ लावण्याच्या सिद्धांताचा आणि नियमांचा **धर्मशास्त्रावर काय परिणाम झाला** ह्या प्रश्नाचाच प्रस्तुत ग्रंथामध्ये विचार करावयाचा आहे.

मीमांसेमधील पहिला नियम असा आहे की **वेदामधील कोणताही भाग** (एक अक्षर देखील) **अनर्थक** (अर्थहीन अथवा उद्देशहीन) असल्याचे **मानता येत नाही.** ह्याकरिता **वेदाचा फार मोठा भाग** विधीची प्रशंसा करण्याचा हेतु असलेला **अर्थवाद** असल्याचे मानले आहे. पूमी. मध्ये विधींना अत्यंत महत्त्व दिले आहे आणि अर्थवादाना आणि मंत्रांना अतिशय गौण दर्जा दिला आहे. ह्याचा परिणाम असा झाला आहे की ब्राह्मण ग्रंथांचा लहानसाच भाग सर्व श्रेष्ठ प्रमाणभूत अधिकृत मानला गेला आहे आणि मंत्र नसलेला ब्राह्मणग्रंथांचा आणि वेदसंहिताचा भाग अधिकृतपणाच्या बाबतींत दुय्यम दर्जाचा अथवा कमी महत्त्वाचा मानला गेला आहे.

अर्थ लावण्यासंबंधीच्या मीमांसाशास्त्रामधील नियमांचे निरनिराळ्या दृष्टीने अनेक गट पडतात. काही नियम **सर्वसाधारण** असतात आणि काही **विशिष्ट कार्यांपुरते** असतात. एकाच विषयासंबंधीच्या निरनिराळ्या ग्रंथांत सांगितलेल्या तपशीलांत जेव्हा विरोध असतो, तेव्हा श्रुति, लिंग, वाक्य, प्रकरण, स्थान आणि समाख्या ह्या पारिभाषिक संज्ञांचा उपयोग करून **योग्य कार्यक्रम कसा ठरवावा** ह्याबद्दलही काही नियम असतात (पूमीसू ३·३·१४) आणि काही नियम **अधिकार, अतिदेश, ऊह, बाध, तंत्र** आणि **प्रसंग** ह्यांच्या संबंधी असतात.

प्रथमतः सर्वसाधारण नियमांची काही उदाहरणे देऊ. वर उल्लेख केलेला विधि आणि अर्थवाद ह्यांच्या प्रामाण्यासंबंधीचा नियम सर्वसाधारण स्वरूपाचा आहे. विधि, नियमविधि आणि परिसंख्या ह्यांच्यामधील भेद सांगणारे नियम हे सर्वसाधारण स्वरूपाचे असतात. एखाद्या वाक्यामधील एखाद्या भागाच्या निश्चित अर्थाविषयी शंका उत्पन्न झाल्यास तो अर्थ त्या वाक्यामधील बाकीच्या भागाच्या आधाराने ठरवावा, एकवचनामध्ये बहुवचनाचा समावेश होतो हाही एक सर्वसाधारण नियम आहे. ह्याला 'ग्रहैकत्व न्याय' अशी संज्ञा आहे (पूमीसू. ३·१·१३।१५).

ज्या नामासंबंधी विधान केले असते त्याला **'अनुवाद्य'** अथवा **'उद्दिश्यमान'** असे म्हणतात आणि त्याच्यासंबंधी केलेल्या विधानाला **'विधेय'** अशी संज्ञा आहे. ह्या नियमाचा धर्मशास्त्रावरील ग्रंथात पुष्कळ वेळा आधार घेण्यात येतो. एखाद्या उद्दिश्य मानाच्या विशेषणाचा (विशेष गुणाचा) उल्लेख केलाच पाहिजे असे नाही (उद्दिश्यमानस्य विशेषणमविवक्षितम्) (पू. मी. सू ३·४·२२ वरील टुप टीका).

'स्वर्ग कामो यजेत' (स्वर्ग प्राप्तीची इच्छा असणाऱ्याने यज्ञ करावा) ह्या वचनांत वेदाने पुल्लिंगाचा उपयोग केला आहे. तथापि पूमीसू. (६·१·६।१६) मध्ये असे सिद्ध केले आहे की त्या वचनांत **स्त्रीलिंगाचाही अंतर्भाव** होतो आणि **स्त्रियांना देखील यज्ञ करण्याचा अधिकार आहे.** तथापि श्रुतीने एखादी विशिष्ट क्रिया यजमानाने करावयास सांगितली असेल तर ती क्रिया फक्त पुरुषानेच करावी. कारण पत्नी ही मंत्राच्या ज्ञानाच्या बाबतींत पतीच्या बरोबरीची नसते आणि अज्ञान असते. म्हणून ज्या क्रिया तिने कराव्या असे स्पष्ट नियमांत सांगितले असेल तेवढ्याच क्रिया तिने कराव्या (पूमीसू. ६·१·२४). श्रौतयज्ञासंबंधी पत्नीच्या अधिकारावर वर उल्लेख केलेले निर्बंध असले तरी स्मृतीमधील पुल्लिंगाचा उपयोग केलेले अनेक नियम स्त्रियांना देखील लागतात. उदा. मनु (११·९३) मध्ये कोणा ब्राह्मण क्षत्रिय वैश्य पुरुषाने सुरा पिऊ नये असा नियम सांगितला आहे. याज्ञ (३·१५६) वरील टीकेत मिताक्षरेने सांगितले आहे हा निषेध तीन वर्णांच्या पुरुषांच्या पत्न्यांना देखील लागू पडतो.

पूमीसू. मध्ये असे सिद्ध केले आहे की काही विवक्षित प्रसंगी एखाद्या विधिवचनामधील एखाद्या शब्दाच्या **लिंगाला** आणि **वचनाला** विशेष महत्व दिले पाहिजे असा हेतु असण्याचा संभव असतो. उदा. ज्योतिष्टोम यज्ञामध्ये 'अग्निषोमीयं पशुं आलभति' (अग्नि आणि सोम यांना पशूचा बलि देतो) असे वेदवचनात सांगितले आहे. पूमीसू. (४·१·११।१६) मध्ये असे सिद्ध केले आहे की ह्या वचनाला अनुसरून बलि द्यावयाचा पशु **एकच** असतो. म्हणजे येथे **वचनाला महत्व** दिले आहे.

अग्निपुराणात (१७५·५९।६१) असे म्हटले आहे की 'व्रताच्या अंती सामर्थ्यानुसार २४,१२,५ अथवा फक्त ३ विप्रांना भोजन द्यावे' निर्णयसिंधु- (पा. २४) मध्ये असे सांगितले आहे की ह्या श्लोकात 'विप्राः' असा

पुल्लिंगी शब्द योजिला असल्यामुळे फक्त ब्राह्मण वर्णाच्या **पुरुषांनाच** भोजन दिले पाहिजे, **स्त्रियांना देऊन चालणार नाही.**

ह्याच्या उलट पद्मपुराणात म्हटले आहे की जर एखादी स्त्री गरोदर असली, नुकतीच प्रसूत झाली असली अथवा आजारी असली अथवा **अशुद्ध झालेली** असली तर तिने आपले व्रत **दुसऱ्या कोणाकडून करवून घ्यावे** अथवा शुद्ध झाल्यावर तिने स्वतः आचरण करावे. निर्णयसिंधुमध्ये असे म्हटले आहे की ह्या अवतरणात सांगितलेला नियम **पुरुष अशुद्ध** झाला असता **त्यालाही लागू पडतो,** कारण ह्या ठिकाणी **लिंगावर विशेष जोर द्यावा अशी अपेक्षा नाही.**

मीमांसेमध्ये **शब्दाचा अर्थ लावण्यासंबंधी** काही **नियम** आहेत. शबरस्वामीने आपल्या भाष्यामध्ये असे सांगितले आहे की जैमिनीच्या सूत्रामधील आणि वेदामधील शब्दांचा अर्थ **शक्यतोवर** गौण अथवा पारिभाषिक दृष्टीचा न मानता लौकिक व्यवहारामध्ये त्या शब्दांचा अर्थ जसा असतो तसा मानावा. तसेच एखाद्या शब्दाच्या गौण आणि मुख्य अर्थांपैकी एखाद्या विवक्षित ठिकाणी त्या शब्दाचा **मुख्य अर्थ** स्वीकारणे हेच योग्य असते. (पूमीसू. ३·२·१।२ वरील भाष्य). एखाद्या शब्दाचे भिन्न प्रकारचे अर्थ असले तर विवक्षित स्थळी जो अर्थ **योग्य असेल तो त्या शब्दाचा अर्थ समजावा.**

एखाद्या श्रुतिवचनात निरनिराळ्या प्रकारच्या क्रियांच्या बाबतीत एकच क्रियापद योजिले तरी प्रत्येक प्रकारच्या वस्तूच्या बाबतीत जी अत्यंत योग्य पद्धति असेल त्या पद्धतीने ती वस्तु हवन करावी. ह्याला **'सामर्थ्याधिकरण'** अशी संज्ञा आहे. पूमीसू (१·४·२५).

एका वाक्यात एकच शब्द दोन अर्थाने (म्हणजे त्याच्या मुख्य अर्थाने आणि त्याच्या अलंकारिक अर्थाने) योजता कामा नये. याज्ञ. (२·१२३) मध्ये म्हटले आहे की जेव्हा (सहोदर) बंधु वाटप करू लागतात तेव्हा मातेला पुत्रांच्या एवढा वाटा मिळतो. ह्या श्लोकासंबंधी दायभागाने वरील सिद्धांताचा आधार घेऊन असे म्हटले आहे की याज्ञ. ने सांगितलेल्या नियमात 'माता' ह्या शब्दाचा अर्थ जन्मदात्री जननी असा आहे आणि तो नियम सापत्न मातेला लागत नाही. तथापि, धर्मशास्त्रावरील सर्व ग्रंथात हा नियम पाळला जात नाही. उदा. त्याच श्लोकावरील टीकेत अपरार्काने (पा. ७३०) 'माता' ह्या शब्दात 'सापत्न मातेचा समावेश केला आहे.'

पूमीसू (१·३·८।९) मध्ये असा निर्णय केला आहे की काही विशिष्ट शब्द ज्या अर्थाने वेदामध्ये (म्हणजे शास्त्रात) योजण्यात येतात अथवा शिष्ट त्यांचा उपयोग करितात त्या अर्थानेच ते वापरले पाहिजेत. उदा. याज्ञ (१·२५५) मध्ये 'श्राद्ध' हा शब्द आला आहे. त्या शब्दांचा **मुख्य** अर्थ काय असा प्रश्न आहे. त्या शब्दाचा मुख्य अर्थ 'ब्राह्मणांना भोजन घालणे' हा नसून 'पिण्डदान करणे' हा आहे असे विश्वरूपाने सांगितले आहे.

पूमीसू (१·३·१०) मध्ये असा नियम सांगितला आहे की मूळचे परदेशी भाषेतील शब्द संस्कृत भाषेत रूढ असले तर त्यांचा अर्थ परदेशी भाषेत जसा समजत असतील तसा घ्यावा आणि त्यांचा अर्थ निरुक्त आणि व्याकरण ह्यांच्या साहाय्याने काढण्याचा प्रयत्न करू नये. अशा शब्दांची शबरस्वामींनी पुढील उदाहरणे दिली आहेत : पिक (कोकिळ), नेम (अर्ध), तामरस (कमल), सत (वर्तुलाकार लाकडी पात्र).

पूमीसू (३·१·१२) मध्ये असा नियम सांगितला आहे की ज्यावेळी शास्त्रात सांगितलेल्या एखाद्या क्रियेशी अनेक गुणधर्म असणाऱ्या एका पदार्थाचा संबंध असतो, त्यावेळी ते सर्व गुणधर्म त्या एकाच पदार्थाला अनुलक्षून असल्याचे मानावे. उदाहरणार्थ तै. सं. मध्ये असा नियम सांगितला आहे की "तो एक वर्षीय, पिंगट डोळ्याच्या आणि तांबुस रंगाच्या कालवडीच्या मोबदल्यात सोम विकत घेतो." ह्या वाक्यात असलेले सर्वही गुण एकाच कालवडीला अनुलक्षून असल्याचे समजावे.

पूमीसू (६·१·५१।५२) मध्ये शब्दासंबंधी दुसरा एक नियम **'निषादस्थपति'** न्यायाने सिद्ध केला आहे. शास्त्रात असे सांगितले आहे की ज्या इष्टीमध्ये रुद्राला उद्देशून शिजलेल्या भाताची आहुती अर्पण करण्यात येते ती इष्टि निषादस्थपतीकरिता करावी. ब्राह्मण पिता आणि शूद्र माता ह्यांच्यापासून उत्पन्न झालेल्या संततीला 'निषाद' म्हणतात. (मनु १०·८). तो तीन उच्च वर्णांचा नसतो. 'स्थपति' ह्या शब्दाचा अर्थ 'प्रमुख अथवा पुढारी' असा होतो. प्रश्न असा आहे की 'निपादस्थपति' ह्या सामासिक शब्दाचा अर्थ **कर्मधारय** समास धरून केल्यास **'प्रमुख असणारा** निषाद' असा होतो; **षष्टीतत्पुरुष** समास धरून केल्यास 'निषीदांचा प्रमुख' असा होतो. सिद्धान्त असा आहे की कर्मधारय समास तत्पुरुष समासापेक्षा अधिक बलवान असतो कारण कर्मधारयामध्यें दोन्ही शब्दांचा क्रियापदाशी प्रत्यक्ष संबंध असतो.

प्रभाकराने असे प्रतिपादन केले आहे की कोणत्याही एका **शब्दाला स्वतंत्रपणे अर्थ नसतो** परंतु एखाद्या वाक्यामध्ये शब्द जुळले गेले म्हणजे ते अर्थपूर्ण होतात. ह्या कारणाने प्रभाकराला आणि त्याच्या अनुयायांना **'अन्विताभिधानवादिनः'** असे म्हणत असत आणि त्याच्याविरुद्ध मताच्या कुमारिल भट्ट आणि त्यांचे अनुयायी ह्यांना**'अभिहितान्वयवादिनः'** असे म्हणत असत, कारण ते असे मानीत असत की शब्दांना स्वतःचे निरनिराळे अर्थ असून ते एका वाक्यात एकत्र येतात आणि असे शब्द एकत्र आल्यावर त्यांच्यापासून आणखी एक त्या वाक्याचा अर्थ उत्पन्न होतो.

आता **वाक्यांचा अर्थलावण्यासंबंधी काही नियम** सांगू.

ऋग्वेद आणि सामवेद हे छंदोबद्ध ग्रंथ आहेत. त्यामुळे त्या दोहोमधील कोणत्या शब्दामिळून एक वाक्य बनते हे ठरविण्याच्या कामात सामान्यतः अडचण येत नाही. परंतु कृष्णयजुर्वेदामधील बराच भाग गद्यांत आहे. म्हणून पूमीसू. (२·१·४६) मध्ये **वाक्य कसे तयार होते** ह्याची व्याख्या करिताना असे म्हटले आहे की जेव्हा अनेक शब्दांमिळून एकच अर्थ होतो अथवा एकच हेतु साध्य होतो परंतु त्या शब्दांपैकी एक अथवा काही थोडे शब्द इतरांपासून वेगळे केले तर ते वेगळे केलेले शब्द तो हेतु साधण्यास असमर्थ होतात आणि त्यांना बाकीच्या शब्दांची गरज लागते तेव्हा ते सर्व शब्द मिळून एक वाक्य होते. ह्यावरून असा निष्कर्ष निघतो की वाक्य बनविण्याला पुढील तीन गोष्टींची आवश्यकता असते : (१) उच्चारलेल्या अथवा लिहिलेल्या शब्दांचा समुच्चय **(पदसमूह)** असावा लागतो, (२) त्या शब्दांना **परस्परांची आकांक्षा** असावी लागते (म्हणजे त्यांच्या पैकी एक शब्द गाळला तर पूर्ण अर्थ निघत नसला पाहिजे), (३) त्या सर्व शब्दांमिळून **एकच कार्य** साधत असले पाहिजे अथवा सर्वामिळून **एकाच अर्थाचा बोध** होत असला पाहिजे (कोणाच्या मताप्रमाणे **अर्थैकत्व** असले पाहिजे). एक वाक्य बनविण्याला सामान्यतः शब्दांमध्ये **सन्निधि** असावी लागत असली तरी अशा सन्निधीची प्रत्येक ठिकाणी आवश्यकता असतेच असे नाही (त्यांच्या दरम्यान दुसरे काही शब्द आले तरी त्या शब्दांचे एक वाक्य होऊ शकते).

एकाच मंत्रमय वचनामधील **निरनिराळ्या भागांचा भिन्न भिन्न हेतु** असेल तर ते भाग **निरनिराळीं**

**वाक्ये** समजण्यास हरकत नाही. उदा. तै. (१·७·९·२) मधील 'आयुर्यज्ञेन कल्पताम्, प्राणो यज्ञेन कल्पताम्'.... इत्यादि भिन्न भिन्न दहा निरनिराळी वाक्ये आहेत.

**वाक्यभेदाच्या सिद्धांताला** मीमांसेमध्ये तसेच धर्मशास्त्रामध्ये अतिशय महत्त्व आहे. वाक्यभेद ह्याचा अर्थ 'वाक्यांचा भेद' अथवा 'वाक्यांची फुटाफूट' असा आहे. ज्यावेळी सर्व वाक्ये सारखीच स्वतंत्र असतात आणि कोणत्याही एका वाक्याची पूर्तता करण्याकरिता दुसऱ्या वाक्यांमधील शब्दांची आवश्यकता नसते त्यावेळी ती वाक्यें **भिन्नभिन्न** असल्याचे मानावे. वाक्यभेद ह्या शब्दाचा दुसरा आणि अधिक वेळी लागू पडणारा आशय पुढीलप्रमाणे असतो. ज्याच्याविषयी एक विधि (नियम) अस्तित्वांत असतो त्याच्या संबंधी दुसरे कांही नियम सांगावयाचे असतील तर ते वेगवेगळे नियम (विधि) असावयास पाहिजेत. जर एकाच वाक्यात एकाहून अधिक विधि आहेत असे मानले तर वाक्यभेदाचा दोष उत्पन्न होतो. **वाक्यभेदाची एक दोन उदाहरणे** देऊ. 'ग्रहं सम्मार्ष्टि' ह्या वाक्याचा अर्थ 'तो पेले स्वच्छ करितो' असा केला आणि फक्त 'एकच पेला स्वच्छ करावयाचा असतो' असा केला तर वाक्यभेद होईल म्हणून असे ठरविण्यात आले की ह्या नियमामध्ये 'ग्रहम्' हा शब्द एकवचनी असला तरी त्या एकवचनावर विशेष जोर देऊ नये आणि सर्वही ग्रह (पेले) स्वच्छ करावे; असे न केल्यास 'ग्रहं सम्मार्ष्टि' आणि 'एकमेव सम्मार्ष्टि' असे दोन विधि होतील.

पूमीसू. (१·३·३) वरील भाष्यात शबरस्वामींनी वाक्यभेदासंबंधी पुढील उदाहरण दिले आहे. तै. ब्रा. (१·१·२-६) सारख्या श्रुतिवचनांत अग्न्याधानासंबंधी विधीचे वर्णन करिताना असे म्हटले आहे की 'ज्याला एक पुत्र आहे आणि ज्याचे केस काळे आहेत, त्याने श्रौत अग्नीची स्थापना करावी.' जर ह्या वाक्यांत दोन लक्षणे (पुत्र असणे आणि केस काळे असणे) सांगण्याचा हेतु असेल तर एकाच वाक्यांत दोन स्वतंत्र विधि होतील म्हणजे वाक्यभेद हा दोष उत्पन्न होईल आणि तो होऊ देता कामा नये. ह्या करिता असा मनुष्य विशिष्ट वयाचा असावा एवढेच सांगण्याचा हेतु आहे अशा प्रकारचा अर्थ केला पाहिजे. म्हणजे अग्न्याधानाच्या वेळी अग्न्याधान करणारा **अगदी कोवळ्या वयाचा** मुलगा असता कामा नये तसेच **अतिवृद्ध** असता कामा नये असा अर्थ केला पाहिजे. असा अर्थ करण्यात **लक्षणेचा** (अर्थ सूचित करण्याचा) दोष आहे. परंतु **लक्षणा** हा फक्त शब्दाचा दोष आहे आणि **वाक्यभेद** हा वाक्याचा दोष आहे. म्हणून वाक्यभेदाचा दोष करण्यापेक्षा लक्षणेचा दोष पत्करावा. हा वाक्यभेदाचा नियम धर्मशास्त्रावरील ग्रंथकारांनी (एकदा विभक्त झालेले भागीदार पुन्हा एकत्र होण्यासारख्या) अनेक प्रश्नांच्या बाबतीत उपयोगात आणला आहे.

वाक्यांसंबंधी **'अनुषंग'** संज्ञा असलेला दुसरा एक सिद्धांत आहे. एकाच प्रकारच्या अथवा स्वरूपाच्या अनेक वाक्यांपैकीं एका वाक्यातील एखादा शब्द, वाक्यांश अथवा पद दुसऱ्या एका अथवा अनेक वाक्यांत 'अध्याहृत' धरणे हा अनुषंगाचा एक प्रकार असतो. दोन अथवा अधिक आपल्या पुरती संपूर्ण असल्यासारखी दिसणारी वाक्यें असतात, परंतु त्यांच्यापैकी शेवटच्या वाक्यांत गौण स्वरूपाचे काही विशिष्ट शब्द असतात आणि ते पूर्वीच्या वाक्यात घालावे लागतात अथवा अध्याहृत असल्याचे मानावे लागते. ह्या दुसऱ्या प्रकारच्या अनुषंगाला '**अनुकर्ष**' असेही म्हणतात.

पुन्हा एकत्र झालेल्या मनुष्याच्या संपत्तीच्या वारसाच्या बाबतींत मिताक्षरा आणि मदनरत्न ह्या ग्रंथांनी अनुषंगाच्या सिद्धांताचा उपयोग केला आहे.

हा अनुषंगाचा सिद्धांत निरनिराळ्या वाक्यांच्या दरम्यान दुसऱ्या प्रकारचे शब्द आले असल्यास लागू शकत नाही. उदाहरणार्थ, पशूचा बलि देण्यासंबंधीच्या मंत्रात 'सं ते प्राणो वायुना गच्छताम्, सं

यजत्रैरङ्गानि, सं यज्ञपतिराशिषा इ. शब्द आहेत (तुझे अवयव पूज्य देवतांशी एकत्र होवोत, आणि यज्ञकर्ता आशीर्वादाशी एकत्र होवो०). ह्या ठिकाणी पहिले पद आणि तिसरे पद ह्यांच्या दरम्यान आलेल्या पदामध्ये दोन बहुवचनी शब्द आहेत, परंतु पहिल्या आणि तिसऱ्या पादात एकवचनी **दोन** शब्द आहेत; ह्याकरिता पहिल्या पदांतील शब्दांचा दुसऱ्या पदातील शब्दांशी अनुषंग होत नाही आणि तिसऱ्या पदाचा अर्थ पूर्ण करिताना (पहिल्या पदातील शब्द न घालता) कोणालाही लौकिक भाषेतील कोणतेही शब्द घालता येतील.

यज्ञामध्ये करावयाच्या निरनिराळ्या कर्मांपैकी काही **प्रमुख** कर्मे असतात आणि काही **गुणभूत** (म्हणजे गौण अथवा आनुषंगिक) असतात. ज्या क्रियांच्या योगाने एखादी वस्तु उपयोगाला योग्य केली जाते अशा (साळी कुटण्यासारख्या) क्रियांना **गुणभूत** क्रिया म्हणतात. ह्या दोन प्रकारांखेरीज कर्मांचे **नित्य, नैमित्तिक** अथवा काम्य असे अथवा **क्रत्वर्थ** आणि **पुरुषार्थ** असे गट करण्यात येतात हे मागे सांगितलेच आहे. निरनिराळ्या कर्मांमधील भेदाभेद पुढील सहा [तदिह षड्विधः कर्मभेदो वक्ष्यते–
शब्दान्तरं, अभ्यासः, संख्यां, गुणाः, प्रक्रिया, नामधेयमिति।
… …तदेतन्नाकर्मलक्षमित्यध्यायमाचक्षते।
पू. मी. सू. २·१·१ वरील शबरभाष्य.] साधनांनी ठरविता येतात : **शब्दांतर, अभ्यास** (पुनः पुनः उच्चार करणे), **संख्या, गुण** (देवता अथवा पदार्थ ह्याच्या विषयीच्या गौण स्वरूपाचा तपशील), **प्रकरण** (संदर्भ) आणि **संज्ञा** (नाव).

**विधीचे चार प्रकार** असून **विनियोगविधि** हा त्यांपैकी एक प्रकार असतो. ह्या विधीच्या योगाने प्रमुख धार्मिक विधीचा त्याच्या आनुषंगिक असलेल्या गौण विधींशी असलेला (**शेषिन्** अथवा **अंगिन्** ह्या नात्याचा) संबंध कळतो. ह्या विषयाचे विवेचन पूमीसू. च्या तिसऱ्या अध्यायात केले असून त्यात प्रथमतः **शेष** ह्याची व्याख्या दिली आहे आणि धार्मिक कृत्यात त्याचा उपयोग कसा करितात हे सांगितले आहे, शेष व शेषिन् ह्यांचे कोणते संबंध असतात हे सांगून वर उल्लेख केलेल्या सहा साधनांपैकी प्रत्येकाचे तुलनात्मक महत्व सांगितले आहे.

**अंग** आणि **अंगिन्** ह्यांचे एक उदाहरण देऊ. 'व्रीहीन् प्रोक्षति' (तांदुळावर पाणी शिंपडतो) ह्या पदामध्ये **प्रोक्षण** हे अंग असून त्याचा 'व्रीहीन्' ह्या शब्दाशी गौण संबंध आहे. प्रोक्षणाचा हेतु सर्वश्रेष्ठ फलाला (अपूर्वाला) साह्य करणे हा आहे. कारण जर तांदुळावर पाणी प्रोक्षण केल्याशिवाय यज्ञ केला तर **अपूर्व** (फल) प्राप्त होणार नाही.

ज्याच्या योगाने दुसऱ्या कोणाचा हेतु साधतो ते **शेष** आणि अशा दुसऱ्याचे ते शेष असते (पूमीसू. ३·१·२). ज्या कृतीच्या योगाने एखादी व्यक्ति अथवा पदार्थ यागामध्ये अथवा दुसऱ्या एखाद्या कार्यामध्ये उपयोग करण्याला योग्य बनते त्या क्रियेला **संस्कार** असे म्हणतात. बादरीच्या मताप्रमाणे 'शेष' हा शब्द अशा संस्कारांना अथवा पदार्थांना अथवा (गाईचा लालसर रंग ह्यासारख्या) गुणांना नेहमी लागतो. (पूमीसू. ३·१·३). परंतु जैमिनीच्या मताप्रमाणे (पूमीसू ३·१·४।६) धार्मिक विधि हे त्या विधीच्या (स्पष्ट सांगितलेल्या अथवा गर्भित असलेल्या) फलाचे शेष असतात. फले ही धार्मिक कृत्ये करणाऱ्या कर्त्याची **शेष** असतात आणि असा **कर्ता** काही विशिष्ट कृत्यांचा **शेष** असतो.

विनियोगविधीच्या बाबतीत प्रधान कोण आणि गौण कोण ह्याबद्दल संशय आल्यास अथवा विरोध उत्पन्न झाल्यास त्याचा निर्णय करण्याची श्रुति, लिंग, वाक्य, प्रकरण, स्थान, संज्ञा अशी सहा साधने

पूमीसू. ने सांगितली आहेत आणि एखादे ठिकाणी अनेक साधने एकत्र होत असल्यास त्यांच्यापैकी पूर्वी आलेल्या प्रत्येकापेक्षा मागून आलेले साधन अधिक **दुर्बल** असते कारण ते साधन त्या साधनाच्या उद्दिष्टापासून (म्हणजे विधीच्या पासून) त्याच्या पूर्वीच्या साधनांहून अधिक दूर असते (पूमीसू. ३·३·१४). ह्या सूत्राला **'बलाबलाधिकरण'** असे नाव आहे.

ह्या सहा साधनांपैकी प्रत्येकाचा त्याच्या नंतर उल्लेख केलेल्या सर्व साधनांशी विरोध येऊ शकेल म्हणजे श्रुतीचा त्यांच्या पुढल्या ५ शी, लिंगाचा त्याच्या पुढील ४ शी, अशा रीतीने ३·२·१ असे विरोधाचे एकूण १५ प्रसंग होऊ शकतील. ह्या ठिकाणी श्रुति आणि लिंग ह्यांच्या विरोधाचे एक उदाहरण देऊ. मैत्रा. सं. (३·२·४) मध्ये म्हटले आहे की 'ऐन्द्री (इंद्राला उद्देशून म्हटलेल्या) मंत्राने गार्हपत्य अग्नीची पूजा करावी' इंद्राला उद्देशून म्हटलेला मंत्र तै. सं.४·२·५·४ हा आहे. ह्या मंत्रामध्ये 'ऐन्द्र्या' हा शब्द आला आहे. या बाबतीत अशी शंका उत्पन्न होते की 'ऐन्द्र्या' ह्या शब्दावरून सूचित केल्याप्रमाणे इंद्राची पूजा करावी अथवा त्या मंत्राने गार्हपत्य अग्नीची पूजा करावी अथवा इंद्र आणि अग्नि ह्या दोहोंची पूजा करावी अथवा आपल्या इच्छेप्रमाणे इंद्र अथवा गार्हपत्य अग्नि ह्यांच्यापैकी कोणाही एकाची पूजा करावी. **निर्णय** असा आहे की श्रुति (म्हणजे प्रत्यक्ष वेदवचन) लिंगापेक्षा अधिक बलवान असते. 'ऐंद्र्या' ह्या तृतीयाविभक्तीतील शब्दावरून तो केवळ तपशील आहे असा बोध होतो. इंद्राची पूजा करावी असे स्पष्ट विधान करणारा एकही शब्द वरील वाक्यात नाही.

**प्रयोज्य** आणि **प्रयोजक**. स्वर्गासारखे फल हे यज्ञाचे **प्रयोजक** अथवा **पुरुषार्थ** विधि असते. ज्याच्या करिता वेदाच्या वचनानी मनुष्याला काही कर्म करण्याला प्रवृत्त केले जाते ते **प्रयोजक**. 'स्वर्गप्राप्तीकरिता दर्शपूर्णमास यज्ञ करावा' असे वचन आहे. म्हणजे स्वर्ग अथवा तत्सम फल हे दर्शपूर्णमास यागाचे **प्रयोजक** आहे.

काही विशिष्ट पदार्थांचा, संस्कारांचा आणि गौण कृत्यांचा कोणत्या तरी फलाशी संबंध असतो. उदा. तै. सं. (३·७·५·२) मध्ये जुहू पळी, नेत्रात लावण्याचे काजळ, आणि प्रयाज आणि अनुयाज विधि ह्यांच्यासंबंधी काही वाक्ये आहेत. पूमीसू. (४·३·१०) मध्ये म्हटले आहे की ज्यात पदार्थाशी, संस्काराशी अथवा गौण कृत्याशी फलाचा संबंध जोडला आहे अशी वेदवचने फलाच्या बाबतीत विधि (नियम) नसून केवळ **अर्थवाद** असतात कारण त्या वचनांमुळे मुख्य यज्ञाचा हेतु साधतो.

**विश्वजित्** हा एक विशिष्ट प्रकारचा यज्ञ असतो आणि त्यात यज्ञकर्ता स्वतःचे स्वामित्व असणाऱ्या सर्व धनाचे दान करितो. ह्या यज्ञाच्या विवेचनाला जैमिनीने सुमारे १४ अधिकरणे खर्च केली आहेत. त्यात सिद्ध केलेल्या सिद्धांतांपैकी एक ठळक सिद्धांत असा आहे की यज्ञामध्ये दक्षिणा देण्याच्या वेळी यज्ञकर्त्याचे ज्यावर स्वामित्व असेल तेवढ्याचेच दान यज्ञकर्ता देऊ शकतो आणि जी वस्तु त्याला **भविष्यकाळी प्राप्त होणार** असेल अशी वस्तु तो दान देऊ शकत नाही.

विश्वजित यज्ञाचे फल श्रुतीने स्पष्टपणे सांगितले नसले तरी (इतर यज्ञाचे फल स्वर्गप्राप्ती असल्याचे स्पष्ट सांगितलेले असते त्याप्रमाणेच) विश्वजित् यज्ञाचे फल स्वर्ग हेच असते असे पूमीसू. च्या चौथ्या अध्यायाच्या तिसऱ्या पादात सिद्ध केले आहे.

पूमीसू. च्या पाचव्या अध्यायात यज्ञातील निरनिराळ्या विधींच्या **क्रमाचे** विवेचन केले आहे.

यज्ञामध्ये करावयाच्या अनेक कृत्याचा विधीमध्ये उल्लेख केलेला असतो. परंतु ती कृत्ये कोणत्या क्रमाने करावी हे नेहमीच त्यात सांगितलेले नसते. ही कृत्ये यज्ञकर्त्याच्या इच्छेप्रमाणे कोणत्याही क्रमाने करून चालणार नाही. असा क्रम ठरविण्याकरिता श्रुति, अर्थ, पाठ, प्रवृत्ति, कांड, स्थान आणि मुख्य ह्या सहा साधनांचा आधार घ्यावा लागतो. ह्या संबंधीचे एक उदाहरण देऊ. पराशर [सन्ध्या स्नानं जपो होमो देवतातिथिपूजनम्। आतिथ्यं वैश्वदेवं च षट्कर्माणि दिने दिने ॥

पराशर स्मृति (१·३९).] स्मृतीमध्ये (१·३९) असा नियम सांगितला आहे की प्रत्येकाने प्रतिदिनी संध्या, स्नान, जप, होम, वेदाध्ययन, देवपूजा, वैश्वदेव आणि अतिथीसत्कार ह्या क्रिया कराव्या. ह्या ठिकाणी संध्या स्नान हा (स्मृतिवचनात दिलेला) पाठक्रम टाकून देऊन योग्यतेवरून (अर्थाला अनुसरून) सूचित होणारा क्रम स्वीकारला पाहिजे आणि म्हणून **स्नान** पहिल्याने केले पाहिजे आणि **संध्या** त्यानंतर केली पाहिजे (पूमीसू. ५·४·१).

जर अनेक देवतांची अथवा ब्राह्मणांची अनेक कृत्यांनी अथवा वस्तूंनी पूजा करावयाची असेल तर एका देवतेची अथवा एका ब्राह्मणाची क्रमाक्रमाने सर्व कृत्यांनी अथवा वस्तूंनी पूजा करावी आणि नंतर दुसऱ्या देवतेची अथवा ब्राह्मणाची तशीच पूजा करावी; **अथवा** प्रत्येक देवतेची अथवा ब्राह्मणाची एका कृत्याने अथवा पदार्थाने पूजा करावी, नंतर सर्वांची दुसऱ्या कृत्याने अथवा वस्तूने पूजा करावी. पहिल्या प्रकाराला **'कांडानुसमय'** असे म्हटले आहे आणि दुसऱ्या प्रकाराला **'पदार्थानुसमय'** अशी संज्ञा आहे. (पूमीसू.५·२·७·९ आणि ५·२·१।३).

पूमीसू.चा **साहावा** अध्याय अत्यंत उद्‌बोधक आहे. त्यांत पहिल्याने **अधिकाराच्या** अंगांचे म्हणजे यज्ञ करणाऱ्याच्या ठिकाणी आवश्यक असणाऱ्या गुणांचे विवेचन केले आहे. हा अध्याय अति विस्तृत असून त्यांत **८ पाद** आहेत ह्या अध्यायातील धर्मशास्त्रावरील ग्रंथांवर ज्या सिद्धान्तांचा परिणाम झाला आहे असे थोडे सिद्धांत प्रस्तुत प्रकरणात सांगू.

पूमीसू (६·१·१।३) ह्यांत असे सिद्ध केले आहे की 'ज्याला स्वर्गाची इच्छा असेल त्याने दर्शपूर्णमास अथवा ज्योतिष्टोम यज्ञ करावा' अशा अर्थाच्या वेदवचनांत स्वर्ग हे **प्रधान** अथवा प्रमुख कर्म असून याग हे कर्म **गौण** अथवा आनुषंगिक असते आणि अशा वेदवचनांनी यज्ञ करणाऱ्याचे गुण सांगितलेले असतात. **'अधिकारी'** ह्याची अशी एक व्याख्या दिली आहे की "ज्याला (स्वर्ग अथवा सौख्य ह्यांच्या सारख्या) काहीतरी **फलाची इच्छा** असते ज्याला शास्त्रांत सांगितलेले **कर्म करण्याचा अधिकार** असतो, जो **विद्वान** असतो आणि ज्याला (श्रुतीने) **यज्ञ करण्याला प्रतिबंध केलेला नाही.** तो अधिकारी समजावा." शूद्राला देखील सुखाची इच्छा असते. त्याच्या अंगी विद्वत्ता देखील असू शकेल, परंतु त्याला वेदान यज्ञ करण्याला प्रतिबंध केलेला असल्यामुळे शूद्र यज्ञ करण्याला अधिकारी नसतो.

पूमीसू. (६·१·३९।४०) मध्ये असे सिद्ध केले आहे की तीन उच्च वर्णातील प्रत्येक पुरुषाला श्रौतयज्ञ करण्याचा अधिकार आहे. पूमीसू. (६·१·४१) मध्ये म्हटले आहे की एखाद्या अवयवाने हीन असणारा मनुष्य द्रव्यहीन मनुष्यासारखा असतो, म्हणजे ज्याप्रमाणे द्रव्यहीन मनुष्य निरनिराळ्या साधनांनी द्रव्य संपादन करण्याचा संभव असतो त्याप्रमाणे अवयवाने हीन असणाऱ्या मनुष्याने आपले व्यंग दूर करण्याचा प्रयत्न केला तर त्याला श्रौतयज्ञ करण्याचा अधिकार असतो. तथापि, जर असे व्यंग जन्मजात आणि दूर करण्यासारखे नसेल तर असे व्यंग असणाऱ्या मनुष्याला श्रौत यज्ञ करिण्याचा अधिकार नसतो. प्राचीन आणि मध्ययुगीन कालांतील हिंदूंच्या वारसा हक्कासंबंधीचा कायदा वरील सिद्धांताच्या आधारावर तयार

केलेला होता. याज्ञ (२·१४०) मध्ये असे सांगितले आहे की नपूंसक, जाति बहिष्कृत व त्याचा पुत्र, लंगडा, माथेफिरू, जन्मजात मूर्ख, अंध आणि असाध्य रोगाने ग्रस्त मनुष्य ह्यांना संपत्तीमध्ये हिस्सा मिळण्याचा अधिकार नसतो, परंतु त्यांना पालन पोषण मिळण्याचां अधिकार असतो. ह्या श्लोकावरील टीकेत मिताक्षरेने असे म्हटले आहे की अपात्रतेची ही लक्षणे पुरुषांना आणि स्त्रियांना लागतात. तथापि इ. स. १९५६ च्या ३२ व्या कायद्याने ही अपात्रतेची सर्व कारणे बाजूला सारली आहेत.

पूमीसू. (६·३·१७।४१) ह्यांच्या पैकी बऱ्याच सूत्रात **'प्रतिनिधि'** म्हणजे काय ह्याचे विवेचन केले आहे. ह्यासंबंधी वर्णन मागे खंड २ आणि ३ मध्ये करण्यात आले आहे.

पूमीसू. च्या सातव्यापासूनच्या सहा अध्यायात ज्या विधींचा तपशील वेदाने स्पष्टपणे सांगितलेला नाही अशा ऐन्द्राग्न यज्ञासारख्या विधींचा विचार केला आहे. ७ व्या अध्यायात असा विषय आहे की (**प्रकृति** अथवा आदर्श स्वरूपाच्या यज्ञात फेरफार करून तयार केलेल्या) **विकृती**मध्ये काही तपशील अधिक घालावयाचे असतात किंवा काय आणि असल्यास त्यात कोणते आणि किती तपशील अधिक घालावे.

ज्या पद्धतीने अथवा मार्गाने एका विधीकरिता सांगितलेले तपशील त्या विधीहून भिन्न अशा दुसऱ्या विधीमध्ये समाविष्ट केले जातात त्या पद्धतीला अथवा मार्गाला **'अतिदेश'** अशी संज्ञा आहे. ह्यातील काही अतिदेश करण्याबद्दल वेदवचनात स्पष्ट उल्लेख केलेला असतो आणि काही ठिकाणी अशा वेदवचनांच्या अस्तित्वाचे **अनुमान** करावे लागते. उदा. 'इषु' नावाच्या जादुगारीच्या यज्ञाच्या बाबतीत वेदवचनात त्या यज्ञाचे काही तपशील सांगून बाकीचे तपशील 'श्येन' यज्ञाप्रमाणे करावे असे म्हटले आहे. चातुर्मास्य यज्ञांपैकी **वरुणप्रधास** हा एक यज्ञ आहे. त्या यज्ञामध्ये अवभृथ स्नान करावे असा नियम सांगितला आहे परंतु त्याबद्दलचे तपशील दिले नाहीत आणि म्हणून त्या स्नानासंबंधीचे आवश्यक तपशील सोमयागामधील अवभृथासंबंधीच्या नियमापासून घ्यावयाचे असतात. स्मृतींनी आणि निबंधग्रंथांनी **अतिदेशाचा** वारंवार उपयोग केलेला असतो. उदाहरणार्थ, याज्ञ (१·२३६ आणि २४२) ह्यात सांगितले आहे की **अग्नौकरण** आणि **पिण्डदान** ह्यांच्या बाबतीतील पिण्डपितृयज्ञामधील कार्यक्रम पार्वणश्राद्धात करावा.

पूमीसू. च्या आठव्या अध्यायात अतिदेशाचा उपयोग केलेल्या विशिष्ट प्रसंगांचे वर्णन केले आहे.

पूमीसू. च्या नवव्या अध्यायात **ऊह** (फेरफार) ह्यासंबंधी विवेचन केले आहे. ऊह ह्या शब्दाचा सर्वसाधारण अर्थ **तर्क** अथवा **विचारणा** असा आहे. परंतु पूमीसूत्रामध्ये ह्या शब्दाला एक विशिष्ट अर्थ असतो. अतिदेशाचे तत्त्व मंत्र, सामन् आणि संस्कार ह्यांना लावले म्हणजे त्यात काही फेरफार करावे लागतात. मीमांसकांनी शोधून काढलेले तत्त्व असे दिसते की जर मूळच्या मंत्रामधील शब्द विकृति यज्ञामध्ये जसेच्या तसे घेणे **अशक्य** असेल तरच फक्त ऊहाचा (फेरफाराचा) उपयोग करावा, परंतु अन्यत्र करू नये. तथापि, शबरस्वामीनी म्हटले आहे की याज्ञिक लोक ऊह करितात म्हणजे ते मंत्र म्हणताना अनुरूप फेरफार करितात. ज्या मंत्रामध्ये फेरफार केलेले असतात त्यांना मंत्र असे म्हणत नाहीत, कारण ज्यांना विद्वान लोक मंत्र म्हणून ओळखतात तेच फक्त मंत्र असतात (पूमीसू. २-१-३४ आणि त्यावरील शाबर भाष्य). धर्मशास्त्रावरील ग्रंथात ऊहाचा उपयोग केला जातो. उदा. विष्णुधर्मसूत्रामध्ये (७५·८) असा नियम सांगितला आहे की आपल्या मातामहाचे आणि त्याच्या दोन पुरुष पूर्वजांचे श्राद्ध मंत्राचा ऊह करून इतर श्राद्धाप्रमाणेच करावे. पुरुषपूर्वजांच्या श्राद्धातील मंत्र 'शुन्धन्ताम् पितरः' (आप. श्रौ. १·७·१३) हा आहे. त्याच्यात. 'शुन्धन्ताम् मातामहाः' असा फेरबदल करावा. पूमीसू. (९·३·२३।२६) मध्ये वरील नियमात

एक अपवाद सांगितला आहे. जेव्हा एखाद्या यज्ञामध्ये शिजलेल्या तांदुळाच्या भाताची आहुती द्यावयाची असून शिजलेला तांदुळाचा भात नष्ट झाल्यामुळे अथवा न मिळाल्यामुळे त्याच्या जागी '**नीवार**' (देवभात) प्रतिनिधि म्हणून घेतले असले तर मंत्रामधील 'व्रीहीणां' ह्या शब्दाच्या जागी 'नीवाराणां' असा ऊह न करिता 'व्रीहीणां' हेच शब्द ठेवावयाचे असतात, कारण शिजलेल्या नीवारांचे शिजलेल्या तांदुळांशी साम्य असल्या कारणाने तांदुळांच्या जागी 'नीवार' घेतलेले असतात.

पूमीसू. च्या नवव्या अध्यायातील तिसऱ्या आणि चौथ्या पादामध्ये 'अध्रिगु प्रैषा' संबंधी विचार केला आहे. हा प्रैष पशुबंधविधीमध्ये होतृ ऋत्विजाने म्हणावयाचा असतो. ह्या प्रैषामधील कांही विशिष्ट शब्दांमध्ये ऊह (फेरफार) करावयाचा असतो.

पूमीसू .चा दहावा अध्याय सर्वांत मोठा असून त्यांत ८ पाद आणि ५७७ सूत्रें आहेत (म्हणजे संपूर्ण सूत्रसंख्येपैकी पाचव्या हिश्श्याहून अधिक सूत्रें त्या अध्यायात आहेत. त्या अध्यायात **बाध** आणि **समुच्चयं** ह्यांच्यासंबंधी विवेचन केले आहे. **बाध** म्हणजे वगळणे आणि **अभ्युच्चय** अथवा **समुच्चय** ह्यांचा अर्थ बाधाच्या उलट प्रकारचा असतो. सामान्य नियम असा आहे की **प्रकृति** (आदर्श) यागामधील तपशील **विकृति**यागामध्ये समाविष्ट करावयाचे असतात. परंतु काही ठिकाणी विकृतियागाचे नाव निराळे असते आणि प्रकृतियागामधील कांही (शुद्धि आणि अलंकृत करण्यासारखे) **संस्कार** आणि कांही **पदार्थ** (**द्रव्यें**) विकृतियागामध्ये समाविष्ट करिता येत नाहीत, कारण असे संस्कार आणि अशी द्रव्ये ह्यांचा समावेश करू नये अशी स्पष्ट वचनें असतात अथवा अशा संस्कारांचा आणि द्रव्यांचा विकृतियागामध्ये काही उपयोग नसतो अथवा त्यांचा उपयोग निरर्थक असतो. शबरस्वामी म्हणतात की जेव्हा प्रकृतियागामधील काही कृत्यें विकृतियागांत समाविष्ट करावयाची आहेत असे निश्चित ज्ञान झाल्यानंतर देखील दुसरीही काही कृत्यें त्या विकृतियागामध्ये समाविष्ट करावयास पाहिजेत असे निश्चित ज्ञान होते तेव्हा **अभ्युच्चय** (वाढ) घडतो म्हणजे अशीं दुसरी कृत्यें देखील विकृतियागात समाविष्ट करण्यात येतात.

पूमीसू. (३·३·१४) वरील तंत्रवार्तिकात **बाधाची** पुढीलसारखी काही उदाहरणे दिली आहेत : तर्क आणि मृगजल ह्यांच्या सारख्या दृष्टिभ्रमाचे निराकरण (बाध) प्रत्यक्ष पाहण्याने होते, ज्ञानाच्या भ्रांतिकारक साधनांचा बाध ज्ञानाच्या सहा साधनांनी होतो; स्मृतीचा बाध श्रुतीने होतो; परस्पर विरोधी आणि अविश्वसनीय स्मृतीचा बाध विश्वसनीय आणि अविरोधी स्मृतींनी होतो.

**समुच्चयाचे** एक उदाहरण देऊ. वाजपेय यज्ञ हा ज्योतिष्टोमाचा एक प्रकार असतो असे पूमीसू. (३·७·५०।५१) मध्ये सांगितले आहे. ज्योतिष्टोम यागात (प्रकृति यागांत) देखील काही विशिष्ट पशूंचे बलिदान करावयाचे असते. प्रश्न असा आहे की प्रकृतियागांत बलिदान करावयास सांगितलेल्या पशूंची वाजपेयामध्ये **बाधा** असते अथवा समुच्चय असतो. निर्णय असा आहे की त्यांचा **समुच्चय** करावयाचा असतो. (पूमीसू १०·४।६). कारण तै. ब्रा. (१·३·४) मध्ये आलेल्या वचनावरून वाजपेय यज्ञामध्ये १७ पशूंव्यतिरिक्त इतर पशूंचेही बलिदान करावे लागते असे दिसून येते.

दहाव्या अध्यायामध्ये **यज्ञामधील दक्षिणे**संबंधी एक महत्त्वाचा विषय आहे. पूमीसू. (१०·२·२२।२८) मध्ये असे सिद्ध केले आहे की एखाद्या अदृष्ट (न दिसणाऱ्या) हेतु करिता दक्षिणा द्यावयाची नसून यज्ञामध्ये आवश्यक असणाऱ्या विधीकरिता ऋत्विजांची नेमणूक करण्याकरिता दक्षिणा द्यावयाची असते. पूमीसू. (१०·३·३९) मध्ये ताण्ड्य ब्राह्मणामधील (१६·१·१०।११) ह्या मंत्राच्या आधारावर **दक्षिणेच्या प्रकारांचे** वर्णन

केले आहे. पूमीसू. (१०·३·५०) मध्ये **यजमानाने स्वतः दक्षिणा वाटावी** असा नियम दिला आहे. पूमीसू. (१०·३·५५) मध्ये **दक्षिणा वाटण्याची पद्धति** दिली आहे. सर्व **ऋत्विजांना समान दक्षिणा** मिळावी. होतृ, अध्वर्युप्रभृति **चार मुख्य ऋत्विज** असतात; त्या **प्रत्येकाला** काही विशिष्ट क्रमाने **तीन तीन साहाय्यक** असतात; मुख्य आणि साहाय्यक मिळून होणाऱ्या **प्रत्येक गटाला** एकंदर द्यावयाच्या गाईपैकी ¼ गाई द्याव्या; त्यांच्या पैकी साहाय्यकांना मुख्य ऋत्विजाला मिळावयाच्या गाईचा क्रमाने ½, ⅓ आणि ¼ गाई मिळाव्या. **पूर्वपक्ष** असा आहे की श्रुतीने असमान वाटणी करावयास सांगितली नसल्यामुळे सर्वांना समान दक्षिणा (गाई) मिळावी आणि प्रत्येकाला त्याने केलेल्या कामाला अनुसरून दक्षिणा वाटली पाहिजे. **सिद्धांत** असा आहे की ही दोन्ही मते मान्य करिता येत नाहीत आणि श्रुतीने योजिलेल्या **अर्धिनः, तृतीयिनः** आणि **पादिनः** ह्या शब्दांच्या अर्थाला अनुसरून दक्षिणा वाटावी.

वरील विवेचनावरून मीमांसाशास्त्रातील काही मुख्य सिद्धांतांची आणि तत्वांची कल्पना येऊ शकेल. ह्या सिद्धांतांचा धर्मशास्त्रातील ग्रंथांवर फार मोठा परिणाम झाला होता. मीमांसाशास्त्रातील नियमांनी धर्मशास्त्रावरीर ग्रंथकारांना धर्मवचनांचा अर्थ लावण्याच्या कामांत फार साहय्य केले असले तरी मीमांसा शास्त्राच्या नियमांचा उपयोग करणे ही सोपी गोष्ट नाही आणि त्या नियमांच्या साहाय्याने सर्वसंमत होतील असे निश्चित निर्णय काढणे नेहमीच शक्य होते असे म्हणता येत नाही. असे होण्याला अनेक कारणे आहेत. मीमांसाशास्त्राचे प्रमुख पुरस्कर्ते प्रभाकर आणि कुमारिल भट्ट ह्यांच्या मतांत एकवाक्यता नाही; जैमिनीच्या सूत्रांतदेखील अनेक पाठभेद आहेत, कुमारिलभद्र आणि शबरस्वामी ह्यांच्या मतांत अनेक ठिकाणी भिन्नता आढळून येते; मोठमोठ्या मीमांसकांनी अनेक मुद्यांवर सर्वस्वी भिन्न असे निर्णय काढले आहेत.

ह्या संबंधीचे एक ठळक उदाहरण दत्तकासंबंधीचे वसिष्ठ स्मृतीतील (१५·५) हे वचन सांगता येईल. त्या वचनाचा सरळ अर्थ असा करता येईल की 'कोणाही स्त्रीला तिच्या पतीच्या अनुमतीशिवाय एखादा पुत्र दत्तक देऊ नये अथवा आपल्या पतीच्या अनुमतीशिवाय तिने एखादा पुत्र दत्तक घेऊ नये' ह्या वचनाचे मीमांसाशास्त्राच्या नियमांना अनुसरून निरनिराळ्या ग्रंथांनी आणि ग्रंथकारांनी चार प्रकारचे अर्थ केले असून त्यांना अनुसरून निरनिराळ्या न्यायालयांनी निरनिराळे भिन्न निर्णय दिले आहेत. नुकत्याच झालेल्या हिंदूंच्या दत्तकासंबंधीच्या आणि अन्नवस्त्रासंबंधीच्या (सन १९५६ च्या ७८ व्या) कायद्याने पूर्वीची धर्मशास्त्रातील वचनें, नियम, रूढी, परंपरा रद्द करून पूर्वीच्या कायद्यांत दूरगामी आणि मूलभूत असे फेरबद्दल केले आहेत.

ह्या नव्या कायद्याने निर्माण झालेल्या निरनिराळ्या समस्यांच्या तपशीलांत न शिरता, जाता जाता असे म्हणावेसे वाटते की ज्या वेळी एखाद्या प्रचलित कायद्यातील अस्तित्वात असलेल्या अथवा मानलेल्या अडचणी कमी करण्याकरिता त्या कायद्यात दूरगामी फेरबदल करण्यात येतात तेव्हा पुष्कळवेळा नजीकच्या भविष्य काळात अनेक नव्या समस्या निर्माण केल्या जातात. ह्याबद्दलचे एक साधे उदाहरण हिंदू-मुलींच्या विवाहोचित वयासंबंधीच्या कायद्याचे देता येईल. ही वयोमर्यादा वाढविण्याच्या हेतूने जे निरनिराळे कायदे करण्यात आले. त्यांच्या योगाने आणि बदललेल्या परिस्थितीमुळे आता प्रौढ कुमारींची समस्या निर्माण झाली आहे आणि मध्यम स्थितीतील हिंदुकुटुंबांत अशा प्रौढ कुमारींच्या विवाहाच्या बाबतीत फार अडचणी अनुभवाला येऊ लागल्या आहेत.

# विभाग ८ : सांख्य, योग आणि तर्क ह्यांचा धर्मशास्त्राशी संबंध

## प्रकरण ३१

### धर्मशास्त्र आणि सांख्य

(मू. ग्रं. पा. ५।१३५२-१३८४)

सुप्रसिद्ध सहा दर्शनांपैकी (तत्त्वज्ञानाच्या प्रणालींपैकी) सांख्य हे एक दर्शन आहे. सांख्यमताची उत्पत्ति कशी झाली हा भारतीय तत्त्वज्ञानासंबंधी एक अति अवघड प्रश्न आहे. सांख्य मतासंबंधी अनेक ग्रंथ आणि निबंध लिहले गेले आहेत. ईश्वरकृष्णाच्या सांख्यकारिका ह्या ग्रंथात मूळच्या सांख्य तत्त्वज्ञानात सुधारणा केलेले तत्त्वज्ञान सांगितले आहे. परंतु ते मूळचे तत्त्वज्ञान काय होते ह्याचे साधारणतः सर्वमान्य असे उत्तर देता येत नाही. निदान इ. स. च्या ५ व्या शतकापासून तरी ईश्वरकृष्णाचा सांख्यकारिका हा ग्रंथ सांख्यमताचे प्रतिपादन करणाऱ्या ग्रंथात अग्रेसर असल्याचे मानण्यात येत आहे. सांख्य कारिका हा ग्रंथ आणि त्यावरील टीका ह्यांचे चिनी भाषेत भाषांतर परमार्थ नावाच्या एका श्रमणाने इ. स. ५४६ च्या सुमारास केले होते. सांख्यकारिकेवरील अनेक टीका प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांत परमार्थाने चिनी भाषेत भाषांतर केलेली टीका सर्वांत जुनी असावी. दुसरी एक माठरवृत्ती नावाची टीका प्रसिद्ध झाली आहे. गौडपादाची ही एक टीका असून ती माठरवृत्तीची संक्षिप्त आवृत्ती असावी असे डॉ. बेलवलकर यांचे मत आहे. दुसरी एक जयमंगला नावाची टीका असून तिच्या समाप्तीवाचक संकल्पामध्ये ती शंकराचार्य ह्यानी केल्याचे म्हटले आहे. सांख्यकारिका ग्रंथाचा रचनाकाल निश्चितपणे सांगता येत नाही. परंतु त्या ग्रंथाचे भाषांतर इ. स. ५४६ सालाच्या सुमारास झाले होते त्या अर्थी तो ग्रंथ निदान इ. स. २५०—३०० नंतरचा म्हणता येत नाही. कदाचित तो काही शतके त्याच्याही पूर्वीचा असण्याचा संभव आहे. सांख्यसूत्र अथवा सांख्य प्रवचन सूत्र ह्या कपिलाच्या नावावर प्रसिद्ध असलेल्या ग्रंथावर विज्ञान भिक्षूने एक भाष्य रचिले होते.

परमार्थाने चिनी भाषेत भाषांतर केलेल्या टीकेवरून तयार केलेल्या संस्कृत टीकेत पंचशिखापासून ईश्वरकृष्णापर्यंतची परंपरा दिली आहे. त्यात त्या दोघांच्या दरम्यान तीन पुरुष दिले आहेत. युक्तिदीपिकेत (पा. १२५) म्हटले आहे की पंचशिख आणि ईश्वरकृष्ण ह्यांच्या दरम्यान कमीत कमी दहा पुरुष होऊन गेले. ईश्वरकृष्णाचा काळ इ. स. २५० च्या सुमारास मानला तर पंचशिखाचा काळ ख्रि. पू. पहिल्या शतकानंतरचा म्हणता येणार नाही आणि तो कदाचित त्याच्याही बराच पूर्वीचा असू शकेल. सांख्यकारिका ह्या ग्रंथात असे म्हटले आहे की ते पवित्र सांख्यशास्त्र कपिलमुनीने आसुरीला शिकविले, त्याने ते पंचशिखाला शिकविले, पंचशिखाने ते अनेक शिष्यांना शिकविले आणि त्यानंतर ते शास्त्र गुरुशिष्य परंपरेने ईश्वरकृष्णाला प्राप्त झाले.

सांख्य शास्त्राच्या बाबतीत कपिल, आसुरी, पंचशिख, जैगीषव्य, विन्ध्यवास अथवा विन्ध्यवासिन् आणि ईश्वरकृष्ण हे पुरुष महत्वाचे आहेत.

अधिकृत सांख्यशास्त्राच्या **प्रमुख आणि मूलभूत कल्पना** पुढीलप्रमाणे आहेत : अनादिकालापासून **प्रकृति** (निसर्ग अथवा जड पदार्थ) आणि पुरुष (आत्मा, चैतन्य, ज्ञाता) अशी दोन स्वतंत्र तत्त्वे अस्तित्वात आहेत. प्रकृतीलाच प्रधान, आणि अव्यक्त अशीही नावे आहेत. पुरुष अनेक आहेत. प्रकृति अथवा प्रधान आणि अव्यक्त ही सत्त्व, रज आणि तम ह्या गुणापासून बनलेली असून तिच्यात हे गुण साम्य स्थितीत असतात. सर्व भौतिक आणि मानसिक सृष्टीमध्ये सर्वात कमी प्रतीचा घटक जड, अभेद्य पदार्थ अथवा विकृत

मनोवृत्ती हा असतो. त्या मनोवृत्तीला तामस म्हणतात आणि त्या मनोवृत्ती जड आणि व्यापणाऱ्या असतात. दुसरा घटक भौतिक आणि मानसिक सृष्टीत सतत होणारा फेरबदल हा असतो. ह्या घटकाला सांख्यकारिकेत रजस् (चल आणि उपष्टंभक) अशी संज्ञा दिली आहे. तिसरा घटक सत्त्व हा असतो. सत्त्व म्हणजे ज्यांच्या योगाने ज्ञान आणि अनुभव प्राप्त होतो अशा निरनिराळ्या चेतना. सत्त्वाला लघु अथवा हलका आणि प्रकाशक म्हणतात. हे तीन गुण अथवा घटक भिन्न भिन्न प्रमाणात एकत्र येऊन त्यांच्यापासून हे सर्वदा उत्क्रांत होणारे विश्व बनते. प्रधान हे तत्त्व तीन गुणाहून वेगळे नसून उत्क्रांतीला प्रारंभ होण्यापूर्वी जी मूळची स्थिती होती तिला प्रधान हे नाव दिले आहे. प्रकृति अनादि असल्याकारणाने सांख्यशास्त्राने ईश्वर हा सृष्टिकर्ता न मानता अनवश्यक असल्याचे मानले आहे. पुरुष आणि प्रकृती ह्यांचा अथवा दोहींचा धर्मशास्त्राशी काही संबंध नाही. प्रकृतीच्या जाळ्यामध्ये अविचाराने पुरुष कोणत्या तरी रीतीने गुंतून पडतो. प्रकृतीपासून महान् (म्हणजे बुद्धि) हे तत्त्व उत्पन्न होते आणि त्याच्यापासून अहंकार तत्त्व उत्पन्न होते, अहंकारापासून एका बाजूला पाच तन्मात्रा (शब्द, स्पर्श, गंध, रस आणि रूप ह्यांची सूक्ष्म रूपे) उत्पन्न होतात आणि दुसरीकडे मन आणि दहा इन्द्रिये (पाच ज्ञानेन्द्रिये आणि पाच कर्मेन्द्रिये) उत्पन्न होतात. पाच तन्मात्रांपासून पृथ्वी, अप, तेज, वायु आणि आकाश ही पाच महाभूते उत्पन्न होतात. तत्त्वांची एकूण संख्या २४ असून पुरुष हे २५ वे तत्त्व असतें. प्रधान हे पुरुषापासून भिन्न असून पुरुषाला मदत करिते (पुरुष अक्रिय आणि साक्षी असतो). सांख्यशास्त्र ईश्वराचे अस्तित्व मान्य करीत नाही. आंधळा आणि लंगडा ह्यांनी सहकार्य करून उद्दिष्ट स्थळी पोचावे त्याप्रमाणे प्रकृती आणि पुरुष एकत्र येतात आणि प्रकृतीचे कार्य पुरुष पाहतो. जेव्हा प्रकृतीचे घटक असणारे गुण आणि पुरुष ह्यांच्यामधील भिन्नता पुरुषाला कळते तेव्हा तो मुक्त होतो. सांख्यशास्त्रात आत्मे अनेक असल्याचे मानले जाते. सांख्यशास्त्राच्या सत्कार्यवाद ह्या सिद्धान्ताप्रमाणे कार्याची उत्पत्ती शून्यापासून न होता कार्य हे कारणामध्ये आधीच अस्तित्वात असते. (सांख्यकारिका श्लो. ९, छां. उप. ६·२·२, गीता २·१६- नासतो विद्यते भावः). सांख्यशास्त्रात विश्वाच्या उत्पत्तीची जी कल्पना आहे ती आधुनिक काळच्या उत्क्रान्तीच्या कल्पने इतकीच सयुक्तिक आणि समंजस आहे.

वेदान्तसूत्रावरील टीकेत (वे. सू. १·४·२८) शंकराचार्यांनी म्हटले आहे की सांख्य मत कार्यकारणात भेद मानीत नसल्यामुळे ते वेदान्ताशी अधिक जवळचे आहे आणि देवलासारख्या काहीं धर्मसूत्रकारांनी त्या मताचा आश्रय केला आहे. ती मते मनुष्याचे अत्युच्च ध्येय प्राप्त करून घेण्याची साधने असल्याचे शिष्टांनी मानले असून त्यांना (श्वेता. आणि कठ उप. यांच्यासारख्या) वेदवचनांचा आधार आहे. मनुप्रभृतींनी आपल्या ग्रंथांत विश्वाचे कारण ब्रह्म आहे हा सिद्धान्त काही थोड्या प्रमाणात मान्य केला आहे.

भगवद्गीतेत देखील काही विशिष्ट सांख्यसिद्धान्तांचे विवेचन केले आहे आणि २४ तत्त्वांची यादी दिली आहे आणि त्यात पुरुष गाळला असून पाच तन्मात्रांच्या जागी पाच महाभूते घातली आहेत (गीता १३·५). गीता (७·६ आणि ८) यात ईश्वरच सर्व जगाचे उत्पत्तिस्थान असून त्यामध्येच जग शेवटी विलीन होते असे सांगितले आहे. ह्या ठिकाणी गीता आणि अधिकृत सांख्यशास्त्र यात महत्त्वाचा भेद आहे.

मुंडक आणि कठ उपनिषदांत सृष्टीच्या उत्पत्तीचा जो क्रम दिला आहे तो अधिकृत सांख्यशास्त्रात सांगितलेल्या क्रमासारखाच आहे— मात्र उपनिषदांनी सर्व श्रेष्ठ उत्पत्तिकर्त्याचे अस्तित्व मानले आहे आणि सांख्यशास्त्राने उत्पत्तिकर्ता वगळून उत्पत्तीचा क्रम तेवढा मान्य केला आहे. सांख्यशास्त्र आणि उपनिषदे ह्यांच्या परस्पर संबंधाच्या बाबतीत सांख्यशास्त्राने उपनिषदांमधील विचारांचा आधार घेतला असावा, कारण बृह. आणि छां. ह्यांच्यासारख्या प्राचीन उपनिषदांत सांख्यसिद्धांतांचा अथवा त्यातील प्रक्रियांचा मागमूस आढळत नाही आणि सांख्यशास्त्राचे उल्लेख विद्वानांच्या मताने बृह. आणि छां. उप. ह्यांच्या नंतरच्या

असणाऱ्या कठ, मुंडक, श्वेताश्वतर, प्रश्न ह्या उपनिषदांतच फक्त आढळतो. कौटिल्याला सांख्य आणि योग ह्या शास्त्रांची माहिती होती (अर्थशास्त्र १—२ पा. ६). शंकराचार्यांनी (वे. सू. २·१·३ वरील भाष्यात) एवढे मान्य केले आहे की सांख्य आणि योग शास्त्रांतील जेवढा भाग वेदविरुद्ध नाही तेवढ्या भागापुरती ती शास्त्रे वेदमार्गातील आहेत. ह्यावरून तत्त्वज्ञानाचा एक संप्रदाय ह्या दृष्टीने सांख्यशास्त्राची उत्पत्ति निदान ख्रि. पू. ४ थ्या शतकापूर्वी झाली असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही.

महाभारत (शांतिपर्व) यात सांख्यकारिकेत प्रतिपादन केलेले काही सिद्धान्त आले असले तरी त्या सर्व सिद्धान्तांना ईश्वर मानणाऱ्या अद्वैत वेदान्ताच्या मालिकेत बसविले आहेत. महाभारतात सांख्यशास्त्राचे जे उल्लेख आले आहेत ते बहुधा प्रकृति, पुरुष आणि परमात्मा ह्या तिघांना मानणाऱ्या तत्त्वज्ञानाच्या सिद्धान्तांना अनुलक्षून असावेत आणि अशा तत्त्वज्ञानापासून पुढे सर्व विश्वाचा एक नियंता न मानणाऱ्या अधिकृत सांख्यशास्त्राची उत्पत्ती झाली असावी. शांतिपर्वातील वर्णनावरून पंचशिखाचे तत्त्वज्ञान वास्तविक अद्वैतमताचे असून त्यात विश्वाच्या उत्पत्तिप्रभृतीसंबंधीचे पुढील काळात झालेल्या अधिकृत सांख्य शास्त्रातील सिद्धान्तासारखे काही सिद्धान्त चिकटविण्यात आले आहेत असे दिसते.

महाभारतात शांतिपर्वाखेरीज दुसऱ्याही काही पर्वात सांख्यशास्त्रांतील सिद्धान्ताचे प्रतिपादन केले आहे. उदाहरणार्थ आश्वमेधिक पर्व (३५·४७।४८) यांत सत्त्व, रज आणि तम ह्या आत्मगुणांचा आणि त्यांच्या साम्यावस्थेचा उल्लेख केला आहे आणि दुसऱ्या [सत्त्वं रजस्तमश्चेति त्रय आत्मगुणाः स्मृताः ।
तेषां गुणानां सायं चेत्तदाहुः स्वस्थलक्षणम् ।
तेषामन्यतमोत्सेके विधानमुपदिश्यते ॥
आश्वमे० (१२·४।५).] एका ठिकाणी (आश्व. १२·४।५) अव्यक्तादि २४ तत्त्वांची नावे दिली आहेत.

**आसुरि** हा कपिलाचा शिष्य असल्याचे सांख्यकारिकेत आणि महाभारतांत (शांतिपर्व) म्हटले आहे. परंतु त्याने एखादा ग्रंथ केल्याचे प्रसिद्ध नाही, तसेच त्याच्या ग्रंथातील अवतरणे ही सांख्यशास्त्रावरील कोणी ग्रंथकाराने बहुधा उद्धृत केल्याचे आढळत नाही.

**कपिल** ही एक पुराणप्रसिद्ध व्यक्ति आहे. भागवत पुराणात (१·३·१०) त्याला विष्णूचा पाचवा अवतार म्हटले आहे. आणि त्याने अवनत झालेल्या सांख्यशास्त्राचा आसुरीला उपदेश केल्याचे वर्णन केले आहे. वनपर्वात (२२१·२६) कपिलाला सांख्य योगाचा प्रवर्तक म्हटले आहे. गीतेमध्ये (१०·२६) कपिलाला मुनि आणि श्रेष्ठ सिद्ध म्हटले आहे. सांख्यकारिकेमध्येही त्याला मुनि म्हटले आहे. सांख्यसूत्र अथवा सांख्यप्रवचन सूत्र ह्या नावाचा एक ग्रंथ कपिलाच्या नावावर प्रसिद्ध आहे. परंतु तो ग्रंथ इ. स. १४०० च्या सुमारास झाला असावा असे कोणी म्हणतात.

**पंचशिख** हा सांख्यशास्त्रातील एक श्रेष्ठ पुरुष आहे. त्याने त्या शास्त्रावर केलेल्या ग्रंथाला त्यात ६० विषय असल्यामुळे आणि त्यात ६०,००० गाथा असल्यामुळे ‘षष्टितन्त्र’ म्हणतात. त्याला पंचशिख हे नाव त्याच्या मस्तकावरील **शिखेवरून पडले.**

**जैगीषव्य** ह्याचा उल्लेख शांतिपर्व, बुद्धचरित, योगशास्त्र इत्यादि ग्रंथांत केला आहे. हा योगशास्त्रावरील वेदान्तमताचा ग्रंथकार असावा असे दिसते.

**विन्ध्यवास** अथवा **विन्ध्यवासित्** आणि ईश्वरकृष्ण एकच असावे असे काही विद्वानांचे मत आहे परंतु

त्यांनी दिलेला पुरावा अपुरा आहे. ईश्वरकृष्ण इ. स. ३३०-३८० ह्या काळात होऊन गेला. विन्ध्यवास बुद्धाच्या निर्याणानंतरच्या १० व्या शतकात झाला असे परमार्थाचे मत आहे.

संख्या ह्या शब्दाचा अर्थ 'अंक' अथवा 'गणना.' सांख्यशास्त्राने २५ तत्त्वांची गणना केली आहे आणि पंचशिखाच्या षष्टितन्त्र ह्या ग्रंथात साठ विषयांचे विवेचन केले आहे. ह्यावरून ह्या तत्त्वज्ञानाला **सांख्य** म्हणू लागले असण्याचा संभव आहे. ज्या तत्त्वज्ञानामध्ये प्रकृति, पुरुष प्रभृति पंचवीस तत्त्वे गृहीत धरली आहेत ते सांख्य तत्त्वज्ञान. अमरकोशामध्ये 'सांख्य' शब्दाचा 'तर्कयुक्त चिकित्सा' अथवा 'जाणीव' असा दुसरा एक अर्थ दिला आहे. त्याला धरून 'तर्कयुक्त चिकित्सा करणारे शास्त्र' अशी सांख्य शब्दाची दुसरी व्याख्या करिता येईल. सांख्य म्हणजे तत्त्वज्ञान (अंतिम सत्याचे ज्ञान, वेदान्त) अथवा ज्याला अंतिम सत्य कळले असा पुरुष ह्या अर्थाने सांख्य हा शब्द भामती मध्ये योजला आहे. गीतेमध्ये नुसते तत्त्वज्ञान ह्या अर्थाने सांख्य हा शब्द (२·३९,५·५,१३·२४) मध्ये आणि ज्याला अंतिम सत्य कळले आहे ह्या अर्थाने (३·३,५·५) मध्य योजला आहे.

तुलनेने प्राचीन अशा पुढील ग्रंथांत सांख्यकारिकेतील मतांसारखी मते आढळतात. बुद्धचरित् (१३·१७), चरकसंहिता (शरीरस्थान १·१७), विष्णुपुराण (१·२·१९।२३),मत्स्य (३·१४।१९) ब्रह्मपुराण (१·३३।३५),पद्मपुराण (पाताल ८५·११।१८), कूर्म (१·४·१३।३५), ब्रह्माण्ड (२·३२·७१।७६), भागवत (३·२६), कुमारसंभव (२·४),रघुवंश (१०·३८), बाणकृत कादम्बरी (पहिला श्लोक), शारदातिलक, इत्यादि.

शांतिपर्व (२९०·१०३।१०४) यांत [ज्ञानं महद्यद्धिमहत्सु राजन् वेदेषु सांख्येषु तथैव योगे।
यच्चापि दुष्टं विविधं पुराणं सांख्यागतं तन्निखिलं नरेन्द्र।
यच्चेतिहासेषु महत्सु दृष्टं यच्चार्थशास्त्रे नृपशिष्टजुष्टे।
ज्ञानं च लोके यदिहास्ति किंचित्सांख्यागतं तच्च महन्महात्मन्॥
शान्ति. (२९०·१०३।१०४).] म्हटले आहे की वेद, सांख्य, योग, पुराणे, इतिहास, अर्थशास्त्र ह्यात जे जे ज्ञान आढळते आणि जे जे ज्ञान जगात अस्तित्वात आहे ते सर्व सांख्यशास्त्रापासून निघाले आहे. हे विधान यथार्थ आहे.

# प्रकरण ३२

## योग आणि धर्मशास्त्र

(मू. ग्रं. पा. ५।१३८५-१४६७)

उपनिषदांमध्ये (श्वे. उप. ६·१३) त्याचप्रमाणे महाभारत (शान्ति [पञ्चविंशति तत्त्वानि तुल्यान्युभयतः समम् ।
योगे सांख्येपि च तथा विशेषांस्तत्र मे शृणु ॥
- शान्तिपर्व (२२८·२८)] २२८-२८), भगवद्गीता (५·४।५) आणि पद्मपुराणा (पाताल खं. ८५·११ प्रभृति) सारख्या पुराणांत योग आणि सांख्य ह्यांचा पुष्कळवेळा एकत्र उल्लेख केलेला आढळतो आणि त्या दोघांचा परस्पर संबंध सर्वही ग्रंथांत एकाच प्रकारचा आहे.

विश्वाच्या उत्पत्तिविषयी निरनिराळ्या दृष्टीने ज्या ग्रंथांत विवेचन केले आहे त्या सर्व ग्रंथांवर सांख्यशास्त्राचा अतिशय परिणाम झाला असला तरी भारतातील सर्व प्रकारच्या लोकात योगशास्त्राला जितकी लोकप्रियता लाभली होती आणि अद्यापिदेखील योगशास्त्र जितके लोकप्रिय आहे तितकी लोकप्रियता सांख्यशास्त्राला मिळाली नाही. योग हा शब्द युज्=जोडणे, एकत्र करणे ह्या धातूपासून झाला आहे. योगाचे बीज ऋग्वेदामध्ये देखील सांपडू शकते (ऋ ५·८१·१ पहा). योग हा शब्द योगसूत्रात ज्या अर्थाने आला आहे त्याच अर्थाने तो काही उपनिषदांतही योजला आहे. कठ उपनिषदात (२·१२) म्हटले आहे की 'सूज्ञ लोक आपले मन योगाच्या साह्याने अंतरात्म्याचे ठिकाणी केंद्रित करून परमेश्वराचे चिंतन करतात आणि सुखदुःखापासून मुक्त होतात.' योग हा शब्द तैत्तिरीय (२·४), प्रश्न (५·५।६), श्वेता० (१·३), छांदो०, (८·१५), बृहदा०, (१·५।२३) इत्यादि दुसऱ्याही उपनिषदात आला आहे. वेदान्तसूत्रामध्ये सांख्यमताचे खंडन करण्याकरिता जो कोटिक्रम योजला आहे त्याच कोटिक्रमाने योगाचे खंडन केले आहे. शंकराचार्यांनी भाष्यामध्ये योगशास्त्र असा उल्लेख केला आहे परंतु त्यात योगसूत्र हा शब्द योजला नसल्यामुळे त्यांनी केलेला उल्लेख एखाद्या सूत्रग्रंथाला अनुलक्षून नसावा. याज्ञ. स्मृती (३·११०) मध्ये याज्ञवल्क्याने एक योगशास्त्र रचल्याचा उल्लेख केला आहे आणि शंकराचार्यांनी केलेला उल्लेख त्याच्यासारख्या एखाद्या ग्रंथाला अनुलक्षून केला असण्याचा संभव आहे. मुंडक, (३·१·५) कठ (३·१३) ह्यांच्यासारख्या उपनिषदांनी योग ह्या शब्दाचा उपयोग केला आहे इतकेच नव्हे तर त्यात योगाच्या काही पायऱ्या आणि त्यातील ब्रह्मप्राप्तीच्या प्रक्रियाही दिल्या आहेत. आप. ध. सू. (१·८·२३·३।६) मध्ये म्हटले आहे की योगामुळे सर्व दोषांचा नाश होऊन मनुष्य शांतीला (मोक्षाला) पोचतो. ह्यावरून असे दिसून येते की ख्रि पू. ४ थ्या अथवा ५ व्या शतकाच्या बऱ्याच आधी मनाचे नियमन करणारे शास्त्र ह्या अर्थाने योगाचा विकास झाला होता.

शांतिपर्वात (३३७·५९।६१) असे म्हटले आहे की हिरण्यगर्भ हा प्राचीन काळचा योगवेत्ता असून दुसऱ्या कोणालाही योग माहित नव्हता. दुसऱ्या एका ठिकाणी (शांति ३६·७६) म्हटले आहे की सांख्य, योग इत्यादि सर्व एकमेकांची अंगे आहेत. अनुशासन पर्वात (१४·२२३) सनत्कुमारांना योगशास्त्राचे संस्थापक म्हटले आहे. अहिर्बुध्न्य संहितेत (१२·३२।३३) हिरण्यगर्भाने दोन योगसंहिता सांगितल्याचा उल्लेख केला आहे : शल्यपर्व (अ. ५०), शांतिपर्व (२२९·१४), वराहपुराण (४·१४), बुद्धचरित्र (१२), ह्या ग्रंथांत योगी असलेल्या जैगीषव्याचा उल्लेख केला आहे. ह्या उल्लेखावरून जैगीषव्य हा इ. स. च्या बऱ्याच पूर्वीच्या काळचा योगशास्त्राचा आचार्य होता असे दिसते. त्याने बहुधा योगशास्त्रावर एक ग्रंथ केला असून तो सध्या उपलब्ध नसावा.

पतंजलिकृत योगसूत्र आणि त्यावरील व्यासकृतभाष्य आणि वाचस्पतीकृत ‘तत्त्वे वैशारदी’ टीका ह्या ग्रंथांच्या भारतामध्ये अनेक आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या आहेत. योगसूत्रावर आणखीही अनेक टीका झाल्या आहेत.

सांख्याप्रमाणेच योग हे एक दर्शन आहे, परंतु इतर दर्शनांच्या तुलनेने योगसूत्र हा ग्रंथ लहान आहे. त्याचे समाधि, साधना, विभूति आणि कैवल्य असे चार पाद केले असून सर्वही पादांमिळून (५१+५५+५५+३४=) फक्त १९५ सूत्रे आहेत.

भोजदेवकृत टीकेमध्ये पतंजलीला शेषाचा अवतार मानला असून त्याने व्याकरण, योग आणि वैद्यक ह्या विषयांवर ग्रंथ रचिले असल्याचे सांगितले आहे. व्याकरणशास्त्रावरील महाभाष्य हा ग्रंथ करणारा आणि योगसूत्राचा कर्ता एकच नव्हेत असे काही विद्वानांचे मत आहे परंतु ते सिद्ध करण्यासारखा सयुक्तिक कोटिक्रम कोणीही मांडलेला नाही, ह्या दोन्ही ग्रंथांचा कर्ता एक नव्हे असे मानले तरीदेखील योगसूत्राच्या कर्त्याचा काळ इसवी सनाच्या २ ऱ्या अथवा ३ ऱ्या शतकानंतरचा निश्चितपणे ठरविण्याला फारशी कारणे उपलब्ध नाहीत. व्याकरणावरील महाभाष्याचा कर्ता पतंजलि हा ख्रि. पू. १५० च्या सुमारास होऊन गेल्याचे सामान्यतः मानण्यात येते. योगसूत्राचा काल ठरविण्याच्या बाबतीत व्यासकृत भाष्याचा रचनाकाळ बराच महत्त्वाचा आहे. व्यासकृत योगभाष्यात महाभारत आणि विष्णुपुराण यांतील अवतरणे उद्धृत केली आहेत. त्यावरून योगभाष्याचा काळ इ. स. च्या ४ थ्या शतकाच्या सुमाराचा ठरविण्यास हरकत नाही. योगसूत्र आणि योगभाष्य ह्यांच्या दरम्यान काही शतकांचा काळ गेला असावा असा निष्कर्ष अंतर्गत पुराव्यावरून निघतो. त्यावरूनही योगसूत्राचा काळ ठरविता येतो. परंतु तो ख्रि. पू. २ ऱ्या शतकापूर्वीचा ठरविता येत नाही.

योगाच्या प्रक्रियांचा आणि परिभाषेचा उल्लेख उपनिषदांत केला आहे. महाभारतामध्ये देखील योगाच्या कक्षेत येणाऱ्या विषयांचे विस्तृत विवेचन केले आहे. भगवद्गीता [असंशय महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम्।
अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ॥
– भगवद्गीता (६·३५).] (६·३५) आणि योगसूत्र (१·१२) ह्या दोहोमध्येही लक्षात येण्यासारखी साम्यता आहे. दोहोनीही योगाची व्याख्या ‘मनोवृत्तींचा निरोध’ अशी दिली आहे. तसेच दोहोनी मनाचा निग्रह करण्याची अभ्यास आणि वैराग्य ही साधने सांगितली आहेत.

योगसूत्रांत विश्वाच्या उत्पत्तिविषयी पतंजलीने आपली स्वतःची कल्पना कोठेही स्पष्टपणे सांगितलेली नाही. तथापि योगसूत्रामध्ये सांख्यांचे काही सिद्धांत गृहीत धरून मान्य केले आहेत. सांख्यांच्या मताप्रमाणे प्रधान हे विश्वाच्या उत्पत्तीचे मुख्य कारण आहे. योगसूत्रामध्ये प्रधान म्हणजे काय आणि त्याचे महत्त्व काय ह्याचे कोठेही विवेचन केलेले नाही. ह्यावरून सांख्यशास्त्रात प्रधानाचे जे वर्णन केले आहे त्या वर्णनासहित प्रधानाची कल्पना योगसूत्राने गृहीत धरली होती असा निष्कर्ष निघतो. आत्मे अनेक आहेत ह्या बाबतीतही दोघांचे एकमत आहे. व्यासभाष्यात पंचशिखाची अनेक अवतरणे उद्धृत केली आहेत.

योगसूत्राने सांख्यशास्त्रातील मूलभूत सिद्धान्तांपैकी काही मान्य केले असले तरी काही विशिष्ट मुद्यासंबंधी दोन शास्त्रात भेद आहेत. अधिकृत सांख्यशास्त्रात ईश्वराला कोठेही स्थान दिलेले नाही परंतु योगसूत्रात (१·२३।२९) ईश्वराचे अस्तित्व मान्य केले आहे. तथापि ईश्वराला योगसूत्रांत दिलेले स्थान मुख्य

नसून गौण आहे आणि ते देखील बहुधा सामान्य लोकांच्या विचारांना आणि श्रद्धेला मान्यता देण्यापुरतेच दिले असावे. योगसूत्रांत ईश्वराला विश्वाचा उत्पत्तिकर्ता म्हटले नाही. योग आणि सांख्य ह्या दोन्ही शास्त्रांचे सर्वोच्च ध्येय कैवल्य आहे (सांख्यकारिका ६६, ६८ पा. सू ३·५० इ.). तथापि ते प्राप्त करून घेण्याला पदार्थज्ञानाखेरीज दुसरे कोणतेही विस्तृत प्रयत्न करण्याची आवश्यकता सांख्यशास्त्रात सांगितली नाही परंतु योगसूत्रामध्ये मनावर स्वामित्व मिळविण्याकरिता दीर्घ प्रयत्न करावयास सांगितले आहे. त्यात ज्ञानाला महत्त्व न देता प्रयत्नाला महत्त्व दिले आहे, प्राणायाम आणि ध्यान फार महत्त्वाची अंगे मानली आहेत आणि अशा रीतीने योगसूत्राप्रमाणे कैवल्याचा मनाशी संबंध आहे. सांख्यशास्त्रांत असे गृहीत धरले आहे की जीवात्म्याला जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त होण्याला पुरुष आणि प्रकृति ह्यांच्या स्वरूपाचे आणि त्यांच्यामधील भेदाचे बुद्धीला ज्ञान झाले म्हणजे पुरे आहे, परंतु योगशास्त्राने इच्छा आणि वासना ह्यांचे व्यवस्थित नियंत्रण करणे अवश्य असल्याचे मानले आहे. सांख्य आणि योग ह्या दोन्ही शास्त्रांच्या मताप्रमाणे प्रत्येक जीवात्मा अमर असतो आणि त्यांचे अंतिम ध्येय प्रकृतीच्या आणि गुणांच्या बंधनापासून मुक्त होणे हेच असते, परंतु अद्वैत वेदान्ताच्या मताप्रमाणे आत्म्याचे ध्येय ब्रह्मामध्ये विलीन होऊन ब्रह्माशी एकरूप होणे हे असते. ह्याठिकाणी सांख्य आणि योग यांच्यात आणि अद्वैत वेदान्तात भेद आहे.

याज्ञवल्क्य स्मृतीमध्ये (३·११०) याज्ञवल्क्याने केलेल्या योगशास्त्राचा उल्लेख केला आहे. याज्ञवल्क्याचा उल्लेख बृह. उप. मध्ये (२·४) केला आहे आणि याज्ञ. आणि त्याची पत्नी मैत्रेयी यांचा संवाद दिला आहे. त्या संवादांत (बृ. उप. २·४·५) 'आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्योः मन्तव्यो निदिध्यासितव्यः' हे सुप्रसिद्ध वाक्य आले आहे. याज्ञ. च्या नांवावर याज्ञ. स्मृति व्यतिरिक्त तीन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. त्यांपैकी कोणत्या ग्रंथाचा याज्ञ. स्मृतीमध्ये उल्लेख केला आहे हे वादग्रस्त आहे. ते ग्रंथ म्हणजे वृद्धयाज्ञवल्क्य, योगयाज्ञवल्क्य आणि बृहद्योगयाज्ञवल्क्य हे होत.

योगवासिष्ठ हा ३२००० श्लोकांचा विस्तृत ग्रंथ आहे. त्यांत निरनिराळी मते समाविष्ट केली आहेत. योगवासिष्ठ ह्या ग्रंथाच्या रचनाकाळाविषयी वाद आहे, परंतु प्रस्तुत ग्रंथकाराच्या मते उपलब्ध योगवासिष्ठ हा ग्रंथ इ. स. च्या ११ व्या आणि १३ व्या शतकांच्या दरम्यान रचिला गेला असावा.

योगसूत्र ह्या ग्रंथात आलेले महत्त्वाचे विषय आणि सिद्धांत पुढीलप्रमाणे आहेत :—

योगाची व्याख्या (सूत्र २) मनाचा निरोध करणे अथवा मनावर अथवा मनाच्या व्यापारावर अथवा मनाच्या चंचलत्वावर नियंत्रण घालणे अशी केली आहे. सामान्य व्यवहारात आत्मा हा मनाच्या चलबिचलीचे रूप घेतो असे दिसते परंतु जेव्हा मनाच्या वृत्तीवर स्वामित्व मिळते तेव्हा द्रष्टा अथवा पाहणारा जो आत्मा तो आपल्या स्वतःच्या स्वरूपात राहतो.

योगसूत्राच्या पहिल्या पादामध्ये (सूत्र १९।५१) समाधींचे निरनिराळे प्रकार, त्या प्राप्त करून घेण्याचे निरनिराळे मार्ग योगशास्त्रामध्ये ईश्वराचे स्थान, योगाभ्यास करणाऱ्या व्यक्तीच्या मनाला व्यग्र करणारे व्याधि, ग्लानि, संशय इत्यादि नऊ अंतराय (अडथळे) आणि त्या अंतरायाचे दुःख, मानसिक त्रास इत्यादि विकाररूपी सहकारी, ते अंतराय निवारण कण्याचे उपाय इत्यादि विषयांचे विवेचन केले आहे. दुसऱ्या पादामध्ये ज्याला चित्ताची एकाग्रता साधली आहे अशा मनुष्याला करता येण्यासारखा योग वर्णन केला आहे.

मनाच्या वृत्ती पाच आहेत :— प्रमाण (यथार्थज्ञानाची साधने), विपर्यय (चुकीची कल्पना), विकल्प (कल्पना), निद्रा आणि स्मृति. ह्यांपैकी काही वृत्तींवर क्लेशांचा (अडथळ्यांचा) परिणाम होतो आणि इतरांवर होत नाही, ज्या वृत्तींवर परिणाम होतो त्यांच्यावर स्वामित्व मिळविले पाहिजे आणि ज्यांच्यावर परिणाम होत नाही त्यांचा स्वीकार केला पाहिजे.

वृत्तीचे नियंत्रण करण्याची साधने अभ्यास (पुनःपुनः करणे) आणि वैराग्य (आसक्ति-शून्यता) ही आहेत. पर आणि अपर असे दोन प्रकारचे वैराग्य असते. व्यासभाष्यात म्हटले आहे की ज्ञानाची अंतिम मर्यादा वैराग्य असून कैवल्य हे वैराग्याशी वेगळे करता न येण्यासारखे निगडित असते. ह्या स्थितीला 'धर्म—मेघ-समाधि' म्हणतात असें वाचस्पतीने म्हटले आहे.

समाधीचे संप्रज्ञात अथवा सालंबन समाधि आणि असंप्रज्ञात समाधि असे दोन प्रकार आहेत. संप्रज्ञात (जाणीवपूर्वक) समाधीचे चार प्रकार अथवा चार टप्पे असतात : सवितर्क, सविचार, सानंद आणि सास्मित. ह्या चार टप्प्यांनी जेव्हा सर्ववृत्ती नाहीशा होतात अशा स्थितीचा वारंवार अनुभव येतो आणि मनामध्ये केवळ उच्च प्रकारच्या भावनाच राहतात त्यावेळी असंप्रज्ञात समाधि प्राप्त होते.

योगसाधन करू इच्छिणाऱ्याने आपल्या स्वतःच्या प्रयत्नावर आणि अभ्यासावर अवलंबून राहण्यास पतंजलीने सांगितले आहे. ईश्वरी कृपेचा येथपर्यंत कोठेही उल्लेख केलेला नाही. ह्यावरून असे सिद्ध होते की कोणाही पुरुषाला अथवा स्त्रीला आणि नास्तिक मताच्या मनुष्यालादेखील योगाचा अभ्यास करता येईल आणि ईश्वराची भक्ति न करता अथवा ईश्वरी प्रसाद झाला नसला तरी असंप्रज्ञात समाधि आणि मोक्ष प्राप्त करून घेता येईल. तथापि पंतजली मानसशास्त्रात प्रवीण असल्याकारणाने त्याला श्रद्धेमुळे होणाऱ्या साहाय्याची जाणीव होती आणि म्हणून त्याने असे सांगितले आहे की जर तुमची ईश्वराच्या ठिकाणी श्रद्धा असेल तर तुम्हाला ईश्वर योगाभ्यासामध्ये साह्य करील आणि त्या दृष्टीने त्याने योगशास्त्रामध्ये ईश्वराला मर्यादित स्थान दिले आहे. त्याने असे म्हटले आहे की ईश्वरप्रणिधाना- (ईश्वरभक्ती) च्या योगाने ईश्वराशी ऐक्यता उत्पन्न होत नाही, परंतु त्याच्या योगाने तोपर्यंत बद्ध असणाऱ्या आत्म्याला ईश्वराची नित्य स्थिति प्राप्त होण्याला साहाय्य होते.

असंप्रज्ञात समाधीमध्ये अथवा बीजरहित समाधीमध्ये सांगितलेली मनाची स्थिती आपण होऊनच निवृत्त होते आणि योग्याचे मन स्वतःच्या ठिकाणी स्थिर होते, आपल्या स्वतःच्या तेजाने प्रकाशू लागते. त्यावेळी योग्याला शुद्ध, केवल आणि मुक्त असे म्हणतात.

**योगसूत्राच्या २ ऱ्या** पादामध्ये ज्यांच्या चित्ताला एकाग्रतेची संवय नाही आणि ते अस्वस्थ, व्यथित असूनही ज्या मनुष्यांना योगाचे तंत्र शिकण्याची इच्छा असेल त्यांनी कोणत्या मार्गाने जावे ह्याचे विवेचन केले आहे. आधुनिक काळचे भारतीय अथवा पाश्चात्य साधक ह्यांच्या दृष्टीने योगसूत्रामधील दुसरा पाद अत्यंत महत्त्वाचा आहे आणि त्या पादांतील शिकवणीचा धर्मशास्त्रावरील ग्रंथांवर अतिशय परिणाम झालेला आहे. योगाची मूलभूत कल्पना अशी आहे की व्यक्तिगत आत्मा हा सत्य, नित्य आणि शुद्ध असतो परंतु तो ह्या भौतिक जगामध्ये गुंतून पडलेला असतो आणि स्वतः नित्य असूनही अनित्य वस्तूंच्या मागे लागलेला असतो. आत्म्याची अविद्येपासून आणि गुणांपासून सुटका करणे आणि आपल्या शुद्ध स्वरूपाची प्राप्ती करून घेणे हे मनुष्याने साध्य करून घ्यावयाचे ध्येय असते आणि ते ध्येय प्राप्त करून घेण्याकरिता योगसूत्रांमध्ये कडक साधना सांगितली आहे. पतंजली आणि फ्रूडसारख्या पाश्चात्य मानसशास्त्रज्ञांमध्ये दोन महत्वाचे भेद

आहेत : पतंजलीने आत्म्याच्या स्वातंत्र्याला आणि बंधमुक्तीला जास्त महत्त्व दिले असून साधन म्हणून मनाच्या व्यापारांवर नियंत्रण सांगितले आहे. आधुनिक मानसशास्त्रज्ञ मनाचे नियंत्रण करण्याच्या विरुद्ध असतात; दुसरा भेद म्हणजे आधुनिक शास्त्रज्ञ कर्म आणि पुनर्जन्म ह्यांचा विचार करीत नाहीत, परंतु पतंजलीचा त्या सिद्धान्तावर पूर्ण विश्वास होता.

योग साधण्याकरिता करावयाच्या प्राथमिक क्रिया अथवा साधना तप, स्वाध्याय, आणि ईश्वरप्रणिधान ह्या आहेत आणि त्या केल्या म्हणजे समाधी लागते आणि अविद्या, अस्मिता, राग (सुखासक्ती) द्वेष, आणि अभिनिवेश (जगण्याची इच्छा) हे पांच क्लेश कमी होतात.

योगाची [यमनियमासन-प्राणायाम-प्रत्याहार-धारणा-ध्यान-समाधयोष्टावङ्गानि।
– योगसूत्र (२·२९)] अंगे आठ आहेत : यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधि (यो. सू. २·२९). ह्यांतील पहिली पांच समाधीला अप्रत्यक्ष रीतीने साह्य करतात म्हणून त्यांना बहिरंग साधने म्हणतात आणि धारणा, ध्यान आणि समाधि ह्यांना अंतरंग साधने म्हणतात. (यो. सू. ३·७) योगाच्या अंगांच्या योगाने जेव्हा मल धुऊन जातात तेव्हा ज्ञानाचा प्रकाश अधिकाधिक पडू लागतो आणि शेवटी विवेचक ज्ञान पूर्णत्वाला पोचते. दुसऱ्या पादांतील बहिरंग साधनांसंबंधीच्या सूत्रांना धर्मशास्त्रावरील ग्रंथांत विशेष महत्त्व दिलेले असते.

गोरक्षसंहितेसारख्या काही ग्रंथांत योगाची अंगे ६ च सांगितलेली असून यम, नियम अथवा दुसरी काही अंगे गाळलेली असतात.

**यम** पांच आहेत : (यो. सू. २·३०।३१) अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह. ह्यांचे कडक रीतीने पालन करणे ह्याला 'महाव्रत अशी संज्ञा असून योग्यांनी ते यम अपवाद न करिता सर्व अवस्थांमध्ये पालन केले पाहिजेत.

**नियम** पांच आहेत : (यो. सू. २·३२) शौच, संतोष, तप, स्वाध्याय, ईश्वरप्रणिधान. ह्यातील शेवटल्या तीन नियमांमिळून **क्रियायोग** होतो.

यम ही दुसऱ्याशी संबंध येणारी आणि निषेधाच्या स्वरूपाची कृत्ये आहेत आणि नियम ही स्वतःशी संबंध असलेली विधिपर कृत्ये असतात. यम आणि नियम ह्यांच्या पालनाने निरनिराळ्या सिद्धि (विशेष सामर्थ्ये) प्राप्त होतात. (यो. सू. २·३५।४५).

**आसनाची** व्याख्या योगसूत्रामध्ये (यो. सू·२·४६।४८) 'स्थिर आणि सुखदायक अशी स्थिति' अशी केली आहे. गीतेसारख्या ग्रंथांत (६·११) आसन म्हणजे दर्भ, मृगचर्म आदींनी आच्छादलेली बसावयाची जागा असे वर्णन केले आहे. ह्यावरून योगाभ्यासात विशिष्ट जागेची आवश्यकता नसून योगसाधना करणाऱ्याला कोणतीही सहज करता येण्यासारखी स्थिर आणि सुखकारक शरीराची अवस्था स्वीकारली तरी पुरे होते असे ध्वनित होते.

हठयोगामध्ये सांगितलेल्या मयूरासन, कुक्कुटासन, ह्यांच्या सारख्या आसनांच्या योगाने रोगांचे निर्मूलन होते असे सांगितले आहे.

वास्तविक रीतीने योगाच्यां दोनच प्रमुख पद्धती आहेत : पतंजलीकृत योगसूत्र आणि त्यावरील व्यासभाष्य यांत प्रतिपादन केलेली पद्धति आणि दुसरी गोरक्षशतक, स्वात्मारामयोगिन् कृत हठयोगप्रदीपिका आणि त्यावरील ब्रह्मानंदकृत ज्योस्ना नावाची टीका यात प्रतिपादन केलेली पद्धति. ह्या दोन पद्धतीमधील भेद असा आहे की पतंजलीच्या योगपद्धतीत सर्व प्रयत्न मनाच्या नियंत्रणाकडे लावलेले असतात आणि हठयोगात शरीर, शरीराचे आरोग्य, शरीराची शुद्धता आणि रोगांपासून मुक्तता ह्यांच्याकडे लक्ष पुरविलेले असते. गोरक्षसंहिता आदि हठयोगावरील ग्रंथांत आसन आणि प्राणायाम ह्यांचा मुख्य उद्देश कुंडलिनी जागृत करून तिला निरनिराळ्या चक्रामधून सुषुम्ना नाडीद्वाराने ब्रह्मद्वारापर्यंत नेणे हा असल्याचे सांगितले असते. योगसूत्रामध्ये चक्रे आणि नाडी ह्यांचा क्वचितच उल्लेख केला आहे. कुंडलिनी ही मनुष्याच्या शरीरामधील महत्त्वाची शक्ति असून ती पाठीच्या कण्याच्या बुडाशी एखाद्या सर्पाप्रमाणे वेटोळी घालून निद्रिस्त असते. कुंडलिनी जागृत करण्याचा प्रयत्न करणे हा एक भयंकर प्रयोग असतो. छांदो० (८·६·६) आणि कठ (६·१६) उपनिषदात म्हटले आहे की हृदयामध्ये १०१ नाड्या असून त्यातील एक मस्तकाला (टाळूला) भेदून जाते आणि त्या नाडीच्या द्वारा प्राण वर नेल्यास अमरत्वाची प्राप्ती होते.

आसने दोन प्रकारची असून त्यातील स्वस्तिक, पद्म, सिद्ध ह्यांच्यासारखी आसने प्राणायाम, ध्यान आणि समाधी ह्यांना उपयुक्त असतात आणि शीर्षासन, सर्वांगासन ह्यांच्यासारखी आसने रोग बरे करण्याकरिता आणि शारीरिक बल संपादन करण्याकरिता उपयुक्त असतात.

**प्राणायाम**. फार प्राचीन काळापासून धर्मशास्त्रावरील ग्रंथांत योगाच्या ह्या अंगाचा सर्वांत अधिक प्रमाणात उल्लेख केला आहे. प्राणायाम ह्याचा अक्षरशः अर्थ 'प्राणांचे नियंत्रण अथवा प्राणाला विश्रांती' असा आहे.'अन्'= श्वासोच्छ्वास करणे ह्या धातूला प्र उपसर्ग लागून प्राण हा शब्द झाला आहे. ऋग्वेदात (१·६६·१, ३·५३·२१।३०) अनेक ठिकाणी प्राण शब्दाचा अर्थ 'श्वास' एवढाच असतो. तै. सं. मध्ये (१·६·३·३) पाच प्राणांची नावें आली आहेत. उपनिषदात प्राण हा जीवाची मुख्य शक्ति अथवा तत्त्व मानले असून तो ब्रह्माचे प्रतीक समजला गेला आहे. (बृ. उप. ६·६·३) प्राणायामामध्ये पाच प्राणांपैकी 'प्राण' आणि 'अपान' ह्या दोहोचा विशेष संबंध येतो. ह्या दोन शब्दांच्या अर्थाविषयी मतभेद आहे परंतु प्राण ह्याचा अर्थ श्वास घेणे अथवा 'हृदयस्थ वायु' आणि अपान ह्याचा अर्थ 'उदरस्थवायु' असा पूर्वीच्या काळी होता आणि सध्याही तसाच आहे. शंकराचार्यांनी बृह. उप. (१·५·३) वरील भाष्यात म्हटले आहे की "प्राण हा हृदयाचा व्यापार असून तो मुख आणि नासिका ह्यांच्या प्रदेशात संचार करतो आणि त्याला पुढे नेण्यात येत असते म्हणून त्याला प्राण म्हणतात; अपान ही अधोबाजूला जाणारी गती असून तो नाभीपासून सुरू होतो आणि मल आणि मूत्र बाहेर टाकतो म्हणून त्याला अपान म्हणतात."

प्राणायाम हा शब्द कोणत्याही प्रमुख उपनिषदात आलेला नाही. तो आप. ध. सू. सारख्या सूत्रग्रंथांत अनेक वेळा आला आहे आणि त्यात आलेल्या उल्लेखांवरून सूत्रांच्या रचनाकाळी (ख्रि. पू. अनेक शतके) प्राणायाम हे योगाचे एक अंग असल्याचीं कल्पना उत्पन्न झालेली नसावी आणि तो एक स्वतंत्र धार्मिकविधि असावा असे वाटते. अवश्य मानलेली कृत्ये न करणे आणि निषिद्ध कृत्ये करणे ह्यांच्यामुळे उत्पन्न होणाऱ्या दोषांचे निवारण करणारा प्राणायाम हा एक प्रायश्चित्तासारखा विधि समजला जात असावा असे वाटते.

योगसूत्रात (१·३४) प्राणायामाची व्याख्या पुढीलप्रमाणे दिली आहे : "आसनाची स्थिती निश्चितपणे

येऊ लागली म्हणजे प्राणायाम ही श्वास आणि उच्छ्वास ह्यांच्या गतीतील विश्रांति असतें." प्राणायामामधील प्रमुख अंगे श्वास (शरीराच्या बाहेर असलेली हवा आत ओढून घेणे) आणि उच्छ्वास (शरीरातील अथवा छातीमधील हवा बाहेर सोडून देणे) ह्या असतात. ह्या दोन्ही क्रियांचा अभाव ह्याला योगाच्या परिभाषेत कुंभक म्हणतात. पतंजली अथवा व्यासभाष्य ह्यापैकी एकाही ग्रंथात पूरक, रेचक आणि कुंभक हे सुपरिचित शब्द वापरले नसून श्वास, प्रश्वास आणि गतिविच्छेद हे शब्द योजले आहेत. तथापि त्या शब्दांचा उल्लेख देवल ध. सूत्र (अपरार्क पा. १०२३), बृहद् योगी याज्ञ. ह्यांच्यासारख्या ग्रंथांत केला असल्याकारणाने ते शब्दही बऱ्याच प्राचीन काळचे असल्याचे मानले पाहिजे.

प्राणायाम करावयाच्या अनेक पद्धती आहेत. त्यांत सर्वांत सोपी पद्धती पुढीलप्रमाणे आहे : उजवी नाकपुडी आंगठ्याने बंद करून बाहेरची हवा स्वतःच्या शक्तीप्रमाणे डाव्या नाकपुडीने ओढून घ्यावी, नंतर ती हवा उजव्या नाकपुडी द्वारा सोडून द्यावी; पुन्हा उजव्या नाकपुडीने हवा ओढून घ्यावी आणि डाव्या नाकपुडी द्वारा सोडून द्यावी; आणि हा प्रकार निदान तीन वेळा करावा. अशा प्रकारचा अभ्यास दिवसातून निदान दोन अथवा चार वेळा करावा.

योगसूत्रात (२·५२।५३) म्हटले आहे की प्राणायामाच्या अभ्यासाने (सत्वगुण विशिष्ट) प्रकाशावरील आवरण (अथवा क्लेश) क्षीण होते आणि योग्याचे मन धारणेला योग्य होते. गोरक्षशतकात (५४) सांगितले आहे की योगी आसनांच्या योगाने रोगांचा नाश करतो, प्राणायामाच्या योगाने पातकांचा नाश करतो आणि प्रत्याहाराने मनोविकारांचा नाश करतो.

प्राणायामामध्ये पूरक, रेचक आणि कुंभक हे कोणत्या अनुक्रमाने करावयाचे ह्या दृष्टीने प्राणायामाचे बाह्य, अंतर्गत आणि दाबलेला असे तीन प्रकार आहेत. रेचक, पूरक आणि कुंभक ह्यांच्या कालमर्यादा सर्वसाधारणपणे १:४:२ अथवा १:२:२ अथवा तीनही समप्रमाणात असाव्या. हठयोगप्रदीप (२·४४) मध्ये प्राणायामाचे आठ प्रकार सांगितले आहेत आणि त्यांतील उज्ज्ञापी आणि भस्त्रिका हे दोन अतिशय महत्वाचे आहेत.

**प्रत्याहार**. "ज्यावेळी (मनाचे नियंत्रण केल्याकारणाने) इंद्रियांचा विषयोपभोगाशी संबंध येत नाही अथवा जेव्हा इंद्रिये विषयांपासून परावृत्त करण्यात येतात आणि असे झाल्यामुळे इंद्रिये मनाच्या स्थितीसारखी होतात तेव्हा त्या स्थितीला प्रत्याहार म्हणतात" अशी व्याख्या यो. सू. (२·५४) मध्ये दिली आहे.

**तिसऱ्या पादाला** विभूतिपाद असे नाव आहे. त्यात योग्याच्या सामान्य मनुष्यापेक्षा जास्त आणि भिन्न अशा सामर्थ्याविषयी विवेचन केले आहे. ह्या पादात पहिल्याने योगाच्या शेवटल्या तीन म्हणजे धारणा, ध्यान आणि समाधि ह्या अंगांचे विवेचन केले आहे. ही तीन अंगे संप्रज्ञात समाधीच्या दृष्टीने अंतरंग असतात परंतु निर्बीज समाधीच्या दृष्टीने ती बहिरंगच असतात. ही तीनही अंगे जेव्हा एकाच ध्येयावर करण्यात येतात तेव्हा त्यांना संयम अशी पारिभाषिक संज्ञा आहे. निरनिराळ्या संयमांपासून विभूति उत्पन्न होतात. विभूति म्हणजे असामान्य शक्ति.

धारणा, ध्यान आणि समाधि ही योगाची प्रत्यक्ष अंगे असून त्या एका पुढील एक अशा अभ्यासाच्या तीन अवस्था आहेत.

**धारणा**. धारणा म्हणजे मन एखाद्या विवक्षित ठिकाणी अथवा वस्तूवर दृढ धरणे. (यो. सू. ३·१२) शरीर, इंद्रिये, मन, बुद्धि आणि आत्मा (अहंकार) ह्यांना ताब्यात ठेवणे म्हणजे धारणा अशी व्याख्या देवलाने (अपरार्क पा १०२५) दिली आहे. स्वतःची नाभी, हृदय, मस्तक, डोळ्यातील तेज, नासिकाग्र, जिभेचे अग्र ह्यांच्यासारख्या एखाद्या स्थळावर अथवा देवाच्या मूर्तीसारख्या बाह्य वस्तूवर मन दृढ धरून ठेवणे ह्याला धारणा म्हणतात असे भाष्यात सांगितले आहे. ह्या अवस्थेमध्ये ध्यान धरणारा, ध्येय आणि ध्यानाची क्रिया-अशी त्रिपुटी अस्तित्वात असते.

**ध्यान**. ह्या अवस्थेमध्ये ध्येयाचे एकाग्रतेने आणि अव्यग्रतेने आकलन करावयाचे असते. उपनि. मध्ये ध्यानाची आवश्यकता सांगितली आहे. 'आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः' (बृह. उप. २·४·५). ध्यान हे सगुण अथवा निर्गुण असे दोन प्रकारचे असते. ध्यानाच्या अवस्थेमध्ये ध्यान धरणारा आणि ध्येय हे द्वंद्वच फक्त अस्तित्वात असते आणि ध्येयाच्या ठिकाणी मन स्थिर करून ठेवण्याच्या प्रयत्नाची जाणीव नसते.

**समाधि**. ध्यानामध्ये ज्यावेळी ध्येय वस्तु प्रकाशू लागते आणि ध्येयाहून भिन्न अशी ध्यानाची जाणीव नाहीशी झाल्यामुळे ध्यानाचे स्वतःचे रूपच जणू काय रिकामे होते त्यावेळी ते ध्यानच समाधि होते. (यो. सू. ३-३, ४, ८) ध्यान धरल्यानंतर [तदेवार्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधिः। त्रयमेकत्र संयमः। तदपि बहिरङ्गं निर्बीजस्य।

– योगसूत्र (३·३·४–८).] काही एका मर्यादेनंतर ध्येय वस्तूच काय ती दिसू लागते आणि आपण ध्यान करीत आहो ही जाणीव नाहीशी होते. ह्या स्थितीचे यो. सू. (३·३) मध्ये 'स्वरूप-शून्यमिव' असे वर्णन केले आहे. हठयोगप्रदीपिकेत (४·७) म्हटले आहे की "ज्या स्थितीमध्ये जीवात्मा आणि परमात्मा ह्या दोघामध्ये ऐक्य असते आणि मनाचे सर्व संकल्प नाश पावतात त्या स्थितीला समाधि म्हणतात."

संप्रज्ञात समाधीचे सवितर्क, निर्वितर्क, सविचार आणि निर्विचार असे चार प्रकार आहेत. सबीज अथवा सविकल्प आणि निर्बीज अथवा निर्विकल्प असेही समाधीचे प्रकार आहेत. समाधि हा शब्द कोणत्याही प्राचीन उपनिषदात आलेला नाही. धारणा, ध्यान आणि समाधि ह्या अवस्थांत मानसिक स्थितीला विशेष महत्त्व असते.

ध्यान, धारणा आणि समाधी ह्यांचा योगी जेव्हा अभ्यास करीत असतो तेव्हा काही अतिमानुषशक्ति अथवा सिद्धी त्याला प्राप्त होतात. अशा शक्तींकडे योग्याने दुर्लक्ष्य करावे कारण त्यांच्या योगाने अंतिम ध्येय प्राप्तीला अडथळा येत असतो असे यो. सू. (३·३६) मध्ये सांगितले आहे. परंतु बहुतेक योगी अशा सिद्धींची प्राप्ती होणे हा योगाचा महत्वाचा भाग मानतात. यो. सू. मधील १९५ सूत्रांतील ३५ सूत्रे ह्या सिद्धींच्या वर्णनाला दिली आहेत ह्यावरून सिद्धींची प्राप्ती हा योगाचा एक महत्वाचा भाग आहे असे म्हटल्याशिवाय राहवत नाही.

**जन्म**, [जन्मौषधिमन्त्रतपःसमाधिजाः सिद्धयः।

– यो. सू (४·१).] औषधी, मंत्र, तप आणि समाधी ह्या पांच मार्गांनी सिद्धी प्राप्त होतात असे यो. सू. (४·१) मध्ये सांगितले आहे. आणि ह्या पांचांपैकी प्रत्येक मार्ग त्याच्या पूर्वीच्या मार्गापेक्षा अधिक श्रेयस्कर असतो.

देवल धर्मसूत्र, (कल्पतरु-मोक्ष पा. २१६।२१७), याज्ञ-स्मृति, (३·२०२।२०३) कल्पतरू, इत्यादि ग्रंथांत सिद्धींची विस्तृत विवेचने केली आहेत.

मंत्रांमध्ये परिणामकारक शक्ति कशी उत्पन्न होते ह्याबद्दल निरनिराळ्या उपपत्या उपलब्ध आहेत.

**यो. सू. च्या चौथ्या पादामध्ये** कैवल्याचे वर्णन केले आहे.

ज्या योग्याने समाधीपर्यंतच्या सर्व साधनांचा अभ्यास केलेला असतो आणि ज्याला पुरुष आणि सत्त्वादिगुण ह्यांच्यामधील भेदाचे पूर्ण ज्ञान झालेले असते, तो त्या तीन गुणांच्या वंधनांपासून मुक्त होतो, कारण ते गुण आत्म्यासंबंधी आपले कार्य केल्यानंतर प्रधानामध्ये विलीन होतात; त्या स्थितीला **कैवल्य** म्हणतात अथवा ज्या स्थितीमध्ये चिच्छक्ति (जाणीव देणारे तत्त्व) सत्वादिगुणांशी संबंध न येता केवळ आपल्याच रूपाने अस्तित्वात राहते, त्या स्थितीला कैवल्य म्हणतात. (यो. सू. ४·३४) ज्यावेळी सारासार विचाराने अविद्येचे (अज्ञानाचे) निरसन केले जाते आणि साक्षी असणाऱ्या आत्म्याचा गुणांशी संबंध सुटतो त्या स्थितीला कैवल्य म्हणतात. (यो. सू. २·२४।२५) उपनि. मध्ये म्हटले आहे की अशा स्थितीत मुक्त झालेल्या आत्म्याला सुख नसते अथवा दुःखही नसते, कारण तो योगी शरीरच मी आहे ह्या अवस्थेहून वर गेलेला असतो. (छां. उप. ८·१२·१; कठ २·१२).

योग्याचे ध्येय जीवन्मुक्ति म्हणजे आयुष्याचा आणि व्यक्तित्वाचा त्याग करणे (आणि जरी काही काळपर्यंत शरीर अस्तित्वात राहिले तरी जगाच्या दृष्टीने मरण पावणे) हे आहे.

योगाच्या आठ अंगांचे वर्णन कमी अधिक प्रमाणात अनेक पुराणांत केले आहे. (अग्नि २१४।२१५, ३७२।३७६ इ.) निरनिराळ्या पाश्चात्य विद्वानांनीही भारतीय योगपद्धतीचे महत्त्व वर्णन केले आहे. योगाचा अभ्यास करणारी व्यक्ति अत्यंत सुखी होते आणि त्याची प्रसन्नता त्याच्या सहवासातील इतरांनाही प्रसन्न करते असे डॉ. बेहनन याने म्हटले आहे. त्याने योगाचा स्वतः अनुभव घेतला होता आणि स्वतःवर प्रयोग केले होते.

योगाचा अभ्यास करणारी व्यक्ति अधिकाधिक उच्च आध्यात्मिक पायरीवर जात असल्याची लक्षणे त्याच्या स्वतःच्या ठिकाणी दिसू लागतात. अशा लक्षणांचे वर्णन श्वेता. उप. (२·११), वायु (११·६३), मार्कण्डेय (३६·६३) इत्यादि ग्रंथांत केली आहेत. उदाहरणार्थ, त्याच्या शरीराला हलकेपणा येतो, आंगाची कांती उजळते, आवाज सुंदर होतो, शरीराला सुखकारक गंध येतो, तो लोकांना आवडू लागतो, थंडी उष्णता ह्यांची पीडा त्याला होत नाही, इतरांची भीति वाटत नाही अशा लक्षणांवरून सिद्धी जवळ आल्याचे समजते.

योगसूत्रे अवघड आहेत आणि त्यात योगाभ्यासाच्या अनक पायऱ्यांचे सांगोपांग विवरण केलेले नाही. अध्यात्म ज्ञान गुप्त राखावे, ते वाटेल त्याला न देता फक्त काही विशिष्ट गुणसंपन्न शिष्यालाच सांगावे अशी अनादि कालापासून चालत आलेली रूढि आहे, त्यामुळेच पतंजलीने असे केले असावे. गीतेंमध्ये देखील अर्जुनाला सांगितलेले सर्व ज्ञान गुह्यांतही गुह्य असल्याचे म्हटले आहे (१८·६३) आणि ते तपस्वी नसलेल्या, भक्ति नसलेल्या, गुरुशुश्रूषा न केलेल्या शिष्याला देऊ नये असे सांगितले आहे. (१८·६४।६५)

प्राचीन काळी हा नियम केवळ अध्यात्मज्ञानापुरताच मर्यादित नसून भारतात तो इतर विद्यांच्या बाबतीत देखील लावण्यात येत असे. (निरुक्त २·३).

भारतात अनेक शतकांपासून संन्यासी आणि योगी ह्यांना अतिशय मान देण्यात आला आहे. श्राद्धामध्ये बोलाविलेला एक योगी शेकडो आणि हजारो ब्राह्मणांच्या योग्यतेचा असतो असे धर्मशास्त्रावरील ग्रंथांत सांगितले आहे. तसेच धर्मासंबंधी संशय उत्पन्न झाल्यास त्याचा निर्णय देण्यातही त्याला फार महत्त्वाचा मानला आहे. (याज्ञ १·९ इ.) यथार्थ आत्मज्ञानाला स्मृतींनी फार महत्व दिले आहे. योगाच्या साहाय्याने आत्मदर्शन प्राप्त करून घेणे हा सर्वश्रेष्ठ धर्म असल्याचे याज्ञ० स्मृतीमध्ये (१·८) म्हटले आहे. ज्यांनी योगमार्गाचे अवलंबन केले आहे असे अनेक थोर पुरुष भारतात आजपर्यंतच्या हजारो वर्षाच्या काळात होऊन गेले आहेत. योगाच्या साहाय्याने त्यांना हवी असणारी आत्म्याची अविद्येपासून आणि जन्म-मरणाच्या बंधनातून मुक्ति प्राप्त झाली होती. योगमार्ग अत्यंत बिकट असल्याचे फार प्राचीन काळापासून सांगितले आहे. शांतिपर्वात (२८९·५० आणि ५४) म्हटले आहे की वस्तऱ्याच्या तीक्ष्ण धारेवर देखील उभे राहणे सोपे असू शकेल परंतु ज्यांचे आत्मे शुद्ध झालेले नसतील त्यांना धारणेचा सतत अभ्यास करणे दुःखदायक आणि अवघड वाटेल. बहुसंख्य पुरुष आणि स्त्रिया ह्यांना पातंजल योग अथवा अद्वैत वेदान्त हे दोनही मार्ग अनुसरणे आणि त्यांची अंतिम ध्येये प्राप्त करून घेणे बहुतेक अशक्य आणि अप्राप्य असते. कर्मयोगाचा (शास्त्रात सांगितल्याप्रमाणे सत्कृत्ये फलाची आसक्ती न धरता करणे) आणि भक्तियोगाचा मार्ग सामान्य व्यवहारी जीवांना अधिक सोईचा आणि आचरता येण्यासारखा वाटतो. गीतेमध्ये (१३·१३।१८) म्हटले आहे की देव हा सर्व सृष्टी व्यापून राहणारा आणि सर्वांच्या अंतर्यामी भरलेला असतो आणि देवाचा जो भक्त हे सर्व जाणतो तो देवाच्या स्वरूपाला प्राप्त होतो.

# प्रकरण ३३

## तर्क आणि धर्मशास्त्र

(मू. ग्रं. पा. ५।१४६८-१४८२)

याज्ञवल्क्य स्मृती- (१·३) मध्ये चौदा विद्यांमध्ये **न्यायाचा** समावेश केला असून धर्म काय हे समजण्याच्या साधनांपैकी न्याय हे एक साधन असल्याचे सांगितले आहे. ह्या ठिकाणी ‘न्याय’ ह्याचा अर्थ ‘तर्कविद्या’ असा असल्याचे मिताक्षरेत म्हटले आहे. न्यायसूत्र (१·१·१) आणि कणादाचे वैशेषिक [अथातो धर्म व्याख्यास्यामः। यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धि स धर्मः।

वैशेषिकसूत्र (१·१·२)] सूत्र (१·१·२ आणि ४) ह्या दोन्ही ग्रंथात त्या दर्शनांचे सांगोपांग ज्ञान झाल्याने निःश्रेयसाची प्राप्ती होते असे गृहीत धरले आहे.

‘तर्क’ ह्या शब्दाचा अतिशय प्राचीन काळचा उल्लेख कठ उपनिषदांत (२·९) आला आहे. त्यात असे म्हटले आहे की आत्म्याविषयीचे ज्ञान केवळ तर्काने मिळविता येणार नाही. तर्क हे योगाचे एक अंग असल्याचे मैत्रायणी उप. (२·१८) मध्ये सांगितले आहे. मनूने (१२·१०५।१०६) म्हटले आहे की जो मनुष्य वेदांचा आणि स्मृतीत सांगितलेल्या धर्मसंबंधी नियमांचा वेदशास्त्राशी विरोध नसणाऱ्या तर्काच्या साह्याने विचार करतो त्यालाच धर्म काय हे समजते. जुन्या काळच्या बहुतेक संस्कृत ग्रंथकारांची तर्काच्या बाबतीत अशीच दृष्टि आहे. त्यांच्यामते जर केवळ तर्कावर विश्वास ठेवला तर त्यापासून अनिश्चितपणा आणि अव्यवस्था निर्माण होईल. ईश्वराचे आणि आत्म्याचे अस्तित्व, मनुष्याच्या मृत्यूनंतर काय होते, ह्यांच्यासारख्या अनेक महत्वाच्या बाबतीत समाजातील सर्व लोकांना अथवा बहुतेक लोकांना मान्य होतील अशी उत्तरे केवळ तर्काच्या आधारावर देता येणे शक्य नाही, वेद आणि स्मृति ह्यांच्यामध्ये सहस्रावधी वर्षांच्या काळात श्रेष्ठ आणि निःस्वार्थी आणि सूज्ञ ऋषींनी केलेल्या विचारांचा आणि त्यांना जीवनातील सर्व अवस्थांसंबंधी आलेल्या अनुभवांचा समावेश झालेला असल्यामुळे आधुनिक काळच्या एक अथवा अनेक व्यक्तींनीं ठरविलेली आणि वेदांतील मतांच्या विरुद्ध असलेली मते स्वीकारावयास बहुतेक लोक तयार होत नाहीत.

सनातनी मताच्या लोकांची विचारसरणी अशी असली तरीदेखील वेदामध्ये सांगितलेल्या आधारांचा आणि रूढींचा लोकमताच्या जोरावर वेळोवेळी त्याग करावा लागला आहे. स्मृतिकारांनी स्वतःच सांगितले आहे की शास्त्रातील शब्दांचे अंधविश्वासाने अनुकरण केल्यास धर्माचा नाश होईल आणि दोन स्मृतीत मतभेद असतील तेथे **तर्काचा**, लोकमताचा आणि रूढींचा विचार करावा. शंकराचार्य आणि इतर भारतीय थोर ग्रंथकारांनी तर्काचा सर्वस्वी त्याग करावा असे सांगितले नसून एक अथवा अनेक लोकांनी तर्काच्या आधारावर काढलेले निष्कर्ष जर वेद आणि स्मृतिवचनांच्या विरुद्ध असतील तर सर्वसाधारणपणे अशा निष्कर्षाचे अनुकरण करू नये असे सांगितले आहे. (वे. सू. २·१·१ वरील शांकरभाष्य) बुद्धधर्मीय आणि जैन ह्यांना पाखांडी मानले आहे ह्याचे कारण त्यांनी तर्काचा आश्रय केला हे नसून त्यांनी वेदाचा आणि पवित्र परंपरांचा अधिकार अमान्य केला हे होय. वेदांना प्रमाण मानणे आणि पवित्र परंपरा पाळणे ह्या मर्यादा उल्लंघन न करता देखील अनेक प्रकारच्या आणि अतिशय घोटाळ्याच्या मतांना, विधींना आणि सनातनी म्हटल्या जाणाऱ्या रीतिरिवाजांना हिंदु धर्मात भरपूर वाव आहे. उपनिषदांनी यज्ञामधील काही विधींचा उपहास केला असला तरीदेखील उपनिषदांना वेदान्त म्हणतात आणि वेदप्रणीत धर्माचे आणि वैदिक वाङ्मयाचे सर्वोच्च टोक असल्याचे मानतात.

प्राचीन काळापासन चालत आलेल्या तत्त्वज्ञान विषयासंबंधीच्या वादग्रस्त मुद्यांपैकी ग्रंथप्रामाण्य आणि तर्क अथवा श्रद्धा आणि तर्क ह्यांच्यामधील झगडा हा एक मुद्दा आहे, प्राचीन काळी आणि मध्ययुगीन काळात देखील स्वतंत्र मतवादी लोक अस्तित्वात होते आणि ईश्वराचे अस्तित्व, जीवात्म्याचे अस्तित्व इत्यादि विषयांवरील तर्काच्या आधारावर त्यांनी प्रकट केलेली मते प्राचीन ग्रंथात दिली आहेत. त्यांनी ईश्वराचे अस्तित्व अमान्य केले आहे, विश्वामध्ये मानवी बुद्धीपेक्षा अधिक श्रेष्ठ बुद्धि असल्याचे ते मान्य करीत नाहीत ह्याच्या उलट आत्मज्ञानाच्या अथवा ईश्वराच्या बाबतीत आपल्यापेक्षा अधिक अधिकारी अथवा अधिक योग्यतेच्या व्यक्तीवर विश्वास ठेवावा असे बहुतेक लोकांना वाटते कारण अशा प्रश्नांवर समंजसपणाने साधकबाधक रीतीने आपला आपण विचार करण्याइतकी फुरसत अथवा आवड अथवा बौद्धिक पात्रता बहुतेक लोकांपाशी नसते, अथवा दुसऱ्याही काही परिस्थितीमुळे असा विचार करणे त्यांना शक्य .होत नाही. आपल्यापेक्षा श्रेष्ट असणाऱ्या आणि दुसऱ्यांना मार्गदर्शन करू शकणाऱ्या आणि त्या मार्गदर्शनाच्या विरुद्ध वर्तन करणाऱ्यांना शासन करणाऱ्या अशा कोणावर तरी व्यक्तिशः प्रत्येक मनुष्य अवलंबून राहतो आणि इतक्याच बाबतीत स्वतंत्र मतवादी आणि आस्तिक मताच्या लोकांचे एकमत होण्यासारखे आहे.

देवाचे आणि जीवात्म्याचे अस्तित्व मानणे ही गोष्ट लक्षावधि स्त्रीपुरुष असलेल्या बहुतेक सर्व मानव समाजाच्या हिताची आहे असे प्रस्तुत ग्रंथकाराचे मत आहे. सद्‌गुणांच्या आणि न्यायाच्या मार्गाने चालण्याची प्रवृती बहुतेक लोकांना देवाच्या भीतीमुळे, सदसद्‌विवेकबुद्धीच्या टोचणीने, लोकमताच्या भीतीमुळे आणि राज्यकर्त्याकडून शासन होईल ह्या भीतीमुळे होत असते. स्वतंत्र मताचे लोक व्यक्तीपेक्षा समाज श्रेष्ठ असल्याचे मानतात आणि अशा रीतीने ईश्वराच्या जागी समाजाची उपासना अस्तित्वात आली. मानवी ध्येय काय असावे ह्याविषयी परस्पर विरोधी दोन गट सांप्रतकाळी अस्तित्वात आहेत आणि ह्या दोहोंपैकी कोणत्याही गटाशी न जोडलेला असा एक तिसरा गट आहे. इंग्लंड, अमेरिका प्रभृति देशांचा समावेश भांडवलशाही गटात होतो आणि रशिया, चीन प्रभृति देशांचा समावेश समाजवादी अथवा कम्युनिस्ट गटात होतो. रशिया, चीन सारख्या समाजवादी गटातील देशांत लोकांना ऐहिक सुखसोई अधिक मिळत असल्या तरी त्यांना भाषणस्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्य व्यवसायाचे स्वातंत्र्य ह्यांच्यासारखी अनेक स्वातंत्र्ये गमवावी लागतात. ह्या गटातील लोकांचा पंथ असहिष्णुतेचा आहे. त्यांची शास्त्रेदेखील वेगळ्या प्रकारची असतात. ख्रिस्ती, मुसलमान ह्या धर्माच्या लोकांत देखील परमताविषयी सहिष्णुता नसते आणि त्यांनी आपली मते इतरांच्या मनावर बिंबविण्याकरिता अनेक शतकेपर्यत धर्मच्छळ आणि रक्तपात करण्यास अनमान केले नाही.

सर्वस्वी लौकिक अथवा ऐहिक सुखाकरिता प्रयत्न करणे ही गोष्ट हिंदु धर्माच्या आणि उच्च प्रकारच्या सर्वही धर्मांच्या उपदेशांच्या आणि ध्येयांच्या विरुद्ध आहे. स्वतंत्रमतवादी लोक सर्व बाबतीत ज्ञान मिळविण्याकरिता विज्ञानात योजलेली पद्धति वापरावी असे म्हणतात. परंतु विज्ञानाचे सिद्धांत काही एका मर्यादेपर्यंत योग्य असले तरी ती मर्यादा फार आकुंचित आहे. मानवी आकांक्षा पुऱ्या करण्याकरिता निसर्गाचा उपयोग कसा करून घ्यावा हे विज्ञान सांगते परंतु मानवी आकांक्षा कोणत्या असाव्या हे विज्ञान सांगत नाही. विज्ञान नीतिनिरपेक्ष असून अध्यात्मविषयाशी त्याचा संबंध नसतो. अंतर्गत बुद्धीने जाणता येण्यासारख्या आणि तर्काने न कळण्यासारख्या अनेक वृत्ती, श्रद्धा आणि प्रेरणा असतात आणि त्या वृत्ती तर्कगम्य वृत्तीहून उच्च असल्याचे लोक मानतात. ह्याकरिता प्रत्येक पिढीतील विचारवंत लोकांनी पूर्वपरंपरा सर्वच अचूक असतात असे न मानता त्यात सारभूत आणि महत्त्वाचा अंश काय आहे हे समजून घेण्याचा

प्रयत्न करावा आणि असा महत्त्वाचा भाग कायम राखून चालू परिस्थितीतील प्रश्नांचा उलगडा होईल अशा प्रकारची तर्कशुद्ध मते प्रतिपादन करावी. वर सांगितल्याप्रमाणे आमच्या स्मृतिकारांनी आणि प्राचीन ग्रंथकारांनी धार्मिक बाबतीत तर्काला स्थान दिले आहे आणि त्यांनी धार्मिक विधींच्या, तत्त्वज्ञानाच्या मतांच्या आणि सामाजिक चालीरीतींच्या बाबतीत अत्याचार न करता आणि धर्मच्छळ न करता फार मोठे फेरबदल घडवून आणले आहेत. आमच्या लोकांनी दीर्घकाळपर्यंत सतत ज्या प्रकारची सहिष्णुता दाखविली तिच्यापेक्षा अधिक तीव्र प्रकारच्या सहिष्णुतेची कल्पना करणे अशक्य आहे. एखादा मनुष्य एकेश्वरवादी, अनेक ईश्वरवादी, मूर्तिपूजक अथवा अज्ञेयवादी असला तरी जोपर्यंत तो वेद आणि सामाजिक परंपरा ह्यांच्या बाबतीत बहुजन समाजाच्या मतांना धरून असेल तोपर्यत तो पूर्णपणे हिंदु असल्याचे मानले जाते. अशा प्रकारच्या सहिष्णुतेमुळे काही दोषही उत्पन्न झाले. धर्मश्रद्धा कमी झाली, आणि धार्मिक विधि आणि तत्त्वज्ञान ह्यांत असंख्य भेद उत्पन्न झाले आणि मोठ्या प्रमाणात अतिरेक होऊन काही अपायकारक आणि किळसवाणे प्रघात आणि रूढि उत्पन्न झाल्या.

काही स्वतंत्रमतवाद्यांनी उपयुक्ततावादाची कल्पना मांडली आहे. त्यांच्या मताने कोणत्याही कृत्यांचा बरेवाईटपणा त्यांच्या परिणामावरून ठरवावयाचा असतो; आणि ज्या कृत्यांच्या योगाने समाजांतील अधिकात अधिक लोकांचे अधिकात अधिक हित अथवा सुख साधते ती कृत्ये चांगली समजावी. ह्या कल्पनेत अनेक मोठे दोष आहेत. तिच्यामागे नैतिक कल्पना नाही, अधिकात अधिक लोक आणि अधिकात अधिक हित हांच्यासंबंधी सर्वाचे एकमत न होण्याचा संभव असतो; सुखाला प्राधान्य दिल्याने विलासांना आणि ऐहिक चैनींना ती पोषक आहे, व्यक्तीने अथवा समाजाने काय करावे हे त्या कल्पनेने कळत नाही.

विचारस्वातंत्र्याचा निषेध न केला तरी स्वतंत्रमताचे अवास्तव देव्हारे माजविणेही योग्य नाही. ईश्वराची सत्ता घालवून द्यावयाची असल्यास तिच्याजागी कोणतीतरी दुसरी सत्ता स्थापन केली पाहिजे आणि ती अशा प्रकारची असली पाहिजे की जिच्यावर विश्वास ठेवून चालू पिढीला आपले श्रमाचे आयुष्य घालविता येईल अथवा स्वार्थाचा होम करता येईल. गीतेमध्ये (३·२६) असा महत्त्वाचा इशारा दिला आहे की ज्ञानी पुरुषांनी अज्ञानी आणि कर्मांमध्ये आसक्त असणाऱ्या लोकांचा बुद्धिभेद न करिता स्वतः सर्व कर्मे योगयुक्तपणे करीत राहून इतरांकडूनही तशीच करवावीत.

गेल्या दोन जागतिक युद्धात सुशिक्षित आणि खिस्तधर्मीय म्हणविणाऱ्या लोकांनी जी रानटी कृत्ये केली त्यामुळे लोकांच्या विचारांत क्रांति उत्पन्न झाली आहे आणि सांप्रत काळच्या अनेक अडचणींचे मूळ धर्मश्रद्धेच्या नाशात असल्याचे लोक प्रतिपादन करू लागले आहेत. परंतु कोणत्या धर्मश्रद्धा आणि कोणते धार्मिक आचार लोकांच्या मनावर बिंबविण्याचे प्रयत्न करावे हा महत्त्वाचा प्रश्न आहे. सर्व प्रकारच्या अडचणींवर धर्म हे एक औषध होऊ शकणार नाही आणि अनेक प्रचलित धर्मातील अनेक आचार आणि मते बऱ्याच जणांना पसंत पडत नाहीत. निरनिराळ्या काळात दया, अहिंसा, सत्य, स्वदेशाभिमान, परोपकार ह्यांच्यासारख्या निरनिराळ्या नैतिक आणि सामाजिक गुणांना महत्त्व देण्यात आले होते. हे सर्वच गुण धर्माच्या योगाने उत्पन्न होत नसून ते निरनिराळ्या परिस्थितीला अनुसरून उत्पन्न होतात. ख्रिस्ती म्हणविणाऱ्या राष्ट्रांनी स्पर्धेलाच ईश्वर मानून तिची उपासना केली आणि तिच्या आधारावर साम्राज्ये वाढविली आणि विपुल धन आणि वैभव मिळविले. महायुद्धात झालेल्या हत्याकांडानंतर आता अनेक थोर लोक-केवळ धार्मिक प्रवृत्तीचेच नव्हे तर निरनिराळ्या राज्याचा कारभार करणारे देखील नैतिक प्रवृत्ती, दयाळूपणा, निःस्वार्थीपणा, आपण उपभोगित असलेल्या सुखसोईचा इतरांना लाभ करून देण्याची इच्छा

इत्यादि सद्‌गुणांचा उपदेश करू लागले आहेत. हे सर्व सद्‌गुण नवीन नसून ते सर्व लोकांनी अवश्य बाळगण्यासारखे असल्याचे बृह. उप. (५·२·१।३) मध्येही सांगितले आहे. तसेच ख्रि. पू. ३ ऱ्या शतकात होऊन गेलेल्या सम्राट अशोकाने आपल्या आज्ञापत्रात सहिष्णुता, माणुसकी, दातृत्व, मूक प्राण्यांबद्दल अनुकंपा इत्यादि नीतितत्त्वांचे पालन करण्याची आज्ञा केली होती.

# विभाग ९

## प्रकरण ३४

### विश्वाच्या उत्पत्तिसंबंधीचे शास्त्र आणि सृष्टिज्ञान

(मू. ग्रं. पा. ५।१४८३-१५२९)

भारतीय धर्मशास्त्रावरील सर्व ग्रंथकार ईश्वराचे अस्तित्व मान्य करतात. ज्याप्रमाणे ख्रिस्ती धर्मशास्त्रावरील ग्रंथकार ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करणारे अनेक कोटिक्रम मांडीत असतात त्याप्रमाणे आमच्याकडील ग्रंथकार ईश्वराच्या अस्तित्वासंबंधी वादविवाद क्वचितच करताना आढळतात.

फार प्राचीन काळापासून विश्वाच्या उत्पत्तीच्या बाबतीत दोन प्रमुख सिद्धान्त अस्तित्वात आहेत. कोणाच्या मते सर्व विश्वाचे उत्पादक प्रथम कारण हे सर्व विश्वाला व्यापून असते आणि कोणाच्या मते विश्वाचा उत्पत्तिकर्ता ईश्वर असून तो विश्वापेक्षा श्रेष्ठ असतो. बहुतेक सर्व तत्त्वज्ञानी लोक ह्या दोहोपैकीं कोणता तरी एक सिद्धान्त मान्य करतात. ऋग्वेद आणि उपनिषदे ह्यांनी ह्या दोहोपैकी पहिला सिद्धान्त गृहीत धरल्यासारखे दिसते.

वेदांच्या आणि उपनिषदांच्या काळी विश्वाची उत्पत्ती परमाणूंपासून झाली हा सिद्धान्त अस्तित्वात नव्हता. त्या सिद्धान्ताचा संस्थापक कणाद होता. परंतु कणादाने ईश्वरासंबंधी काहीही म्हटलेले नाही. ग्रीसमध्ये परमाणुवादाचे प्रतिपादन डेमोक्रीटस्ने (मृत्यु-ख्रि. पू. ३७० च्या सुमारास) केले. मध्ययुगीन काळात न्याय-वैशेषिक विषयावरील ग्रंथकारांनी परमाणूच्या सिद्धान्ताला ईश्वरासंबंधीच्या सिद्धान्ताची जोड दिली. परिमाणुवादी लोकांची कल्पना अशी आहे : जेव्हा ईश्वराला विश्वाची उत्पत्ती करण्याची इच्छा होते तेव्हा परमाणूंमध्ये चेतना उत्पन्न होते, दोन परमाणू एकजीव होऊन द्वयणुक् निर्माण होते, तीन परमाणूपासून त्र्यणुक् निर्माण होते आणि अशा क्रमाने शेवटी पृथ्वी निर्माण होते; जेव्हा ईश्वराला उत्पन्न केलेल्या पदार्थाचा नाश करण्याची इच्छा होते तेव्हाही परमाणूंमध्ये चेतना निर्माण होते आणि ते क्रमाक्रमाने एकमेकात विलीन होतात आणि विश्वाचा नाश होतो. परमाणू हे अंतरहित आणि असंख्यं असतात.

धर्मसूत्रकार ईश्वर अद्वितीय असल्याचे मानतात. लोक जरी ईश्वराची उपासना शिव, विष्णु अथवा देवी अशा निरनिराळ्या रुपांनी करीत असले तरी तो देहधारी नसून आत्मस्वरूपी आहे; तो अचल, सर्वव्यापक, सर्वज्ञ, सर्व शक्तिमान, पवित्र, न्यायी आहे असेच बहुतेकांचे मत होते. ऋग्वेदात देखील अग्नि, इंद्र, वरुण प्रभृति निरनिराळ्या देवांच्या कृत्यांचे वर्णन केले असले तरी सत् (आदितत्त्व) एकच असून तेच आपल्या स्वतःमधून हे विश्व निर्माण करून त्यात प्रवेश करते आणि तेच विश्वाला चेतना देते, एकाच सत् तत्त्वाला लोक अग्नि, यम, मातरिश्वन् इत्यादि निरनिराळी नावे देतात अशा अर्थाचीही अनेक सूक्ते आहेत. (ऋ १·१६४·४६ प्रभृति) अशा रीतीने उपनिषदांत प्रतिपादन केलेल्या तत्त्वज्ञानाचे बीज ऋग्वेदामध्ये आढळून येते.

ऋग्वेदामध्ये निरनिराळ्या सूक्तात निरनिरांळ्या देवांनी सृष्टि निर्माण केल्याचे सांगितले आहे; तै. सं. (३·३·७·१) मध्ये प्रजापतीने देव आणि असुर उत्पन्न केल्याचे सांगितले आहे; अथर्ववेदात १० वे खंडातील ७ आणि ८ ह्या सूक्तांत स्कम्भ हा मूळ पुरुष असल्याचे सांगून तोच प्रजापति झाला आणि तोच सर्व

विश्वाचा उत्पादक आणि संरक्षक असल्याचे वर्णन केले आहे; त्याच वेदामध्ये एके ठिकाणी (अथर्व.१९·५३-८; १९·५४·१) काल हेच आदितत्त्व असून त्याच्यापासून सर्व विश्वाची उत्पत्ती होते आणि त्यांतच विश्वाचा लय होतो असे सांगितले आहे; शत. ब्रा. (६·१·१) मध्ये एके ठिकाणी सुष्टीच्या आरंभी असत् होते असे म्हटले असून दुसरे एके ठिकाणी (शत. ब्रा. ११·१·६-१ प्रभृती) आरंभी जल होते असे सांगितले आहे. सृष्टीची उत्पत्ती सुवर्णाच्या अंड्यापासून झाल्याची कल्पनाही अनेक ग्रंथांत सांगितली आहे. (ऋ. १०·१९२·३; छां. उप. ३·१९·१।२ इत्यादि) तसेच आदितत्त्वाला आपण बहुविध व्हावे अशी इच्छा झाल्याचीही कल्पना अनेक ग्रंथांत (बृह. उप. १·४·३।४; छां. उप ६·२·३।४ इ.) वर्णन केली आहे. उपनिषदांतही कोठे प्रथम पाणी (ऐत. उप. १६) असल्याचे वर्णन केले आहे तर कोठे आरंभी प्रथम तेज (छां. उप.) अथवा आकाश (तै. उप. २·१) उत्पन्न झाल्याचे वर्णन केले आहे.

विश्वाच्या उत्पत्तिप्रमाणेच विश्वाच्या नाशासंबंधी अनेक उपपत्त्या वर्णन केलेल्या आहेत. उपनिषदांत (तै. उप. आणि छां. उप.) म्हटले आहे की ब्रह्मापासून पांच महाभूते उत्पन्न होतात आणि ब्रह्मामध्येच ती विलीन होतात. विश्वाच्या नाशाला प्रलय अशी संज्ञा आहे. ब्रह्मदेवाचा एक दिवस १००० युगांइतका असतो आणि त्यांची रात्रही तेवढीच असते. ब्रह्मदेवाच्या दिवसाच्या आरंभी अव्यक्त मूलतत्त्वापासून सर्व दृश्य पदार्थ उत्पन्न होतात आणि त्याची रात्र सुरू झाली म्हणजे ते पदार्थ त्याच अव्यक्त मूलतत्त्वांत लय पावतात.(मनु १·७३; भग. गीता ८·१७।१८). ब्रह्मदेवाच्या दिवसाच्या अंती होणाऱ्या प्रलयाला नैमित्तिक प्रलय अशी संज्ञा आहे.

अद्वैत वेदान्ताच्या मताप्रमाणे विश्वाच्या उत्पत्तीचे आणि लयाचे वर्णन हे केवळ व्यावहारिक दृष्टीनेच सत्य असते. पारमार्थिक दृष्टीने वास्तविकपणे सष्टीची उत्पत्तीही होत नसते आणि तिचा लयही होत नाही, जीवात्मा बंधनांत नसतो आणि म्हणून कोणाचीच मुक्ति होत नसते. ईश्वर मानण्याऱ्या बहुतेक सर्व धर्मात देव, व्यक्तिगत जीव आणि बाह्य विश्व ही तीन मूलभूत तत्वे गृहीत धरलेली असतात. परंतु ही तीन तत्त्वें अंतिम सत्ये नसून काही एका मर्यादेपर्यंतच म्हणजे मनुष्य आपल्या अहंकाराला स्वतंत्र अस्तित्व मानीत असतो तोपर्यंतच ती सत्य असतात. ब्रह्माहून विश्व स्वतंत्र नाही अशी उच्च आध्यात्मिक कल्पना उपनिषदांनी प्रतिपादन केली आहे. परंतु विश्व उत्पन्न करणारा देव (सगुण ब्रह्म) आणि विश्व ही दोन्ही सत्य आहेत अशी सर्वसामान्य लोकांची कल्पना असते. ह्या दोन्ही कल्पनांचा एक- समयावच्छेदेकरून समावेश उपनिषदात केलेला असतो. छां. उप. (७·२४) मध्ये म्हटले आहे की जेथे मनुष्यांना दुसरे काही दिसत नाही, ऐकू येत नाही, समजत नाही ते अमर्यादित (ब्रह्म) होय आणि जेथे मनुष्याला दुसरे काही दिसते, ऐकू येते, समजते ते मर्यादित (ब्रह्म) होय; अमर्यादित ब्रह्म मरणरहित असते, मर्यादिताला मरण असते. उपनिषदातील काही वचनात जीवात्म्याची उत्पत्ती परमात्म्यापासून झाल्याचे सांगितले आहे तर काही वचनात जीवात्मा जन्मरहित, मृत्युरहित आणि स्वयंभू असतो, नित्य असतो असे म्हटले आहे. एक परमात्म तत्त्व बहुविध असणाऱ्या विश्वामध्ये कसे विस्तार पावते आणि त्याला व्यापून राहते हे एक गूढ आहे. ब्रह्म कसे आहे हे सांगणे शक्य नसून ते कसे नाही एवढेच फक्त (नेति नेति) सांगणे शक्य असते.

बहुसंख्य सामान्य लोकांना ही उच्च आध्यात्मिक भूमिका समजू शकत नाही; त्यांना केवळ प्रत्यक्ष अनुभवाला येण्यासारखीच भूमिका समजू शकते आणि अशा सामान्य लोकांकरिताच धर्मशास्त्रावरील ग्रंथात सगुण देव, यज्ञासारखे विधि आणि विधाने सांगितलेली असतात. त्यांच्यापेक्षा कमी संख्या असणारा एक वर्ग समाजात असतो आणि ते लोक देवाची प्रार्थना करतात, देवाचा शोध करतात आणि देव आपल्या अंतर्यामी असल्याचे त्याना कळून येते. त्यांच्याहीपेक्षा कमी संख्या असणारा एक वर्ग असतो आणि त्या

वर्गात मोठे मोठे ऋषी, आचार्य इत्यादिकांचा समावेश होतो. ह्या वर्गातील लोक शुद्ध अद्वैत ज्ञानाच्या शिखराला पोचतात; त्यांचा अहंकार नष्ट होतो आणि ते एकमेव असणाऱ्या परमतत्त्वात विलीन होण्याला पात्र होतात.

आमच्या धर्मशास्त्रांत धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष असे चार पुरुषार्थ अथवा मानवी जीवनाची ध्येये सांगितली आहेत. त्यांच्यापैकी शेवटला मोक्ष हा पुरुषार्थ सर्वात श्रेष्ठ असून तो फक्त काही थोड्या लोकांनाच प्राप्त करून घेता येतो आणि म्हणून त्याला परम पुरुषार्थ म्हणतात. परंतु सामान्य लोकांच्या दृष्टीने तीनच पुरुषार्थ असल्याचे मनूने (२·२२४) म्हटले आहे आणि आपली कर्तव्ये न करिता मोक्षाची इच्छा करणारा नरकात जातो असे म्हटले आहे. (मनु ६·३६।३७) ब्रह्मप्राप्तीपूर्वी प्रत्येकाने आसक्तिरहित, शांत, आत्मनिग्रह केलेले आयुष्य घालविले पाहिजे. ब्रह्मज्ञानाबरोबरच श्रेष्ठ प्रकारच्या नैतिक आणि आध्यात्मिक गुणांची आवश्यकता असल्याचे उपनिषदात सांगितले आहे. मनुष्य आपल्या मनातील निरनिराळ्या कल्पनांच्या चक्रातून जेव्हा मोकळा होतो आणि त्याला आत्मतत्त्वाचें ज्ञान होते तेव्हा तो अमर होतो (कठ उप. ६·१४), जो ब्रह्मामध्ये स्थिर होतो त्याला अमृतत्वाची प्राप्ती होते असे छां. उप. (२·२३·२) मध्ये म्हटले असून तशाच अर्थाची वचने इतर उपनिषदात आणि गीतेमध्ये (१३·१२; १४·२०) आली आहेत. ह्या स्थितीला पोचलेल्या लोकांना जीवात्मा आणि हे दृश्य मिथ्या (माया) आहे असे म्हणता येईल. परंतु बहुतेक सर्व लोकांच्या बाबतीत हे विश्व मायिक आहे अशी भाषा वापरणे योग्य होणार नाही. विश्व हे ब्रह्माच्या इतके सत्य नाहीं एवढेच म्हणण्याचा अद्वैत वेदान्तवादी लोकांच्या म्हणण्याचा आशय असतो.

सृष्टीच्या वर्णनाच्या बाबतीत उपनिषदात अतिशयच थोडी माहिती आली असून त्यात असलेली माहिती हिमालय आणि विन्ध्य ह्या दोन पर्वतांच्या मधील प्रदेशांसंबंधीच आहे. (कौषीतकी उप. २·१३) पुराणात भूवर्णनात्मक सहस्रावधि श्लोक आले आहेत आणि त्यात दिलेल्या वर्णनाचा धर्मशास्त्रावरील ग्रंथात पुष्कळ वेळा आधार घेण्यात येतो. अशोकाच्या रूपनाथ येथील खडकावर खोदलेल्या आज्ञापत्रात जम्बुध्दीपाचा उल्लेख केला आहे त्यावरून ख्रि. पू. ३०० च्या आधी जम्बुद्वीपाची निश्चित माहिती होती हे सिद्ध होते. निरनिराळ्या पुराणांत निरनिराळी द्वीपे, त्यात असणारे वर्षसंज्ञक विभाग, कुलपर्वत, प्रमुख नद्या ह्यांची नावे दिली आहेत. त्यांवरून असे दिसते की भारतवर्ष हा जम्बुध्दीपाचा एक भाग होता आणि त्याचे इंद्रद्वीप, ताम्रपर्ण इत्यादि नऊ विभाग होते. त्यांपैकी नववा विभाग दक्षिणोत्तर १००० योजने विस्तीर्ण होता. त्याच्या पूर्वेकडे किरात देश, पश्चिमेस यवन देश असून मध्य भागात चार वर्ण असलेला समाज राहत

[भारतस्यास्य वर्षस्य नवभेदान् निशामय।
इन्द्रद्वीपः कसेरुश्च ताम्रपर्णो गभस्तिमान् ॥
नागद्वीपस्तथा सौम्यो गन्धर्वस्त्वथ वारुणः।
अयं तु नवमस्तेषां द्वीपः सागरसंवृतः॥
योजनानां सहस्रं तु द्वीपोऽयं दक्षिणोत्तरात्।
पूर्वे किराता यस्यान्ते पश्चिमे यवनाः स्मृताः।
ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्या मध्ये शूद्राश्च भागशः॥
विष्णुपुराण (२·३·६।९).] होता. (विष्णु पु. २·३·६।६९ इ.) हा विभागाला काही पुराणांनी (मत्स्य ११४·१० प्रभृति) कुमारद्वीप हे नाव दिले असून त्याच्या मर्यादा कुमारिकी (कन्या-कुमारी) पासून गंगेच्या उगमापर्यंत होत्या. ह्यावरून हा विभाग आधुनिक भारतासारखा एक देश होता असे दिसते. जेव्हा आर्यांची संस्कृती आग्नेय आशियात पसरली तेव्हा सांप्रतचा भारत आणि हा बृहन्भारत ह्या दोहोमिळून होणाऱ्या प्रदेशाला भारतवर्ष ही संज्ञा लावण्यात येऊ लागली असण्याचा संभव आहे. भारतवर्ष हे नाव कसे पडले ह्याबद्दल निरनिराळ्या उपपत्त्या दिल्या आहेत. मनूने प्रजाजनांचे भरण (पोषण) केले म्हणून त्याला भरत म्हणत आणि त्याच्यावरून ह्या वर्षाला भारतवर्ष म्हणतात असे एके ठिकाणी (वायु. ४५·७५।८१) वर्णन केले आहे

तर ऋषभाचा पुत्र भरत ह्याच्यावरून हे नांव पडल्याचे कोणी (वायु. ३३·५०।५२) म्हटले आहे आणि दुष्यंत आणि शकुंतला ह्यांचा पुत्र भरत त्याच्यावरून हे नांव पडल्याचेही कोणी (वायु. ९९·१३४) सांगितले आहे.

प्राचीन भारतात कन्याकुमारीपासून हिमवतापर्यतच्या प्रदेशात राहणाऱ्या सुसंस्कृत लोकांची भाषा एकच होती असे जै. सू. १०·१·३५ वरील शाबर भाष्यावरून दिसते. प्राचीन काळचे भारतीय लोक आपल्या संस्कृतीचा संबंध विशिष्ट वंशांतील लोकांशी न जोडता भारतवर्षाशी जोडीत असत.

निरनिराळ्या पुराणांत प्राचीन आणि मध्ययुगीन काळच्या भारतातील देशांची नावे दिली आहेत. ऋग्वेद रचणाऱ्या ऋषींना बर्फाच्छादित पर्वतांची माहिती होती. (ऋ. १०·१२१·४)ऋग्वेदांत आणि अनेक पुराणांत अनेक नद्यांची नावे आली आहेत (ऋ. १०·७५·५।६ इ.; अनुशासन १६५·१९।२९). योगसूत्रावरील (३·२५) व्यासभाष्यात (भूः, भुवः प्रभृति) सात लोक, (अवीचि प्रभूति) सात नरक, सात पाताले, सात व्दीपे, पृथ्वीच्या मध्यभागी असलेले (मेरुप्रभृति) सात पर्वत, सात वर्षे, (जम्बु, शक, कुश प्रभृति) सात द्वीपे, सात सागर, देवाची उपवने, देवांची सुधर्मा नावाची सभा आणि सुदर्शन नांवाची राजधानी, वैजयन्त नांवाचा राजवाडा, (महेन्द्र, प्राजापत्य, जन, तप आणि सत्य ह्या लोकांत राहणारे) देवगण, ह्यांची बरीच माहिती दिली आहे. त्या वर्णनांत आलेले अनेक तपशील पुराणांत दिलेल्या तपशीलांशी पूर्णपणे जुळतात. ह्यावरून असे दिसून येते की पुराणांत दिलेले सृष्टिवर्णन इ. स. च्या ४ व्या शतकाच्या बऱ्याच आधी सुनिश्चित झालेले होते.

उपनिषदांत अथवा त्यांच्या नंतरच्या काळात झालेल्या ग्रंथांत वर्णन केलेली विश्वोत्पत्ती संबंधीची माहिती पृथ्वी ही विश्वाचा मध्य आहे GEO-CENTRIC (जि ओ सेंट्रिक) ह्या तत्त्वाला अनुसरून केलेली असते आणि त्या वर्णनांत पृथ्वी, पंचमहाभूतें, सूर्य, चंद्र, ग्रह आणि नक्षत्रे ह्यांच्या विषयीची सर्वसामान्य (तपशील नसलेली) माहिती दिलेली असते.

# प्रकरण ३५

## कर्म आणि पुनर्जन्म ह्यांच्यासंबंधी सिद्धान्त

(मू. ग्रं. पा. ५।१५३०-१६१२).

भारतात धार्मिक आणि तत्त्वज्ञानविषयक जे सिद्धांत अस्तित्वात आहेत त्यांतील अत्यंत महत्त्वाच्या सिद्धांतांपैकी कर्म आणि पुनर्जन्म ह्यांच्यासंबंधी सिद्धान्त हा एक आहे. ह्या देहाला मरण आल्यानंतर मनुष्याची स्थिती काय होते असा जो प्रश्न सर्व विचारवंतांमुळे उभा राहतो त्याला ह्या सिद्धांतामध्ये उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. हिंदु, जैन आणि बुद्ध इत्यादि धर्मीय सर्व भारतीयांच्या सहस्त्रावधि वर्षांच्या कालातील अथवा निदान उपनिषदांच्या नंतरच्या काळातील विचारांवर ह्या सिद्धांताचा फार मोठा परिणाम झाला आहे. सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्वमीमांसा आणि वेदान्त ही निरनिराळी दर्शने एकमेकांच्या काही विशिष्ट सिद्धान्तांवर कडाक्याचे हल्ले करीत असली तरी कर्म आणि पुनर्जन्माच्या सिद्धांताला (चार्वाकासारखे जडवादी लोकांचे अपवाद सोडल्यास) सर्व दर्शने एकमताने पाठिंबा देतात ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. बुद्ध आणि जैन धर्माचा वेदांमधील आणि स्मृतींमधील अनेक मतांबद्दल विरोध असला तरी त्यांनी आपआपल्या पद्धतीप्रमाणे हा सिद्धांत स्वीकारला आहे. अशा रीतीने ज्यावर त्या सर्व धर्मांचे एकमत आहे असा पुनर्जन्म हा एकमेव सिध्दान्त आहे. (प्रा. विंल्सनकृत 'हिंदूंचा धर्म' खंड २ पा. ११२).

प्राचीन काळच्या ग्रीक लोकांपैकी काही पुनर्जन्म मानीत असत. मनुष्याचा आत्मा अमर असतो आणि देहाला जेव्हा मृत्यु येतो तेव्हा तो आत्मा त्यावेळी जन्माला येत असलेल्या कोणत्या तरी जीवामध्ये प्रवेश करितो असे प्राचीन इजिप्त मधील लोक समजत असत. अलिकडील थोडया वर्षात पाश्चात्य देशांतील अनेक ग्रंथकारांची मने ह्या विषयाकडे आकृष्ट झाली आहेत. पुनर्जन्माचा सिद्धांत प्रथम कोणी शोधून काढला ह्याविषयी काही पाश्चात्य ग्रंथकारांनी वाद उपस्थित केला आहे. कर्म आणि पुनर्जन्म ह्यांच्या संबंधी संस्कृत ग्रंथांतल्या इतकी सविंस्तर; महत्वाची आणि परिपूर्ण स्वरूपाची माहिती सर्व जगात इतर कोठेही आढळणार नाही. तेव्हा हा सिध्दान्त भारतीयांनीच शोधून काढला असला पाहिजे असेच मानणे सयुक्तिक होईल."

पुनर्जन्माच्या सिद्धांतात पुढील गोष्टी गृहीत धरलेल्या असतात :— (१) मनुष्याला आत्मा असतो आणि तो अंत रहित असून स्थूल देहाहून वेगळा असतो; (२) इतर सचेतन जीवजंतु, प्राणी, वनस्पती आणि बहुधा अचेतन जड पदार्थ ह्यांच्यामध्येही आत्मा असतो; (३) मनुष्याचे आणि मनुष्याहून खालच्या दर्जाच्या प्राण्यांचे आत्मे एका प्रकारच्या भौतिक शरीरातून दुसऱ्या प्रकारच्या शरीरात जाऊ शकतात; (४) आत्मा कर्ता आणि भोक्ता दोन्ही असतो.

'कर्म' हा शब्द ऋग्वेदामध्ये अनेक वेळा आला आहे आणि ऋ. १·२२·१९ इत्यादि सारख्या काही वाक्यात त्याचा अर्थ 'पराक्रम' अथवा 'शौर्याची कृत्ये' असा असावा असे दिसते. अतिशय प्राचीन काळी स्वर्ग हे कर्मांच्या फलांच्या उपभोगाचे स्थान असल्याचे बहुधा मानण्यात येत असे. अमृतत्व आणि स्वर्गातील सुखोपभोग ह्यांना फार मूल्यवान समजत असत आणि त्यांची प्राप्ती व्हावी म्हणून केलेल्या देवांच्या प्रार्थना ऋग्वेदात आल्या आहेत. (ऋ. १·३१·७, ९·११३·७।१०). परंतु दुष्कृत्ये करणाऱ्यांना मृत्यूनंतर कोणती गती प्राप्त होते ह्याविषयी ऋग्वेदामध्ये फारसे काही सांगितलेले नाही. कर्माच्या आणि पुनर्जन्माच्या बाबतीत मूलभूत कल्पना अशी आहे की एखाद्या मनुष्याचे भावी जीवन त्याने केलेल्या चांगल्या अथवा वाईट कृत्यांवर

अवलंबून असते आणि त्या बाबतीत त्या मनुष्याला कोणताही फेरबदल करिता येत नाही असे काही विद्वानांचे मत आहे. परंतु त्यांनी मांडलेल्या पुराव्यावरून तसे सिद्ध होत नाही. कर्माच्या आणि पुनर्जन्माच्या सिद्धांताविषयी अशा स्वरूपाचे स्पष्ट विधान ऋग्वेदामध्ये कोठेही आढळत नाही.

कर्म आणि पुनर्जन्म ह्यांच्या सिद्धांताविषयी ऋग्वेदात काहीही स्पष्ट उल्लेख केलेला नाही ह्या विधानाविरुद्ध प्रा. रा. द. रानडे, श्री. ज. स करंदीकर ह्यांच्यासारख्या काही विद्वानांनी मते प्रतिपादन केली आहेत. त्यांच्या मताचा सविस्तर परामर्श मूळ इंग्रजी ग्रंथात (खंड ५ पा. १५३७।१५४४) घेण्यात आला आहे. प्रस्तुत ग्रंथकाराच्या मते त्यांनी उल्लेख केलेल्या ऋचांचा अर्थ ते म्हणतात तसा होत नाही. प्रस्तुत सारांशग्रंथात हा सर्व तपशील गाळला आहे.

सत्कृत्यांबद्दल चांगली फळे आणि दुष्कृत्यांबद्दल शासन ह्याबद्दल अधिक तपशील ब्राह्मणग्रंथांत सापडतो. (शत [एतस्माद्वै यज्ञात्पुरुषो जायते। स यद्ध वा अस्मिँल्लोके पुरुषोऽन्नमत्ति तदेनममुष्मिँल्लोके प्रत्यत्ति। शतपथ ब्रा. (१२·९·१·१).] ब्रा. (१२·९·१·१). ब्राम्हणग्रंथातील कल्पनाच पुढे धर्मसूत्रात (विष्णु ध. सू. ५१·५५) आणि मनुस्मृति (५·५५) प्रभृति स्मृतींत वर्णन केली आहे. शत. ब्रा. (१०·४·३·१० इ.) आणि तैत्तिरीय ब्रा. (३·११·८·६) यात पुनर्मृत्यूचा (पुन्हा पुन्हा येणाऱ्या मृत्यूचा अथवा पुन्हा पुन्हा घ्याव्या लागणाऱ्या जन्मांचा) अनेक वेळा उल्लेख आला आहे. तै. ब्रा. मध्ये दिलेल्या नचिकेताच्या कथेमध्ये पुनर्मृत्यूचा त्याग कसा करावा हे सांगण्याची नचिकेताने यमाला विनंती केली आहे.

बृहदारण्यक उपनिषदामध्ये (४·४·५।७) म्हटले आहे की मनुष्य ज्या प्रकारची कृत्ये करील आणि आचरण करील त्या अनुसार तो चांगल्या अथवा वाईट प्रकारचा होईल (म्हणजे चांगला अथवा वाईट जन्म घेईल). मनुष्य कामनामय असतो, त्याच्या कामनांप्रमाणे त्याची इच्छा असते आणि त्या इच्छेप्रमाणे त्याची कृती होते. मनुष्याच्या मनातील कामनांना अनुसरून त्याला फल मिळते आणि त्या फलांसह तो अन्यस्थानी जातो आणि तेथे त्या फलांचा उपभोग घेऊन झाल्यावर तो परत ह्या कर्मभूमीमध्ये येतो; ज्या मनुष्याच्या मनात मुळीच कामना नसतात तो अमर होतो आणि तो येथेच ब्रह्मस्थितीला पोचतो.

हा उतारा जन्मांतराविषयीचा उपनिषदांतील महत्त्वाचा, सर्वात प्राचीन आणि स्पष्ट असा पुरावा आहे. जीव एका देहातून दुसऱ्या देहात कसा जातो ह्याच्या स्पष्टीकरणाकरिता उपनिषदात अनेक उदाहरणे दिली आहेत. त्यांच्यापैकी पुढील दोन उल्लेखनीय आहेत. एखादा किडा गवताच्या एका पातीवरून दुसऱ्या पातीवर जाताना तो प्रथम दुसरी पाती ओढून घेऊन तिच्यावर आपले पुढले पाय टेकतो आणि त्या पातीवर स्थिर झाल्यावर आपले मागील पाय त्या पातीवर टेकतो. त्याचप्रमाणे जीव एका देहाला मरण आल्यावर दुसऱ्या देहाकडे वळतो आणि त्या देहामध्ये स्थिर होतो. (बृह. उप. ४·४·३) जन्मांतराविषयीचे दुसरे उदाहरण आपल्या अंगावरील कात अथवा मेंग टाकून त्यातून बाहेर पडणाऱ्या सर्पाचे आहे. त्या सर्पाप्रमाणेच जीव एक देह सोडून बाहेर पडतो. (बृह. उप. ४·४·७).

मनुष्याचा देह मरण पावतो त्यावेळी जीवाचे काय होते हा बाबतीत मुख्य अशा तीन अवस्था संभवनीय असतात; त्या म्हणजे (१) संपूर्ण नाश, (२) केलेल्या कर्माचे फल भोगीत अनंत कालपर्यंत स्वर्गात अथवा नरकात राहणे, (३) पुनर्जन्म. आत्मा अमर असल्याचे जे लोक मान्य करीत नाहीत ते ह्या तीन अवस्थांपैकी पहिली मान्य करितात. कठ उपनिषदात (१·२०) असे सूचित केले आहे की प्राचीन भारतामध्ये देखील मृत्यूनंतर जीवाच्या अस्तित्वाविषयी संशय मानीत असत. मृत्यूनंतर जीवाचा संपूर्ण नाश

होतो असे मानणाऱ्यांना इतर प्रश्न उपस्थित होत नाहीत. ईश्वर, स्वर्ग आणि नरक ह्यांचे अस्तित्व मानणाऱ्यांपैकी देखील अनेक लोक पुनर्जन्म मान्य करीत नाहीत परंतु मृत्यूनंतर आत्मा अस्तित्वात असतो एवढेच मान्य करितात. परंतु ह्या जन्मामधील अल्प अवधीमध्ये केलेल्या कृत्यांकरिता अनंत कालपर्यंत स्वर्ग अथवा नरक म्हणजेच सुख अथवा दुःख प्राप्त होणे ही प्रमाणाबाहेर असणारी विषमता असल्या कारणाने दुसरी अवस्था अनेक लोकांना मान्य होत नाही आणि म्हणून पुष्कळ लोकांना तिसरी अवस्था पटते. कारण त्या अवस्थेमध्ये मृत्यूनंतर आत्मा अन्य आकारात आणि अन्य परिस्थितीत अखंड अस्तित्वात असण्याची शक्यता असते.

बृह. उप (६·२) आणि छा. उप. (५·१०·४|९) ह्यांत मृत्यूनंतर आत्मा स्वर्गाला ज्या मार्गांनी जातो त्या मार्गांविषयी विवेचन आले आहे. ह्या मार्गांना देवयान आणि पितृयान अशा संज्ञा आहेत. ह्या दोन मार्गांची ऋग्वेदालाही माहिती होती आणि स्वर्गामध्ये सुखे आणि उपभोग असतात ही गोष्टही माहीत होती. (ऋ. १०·२·७; १०·१८·१). परंतु स्वर्गातील सुखे किती काळपर्यंत राहतात हे ऋग्वेदाला माहीत नव्हते आणि पुनर्जन्माविषयीही त्यात स्पष्ट विधान केलेले नाही. ब्राह्मणग्रंथांच्या काळांत पुनर्मृत्यूची कल्पना जरी विचारवंतांच्या मनात उद्‌भवली होती तरी त्या ग्रंथांत देखील चांगल्या अथवा वाईट कृत्यांना अनुसरून पुनर्जन्म प्राप्त होतो अशी निश्चित कल्पना क्वचितच आढळते. पुनर्जन्माच्या उत्पत्तिसंबंधी बृह. उपनिषदात (३·३·१३ आणि ४·५·५|७) याज्ञवल्क्याने असे प्रतिपादन केले आहे की मनुष्याला त्याच्या स्वतःच्या कृत्यांमुळे आणि आचरणांमुळे नवीन जन्म घ्यावे लागतात. बृह उप मधील ह्या अवतरणांमध्ये देवयान आणि पितृयान मार्गांचा मुळीच उल्लेख केला नाही परंतु बृह. उप. (६·२·१६) मध्ये त्या दोन मार्गांचा पुनर्जन्माशी संबंध जोडला असून कृमी आणि मक्षिका ह्यांच्या जन्माला येणाऱ्यांकरिता तिसरा एक मार्ग सांगितला आहे. शत.ब्रा. (१·९·३·१|२), कौषीतकि ब्रा. (१·२|४), अथर्व वेद (१५·१२·५) यांतही ह्या दोन्ही मार्गांचा उल्लेख केला आहे.

मृत्यूनंतर जीवाची काय स्थिती होते ह्या विषयीच्या एका कल्पनेला उपनिषदांमध्ये **पंचाग्निविद्या** अशी संज्ञा दिली आहे. बृह. उप. (६·२) मध्ये असे म्हटले आहे. की स्वर्ग, पर्जन्याची देवता, पृथ्वी, पुरुष आणि स्त्री हे पाच अग्नि असून श्रद्धा, सोम (चंद्र), पर्जन्य, अन्न आणि रेत ह्या त्या अग्नींमध्ये द्यावयाच्या आहुती असतात. जे जीवात्मे ही पंचाग्नि विद्या जाणतात ते प्रकाशाकडे (अर्चिस्) जातात आणि तेथून क्रमाने दिवस, शुक्लपक्ष, उत्तरायण, देवलोक, सूर्य, विद्युत ह्यांच्याकडे जाऊन शेवटी ब्रह्मलोकात जातात. त्या लोकांत त्यांची उन्नती होऊन ते तेथेच राहतात आणि परत संसारात येत नाहीत.

परंतु जे जीवात्मे यज्ञ, दान, तप ह्या साधनांनी परलोक मिळवितात ते धूमाकडे जातात आणि तेथून क्रमाने रात्र, कृष्णपक्ष, दक्षिणायन, पितृलोक ह्यांच्याकडे जाऊन शेवटी चंद्रलोकाप्रत जातात. जेव्हा त्यांनी पृथ्वीवर केलेल्या कर्माचे फल संपते तेव्हा ते जीवात्मे आकाश, वायु, पर्जन्य ह्या मार्गाने पृथ्वीवर येतात, तेथे ते अन्न होतात आणि त्यांची पुरुष नावाच्या अग्नीमध्ये आहुती देण्यात येते; पुरुषापासून ते स्त्री नावाच्या अग्नीमध्ये जन्माला जातात. ह्याप्रमाणे यज्ञादि कर्मांनी परलोक प्राप्त करून घेणारे जीवात्मे पुनः पुनः ह्या लोकात परत येतात.

ज्या जीवात्म्यांना हे दोन्ही मार्ग माहीत नसतात ते कृमी, कीटक (पक्षी) आणि मक्षिका होतात.

छां. उप. (५·१०·७|८) मध्ये म्हटले आहे की ज्यांचे आचरण चांगले असते त्यांना त्वरित चांगला

(ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य) जन्म प्राप्त होतो, परंतु ज्यांचे आचरण दुष्ट असते त्यांना (कुत्रा, चांडाल, डुकर अशांसारखा) दुष्ट जन्म त्वरित प्राप्त होतो. जे जीव ह्या दोन मार्गापैकी एकाही मार्गाने जात नाहीत ते (कृमी, कीटक ह्यांच्यासारखे) क्षुद्र प्राणी होतात. त्यांचा ह्या दोन मार्गांहून वेगळा तिसरा मार्ग असतो.

भगवद्गीतेमध्ये (८·२३।२७) ह्या दोन मार्गांचा उल्लेख करून असे म्हटले आहे की एका मार्गाने जाणारा योगी ह्या लोकी परत येत नाही आणि दुसऱ्या मार्गाने जाणारा ह्या लोकी परत येतो. गीतेमध्ये ह्या मार्गांना शुक्ल (प्रकाशमान) आणि कृष्ण (काळा) गती म्हटले आहे. शुक्ल मार्गाचा क्रम अग्नि, ज्योतिस्, दिवस, शुक्लपक्ष, उत्तरायणाचे सहा महिने असा असून अशा काळी मृत्यु पावलेले ब्रह्मवेत्ते ब्रह्म पदाला जातात. कृष्णमार्गाचा क्रम धूम, रात्र, कृष्णपक्ष, दक्षिणायनाचे सहामहिने असा असून त्या काळी मृत्यु पावलेले योगी चंद्रलोकाला जाऊन ह्या लोकी परत येतात. महाभारतात (शांति. २६·८।१०) उत्तर आणि दक्षिण मार्गांचा उल्लेख केला असून दक्षिणमार्ग दान, वेदाध्ययन आणि यज्ञ ह्यांनी प्राप्त होतो असे म्हटले आहे.

वेदान्तसूत्रांत पुनर्जन्माच्या सिद्धांताचा पुष्कळ वेळा उल्लेख केला आहे. ईश्वर निष्ठुर असून विषम वागणूक देणारा आहे ह्या आक्षेपाचे निराकरण करिताना वे. सू. (२·१·३४।३६) मध्ये कौषी. आणि बृह. उपनिषदांचा [तौ होत्क्रम्य मन्त्रयांचक्राते। तौ ह यदूचतुः कर्म हैव तदूचतुः।
अथ यत्प्रशशंसतुः कर्म हैव तत्प्रशशंसतुः। पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति पापः पापेनेति।
बृह. उप. (३·३·१३).] आधार देऊन असे प्रतिपादन केले आहे की ईश्वर प्राणिमात्रांत विषमता निर्माण करिताना त्या प्राण्यांच्या सद्गुणांचा आणि दुर्गुणांचा विचार करतो. अधिक उच्च अथवा खालचा जन्म प्राप्त होणे ही गोष्ट मनुष्यांच्या कर्मांवर अवलंबून असते.

कर्म आणि पुनर्जन्म ह्यांच्या संबंधी आप. ध. सूत्रात (२·१·२·२।३ आणि ५।६) असे सांगितले आहे की सर्व वर्णांचे लोक शास्त्रात सांगितलेली आपआपली कर्तव्ये करून स्वर्गात जातात आणि अत्यंत श्रेष्ठ आणि अमर्याद सुख भोगतात; त्यानंतर आपल्या कृत्यांची (उपभोग न घेतलेली) फले भोगण्याकरिता ते ह्या लोकी परत येतात आणि (त्या कृत्यांना अनुसरून) निरनिराळ्या जातींत, कुलांत, रूप, वर्ण, बल, बुद्धि, शहाणपणा, संपत्ती, स्वधर्माचरण ह्यांनी युक्त असा जन्म घेतात. ह्याच्या योगाने एखाद्या चक्राप्रमाणे उभय लोकात सुख उत्पन्न होते. असाच नियम दुष्ट कृत्यांच्या फलांच्या वाढीला लागू पडतो. सुवर्णाची चोरी करणारा, ब्रह्महत्या करणारा मनुष्य ब्राह्मणादि ज्या वर्णाचा असेल त्या वर्णाला अनुसरून काही नियमित काळपर्यंत नरकामध्ये यातना भोगतो आणि त्यानंतर अनुक्रमे चांडाल, पुल्कस अथवा वैण कुलांत जन्म घेतो. अशाच अर्थाची सूत्रे गौत. ध. सू. (११·२९।३०) आहेत. वे. सू. (३·१·८) वरील भाष्यामध्ये शंकराचार्यांनी गौ. ध. सू. चा उल्लेख करून असे म्हटले आहे की वाईट कृत्यांच्या परिणामांचा नाश करणे ही गोष्ट शास्त्रांत सांगितलेल्या (प्रायश्चित्ते, ब्रह्मज्ञानप्राप्ती ह्यांच्यासारख्या) काही उपायांव्यतिरिक्त इतर कोणत्याही प्रकाराने संभवनीय नसते आणि उलट असे होण्याचा संभव असतो की वाईट कृत्यांचे परिणाम आड आल्याकारणाने चांगल्या कृत्यांची फले प्राप्त होण्याला विलंब लागतो.

कर्माच्या सिद्धांताचे तत्त्व असे आहे की प्रत्येक चांगल्या अथवा वाईट कृत्यापासून काहीतरी परिणाम उत्पन्न होतो आणि असा परिणाम टाळता येत नाही. भौतिक जगात सर्वत्र लागू पडणारा कार्यकारणाचा अटळ सिद्धांत कर्माच्या सिद्धांतामध्ये मानसिक आणि नैतिक कृत्यांना लावला आहे. परंतु हा सिद्धांत प्रत्यक्ष अनुभवाच्या आधारावर बनविलेला आहे असे म्हणता येणार नाही अथवा प्रयोग करून त्या

सिद्धांताचा पडताळा पाहता येईल असेही म्हणता येणार नाही. तथापि हा सिद्धांत केवळ कल्पनेच्या अथवा भावनेच्या स्वरूपाचा असला तरी इतर काही भोळ्या आणि बालिश तर्कांच्या पेक्षा तो पुष्कळच चांगला आहे. कर्माच्या आणि पुनर्जन्माच्यां सिद्धांताच्या अभावी हे जग लहरी आहे, विश्वाचा उत्पादक ईश्वर केवळ आपल्या इच्छेप्रमाणे अथवा लहरीप्रमाणे फले देऊ शकतो असे मानले गेले असते.

कर्माच्या सिद्धांतामध्ये तीन गोष्टींना महत्व दिले आहे : (१) प्रस्तुतचे जीवन पूर्वीच्या एक अथवा अनेक जन्मांत केलेल्या कृत्यांच्या प्रायश्चित्तासारखे असते; (२) दुष्कृत्यांचे परिमार्जन मागाहून केलेल्या सत्कृत्यांनी होऊ शकत नाही आणि त्या दुष्कृत्यांबद्दल शासन भोगलेच पाहिजे; (३) दुष्कृत्यांबद्दलचे शासन आपोआप मिळत असते आणि ते त्या त्या व्यक्तीला मिळत असते. ह्या सिद्धांताप्रमाणे दैव अथवा नशीब अशी गोष्टच अस्तित्वात नसून जे काही घडत असते त्याची कारणे आपणास अज्ञात असली म्हणजे आपण त्या घटनेला दैव अथवा नशीब म्हणतो एवढेच.

कर्माच्या सिद्धांतावरूनच पुनर्जन्माचा सिद्धांत निघतो. एखाद्याने केलेल्या कृत्यांचे परिणाम तात्काल होणार नाहीत अथवा त्या व्यक्तीच्या सांप्रतच्या जन्मातही होणार नाहीत. मनुष्याच्या पूर्व जन्मांतील कृत्यांना अनुसरून त्याच्या चालू जन्मातील स्थिती असते आणि प्रस्तुत जन्मातील कृत्ये आणि पूर्व जन्मांतील अवशेष राहिलेला परिणाम ह्या दोहोंच्या योगाने त्या मनुष्याचा पुढील जन्म ठरविला जातो. (आदिपर्व ८०·२; मनु ४·१७२). पुनर्जन्माच्या सिद्धांताचा हा पाया आहे. मृत्यूनंतर काहीही शिल्लक राहत नाही अथवा अनंत काळपर्यंत आत्मा सुख अथवा दुःख भोगित राहतो ह्या दोन्ही कल्पनांच्या इतका (किंवा त्यांच्या पेक्षाही अधिक) समाधानकारक पुनर्जन्माचा सिद्धांत निश्चितपणे आहे. बहुतेक धर्माचे लोक ईश्वर त्यांच्या बाजूचा असल्याचे मानतात; परंतु सत्कृत्ये करणारा मनुष्य आपल्या सत्कृत्यांच्या मुळेच ईश्वराच्या अति निकटवर्ती असतो आणि दुष्कृत्ये करणाऱ्या मनुष्याला त्याने मानलेला ईश्वराचा प्रेषित ईश्वरी कृपा प्राप्त करून देऊ शकत नाही अशी घोषणा उपनिषदे आणि गीता ह्यांनीच काय ती हजारो वर्षांपूर्वी केली आहे.

भगवद्गीतेत (६·३७|४५) म्हटले आहे की योगमार्गात एखाद्या मनुष्याला शीघ्रपणे सिद्धी प्राप्त झाली नाही तरी त्याने श्रद्धापूर्वक केलेले परिश्रम व्यर्थ जात नाहीत. त्याला पुण्यवानांना मिळणारे लोक मिळतात आणि तेथे दीर्घकाल पर्यंत राहून तो ज्ञानवान योग्यांच्या अथवा शुद्ध आचरण असणाऱ्या श्रीमंताच्या कुलात जन्माला येतो आणि त्या नव्या देहात अधिक सिद्धीकरिता तो प्रयत्न करू लागतो आणि त्याच्या पूर्वजन्मीच्या अभ्यासाने युक्त होऊन तो अनेक जन्मांनंतर अखेर परम गतीला जातो.

आपल्या चालू जन्मातील अनेक गोष्टींचा उलगडा इतर कोणत्याही कल्पनेपेक्षा पुनर्जन्माच्या कल्पनेने अधिक समाधानकारक रीतीने करिता येतो. परस्परांना फारच थोडे वेळा पाहिलेल्या लोकांना परस्परांविषयी शत्रुत्व अथवा मित्रत्व वाटते, दृश्य कारण नसताना काही लोकांना आपत्ती प्राप्त होते आणि काही लोकांना पात्रता नसताना सुखोपभोग प्राप्त होतात अशा घटनांचा उलगडा पुनर्जन्माच्या सिद्धांताने होतो. हा सिद्धांत अस्तित्वात नसता तर जगामधील विषमतेमुळे ईश्वराच्या न्यायीपणाच्या समजुतीला धक्का बसला असता. सर्व मानवी प्रयत्नांना अनुरूप बक्षीस अथवा शासन पुढील जन्मात मिळेल असे गृहीत धरल्याने आणि असा विश्वास बाळगल्याने मनुष्याला प्रस्तुत जन्मात चांगली कृत्ये करण्याची सतत प्रेरणा होण्याचा, तसेच तो व्यसनांपासून आणि निष्ठुरपणाच्या कृत्यांपासून परावृत्त होण्याचा संभव आहें. जगामध्ये वाईट गोष्टी का अस्तित्वात असतात ह्याचे उत्तरं ह्या सिद्धांतावरून मिळते. संगीत, गणित, निरनिराळ्या कला ह्यांच्या बाबतीत एखाद्या मनुष्यामध्ये लहानपणापासूनच आढळून येणाऱ्या नैपुण्याचा ह्या

सिद्धांतावरून उलगडा होतो. हा सिद्धांत योग्य रीतीने समजून घेतला तर तो नैराश्यवादी अथवा दैववादी नसून उलट प्रस्तुत जन्मात सर्व प्रकारे मानवी प्रयत्न करण्याला ह्या सिद्धांतात महत्व दिले आहे.

परंतु संसार अशाश्वत आहे. जीवनात सुखापेक्षा दुःख कितीतरी अधिक आहे ही शिकवण वेदान्तावरील आणि धर्मशास्त्रावरील ग्रंथांनी आणि मध्ययुगीन काळातील संतांनी लोकांच्या मनावर इतकी बिंबविली आहे की त्यांना जीवनात उत्साह वाटत नाहीसा झाला आहे. कर्माचा सिद्धांत हे प्रयत्न करावयास प्रेरणा देणारे एक सामर्थ्यवान साधन होण्याच्या ऐवजी आणि त्याच्या योगाने लोकांना आशेचा संदेश मिळण्याच्या ऐवजी तो सिद्धांत अनेक लोकांच्या मनात दैववादाशी मिश्रित झाला आहे आणि त्यामुळे लोक दुर्बळ, मुकाट्याने आज्ञा पालन करणारे झाले आहेत आणि दीर्घ प्रयत्न करण्याकडे त्यांची प्रवृत्ती नाहीशी झाली आहे.

कर्माचे तीन विभाग केले आहेत. संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण. **संचित कर्म** म्हणजे पूर्वी होऊन गेलेल्या सर्व जन्मांत केलेल्या ज्या कर्मांची फले अद्यापि भोगलेली नसतात अशी सर्व कर्मे. **प्रारब्धकर्म** म्हणजे प्रस्तुत जन्म घेण्याच्या पूर्वीच्या संचित कर्मापैकी सर्वांत बलवान असलेले आणि ज्या कर्माच्या योगाने प्रस्तुत जन्माचे स्वरूप ठरते असे मानण्यात येणारे कर्म. प्रस्तुत जन्मात मनुष्य जी कर्मे साठवून ठेवतो त्यांना **क्रियमाण** कर्म म्हणतात. संचितं आणि क्रियमाण ही दोन्ही एकत्र करून त्यांच्यापैकी जे सर्वात बलवान (अथवा काहींच्या मताने सर्वात जुने) कर्म असेल त्याला अनुसरून पुढील जन्म ठरतो.

कर्माचे सात्विक, राजस, तामस असेही निरनिराळे प्रकार असतात आणि त्यांचे निरनिराळे परिणाम घडत असतात. सात्विक कर्मांच्या योगाने स्वर्गप्राप्ती होते, बहुतांशी राजस कर्मांनी भूलोक अथवा अंतरिक्ष लोक ह्यांची प्राप्ती होते आणि मुख्यत्वेंकरून तामस असणाऱ्या कर्मांनी यातना भोगण्याचे निरनिराळे देह अथवा जन्म प्राप्त होतात.

कर्मांच्या सिद्धांताच्या बाबतीत मनुष्याला क्रियास्वातंत्र्य असते किंवा नाही असा प्रश्न उपस्थित होतो. वर सांगितल्याप्रमाणे मनुष्याचा जन्म त्याच्या पूर्वीच्या जन्मातील कर्मांना अनुसरून ठरत असला तर तो मनुष्य कर्मांच्या स्वाधीन असलेले एक बाहुले होईल आणि त्याला स्वतःला जे कर्म सर्वात चांगले असल्याचे वाटेल ते कर्म करण्याचे क्रियास्वातंत्र्य राहणार नाही. हा एक बिकट प्रश्न असून त्यावर प्राचीन काळापासून आजपर्यंत झालेल्या सर्व श्रेष्ठ विचारवंतांनी भिन्नभिन्न मते प्रदर्शित केली आहेत आणि ह्या प्रश्नाचे समाधानकारक असे एकही उत्तर देणे शक्य नाही. भारतात झालेल्या ग्रंथांत सांगितलेल्या कर्माच्या सिद्धांतापुरतेच बोलावयाचे झाल्यास असे दिसते की प्रस्तुत जन्मामधील परिस्थितीच्या मर्यादेत करिता येतील तितकी सत्कृत्ये करण्याचे आणि नीतियुक्त आचरण करण्याचे क्रियास्वातंत्र्य मनुष्याला असते असे त्या ग्रंथांनी गृहीत धरले आहे. प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानाच्या आधारावर क्रियास्वातंत्र्य आणि पूर्व नियती ह्या दोन्ही गोष्टी मान्य करणे शक्य आहे. प्रत्येक व्यक्ती ज्या परिस्थितीत जन्माला येते त्या परिस्थितीच्या बाबतीत पूर्व नियति मान्य केली पाहिजे आणि त्या व्यक्तीच्या प्रस्तुत जन्मामधील कृत्यांच्या बाबतीत त्या व्यक्तीला क्रियास्वातंत्र्य असल्याचे मानले पाहिजे. भगवद्गीतेचा सर्वसाधारण कल क्रियास्वातंत्र्य मानण्याकडे असला तरी कोठेकोठे (३·५, ३·३३, १८·५९।६०) पूर्वनियतीचा स्वीकार केल्यासारखे दिसते. सर्व प्राणी प्रकृतीच्या गुणांनी परतंत्र असल्याचे गीतेत म्हटले आहे.

रामायण (अयोध्या ३९·४), नारदीयपुराण (उत्तर भाग २९·१८), पद्म पुराण (२·८१·४८) आदि

ग्रंथांत देखील असा विश्वास व्यक्त केला आहे की मनुष्याच्या पूर्व जन्मात केलेल्या कर्माचा परिणाम त्याला प्रस्तुत जन्मात भोगावा लागतो आणि पूर्वजन्मातील कर्माचे परिणाम भोगल्याशिवाय त्या कर्मांचा नाश होत नाही. तसेच त्यांत असेही म्हटले आहे की मनुष्य आपल्या स्वतःच्या कृत्यांच्या योगाने देवही होऊ शकतो. (पद्म २·९४·१३).

कर्म आणि पुनर्जन्म ह्यांच्या सिद्धांतांच्या संबंधीच्या वादात काही श्रेष्ठ भारतीय आणि युरोपियन विद्वानांनी एका आनुषंगिक मुद्यावर बरीच चर्चा केली आहे. जीवात्मा मृत्यूनंतर ज्या मार्गांनी परलोकी जातो आणि परत येतो त्या मार्गासंबंधी केलेल्या विवेचनात बृहदारण्यक (६·२) आणि छांदोग्य (५·३।१०) उपनिषदांत असे म्हटले आहे की ती विद्या त्या वेळेपर्यंत ब्राह्मणांकडे गेलेली नव्हती आणि फक्त क्षत्रिय वर्णाकडे राहिलेली होती. मुख्यत्वेकरून उपनिषदांतील ह्या विधानाच्या आधारावर ड्यूसन ह्या जर्मन पंडिताने आणि डॉ. रा. गो. भांडारकर ह्या भारतीय विद्वान पंडिताने असे प्रतिपादन केले आहे की ब्रह्मविद्येचे आद्यपुरस्कर्ते ब्राह्मण नसून क्षत्रिय होते आणि ब्राह्मणांना ती विद्या प्रथम अवगत नव्हती.

ह्या वादाचा ओझरता उल्लेख प्रस्तुत सारांश ग्रंथाच्या खंड २ मधील पा. १२३ वर केला आहे आणि त्याचे सविस्तर विवेचन मूळ इंग्रजी ग्रंथाच्या खंड ५ मधील १५७७ ते १५८७ ह्या पानांत केले आहे. उपनिषदांतील कथेवरून असे दिसते की याज्ञवल्क्यासारखे काही विद्वान ब्राह्मणदेखील जनक आणि अश्वपति ह्यांच्यासारख्या क्षत्रिय राजांकडे ब्राह्मविद्या शिकण्याकरिता शिष्य म्हणून गेले होते. उपनिषदातील कथेंत उल्लेख केलेली विद्या कोणती होती हा एक प्रश्न आहे. ब्राह्मणांनी ज्या विद्यांची उपासना करावयाची असे अशा उद्‌गीथ विद्या, मधुविद्या ह्यांच्यासारख्या अनेक विद्यांचा त्या दोन उपनिषदांत उल्लेख केला आहे. पंचाग्निविद्या ही एक अशाच प्रकारची विद्या असून तिचा संबंध देवयान आणि पितृयान ह्या मार्गांशी आहे. उपनिषदांतील विधानावरून फारतर असे म्हणता येईल की काही क्षत्रिय राज्यकर्ते अथवा सरदार यांनी पितृयान पथातील जीवात्म्याच्या परत येण्याच्या मार्गांचा आध्यात्मिक स्वरूपाचा खुलासा केला होता आणि तो प्रथम प्रतिपादन केला होता. जरी वादाकरिता ही गोष्ट मान्य केली तरी तेवढ्यावरून ब्रह्मविद्येचा शोध आणि त्या विद्येचा विकास क्षत्रियांनीच केला असे अनुमान काढता येत नाही.

ह्या वादाचे ह्याहून अधिक विवेचन प्रस्तुत सारांशग्रंथात करता येणे शक्य होणार नाही. ह्या वादाचा कर्म आणि पुनर्जन्म ह्यांच्या सिद्धांताक्षी प्रत्यक्ष संबंध नाही. ज्यांना ह्या वादासंबंधी अधिक माहिती पाहिजे असेल त्यांनी मूळ ग्रंथातील खंड ५ मधील १५७७ ते १५८७ ही पाने पहावी.

बऱ्या आणि वाईट सर्व कर्मांची फले त्या कर्मकर्त्याने भोगलीच पाहिजेत असा अटळ नियम जरी उपनिषदांनी सांगितला होता तरी ह्या बाबतीत उपनिषदे काही अपवाद मानीत असावीत असे दिसून येते. एखाद्या व्यक्तीला ब्रह्मज्ञान झाल्यानंतर देहाला मरण येण्यापूर्वी त्या व्यक्तीने केलेल्या चांगल्या अथवा वाईट कर्मापासून काहीही फले उत्पन्न होत नाहीत (छां. उप. ४·१४·३; बृह. उप. ४·४·२२; मुण्डक २·२·८ इ.). तथापि हा नियम ब्रह्मज्ञान होण्याच्या पूर्वी केलेल्या कर्मांना म्हणजे प्रारब्ध कर्मांना लागत नाही आणि अशा कर्मांची फले त्या देहाने त्याच्या पूर्वनियोजित मृत्युकालापर्यंत भोगलीच पाहिजेत आणि त्यानंतरच ती व्यक्ती मुक्त होते. (वे. सू. ४·१·१३।१५ वरील शांकरभाष्य).

दुसरा अपवाद विचारपूर्वक न केलेल्या वाईट कृत्यांच्या फलांविषयी आहे. अशा कृत्यांसंबंधी धर्मसूत्रात आणि स्मृतींत चर्चा केलेली असून अशा कृत्यांबद्दल **प्रायश्चित्त** घेण्याची कल्पना उत्पन्न झाली.

धार्मिक कृत्ये करण्यात येत असताना काही अपघात झाला अथवा चूक झाली अथवा एखादी अशुभ सूचक अथवा दुर्दैवी घटना घडून आली तर त्या दोषाचा परिहार करण्याकरिता वेदांच्या काळापासून काही विशिष्ट विधि करण्यात येत असत. परंतु त्यात सामान्यतः पातकांचा प्रश्न उपस्थित होत नसे. ह्या विषयाची गौ. ध. सू. (१९·३।१०) मध्ये केलेली चर्चा बहुधा सर्वात प्राचीन काळची आहे. पातकाकरिता केलेल्या प्रायश्चित्तांच्या परिणामकारित्वाविषयी **दोन** प्रकारची मते अस्तित्वात होती : अशा प्रायश्चित्तांपासून पातकांचा नाश होत नाही आणि त्या पातकांचे परिणाम भोगलेच पाहिजेत असे एक मत होते आणि प्रायश्चित्ते केल्याने शुद्धता प्राप्त होते अशी श्रुतिवचने आहेत म्हणून प्रायश्चित्ते करावी असे दुसरे मत होते. फक्त न कळत केलेली पातके प्रायश्चित्तांनी दूर होतात असे कोणाचे मत होते आणि ह्याच्या उलट बुद्धिपुरस्सर केलेली पातके देखील दूर करण्यात प्रायश्चित्ते समर्थ असतात अशा अर्थाची श्रुतिवचने असल्याचे अनुमान आहे असे मनु (११·४५) मध्ये म्हटले आहे. मनूने (११·४६) मध्ये असे प्रतिपादन केले आहे की पातकांकरिता प्रायश्चित्ते केलीच पाहिजेत, कारण तसे न केल्यास दुहेरी शासन भोगावे लागते म्हणजे दीर्घकालपर्यंत नरकाच्या यातना भोगाव्या लागून त्यानंतर शारीरिक व्यंग असलेल्या अथवा दोषयुक्त देहांमध्ये दुसरे जन्म घ्यावे लागतात. महापातके केल्यामुळे नरकवास भोगल्यानंतर घ्याव्या लागणाऱ्या निरनिराळ्या योनीतील जन्मांसंबंधी विस्तृत माहिती मनु (१२·५४।६९) आणि याज्ञ. (३·२०६।२०८ आणि २१२।२१५) यात दिली आहे.

उपनिषदांनी प्रतिपादन केलेला. कर्माची फले भोगलीच पाहिजेत हा अटळ सिद्धांत प्रायश्चिताच्या कल्पनेने एकवार ढिला करण्यात आल्यावर पातकांचे परिणाम दूर करण्याचे अथवा कमी करण्याचे प्रायश्चिताहून अन्य मार्ग अगदी प्राचीन काळी देखील शोधून काढण्यात आले. अशा मार्गात वेदाचा जप, तप, होम, उपोषण, दाने ही साधने गौतम [तस्य निष्क्रयणानि जपस्तपो होम उपवासो दानम्। – गौ. ध. सू. (१९·११),] ध. सू. (१९·११) मध्ये सांगितली आहेत. ज्यांना वेदाचे अध्ययन करण्याचा अधिकार नव्हता अशा शूद्रांकरिता कृष्णाचे नामस्मरण, तीर्थयात्रा, प्राणायामाचा अभ्यास ह्यांच्यासारखी साधने पुढे सांगण्यात आली. काही विशिष्ट पातकांच्या बाबतीत **पातकाची कबुली** दिल्याने मनुष्य पातकापासून मुक्त होतो असे अगदी प्राचीन काळी देखील मानले जात होते. मनूने (१२·२२७ आणि २३०) असा नियम सांगितला आहे की एखाद्या पातक्याने आपली पातके जाहीर केल्यास, त्याला अनुताप झाल्यास, त्याने तप आणि तपाची शक्ति नसल्यास वेदाचा जप, दान इत्यादि कृत्ये केल्यास तो त्या पातकांच्या परिणामापासून मुक्त होतो. अशा प्रकारच्या नियमांमुळे सामान्य लोकांत पातकांविषयी बेफिकिरीची वृत्ती उत्पन्न होण्याचा संभव असतो आणि धर्मशास्त्रावरील प्राचीन ग्रंथकारांना तशी वृत्ती उत्पन्न होऊ नये असे वाटत असल्यामुळे त्यानी पश्चात्ताप आणि पातकांची कबूली ह्या कल्पनांची सांगड पातकांकरिता नरक यातना आणि पुनर्जन्म हे शासन भोगावे लागते ह्या जुन्या कल्पनेशी घातली. उदाहरणार्थ, विष्णुपुराणात (२-६-४०) असा नियम सांगितला आहे की “एखादे पातक केल्यानंतर मनुष्याला जेव्हा अनुताप वाटेल तेव्हा त्याने; हरीचे स्मरण करणे हेच श्रेष्ठ प्रायश्चित्त केले म्हणजे पुरे होईल.” ख्रिस्तीधर्मशास्त्रातील ग्रंथांत अशाच स्वरूपाचे नियम दिले आहेत.

कर्माच्या काटेकोर नियमाप्रमाणे एका मनुष्याचे चांगले अथवा वाईट फल दुसऱ्या मनुष्याला देता येत नाही आणि कोणालाही दुसऱ्या कोणाच्या पातकाकरिता शासन भोगावे लागत नाही. परंतु पित्याच्या पातकाकरिता त्याच्या पुत्रांना देव शासन करण्याचा संभव असल्याची समजूत प्रचलित असल्याचे उल्लेख ऋग्वेदामध्ये (७·८६·५) आले आहेत. राजाला प्रजेच्या धर्माचा (पुण्याचा) अंश मिळतो आणि जो राजा करभार घेऊन प्रजेचे संरक्षण करित नाही त्याला प्रजेची सर्व पातके मिळतात असे मनूने (८·३०४।३०५, ३०८) मध्ये म्हटले आहे. त्याप्रमाणेच ज्या गृहस्थाकडून आदरसत्कार न होता अतिथि विमुख जातो त्याचे

पुण्य तो अतिथि हरण करतो आणि आपली सर्व दुष्कृत्ये त्याला देतो असे नियम स्मृतींत आणि पुरणांत सांगितले आहेत. [अतिथिर्यस्य भग्नाशो गृहात्प्रतिनिवर्तते।
स तस्मै दुष्कृतं दत्त्वा पुण्यमादाय गच्छति॥
– शान्तिपर्व (१८४·१२)] (शांतिपर्व १८४·१२). खोटी साक्ष देण्याबद्दलही असेच नियम सांगितले आहेत. (याज्ञ २·७५). अशा नियमांचा बहुधा शब्दशः अर्थ घ्यावयाचा हेतू नसतो. पती आणि पत्नी ह्यांच्या बाबतीतही पतिव्रता स्त्री आपल्या पुण्याने पतीचा उद्धार करते अशी वर्णने स्मृतींत आणि पुराणांत केली आहेत. (मनु. ५·१६४।१६६). त्या वर्णनांत अर्थवाद असला तरी बहुधा त्या काळच्या लोकांची भावना त्यांत व्यक्त केली आहे. चोरीसारख्या पापकृत्यांबद्दल राजाने शासन केले म्हणजे त्या पापाचा परिणाम नाहीसा होतो असे मनूने (८·३१८) म्हटले आहे.

मृत पितरांना पिंड अर्पण करण्याचा सांप्रदाय आणि कर्म आणि पुनर्जन्माचा सिद्धांत ह्यांचा समन्वय करणे अवघड आहे. मृत पूर्वजांच्या जीवांना उद्देशून पिंड अर्पण करण्याची पद्धती वेदांच्या काळी आणि बहुधा वेदकाळाच्याही पूर्वी अस्तित्वात होती आणि कर्म आणि पुनर्जन्माची कल्पना त्यानंतरच्या काळी निघाली आणि श्राद्धाच्या पद्धतीचा त्याग करावयास लोक तयार नसल्याकारणाने धर्मशास्त्रकारांनी दोन्ही प्रकार राहू दिले.

एखादा मनुष्य आयुष्यभर पातके करीत असला तरी त्याला मरणाच्या शेवटल्या क्षणी आलेल्या विचाराला अनुसरून पुढील जन्म प्राप्त होतो ही लौकिक समजूत देखील कर्म आणि पुनर्जन्माच्या सिद्धांताशी विसंगत आहे. ह्या समजुतीला भगवद्गीतेचा आधार नाही. (भ. गी. ८·५।७).

उपनिषदे (आणि त्यांच्यावरील भाष्ये), वेदांतसूत्रे (आणि त्यांच्यावरील भाष्ये) आणि भगवद्गीता ह्यांच्या व्यतिरिक्त कर्म आणि पुनर्जन्माच्या सिद्धांताचे सोपपत्तिक विवेचन केलेले फारच थोडे ग्रंथ आहेत. अशा प्रकारच्या ग्रंथांत आद्य शंकराचार्यांचा प्रियशिष्य पद्मपाद याचा 'विज्ञानदीपिका' नावाचा ग्रंथ तुलनेने जुना आहे. तसाच भट्ट वामदेव कृत 'जन्ममरणविचार' हा एक ग्रंथ आहे. दुसरा एक अलिकडील काळातील (इ. स. १८१९) 'प्रारब्ध ध्वान्त संहृती' ह्या नावाचा एक ग्रंथ अच्युतराय मोडक ह्या विद्वान ग्रंथकाराने नाशिक जवळच्या पंचवटी ह्या गावात रचला होता. ह्या विषयावर अनुकूल आणि प्रतिकूल मताचे मुख्यत्वे पाश्चात्य ग्रंथकारांनी लिहिलेलेही अनेक ग्रंथ आहेत. श्री. संजाना ह्या पारशी गृहस्थाने लिहिलेला 'पुनर्जन्माचा सिद्धांत' हा ग्रंथ सर्वात मोठा आणि सर्वात अलिकडील (१९५४) आहे. ह्या विषयावर श्री. अरविंद घोष ह्यांचा 'पुनर्जन्माचा सिद्धांत,' डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन् ह्यांच्या 'ब्रह्मसूत्रावरील ग्रंथाच्या प्रस्तावनेतील पा. १९४।२०७ मधील विवेचन इत्यादि दुसरेही अनेक ग्रंथ आहेत.

कर्माच्या आणि पुनर्जन्माच्या सिद्धांताविरुद्ध पाश्चात्य ग्रंथकारांनी घेतलेल्या काही आक्षेपांचा थोडक्यात उल्लेख करू. पाश्चात्य ग्रंथकारांची मते ख्रिस्ती धर्माच्या आधारावर बनलेली असतात. ख्रिस्ती धर्मात आत्मा अमर असल्याचे मानतात परंतु प्रस्तूत देहाच्यापूर्वी आत्मा अस्तित्वात असल्याचे मान्य करित नाहीत. मॅक्टेगार्ट ह्या ग्रंथकाराने अशा प्रवृत्तीचा निषेध करून असे म्हटले आहे की ज्या पुराव्यावरून आत्म्याचे अमरत्व सिद्ध होईल त्याच पुराव्यावरून पूर्वजन्म सिद्ध होईल.

प्रिंगल पॅटिसन ह्या ग्रंथकाराने पुनर्जन्माच्या सिद्धांताच्या विरुद्ध असा आक्षेप घेतला आहे की मनुष्याला पूर्वजन्माची आठवण नसते. ही गोष्ट कर्माच्या सिद्धांताच्या पुरस्कर्त्यांना मान्य आहे. मनुष्याला

प्रस्तुत जन्मात देखील बालपणातील पहिल्या एक दोन वर्षांत आपण काय केले हे स्मरत नाही तसेच वृद्धपणातही स्मृती नष्ट होते ह्यावरून बालपण अस्तित्वात नसते असे सिद्ध होत नाही. असेही म्हणता येईल की पूर्वीच्या जन्माच्या आठवणी नसतात ही देवाची दयाच समजली पाहिजे, कारण तसे नसते तर फार घोटाळे उत्पन्न झाले असते.

पाश्चात्य ग्रंथकारांनी दुसरा एक आक्षेप आनुवंशिकपणाच्या आधारावर घेतला आहे. मातापित्यांच्या आणि त्यांच्या अपत्यांच्या शारीरिक आणि केव्हा केव्हा मानसिक शक्तीत अतिशय साम्य दिसून येते. ह्या आक्षेपाला असे उत्तर देता येईल की कर्माच्या सिद्धांतामध्ये मनुष्याला आपल्या पूर्वजांकडून कोणत्या गोष्टींचा वारसा येतो हे सांगितलेले नसून आपल्या स्वतःच्या एक अथवा अनेक पूर्वजन्मांत केलेल्या कृत्यांचा कोणता परिणाम होतो हे सांगितलेले असते. अद्यापि.अज्ञात असणाऱ्या कोणत्यातरी नियमाला अनुसरून ज्या आत्म्याला पुनर्जन्म घ्यावयाचा असतो तो त्याच्या परिस्थितीला अनुरूप असणाऱ्या मातापित्यांच्या पोटी जन्माला येत असावा. शिवाय त्याच मातापित्यांची सर्वच अपत्ये त्यांच्या सारखी नसतात.

काही ग्रंथकारांनी असाही एक आक्षेप घेतला आहे की जगातील लोकसंख्या झपाट्याने वाढत आहे तेव्हा हे अधिक आत्मे कोठून येतात? ह्याला उत्तर असे देता येईल की मनुष्यांहून खालच्या दर्जाच्या प्राण्यांच्या स्वरूपात वागत असणारे आत्मे ज्या कर्मांच्या योगाने त्यांना नीच योनी प्राप्त झाल्या होत्या ती कर्मे संपल्यामुळे मनुष्यांच्या जन्मास येत असतील. काही पुराणांत आणि इतर ग्रंथात असेही सांगितले आहे की अत्यंत पातकी मनुष्य अधिकाधिक खालच्या दर्जाच्या जन्माला जातो. (वायु १४·३४। ३७; मनु. १४·६२।६८ इ.).

# विभाग १० : हिंदू (भारतीय) संस्कृतीतील वेदकालापासून इ. स. १८०० च्या सुमारापर्यंतच्या काळातील मूलभूत कल्पना, वैशिष्ट्ये आणि भावी धोरण

## प्रकरण ३६

### हिंदू (भारतीय) संस्कृतीतील मूलभूत आणि प्रमुख वैशिष्ट्ये

(मू. ग्रं. पा. ५।१६१३–१६५७)

धर्मशास्त्राच्या इतिहासाच्या आतापर्यंतच्या विवेचनात हिंदुसंस्कृतीमधील मूलभूत आणि महत्त्वाच्या वैशिष्ट्यांचे विवेचन प्रसंगानुसार जागोजागी करण्यात आले आहे. त्या सर्वांचे विखुरलेले धागे एकत्र करून अशा वैशिष्ट्यांचे महत्त्व वर्णन करणे अवश्य आहे.

'हिंदु' हा शब्द (हिंदु ह्या स्वरूपात) इराणचा सम्राट दरायस (ख्रि. पू. ५३२–४८६) आणि झर्सिस (ख्रि. पू. ४८६–४६५) यांनी सिंधु नदीच्या पश्चिमेकडील आणि पूर्वेकडील प्रदेशाला आणि त्या प्रदेशातील लोकांना लावल्याचे आढळते. परंतु ग्रीक लोक त्याच प्रदेशातील लोकांना 'इंडोल' असे म्हणत असत आणि त्या शब्दावरून 'इंडियन' हा शब्द बनला आहे. 'सिंधु' हा शब्द ऋग्वेदामध्ये अनेक वेळा आला असून त्या शब्दाने सिंधुं नदीचा बोध होतो. पाणिनीने, (४·३·९३) 'सिंधु' हा शब्द एक देश ह्या अर्थाने योजला आहे. पुराणात भारत वर्षाची मर्यादा सांप्रतच्या भारतासारखी असल्याचे म्हटले आहे. अशोकाने आपल्या आज्ञापत्रांत आपल्या राज्याला 'जम्बुद्वीप' म्हटले आहे. आणि सांप्रतकाळी देखील धार्मिक विधीच्या आरंभी जो दीर्घ संकल्प करण्यात येतो त्यांत 'जम्बुद्वीपे भरत वर्षे' हे शब्द असतात. ह्याकरिता आपण आपल्या देशासंबधी बोलताना योजावयाचा योग्य शब्द 'भारतवर्ष' असला पाहिजे. भारताच्या राज्यघटनेत या देशाला 'इंडिया म्हणजेच भारत' असे म्हटले आहे.

संस्कृति ह्या अर्थाचे इंग्रजी भाषेत 'कल्चर' आणि 'सिव्हिलायझेशन' हे शब्द असून कोणी ग्रंथकार ते समानार्थी मानतात आणि कोणी ग्रंथकार त्यांच्या अर्थांत भिन्नता असल्याचे मानतात. एका ग्रंथकाराने म्हटले आहे की सामान्यतः त्या शब्दांनी एखाद्या देशातील लोकांचे ज्ञान, धर्म, श्रद्धा, कला, नीतिमत्ता, कायदा, रूढि, आणि त्या देशातील मनुष्यांनी संपादन केलेली योग्यता, सवयी ह्या सर्वांचा समावेश होतो. एका ग्रंथकाराने म्हटले आहे की एखाद्या समाजातील धुरीण ज्या प्रकारचा जीवनक्रम आदर्श समजतात आणि जो जीवनक्रम त्या समाजातील इतर लोक तक्रार न करता चालू देतात ती त्या समाजाची संस्कृति होय.

मानव जातीच्या इतिहासातील गेल्या ६००० वर्षाच्या काळात अनेक संस्कृति उदयाला आल्या आणि अस्ताला गेल्या. थोडे अपवाद वगळता त्यांच्यापैकी बहुतेक संस्कृतींचे वर्णन त्या जन्माला आल्या, वृद्धिंगत झाल्या, अवनत झाल्या आणि नष्ट झाल्या आणि एकदा नष्ट झाल्यावर त्यांचे पुनरुज्जीवन झाले नाही एवढेच करता येईल. काही ग्रंथकार म्हणतात की संस्कृति उपजत नाहीत आणि मरण पावत नाहीत तर त्या दुसऱ्या प्रकारच्या संस्कृतीमध्ये मिसळून जातात.

जगात आतापर्यंत झालेल्या संस्कृतींपैकी भारतीय आणि चिनी ह्याच दोन संस्कृति अशा आहेत की

त्या अनेक परकीयांचे हल्ले झाले तरी कमीत कमी चार हजार वर्षे टिकून राहिल्या आहेत आणि त्यांनी आपल्या परंपरा अखंड चालू ठेवल्या आहेत. भारताने आपल्यावर हल्ला करणाऱ्या पर्शियन, ग्रीक, शक, हूण, तुर्क ह्यांच्यासारख्या आक्रमकांना आत्मसात करून घेतले, त्यांनी भारताच्या आध्यात्मिक विचारसरणीचा अंगीकार केला आणि त्यांनी भारताच्या सामाजिक व्यवस्थेत स्थान मिळविले. इतकेच नव्हे तर आपल्या वाङ्मयाचा, धर्माचा, कलांचा आणि संस्कृतींचा सिंहलद्वीप, ब्रह्मदेश, सयाम, सुमात्रा, बाली, चीन, तिबेट, जपान, मंगोलिया, कोरिया इत्यादि देशांत त्यांच्यावर स्वाऱ्या न करिता, मुख्यत्वेकरून शांततेच्या साधनांनी म्हणजे शिक्षण देऊन आणि मने वळवून प्रसार केला. बाली हे सुंदर बेट अद्यापिही हिंदु असून तेथे चार वर्ण अस्तित्वात आहेत.

भारतीय संस्कृति अनेक सहस्र वर्षे कशी टिकून राहिली ह्याबद्दल काहीतरी कारण शोधणे अवश्य आहे आणि असे कारण त्या संस्कृतीमधील मूलभूत कल्पना आणि वैशिष्ट्ये यांचा विचार केल्यास समाधानकारक रीतीने सांगता येईल. भारतीय संस्कृतीचे एक विशिष्ट स्वरूप आहे आणि तिचे मूल्यमापन केवळ युरोपियन परिमाणांनी करिता येणार नाही.

गेल्या काही शतकांत जगातील निरनिराळ्या समाजांना असा अहंकार झाला होता की आपण इतरांपेक्षा श्रेष्ठ असून काही विशिष्ट गोष्टींचा प्रचार करण्याची आपल्यावर जबाबदारी आहे. साम्राज्यवादी ब्रिटिश लोक म्हणत की अविकसित आणि मागासलेल्या लोकांच्या हिताकरिता आणि उन्नतीकरिता आपण 'श्वेत मनुष्याचे ओझे' वाहत असतो. वास्तविकपणे त्यांनी आपल्या सत्तेखालील लोकांना दरिद्री बनविले होते. त्याप्रमाणेच भांडवलवाल्यांच्या हातातून सामान्य जनतेला मुक्त करून पृथ्वीवर स्वर्ग निर्माण करण्याचे कार्य आपल्यास करावयाचे आहे असे रशिया म्हणत आहे. सांप्रतकाळी काही भारतीय लोकही अशी प्रौढी मिरवितात की धर्मश्रद्धा भारताखेरीज अन्यत्र कोठेही अस्तित्वात नाही. 'कृण्वन्तो विश्वमार्यम' ह्या ऋग्वेदातील (९·६३·५।६) शब्दांच्या आधारावर काही लोक असे प्रतिपादन करतात की वेदांनी सर्व जग आर्य करण्याची कामगिरी आपल्या देशाकडे सोपविली आहे. ह्या बाबतींत असे सांगणे अवश्य आहे की वेदांतील त्या वचनाचा तसा अर्थ होत नाही. इंद्राप्रीत्यर्थ केलेल्या सोमयागाच्या योगाने विश्व आर्य होईल असे त्या ऋचेत सूचित केले आहे असा फारतर त्याचा अर्थ लावता येईल. आधुनिक काळचे भारतीय लोक जगाला देऊ शकतील आणि त्याचा प्रसार करू शकतील असा कोणताही संदेश त्या ऋचांत नाही. धर्मनिष्ठेबद्दल इतकेच म्हणता येईल की धर्मनिष्ठेला हिंदुधर्मात फार महत्वाचे स्थान आहे आणि दुसऱ्या कोठल्याही लोकांपेक्षा धर्मनिष्ठेचा हिंदु लोकांत अधिक फैलाव झालेला आहे.

गेल्या चार पाचशे वर्षांच्या काळांत ख्रिस्ती धर्मीय पाश्चात्य राष्ट्रे सूक्ता-सूक्त मार्गांनी आणि आधुनिक शास्त्रीय शोधांचा उपयोग चढाओढ करण्याच्या कामी करून मागसलेल्या देशांची आणि लोकांची पिळणूक करण्यात गुंतली होती. परंतु गेल्या दोन जागतिक युद्धात झालेल्या द्रव्य आणि मनुष्य हानीमुळे आणि अणुअस्त्राच्या उपयोगाने अखिल मानवजातीचा अथवा त्यांतील बऱ्याच भागाचा नायनाट होण्याची शक्यता दिसून आल्यामुळे त्या देशांतील अनेक विचारवंतांचे डोळे उघडले आहेत आणि जर जगांतील आधुनिक सुशिक्षित समाजस्थिती आणि संस्कृति नष्ट होऊ द्यावयाची नसेल तर राष्ट्रांनी सदाचरणाची आणि न्यायाची आवड, दुसऱ्यांबद्दल सहानुभूति, विश्वबंधुत्व ह्यांच्यासारखे आध्यात्मिक गुण (मूल्ये) वाढविले पाहिजेत असे त्यांना वाटू लागले आहे. जरी आमच्या देशांतील प्राचीन ऋषींनी आणि धर्मशास्त्रावरील ग्रंथकारांनी आध्यात्मिक गुणांना फार महत्व दिले असले तरी आपल्या समाजांतील बहुसंख्य लोकांच्या आणि त्यांचे पुढारी म्हणविणाऱ्यांच्या ठिकाणी त्या गुणांचा अनेक शतकेपर्यंत अभाव होता. करिता आपल्या गतवैभवाची

केवळ प्रशंसा करण्याऐवजी सर्व सुशिक्षित भारतीयांनी अंतर्मुख व्हावे आणि १३ व्या शतकापासून आमच्या स्वातंत्र्याचा अंत का झाला ह्याची कारणे शोधून काढावी. परदेशी आक्रमकांची संख्या थोडी असून आणि भारतीय सैन्यांतील सैनिकांचे वैय्यक्तिक धैर्य आणि मरणाविषयी निर्भयता कौतुक करण्यासारखी असूनही आमचा पराजय का झाला, सर्व भारतभर कायमचे असे मध्यवर्ती राज्य स्थापन करता कां आले नाही, भारतांतील उत्कृष्ठ नैसर्गिक साधनांचा उपयोग करून व्यापार आणि उद्योगधंदे यांत वर्चस्व स्थापन का करिता आले नाही ह्यांच्या सारख्या वरचेवर विचारल्या जाणाऱ्या प्रश्नांचा विचार केला पाहिजे आणि आता शेकडो वर्षांनंतर भारतानें स्वातंत्र्य प्राप्त करून घेतले आहे तेव्हा आपल्या दोषांची सर्व व्यापक आणि प्रामाणिक चिकित्सा केली पाहिजे.

बहुतेक हिंदूंना एकत्र करतील अशा फक्त कांही थोड्या बाबी आहेत. त्या म्हणजे कर्म आणि पुनर्जन्माचा सिद्धांत, विस्तृत आणि मानास्पद असे संस्कृत वाङ्मय, वेदांबद्दल पूज्यता, मानससरोवरापासून रामेश्वरपर्यंतची तीर्थक्षेत्रें ह्या होत. परंतु सर्व हिंदूंमध्ये परिणामकारक ऐक्य उत्पन्न होण्यास ह्या थोड्या गोष्टी, पुरेशा नव्हत्या. आमच्यातील पुष्कळ लोक योग्यता नसूनही अध्यात्मवादी बनले, आचारांत आणि विचारांत फार मोठे अंतर पडले फसून परधर्मात गेलेल्यांना परत घेण्यात आले नाही, अस्पृश्यता मानण्यात येत असे इत्यादि दोष आमच्या समाजात होते आणि आहेत.

हिंदू अथवा भारतीय संस्कृतीची कांही विशिष्ट लक्षणे खालीलप्रमाणे आहेत :—

१) धार्मिक आचार आणि रूढि यांची अखंड परंपरा;

२) देश विस्तृत असल्यामुळे राजांचे ध्येय सम्राट होणे हें असे, राजाराजांमध्ये आणि लहान अधिपतींमध्यें वरचेवर लढाया चालत असत;

३) भिन्न भिन्न संस्कृतींमध्ये उग्र स्वरूपाचा संघर्ष उत्पन्न झाला नाहीं, धर्ममतांबद्दल सहिष्णुता वसत असे आणि भिन्न भिन्न मतांचा समन्वय करण्याकडे नेहमी प्रवृत्ती असे.

आमच्या विद्वान लोकांनी विशेषतः ११ व्या शतकापासून पुढे वेदान्त, काव्य, शास्त्र, श्राद्ध, दान इत्यादि विषयांवर सहस्त्रावधि ग्रंथ लिहिले परंतु त्यांनी आमच्यामधील दोषांची चिकित्सा केली नाही, विज्ञानांमधील आणि औद्योगिक कलाशास्त्रात जगभर लागलेल्या शोधांची माहिती करून घेतली नाही आणि आपण नवे शोध लावले नाहीत, आधुनिक तोफा आणि बंदुका यांचे कारखाने काढले नाहीत, बलिष्ठ आरमार स्थापन केले नाही.

हिंदु संस्कृतीची काही विशिष्ट लक्षणे वर सांगितली आता काही महत्त्वाची वैशिष्ट्ये सांगू :

(१) देव एकच आहे. ऋग्वेदाच्या काळाइतक्या पूर्वीच्या काळात देखील अस्तित्वात असलेली अत्यंत ठळक अशी कल्पना म्हणजे जरी लोक तिला इंद्र, मित्र, वरुण, अग्नि इत्यादी नावे देत असले तरी आणि त्या नावांनी तिची उपासना करीत असले तरी खरी अथवा सारभूत अशी वस्तु एकच आहे. महाभारत, पुराणे, काव्ये यांत आणि मध्ययुगीन काळात जरी विष्णु अथवा शिव ह्यांच्या उपासनांसारखे निरनिराळे अनेक सांप्रदाय आणि मतभेद उत्पन्न झाले होते तरी त्या काळीदेखील बहुतेक सर्व हिंदूंच्या मनात अशी

जाणीव असे की भिन्न भिन्न नावांनी संबोधला असला तरी देव एकच आहे.

(२) वरील कल्पनेवरूनच परमताविषयी आणि उपासनांविषयी सहिष्णुता उत्पन्न झाली.

(३) प्रत्येक व्यक्तीमधील आत्मा आणि ब्रह्म ह्यांत भेद नसतो. जे भेद दिसतात ते वरकरणी असतात. कोळी, दास, जुगारीइतकेच नव्हे तर निर्जीव सृष्टि देखील ब्रह्माहून भिन्न नसते. प्राचीन भारतातील शिक्षण आणि समाजशास्त्र ही अनेकात एकत्व पाहण्याच्या कल्पनेवर आधारलेली होती. सत्य स्वरूपातील वेदान्त हा नीतिमत्तेचा सर्वात बलिष्ठ आधार आहे.

(४) प्रत्येक व्यक्तीला देव, ऋषि आणि पितर ह्यांची ऋणे असतात आणि ती ऋणे अनुक्रमे यज्ञ करून, विद्येचे अध्ययन करून आणि पुत्रांची उत्पत्ती करून फेडावयाची असतात.

(५) प्रत्येक व्यक्तीने प्राप्त करून घ्यावयाची ध्येये अथवा पुरुषार्थ धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष असे चार असतात. फार प्राचीन काळापासून धर्माला महत्त्व देण्यात आले आहे. धर्म हा सर्व विश्वाचा आधार असतो असे तै. [धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा। लोके धर्मिष्ठं प्रजा उपसर्पन्ति।
धर्मेण पापमपनुदति धर्मे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्धर्मं परमं वदन्ति॥
– तै. आ. (१०·६३).] आर. (१०—६३) मध्ये म्हटले आहे. धर्माहून उच्च काही नाही (बृह. उप. १-४-१४). महाभारतात [धर्मे चार्थे च कामे च मोक्षे च भरतर्षभ।
यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत्क्वचित्॥
– आदिपर्व (६२·५३).] म्हटले आहे की चार पुरुषार्थांचे सर्व ज्ञान महाभारतात आले असून भारतात नाही ते दुसऱ्या कोणत्याही ग्रंथांत सापडणार नाही. त्याच ग्रंथात (उद्योग १२४-३४।३८) धर्म हा सर्वामध्ये श्रेष्ठ पुरुषार्थ असून अर्थ मध्यम आणि काम कनिष्ठ प्रतीचा पुरुषार्थ असल्याचे सांगितले आहे. आपल्या वर्णाला अनुरूप अशा कर्मांनी आणि दुसऱ्याना पीडा न देता आपल्या गरजेपुरते धन मिळवावे (मनु ४·३ आणि १५). धर्माशी विरुद्ध नसतील अशा सर्व सुखांचा उपभोग घ्यावा (आप. घ. सू. २·८·२०·२२।२३). धर्म, अर्थ आणि काम ह्या तिहींत विरोध उत्पन्न झाल्यास धर्माचा स्वीकार करून दुसऱ्या दोहोंचा त्याग करावा (महाभारत अनुशा. १११·१८।१९).

तीन पुरुषार्थांच्या कल्पनेचा निष्कर्ष असा आहे की आपले कर्तव्य करावे, मोहाच्या जाळ्यात सापडू नये (गीता २·४७, ३·१९); दुसऱ्याने आपल्याशी जसे आचरण करावे असे आपणाला वाटते तसे आचरण आपण दुसऱ्याशी करावे (गीता ६·३२); धर्माशी विरोध न करिता आणि इतरांना पीडा न देता द्रव्य मिळवावे; विषयसुखाच्या बाबतीत शुद्ध आचरण करावे आणि सौंदर्याचा उपभोग घ्यावा. धर्मशास्त्रावरील ग्रंथांत खरा निराशावाद आलेला नाही. अनुशासन पर्वात (१४६·७६।८०) असे व्यवहार्य आणि हितकारक नियम सांगितले आहेत की प्रत्येकाने खऱ्या मार्गाने आणि सदाचरणाने धन मिळवावे, अशा धनाचे तीन भाग करून त्यांतील एका भागाने धर्म आणि अर्थ हे पुरुषार्थ साधावे, दुसरा भाग धर्माशी विरोध नसणाऱ्या कामाचा (सुखांचा) उपभोग घेण्यात खर्च करावा आणि तिसरा भाग धनाचा संचय करावा.

चौथा पुरुषार्थ जो मोक्ष तो केवळ थोड्या लोकांना प्राप्त करून घेणे शक्य असते. तो प्राप्त करून घेण्याचा मार्ग अत्यंत अवघड असतो. शिवाय मोक्षासंबंधी कल्पना निरनिराळ्या सांप्रदायांत निरनिराळ्या असतात ही अडचणही मोक्ष पुरुषार्थ मिळविण्यात असते. मनुष्याचा स्वभाव वास्तविक दैवी प्रकृतीचा असतो. आपले ईश्वराशी अभेदत्व आहे ही गोष्ट जाणणे आणि ईश्वराशी प्रत्यक्ष तादात्म्य पावणे हे मनुष्याला

शक्य आहे आणि हाच मानवी जीवनाचा अंतिम हेतु असावा.

धर्माच्या बाबतीत असा एक गैरसमज अस्तित्वात आहे की आमचा धर्म हा सनातन असल्याकारणाने त्यात कोणताही फेरबदल करू नये. आमचा धर्म सनातन आहे ह्याचा अर्थ आमची संस्कृति अत्यंत प्राचीन आहे आणि तिला दीर्घ परंपरेचा आधार आहे असा आहे. प्राचीन काळापासून मध्ययुगीन काळापर्यंत अनेक फेरफार करण्यात आले आहेत. मनु, याज्ञ., विष्णु ध. सू., पुराणे इत्यादि ग्रंथांत असे सांगितले आहे की एकेकाळी धर्म म्हणून समजल्या जाणाऱ्या गोष्टी लोकांना निंद्य वाटू लागल्या आणि त्यांच्यापासून लोकांना दुःख होऊ लागले तर त्यांचा त्याग करावा.

धर्माचे निरनिराळ्या दृष्टिकोनातून निरनिराळे वर्ग करण्यात आले आहेत. उदाहरणार्थ, श्रौत आणि स्मार्त, वर्णधर्म, आश्रमधर्म, गुणधर्म, नित्यधर्म, नैमित्तिक धर्म, सामान्य धर्म. ह्या वर्गवारीवरून हिंदु धर्मात वर्ण आणि जाती ह्यांचे अस्तित्व आहे हे महत्वाचे वैशिष्ट्य कळून येते.

(६) वर्ण आणि जाती ह्या विषयाचे विवेचन प्रस्तुत ग्रंथात पूर्वी एकदा खंड २ मध्ये करण्यात आले आहे. सांप्रतकाळी भारतामध्ये कित्येक हजार जाती आणि पोट जाती अस्तित्वात आहेत. त्या कशा उत्पन्न झाल्या हा प्रश्न सोडविणे अशक्य आहे. ही जातिसंस्था ब्राह्मणांनी निर्माण केली आहे असा आरोप कित्येक पाश्चात्य ग्रंथकारांनी केला आहे. परंतु हा आरोप निराधार आहे. निरनिराळ्या धर्मसूत्रांत आणि स्मृतींत भिन्न भिन्न जातींच्या आणि वर्णांच्या स्त्रीपुरुषांच्या विवाहापासून आणि संबंधापासून मिश्रजाती कशा निर्माण झाल्या ह्याविषयी विस्तृत वर्णने केलेली आहेत. ह्या प्रकाराला संकर अथवा वर्णसंकर अशी संज्ञा आहे आणि असा संकर होणे हे अनिष्ट समजले जाई. असा वर्णसंकर होऊ न देण्याची जबाबदारी राजा आणि विद्वान ब्राह्मण ह्यांच्यावर असल्याचे समजले जाई.

मूळची वर्णव्यवस्था स्वाभाविक होती आणि ती जन्मावर आधारलेली नव्हती. वेदांच्या काळी फक्त काही विशिष्ट वर्ग होते आणि आधुनिक काळच्या अर्थाच्या जाती अस्तित्वात नव्हत्या. स्मृतींच्या काळी अनेक जाती उत्पन्न झाल्या होत्या परंतु त्या काळीदेखील सर्वांत अधिक महत्त्व जातींच्या अधिकारांना न देता त्यांच्या कर्तव्यांना आणि नैतिक शीलाला आणि मानवी प्रयत्नांनी मिळविलेल्या योग्यतेला दिले जात असे. महाभारताच्या काळी स्वयंपूर्ण आणि तुटक जाती असाव्यात किंवा नाही ह्याविषयी बरीच खळबळ झाली असावी असे त्या ग्रंथांतील ठिकठिकाणच्या विवेचनावरून दिसून येते. पुराणांत चार वर्णांचे विशेष गुण कोणते असावे हे सांगितलेले असते. धर्मशास्त्रावरील सर्व ग्रंथांत अशा विशिष्ट गुणांव्यतिरिक्त काही नैतिक गुणांना अत्यंत महत्त्व दिलेले असते. ब्राह्मणांच्या दृष्टी समोर अति उच्च प्रकारचा आदर्श ठेवलेला असे. दारिद्र्य, साधी राहणी आणि उच्च विचारसरणी, द्रव्यार्जनाकडे अति लक्ष न देता प्राचीन वाङ्मयाचे अध्ययन आणि जतन करणे, त्यांत भर घालणे ही ब्राह्मणांची कर्तव्ये असत आणि त्या आदर्शाप्रमाणे वागण्याचा त्यांच्यापैकी बरेच लोक प्रयत्न करीत असत आणि ह्याच कारणाने ब्राह्मणांच्या पाठीशी लष्करी सामर्थ्य नसताना देखील कमीतकमी तीन हजार वर्षेपर्यंत सामान्य लोकांनीच नव्हे तर सरदारांनी आणि राजांनी ब्राह्मणांना पूज्य मानले. प्राचीन भारतीय संस्कृतीमध्ये शरीरापेक्षा मनाला आणि आत्म्याला अधिक श्रेष्ठ मानले जात असे.

सध्या अस्तित्वात असलेल्या प्रकारची जातिसंस्था समाजाला अप्रिय आणि अहितकारक झाली असल्यास तिचे उच्चाटन करण्यास हरकत नाही. परंतु ते कार्य अल्पकाळात अथवा कायद्याच्या बळावर

करता येणार नाही. त्याकरिता दीर्घ प्रयत्न करावे लागतील. निवळ जातिसंस्थेविरुद्ध टीका करून ते कार्य होणार नाही. जातिसंस्था नष्ट झाली तरी ज्या तत्त्वांच्या आधारावर हिंदुधर्म जगला ती सर्व तत्त्वे लयाला जाणार नाहीत. आमच्या अवनतीचे जातिभेद हे एकमेव अथवा अत्यंत महत्वाचे कारण आहे असे सतत म्हणत राहणे चांगले नाही. दुसऱ्या अनेक देशांत आणि समाजांत जाती नसूनही ते मागसलेल्या स्थितीत राहिले होते. अनेक शतकेपर्यंत असलेली आमची अवनती आमच्या देशातील खालच्या आणि वरच्या सर्व दर्जाच्या लोकांत काही विशिष्ट सद्‌गुणांचा अभाव असल्यामुळे झाली. करिता जातिसंस्थेला त्याबद्दल दोष देण्याचे बंद करून जातिसंस्थेचे निर्मूलन करण्याचे अथवा तिच्यातील दोष नाहीसे करण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. कर्तव्यबुद्धीने कर्तव्य करणे, दीर्घ प्रयत्न करणे, उच्च नैतिक आचरण, राष्ट्रीयत्वाची भावना, स्वातंत्र्य प्रीति, न्यायप्रियता ह्यांच्यासारखे सद्‌गुण आमच्यामध्ये निर्माण केले पाहिजेत. अशा योजनात प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षणाचा सर्व जातीत अधिकाधिक प्रसार करणे, मिश्रविवाह करणे, संस्कृतीच्या ऐक्याची भावना वाढविणे इत्यादिकांचा समावेश केला पाहिजे आणि त्याकरिता अनेक स्वार्थत्यागी, उच्च शीलसंपन्न, कर्तव्यनिष्ठ अशा लोकांची आवश्यकता आहे.

(७) **आश्रम.** आश्रमसंस्था हे आमच्या संस्कृतीमधील दुसरे एक महत्वाचे वैशिष्ट्य आहे. ही व्यवस्था ख्रिस्ती शकापूर्वी अनेक शतकांपासून निश्चितपणे अस्तित्वात आहे. आश्रम हा शब्द वेदसंहिता अथवा ब्राह्मण ग्रंथांत आलेला नाही. तथापि काही काही आश्रम ऋग्वेदाच्या काळापासून खात्रीने माहित असले पाहिजेत. सूत्रग्रंथांच्या [चत्वार आश्रमा गार्हस्थ्यमाचार्य कुलं मौनं वानप्रस्थ्यमिति।
– आप. ध. सू. (२·९·२१·१)] बऱ्याच अगोदर निदान ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ अथवा वैखानस आणि संन्यास हे चार आश्रम अस्तित्वात होते.

वर्णव्यवस्थेने संपूर्ण समाजाचे भाग पाडले होते आणि तिचा संबंध सर्वसामान्य जनसमूहाशी होता. त्याप्रमाणेच आश्रमांचा संबंध समाजांतील प्रत्येक व्यक्तीशी असतो आणि प्रत्येक व्यक्तीने निरनिराळे पुरुषार्थ (आयुष्यांतील ध्येयें) साध्य करून घेण्याकरिता लागणारी तयारी कशी करावी ह्याचा आराखडा आश्रमव्यवस्था घालून देते. चार आश्रम हे व्यक्तीच्या आयुष्यांतील क्रमाक्रमाने येणारे टप्पे असतात. सामान्यतः मनुष्याची आयुर्मर्यादा १०० वर्षे अथवा १०० हिवाळे अथवा १०० वर्षाऋतु असल्याचे ऋग्वेदामध्ये (६·४·८. इ.) सांगितले आहे. आपण किती काळपर्यंत जगू हे कोणालाही सांगता येणे शक्य नसल्या कारणाने, ह्या चार आश्रमांपैकी प्रत्येकाचा अवधि २५ वर्षांचा होता अशी कल्पना करू नये; मनुष्य जर दीर्घ काळपर्यंत जिवंत राहिला तर त्याने ह्या चार टप्प्यांतून जावे एवढाच अर्थ समजावा. ह्या चार आश्रमांच्या क्रमाविषयीही मतभेद होते.

ह्यासंबंधी सविस्तर विवेचन ह्या इतिहासाच्या दुसऱ्या खंडात केले आहे. आश्रमव्यवस्थेविषयी ड्यूसन ह्या विद्वान ग्रंथकाराने असे प्रशंसोद्‌गार काढले आहेत की मानवजातीच्या संपूर्ण इतिहासात आश्रमांच्या कल्पनेतील भव्यतेशी बरोबरी करू शकतील अशा फारशा कांही गोष्टी उत्पन्न झालेल्या नाहींत.

(८) **कर्म आणि पुनर्जन्म यांच्यासंबंधी सिध्दान्त**. हिंदु धर्म आणि तत्त्वज्ञान यांच्या अत्यंत महत्त्वाच्या सिद्धान्तांपैकी हा एक आहे आणि त्याचे दीर्घकालीन अस्तित्व आणि त्यासंबंधी झालेले प्राचीन विस्तृत वाङ्‌मय ह्यांच्या दृष्टीने तो सिद्धान्त अपूर्व आहे. त्याचे विवेचन वेगळ्या प्रकरणांत केले आहे.

(९) **अहिंसेविषयीचा सिध्दान्त.** हादेखील महत्त्वाचा सिद्धान्त आहे. उप., महाभारत, धर्मशास्त्रे

आणि पुराणे ह्यांच्या दृष्टीने अहिंसा ह्या विषयाचे विवेचन ह्या इतिहासाच्या दुसऱ्या खंडांत करण्यात आले आहे. काही यज्ञांत आणि ऋतूंमध्ये (सोमयागासाख्या मोठ्या यज्ञांमध्ये) पशूचे बलिदान करण्यात येत असे. ऋग्वेदाच्या काळी देखील लोकांना असे वाटू लागले होते की अग्नीची उपासना समिधा, धान्य वगैरेनीं केली अथवा वेदाध्ययन, नमस्कार, अथवा यज्ञांच्या रूपाने केली तरी ती सारख्याच योग्यतेची होते. पुढे यज्ञात बलिदान करावयाच्या पशूच्या सभोवती जळते कोलित फिरवून त्या पशूला अहिंसेकरता सोडून देण्यात येऊ लागले असे तै.ब्रा. (३·९·३·३) वरून दिसून येते. ही अहिंसेची कल्पना शुचित्वाच्या कल्पनेवरून निघालेली नसून इतर सर्व जीव देखील ब्रह्मच असतात ह्या भावनेतून उत्पन्न झाली होती. महाभारत आणि स्मृति ह्यांनी अहिंसा आणि शौच (पवित्रता) ह्यांचा समावेश सर्वांना लागू पडणाऱ्या सामान्य धर्मांत केला आहे.

फक्त जैन धर्मांत पूर्ण अहिंसेचा उपदेश केला होता आणि तो आचरणातही येत असे. बुद्धाचा मांस भक्षणाला विरोध नव्हता. मात्र त्या प्राण्याची हत्या बुद्धाच्या स्वागताकरिताच मुद्दाम केलेली नसली म्हणजे झाले.

(१०) **कर्ममार्ग, भक्तिमार्ग आणि ज्ञानमार्ग** ह्यांच्याविषयी विवेचन मागे करण्यात आले आहे. निष्काम कर्मयोग ह्या नावाचा दुसरा एक सिद्धांत भगवद्गीतेत प्रतिपादन केला आहे आणि त्याचेही विवेचन मागे केले आहे. कोणत्याही फलाची इच्छा न धरता आपल्या कर्तव्याचे पालन करणे ही परमेश्वराची उपासना आहे असा तो सिद्धांत आहे.

(११) **अधिकार-भेद**. धार्मिक उपासनेच्या आणि तत्वज्ञानाच्या बाबतीत मनुष्यप्राण्यात निरनिराळे दर्जे असतात ही गोष्ट भारतात फार प्राचीन काळापासून मान्य करण्यात आली आहे. अध्यात्म शास्त्रातील गूढ सिद्धांत आकलन करण्याची आणि त्यांचे आचरण करण्याची पात्रता सर्वांना नसते. ह्याकरिता असे सिद्धांत गुप्त ठेवावे असे उप. आदि ग्रंथांत पुष्कळ ठिकाणी सांगितले आहे. अशाच प्रकारची प्रवृत्ती प्राचीन काळच्या इतर राष्ट्रातही होती. आधुनिक काळचे अनेक ग्रंथकार मूर्तिपूजा करणाऱ्या लोकांची निंदा करतात. हिंदु लोकांत मूर्तिपूजा प्रचलित आहे. परंतु त्याबद्दलची त्यांची भावना अशी असते की त्यावेळेपुरता त्या वस्तूमध्ये देव वसत असतो. देव सर्वत्र आहे. तो तुमच्यात, माझ्यात आणि लाकडाच्या प्रतिमेत देखील आहे अशीच सर्वसामान्य लोकांची भावना असते. युरोपातील अनेक ख्रिस्ती मंदिरात मॅडोना अथवा विशिष्ट धातूंच्या मूर्तीची अथवा चित्रांची पूजा होत असते. त्यावरून युरोपातील अनेक ख्रिस्तीधर्मीयांचा मूर्तिपूजा करण्याकडे कल आहे असे म्हटल्यास ते चुकीचे होणार नाही.

(१२) **विस्तृत संस्कृत वाङ्मय**. भारतामध्ये संस्कृत भाषेत निदान ३००० वर्षाइतक्या काळात अतिशय वेगवेगळ्या स्वरूपाचे आणि वाङ्मयाच्या निरनिराळ्या शाखांत अनेक विस्तृत ग्रंथ निर्माण झाले ही गोष्ट सर्व जगाच्या इतिहासात अपूर्व आहे. गणितशास्त्रातील दशम स्थानाचे मूल्य ह्या देशात शोधण्यात आले. ह्या संस्कृत वाङ्मयाच्या आधारावर १८ व्या आणि १९ व्या शतकांच्या अखेरीला युरोपखंडातील लोकांनी भाषाशास्त्र, तुलनात्मक धर्मशास्त्र इत्यादि अनेक शास्त्रे निर्माण केली. भारताने आपल्या स्वतःच्या हिताकरिता आणि जगाच्या हिताकरिता विस्तृत वाङ्मय जतन करून ठेवले आहे. त्यातील बऱ्याच ग्रंथांत असा उपदेश केला आहे की मनुष्याने आपल्या इंद्रियांचे नियमन करून अधिकाधिक उच्च अशा नैतिक आणि आध्यात्मिक योग्यतेला पोचण्याचा अखंड प्रयत्न करावा.

(१३) **योग.** सर्व जगामध्ये योगासारखी शारीरिक आणि नैतिक शिस्त उत्पन्न करणारी, विचारपूर्वक तयार केलेली आणि व्यापक स्वरूपाची दुसरी एकही पद्धति बहुधा अस्तित्वात नसेल. योग हे भारतीय संस्कृतीचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. पाश्चात्य लोकांनी आर्थिक बाबतीत अतिरेक अनुभविला परंतु त्यामुळे निरनिराळे ओढाताणीचे प्रसंग आणि संघर्ष उद्भवले आणि आता त्यांची प्रवृत्ती योग आणि वेदान्त ह्यांच्यासारख्या भारतीय तत्त्वज्ञानाकडे अधिकाधिक होऊ लागली आहे.

(१४) **तत्त्वज्ञान**. आपल्या तत्त्वज्ञानांपैकी बऱ्याच तत्त्वज्ञानांची मध्यवर्ती कल्पना 'तत्त्वमसि' (छां. उप ६·१) अथवा जीव आणि ब्रह्म यांचे अभिन्नत्व असते ही आहे. तत्त्वज्ञानाची जिज्ञासा असणाऱ्यांना भारतीय तत्त्वज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांत अतिशय विस्तृत सामग्री आढळेल. जगातील प्राचीन अशा कोणत्याही देशांना ह्या बाबतीत भारतापेक्षा क्वचितच वरचढ करता येईल. तत्त्वज्ञानाचा निदर्शक 'दर्शन' हा शब्द आहे. सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्व मीमांसा आणि उत्तर मीमांसा अथवा वेदान्त अशी सहा प्रमुख दर्शने आहेत. भारतीय तत्त्वज्ञान अध्यात्माशी केंद्रित झालेले असते. तत्त्वज्ञानाची नुसती चर्चा करून भागत नाही तर ते आचरणात आणले पाहिजे असा आग्रह असतो. बहुतेक तत्त्वज्ञानांचा उद्देश ब्रह्मप्राप्ती हा असून त्याकरिता फार मोठी नैतिक तयारी करण्याची आवश्यकता असते.

(१५) **कला, शिल्प, चित्रकला**. भारतातील प्राचीन काळच्या स्मृतिचिन्हांपैकी सांची येथील स्तूप, अजिंठ्याची लेणी, वेरूळ येथील कैलासमंदिर, ओरिसातील कोनारक देवालय ही प्रमुख आहेत.

काही काही पुराणांत ह्या कलांसंबंधी उल्लेख आहेत. उदाहरणार्थ, मत्स्य पुराणात (२५२-२।४) भृगु, अत्रि प्रभृति वास्तुशास्त्राच्या आठ प्रणेत्यांची नावे दिली आहेत; विष्णुधर्मोत्तर पुराणाच्या तिसऱ्या खंडाला चित्रसूक्त अशी संज्ञा असून त्यात नृत्यकलेसंबंधी विवेचन केले आहे. वराहमिहिराच्या बृहत्संहितेमध्ये राजवाडे, देवालये, देवतांच्या मूर्ती, पुतळे इत्यादि विषयांचे विवेचन केले आहे. भोजकृत युक्तिकल्पतरु, सोमेश्वरकृत अभिलषितार्थ चिन्तामणि, शिल्परत्न इत्यादि दुसरेही ह्याविषयावरील संस्कृतग्रंथ आहेत. प्राचीन कालची सुप्रसिद्ध चित्रे फक्त अजिंठा येथील लेण्यांत, ग्वालेर नजीकच्या बाघ येथील लेणी आणि सिंहलद्वीपांमधील सिगिरिया येथील लेणी ह्यांतच अस्तित्वांत आहेत. अनेक पाश्चात्य लेखकांनी अजिंठ्याच्या लेण्यांतील चित्रांविषयी गौरवपर वर्णने लिहिली आहेत आणि त्यासंबंधी अनेक ग्रंथही झाले आहेत. दक्षिण भारतामधील वास्तुशास्त्र आणि खोदकाम ह्यांच्यामध्ये एक वेगळ्याच प्रकारचे वैशिष्ट्य आहे. संगीत ह्या विषयावरही अनेक ग्रंथ लिहिण्यात आले आहेत. भारतीय वास्तुशास्त्र आणि मूर्ती करण्यासंबंधी संकेत ह्यांचा प्रसार जावा, बाली आणि इंडोनेशियामधील इतर प्रदेश ह्यांत झाला.

आणखीही काही थोड्या वैशिष्ट्यांचा उल्लेख करता आला असता. दुसऱ्या कोणत्याही संस्कृतीमध्ये ही वैशिष्ट्ये नव्हती अथवा नाहीत असे म्हणता आले नाही तरी जगांतील कोणत्याही संस्कृतीमध्ये ही **सर्व** वैशिष्टये सध्या अथवा पूर्वीच्या काळी असलेली आढळू शकणार नाहीत एवढेतरी खात्रीने म्हणता येते. मनुष्य, त्याच्याहून खालच्या दर्जाचे प्राणी इतकेच नव्हे तर अचेतन वस्तु देखील तत्त्वतः एकाच स्वरूपाच्या आहेत ही वेदान्ताची उदात्त भावना, भिन्न भिन्न धार्मिक मतांच्या आणि तत्त्वज्ञानांच्या बाबतींत सर्वकाळी दाखविण्यांत आलेली थोर सहिष्णुता, सत्य आणि अहिंसा ह्यांना दिलेले महत्त्व ह्याच्यासारख्या सर्व अथवा बहुतेक सर्व गोष्टी तर अप्रतिम असून त्या इतर कोठेही आढळत नाहीत.

# प्रकरण ३७

## भविष्यकाळचे धोरण

(मू. ग्रं. पा. ५।१६५८–१७११)

इ. स. १७६५ मध्ये ब्रिटिशांच्या सत्तेखाली भारताचा बराचसा प्रदेश आला आणि त्याच्या नंतर क्रमाक्रमाने भारतांतील अनेक प्रदेश त्यांच्या ताब्यात येऊन इ. स. १८४५ मध्ये सर्व भारत त्यांच्या ताब्यात आला. इ. स. १९४७ मध्ये ब्रिटिशांनी भारत सोडले आणि अशा रीतीने भारतातील निरनिराळे प्रदेश ब्रिटिशांच्या अमलाखाली सुमारे १०० ते १८० वर्षेपर्यंत होते. ह्या काळात सर्व भारतभर एक राज्यपद्धती अमलांत आली, पाश्चात्य पद्धतींची न्यायालये स्थापन करण्यात आली, कायदेकानू सर्व भारतीयांना भेदभाव न करता लागू होऊ लागले, सर्वांना एकाच दर्जाचे मानणारी शिक्षणपद्धती, वर्तमानपत्रे, वाहतुकीची अधिक चांगली साधने, आधुनिक विज्ञान, इंग्रजी वाङ्मय आणि कला, व्यक्तिस्वातंत्र्याची कल्पना, पाश्चात्य पद्धतीची राहणी (निदान मोठ्या शहरात) अशा अनेक गोष्टी अस्तित्वात आल्या. ब्रिटिशांच्या सत्तेच्या कालावधीमध्ये भारतामध्ये करण्यात आलेले फेरफार इतके मोठे होते की तितके फेरफार ब्रिटिश येण्यापूर्वीच्या अनेक शतकांत झालेले नव्हते. ह्या फेरफारांचे तसेच भारताला स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर झालेल्या गोष्टींचा हिंदु समाजाच्या प्राचीन ध्येयांवर आणि महत्वाच्या मानलेल्या गोष्टींवर नजीकच्या भविष्यकाळांत काय परिणाम होण्याचा संभव आहे ह्याचे विवेचन संक्षेपाने प्रस्तुत प्रकरणामध्ये करावयाचे आहे.

ब्रिटिशांच्या ताब्यात भारत होता त्या काळी त्यांची वसाहतपद्धती पूर्णत्वाला पोचलेली होती. भारतांतील कच्चा माल इंग्लंडमध्ये नेऊन त्याच्यापासून तयार केलेला माल भारतात आणणे, राजकीय बाबतीत पूर्ण पारतंत्र्य, प्रमुख आर्थिक बाबी परकीयांच्या ताब्यांत, भारतांत गुंतवलेले भांडवल परकीय असून त्याच्यावर भरपूर नफा अथवा व्याज देण्याची राज्यकर्त्यांनी दिलेली हमी, मोठे उद्योगधंदे परकीयांच्या ताब्यांत आणि त्यांचे धोरण परकीयांच्या हिताची काळजी घेण्याचे, जमीन आणि लोक ब्रिटिशांच्या हिताची साधने इत्यादि गोष्टी त्या वसाहत पद्धतीची प्रमुख अंगे होती. त्या पद्धतीने भारतांतील द्रव्य शोषण १०० हून अधिक वर्षेपर्यंत करण्यांत येऊन भारत हा सर्व जगांतील अत्यंत दरिद्री देशांपैकी एक बनला. भारताला राजकीयदृष्ट्या शांतता आणि ऐक्य ह्यांची प्राप्ती झाली परंतु त्याच्या मोबदला अत्यंत दारिद्र्य आणि उपासमारी ह्यांच्या रूपाने किंमत द्यावी लागली. देशातील राज्यकारभारात ब्रिटिशांचे पूर्ण वर्चस्व असे. सैन्यातील आणि मुलकी कारभारातील अधिकारी मुख्यत्वे ब्रिटिश असत, शिक्षणाचे धोरण दुभाषाचे काम करणारे लोक निर्माण करणे हे होते.मेकॉलेने म्हटल्याप्रमाणे असे लोक वर्णाने भारतीय असले तरी त्यांच्या आवडी निवडी, मते, नीतिपर कल्पना, बुद्धिमत्ता इंग्लिश असावी असे शिक्षण त्याना दिले जात असे. संस्कृतसकट सर्व विषय इंग्रजीतून शिकविले जात त्यामुळे शिकणाऱ्यांचे मोठे श्रम वाया जात. शास्त्रीय आणि धंदेविषयाकडे दुर्लक्ष होऊन भाषाविषयाचा प्रमाणाबाहेर प्रसार झाला. सर्वसाधारण समाज आणि शिकलेले लोक ह्यांच्यामध्ये बहुतांशी अलंघनीय दरी उत्पन्न झाली. देशातील बराच मोठा भाग ब्रिटिशांच्या ताब्यात गेला होता तरी १०० वर्षे पर्यंत अवघी तीन विश्वविद्यालये स्थापन केली होती आणि तीदेखील केवळ परीक्षा घेणारी होती. सन १९२० पर्यंत सर्वस्वी सरकारने चालविलेले विज्ञानाचे एकही महाविद्यालय मुंबई प्रांतात अस्तित्वात नव्हते. परंतु ह्या शिक्षणाचा परिणाम मात्र ब्रिटिशांच्या अपेक्षेहून उलट प्रकारचा झाला. मिशनऱ्यांच्या प्रयत्नाने खालच्या वर्गातील आणि आदिवासी ह्यांच्या मधील काही थोड्या लोकांखेरीज फारच थोड्या भारतीयांनी ख्रिस्तीधर्म स्वीकारला आणि शिकलेल्या लोकांत

राष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न झाली. राजकीय चळवळ वाढत गेली. शेवटी केवळ धर्माच्या पायावर भारताची विभागणी करण्यात आल्याकारणाने अत्यंत हिडिस घटना घडून आल्या. लक्षावधी लोकांच्या कत्तली झाल्या आणि लक्षावधि लोकांना आपली घरेदारे सोडून जावे लागले. अशा भारताच्या इतिहासात कधीही न घडलेल्या घटना घडून आल्या. आणि त्याबरोबरच एवढे विस्तृत साम्राज्य परस्परांच्या संमतीने आणि युद्धाशिवाय सोडून दिल्याची जगाच्या इतिहासात अद्वितीय आणि अपूर्व अशी ही गोष्ट घडून आली.

स्वतंत्र भारताची राज्यघटना २६ जानेवारी १९५० रोजी अमलात आली. ह्या राज्यघटनेने भारत हे सर्वसत्ताधारी लोकशाही प्रजासत्ताक राज्य असल्याचे ठरविले आहे. स्वतंत्र भारताचा विस्तार अद्यापि देखील फार मोठा आहे आणि एवढा मोठा प्रदेश कदाचित अशोकाव्यतिरिक्त इतर कोणत्याही राज्यसत्तेखाली नव्हता. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर गेल्या १४ वर्षांच्या अवधीत भारताने केलेल्या कामांपैकी महत्वाची कामे पुढीलप्रमाणे आहेत : सर्वव्यापक लोकशाही राज्याची घटना, अस्पृश्यता निर्मूलन, भारतातील जवळ जवळ ⅓ प्रदेश आणि ⅛ लोकसंख्या असलेल्या ५०० हून अधिक देशी संस्थानांचे विलिनीकरण, राज्यातील प्रदेशांची घटक राज्ये आणि केंद्रशासित प्रदेश अशी सामान्यतः भाषिक एकतेच्या आणि राज्यकारभाराच्या सोईच्या दृष्टीने केलेली विभागणी, वयात आलेल्या सर्व स्त्रीपुरुषांना मताधिकार, समाजवादी पद्धतीचा समाज बनविण्याचे ध्येय, पंचवार्षिक योजना इ. इ.

घटनेने स्थापन केलेले लोकशाही प्रजासत्ताक राज्य ही गोष्ट जवळजवळ १२ शतके तरी भारताला अपरिचित होती. ऋग्वेदाच्या काळापासून भारतात वंशपरंपरा चालणारी राजांची सत्ताच अस्तित्वात होती.

भारताच्या राज्यघटनेमध्ये अनेक दोष आहेत. त्यांतील मुख्य दोष पुढीलप्रमाणे आहेत : (१) घटना फार विस्तृत असूनही तीत अनेक उणीवा आहेत; (२) आमच्या परंपरागत कल्पनांचा संपूर्णपणे त्याग करण्यात आला आहे; धर्मसूत्रात आणि स्मृतीत लोकांचे धर्म (कर्तव्ये) सांगितलेले असतात. सामान्य जनसमूहाला सत्ता प्राप्त झाली आहे परंतु त्याच्यावर कोणत्याही जबाबदाऱ्या नाहीत अशी भावना उत्पन्न झाली आहे. लोकांची कर्तव्ये सांगणारे एकही कलम घटनेत नाही; (३) संस्था आणि संघ स्थापन करण्याचे आणि संप करण्याचे स्वातंत्र्य दिले आहे परंतु सरकारला अथवा समाजाला संकटात पाडणाऱ्या संपावर निर्बंध घातला नाही. संपांचा हक्क प्रथमारंभी खाजगी मालक आणि खाजगी कामगार ह्यांच्यापुरताच द्यावयाला पाहिजे होता; (४) घटनेत वाजवीहून अधिक दुरुस्त्या करण्यात आल्या आहेत. त्यात खाजगी मिळकतीवरील हक्कावर अतिक्रमण करणाऱ्या दुरुस्त्या आहेत, न्यायालयाकडे दाद मागण्याचा हक्क काढून घेतला आहे; (५) विश्वविद्यालयांवरील अधिकार घटक राज्यांकडे दिला आहे, फक्त हिंदुविश्वविद्यालय, मुस्लीमविश्वविद्यालय, दिल्ली विश्वविद्यालय आणि शांतिनिकेतन एवढीच केंद्राच्या अधिकारात ठेविली आहेत; (६) हिंदी ही केंद्र सरकारची अधिकृत भाषा ठरविली आहे. त्यामुळे भावनात्मक ऐक्य निर्माण होण्याऐवजी मोठा कलह निर्माण झाला आहे. भावनात्मक ऐक्य निर्माण करण्याचे राज्यकारभाराची अधिकृत भाषा हे एकमेव अथवा प्रमुख साधन नाही. त्याकरिता शाळेत जाणाऱ्या. मुलांपासून आरंभ करून सांस्कृतिक ऐक्याची भावना निरनिराळ्या साधनांनी लोकांच्या मनात बिंबविली पाहिजे; (७) केंद्र आणि घटकराज्ये ह्यांच्या अधिकारातील विषयांची विभागणी चुकीची झाली आहे. उदाहरणार्थ मादक पदार्थांवरील सत्ता घटक राज्यांकडे दिल्यामुळे काही राज्यांनी मद्यावर बंदी घातली आहे आणि काहींनी घातली नाही आणि त्यामुळे मद्यावरील बंदी सपशेल फसली आहे.

लोकांचे, लोकांकडून चालणारे आणि लोकांच्या हिताकरता चालणारे राज्य ते लोकशाही राज्य

अशी व्याख्या आब्राहाम लिंकनने केली आहे. एवढ्या विस्तृत देशातील सर्वांना राज्यकारभार करू देणे शक्य नसल्यामुळे राज्यकारभार करण्याकरिता काही थोड्या लोकांना निवडून देणे एवढेच लोकांना शक्य असते. प्रत्यक्ष व्यवहारात सर्वात अधिक योग्य असणाऱ्यांनाच राज्य करू दिले जाते असे नाही. भारतातील बहुसंख्य लोक अशिक्षित आहेत. भविष्यकाळी ही परिस्थिती बदलेल ह्या आशेवर पहिली पायरी म्हणून चालू स्थिती चालवून घेणे अवश्य आहे. भावी सामाजिक आणि आर्थिक रचना आमच्या पूर्व परंपरेमधील सर्व चांगल्या गोष्टीच्या तसेच मनु. (१०—६३) आणि याज्ञ. (१·१२२) मध्ये सांगितलेल्या सर्व लोकांना लागू असणाऱ्या कर्तव्यांच्या आणि धर्माच्या पालनाच्या पायावर केली पाहिजे. धर्मातीत राज्य ह्याचा अर्थ नैतिक आणि आध्यात्मिक गुणांशी काही कर्तव्य नसणारे राज्य असा नसावा आणि तसा त्याचा अर्थ नाही. आपल्या नित्याच्या आयुष्यक्रमातील भौतिक आणि शारीरिक गरजांपेक्षा अधिक उच्च असा काहीतरी आपल्या जीवनाचा उद्देश असला पाहिजे. बहुतेक सामान्य स्त्रीपुरुषांच्या दृष्टीने उपयुक्त अशी ध्येये सामान्यतः धर्मच ठरवीत असतो.

राज्यसंस्था ही सर्व लोकांच्या हिताकरिता असली पाहिजे, कोणत्याही एका गटाच्या अथवा जमातीच्या हिताकरिता असता कामा नये. नैतिक आणि आध्यात्मिक गुणांचा प्रत्यक्ष संबंध न येता राहणीचे मान उंचावण्यावर महत्त्व दिल्यामुळे भौतिक सुखोपभोगाची आणि सत्ता संपादन करण्याची इच्छा प्रबळ झाली आहे आणि त्याचबरोबर माल उत्पन्न करण्याकरिता शक्य तितके प्रयत्न करण्याची निकड अथवा कल्पनाही कोणाला वाटत नाही.

ज्या देशात कमीतकमी निर्बंध घालावे लागतात त्या देशातील राज्यसत्ता सर्वोत्कृष्ट समजावी. भारतात सन १९५० ते १९५६ ह्या सात वर्षात जवळजवळ ४५० कायदे एकट्या केंद्र सरकारने केले आहेत आणि त्यांच्यापैकी काही कायद्यांचा हिंदूंच्या कौटुंबिक संबंधावर आणि इतर बाबींवर महत्त्वाचा परिणाम झाला आहे. उदाहरणार्थ दत्तकासंबंधीच्या कायद्याने कोणत्याही स्त्रीला, अविवाहित स्त्रीला देखील दत्तक घेता येतो. धर्मशास्त्राप्रमाणे विधवेला आपल्या पतीच्या पारलौकिक हिताकरिताच फक्त दत्तक घेता येत असे. हिंदु विवाहासंबंधीच्या कायद्याने विवाह हा एकपत्नी विवाह ठरविला आहे आणि कोणत्याही जातीच्या व्यक्तीने कोणत्याही जातीच्यां स्त्रीबरोबर केलेला विवाह कायदेशीर ठरविला आहे. बुद्ध, जैन आणि शीख ह्यांना विवाहाच्या बाबतीत हिंदु समजण्याचे ठरविले आहे. हिंदु समाजाचे मिताक्षरा प्रकारची एकत्र कुटुंबपद्धती हे एक दीर्घकालापासून चालत आलेले वैशिष्ट्य आहे. ही एकत्र कुटुंबपद्धती आणि जातिसंस्था ह्यांनी हिंदु समाजाची अनेक शतकेपर्यंत परकीयांच्या आक्रमणांपासून एखाद्या तटबंदीप्रमाणे संरक्षण करून तो एकत्र राखला. हिंदूंच्या वारसा कायद्याने स्त्रियांना वारसा हक्क दिल्यामुळे ह्या एकत्र कुटुंबपद्धतीवर आघात केला आहे. असा हक्क देण्यात स्त्रियांना न्याय आणि समता देण्याचा हेतु असला तरी त्याचा अतिरेक केला आहे आणि त्यामुळे मृताच्या वारसांची संख्या फार मोठी होण्याचा संभव असून मिळकतीचे इतके तुकडे पडतील की ती मिळकतीची वांटणी न होता दारिद्र्याचीच वाटणी होईल.

कॉँग्रेस पक्षाच्या काही सभासदांना असा विश्वास वाटत असावा असे दिसतें की कायदे करून लोकांना नीतिमान करणे शक्य आहे. मादक पेयासंबंधीच्या कायद्याचा वर उल्लेख केलाच आहे. लोकांची नीतिमत्ता कायद्याने सुधारण्याचा तसाच दुसरा एक छांदिष्टपणाचा प्रयत्न म्हणजे हुंड्यावर घातलेली बंदी होय. ह्या कायद्याने विवाहानिमित्त हुंडा देणारा आणि घेणारा हे दोघेही गुन्हेगार ठरविले असून त्यांना कैदेची आणि दंडाची जबर शिक्षा ठरविली आहे. परंतु हुंड्याच्या व्याख्येला जोडलेल्या खुलाशाने ते शासन जवळजवळ निष्फळ केले आहे. त्या खुलाशात म्हटले आहे की विवाहाच्या प्रसंगी दोन्ही पक्षातील कोणी

दुसऱ्या पक्षाला रोकड, पोषाख, दागिने इत्यादि पदार्थांच्या स्वरूपात दिलेल्या देणग्या विवाहाचा मोबदला म्हणून जर दिलेल्या नसतील तर त्यांचा समावेश हुंड्यामध्ये होत नाही. काही लोकांच्या डोक्यात अशी कल्पना आली की शेतीची जमीन कसणाऱ्याच्या मालकीची असावी. काही राज्यांनी त्याप्रमाणे कायदे करून कुळांना जमिनीचे मालक केले आणि मुलकी अधिकाऱ्यांनी ठरविलेली जमिनीची किंमत जमिनीच्या मालकाला १२ वार्षिक हप्त्यांनी देण्याची जबाबदारी कुळावर टाकण्यात आली आहे. मुलकी अधिकाऱ्यांनी ठरविलेल्या किंमतीबद्दल न्यायालयाकडे तक्रार करण्याची सवलत ठेवली नाही आणि कुळांनी हप्ते न दिल्यास फार भानगडीच्या तरतुदी केल्या आहेत. ह्यामुळे सांप्रतची स्थिती निवळ लुटालुटीची आहे आणि लोकशाही अंमलात आली तर मध्यम स्थितीतील दुय्यम दर्जाच्या लोकांची स्थिती कशी होईल ह्याचे हे एक उदाहरण आहे. प्रस्तुतच्या राज्यसत्तेच्या धोरणामुळे गरीब लोक अधिक गरीब होत आहेत आणि श्रीमंत लोक अधिक श्रीमंत होत आहेत. ज्या देशाला एके काळी ऋषी मान देत असत त्याच देशात समाजसमतावादी मताचा प्रसार होण्याची भीती उत्पन्न झाली आहे.

समाजवादी पद्धतीची समाजव्यवस्था ह्याचा अर्थ समाजाची प्रगती करण्याकरिता योजावयाचे मार्ग व्यक्तीला लाभ देणारे नसून सर्व समाजाला लाभ देणारे असावे आणि त्यांच्या योगाने राष्ट्राच्या एकंदर उत्पन्नात आणि लोकांच्या रोजगारात विशेष लक्षात येण्यासारखी वाढ दिसून यावी आणि त्याबरोबरच निरनिराळ्या व्यक्तींच्या उत्पन्नात आणि संपत्तीत अधिक समपातळी उत्पन्न व्हावी. रशिया आणि चीन ह्या देशांत ज्या प्रकारची एकतंत्री समाजवादी पद्धतीची राज्यसत्ता चालत आहे तशा स्वरूपाची राज्यपद्धती भारतात स्थापन करण्याची आमच्या पुढाऱ्यांची इच्छा नाही असे दिसते परंतु त्यांनी वापरलेल्या संदिग्ध भाषेमुळे समाजवादी पद्धतीचा अर्थ सर्व वस्तु सर्व लोकांच्या मालकीच्या असणे असा होईल आणि अनेक परस्परविरोधी अर्थ होऊ शकतील. रशिया आणि चीन ह्या देशांत ज्या प्रकारच्या बलात्काराच्या पद्धती योजल्या होत्या तशा जुलमी पद्धती अंमलात आणल्या नाहीत तर आमच्या प्रयोगांना ज्या प्रकारची फळे प्राप्त व्हावी अशी आमच्या पुढाऱ्यांची इच्छा आहे आणि अपेक्षा आहे त्या प्रकारची फळें काही एका मर्यादित कालात येणार नाहीत अशी भीति वाटते.

आर्थिक बाबतीत आमच्या राज्यकर्त्यांची अशी कल्पना आहे की आमच्या देशाची आर्थिक व्यवस्था मिश्र स्वरूपाची असेल आणि अशा पद्धतीमध्ये खाजगी आणि सरकारी उद्योगधंदे परस्परांशी सहकार्य करून संपत्ती आणि सुखे ह्यांच्या बाबतीतील लोकामधील विषमता कमी करण्याचा प्रयत्न करतील.

घटनेतील काही विशिष्ट कलमात लोकांना मोठमोठी आश्वासने देण्यात आली आहेत आणि लोकांमध्ये मोठमोठ्या अपेक्षा उत्पन्न केल्या आहेत. ही मोठी आश्वासने आणि अपेक्षा पूर्ण करण्याकरिता जी साधने आणि ज्या व्यवस्था आमचे पुढारी योजित आहेत त्यांत सर्वसामान्य जनतेने स्वार्थत्यागपूर्वक दीर्घोद्योग करावा अशी पुढाऱ्यांची अपेक्षा आहे. परंतु सर्वसामान्य जनतेला फार काळपर्यंत स्वार्थत्यागाच्या, उच्च ध्येयाच्या आणि दीर्घोद्योगाच्या मोठ्या पायरीवर राखता येणे शक्य नाही. वैयक्तिक लाभाची **कल्पना** नाहीशी केली तर बहुसंख्य लोक दीर्घोद्योग मुळीच करणार नाहीत.

आर्थिक बाबतीत ज्या पंचवार्षिक योजना तयार करण्यात आल्या आहेत त्या योजना करणाऱ्यांचे उद्देश, जलद आर्थिक विस्तार आणि रोजगारीत वाढ, उत्पन्न आणि संपत्ती ह्यांच्या बाबतीतील विषमता कमी करणे, आर्थिक सत्ता केंद्रित होण्याला प्रतिबंध करणे, स्वतंत्र आणि समान हक्क असणाऱ्या समाजाच्या महत्वाविषयी लोकमत तयार करणे, सामाजिक न्याय्य स्थिती, काम करण्याचा आणि समान संधि

मिळण्याचा हक्क, किमान राहणीमान मिळण्याचा हक्क ह्या गोष्टी प्राप्त करून देणे हे आहेत.

आर्थिक बाबतीत आमच्या देशाच्या मोठ्या अडचणीच्या बाबी लोकसंख्येची वाढ आणि अन्नाचे उत्पादन ह्या आहेत. आपला देश शेतीप्रधान असूनही प्रचंड लोकसंख्येला खाऊ घालण्याकरिता लक्षावधि टन गहू आणि इतर धान्ये परदेशातून आयात करावी लागतात. विज्ञानातील शोधामुळे मृत्यूचे प्रमाण कमी कमी होत आहे. आमच्या देशातील जननाचे प्रमाण अतिशय मोठे अथवा वाजवीहून अधिक नाही आणि मृत्यूचे प्रमाण इंग्लंड, फान्स ह्यांच्या सारख्या प्रगतीपर देशांच्या सारखेच आहे. परंतु आपल्या देशातील लोकसंख्या आधीच फार मोठी आहे आणि त्यातील बहुतेक लोकांचे उत्पन्न जेमतेम जगण्याला पुरेसे आहे. लोकसंख्येवर आळा घालण्याने देशापुढील सर्व समस्यांचा उलगडा होणार नाही हे खरे असले तरी ही समस्या सोडविल्याखेरीज इतर समस्यांचा उलगडा होणार नाही. लोकसंख्येच्या वाढीवर नियंत्रण घालण्याचे फारच थोडे पद्धतशीर **प्रयत्न** करण्यात आले आहेत. संतती-नियमन ही अत्यंत अवघड आणि नाजूक बाब आहे. एक अथवा अनेक पुत्रांचे महत्त्व भारतातील बहुतेक सर्व—अशिक्षित आणि सुशिक्षित— लोकांत आजच्या घटकेला देखील मान्य आहे. वंध्यत्व आणि गर्भधारणप्रतिबंधक उपाय हे दुधारी शस्त्रासारखे आहेत.

पंचवार्षिक योजनांत लोकांनी करावयाच्या बचतीला फार महत्त्व आहे. दोन पंचवार्षिक योजनांच्या योगाने आमच्या पुढाऱ्यांना परिस्थितीवर काही थोडे वर्चस्व स्थापन करता आले असून भविष्य काळाविषयी थोडा विश्वास आला आहे. तथापि देशातील उत्पादन आणि कार्यक्षमता फार कमी आहे. सर्वसाधारण **जनता** दारिद्र्याने ग्रासलेली असून राहणीमान कमी दर्जाचे आहे आणि त्यामुळे त्यांना फारच थोडी बचत करणे शक्य आहे. विकास योजनांमुळे झालेल्या महागाईमुळे सामान्य लोक असंतुष्ट झाले आहेत. परदेशातून घेतलेल्या साह्याची बेरीज हजारो कोटी रुपये होत आहे आणि त्यातील जवळ जवळ निमी रक्कम अमेरिकन संयुक्त संस्थानाकडून येत आहे. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या अखेरीला म्हणजे इ. स. १९५१ पासून १५ वर्षाच्या अवधीत अमेरिकेचे एकूण कर्ज सुमारे १७५६ हजार कोटी रुपये होईल. हे प्रचंड कर्ज कसे आणि किती वर्षात फेडणार हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे. अमेरिका आणि इतर देशांना द्यावयाच्या एकूण कर्जाची रक्कम तिसऱ्या योजनेच्या अखेरीला सुमारे ११००० कोटी होईल. एकूण मदतीपैकी निम्याहून अधिक मदत अन्नधान्याकरिता दिलेली आहे. १० वर्षात अन्नधान्याचे उत्पन्न शे. ६० टक्के वाढले आहे परंतु त्याच अवधीत लोकसंख्येची वाढ शे. २२ टक्के झाली आहे.

भारताची घटना तयार करणाऱ्यांची आणि आमच्या पुढाऱ्यांची महत्त्वाकांक्षा कल्याणकारी राज्यसंस्था निर्माण करण्याची आणि आर्थिक परिस्थितीत योजनापूर्वक नियंत्रण करून सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीची समाजवादी पद्धतीची पुनर्रचना करण्याची आहे. योजनेतील कार्ये पार पाडण्याकरिता कर बसविणे हे सतत वाढणारे साधन होऊन बसले आहे. प्राप्तीवरील कर, मिळकतीवरील कर, देणग्यांवरील कर, खर्चातील कर, संपत्तीवरील कर, असे पांच कर बसविले आहेत. दुसऱ्या कोणत्याही देशात हे पाचही कर एकदम अस्तित्वात नाहीत. ह्या करांमुळे मध्यम वर्गातील लोकात अनिश्चितपणाची आणि भीतीची भावना आणि श्रीमंत आणि वजनदार समाजात कर चुकविण्याची प्रवृत्ती उत्पन्न झाली आहे. निरनिराळ्या देशांच्या घटना तयार करणाऱ्यांनी कायद्याचे योग्य पालन झाले पाहिजे ह्या गोष्टीचे फार महत्त्व सांगितले आहे. ह्या करांच्या बाबतीत न्यायालयांकडे दाद मागता येत नाही आणि सरकारने नेमलेल्या ट्रायब्यूनलसारख्या अधिकाऱ्यांवर लोकांची वरिष्ठ न्यायालयाइतकी श्रद्धा नाही.

लोककल्याण म्हणजे अन्न आणि शारीरिक आणि आर्थिक सुखसोई असे मानल्यासारखे दिसते. आमच्या घटनेत (शपथेच्या आणि प्रतिज्ञेच्या तरतुदीखेरीज अन्यत्र) देवाचा कोठेही उल्लेख केलेला नाही अथवा उपनिषदे आणि स्मृती ह्यांच्या कालापासून आणि गांधीजींनी देखील मूलभूत मानलेल्या सत्य आणि अहिंसा ह्यांच्यासारख्या नैतिक गुणांचे आणि आध्यात्मिक गुणांचे महत्त्व वर्णन केलेले नाही.

नव्या परिस्थितीत सरकारी अधिकाऱ्यांवर अधिकाधिक नव्या प्रकारच्या जबाबदाऱ्या पडत आहेत आणि त्या पार पाडण्याच्या कामात ते अनभिज्ञ असतात. दोन हजार वर्षांपूर्वी चाणक्याने म्हटले होते की सत्तेने मनाला मद येतो. आर्थिक आणि राजकीय सत्ता जर थोडेसे मंत्री आणि अधिकारी आणि राजकारणी लोक ह्यांच्या हातात केंद्रित झाली तर ती सत्ता इतकी प्रभावी होईल की तिच्यापुढे सांप्रतची संसद पोकळ बाहुले बनेल आणि लोकांचे स्वातंत्र्य काही बाबतीत इतके संपुष्टात येईल की ते एकतंत्री राज्यसत्ता चालणाऱ्या देशातील लोकांना असणाऱ्या स्वातंत्र्यासारखेच जवळजवळ होईल.

अनेक शतकेपर्यंत परकीयांच्या ताब्यात राहिल्यानंतर आपल्या देशाने आता स्वातंत्र्य मिळविले आहे. त्यामुळे आपल्या लोकांना विधायक स्वरूपाचे विचार करण्याची आणि कृती करण्याची फार मोठी संधि प्राप्त झाली आहे. नवी समाजरचना करताना हिंदुधर्माची मूलभूत तत्त्वे आणि सिद्धान्त टाकून देण्याची आवश्यकता नाही परंतु त्या तत्त्वांना आणि सिद्धांतांना नव्या परिस्थितीला उपयुक्त होतील अशा नव्या दिशा दिल्या पाहिजेत. धार्मिक आणि नित्य व्यवहारातील वर्तन ह्यांच्या संबंधी एक सर्वसंग्राहक स्वरूपाचा संग्रह अथवा घटना तयार करणे आवश्यक आहे. अशा तऱ्हेचे प्रयत्न वाई येथील स्वामी केवलानंद सरस्वती ह्यांच्या मार्गदर्शनाखाली स्थापन झालेल्या 'धर्मनिर्णय मंडळ' ह्या संस्थेने केले आहेत. ह्या विषयावर समाजात विचार मंथन झाले पाहिजे.

आतापर्यंत आपल्या घटनेतील आणि पुढाऱ्यांच्या धोरणातील काही ठळक गुणदोषांचे विवेचन केले. भावीकाळाविषयी विचार करताना गेल्या थोड्या शतकात आपल्या समाजाची भयंकर अवस्था झाली तिच्यामुळे धीर खचू देता उपयोगी नाही. गेल्या ३००० वर्षांतील आपल्या यशाकडे आपण पाहिले पाहिजे. आपली लोकसंख्या ४३ कोटीहून अधिक आहे, आपल्या पूर्वजांनी मिळविलेल्या यशाबद्दल आपणाला अभिमान आहे, तेव्हा जर आपण अनेक वर्षेपर्यंत एकविचाराने आणि बुद्धिपूर्वक प्रयत्न केले तर आपला देश जगातील इतर देशांच्या पुढे जाणे अथवा निदान त्यांच्या बरोबरीला येणे अशक्य नाही.

आपल्या ऋषींनी आपल्या संस्कृतीचा पाया घालताना असे आवर्जून सांगितले आहे की मनुष्याचा वैयक्तिक आत्मा आणि जगदात्मा ह्यांच्यामध्ये ऐक्य आहे आणि ते ऐक्य आपल्या वर्तनात आणि आपल्या जीवनात अनुभवाला आणणे हाच मनुष्याचा प्रयत्न असला पाहिजे. भगवद्गीतेत (२·४७) फलाची अपेक्षा न करिता आपले कर्तव्य करण्याचे महत्त्व वर्णन केले आहे.

इतर देशांवर आणि समाजांवर लष्करी आणि राजकीय सत्ता मिळविणे हा भारतीय संस्कृतीचा मुख्य उद्देश नव्हता. त्यामुळे भारतीयांना आक्रमणाकरिता आणि संरक्षणाकरिता सुसंघटित करण्याकडे आपल्या संस्कृतीने दुर्लक्ष्य केले. परंतु आता जीवनकलह चालू असलेल्या सध्याच्या परिस्थितीत आपण आपल्या संस्कृतीच्या सनातन स्वरूपाच्या ध्येयावर नजर ठेवली पाहिजे आणि त्याच्याबरोबरच आपल्या देशबांधवांच्या ऐहिक सुखाकडेही लक्ष दिले पाहिजे. आपल्या समाजाची पुनर्रचना करीत असताना धर्मश्रद्धायुक्त जीवन, सत्याची आवड आणि विश्वबंधुत्वाची—निदान आपल्या देशबांधवांबद्दल बंधुत्वाची

भावना आणि श्रद्धा, शांतीची आवड, गांजलेल्या लोकांबद्दल सहानुभूति, हे श्रेष्ठ नैतिक गुण प्राप्त करून घेण्याकरिता सर्व लोकांनी प्रयत्न केले पाहिजेत. प्राचीन ग्रंथांवर आधारलेल्या धर्मसमजुतींवर तर्क आणि विज्ञान ह्यांच्या आधारावर नियंत्रण घातले पाहिजे. पूर्वीच्या धर्मश्रद्धेची इमारत मोडून पडत आहे. आणि लोकांमधील नीतिमत्तेमध्ये शिथिलता वाढत आहे. तथापि काही झाले तरी आपण आपल्या समाजाची रचना अशी केली पाहिजे की, त्यात कुटुंबाला समाजाचा घटक मानला जाईल आणि कुटुंबाचे अस्तित्व टिकविले पाहिजे. समाजातील सर्व स्थितीतील आणि सर्व देशातील प्रत्येक मुलाला आणि मुलीला शिक्षण मिळविण्याची समान संधी मिळाली पाहिजे, प्रत्येकाचे नित्याचे काम हे पवित्र कार्य आहे आणि तीच ईश्वराची उपासना आहे असे मानले गेले पाहिजे, संपत्ती आणि मिळकत ह्यांच्यामधील अतिरिक्त विषमता नाहीशी केली पाहिजे.

प्रस्तुत ग्रंथाची समाप्ति कठ उपनिषदातील (३·१४) एका अवतरणाने आणि रवींद्रनाथ टागोर ह्यांच्या गीतांजली ह्या काव्यातील एका अवतरणाने करू

कठ उपनिषदात म्हटले आहे की “उत्तिष्ठत, जाग्रत प्राप्यवरान्निबोधत क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया दुर्गं पथस्तत्कवयो वदन्ति ॥” (अर्थ : उठा, जागे व्हा आणि बुद्धिमान गुरु प्राप्त करून घेऊन सत्य समजून घ्या. वस्तऱ्याच्या धारेवर चालणे अवघड असते, त्याप्रमाणे आत्मज्ञान प्राप्त करून घेण्याचा मार्ग अवघड आहे असे सूज्ञ लोक म्हणतात.)

“हे माझ्या पित्या, जेथे मन भयरहित आहे आणि मस्तक उंच केलेले आहे, जेथे ज्ञान प्रतिबंधरहित आहे, जेथे आकुंचित स्वरूपाच्या अंतर्गत भिंतींनी जगाचे लहान लहान तुकडे पडलेले नाहीत, जेथे शब्द सत्याच्या अंतरंगापासून निघत असतात, जेथे अविश्रांत श्रम करून पूर्णत्व संपादन केलेले असते, जेथे निर्मल विचाराचा प्रवाह जुनाट संवयीरूपी भयाण वाळवंटात लुप्त झालेला नसतो, जेथे तू लोकांच्या मनाची प्रवृत्ती सतत विशाल होणाऱ्या विचारांकडे आणि कृत्यांकडे करीत असतोस, अशा प्रकारच्या स्वातंत्र्याच्या स्वर्गात माझा देश जागा होवो.”

(रवींद्रनाथ टागोरकृत गीतांजली!)

**(खंड ५ भाग २ समाप्त)**

# समारोप

(मू. ग्रं. पा. ५II - XXII)

प्रस्तुत ग्रंथकाराच्या अनेक स्नेह्यांनी आणि हितचिंतकांनी आणि धर्मशास्त्राचा इतिहास ह्या ग्रंथाच्या काही वाचकांनी आग्रह केल्यामुळे त्याच्या चरित्रातील काही तपशील, तसेच त्याने हे कार्य कोणत्या परिस्थितीमुळे अंगावर घेतले, त्याकरिता काय तयारी करावी लागली, ह्या कार्याला किती वेळ आणि किती श्रम खर्ची घालावे लागले आणि ह्या कार्यापासून त्याला किती द्रव्याची प्राप्ती झाली ही माहिती थोडक्यात पुढे दिली आहे.

आत्मचरित्र लिहिणे हे अतिशय अवघड आणि नाजूक काम असते. पुष्कळवेळा त्याला 'मी' 'माझे' इत्यादिसारखे शब्द योजावे लागतात आणि त्यामुळे लेखकावर अहंमन्यतेचा आरोप केला जाण्याचा संभव असतो. मी आपल्या स्वतःच्या मातापितरांविषयी अथवा माझ्या पूर्वजांविषयी अथवा माझ्या कौटुंबिक जीवनाविषयी अथवा माझ्या स्वतःच्या आवडीनावडींविषयी फारसे काही लिहू इच्छित नाही. इतरांप्रमाणेच माझ्याही वाट्याला काळज्या, अडचणी आणि दुःख ह्या गोष्टी आल्या, परंतु त्यांच्याविषयी मी फारसे काही सांगणार नाही; कारण ज्या सुखाच्या गोष्टी मला मिळाल्या त्या अशा अडचणींच्या आणि दुःखांच्यापेक्षा फारच अधिक होत्या. माझ्या दीर्घ आयुष्यातील काही गोष्टी लोकांना बोधपर वाटतील आणि मला ज्या प्रकारच्या प्रसंगांना तोंड द्यावे लागले तशाच प्रकारचे प्रसंग ज्यांच्यावर येतील त्यांना उपयुक्त वाटतील अशी मला आशा आहे.

माझा जन्म ७ मे १८८० रोजी रत्नागिरी जिल्ह्यातील चिपळूण ह्या गावाजवळच्या पेढे अथवा परशुराम ह्या नावाच्या एका क्षेत्रात माझ्या मामाच्या घरी झाला. माझे वडील रत्नागिरी जिल्ह्यातील खेड नावाच्या गावाच्या जवळच्या मुर्डे ह्या खेडेगावात राहणाऱ्या भिक्षुक कुटुंबातील होते. त्यांच्या वयाच्या १८ व्या वर्षापर्यंत त्यांना भिक्षुकी चालविण्याचे शिक्षण देण्यात येत होते. परंतु त्यांना भिक्षुकीचा व्यवसाय आवडला नाही आणि ते एका बालमित्राच्या बरोबर इंग्रजी शिकण्याकरिता पुणे येथे गेले. (ह्या बालमित्राचे नाव शंकर बाळकृष्ण दीक्षित असून त्यांनी पुढे ज्योतिषशास्त्रावर डॉ. थिबो ह्यांनी प्रशंसा केलेला एक मराठी ग्रंथ लिहिल्यामुळे ते सुप्रसिद्ध झाले होते). माझे वडिलांनी मुंबई विश्वविद्यालयाची मॅट्रिक्युलेशन परीक्षा देऊन पुढे वकीलीची परीक्षा दिली आणि रत्नागिरी जिल्ह्यातील दापोली येथे तालुका वकील ह्या नात्याने सन १८७८ पासून वकीली करण्यास प्रारंभ केला. त्यांनी सुमारे ४० वर्षे वकीली केल्यानंतर ते निवृत्त झाले आणि इ. स. १९२५ मध्ये निवर्तले. सहा बंधु आणि तीन बहिणी अशी आम्ही नऊ भावंडे होतो. मला एक मोठी बहीण होती आणि मी बाकी सर्व भावंडात मोठा होतो. माझ्या बाल्यावस्थेत माझ्या वडिलांनी मला फलज्योतिषशास्त्राची मूलतत्त्वे शिकविली होती आणि अमरकोशातील अनेक श्लोक पाठ करावयास सांगितले होते. सन १८९१ मध्ये मी दापोली येथील ख्रिस्ती मिशनच्या माध्यमिक शिक्षणाच्या विद्यालयात नाव घातले आणि सन १८९७ मध्ये मॅट्रिक्युलेशनची परीक्षा ३० व्या क्रमांकाने उत्तीर्ण झालो. ह्या विद्यालयात शिकत असताना मला वयाच्या १६ व्या वर्षी आम्लपित्ताचा व पोटदुखीचा आणि ओकाऱ्या येण्याचा विकार झाला आणि त्यामुळे मला जवळजवळ १ वर्षभर शाळा सोडून द्यावी लागली. मी मॅट्रिक्युलेशन उत्तीर्ण झालो त्यावेळी मुंबई आणि पुणे ह्या दोन्ही ठिकाणीच महाविद्यालयातील शिक्षण मिळण्याची सोय होती आणि त्या दोन्ही ठिकाणी त्यावेळी प्लेगची जोराची साथ चालू होती. त्यामुळे माझ्या वडिलांनी मला त्यांच्याजवळ कायद्याचा अभ्यास करावयास सांगितले. परंतु तो रुक्ष अभ्यास मला न आवडल्यामुळे मी मुंबई येथील स्काटिश मिशनच्या विल्सन महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. मॅकिकन ह्यांना पत्र लिहिले आणि प्रत्यक्ष हजर न

राहता अभ्यास करणारा विद्यार्थी म्हणून माझे नाव त्यांच्या महाविद्यालयात दाखल करता येईल का असे विचारले. डॉ. मॅकिकन यांचा फार मायाळू असा लौकिक होता. प्लेगची साथ फार जोरात असल्याकारणाने विश्वविद्यालय गैरहजेरी माफ करण्याचा संभव आहे असे त्यांनी मला कळविले आणि माझे नाव दाखल करण्याकरिता एका सत्राचे (सहामाहीचे) शुल्क म्हणून रु. ३६ पाठविण्यास सांगितले. त्याप्रमाणे पुढे विश्वविद्यालयाने गैरहजेरी माफ केली आणि पहिल्या सत्रात महाविद्यालयात हजर न होता मी जून १८९८ मध्ये दुसऱ्या सत्राच्या आरंभी हजर झालो. मुंबई विश्वविद्यालयाची पहिल्या वर्षाची परीक्षा (हिला त्यावेळी प्रीव्हियस म्हणत) मी नोव्हेंबर १८९८ मध्ये उत्तीर्ण झालो आणि संस्कृत दुसरी भाषा घेणाऱ्या इलाख्यातील सर्व विद्यार्थ्यांत पहिला आल्यामुळे मला रु. १७५ ची एक शिष्यवृत्ती आणि रु. १०० च्या पुस्तकांचे पारितोषिक मिळाले. माझ्या आयुष्यातला हा. पहिलाच भाग्याचा प्रसंग होता. अशा तऱ्हेचे प्रसंग पुढे माझ्या आयुष्यात अनेक आले होते. माझ्या दीर्घ आयुष्यात मला अनेक निस्वार्थी मित्रही मिळाले आणि माझ्या माहितीप्रमाणे केव्हाही कोणी माझा शत्रु झाला नाही. माझ्या बाल्यावस्थेत जडलेल्या दुखण्याने महाविद्यालयातील काळातही माझा पिच्छा सोडला नाही आणि अगदी अलिकडच्या काळापर्यंत ते दुखणे मला फार पीडा देत होते. परंतु मी त्याची फारशी पर्वा न करता आपल्या खाण्यापिण्यावर नियंत्रण घालून नियमित आणि शिस्तीने आयुष्य काढले. विश्वविद्यालयाच्या दुसऱ्या वर्षाच्या (इंटरमीजिएट) परीक्षेत संस्कृत दुसरी भाषा घेणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांत पहिला आल्या कारणाने मला रु. १८० ची शिष्यवृत्ती देण्यात आली. त्यानंतर दोन वर्षांनी सन १९०१ साली मी बी. ए. च्या परीक्षेला बसलो आणि संस्कृतमधील प्रावीण्याबद्दल मला डॉ. भाऊ दाजी पारितोषिक देण्यात आले आणि विल्सन महाविद्यालयातील विद्यार्थ्यात मी पहिला आलो. बी. ए. च्या परीक्षेनंतर मी विल्सन महाविद्यालयात दोन वर्षेपर्यंत दक्षिणा फेलो होतो आणि पहिल्या दोन वर्षाच्या वर्गांना दर आठवड्याला सुमारे तीन तासपर्यंत संस्कृत विषयावर व्याख्याने देत असे. सन १९०२ मध्ये मी पहिली एल. एल. बी. (कायद्याची) परीक्षा पहिल्या वर्गात उत्तीर्ण झालो आणि सन १९०३ मध्ये एम. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झालो आणि मला रु. ४०० चे झाला वेदान्त पारितोषिक देण्यात आले. ह्या पारितोषिकाचे वैशिष्ट्य असे होते की त्या परीक्षेची प्रश्नपत्रिका संस्कृतमध्ये असे आणि त्याची उत्तरे संस्कृतमध्ये लिहावयाची असून ती तीन तासाच्या अवधीत लिहावयाची असत. मुख्य परीक्षक जुन्या पद्धतीने शिक्षण झालेला एक शास्त्री असून तो शांकर वेदान्तामध्ये निपुण असावा लागे. घरच्या आर्थिक परिस्थितीमुळे मी वडिलांच्या सांगण्यावरून सरकारी माध्यमिक विद्यालयात नोकरीकरिता खटपट केली. ह्या कामात देखील डॉ. मॅकिकन ह्यानी शाळाखात्याच्या प्रमुख अधिकाऱ्यांकडे माझी गौरवपूर्वक शिफारस करून मदत केली. आगष्ट १९०४ मध्ये मला रत्नागिरी येथील सरकारी हायस्कूलमध्ये दरमहा रु. ६० पगारावर शिक्षक म्हणून नेमण्यात आले आणि मी एम्. ए. असून मला संस्कृत विषयात ५ शिष्यवृत्या आणि पारितोषिके मिळाली असल्या कारणाने काही थोड्या महिन्यानी तो पगार वाढवून रु. ६५ करण्यात आला. त्या हायस्कूलमध्ये मी ३ वर्षेपर्यंत होतो. सन १९०५ साली सरकारी शाळाखात्यातर्फे घेण्यात येणाऱ्या माध्यमिक शिक्षक प्रमाणपत्राच्या परीक्षेत सबंध मुंबई इलाख्यात पहिल्या क्रमाने उत्तीर्ण झालो. त्याच वर्षी मी मुंबई विश्वविद्यालयाकडे वि. ना. मंडलीक सुवर्णपदकाकरिता (रामायण आणि महाभारतात वर्णन केलेले आर्यांचे आचार आणि त्यांची नीतिमत्ता ह्या विषयावर) एक निबंध पाठविला आणि मला रु. १५० किंमतीच्या पुस्तकांच्या रूपाने पारितोषिक देण्यात आले. त्याच्या पुढीलवर्षी शाळाखात्यातर्फे घेण्यात येणाऱ्या शिक्षणाविषयीच्या नैपुण्याच्या परीक्षेत मी पहिला आलो. त्याच वर्षी (स. १९०६) मी वि. ना. मंडलीक सुवर्णपदकाकरिता “अलंकारशास्त्रावरील वाङ्मयाचा इतिहास” ह्या विषयावंर दुसरा एक निबंध पाठविला आणि मला ते पदक देण्यात आले. एप्रिल १९०७ मध्ये माझ्या स्वतःच्या विनंतीवरून माझी बदली मुंबई येथील एल्फिन्स्टन हायस्कूलमध्ये रु. ७५ वर पांचवा दुय्यम शिक्षक म्हणून करण्यात आली आणि मला संस्कृत विषयाचा मुख्य शिक्षक नेमण्यात आले. सन १९०७ च्या अखेरीला पुणे येथील डेक्कन

महाविद्यालयातील संस्कृतच्या साहाय्यक प्राध्यापकाची जागा रिकामी झाली. त्या जागेचा पगार रु. १२५ द. म. होता. मी त्या जागेकरिता अर्ज केला परंतु त्या जागेवर माझी नेमणूक न करता एल्फिन्स्टन हायस्कूलमधीलच ९ व्या दुय्यम शिक्षकाला नेमण्यात आले. त्या शिक्षकाला मॅट्रिक्युलेशनपासून एम. ए. पर्यंत कोणत्याही परीक्षेत संस्कृतची एकही शिष्यवृत्ती अथवा संस्कृत विषयात पदक मिळाले नव्हते. त्या नेमणूकीबद्दल मी निषेधपत्र पाठविले परंतु त्याचा उपयोग झाला नाही. तो शिक्षक माझ्यापेक्षा अधिक लायक असल्याची एका अधिकाऱ्याने शिफारस केली असल्याचे मला कळविण्यात आले आणि त्या अधिकाऱ्याचे नांव विचारले तेव्हा माझे पत्र उद्धटपणाचे आणि उत्तर देण्याच्या लायकीचे नाही असे मला कळविण्यात आले. ह्यामुळे माझ्या अपमानात भर पडली आणि मी दुसऱ्या एल. एल. बी. च्या परीक्षेला बसण्याचे आणि त्यानंतर सरकारी नोकरी सोडून देण्याचे ठरविले. त्याप्रमाणे मी नोव्हेंबर १९०८ मध्ये दुसऱ्या एल. एल. बी. ची परीक्षा उत्तीर्ण झालो. त्यामुळे मी सरकारी नोकरी सोडण्याचा पक्का निश्चय केला असल्याचा सरकारी शाळा खात्याचा समज झाला आणि म्हणून माझ्या भावनेला थोडेसे बरे वाटावे ह्या करिता मला एल्फिन्स्टन महाविद्यालयात फेब्रु. ते एप्रिल १९०९ अखेरपर्यन्त प्रा. श्री. रा. भांडारकर ह्यांच्या गैरहजेरीत संस्कृतचा हंगामी प्राध्यापक नेमले. एप्रिल १९०९ अखेरीला मी परत एल्फिन्स्टन हायस्कूलमधील जागेवर आलो आणि वकीलीचा व्यवसाय कोठे करावा ह्याचा शोध करू लागलो. मी असे ठरविले होते की सरकारी नोकरी सोडली तर मुंबई येथील वरिष्ठ न्यायालयाच्या अपील शाखेतच वकील होईन. वरिष्ठ न्यायालयातील काम बुद्धीचे आणि दीर्घ परिश्रमाचे असते. त्यावेळी त्या न्यायालयाच्या अपील शाखेत कै. दाजी आबाजी खरे हे वकिलांमध्ये जवळजवळ अग्रभागी होते आणि ते मला आणि माझ्या वडिलांना ओळखत असत. त्यांना सल्ला विचारता त्यांनी असे सांगितले की जर वरिष्ठ न्यायालयात वकीली करावयाची असली आणि ती धरून राहावयाचे असले तर किमान रु. २००० ची रोकड हाती असली पाहिजे. माझेजवळ त्यावेळी एक पै देखील शिल्लक नव्हती आणि घरच्या आर्थिक परिस्थितीत वडिलांकडूनही मदत मिळण्याची शक्यता नव्हती. तेव्हा ही रक्कम गोळा करण्याकरिता जून १९०९ पासून दोन वर्षेपर्यन्त हायस्कुलात लागणारी दोन पुस्तके मी प्रसिद्ध केली आणि महाविद्यालयाला लागणारेही एक पुस्तक प्रसिद्ध केले. शिवाय प्रीव्हियस आणि इंटरमिजिएट परीक्षेकरिता संस्कृतचा परीक्षक मला नेमण्यात आले. अशा रीतीने मी रु. २००० गोळा केले आणि जून १९११ च्या अखेरीला सरकारी नोकरी सोडली. ६ जुलै १९११ रोजी मुंबई येथील वरिष्ठ न्यायालयाच्या अपीलशाखेत वकील म्हणून माझी नोंद करण्यात आली. त्यावेळी मला ३२ वे वर्ष चालू होते.

आयुष्य हा एक अतर्क्य प्रकार आहे. त्यात भाग्याचे प्रसंग आणि संधि भरपूर आलेल्या असतात आणि आपल्या स्वतःच्या प्रयत्नाने आपण त्या प्रसंगांचा आणि संधींचा फायदा करून घेतला पाहिजे. माझ्या वकीलीची पहिली दोन वर्षे फारच हलाखीची गेली. माझ्याकडे काम फारच थोडे येई. काम फारसे नसल्यामुळे मी हिंदुकायदा आणि मुसलमान कायदा हे विषय घेऊन एल. एल. एम. (कायद्याची शेवटली परीक्षा) परीक्षेला बसून तीत सन १९१२ मध्ये उत्तीर्ण झालो. सन १९११ पासून जून १९१८ पर्यंत मी बाणभट्टाची कादंबरी, हर्षचरित, उत्तररामचरित्र ह्यांच्यासारखी पुस्तके विपुल टीपांसह प्रतिवर्षी एक अथवा अधिक प्रसिद्ध केली. शिवाय वरिष्ठ न्यायालयातील वकीलांच्या परीक्षेला बसणाऱ्या विद्यार्थ्यांची तयारी करण्याकरिता शिकविण्याचा एक खाजगी कायद्याचा वर्गही मी चालविला. ह्या कामामुळे दरमहा सुमारे रु. १०० चे निश्चित उत्पन्न सन १९१३ ते १९१७ पर्यंतची चार वर्षे मला मिळाले. आणि त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे कायद्याचा विस्तृत विषय एकट्याने शिकविण्याचे काम केल्याने मला कायद्यातील भानगडीच्या सर्व प्रश्नांत नैपुण्य प्राप्त झाले. मध्यंतरच्या काळात मला रु. ७०० च्या वेतनावर संस्कृत, प्राकृत आणि त्यांच्याशी संबंध असणाऱ्या भाषांसंबंधी सहा व्याख्याने देण्याकरिता विल्सन भाषाशास्त्राचा व्याख्याता नेमण्यात आले. सन १९१३ मध्ये मी रायल एशियाटिक सोसायटीच्या मुंबई शाखेचा सामान्य सभासद झालो. आणि १९१५

मध्ये (रु. ५०० एकदम देऊन) मी त्या संस्थेचा आजीव सभासद झालो. सन १९१५ च्या प्रारंभी मुंबई विश्वविद्यालयाने मला दरमहा रु. १०० पगारावर दोन वर्षाकरिता स्प्रिंगर संशोधक नेमले. माझ्या संशोधनामधील काही भाग एशि. सो. च्या नियतकालिकांत सन १९१७ मध्ये प्रसिद्ध झाला होता. सन १९१६ मध्ये विल्सन महाविद्यालयातील संस्कृतचे कायम प्राध्यापक कै. श्रीधर रामकृष्ण भांडारकर आजारी पडले असताना त्यांच्या जागी प्राध्यापकाचे काम मी विनावेतन केले आणि वेदान्तसूत्रावरील रामानुजभाष्याच्या अत्यंत कठीण भागावर बी. ए. च्या वर्गाला आठवड्यातून तीन तास व्याख्याने दिली. जून १९१७ मध्ये कायद्याच्या सरकारी महाविद्यालयामध्ये मला कायद्याचा प्राध्यापक नेमण्यात आले. ही घटनाही अनपेक्षित अशी होती. त्या जागेकरिता वरीष्ठ न्यायालयाच्या सरन्यायाधीशाने माझे आणि दुसऱ्या एका बऱ्याच जुन्या वकीलाचे अशी दोन नावे सुचविली होती. त्या जुन्या वकिलाने शेवटल्या घटकेला काही कारणाकरिता ती जागा नाकारली आणि ता. २० जून १९१७ रोजी म्हणजे ज्या दिवशी कायद्याचे महाविद्यालय उघडावयाचे होते त्या दिवशी मी वरिष्ठ न्यायालयातील वकीलांच्या खोलीत बसलो असताना माझी त्या जागेवर नेमणूक केल्याची सरकारची तार मला मिळाली. ही नोकरी सुखाची होती. पगार रु. ३०० दरमहा होता आणि काम स्वल्प म्हणजे आठवड्यातून चार दिवस संध्याकाळी ५॥ ते ६॥ पर्यन्त व्याख्याने देण्याचे होते. मी ते काम सन १९१७ ते १९२३ पर्यंत ६ वर्षे केले. त्यावेळेपर्यंत माझ्या इतक्या कमी म्हणजे ६ वर्षाहून कमी काम केलेल्या वरिष्ठ न्यायालयातील अपील शाखेच्या वकीलाला अशा जागी क्वचितच नेमण्यात आले असेल.

सन १९११ च्या सुमारास प्रा. श्री. रा. भांडारकर ह्यांनी सुचविल्यावरून व्यवहारमयूख ह्या ग्रंथाची स्पष्टीकरणात्मक टीपांसह आवृत्ती तयार करण्याचे काम मी अंगीकारले होते. श्री. भांडारकर हे मुंबई सरकारच्या संस्कृत ग्रंथमालेच्या प्रमुख संपादकांपैकी एक होते. परंतु माझ्या आयुष्यातील चढ उतारांमुळे मी त्या कार्याकडे दुर्लक्ष्य केले होते आणि ते सोडून देण्याचे जवळजवळ ठरविले होते. पुढे सन १९१७ मध्ये पुणे येथे स्थापन झालेल्या भांडारकर प्राच्यविद्या संशोधन समितीकडे ह्या संस्कृत ग्रंथमालेचे काम सोपविण्यात आले. त्या संस्थेच्या धुरीणांनी मी अंगीकारलेले काम पुरे करण्याचा मला आग्रह केल्यावरून मी ते मान्य केले आणि त्या कार्याकरिता धर्मशास्त्राचे विस्तृत वाङ्मय वाचण्यास प्रारंभ केला. अशा रीतीने मी तयार केलेल्या नीलकंठकृत व्यवहारमयूखाची संशोधित आणि सटीप आवृत्ती भांडारकर प्रा. सं. समितीने सन १९२६ मध्ये प्रसिद्ध केली. त्या आवृत्तीला जोडलेल्या लहानशा उपोद्घातात धर्मशास्त्रामधील वाङ्मयाचा इतिहास लिहिण्या चे काम आपल्या अंगावर घेतले असल्याची घोषणा मी केली.

डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांनी आपला हजारो पुस्तके असलेला मोठा ग्रंथसंग्रह त्या पुस्तकांची काळजी घेऊन संस्कृत भाषेच्या अध्ययनाचे केंद्र करण्याच्या अटीवर कोणत्यातरी संस्थेला देण्याची इच्छा प्रदर्शित केली होती. तो ग्रंथसंग्रह मिळविण्याकरिता डॉ. बेलवलकर प्रभृति सुमारे ३० लोकांनी पुणे येथे डॉ. रा. गो. भांडारकर ह्यांच्या नांवाची एक संस्था स्थापन केली आणि त्या संस्थेकरिता आपसात वर्गणी गोळा करून एक जागा खरेदी केली. त्या लोकांत मीही एक होतो. सामान्य जनतेने आणि सरकारने त्या संस्थेला मदत दिली. टाटा कंपनीने इमारतीकरिता देणगी दिली. औंध, हैद्राबाद इत्यादि संस्थानांनी देखील नंतर त्या संस्थेला देणग्या दिल्या. त्यात भांडारकर स्मारक प्राच्याविद्या संशोधन समितीने हाती घेतलेली पहिली योजना महाभारताची संशोधित आवृत्ती प्रसिद्ध करणे ही होती. मुंबई सरकारने संस्कृत ग्रंथमालेचे काम त्या संस्थेकडे सोपविले.

धर्मशास्त्राच्या इतिहासाचा पहिला खंड सन १९३० मध्ये प्रसिद्ध झाला. त्यात ७६० पाने असून त्यात कमी अधिक प्रख्यात अशा ग्रंथांची आणि ग्रंथकारांची कालानुक्रमणिका, आणि त्या ग्रंथांचे तुलनात्मक

विवेचन केले आहे. मी भांडारकर संस्थेच्या संस्थापकांपैकी एक असल्यामुळे आणि त्यावेळी वरिष्ठ न्यायालयातील एक यशस्वी वकील असल्यामुळे मला द्यावयाच्या मोबदल्याबद्दल कोणताही करार न करिता मी तो खंड ह्या संस्थेला प्रसिद्ध करण्यास दिला. त्यावेळी माझ्या मनातून तो इतिहास दोन खंडांत पुरा करावयाचे होते आणि तसे त्या खंडाच्या प्रस्तावनेत मी स्पष्टपणे सांगितले होते. परंतु माझ्या बालपणापासूनच्या पोट दुखण्याची भयंकर व्यथा मला त्यावेळी देखील त्रास देत होती. धर्मशास्त्राच्या इतिहासाचा १३६८ पानांचा दुसरा खंड जून १९४१ मध्ये (म्हणजे पहिल्या खंडाच्या प्रकाशनानंतर ११ वर्षांनी) प्रसिद्ध झाला. त्यावेळी माझे वय ६१ वर्षाचे होते आणि ही दुराराध्य व्यथा पाठीस लागलेली होती. ह्या खंडात मूळच्या योजनेत नसलेली श्रौत विधींची सुमारे ३०० पानांची माहिती समाविष्ट झाली आहे. १०८८ पाने असलेला तिसरा खंड आगष्ट १९४६ मध्ये प्रसिद्ध झाला आणि त्यात राजधर्म, व्यवहार आणि सदाचार ह्या तीन विषयांचे विवेचन केले आहे. दुसऱ्या महायुद्धामुळे कागद दुर्मिळ झाला, भांडारकर संस्थेची आर्थिक स्थिती खालावली होती, माझी शारीरिक प्रकृतीही काळजी करण्यासारखी झाली होती, अशा अडचणीत मला भांडारकर संस्थेला रु. ३००० कर्ज म्हणून द्यावे लागते आणि शेकडो रुपये किंमतीचा कागद विकत घ्यावा लागला. चौथ्या खंडाची पाने ९२६ हून अधिक असून तो आगष्ट १९५३ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यावेळी मला ७४ वे वर्ष चालू होते. त्या खंडात पातके, प्रायश्चित्ते, आशौच, शुद्धि, श्राद्ध, तीर्थयात्रा ह्या विषयांचे विवेचन केले आहे. शेवटल्या म्हणजे पाचव्या खंडात अनेक विषय आले आहेत. व्रते आणि काल ह्या विषयांचे विवेचन केलेला ७१८ पानांचा त्या खंडाचा पहिला भाग १९५८ मध्ये वेगळा प्रसिद्ध करण्यात आला कारण त्यावेळी मला हृदयाचा विकार झाला होता आणि ७८ वर्षांहून अधिक वय झाले असल्यामुळे मी त्यातून वाचणार नाही असे वाटले होते. पाचव्या खंडाच्या दुसऱ्या भागात शांति, पुराणे, भारतांतून बुद्ध धर्म नाहीसा होण्याची कारणे, तंत्रे, सांख्य, योग, तर्क, पूर्वमीमांसा, विश्वविद्या, कर्म आणि पुनर्जन्माचा सिद्धांत, भारतीय संस्कृतीमधील महत्वाची लक्षणे, भविष्यकालीन अवस्थेची दिशा ह्या विषयांचे विवचेन आले आहे. हा शेवटला भाग तयार करण्याकरिता सन १९५३ पासून आठ वर्षांहून अधिक काळ निरनिराळ्या प्रकारच्या ग्रंथाचे वाचन आणि लेखन करावे लागले.

सन १९१८ च्या सुमारापासून मला वकील ह्या नात्याने चांगले काम मिळू लागले. मुंबईच्या वरिष्ठ न्यायालयाखेरीज खानदेश, पुणे, सोलापूर ह्यांच्यासारख्या बाहेर ठिकाणच्या जिल्हा न्यायालयांत देखील मी काम केले. माझ्या कॉलेजातील ज्या स्नेह्यांनी, माझ्या वकीलीच्या वर्गातून उत्तीर्ण झालेल्या ज्या माझ्या विद्यार्थ्यांनी माझ्याकडे कायद्याची कामे पाठविली त्यांचा मी फार आभारी आहे.

मुंबई आणि पुणे येथील अनेक बौद्धिक कार्यात मी भाग घेतला. मुंबई विश्वविद्यालयाच्या सीनेटचा मी सन १९१९ ते १९२८ पर्यंत सभासद होतो. भांडारकर संस्थेच्या नियामक आणि इतर समित्यांचा मी सतत सभासद आहे. मुंबई येथील मराठी ग्रंथ संग्रहालयाशी आणि मुंबई येथील ब्राह्मण सभेशी अध्यक्ष, विश्वस्त ह्यांच्यासारख्या निरनिराळ्या नात्यांनी माझा दीर्घ कालपर्यंत संबंध आला आहे.

अनेक संस्थांच्या आणि व्यक्तींच्या न्यायालयातील दाव्यांत मी मोफत कामे केली आहेत. धुळे येथील श्री. जावडेकर वकील ह्यांनी पुरस्कृत केलेल्या रेल्वे संबंधीच्या आणि गरीब आणि निराश्रित लोकांच्या दाव्यांत मी काम चालविले आहे. अशा तऱ्हेच्या दाव्यांतील एक दावा पुणे येथील डेक्कन महाविद्यालयाचा होता. मुंबई सरकारच्या मनांतून ते महाविद्यालय बंद करून ती जागा आणि इमारत एका पारशी सार्वजनिक विद्यालयास विकून टाकण्याचे होते. त्या कामात मी माजी विद्यार्थ्यांच्या बाजूने काम चालविले आणि माझ्या विनंतीवरून सुप्रसिद्ध बॅरिस्टर श्री. जयकर ह्यांनीही काहीही शुल्क न घेता काम

केले. पुढे श्री. वा. गं. खेर हे मुख्यमंत्री असलेले लोकनियुक्त मंत्रीमंडळ अधिकारारूढ झाल्यावर त्या मंत्री मंडळाने त्या दाव्यात तडजोड करून डेक्कन कॉलेज हे वैदिक अध्ययन, उच्च दर्जाचे संस्कृत वाङ्मय, प्राचीन भारतीय इतिहास इत्यादि विषयात संशोधन करणारी संस्था म्हणून चालविण्याचे सरकारने मान्य केले. त्या संस्थेने श्री. जयकर यांना आणि मला माजी विद्यार्थ्यांच्या संस्थेचे सन्मान्य सभासद करून घेतले आणि त्या संस्थेच्या व्यवस्थापक समितीचा मी सन १९३८ पासून आज मितीपर्येत एक सभासद आहे.

अशा प्रकारच्या मोफत चालविलेल्या दाव्यातील एक दावा एका गरीब ब्राह्मण विधवेने पंढरपूर येथील विठोबा देवालयाच्या पुजाऱ्यांविरुद्ध केलेला होता. त्या पुजाऱ्यांनी ती विधवा सकेशा आहे ह्या कारणास्तव तिला इतर हिंदूंप्रमाणे विठोबाच्या मंदिरात मूर्तीच्या पायावर डोके ठेवून पूजा करण्यास प्रतिबंध केला होता. दुसरा एक सार्वजनिक स्वरूपाचा दावा मुंबई येथील ब्राह्मण सभेविरुद्ध मुंबई येथील काही सनातनी मताच्या लोकांनी सार्वजनिक गणपती उत्सवात महार जातीच्या मेळ्याला प्रवेश दिल्याबद्दलचा होता.

सन १९४४ मध्ये मुंबई विश्वविद्यालयाने मला सर लल्लूभाई शाहा व्याख्याता नेमिले आणि मी 'हिंदु चालीरीती आणि आधुनिक कायदे' ह्या विषयावर चार व्याख्याने दिली. ती व्याख्याने विश्वविद्यालयाने पुस्तकरूपाने प्रसिद्ध केली आहेत.

मुंबई येथील एशियाटिक सोसायटीच्या व्यवस्थापक समितीचा मी सुमारे ४५ वर्षे सभासद आहे आणि अनेक वर्षेपर्यंत मी त्या समितीचा उपाध्यक्ष आणि तिच्या नियतकालिकाच्या संपादकांपैकी एक आहे. त्या नियतकालिकात मी अनेक विस्तृत लेख लिहिले आहेत. सन १९४६ मध्ये डॉ. वी. सी. लॉ ह्या थोर विद्वान् गृहस्थाने माझ्या विनंतीवरून एशियाटिक सोसायटीला रु. ३००० ची देणगी दिली आणि पां. वा. काणे ह्या नावाने एक सुवर्णपदक देण्याकरिता निधि म्हणून रु. ५००० ची देणगी दिली. हे पदक माझ्या आवडीच्या विषयात संशोधन केलेल्याला दर तीन वर्षांनी द्यावे अशी अट आहे. ह्या डॉ. लॉ ह्यांना मी समक्ष पाहिलेलेही नव्हते.

७ मे १९४१ रोजी माझ्या ६१ व्या वाढदिवसानिमित्त माझा सत्कार करण्याकरिता 'प्राच्यविद्येतील अध्ययना' संबंधीचा एक ग्रंथ मला देण्यात आला. तो ग्रंथ डॉ. एस. एम. कात्रे आणि प्रा. पी. के. गोडे ह्यांनी संपादन केला असून पुणे येथील ओरिएन्टल बुक एजन्सीचे चालक डॉ. एन. जी. सरदेसाई ह्यांनी प्रसिद्ध केला होता. ह्या ग्रंथांत मुख्यत्वे भारतीय विद्वानांनी आणि काही थोड्या परदेशीय विद्वानांनी लिहिलेले ७४ लेख छापले आहेत.

सन १९४२ मध्ये ब्रिटिश सरकारने मला 'महामहोपाध्याय' ही पदवी अर्पण केली आणि अलाहाबाद विश्वविद्यालयाने 'डॉक्टर ऑफ लिटरेचर' (डी. लिट्) ही सन्मान्य पदवी मला अर्पण केली. सन १९४६ मध्ये मला नागपूर येथे भरलेल्या अखिल भारतीय प्राच्यविद्यापरिषदेचा अध्यक्ष करण्यात आले. सन १९४७ साली मुंबई प्रांताचे त्यावेळचे मुख्यमंत्री श्री. बा. गं. खेर ह्यांच्या आग्रहावरून दोन वर्षांकरिता मुंबई विश्वविद्यालयाचा कुलगुरु (व्हाइस चान्सेलर) होण्याचे मी मान्य केले. त्या कामाबद्दल वेतन काहीही ठरलेले नव्हते अथवा दुसरे कोणतेही भत्ते मिळावयाचे नव्हते. ह्या कामाकरिता मला प्रतिदिनी केव्हा केव्हा तीन तास घालवावे लागत. श्री. खेर यांनी ते काम आणखी तीन वर्षे करण्याचा मला आग्रह केला आणि त्यावेळचे मुंबई प्रांताचे राज्यपाल सर महाराजसिंग ह्यांनीही कुलपती (चान्सेलर) ह्या नात्याने मला आग्रह

केला. श्री. खेर ह्यांनी त्या कामाबद्दल मासिक रु. २००० वेतन मिळण्याची व्यवस्था करण्याचे कबूल केले आणि वकिलीचे काम सोडून देण्याची विनंती केली. परंतु अनेक कारणांकरिता (आणि ते काम पत्करल्यास आणि कुलगुरुच्या कामाकरिता अधिक वेळ दिल्यास धर्मशास्त्राचा इतिहास ह्या ग्रंथाचे काम मागे पडेल हेही त्यात एक कारण होते) मी ती विनंति मान्य केली नाही. सन १९४५ मध्ये अखिल भारतीय प्राच्यविद्यापरिषदेचे अधिवेशन मुंबई येथे भरले होते. त्यावेळी मी स्वागत समितीचा अध्यक्ष होतो. सन १९४८ साली प्राच्यविद्याविशारदांची आंतरराष्ट्रीय परिषद पारीस येथे भरली होती. त्या परिषदेला भारत सरकारने पाठविलेल्या तीन प्रतिनिधीमध्ये मी एक होतो. सन १९५१ मध्ये त्याच परिषदेचे अधिवेशन इस्तंबूल येथे भरले होते आणि भारत सरकारने पाठविलेल्या प्रतिनिधि मंडळाचा मी प्रमुख होतो. त्या परिषदेमध्ये मी असा प्रस्ताव मांडला होता की "डेक्कन महाविद्यालयाने अंगावर घेतलेल्या ऐतिहासिक तत्त्वांच्या संस्कृत कोशाच्या कामाला युनेस्को ह्या संघटनेने डेक्कन महाविद्यालयाला आपल्या आर्थिक, सामाजिक आणि सांस्कृतिक शाखेतर्फे भरपूर देणगी द्यावी." तो प्रस्ताव एकमताने मान्य होऊन त्याप्रमाणे युनेस्कोन डेक्कन महाविद्यालयाला ५००० डॉलरची देणगी दिली. सदरहू परिषदेचे सन १९५४ चे अधिवेशन केंब्रिज येथे भरले होते आणि भारत सरकारने पाठविलेल्या प्रतिनिधीमंडळाचा मी प्रमुख होतो. केंब्रिजहून मी स्वतःच्या खर्चाने अमेरिकन संयुक्त संस्थानांत गेलो आणि त्या देशांतील प्रिन्स्टन, हार्वर्ड आणि रोचेस्टर ही विश्वविद्यालये पाहिली. लंडन येथील विश्वविद्यालयाच्या प्राच्य आणि आफ्रिकन अध्ययनाच्या विद्यालयाने मला त्या संस्थेचा सन्मान्य सभासद (फेलो) केले. त्या संस्थेच्या, त्यावेळच्या २५ सन्मान्य सभासदांत मीच एकटा भारतीय होतो. सन १९५३ च्या डिसेंबरमध्ये भारतीय ऐतिहासिक परिषदेच्या वाल्टेर येथे भरलेल्या अधिवेशनाचा मी अध्यक्ष होतो.

सन १९५३ च्या नोव्हेंबरमध्ये भारताच्या अध्यक्षांनी मला (पार्लमेंटचा) राज्य सभेचा सभासद नेमले आणि त्या सभासदत्वाची मुदत १-४-५९ मध्ये पुरी झाल्यावर पुन्हा ६ वर्षांकरिता मला सभासद नेमले. पार्लमेंटमध्ये असताना मी अनेक समित्यांवर काम केले. भारतीय अध्ययनाची मध्यवर्ती संस्था स्थापन करण्याविषयी मी केलेली विनंती तत्त्व ह्या दृष्टीने सरकारने मान्य केली असून अशा संस्थेची घटना आणि इतर तपशील ठरविण्याकरिता एक समिती नेमण्यात आली आहे; त्या समितीचा मी एक सभासद आहे. १५ आगस्ट १९५८ रोजी भारताच्या अध्यक्षांनी मला एक गौरवपर पत्र आणि रु. १५०० चे **वर्षासन** दिले. सन १९५९ च्या आगष्टमध्ये भारताच्या अध्यक्षांनी मला प्राच्यविद्येचा राष्ट्रीय प्राध्यापक नेमले. ही नेमणूक ५ वर्षांकरिता असून त्या कामाचे वेतनही बरेच आहे आणि त्याबद्दलची अट एवढीच आहे की मी सध्या करीत असलेले संशोधनकार्य चालू ठेवावे. सरकारकडून द्रव्यप्राप्ती होत असलेली जागा पत्करल्यामुळे मला सप्टेंबर १९५९ मध्ये कायद्याप्रमाणे पार्लमेंटच्या सभासदत्वाचा राजीनामा द्यावा लागला.

सन १९६० मध्ये पुणे विश्वविद्यालयाने मला 'डॉक्टर ऑफ लेटर्स' ही सन्मान्य पदवी अर्पण केली. सन १९५६ च्या आरंभापासून मी कायद्यासंबंधी कोणतेही नवे काम स्वीकारले नाही आणि पूर्वी स्वीकारलेल्या कामांची मी मार्च १९५६ पर्यंत व्यवस्था लावली. सन १९५६ च्या एप्रिलपासून मी आपला काळ सप्टेंबर १९५९ पर्यंत पार्लमेंटचे कामकाज आणि धर्मशास्त्राच्या इतिहासाचा अखेरचा खंड ह्यांवर आणि त्यानंतर फक्त धर्मशास्त्राच्या इतिहासाच्या कामावर खर्च केला आहे.

सन १९१९ पासून सुमारे १९४६ पर्यंत मला वकिलीचे काम भरपूर होते. तरीही ते काम करून वाङ्मयात्मक कामाला मी वेळ कसा काढू शकलो ह्याबद्दल अनेकांनी मला प्रश्न विचारले होते. वरिष्ठ न्यायालयात आठवड्यातून फक्त पाच दिवस काम चालते. सुटीचे दिवस, शनिवार आणि रविवार हे सर्व

दिवस मी वाङ्मयात्मक कामाकरिता नेहमी खर्च करीत असे. न्यायालयातील अपील शाखेत नेहमी दोन न्यायासने असत आणि केव्हा केव्हा तीनही असत. प्रत्येक न्यायासनापुढे प्रतिदिवशी विचाराकरिता पुष्कळ वेळा दहा अपीले फळ्यावर लावलेली असत. कारण जर एखाद्या वकिलाला दुसऱ्या एखाद्या न्यायासनासमोर एखादे काम त्याचवेळी असले तर तो त्या कामातून मोकळा होईपर्यंत ते काम तहकूब ठेवावे असा रिवाज आहे. त्यामुळे एखाद्या वकिलाचे एखाद्या न्यायासनापुढे एकच जरी काम असले तरी ते केव्हा लागेल हे अनिश्चित असल्याकारणाने त्याला त्या न्यायासनात आरंभापासून हजर रहावे लागते. बहुतेक वकील जेव्हा मोकळे असतील तेव्हा आपला वेळ वकिलांच्या खोलीत गप्पा मारण्यात घालवीत असत. परंतु मी असा रिकामा वेळ पुढील आठवड्यात येणाऱ्या अपीलांची टाचणे करण्याकरिता ग्रंथालयात घालवीत असे आणि कामाचे कागद मी क्वचितच घरी वाचीत असे. म्हणून मला प्रत्येक दिवशी सकाळी आणि संध्याकाळी काही तास संस्कृत ग्रंथाच्या अध्ययनाकडे खर्च करिता येत असत. प्रतिदिवशी मी आठ ते दहा तास काम करीत असे. आणि केव्हा केव्हा १०।१२ तासही काम करीत असे. सन १९०४ ते १९५८ पर्यंत मी दिवसा केव्हाही झोपलो नाही-डुलकी देखील घेतली नाही. पन्नास वर्षे मी मुंबई येथील चौपाटीवर रोज सकाळी एक तास फिरावयास जात असतो आणि १९१२ पासून १९५६ पर्यंत मलबार टेकडीवरील (हँगिंग) बागेतही जात असे.

सन १९२५ च्या सुमारास मला पोटाच्या आतड्यातील व्रणाचा (ड्यूडोनल अल्सरचा) विकार असल्याचे क्ष किरणांच्या साहाय्याने दृष्टोत्पत्तीस आले. काही डॉक्टरांनी मला त्याबद्दल शस्त्रक्रिया करून घेण्याचा सल्ला दिला होता तर काही डॉक्टरांनी तसे करू नका असे सांगितले होते. पुढे मी युरोप खंडात प्रवास करीत असताना व्हिएन्ना येथील एका निष्णात जर्मन डॉक्टराने मला असा सल्ला दिला की मी माझी खाण्यापिण्याची चालू पद्धती तशीच चालू ठेवावी आणि ते दुखणे बरेच वर्षांपासून चालत असल्यामुळे त्या वयात शस्त्रक्रिया करून घेऊ नये.

धर्मशास्त्राच्या इतिहासाची साधने जमविण्याची माझी पद्धति पुढीलप्रमाणे आहे : माझ्याजवळ सुमारे १०० टांचणवह्या आहेत. त्यांतील काही निरनिराळ्या विषयावर आहेत आणि काही मधील पाने ए ते झेड ह्यात विभागलेली आहेत. त्या वह्यांत मी वाचलेल्या ग्रंथांमधील महत्त्वाच्या पानांच्या आणि उताऱ्यांच्या नोंदी केलेल्या आहेत. एक मोठ्या आकाराची ५०० पानांची वही फक्त पुराणातील माहितीने भरलेली आहे.

ह्या ग्रंथाच्या लेखनाची माझी पद्धती पुढीलप्रमाणे असे : मी माझ्या हाताने एक पहिला मसुदा लिहित असे. अशी सुमारे १०० पृष्ठे झाल्यावर ती मी काळजीपूर्वक वाचीत असे. केव्हा केव्हा मी अनेक पृष्ठे फाडून टाकून नवा मसुदा तयार करीत असे. तो हस्तलिखित मसुदा टंकलिखित करून त्याच्या दोन प्रती करून घेत असे. छापण्याचे काम पुणे येथे चालत असल्यामुळे वाचून दुरुस्त केलेली एक टंकलिखित प्रत पुण्यास पाठवीत असे. मुद्रिताच्या तीन प्रती (प्रसंगविशेषी चार प्रती) मी स्वतः तपाशीत असे. पांचही खंडांच्या सूचि मी तयार केल्या आहेत. मी लिहिलेल्या आणि मुद्रित केलेल्या ग्रंथांची आणि एशियाटिक सोसायटी, भांडारकर संस्था ह्यांच्यासारख्या संस्थांच्या नियतकालिकात आणि दुसऱ्या नियतकालिकात मी पाठविलेल्या अनेक लेखांची मुद्रित पृष्ठसंख्या कमीत कमी वीस हजार होईल. मसुद्याच्या प्रती टंकलिखित करून घेणे, मुद्रिते तपासण्याकरिता नेमलेल्या एका विद्वान गृहस्थाला वेतन देणे, संस्कृत हस्तलिखित ग्रंथसंग्रह असलेल्या बडोदे, वाराणसी, तंजावर, उज्जयनी ह्यांच्यासारख्या ठिकाणी स्वतः जाणे आणि काही दुर्मिळ संस्कृत हस्तलिखितांच्या युरोप आणि अमेरिकेतील ग्रंथसंग्रहालयातील ग्रंथांच्या फोटोग्राफिक प्रती करून घेणे ह्या कामाकरिता मला बराच खर्च करावा लागला. ह्या ग्रंथांच्या निरनिराळ्या खंडांना लागलेला

छपाईचा एकूण खर्च आणि त्याकरिता भांडारकर संस्थेने मला दिलेले एकूण सन्मान्य वेतन पुढे दिले आहेः—

| | |
|---|---|
| छपाईचा खर्च | रु. ५८,३४२ |
| अद्यापि न बांधलेल्या— | |
| ३९०० प्रतींची बांधणावळ | रु. ७,८०० |
| सन्मान्य वेतन | रु. १८,८०१ |
| एकूण खर्च | रु. ८४,९४३ |

भांडारकर संस्थेने मला खंड १, २ आणि ४ ह्यांच्या बाबतीत प्रत्येक पानाबद्दल रु. ३ दिले आणि खंड ३ बद्दल प्रत्येक पानाबद्दल फक्त रु. २ दिले आणि खंड ५ मधील प्रत्येक पानाबद्दल रु. ४ देण्याचा त्या संस्थेचा मनोदय आहे. टंकलिखित प्रती करणचा खर्च, प्रवास खर्च, हस्तलिखितांच्या फोटोग्राफीक आणि इतर नकला करून घेण्याचा खर्च हे सर्व मी सोसावयाचे आहेत.

अशा तऱ्हेचा.अनेक खंडे असलेला ग्रंथ छापण्याची भारतातील नेहमीची पद्धती त्याकरिता मोठ्या पगारावर एक मुख्य संपादक, अनेक सहाय्यक संपादक, कचेरी वगैरे नेमण्याची आहे. ज्या ग्रंथामध्ये ६००० हून अधिक पाने आहेत आणि जो पुरा करण्याला ३७ वर्षाहून अधिक काळ लागला, तो ग्रंथ लिहिण्याच्या कामाबद्दल भांडारकर संस्थेने मला दिलेली आणि देण्यात यावयाची रक्कम नेहमीच्या पद्धतीप्रमाणे नेमलेल्या मुख्य संपादकाच्या एक वर्षाच्या पगाराइतकीच जेमतेम होईल आणि त्यांतून टंकलिखित प्रती करण्याचा वगैरे सुमारे रु. ३००० चा खर्च वजा केल्यास ती रक्कम तितकी कमी होईल. मला मिळालेत्या नफ्याबद्दलच्या लोकांच्या मनातील विलक्षण कल्पनांचे निरसन करण्याकरिता केवळ ही माहिती सांगावी लागली. एका व्यक्तीने स्वार्थत्याग केल्यामुळेच ६००० हून अधिक पाने असलेल्या ह्या ग्रंथाचे सर्व खंड भांडारकर संस्थेला रु. १८० ला विकता येतात. नेहमीची पद्धती स्वीकारली असती तर ह्या ग्रंथाची किंमत किमान रु. ४०० अथवा त्याहूनही अधिक ठेवावी लागली असती.

सन १९२५ पासून आज मितीपर्यंतच्या गेल्या ३७ वर्षाच्या काळात मला शेकडो मित्रांकडून आणि इतरांकडून, निरनिराळ्या संस्थांपासून आणि ग्रंथांपासून अनेक प्रकारचे साहाय्य मिळाले आहे. ह्या इतिहासाच्या मूळ इंग्रजी खंडांत ज्या व्यक्तींकडून साहाय्य मिळाले त्यांचा नामनिर्देश करून त्यांचे आभार मानले आहेत. आता हे काम पुरे होत आहे ह्याकरिता त्या सर्वांचे मी पुनः मनःपूर्वक आभार मानतो.

विशाल अशा संस्कृत वाङ्मयाचा आणि त्या वाङ्मयाच्या एका शाखेवर मी खर्च केलेल्या परिश्रमांचा आणि कालाचा विचार केला म्हणजे ब्राउनिंग ह्या इंग्रज कवीने म्हटल्याप्रमाणे 'ह्या कार्यसमाप्तीच्या वेळी केलेले काम किती थोडे आहे आणि करावयाचे काम किती अफाट आहे ह्यांच्यामधील अंतर' मनांत येते.